# The Nature of Geography

# भूगोलाचे स्वरूप

मूळ अमेरिकन लेखक

*

रिचर्ड हार्टशॉर्न

मराठी भाषांतरकार

*

मा. स. मराठे




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

प्रथम आवृत्ती–१९९९

प्रकाशक :

सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ
एन्सा हटमेंट, 'डी' ब्लॉक,
आझाद मैदान,
महापालिका मार्ग,
मुंबई–४०० ००१



मुद्रक :

शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार,
सिव्हिल लाईन्स्,
नागपूर–४४० ००१

किंमत : रुपये १८७.००

## अध्यक्षांचे निवेदन

विस्कॉन्सिन विद्यापीठातील भूगोल शास्त्रतज्ज्ञ श्री. रिचर्ड हार्टशोर्न यांनी लिहिलेले " दि नेचर ऑफ जॉग्रफी " या ग्रंथाचे, " भूगोलाचे स्वरूप " हे मराठी भाषांतर सादर करताना महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाला अतिशय आनंद होत आहे. भूगोल शास्त्राच्या तात्विक व तांत्रिक विचारधारांचा तौलनिक अभ्यास करून त्यातून काही सर्वमान्य होतील अशा संकल्पना, व्याख्या व पद्धतींची विधाने करण्याची मनीषा बाळगून प्रस्तुत ग्रंथ लिहिलेला आहे. एक शास्त्रीय व तांत्रिक ग्रंथ म्हणून हा ग्रंथ काहिसा क्लिष्ट होणे स्वाभाविक आहे. पण भूगोल शास्त्राच्या मर्मग्राही अभ्यासकांना व सखोल चिंतकांना ह्याचा खूप उपयोग होईल यात शंका नाही. कारण भूगोल अभ्यासकांच्या, जिव्हाळ्याच्या प्रचलित समस्यांसंबंधीच्या विचारांवर ज्या लेखांचा अर्थपूर्ण प्रभाव पडलेला आढळून आला त्या सर्व अभ्यासलेखांचा या ग्रंथात विवेचक पद्धतीने अंतर्भाव केलेला आहे. भूगोल हा विषय मानवी जीवनाशी अत्यंत जिव्हाळ्याने निगडित आहे. अन्न, ऊन, वारा, पाऊस, झाडे, फळे, पर्वत, नद्या, जंगले, बगीचे नव्हे सर्व प्रकारच्या दैनंदिन गरजा आणि नैसर्गिकता आढळणाऱ्या विविध स्वाभाविक तत्त्वांची उलाढाल भूगोल विषयात अंतर्भूत होत आहे. भूगोल ह्या शब्दाचा अर्थ ह्या भूमीच्या गोलाकारावर जे जे आढळते त्यांचा त्यांचा विवेचक अभ्यास करणारे एक विवेचक शास्त्र म्हणता येईल. अत्यंत व्यापक अशा या विषयावर सर्वसमावेशक विस्तृत ग्रंथ मराठी वाचकांना उपलब्ध करून द्यावा हा हे भाषांतर प्रकाशित करण्यामागे मंडळाचा उद्देश आहे.

हे भाषांतर शास्त्रीय अभ्यासकांना समजेल, काहिशा जटील पण सुस्पष्ट भाषेत श्री. मा. स. मराठे यांनी हे भाषांतर केलेले आहे. स्वतः भाषांतरकारही म्हणतातच की, शास्त्रीय विषयावरील लिखाण भाषांतरीत केले की, ते क्लिष्टच होते. त्यात मूळ ग्रंथाच्या लेखकाने वापरलेली इंग्रजी भाषा, जर्मन भाषेने प्रभावीत झालेली आहे. त्यामुळे तर भाषांतरकाराला मराठीत भाषांतर करणे अधिकच कष्टाचे झाले. पण श्री. मा. स. मराठे यांनी खूप मेहनत घेऊन हे भाषांतर सिद्ध केले याबद्दल मंडळ त्यांचे आभारी आहे. भूगोल शास्त्राचे अभ्यासक या ग्रंथाचे मनःपूर्वक स्वागत करतील असा मला विश्वास वाटतो.

मधुकर आष्टीकर

दिनांक : ९ जानेवारी, १९९८.

अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ.

प्रस्तुत ग्रंथाविषयी थोडेसे . . .

या ग्रंथातील सर्व संदर्भांक, मग ग्रंथाचे क्रमांक असोत नाही तर त्या संबंधीत ग्रंथाचे संदर्भित पृष्ठांक असोत, कंसातच दाखविलेले आहेत. सर्वच संदर्भ ग्रंथ मजकूराशी सलग पण कंसात छापलेले आहेत.

कंसातील पहिला अंक ग्रंथनामाचा निर्देशक आहे, व पुढे स्वल्पविराम टाकून दिलेले एक अगर अनेक अंक त्याच संदर्भग्रंथाचे संदर्भित पृष्ठांक आहेत. ग्रंथनामाचा कंसातील निर्देश क्रमांक हाच संदर्भग्रंथ सूचीमधील त्या ग्रंथनामाचा क्रमांक असतो. ग्रंथकाराचा व त्याच्या ग्रंथाचा ग्रंथमजकुरातच उल्लेख आला असेल तर कंसातील अंक त्या उल्लिखित ग्रंथाच्या फक्त संदर्भित पृष्ठांकांचाच निर्देश करणारे असतात.

एकाच मुद्यावर अनेक संदर्भ द्यावयाचे असतात तेव्हा कंसातील पहिला संदर्भ संपल्यावर अर्धविराम चिन्हाने दुसरा संदर्भ सुरू झाल्याचे सुचविले जाते. दुसऱ्या व पुढील सर्वच संदर्भात प्रथम ग्रंथाचा निर्देशांक व पुढे संदर्भित पृष्ठांक हाच क्रम ठेवलेला आहे. काही ठिकाणी एक अगर अनेक ग्रंथकारांची नावेच फक्त संदर्भासाठी ग्रंथमजकुरात दिलेली असतात तेव्हा त्या प्रत्येक नावापुढे लगेच कंसात एकच अंक छापलेला असतो तो संदर्भग्रंथ यादीतील त्यांच्या त्यांच्या ग्रंथांचा निर्देशांक असतो.

**सूचना.**—मूळ इंग्रजी ग्रंथाच्या अमेरिकी ग्रंथलेखकाने ग्रंथात ठिकठिकाणी in our country, in this country, our Geographers, our views वापरलेल्या अशा शब्दप्रयोगांचे भाषांतर 'आपल्या देशात ', 'आपल्या या देशांत', 'आपले भूगोलकार', 'आपला दृष्टिकोण' असे करणे क्रमप्राप्त होते. अशा सर्व ठिकाणी त्यांचा अर्थ 'आपल्या अमेरिका देशात, आपल्या या अमेरिकेत, अमेरिकी भूगोलकार, अमेरिकी दृष्टिकोण, असा करावा. म्हणजे आपल्या या शब्दाने वाचकांच्या मनाचा गोंधळ होणार नाही.

---

## अनुक्रमणिका

# भूगोलाचे स्वरूप

## मूळ ग्रंथाच्या सातव्या आवृत्तीची प्रस्तावना

या ग्रंथाचे प्रथम प्रकाशन झाल्यानंतर वीस वर्षांच्या काळात भूगोलविषयक विचारप्रणालीसंबंधी नवे विकासकार्य झालेले असल्यामुळे, या ग्रंथातील अनेक निष्कर्षांचा फेरविचार करणे उचित आहे, असे मला वाटू लागले. हे पुनर्विचार मी माझ्या " भूगोलाचे स्वरूप–एक सखोलदृश्य " या ग्रंथातून सादर केले आहेत. हा नवा ग्रंथ सन १९५९ मध्ये रँड, मॅक्नली आणि मंडळी यांनी प्रकाशित केला असून, अमेरिकी भूगोलकारांच्या सभेने एक विषय-प्रतिपादक ग्रंथमालिकेचे पहिलेच पुष्प म्हणून प्रसिद्ध केला आहे. ( यापुढे या ग्रंथाचा उल्लेख ' सखोलदृश्य ' या एकाच शब्दाने केला जाईल). प्रस्तुत ग्रंथात व्यक्त केलेल्या विचारधारेत नंतरच्या चर्चेतून बदल झालेल्या प्रत्येक बाबीत त्या प्रत्येक बदलाची माहिती वाचकांना व्हावी म्हणून त्या त्या ठिकाणी एक टीप देण्यात आली आहे. पुढे दिलेल्या पुरवणी टीपांतून महत्त्वाचे बदल निर्देशित केलेले आहेत :– ३२, ३५, ३६, ३९, ४१, ५१, ५४.

पदवी परीक्षार्थींच्या प्रशिक्षणासाठी प्रस्तुत ग्रंथाचा फार विस्तृतप्रमाणात उपयोग केला जातो याचा विचार करता, ज्या तत्त्वांच्या आधारे हा ग्रंथ लिहिला गेला आहे व ज्यांच्या प्रकाशातच हा ग्रंथ समजून घ्यावयाचा आहे, त्या तत्त्वांचे ग्रंथाच्या मूळ प्रस्तावनेत जसे विधान केले गेले आहे, त्यापेक्षा थोड्या अधिक पूर्णांशाने त्यांचे स्पष्टीकरण देणे इष्ट आहे असे दिसते.

भूगोल क्षेत्राचा आवाका व हेतू यांच्या संबंधीचे एखादे घोषवाक्य प्रस्तुत करावे, किंवा ज्याच्या प्रमाणाने कोणताही विशिष्ट ग्रंथ भूगोल क्षेत्रात प्रवेश देण्यास पात्र आहे अगर नाही याविषयीचा अंतिम निर्णय देणारे ' वेदवाक्य ' (Dictum) उद्घोषित करावे अशापैकी कोणताही हेतू लेखकाच्या मनात कधीच नव्हता. या विषयाबाबत, " अमेरिकी भूगोलातील पद्धतितंत्रविषयक चर्चांतून पाळावयाच्या नैतिक मर्यादा " या शीर्षकाखाली ग्रंथाच्या शेवटी जोडलेल्या पत्रिकेकडे मी वाचकांचे लक्ष वेधत आहे.

अमेरिकी भूगोलकारांमध्ये अनेक वादाचे मुद्दे होते; आणि अद्याप आहेत. भूगोल क्षेत्राच्या विकासाच्या संपूर्ण इतिहासकालात, जे जे लिहून ठेवले गेले आहे त्याच्या प्रकाशात वरील वादग्रस्त मुद्दयांचे परीक्षण करावे येवढाच प्रस्तुत ग्रंथाचा हेतू आहे ; आणि त्याचेच विधान ग्रंथाच्या उपनामात केलेले आहे.

भूतकालाने वर्तमानाला वा भविष्याला आज्ञापत्र दिले अगर तो ते देऊ शकेल, असे कधीच घडले नाही; कारण, प्रत्येक स्वतंत्र भूगोलकार, आपल्या मतांचा अभिव्यक्तीतून आणि

स्वतःच्या आशयप्रधान ग्रंथांच्या रूपांतून सतत विकसनशील असलेल्या आपल्या क्षेत्राच्या स्वरुपात भर टाकतच असतो. तरीही, कोणत्या एका व्यक्तीचा अथवा गटाचा प्रभाव त्यांच्या आधी झालेल्या एकूण विकासकार्याच्या तुलनेने निश्चितपणे अल्पसाच असतो, म्हणूनच, नवागत भूगोलकार आपले पद्धतितंत्रविषयक लिखाण ज्या पूर्वविकास कार्याच्या पायावर उभारावयाच्या प्रयत्नात असतो त्याच्या परिपूर्ण आकलनांवर ते आधारलेले असेल तरच कालौघात ते अत्यंत परिणामकारक होईल. आपल्या आशय-प्रधान अनुसंधानकार्याच्या ओघात विकसित होणाऱ्या दृष्टिकोणांतून व संकल्पनांतूनच पद्धतितंत्रविषयक विचाराची परिणती झालेली असते, आणि त्याचेच सम्यक् दर्शन तशाच आशयप्रधान प्रकाशनांनी घडविलेले असते, हे खरे आहे. परिणामतः सर्व आशयप्रधान साहित्याच्या ओतप्रोत परिक्षणानेच, भूगोलकारांनी आपल्या पद्धतितंत्राचा विचार ज्याप्रकारे केला, त्याच्या वैचारिक स्वरुपाचे उत्कृष्टपणे आकलन करता येईल. अशा स्वरुपाचे अभ्यास जितक्या विस्ताराने आणि सखोलतेने करणे शक्य होईल तितके ते करण्यास विद्यार्थ्यांना प्रोत्साहन देणे निश्चितच इष्ट होईल. सर्वच आशय-प्रधान आणि अर्थपूर्ण साहित्याचे परिक्षण करणे व त्यांतून त्यांच्यातील अनुसूचित पद्धतितंत्रविषयक संकल्पना संक्रमित करणे हे दुर्घट कार्य कोणाही एका अभ्यासकाच्या अवाक्याच्या अगदीच बाहेरचे आहे, असे मला दिसून आले. तसेच, हंबोल्ट, रिटर, रात्सेल अशासारख्या लक्षात भरणाऱ्या एकेका भूगोलकाराच्या ग्रंथातील पद्धतितंत्रविषयक बाजूंचे विश्लेषण त्यांच्या कार्याशी परिचित असलेल्या गुणवत्ताविभूषित अभ्यासकांनी आवश्यक तितक्या विस्ताराने केलेला आहे असे दिसून आले. त्याच अभ्यासलेखांचा मी माझ्या लिखाणासाठी उपयोग केलेला आहे. तथापि, मुळात हा अभ्यास केवळ पद्धतितंत्रविषयक लिखाणांच्या परिक्षणापुरताच सीमित होता. अशी मर्यादा घालूनही, विसाच्या पाढ्यात मोजावे इतके, गेल्या दोन शतकांतील भूगोलकार व त्यांनी निर्माण केलेले साहित्य यांचा समावेश करणे भागच पडले. मात्र, त्यातूनच अभ्यासासाठी हाताळता यावा इतका बेताचा पण समर्पक ठरावा इतक्या विस्ताराचा एक सामग्रीपुंज पुरविला गेला होता, आणि त्याच्या आधारावर व्यावसायिक अभ्यासकांच्या पद्धतीनेच अभ्यास करून " भूगोलाचे स्वरूप व विस्तार " या विषयांसंबंधीच्या विश्वसनीय विधानांची रचना करता येईल, असा विश्वास वाटू लागला.

ही सर्व सामग्री असंख्य प्रकाशनातून, सामान्यपणे अधिकांश ग्रंथांतून म्हणण्यापेक्षा नियतकालिकांतून आणि त्यातही मोठ्या प्रमाणात परकीय भाषांतील प्रकाशनातून इतस्ततः विखुरलेली असल्यामुळे, एक खास हेतू मनात बाळगूनच या ग्रंथांची रचना केली आहे. अशाप्रकारच्या अभ्यासलेखातून ग्रथित झालेले सर्व सारभूत युक्तिवाद व निष्कर्ष सुसंघटित रूपात एकत्र आणणे हाच या ग्रंथाचा हेतू आहे. भूगोलाभ्यासकांच्या जिव्हाळ्याच्या प्रचलित प्रश्नासंबंधिच्या विचारांवर ज्या लेखांचा अर्थपूर्ण प्रभाव पडलेला आढळून आला असे सर्व अभ्यास लेख येथे संघटित स्वरुपात मिळतील. ज्या प्रमाणात या ग्रंथाचा हा हेतू साध्य झाला असेल निदान तेवढ्या प्रमाणात तरी अन्य अभ्यासकांनी त्याची

पुनरावृत्ती अनावश्यक असल्याचे मान्य करावे. या ग्रंथाच्या काहीशा संदर्भकोशासारख्या स्वरुपामुळे ज्या काही अडचणी निर्माण झाल्या त्या प्रत्यक्ष वाचकांनाच या सर्व साहित्याचे अवलोकन स्वप्रयत्नाने करावयास भाग पाडले असते तर उभ्या रहाणाऱ्या अडचणींच्या तुलनेने, फारच कमी होत्या.

या पद्धतीचा एक दुष्परिणाम असा, की अशा ग्रंथांतून पद्धतितंत्रविषयक लिखाणांना आशयप्रधान लिखाणांच्या तुलनेने अनुचित महत्त्व दिले गेल्याचा भास निर्माण होण्याची शक्यता असते, आणि त्या अर्थाची एक गंभीर सूचनाही जारी आहे. त्यामुळेच वेगवेगळ्या भूगोलकारांच्या एकूण ग्रंथ निर्मितीने त्या दोन प्रकारांच्या योगदानांच्या सापेक्ष महत्त्वांचे एक असंतुलित चित्र सादर केले जाण्याची शक्यता आहे. त्याचप्रमाणे निरनिराळ्या भूगोलकारांच्या स्वक्षेत्राच्या विकसनकार्यातील तौलनिक महत्त्वांचे असंतुलित चित्रही प्रस्तुत केले जाण्याची शक्यता आहे. याउलट, आमच्या अभ्यासग्रंथाचा हेतू निरनिराळ्या भूगोलकारांच्या कार्यांचे मूल्यमापन करणे हा नसून गटनिरपेक्षबुद्धिने वेगवेगळ्या पद्धतितंत्रविषयक विचारांची सयुक्तिकता कसाला लावून पहाणे हा हेतू होता. पद्धतितंत्रशास्त्रविषयक स्वतःचे अनुसंधान कार्य सादर करण्याच्या हेतूने ग्रंथप्रकाशन करत असतो, अशा प्रत्येक अभ्यासकावर काही कसोट्या लादल्या जावयाच्या असतात–तशा त्या प्रस्तुत लेखकावर लादल्या गेलेल्या होत्याच. तसेच प्रस्थापित विद्वत्ता प्रमाणांस सतर्कतेने चिकटून राहून पूर्वसूरींच्या ग्रंथांत आढळणारा एतद्विषयक पुरावा प्रस्तुत करण्याची त्याच्यावर सक्ती असते. अर्थातच, " लेखकांवर लादल्या गेलेल्या अशा कसोट्यांची सयुक्तिकता कसाला लावून पहाण्याची पात्रता वाचकांत असावी लागते ". मी माझ्या १९४८ च्या पत्रकात " पद्धतितंत्रविषयक चर्चांमध्ये पाळावयाची नैतिक तत्त्वे ". या शिर्षकाखाली याच तत्त्वाचा उहापोह केलेला आहे, आणि पुढेही " भूगोलातील अपवादवाद " या शिर्षकाखालील माझ्या नंतरच्या एका पत्रकाच्या प्रस्तावनेतही तसा केला आहे. अमेरिकी भूगोलकारांची समिती या संस्थेचे वार्षिक नियतकालिक, खंड XLX (१९५५), पाने २०५ ते २०८.

वेगवेगळ्या एक हजारांहून अधिक संदर्भांच्या सहाय्याने रचलेला ग्रंथ गैरविधानांपासून अथवा गैरसमजांपासून पूर्णतया मुक्त असू शकतो असे म्हणणे धाष्टर्याचे होईल. औपचारिकपणे झालेल्या चर्चांतून अशाप्रकारची एकही बाब प्रदर्शित करण्यात आलेली नसली तरी, पत्रव्यवहारांतून अशा कितीक बाबी माझ्या नजरेस आणल्या गेल्या आहेत; आणि माझ्या पदवी-परिक्षार्थींच्या समवेत केलेल्या अवलोकनांतून त्याहीपेक्षा जास्त बाबी उघडकीला आल्या आहेत. अशी प्रत्येक बाब एका संक्षिप्त टीपेने दुरूस्त केलेली असून, प्रस्तुत आवृत्तीत ती पुरवणी म्हणून जोडली आहे. ग्रंथलेखनकाळातही उपलब्ध असलेले सर्व पद्धतितंत्रविषयक साहित्य पूर्णपणे ग्रंथाच्या आवाक्यात आणण्याचा मूळ हेतू अधिक पूर्णत्वाने सफल व्हावा म्हणून १९३९ सालीच छापल्या जात असलेल्या, पण माझ्या लक्षात उशिरा आलेल्या व

मुद्याला धरून असलेल्या लिखाणांचेही संदर्भ १९३९ मध्येच या ग्रंथात ग्रथित केले गेले आहेत. पुरवणी टीपा क्रमांक २, १३, १४, १८, २२, २८, ४५, ५० मध्ये ज्यांचा उल्लेख आला आहे अशांचा येथे मुद्दाम उल्लेख करावासा वाटतो.

नोव्हेंबर ७, १९६०.

रिचर्ड हार्टशोर्न,
विस्कॉन्सिन विद्यापीठ.

## भाषांतरकाराची प्रस्तावना

प्रस्तुत भाषांतरासाठी घेतलेला "The Nature of Geography" हा ग्रंथ भूगोलशास्त्राच्या तात्त्विक व तांत्रिक विचारधारांचा तौलनिक अभ्यास करून त्यातून काही सर्वमान्य होतील अशा संकल्पना, व्याख्या व पद्धतींची विधाने करण्याची महत्त्वाकांक्षा बाळगून लिहिला गेला आहे. शास्त्र म्हटले की त्याच्या संकल्पना आणि व्याख्या आल्या व त्यांची परिभाषा आणि तंत्र आले. कोणत्याही संकल्पनेचे विधान, त्यानुसार तयार झालेल्या व्याख्यांचे प्रवचन त्यांचे प्रायोगिक तंत्र वापरून त्याच्या परिभाषेतच केले जाते. परिणाम असा होतो की, या चौकटीत बसणारी नित्याच्या व्यवहारातील भाषा वापरणे अवघड होऊन बसते. मग ती भाषा मातृभाषा असो, राष्ट्रीय भाषा असो, परकीय भाषा असो ! भाषा वापरताना वाक्यरचना गुंतागुंतीची, भाषाप्रयोग क्लिष्ट व अर्थानुसंधान दुर्बोध होत जाते. तांत्रिक ग्रंथांना तर ते अधिकच अवघड होते. त्यातून, मतामतांची, त्यानुसार केलेल्या व्याख्यांची व त्यांच्या स्पष्टीकरणांची तुलना करून, रुढ ज्ञानसंचन, वर्तमान विचारप्रवाह, समर्पक उदाहरणे यांच्या सहाय्याने व सारासार विचाराने एक सर्वमान्य संकल्पना व सर्वसंमत व्याख्या बनवणे म्हणजे एक अभिशापच वाटावा इतके त्याचे शब्दांकन अवघड असते. या अडचणीमुळेच, इंग्रजी व अन्य परकीय भाषातील तांत्रिक ग्रंथ मराठीत आणि एकूण भारतीय देशी भाषांतूनही, फारसे भाषांतरित झाले नाहीत. जे झाले त्यात पुष्कळसे परकीय तांत्रिक व पारिभाषिक शब्द जसेच्या तसे वापरून धेडगुजरी भाषांतरे केली. काहींनी भाषांतरांऐवजी सुगम रूपांतरे करण्याचा प्रयत्न केला.

अशा स्थितीत आपला हा भूगोलशास्त्रातील तांत्रिक ग्रंथ क्लिष्ट आणि काहीसा दुर्बोध झाला नसता तरच आश्चर्य. कोणी म्हणेल, मग अशा या ग्रंथाचे भाषांतर करण्याचा खटाटोप करावाच कशाला ? एक तर, अशाप्रकारचे पद्धतितंत्रविषयक तौलनिक अभ्यास करणारे, प्रत्येक प्रश्नाच्या संदर्भातील प्रमाणग्रंथांचे व लेखांचे ढीग उपसून त्यांतील सर्व मतामतांचा तौलनिक अभ्यास करून एक सामान्य व सर्वमान्य विचार प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करणारे व पुढील कार्यकर्त्यांना एक अभ्यास-सुलभ असा भौगोलिक विचार-विकासांचे संदर्भ-ग्रंथ पुरविणारे, भूगोलक्षेत्रातील-पद्धतितंत्रविषयक ग्रंथ इंग्लंड-अमेरिकेसारख्या भाषा-समृद्ध देशांत, फ्रान्स-जर्मनीसारख्या ज्ञानसमृद्ध-देशांत आणि आस्ट्रेलिया-न्यूझिलंड-जपान यासारख्या प्रयोग-प्रवण देशांतही फार थोडे आहेत. आपल्या एकाही भारतीय देशी भाषेत अशा व्यापक स्वरूपाचा एकही भूगोल-पद्धतितंत्रविषयक ग्रंथ नाही. दुसरे, हा एकप्रकारे दुर्बोध असणारा इंग्रजी ग्रंथ गेली वर्षानुवर्षे पदवी व पदव्युत्तर अभ्यासासाठी एक प्रशस्तिपात्र अभ्यासग्रंथ म्हणून ' भूगोलाचे स्वरूप व पद्धती ' या भूगोलक्षेत्रातील तांत्रिक विषयाभ्यासासाठी संदर्भ व मार्गदर्शक ग्रंथ या दृष्टीने पुष्कळशा विद्यापीठांतून वापरला जात आहे. तीच स्थिती

महाराष्ट्राच्या सर्व विद्यापीठांतही आहे. या ग्रंथाचे देशी भाषांतून भाषांतर करणे केवळ अशक्य आहे असे अनेक भूगोलतज्ज्ञांनी बोलून दाखविल्यावरून हे मराठी भाषेला व भूगोलाभ्यासकाला आव्हानच आहे असे प्रस्तुत भाषांतरकारास वाटले. मराठी सारख्या समृद्ध भाषेस अशा ग्रंथाचे भाषांतर करणे अगदीच अशक्य नाही, असे भाषांतरकाराचे ठाम मत आहे. म्हणूनच, मराठी-भाषिक भूगोलाभ्यासकांना असा हा अतिमूल्यवान ग्रंथ अभ्यासासाठी उपलब्ध करून द्यावा या हेतूने हे भाषांतराचे कार्य त्याने अंगिकारले.

एक शास्त्रीय व तांत्रिक ग्रंथ म्हणून ' दि नेचर ऑफ जॉग्रफी ' हा ग्रंथ क्लिष्ट झालेलाच आहे. पण, तो अधिकच क्लिष्ट व थोडा अधिक दुर्बोध होण्यास आणखी एक-दोन कारणांचीही भर पडली आहे. एक कारण असे की, प्रस्तुत ग्रंथात लेखक श्री. हार्टशॉर्न यांची भूमिका संकलकाची आहे. भूगोल क्षेत्रात अनुसंधानकार्य करणाऱ्या प्रतिष्ठित पंडितांची एकाच विषयावरील विविध मते स्वरचित संकल्पना व त्यानुसार बनवलेल्या व्याख्या यांचे संकलन लेखकाला करावयाचे होते. शास्त्र हे क्षेत्रच असे आहे की, त्यातील कोणाही एका संशोधक लेखकाची संकल्पना व त्यानुसार केलेली व्याख्या कधीच परिपूर्ण असत नाही; आणि म्हणूनच, ती सर्वमान्य होत नाही. अर्थात, संकलक लेखकाच्या दृष्टीने, एकाच विषयाच्या अनेक संकल्पनांतून एकच व्यापक संकल्पना उभी करणे आणि त्यांच्या सहाय्याने एकच बहुमान्य व्याख्या बनवणे, ही सत्त्वपरीक्षाच असते. त्यातही गुणदर्शन सोपे असते. पण, अशा तोलामोलाच्या संशोधकांच्या संकल्पनांतील वा व्याख्यांतील दोषांवर बोट ठेवून त्यांचे विधानरूपाने शब्दांकन करणे म्हणजेही एक दिव्यच असते. अशावेळी ते विधान सरळ व स्पष्ट असणे केवळ अशक्य होते. म्हणून त्यासाठी आडवळणाची भाषा वापरणे आवश्यक असते. श्री. हार्टशॉर्न यानाही अशी आडवळणाची अनेक विधाने करावी लागली.

शिवाय ग्रंथ लेखक इंग्रजी व जर्मन या दोनही भाषांचा व साहित्याचा गाढा अभ्यासक असल्याने एका भाषेचा दुसऱ्या भाषेतील लिखाणावर प्रभाव पडणे अपरिहार्य आहे. आपल्या मूळ इंग्रजी ग्रंथात, जर्मन भाषेच्या वळणाने इंग्रजी भाषेचा वापर करण्याचा प्रयत्न झाल्यासारखे दिसते. अनेक ठिकाणी गौणवाक्यांचा व वाक्यांशांचा दुरान्वयाने परस्परांशी संबंध जोडलेला आढळतो. दुरान्वय हा प्रकार इंग्रजी-गद्यलेखनात क्वचितच वापरलेला दिसतो. मराठीला तर तो माहीतच नाही. इंग्रजी वाचकालाही अडचणीची वाटावीत अशी ही वाक्ये, गौणवाक्यांचा व वाक्यांशांचा क्रम बदलून व त्यांचा अन्वय लावून मगच भाषांतरित करणे भाग पडते. पण त्यामुळे भाषांतराबरोबर अर्थांतर होण्याचा धोका संभवतो.

ग्रंथाचे भाषांतर म्हणजे त्यातील कळण्यास अवघड असलेला विषय सोपा करून सांगण्याची युक्ती, असा एक सामान्य गैरसमज असतो. ' परभाषेतील ग्रंथाचा अर्थ भाषांतराने सहजपणे कळत नसला तर, त्या भाषांतराचा उपयोग काय ? ' असाही प्रश्न विचारला जातो. असे गैरसमज बाळगणाऱ्या वाचकांना कोणतेच भाषांतर रंजक वाटणार नाही. विषय गहन आहे आणि परकीय भाषेचे ज्ञान तोकडे आहे, तरीही त्याविषयाचे ज्ञान

करून घेणे आवश्यक आहे असेच अभ्यासक भाषांतराकडे वळतात. विद्यार्थ्यांच्या सोईकरता विषय हलका करून सांगणे व भाषा सोपी करून विषय मांडणे, अशा कृत्यांनी विद्यार्थ्यांच्या काही अपेक्षा अंशतः पूर्ण करणारा एक ग्रंथ विद्यार्थ्यांच्या हाती देणे शक्य असते. पण, मग ते रूपांतर झाले असते भाषांतर नव्हे !

भाषांतर जसे रूपांतर नसावे तसे ते वेषांतरही नव्हे. नट नाट्य-निर्मिती अथवा बहुरूपी लोकरंजनासाठी करतो ते वेषांतर आभास निर्माण करण्यासाठी असते. भाषांतर आभासप्रदर्शक नसावे तर ते सत्यार्थदर्शक असावे. मूळ ग्रंथ-लेखकाने व्यक्त केलेला त्या विषयाचा अभिनिवेष, त्या विषयाचे अर्थगांभीर्य, त्या विषयाचे कलेले अर्थ-विश्लेषण आणि त्याला इष्ट असलेले विषय-महात्म्य या सर्वच गोष्टी स्व-भाषेत यथातथ्यपणे उतरविणे हीच भाषांतरकाराची खरी बांधिलकी असते. याचा अर्थ ' भाषांतर म्हणजे शब्दांतर ' असा अर्थ करणे आणखीच धोक्याचे होईल. परभाषेच्या शब्दाला स्वभाषेचा एक शब्द देऊन केलेले शब्दशः भाषांतर म्हणजे भाषांतर नव्हे. भाषांतर शब्दार्थांचे (संदर्भसापेक्ष शब्दार्थाचे) असते केवळ शब्दांचे नव्हे. शब्दप्रयोग, वाक्यप्रयोग, वाक्प्रचार, म्हणी, सुभाषिते, निष्कर्ष, संकल्पना विधाने अशा सर्व ठिकाणी भाषांतर कोणत्याही अंशाने मूळ ग्रंथातील अर्थाला व आशयाला कमी पडता कामा नये. अशा ठिकाणी समांतर व समानार्थ शब्दप्रयोगांचे, वाक्प्रचारांचे व वाक्यप्रयोगांचे त्यांच्या अन्वयार्थाचे महत्त्व त्यांच्या ध्वन्यर्थाने प्रतीत होते, शब्दार्थाने नव्हे. अर्थात भाषांतरकार जसा विषयज्ञ व भाषाज्ञ असावा, तसाच भाषांतर वाचकही विषयाभ्यासक व भाषाभ्यासक असणे आवश्यक आहे. असे झाले तरच, मूळ ग्रंथाची शास्त्र व भाषा या दृष्टीने आशय-गांभीर्य व सरसता भाषांतरात उतरेल व भाषांतरातील ही सरसता व हा आशय रसवत्तेची व गांभीर्याची हानी न होता सर्वार्थाने वाचकापर्यंत पोहोचू शकेल. अशा पद्धतितंत्रविषयक ग्रंथाचा वाचक कोणत्या वर्गातील असणे इष्ट आहे, हे मूळ लेखकानेच जागोजागी सूचविले आहे.

प्रस्तुत भाषांतरकाराच्या मते भाषांतर हे रूपांतर नव्हे की वेषांतर नव्हे किंवा शब्दांतरही नव्हे तर ते केवळ भाषांतर असते. " अन्या भाषा भाषांतरम् ! " या समासविग्रहाने हेच सुचविले आहे. भाषेचा बदल करण्यापलिकडे इतर कोणताही बदल करण्याचा अधिकार भाषांतरकारास असत नाही. मूळ ग्रंथातील विचारांची उंची, विषयांची व्यापकता व सखोलता, अर्थगांभीर्य व भाषेतील ध्वन्यर्थ यांत कोणताही बदल भाषांतरकारने करावयाचा नसतो. मूळ-ग्रंथवाचकांच्या व भाषांतरवाचकांच्या अनुभवाला येणारा ग्रंथातील विषयाभिनिवेश, विषयाभिव्यक्ती व त्याच वाचकांना येणारा भाषाभिनिवेशाचा व भाषाभिव्यक्तीचा येणारा प्रत्यय हे एकरूपच असले पाहिजेत. आणि हे साधावयाचे असेल तर, मूळ भाषेतील क्रियापदे, नामे, विशेषणे, वाक्यप्रयोग, वाक्प्रयोग, वाक्प्रचार, इतकेच काय अर्थनिर्भर शब्दांशही, भाषांतरात ध्वन्यर्थरूपाने जसेच्या तसे उमटले पाहिजेत. त्यात कोणताच बदल होऊ न देण्याची जबाबदारी भाषांतरकाराची असते.

भाषांतरकाराने आपली भूमिका स्पष्ट केली असली तरी, ती भूमिका किती प्रामाणिकपणे वठविली आहे व भाषांतरकारानेच लावलेल्या भाषांतराच्या कसोट्यांना त्याचे भाषांतर किती प्रमाणात उतरले आहे, या गोष्टी अभ्यासकांनी ठरवावयाच्या आहेत. भाषांतरकाराने यथाशक्ती, यथामती भाषांतर करावयाचे असते ; भाषांतराची समीक्षा जाणकार वाचकांनी करावयाची असते.

इ-१५५७-२ अ.

# भूगोलाचे स्वरूप

## संक्षिप्त विषय-सूची

## ( पृष्ठे ९ ते १९ )

[ या ग्रंथात काढलेल्या सर्व अस्तिपक्षी निष्कर्षांचे सारांश उपसंहाराच्या (१२ व्या) प्रकरणात दिलेले असले, तरी अनुभवांती असे दिसून आले की, या ग्रंथात चर्चा केलेल्या सर्वच विषयात गोडी नसलेल्या, पण काही विषयांपुरती गोडी असलेल्या, वाचकांना मार्गदर्शक म्हणून एका प्राथमिक विषय-सूचीची गरज आहे. ]

प्रकरण १ ले :

(अ) अमेरिकी भूगोलाभ्यासक आपल्या अभ्यासक्षेत्राचे स्वरूप व त्याची व्याप्ती यासंबंधी चर्चा करण्यास उत्सुक असले, तरी ते भूतकाळात झालेल्या चर्चांशी, त्याच प्रश्नावर केल्या गेलेल्या अधिक सखोल अभ्यासांशी, आणि विशेषतः परदेशस्थ अभ्यासकाच्या तत्संबंधी कार्याशी, ते अपरिचितच असतात.

(ब) एक ज्ञानव्यवस्था (Discipline) या नात्याने आपल्या क्षेत्राची आधुनिक काळात वाढ होत असली, तरीही त्याची काही लक्षणे अविकारीच असतात, हे समजून न घेतल्यामुळे असंतोष निर्माण होऊ लागला, ते क्षेत्रच सुधारण्याचे वारंवार प्रयत्न होऊ लागले.

(क) ' भूगोल कसा असणे आवश्यक आहे ? ' किंवा ' तो कसा असावा ? ' अशा अपेक्षांसंबंधीचा व्यक्तिगत दृष्टिकोन सादर करण्याऐवजी त्या अपेक्षा हीच एक अनुसंधानक्षम समस्या आहे अशी येथे कल्पना केलेली आहे. प्रथम विद्वान अभ्यासक मंडळींनी तत्संबंधी जे कार्य केले आणि त्या विषयीच्या संकल्पना बांधल्या त्यांचे परिक्षण केलेले आहे (प्रकरण २ रे). नंतर त्यांच्या सहाय्याने भूगोल म्हणजे काय हे निश्चित करण्याचा प्रयत्न केला आहे (प्रकरण ४ थे) व शेवटी एक ज्ञान शाखा या दृष्टीने त्याची लक्षणे व गुणवत्ता तपासून पाहिली आहे (प्रकरण ११ वे). या हेतूंचे अधिक पूर्णपणे केलेले विधान पान ३१ व ३२ यांवर आहे, त्याची दखल घ्यावी. त्याबरोबर बदल घडवून आणण्याबद्दलचे काही प्रस्ताव आणि काही विशिष्ट संकल्पनांवर भर देण्यात यावा असे अमेरिकी भूगोलकारांकडून आग्रहाने आता प्रतिपादिले जाते आहे, पण आपल्या युरोपीय सहाध्यायांनी ज्यांचा अभ्यास बराच आधी केलेलाच आहे, अशा काही अन्य प्रस्तावांचे येथे परीक्षण केलेले असून त्यांची चाचणीही घेतली आहे (प्रकरण ५ ते १०). भूगोलाभ्यासकांनी अगदी गंभीरपणे अणि आग्रहाने मांडलेल्या कल्पनांचा पूर्ण उहापोह करणे इष्ट वाटल्यामुळे या चर्चा अर्थातच लांबलचक आणि

तपशीलवार झाल्या आहेत, कदाचित् काही वाचकांना अशी प्रकरणे म्हणजे, एकूण ग्रंथाचा तिसरा भाग, गाळावा असेही वाटण्याची शक्यता आहे, कारण त्यातील निष्कर्ष नास्तिपक्षीच आहेत. अशी प्रकरणे व विभाग पुढील प्रमाणे प्रकरण ३ रे. ५ व्या प्रकरणाचा ' अ ' हा विभाग, विभाग ' फ ' वगळून सर्वच नववे प्रकरण आणि प्रकरण १० चे ' क ' व ' इ ' हे विभाग.

प्रकरण २ रे :

भूगोलाची पाळेमुळे जरी प्राचीन-अभिजात-कालापर्यंत खोलवर गेलेली असली तरी, एक आधुनिक शास्त्र म्हणून त्याच्या विकासाने युरोपमध्ये, आणि विशेषतः जर्मनीत, १७५० ते १९०० या कालखंडात संघटित रूप धारण केले. भूगोलविषयक संकल्पनांचा विकासेतिहास आणि त्यासंबंधी झालेली भरीव कामगिरी, यांच्या परिक्षणापासून खालील निष्कर्ष निघतातः-

(१) भूगोल हा क्षेत्राक्षेत्रांतील भेदांच्या कार्यकारण संबंधानुसार केलेला भूक्षेत्रांचा अभ्यास असतो. दुसऱ्या शब्दात तो क्षेत्रिय भेदाभेदांचा अभ्यास असतो.

(२) काही अपवाद वगळता, सर्व भूगोलाभ्यासकांनी दोन प्रकारचे दृष्टीकोन मान्य केले आहेत. सर्व जगभर पसरलेल्या, निदान त्याच्या मोठमोठ्या भागांत असलेल्या, विशिष्ट घटकांतील क्षेत्रिय भेदांवर लक्ष केंद्रित करणारे क्रमबद्ध अभ्यास व त्याच्या-बरोबर विशिष्ट क्षेत्रांच्या संपूर्ण भूगोलाचा प्रादेशिक अभ्यास.

(३) प्राकृतिक (नैसर्गिक या अर्थाने) भूगोल आणि मानवी भूगोल ही वाटणी, अर्थात द्वैतवादाचा एक प्रकार, १९ व्या शतकाच्या मध्यकालाचा एक कूटप्रश्न झाला होता. पण याच कालखंडाच्या अंत्यकालात त्याची पुष्कळशी उकलही झाली होती.

(४) भूगोलाभ्यासकांनी केलेल्या प्रत्यक्ष अनुसंधान कार्यांत भूरूपांवर विशेष भर दिला गेल्यामुळे भूरूपशास्त्र (Geomorphology) हे जर्मनीत आणि कदाचित अमेरिका व अन्य देशातही भूगोलक्षेत्राचा एक विभाग म्हणून पक्के प्रस्थापित झाले.

(५) पृथ्वीच्या एकरूपतेची अथवा एक वस्तुत्त्वाची संकल्पना आणि पृथ्वी ही एक सावयव जीव आहे या अर्थाची कल्पनासुद्धा, भूगोलाच्या आधीच्या विकासक्रमात जरी फार महत्त्वाची मानली जात असे, तरी आता तीच जवळजवळ पूर्णपणे वगळण्यात आली आहे.

(६) विशिष्ट प्रदेश हाच आपल्या परीने एक ' एकक ', एक ' स्वयंपूर्ण ' किंवा एक ' सावयवजीव ' आहे या संकल्पनेवर जरी १९ व्या शतकाच्या पूर्वार्धातच टीका होत असे, तरीही अलीकडच्या काही दशकांत तिने जर्मनीत जीव धरला आहे. आता तिची अन्यत्र लावणिही करण्यात आली आहे आणि अनेक अभ्यासकांकडून तिला मोठ्या जोमाने खतपाणी घातले जात आहे.

(७) याच्याशीच संबंधित असलेला " नैसर्गिक प्रदेशाचा " प्रश्न यातच मोडतो. १९ व्या शतकाच्या पूर्वभागात त्याच्यावर क्रान्तिक हल्ले होऊनही तो एक प्रचलित प्रश्न म्हणून आज त्याचा विचार चालूच आहे.

**प्रकरण ३ रे :**

भूगोलक्षेत्राच्या विकासाच्या प्रमुख दिशांतून प्रतिबिंबित होणाऱ्या चित्रापेक्षा अगदी वेगळी परिभाषा वापरून भूगोलाची एक आगळी कल्पना भूगोलाभ्यासकांनी व त्यांच्या गटांनीही पुढे मांडण्याचा प्रयत्न भूतकाळात अनेक वेळा झालेला दिसतो. ऐतिहासिक विकास-प्रवाहापासून भरकटणाऱ्या या प्रयत्नांपैकी काहींना भूगोलाभ्यासकांच्या अलीकडच्या विचारांतही स्थान मिळालेले दिसते. तथापि त्या विचारांना का फाटा मिळाला याची कारणे निश्चित करण्यासाठी त्या त्या संकल्पनेच्या इतिहासाचाही अभ्यास येथे केला आहे, त्यांचा तपशील पुढीलप्रमाणे–

(अ) ज्यांचा अभ्यास शास्त्रीय पद्धतीने करता येणे शक्य नाही असे समजले जाते अशा प्रकारच्या घटना स्वैरपणे वगळून भूगोल हे एक ' तंतोतंत शास्त्र ' अथवा ' सारतः नैसर्गिक शास्त्र ' आहे, अशी भूगोलाची व्याख्या ;

(ब) भूगोल हे भूपृष्ठाचे शास्त्र म्हणण्यापेक्षा भूगोल हे पृथ्वी या ग्रहाचे शास्त्र आहे, अशी भूगोलाची व्याख्या ;

(क) नैसर्गिक पर्यावरण व मानव यांच्या अन्योन्य संबंधयोगांचा अभ्यास म्हणजे भूगोल किंवा नैसर्गिक पर्यावरणाशी जुळते घेण्यासाठी मानवी व्यवहारांनी केलेली सांधे-मोड अशी भूगोलाची व्याख्या; आणि

(ड) भूपृष्ठावरील घटनांचा अभ्यास म्हणजे भूगोल, अशी भूगोलाची व्याख्या.

**प्रकरण ४ थे :**

(अ) भूपृष्ठावरील क्षेत्रिय भेदाभेदांचा अभ्यास ही भूगोलाची संकल्पना व्यावहारिक ज्ञानाच्या दृष्टीने समर्थनीय आहे. कारण, जगाच्या वेगवेगळ्या क्षेत्रांतील गोष्टी वेगवेगळ्या असतात आणि हे फेरबदल कोणत्यातरी परिस्थितीमुळे परस्परांशी कार्यकारण-भावाने संबंधित असतात ही वस्तुस्थिती सर्वश्रुत आहे. बौद्धिक विचारांच्या दृष्टीने आणि व्यावहारिक हेतूंच्या दृष्टीनेही हे बदल कसले आहेत व त्यांचे संबंध कोणत्या प्रकारचे आहेत हे समजून घेण्याची सतत गरज असते. त्यामुळे विविध क्षेत्रांचे स्वरूप कसे आहे हेही समजते.

(ब) " इतर ज्ञानक्षेत्रांच्या संबंधात तशाच एका क्षेत्राचे तर्कसिद्ध स्थान " या विषयाचे विवेचन जवळजवळ एकच प्रकारच्या परिभाषा वापरून कांट, हंबोल्ट आणि हेटनर यांनी केले आहे. विशिष्ट प्रकाराच्या स्थलकालांचा विचार न करता घटनांचा अभ्यास करणारी शास्त्रे, ती क्रमबद्ध शास्त्रे. यांच्याविरूद्ध, काल व अवकाश यांच्या भाषेत परस्पर

साहचर्यात असणाऱ्या घटना-जटिलांचे अर्थशोधन करण्यासाठी आणखी दोन शास्त्रगटांची गरज असते. इतिहासनिष्ठ शास्त्रे अशा घटनासाहचर्यांचा कालखंडानुसार अभ्यास करतात. खगोलशास्त्र आकाशाच्या अवकाशात आढळणाऱ्या घटना-साहचर्यांचा अभ्यास करते, तर भूपृष्ठाच्या अवकाशात असलेल्या घटनासाहचर्यांचा अभ्यास भूगोल करत असतो.

(क) भूगोलाचे स्वरूप समजून घेण्याचा उत्तम उपाय म्हणून त्याची तुलना इतिहासाशी करणे इष्ट आहे आणि भौगोलिक अवकाशांची, म्हणजेच प्रदेशांची, समज उत्तमरितीने व्हावी म्हणून त्यांची तुलना ऐतिहासिक एककांशी, म्हणजेच कालखंडाशी, करणे इष्ट आहे.

**प्रकरण ५ वे :**

(अ) दुहेरी अर्थाच्या Landschaft (भूक्षेत्रदृश्य) या जर्मन संज्ञेवर Landscape (भूदृश्य) ही संकल्पना आधारलेली असल्यामुळे या क्षेत्रातील अनेक प्रमुख प्रश्नांबाबत स्वच्छ विचारसरणीची कमतरता निर्माण होणे अटळ होते. विशेषत: अशा या द्व्यर्थी संकल्पनेच्या परिभाषेत भूगोलक्षेत्राची व्याख्या करण्याचा प्रयत्न असमर्थनीयच नव्हे तर अनावश्यकही आहे.

(ब) भूदृश्य म्हणजे बाह्य अर्थाने दृश्य (किंवा स्पृश्य) भूपृष्ठ अशा अर्थाची स्पष्ट शब्दात भूदृश्याची व्याख्या केली, तर इंग्रजीतील या शब्दाच्या गुणार्थाला भूगोलात काही मूल्य येण्याची शक्यता राहील. वनस्पती, अनावृत भूपृष्ठ, हिम, बर्फ, जलसंचय, अथवा मानवनिर्मित रूपधेये या सर्वांची वातावरणाच्या प्रत्यक्ष संपर्कात असलेली बाह्य पृष्ठे मिळून हे पृष्ठ तयार झालेले असते. वातावरणाचे या पृष्ठातील किरकोळ अतिक्रमण केवळ तात्त्विक गोंधळ घालते कारण व्यावहारिक हेतुसिद्धीसाठी त्याच्याकडे सहज दुर्लक्ष केले जाते.

(क) " नैसर्गिक भूदृश्य " आणि " सांस्कृतिक भूदृश्य " या संज्ञांचा एकूण भूदृश्याच्या दोन घटक विभागांचा निर्देश करण्यासाठी केलेल्या संज्ञाचा वापर संयुक्तिक नाही. कोणत्याही एका वेळी एकच भूदृश्य अस्तित्त्वात असते, आणि मानवास्पृष्ट अशा क्षेत्रातच खऱ्या अर्थाने नैसर्गिक भूदृश्य असू शकते. ज्यांच्यातील भेद अगदी काळजीपूर्वक स्पष्ट करणे प्राप्त असते अशा विस्तारित विविध संकल्पनांच्या अर्थाने या संज्ञांचा वापर करण्याऐवजी हा प्रश्न सोडविण्याचे अन्य मार्ग येथे सुचविले जात आहेत.

(१) त्या क्षेत्रातील सर्व नैसर्गिक कारकांचा समुच्चय या अर्थाने " नैसर्गिक पर्यावरण " ही संज्ञा सुप्रतिष्ठित असून ती स्पष्टार्थाने समजणारी आहे.

(२) मानवाच्या तेथील प्रवेशापूर्वी अस्तित्त्वात असलेले मूळचे भूदृश्य असा अर्थ सूचित करण्यासाठीच " नैसर्गिक भूदृश्य " हा शब्द वापरावा. नाहीतर, भूदृश्य या संज्ञेची अनेक विकृत रूपे भूतकाळात रूढ झालेली असल्यामुळे, " मूळचे नैसर्गिक भूदृश्य " अशासारखा एक निरर्थक पुनरावृत्तीचा शब्दप्रयोग करावा लागेल, अथवा तो टाळण्यासाठी " आद्य भूदृश्य " ही संज्ञा वापरावी लागेल.

(३) जर या क्षेत्रात मानवाचा कधी अवतारच झाला नसता, तर आज त्या ठिकाणी अस्तित्वात असण्याची शक्यता असलेले जे औपपत्तिक भूदृश्य तद्विषयक संकल्पना ही वारंवार वापरावी लागणारी संज्ञा नव्हे. म्हणूनच, यदाकदाचित ती वापरण्याची गरज पडलीच, तर तिचे विधान करणेच इष्ट होईल.

(४) आद्य विकासाच्या क्षेत्रातील भूदृश्य, अर्थात संस्कृत मानवाच्या पूर्वीचे, हे काही नैसर्गिक भूदृश्य असेलच असे नाही, कारण आद्यमानवानेही काही लक्षणीय बदल घडवून आणलेले असण्याची शक्यता आहे. म्हणून त्याला " आद्य भूदृश्य " म्हणण्यास हरकत नाही.

(५) तसेच, अशा आद्यक्षेत्रांच्या सामान्य भूक्षेत्राला आणि सुविकसित शेतजमिनींच्या मधेच आढळणाऱ्या अनियंत्रित क्षेत्रांना " जंगली भूदृश्य " असे म्हणावे. याविरुद्ध शेते, शेतमळे, रस्ते, नगरे यांच्या भूदृश्यांना ग्रामीण अथवा संस्कारित भूदृश्य म्हणावे.

**प्रकरण ६ वे :**

शास्त्रांच्या इतर कोणत्याही विभागणीप्रमाणेच, इतिहास व भूगोल यांमधील भेद वस्तुस्थितिनिदर्शक नाहीत. प्रत्यक्ष घटनांचे एकत्रित साहचर्य काल व स्थल या दोनही संदर्भात पाहाता येते. वस्तुस्थितीच्या परिक्षणात दिसून येणाऱ्या मानवी बुद्धीमत्तेच्या मर्यादांमुळेच हे विभाजन समर्थनीय ठरण्याची शक्यता आहे. अन्य क्षेत्रांच्या पद्धतींचा वापर केला तरच कोणत्याही एका क्षेत्रातील पुष्कळशा विषयाचा समर्पक अभ्यास करणे शक्य होते.

(अ) ऐतिहासिक अभ्यासांत भौगोलिक दृष्टीकोनाचा उपयोग केला, विशेषतः विशिष्ट भौगोलिक रुपधेयांचे इतिहासदृष्ट्या महत्त्व निश्चित करण्याचा प्रयत्न केला, तर तो तर्कदृष्ट्या इतिहासाचा भाग ठरतो. मग त्याचा मागोवा घेणारा इतिहासकार असो किंवा भूगोलकार असो !

(ब) कोणत्याही प्रदेशाच्या वेगवेगळ्या रुपधेयांपैकी पुष्कळशा रुपधेयांचे समर्पक अर्थशोधन करताना त्यांच्या भूतकालीन अवस्थांचा विचार करण्याची जरूरी भासतेच, कारण विचाराधीन परिस्थिती त्यातून निर्माण झालेली असते. काळाच्या एका आडव्या छेदात आढळतील तशा गोष्टींवर भूगोल आपले लक्ष केन्द्रित करतो. भूगोल त्यांच्या विकास क्रमांचा विचार अर्थशोधनाच्या हेतूने करत असतो. प्रत्यक्ष प्रक्रियांबद्दल त्याला कसलाच जिव्हाळा नसतो.

(क) कोणत्याही एका कालखंडातील भूगोलाला ऐतिहासिक भूगोल म्हणणे संयुक्तिक आहे. मात्र तो कालखंड तवत्काल जणूकाही वर्तमान काळच आहे असे मानलेले असते. तौलनिक ऐतिहासिक भूगोलात एकाच क्षेत्राचा पण लागोपाठ अनेक कालखंडातील भूगोलाचा अभ्यास पाठोपाठ येणाऱ्या कालखंडात पडत गेलेले बदल स्पष्ट करून दाखवण्याच्या हेतूने केलेला असतो.

**प्रकरण ७ वें :**

क्षेत्रांतून अन्योन्य साहचर्यात असलेल्या घटनांच्या बहुजातित्वामुळे व बहुसंख्यत्वामुळे, आपल्या ज्ञानक्षेत्राचा शास्त्रशुद्धविकास व्हावा यासाठी झटणाऱ्या भूगोलाभ्यासकांना आपल्या अभ्यासात कोणकोणत्या सामग्रीचा समावेश करावा या प्रश्नाची बराच काळ चिंता लागून राहिली आहे. या शतकारंभापासून, भूगोलाभ्यासकांनी असे ठामपणे प्रतिपादन करण्यास सुरवात केली आहे, की भूगोलाच्या कक्षा प्राकृतिक व सांस्कृतिक अशा दोनही प्रकारच्या, पण मूर्तस्वरुपाच्या, रुपधेयानी मर्यादित रहाणेच संयुक्तिक आहे. अर्थातच अमूर्त सांस्कृतिक रूपधेये वगळली जावीत (बहुधा हेच स्पष्ट करण्यासाठी भूगोलकार " दृश्यरुपधेय "मर्यादा किंवा " इंद्रिय-गोचर-रुपधेय "मर्यादा हे शब्दप्रयोग करतात). हे प्रमेय अलीकडे पुष्कळशा अमेरिकी भूगोलकारांनी मोठ्या जोमाने व आग्रहाने मांडले आहे. काहींनी तर एक सुप्रतिष्ठित तत्त्व म्हणूनच सांगितले आहे. परिणाम असा झाला, की ते सरळ निकालात न काढता ते प्रमेय तर्कविरुद्ध आहे, ऐतिहासिक दृष्ट्या असंबद्ध आहे, ते उच्छेदक व व्यवहारविरुद्धही आहे, हे दाखविण्यासाठी त्याचे सांगोपांग परिक्षण करावे लागले. (पान २३५ वरील सारांश पहा.)

**प्रकरण ८ वे :**

(अ) जगाच्या क्षेत्रीय भेदाभेदांचा अभ्यास या दृष्टीने भूगोलाचा विचार करावयाचा झाला तर अभ्यासनीय सामग्रीची निवड खालील तर्कशुद्ध आधारावर करावी. जी सामग्री स्वतः स्वतंत्रपणे आणि अन्य बदलत्या घटकांशी असलेल्या तिच्या कार्यकारणसंबंधांनी त्या क्षेत्रीय भेदाभेदांच्या एकूण जटिलात काही महत्त्वाची भर घालते, अशा सामग्रीचीच निवड केली जावी.

(ब) हेटनरने सांगितलेल्या आणि जर्मन भूगोलकारांच्या मोठ्या गटांनी मान्य केलेल्या, कसोट्या पुढे दिल्या आहेत–

(१) संबंधित रुपधेय स्थलानुसार बदलत जाणारे असते;

(२) या बदलांतून एक अगर अनेक क्रमबंध निर्माण होतात. अन्योन्य संदर्भात असलेल्या सापेक्ष स्थलांच्या परिभाषेत हा क्रमबंध सांगता येईल, आणि त्यातून एक क्षेत्रीय अविष्कार नजरेस येईल;

(३) त्या रुपधेयात अगर घटकात होत असणाऱ्या बदलात आणि अन्य घटकात होणाऱ्या बदलांत कार्यकारण संबंध असतो, आणि या विविध घटना एकाच स्थळी एकवटलेल्या असतात.

(क) उदाहरणादाखल वरील कसोट्या विशिष्ट बाबींना लावून पाहिल्या आहेत.

(ड) या कसोट्या पूर्ण करणारा कोणताही सामग्री-संग्रह नकाशावर सादर करता येण्यासारखा असतो; आणि त्यांची अन्य घटकांच्या अशाच नकाशांशी अर्थपूर्ण तुलना करता येते, असेही दिसून येईल. नकाशारुपाने चित्रण हे भौगोलिक साहित्याचे एक अगदी वेगळ्या प्रकारचे तंत्र आहे. म्हणून कोणत्याही अभ्यासाची भौगोलिक गुणवत्ता तो अभ्यास मूलतः नकाशांच्या सहाय्याने करता येतो का या साध्या कसोटीने तपासता येतो.

प्रकरण ९ वे :

(अ ते इ) भूगोलकार ज्या ज्या वेळी प्रादेशिक भूगोलाचा अभ्यास मोठ्या जोमाने करू लागतात, त्या त्या वेळी ते जगाची विभागणी ज्या क्षेत्रीय एककांत करतात त्या एककांच्या स्वरुपाविषयींचे मतभेद वाढतच जातात. या क्षेत्रीय एककांना प्रदेश, नैसर्गिक प्रदेश, भौगोलिक प्रदेश, भूक्षेत्रदृश्य (Landschaften) किंवा भूदृश्य (Landscape) यापैकी काहीही नावे दिलेली असली तरी, ती एकके वेगवेगळ्या मूर्त वस्तूंची, अथवा पूर्णवस्तूंची, किंवा सजीवांची प्रातिनिधिक रूपे असतात; आणि या एककांचा कोणत्याही अन्य स्वतंत्र वस्तूप्रमाणे अभ्यास करणे शक्य असते, असा दावा या विविध अभ्यासकांनी भूतकाळी केलेला होता, आणि या शतकातही पुन्हा ते तसाच दावा करत आहेत. म्हणून या वेगवेगळ्या एककांच्या आकृतिसंयोगाने हे जग भरलेले आहे, आणि एक पूर्ण वस्तू या दृष्टीने एका एककांचा दुसऱ्यांशी असलेल्या संबंधांच्या भाषेत त्यांचा अभ्यास करणेही शक्य आहे. या-ना-त्या कारणाने ही संकल्पना पाठ्यपुस्तकांसह सर्वच अमेरिकी साहित्यात यापूर्वीच घुसलेली आहे. तिच्या सर्व आविष्कारांसह ही संकल्पना त्याज्य आहे हे सिद्ध करताना, प्रथम तिला मान्यताच का मिळाली या संबंधीचा दावा पूर्ण तपशीलानिशी येथे विचारात घेतलेला आहे. कमीजास्त प्रमाणात तर्कमान्य मर्यादा असलेला, आणि प्रादेशिक अभ्यासासाठी आवश्यक असल्यामुळे केवळ सोईसाठी थोडाफार स्वैरपणे केलेला भूपृष्ठाचा एक विभाग म्हणजे प्रदेश, असे म्हणता येईल.

(फ) काही क्षेत्रीय एकके यादीत घातलेल्या संज्ञाशी मिळती-जुळती असतात. शेतकऱ्याचे शेत वा नगराची पेठ हे अगदी वेगळे आणि स्वतंत्र एकक आहे. साहजिकच, एक शेतमळा, कारखाना आणि एखादे नगरसुद्धा बऱ्याच बाबतीत एक स्वयंपूर्ण वस्तू म्हणून विचारात घेणेच संयुक्तिक ठरते. सांस्कृतिक भूदृश्य निर्माण करू पहाणारे मानवाचे कार्य केवळ एक आकृति-संयोग निर्माण करते आणि तोही बराच अपूर्ण असतो.

(ग) एक वेगळी वस्तू या अर्थाने प्रत्येक प्रदेश आपापल्यापरीने परिपूर्ण असतोच अशा समजुतीने प्रदेश-संकल्पनेवर भर दिला गेला. पण त्यामुळेच, ' भूपृष्ठावर अन्योन्य संबंधात येणाऱ्या घटनांच्या सापेक्ष स्थानाचे महत्त्व ' या एका अगदी पायाभूत भौगोलिक कारकाकडे उघड उघड दुर्लक्ष होत गेले.

प्रकरण १० वे :

(अ) प्रदेश या निश्चित स्वरूपाच्या मूर्त वस्तू नसून ते अभ्यासकाने केवळ स्वेच्छेने केलेले भूपृष्ठाचे विभाग आहेत असा निष्कर्ष काढला म्हणून जगाचे किंवा त्याच्या विस्तृत भागांचे प्रदेशासारखे विभाग करण्याच्या प्रश्नाला अगदीच फाटा दिला, किंवा अशा विभागणीचा आधारही शून्य महत्त्वाचा मानला गेला असा अर्थ होत नाही. जगाची प्रदेशात विभागणी करण्याच्या एक अगर अनेक अतिचतुर व उपयुक्त पद्धती शोधणे हीच सर्वात महत्त्वाची गोष्ट आहे.

(ब) प्रादेशिक विभागणीच्या क्रमबंधाचे दोन प्रमुख प्रकार आहेत, आणि ते दोन्हीही निरनिराळ्या कारणाकरता उपयुक्त आहेत. विशिष्ट प्रदेशांचा सत्यस्थितिदर्शक क्रमबंध भूमी व सागर यांच्या संदर्भात असलेल्या त्यांच्या त्यांच्या सापेक्ष स्थानांसह सर्व संबंधित कारकांच्या विचारांवर आधारलेला असतो. पण जातिप्रधान प्रदेशांच्या तौलनिक क्रमबंधात त्यांच्या सापेक्ष स्थानांचा कोणताही विचार न करता त्या क्षेत्रांच्या फक्त आंतरिक लक्षणांचा विचार केलेला असतो. कडक भाषेत बोलायचे तर, यामुळे प्रदेश प्रस्थापित होत नाहीतच, फक्त विशिष्ट प्रकारची क्षेत्रे प्रस्थापित होतात.

(क) क्रमबंधाच्या या दोनही प्रकारात " नैसर्गिक प्रदेश " ही संज्ञा गैरसमज निर्माण करते. काटेकोर विश्लेषणानंतर असे दिसून येते की, हे प्रदेश प्रत्यक्षात काही नैसर्गिक कारकांच्या संयोगांवर आधारलेले असतात व ते कारकसंयोग विशिष्ट संस्कृतीत आणि तंत्रशास्त्रात वाढलेल्या लोकांच्या अनुभवाला येणाऱ्या महत्त्वानुसार निश्चित केलेले असतात.

(ड) विशिष्ट प्रदेशांच्या एका क्रमबंधाच्या विश्लेषणाने या प्रश्नातील अनेक प्रमुख अंगभूत अडचणी उघडकीला आणल्या गेल्या आहेत. त्यातूनच स्वैरपणे सुचणाऱ्या, पण करणे आवश्यक असलेल्या काही इलाजांची चर्चाही केली आहे. तसेच, मूलतः अशा प्रकारची विभागणी आरपार जननिष्ठच (genetic) असली पाहिजे या सिद्धान्ताचेही विश्लेषण केले असून, तो अव्यवहार्य म्हणून त्याज्य आहे असे सुचविले आहे.

(इ) नैसर्गिक घटकांच्या संयोगांवर आधारलेल्या औपपत्तिक प्रदेशांचे तौलनिक क्रमबंध तयार करण्याचे जे विविध प्रयत्न झाले त्यांचे येथे विश्लेषण केले असून, ते असमाधानकारक असल्याचे दिसून आले. बहुतेक बाबतीत ते हवामान प्रकारांचे या वनस्पति प्रकारांचे क्रमबंध असतात, इतकेच.

(फ-ग) मानव-निर्मित सांस्कृतिक रुपधेयांच्या प्रत्यक्ष संश्लेषणावर आधारित जातिनिष्ठ (generic) क्रमबंधांना अधिक यश मिळेल अशी अपेक्षा आहे. जगाच्या विद्यमान भूदृश्यावरणावर (Landscape cover) आधारित एक आणि जमिनीच्या वापराशी संबंधित रुपधेयांच्या संश्लेषणावर आधारलेला दुसरा एक, अशा दोन प्रकारच्या

क्रमबंधांचे तपशीलवार विश्लेषण केले आहे आणि त्यांचे फायदे व त्यांच्या मर्यादा यासंबंधी निष्कर्षही काढलेले आहेत.

(ह) या शेवटच्या ' ह ' या विभागात या प्रकरणाचा संपूर्ण सारांश दिलेला आहे. (पाने ३६१ ते ३६५).

**प्रकरण ११ वे :**

(अ) आतापर्यंतच्या प्रकरणांवरून आढळून येणारी भूगोलाची लक्षणे निश्चित करणे, आणि ज्यांना सोईकरता शास्त्र असे संबोधतात त्या अशाप्रकारच्या अन्य ज्ञानशाखांच्या लक्षणांशी त्यांची तुलना करणे हाच या उपसंहारात्मक प्रकरणाचा हेतू आहे.

(ब) भूगोल हा असा एक विषय आहे, की भौतिक-शास्त्रांबरोबरच सांस्कृतिक शास्त्रांमध्येही त्याची गती असते, आणि या दोनही गटांच्या लक्षणांशी तो सारखीच भागीदारी करतो. याच वस्तुस्थितीचा परिणाम म्हणून काही विशेष लक्षणे भूगोलाला प्राप्त झालेली आहेत. क्रमबद्ध शास्त्रांच्या बाबतीत असतो तसा, अगदी वेगळा दाखविता येईल असा एखादा घटनासंच इतिहासाप्रमाणे भूगोलाच्या अभिरुचि-केंद्र-स्थानी नसतो. भूपृष्ठाच्या विस्तृत क्षेत्रात, म्हणजेच अवकाश विभागांत, आढळणाऱ्या विजातीय घटनांच्या एकसंधीकरणाचा अभ्यास करण्याचे एक वेगळेच कार्य भूगोलाला करावयाचे असते, भूगोल क्षेत्रातील हा निष्कर्ष अधिक महत्त्वाचा आहे. इतिहासाप्रमाणे भूगोलही सत्यस्थितीचे असेल त्या अवस्थेत परीक्षण करत असतो. आणि हे करत असताना त्याची प्रत्यक्षातील रचना न विसकटता सामान्यदृष्टीने त्या गोष्टीकडे तो पहात असतो.

(क) निश्चितता, निर्दोषिता, सार्वकालिकता आणि क्रमबंधक्षमता या आपल्या ध्येयांशी भूगोल किती प्रमाणात निगडित आहे या मापानेच भूगोलाच्या स्वरूपाची कसोटी घेता येते. भूगोल आपले ज्ञान शक्य होईल तितके निश्चित व निर्दोष करण्याच्या प्रयत्नात असतो. अन्य शास्त्रांच्या तुलनेने त्याला मिळालेले यश ही ध्येये गाठण्यात आलेल्या यशाच्या मापानेच मोजून चालत नाही, तर अंगिकारलेल्या या दुर्घट कार्याच्या मार्गातील अडचणींच्या मापानेही ते मोजावयाचे असते.

(ड) जातिसंकल्पनांचा एखादा भक्कम क्रमबंध विकसित करून, आणि त्यांच्या आधाराने अंतस्-संबंध-योगांची काही सामान्य तत्त्वे रचून, भूगोल आपल्या ज्ञानाला सार्वकालिकत्व देण्याच्या प्रयत्नात असतो. इतके करूनही केवळ असामान्य म्हणूनच ज्यांचा अभ्यास करणे शक्य होते अशा अनेक महत्त्वाच्या घटना वगळल्या गेलेल्या असतात; आणि हे असे सर्वच ज्ञानशाखात घडत असते. अगदी इतिहासाइतके नसले तरी, भूगोलातील बऱ्याच मोठ्या प्रमाणातील कार्य निश्चितच अशा असामान्य बाबींशी संबंधीत असते.

क्रमबद्ध भूगोलात मात्र जातिसंकल्पनांच्या आणि साधारण तत्त्वांच्या विकासावर वाढता भर दिला जात आहे. तरीपण, सामान्यतः भौगोलिक प्रश्नांत गुंतलेल्या बहुगुणित कारकसंख्येमुळे, सामान्य तत्त्वांचे अथवा नियमांचे उपयोजन करणे फार अवघड होऊन बसते. प्रादेशिक भूगोलातील सामान्य तत्त्वे व नियम शोधण्याच्या आशेने क्षेत्रविषयक जातिसंकल्पना एकक म्हणून प्रस्थापित करण्याचा प्रयत्न, म्हणजे तर्कदृष्ट्या अशक्य असलेल्या गोष्टीचा शोध घेण्यासारखे असल्याचे आढळून आले आहे; याचे कारण प्रदेश ही एक वस्तू नव्हे किंवा ती एक घटनाही नव्हे. तरीही, क्रमबद्ध भूगोलाच्या जातिसंकल्पनांचा उपयोग प्रादेशिक भूगोलात केला जातो आणि प्रादेशिक प्रकारांची जातिनिष्ठ वर्णने विशिष्ट क्षेत्रांच्या स्वरूपाचे निदान अंशतः आकलन करून घेण्यास मदत करतात.

(इ) भूगोलातील ज्ञानाचे संघटन दोन वेगवेगळ्या प्रकारे क्रमबंध रुपाने केले जाते. भूगोलक्षेत्राच्या विशेषाभ्यासक शाखांनी क्षेत्रीय भेदाभेदांतर्गत घटकांची काही प्रमुख गटांत विभागणी केलेली आहे आणि त्यांपैकी प्रत्येकात अत्यंत घनिष्ठ संबंध असलेल्या घटनांचाच समावेश केला जातो. त्या शाखांत प्राकृतिक भूगोलाच्या विविध अंगांचा जसा समावेश होत असतो– उदाहरणार्थ : हवामानशास्त्र, भूरुपांचा भूगोल, मृत्तिकांचा भूगोल इत्यादि– तसाच, मानवी अथवा सांस्कृतिक भूगोलाच्या विविध शाखांचाही समावेश असतो– उदाहरणार्थ : आर्थिक भूगोल, राजकीय भूगोल, सामाजिक भूगोल इत्यादी. या सर्व शाखांतील ज्ञान क्रमबद्ध भूगोल व प्रादेशिक भूगोल यांच्या परिभाषेतही संघटित केलेले असते.

(फ) भूगोलाची या दोन संघटनप्रकारांत केलेल्या विभागणीची तुलना अन्य संकलक शास्त्रांतील अशाच परिस्थितीशी केलेली आहे. खगोलशास्त्र, ऐतिहासिक भूशास्त्र व इतिहास ही ती शास्त्रे होत.

(ग) क्रमबद्ध भूगोलाच्या स्वरुपाचे विश्लेषण करत असता, खालील पोटविषयांकडे विशेष लक्ष पुरविलेले आहे. एका बाजूला क्रमबद्ध भूगोल आणि दुसऱ्या बाजूस संबंधित क्रमबद्ध शास्त्रे यांच्या प्रयोजनांतील भेद स्पष्टपणे प्रस्थापित करण्याचा प्रश्न, खास तंत्रे, घटक जटिलांचा अभ्यास, भवितव्य कथनाची पात्रता, नैसर्गिक व सांस्कृतिक घटनांच्या आकलन मर्यादा.

(ह) प्रादेशिक भूगोलातील अभ्यासांत तीन प्रमुख टप्प्यांचा संबंध येतो. विशिष्ट स्थळांच्या घटनांमधील प्रत्यक्ष अन्योन्य संबंध समजून घेण्यासाठी लहानसर पोटविभागांचाही विचार करावा लागतो. अशा पोटविभागांपैकी प्रत्येकातील विविध कारकांच्या स्थानिक बदलांकडे स्वेच्छेनुसार दुर्लक्ष केले जाते. मोठ्याशा प्रदेशांची रचनात्मक आणि कार्यात्मक बांधणी शोधून काढता यावी या हेतूने वरील एकक क्षेत्राचे परस्पर संबंध लावणे, हा दुसरा टप्पा. या प्रदेशांची एकमेकांच्या संदर्भात असलेली मांडणी

आणि एका प्रदेशातील घटनांचे दुसऱ्यांतील घटनांशी असलेले अंतःसंबंध यांचा अभ्यास शेवटी करावयाचा असतो. स्वेच्छेनुसार वापरावयाचे विविध उपाय या प्रक्रियेत वापरणे भाग पडते. असे स्वेच्छेनुसार उपयोगात आणावयाचे इलाज काही अडचणी निर्माण करतात, त्यांचीही येथे तपशीलवार चर्चा केलेली आहे. अन्य विशिष्ट प्रश्नांची चर्चा, संक्रमण क्षेत्रांची समस्या, प्रादेशिक अभ्यासात समावेश होऊ शकेल अशाप्रकारचे ज्ञान, " क्षेत्राची उत्पत्ती ", प्रदेशासंबंधीचे शास्त्रीय नियम अथवा तत्त्वे, तौलनिक प्रादेशिक भूगोल, विशेषेकरून सखोल अभ्यासासाठी संयुक्तिक असलेल्या प्रदेशाच्या आकारमानाचा प्रश्न.

(आय) क्रमबद्ध भूगोल व प्रादेशिक भूगोल या भूगोल क्षेत्राच्या दोन भिन्न शाखा नव्हेत तर ते परस्परावलंबी असे दृष्टिकोन आहेत. विशिष्ट अभ्यासांसाठी त्या दोहोंचा संयोग करणे प्राप्त होते. या प्रकरणातील तपशीलवार निष्कर्षांचा सारांश शेवटच्या प्रकरणात पाने ४६४ ते ४६८ वर आला आहे.

**प्रकरण १२ वे :**

ज्यांतून नकारात्मक निष्कर्ष निघाले अशा सर्व चर्चा निष्कर्षांच्या या सारांशातून वगळलेल्या आहेत. अर्थातच मागील सर्व प्रकरणांतून भूगोलाच्या स्वरुपासंबंधीच्या काढलेल्या होकारात्मक निष्कर्षांचे समालोचन येथे केले आहे.

# प्रकरण १ ले

## प्रास्ताविक

## अ – अमेरिकी भूगोलाची ऐतिहासिक पार्श्वभूमी

भूगोलाचा एक क्रमबद्ध शास्त्र म्हणून विचार करत असतानाही, आपला विषय फार जुनाच नव्हे तर प्राचीन आहे. अशी बढाई मारण्याची खोड भूगोलकरांना आहे. पण, या देशातील (म्हणजे अमेरिकेतील) भूगोलज्ञ जेव्हा विषयाची चर्चा चक्री व्याख्यानांच्या अथवा प्रकाशित लेखांच्या रूपाने करतात तेव्हा असा समज होतो, की भूगोल विषयाचा पाया, विसाव्या शतकाच्या सुरुवातीच्या काळात, अमेरिकी पंडितांच्या एखाद्या मंडळानेच घातलेला असावा. एकट्या जर्मनीच्या विद्यापीठातून भूगोल विषयाचा विकास या देशातील (अमेरिकेतील) विद्यापीठांच्या तुलनेने खूपच अधिक झालेला होता ही गोष्ट सर्वश्रुत असूनही, या देशातील आतापावेतो झालेल्या अशा विषयांवरील अनेक चर्चांचा संबंध, युरोपीय भूगोलकारांनी केलेल्या अशाप्रकारच्या चर्चांशी नाममात्रच जोडलेला आढळतो.

या देशातील भूगोलकारांपेक्षा युरोपीय भूगोलकार, आणि विशेषेकरून जर्मन भूगोलकार, या विषयाची चर्चा करण्याचे कामी कितीतरी अधिक लक्ष घालत आलेले आहेत. अगदी अलीकडच्या काही वर्षांत अमेरिकेत उपस्थित केलेल्या अनेक प्रश्नांवर काही जर्मन भूगोलकार या शतकारंभापासूनच परिणामकारक चर्चा करत आहेत. म्हणूनच या चर्चांचे थोडे तपशीलवार परिक्षण करणे आगत्याचे वाटते. असे करताना, टीकाकारांनी पुढे आणलेल्या आक्षेपांना त्यातूनच समाधानकारक उत्तरे मिळाल्यास, रूढ मार्ग बदलून नवे मार्ग दाखविण्याचा आव आणणाऱ्या तथाकथित नव्या सूचनांमुळे निर्माण होणाऱ्या कटकटीपासून आपला बचाव होईल. आणि ज्या प्रस्थापित मार्गांनी आपण कार्य करत आलो आहोत त्यांचेच मूल्य अधिक आहे, असा विश्वास कार्यकर्त्यांच्या मनात निर्माण होईल. उलटपक्षी, या प्रश्नांचा अनेक बाजूंनी विचार व अभ्यास करत असताना, काही बाबतीत तरी आपण खोट्या आशेच्या मागे धावत होतो ही गोष्ट निदर्शनास आली तर यापुढे वाया जाणारे श्रम वाचविता येतील.

या ग्रंथाच्या सुरुवातीला जोडलेल्या ग्रंथ सूचीमध्ये, ज्यावर हा ग्रंथ आधारलेला आहे अशा भूगोलाच्या स्वरूपाची चिकित्सा करणाऱ्या अभ्यास ग्रंथांची यादी जोडलेली आहे; त्याबरोबरच विषय अधिक विषद करणाऱ्या अभ्यासांचीही यादी दिलेली आहे. अगदी अलीकडच्या काही वर्षांत झालेल्या सर्वच महत्त्वाच्या अभ्यासांचा अंतर्भाव पहिल्या यादीत करण्याचा काहीसा प्रयत्न केलेला आहे. तरी फ्रेंच साहित्याबाबतही ती निःसंशयपणे अपूर्णच आहे. मग,

फ्रेंच, जर्मन व इंग्रजी या व्यतिरिक्त अन्य भाषांतील साहित्याची तर गोष्टच काढावयास नको ! विषयप्रकाशक साहित्याची पूर्ण यादी येथे देण्याचा प्रयत्न केलेला नसून वेळोवेळी जे लक्षात येईल त्या साहित्याचा उपयोग लेखकाने केलेला आहे.

या क्षेत्रात कार्य करणाऱ्या विद्यमान सहकाऱ्यांच्या कार्यांचाच आधार घेऊन केलेल्या अशाप्रकारच्या क्रान्तिक सर्वेक्षणात काही विशिष्ट संदर्भ एकाद्या लेखकाने गाळणे पसंत केलेले असते. पण हा सोपा पर्यायही प्रस्तुत लेखकाला निषिद्ध वाटतो. कारण, या सर्व चर्चेत तो वाचकांना तर जबाबदार आहेच, पण ज्यांच्या ग्रंथांतून लेखकाला आवश्यक ती सामग्री मिळाली आहे त्या सर्व सहकारी लेखकांनाही तो तितकाच जबाबदार आहे. (शेवटी जोडलेली लेखक सूची पहा). विशेषतः त्याने स्वतःच अंगिकारलेल्या भूमिकेमुळे दिलेली अवतरणे, अनुवाद व क्रान्तिक टीका ही संबंधीत लेखनाशी सहजी पडताळून पाहता यावीत अशी साधने उपलब्ध करून देण्याची हुकमी जबाबदारी लेखकावर आहे. परिणाम असा झाला, की विविध वैयक्तिक संदर्भ खंडप्राय संख्यानी उभे करणे आवश्यक झाले. या सर्व संदर्भांच्या तळटीपांमुळे वाचकांच्या विचारश्रृंखलेत पडणारा खंड टाळण्यासाठी, संपादकांच्या सूचनेवरून, एका सुटसुटीत संदर्भपद्धतीचा अवलंब येथे केला आहे. संदर्भासाठी आवश्यक ते आधार कंसातील संख्यांनी दाखविलेले आहेत. यामुळे वाचनातील अनावश्यक व्यत्यय टाळता येईल, अशी आशा आहे.

यूरोपमध्ये विकास पावत गेलेल्या भूगोलशास्त्रातील संकल्पनांची अमेरिकी भूगोलकारांना तोंडओळखही नव्हती, असे सुचविणे असमंजसपणाचे ठरेल.* अमेरिकी विद्यापीठातील भूगोलाचे पहिलेच प्राध्यापक, प्रिन्सेस्टनचे अर्नोल्ड गुयोत, हे कार्ल रिटरचे अनुयायी होते. पण त्यांची परंपरा चालविणारे अनुयायी त्यांना मिळाले नाहीत. एलेन सेम्पल हिने केलेले कार्य अधिक ध्येयप्रेरित होते. तिने रात्सेलच्या मानवी भूगोलाच्या संकल्पनांचे प्रतिपादन करून, पुढील सुमारे पाव-शतकासाठी या देशातील मानवी भूगोलाची दिशा ठरवून दिली. त्याच कालखंडात, वुइल्यम मॉरिस डेव्हिस आणि बर्लिन विद्यापीठाचे प्राध्यापक आल्ब्रेक्ट पेंक यांनी या देशातील व जर्मनीतील भूगोलाभ्यासांचे परस्पर संबंध प्रस्थापित करण्यासाठी जेवढे कार्य केले, तेवढे कार्य त्यापूर्वी आणि त्यानंतरही कोणी केले नाही. त्या दोघांच्या स्वतःच्या कार्यात निकटचे संबंध होतेच. शिवाय, प्रत्येकाने दुसऱ्याच्या देशात जाऊन, सुमारे वर्षभर, या विषयाचे अध्यापनही केले,– पेंकने येल व कोलंबिया विद्यापीठांत तर डेव्हिसने बर्लिनमध्ये हा विषय शिकविला आणि प्रत्येकाने दुसऱ्याच्या भाषेत काही प्रमाणात ग्रंथ प्रकाशनही केले. मात्र, या दोघांच्याही आवडीचे क्षेत्र, जवळजवळ निरपवादपणे, प्राकृतिक भूगोलापुरतेच मर्यादित होते. डेव्हिसने भूगोलाच्या प्राकृतिक भागावर दिलेला भर, आणि सेम्पलने, तितक्याच निरपवादपणे, मानवी भागावर दिलेला भर, यांच्या संमिश्रणाने एक प्रकारचा द्वैतवाद निर्माण झाला. असाच द्वैतवाद जर्मनीतील एका कालखंडाचे खास लक्षण मानला जातो. डेव्हिसने या दोहोतील दरी सांधण्याचा केलेला प्रयत्न केवळ औपपत्तिक स्वरूपाचा होता (२०३). कारण, दोहोतील हे संबंध परिपाठात आणण्याचा त्याने प्रयत्न केला नाही.

---

* एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीच्या काळात जेदिदिआ मोर्स हा युरोपीय भूगोलज्ञांच्या निकट संबंधात राहुनच कार्य करत असे (४०९).

अमेरिकी भूगोलकारांच्या बहुतेक सर्वच विचारधारांवर या दोन दृष्टिकोनांचा प्रभाव, जवळजवळ दोन दशकांपर्यंत टिकून असल्याचे दिसते. हा प्रभाव त्यांनी केलेल्या अनुसंधान कार्यावर व त्यांनी प्रतिपादिलेल्या आपल्या विषयांच्या संकल्पनांवर, अशा दोनही अंगांनी, पडलेला दिसतो. ही गोष्ट विशेष करून ब्रिग्रहॅम, ड्रायर, बॅरोज व व्हिटबेक यांच्या अध्यक्षीय भाषणांवरून स्पष्ट होते (३०५, २०७, २०८, २१२). हेटनरच्या कार्याने प्रभावित झालेला फेनमान हा एकटाच याला अपवाद होता. तसा फेनमानच्या कार्याचा ठसा पुढे कित्येक वर्षेपर्यंत क्वचितच उमटलेला दिसतो. हा अपवाद वगळता, भूगोल हे नैसर्गिक पर्यावरण आणि मानवी हालचाली यांच्या संबंध योगांचे शास्त्र आहे, हीच संकल्पना त्यावेळी मान्य झालेली होती. या ' पर्यावरणवादी ' संकल्पनेचे ' अगदी काळजीपूर्वक विधान बॅरोजने केले '. मात्र, त्याने नेहमीचा अनुक्रम बदलून, ' मानवाने नैसर्गिक पर्यावरणाशी केलेली जुळणी म्हणजे मानवी पर्यावरण शास्त्र किंवा भूगोलशास्त्र होय ', अशी व्याख्या तयार केली.

व्हिडाल-द-ल- ब्लाक व जीन ब्रून्हे यांच्या ग्रंथांची इंग्रजी भाषांतरे प्रकाशित करून, फ्रान्सने या देशाला एका निराळ्याच दृष्टीकोणाची ओळख करून दिली. या दोघांनी मानव व पृथ्वी यांच्यामधील संबंधयोगांचा अभ्यास ही भूगोलविषय संकल्पना सिद्धान्त रूपाने मान्य केली, तरी तपशीलात शिरताना, त्यांच्या कार्याने वेगळीच दिशा घेतली, कारण, प्रादेशिक अभ्यासांवर भर देण्याकडेच त्यांचा विशेष कल होता. (ब्रून्हे १८२, ४, १३ ते २७ व ५५२ ff; ८३, ५५; व्हिडाल १८४, ३ ते २४; सॉर ८४, १७१ व १८० ते ८१).

पण कार्ल सॉर याच्या कार्याने, जवळजवळ एक पिढीपूर्वीच जर्मनीत विकास पावलेल्या भूगोलविषयक संकल्पना, अमेरिकी भूगोलज्ञांच्या नजरेस आणून त्यांच्या भूगोलविषयक दृष्टीकोणात सर्वात मोठा बदल घडवून आणला. प्राकृतिक व सांस्कृतिक अशा दोनही भू-दृश्यांच्या भौतिक रूपधेयांच्या अभ्यासाच्या भाषेत भूगोलाचा विचार करण्याचा आणि या रूपधेयांच्या भूवर्णनात्मक अथवा प्रादेशिक अंतःसंबंधानुसार त्यांचे प्रतिपादन करण्याचा मार्ग त्याने पुष्कळांना, विशेषतः तरुण कार्यकर्त्यांना, दाखवून दिला. सन १९२५ ते १९३१ च्या दरम्यानच्या काळात त्याने प्रसिद्ध केलेल्या, जवळ सारख्याच स्वरूपाच्या, ती अभ्यासांतून आणि स्वतःच्या वैयक्तिक लक्षणीय प्रभावाने हे मार्गदर्शन केले (२११, ८४, ८).

अशारीतीने अमेरिकेतील भूगोलावर युरोपीय भूगोलज्ञांच्या लक्षात भरण्या इतका प्रभाव पडलेला आहे. पण हेही लक्षात घेतले पाहिजे, की हा प्रभाव फारच थोड्यांच्या संपर्कातून, म्हणजेच बहुतांशाने डेव्हिस, सेम्पल, सॉर यांच्या द्वारा, पडलेला आहे. फेनमान, वेलिंगृन इत्यादि काही व्यक्ती स्वतंत्रपणे प्रभावित झालेल्या असल्या तरी इतरांनी मान्य केलेल्या भूगोलविषयक संकल्पनांवर त्यांचा परिणाम झाला नाही. पुष्कळशा अमेरिकी भूगोलज्ञांनी, ब्रिटिश भूगोलज्ञांनी ब्रिटिश भूगोलज्ञांच्या कार्याचे अनुकरण केले हे निश्चित आहे. पण ते भूगोलकारही आमच्यापेक्षा जास्त नसले तरी आमच्या इतकेच प्रांतीय दृष्टीचे होते. याला

जे अपवाद होते ते त्यांच्या प्रभावाच्या अभावानेच ठळकपणे दिसून येतात. उदाहरणार्थ चिझोल्ने आपल्या १९०८ च्या एडिंबरो येथील भाषणात (१९२), भूगोल शास्त्राच्या व्याप्तीवर, त्याच्या मताने मोठाच प्रकाशझोत टाकणाऱ्या व अतिशय व्यापक अशा एका प्रबंध मालिकेचा " प्रदीर्घ सारांश " सादर केला; म्हणजेच १९०५ मध्ये हेटनरने यासंबंधी केलेले अभिजान विधान सादर केले. पण, या क्षेत्राचा हा बहुतांशाने जर्मन भूगोलज्ञांचा दृष्टिकोन आजतरी इंग्लंडमध्ये फारच थोड्यांना माहित आहेसे दिसते, यावर पुढे विचार व्हावयाचाच आहे. त्याप्रमाणे हर्बर्टसनने आपल्या जर्मनीतील अभ्यासाबरोबर आणलेल्या मतांचा ठसा, बराच अलीकडेपर्यंत इंग्लंडमध्ये उमटलेला दिसत नव्हता. रात्सेलनंतर जर्मनीतील भूगोलक्षेत्रात झालेल्या विकासाबाबत बहुसंख्य इंग्रजी भूगोलकार पूर्ण अंधारातच आहेत. [उदाहरणार्थः ब्रिआनने या गोष्टीची कबुली एका जर्मन भूगोलकाराबरोबर झालेल्या आपल्या संभाषणासंबंधीच्या एका तळटीपवजा निवेदनात अगदी मोकळ्यामनाने दिलेली आहे. त्यातही त्याने त्याच्या नावाचे वर्णांकन चुकीचे दिले आहे, आणि त्याच्या मतांचे विधानही चुकीचे केले आहे (२८०, ७)] बहुतेक इंग्रज भूगोलकार रात्सेलविषयीच्या ज्ञानाबाबत सेम्पलवर अवलंबून राहिल्याने रात्सेलच्या जर्मनीतील महत्त्वावर त्यानी फाजील भर दिला (१०२, २०२). शिवाय अनेक इंग्रज भूगोलकारांवर पासार्जच्या कार्याचाही प्रभाव पडलेला आहे.

फ्रान्सची परिस्थितीही काहीशी या सारखीच झालेली आहे. व्हिदाल-द-ल ब्लाकने व वालॉकने रात्सेलच्या कार्याकडे बरेच लक्ष दिलेले असले, तरी वॉलॉकच्या आणि ब्रून्हेच्या पद्धतितंत्रविषयक चर्चांतून त्यांना, रात्सेलनंतरच्या काळात जर्मन भूगोलज्ञांनी कोणते विचार मांडले व किती यश संपादन केले याची फारच थोडी समज आल्याचे दिसते, परिणामी, या फ्रेंच भूगोलकारांच्या ग्रंथांच्या इंग्रजीतील प्रकाशनांचा, अमेरिकनांच्या आधुनिक जर्मन भूगोलबाबतचे अज्ञानाचे निराकरण करण्याच्या दृष्टीने, काहीच उपयोग झालेला नाही.

उलटपक्षी, अन्य देशांतून विकास पावलेल्या पद्धतितंत्रविषयक विचारांचा परिणाम जर्मन भूगोलावरही फारच थोडा झालेला दिसतो, अशी पुस्ती जोडावयास हरकत नाही, अपवाद म्हणून व्हिदल-द-ल ब्लाकच्या मार्गदर्शनाखाली निर्माण झालेल्या प्रादेशिक भूवर्णनांच्या प्रभावांचा उल्लेख करण्यास हरकत नाही; कारण, या वर्णनांनी जर्मन भूगोलक्षेत्रात अलीकडेच दिला जाणाऱ्या प्रादेशिक भूगोलावरील जोरास हातभर लावण्यास निःसंशयपणे मदत केली आहे. तसेच हर्बर्टसन्च्या " जगाचे स्वाभाविक प्रदेश " प्रस्थापित करण्याच्या या प्रयत्नांनी काही काळ तरी इंग्लंडपेक्षा जर्मनीचेच लक्ष अधिक वेधून घेतले. सर फ्रान्सिस यंगहजबंड यांच्या व्याख्यानांच्या जर्मन भाषेतील अनुवादांच्या प्रकाशनांचा प्रभाव अनेक आजी जर्मन भूगोलकारांवर, विशेषेकरून ब्रान्न व व्होल्झ यांच्यावर झालेला आहे. प्रथमदर्शनी तरी, आजपर्यंतच्या जर्मन भूगोलावर उल्लेखनिय प्रभाव पाडणारा एकमेव अमेरिकी भूगोलज्ञ डेव्हिस हाच होता. त्याच्या भूरूपांच्या वर्गीकरणाची विकासप्रधानपद्धती, पेंखने स्वीकारली; आणि डेव्हिस व ब्रॉन या दोघांनी मिळून लिहिलेल्या जर्मन भाषेतील भूरूपवर्णनात्मक एका प्रमाणित

पाठ्यपुस्तकात ती सादर करण्यात आली. जर्मनीतील या विषयाचे अभ्यासक आजही "डेव्हिस" पद्धतीच्या सापेक्ष गुणवत्तेबद्दल वाद करत आहेत. एकूण पद्धतितंत्राच्या सर्वसामान्य स्वरूपावर मात्र डेव्हिसचा प्रभाव जर्मनीत पडलेला दिसत नाही.

भूगोलाच्या पद्धतितंत्राचे बाबतीतील सहकार्य जरी तुलनेने मर्यादित असले, तरी युरोपीय भूगोलातील अनुसंधानसामग्रीचा उपयोग अमेरिकी भूगोलज्ञ वाढत्या प्रमाणात करू लागले आहेत. हा विरोध लक्षात घेण्यासारखा आहे. कोपेनचे नाव आपल्या येथे हवामानशास्त्राच्या संदर्भात घरोघरी घेतले जाते. रशियन आणि जर्मन अभ्यासकांनी आमच्या मृत्तिकांच्या वर्गीकरणात क्रांती घडवून आणली. Siedlungs geographic ने (वसाहतींचा भूगोल) आमच्या परिभाषेत Strassendorf (मार्गावरील खेडे) यासारख्या नव्या शब्दांची भर टाकली आहे. पासार्जच्या भूक्षेत्रदृश्यांच्या (Landschaft) संकल्पनांचे निदान एका अमेरिकी पाठ्यपुस्तकात आविष्करण झाले आहे. ज्यांना राजकीय भूगोलात गोडी आहे अशांना युरोपात झालेल्या या क्षेत्रातील विकासांचीही ओळख करून देण्यात आलेली आहे (२१६) आणि मोर्गने तर युद्धकालातील आणि युद्धोत्तरकालातील एकूण युरोपीय भूगोलाचा आढावा आपल्याला सादर केलेला आहे (८८).

इतके फेरबदल होत असूनही, या विषयाच्या स्वरूपासंबंधीचा प्रश्न ही अभ्यास करण्यासारखी बाब नसून, वैयक्तिक मताची बाब आहे, ही रूढ कल्पना अद्याप जीव धरून आहे, असे प्रथमदर्शनीच दिसते. सॉरने केलेल्या आव्हानात्मक विधानावर प्रक्षोभक चर्चा होऊनही, ज्यावर ती विधाने आधारलेली आहेत ते मूळ अभ्यासलेख, तपासून पहावे अशी इच्छा फारच थोड्यांना झाली आहे. हॉलने प्रदेश-संकल्पनेसंबंधी लिहिलेला लेख (६०) आणि प्रस्तुत लेखकाने केलेली संक्षिप्त चर्चा (२१६, ७९५ ते ८०४) या दोन गोष्टी वगळता बहूतेक सर्व भूगोलज्ञांनी हस्ते-परहस्ते आलेल्या अवतरणांवरच समाधान मानले आहे, किंवा भूगोल कसा असावा या संबंधीच्या स्वतःच्या कल्पनांवरच ते अवलंबून राहिले आहेत. याला सर्वात महत्त्वाचा अपवाद अलिकडेच फींचने केलेल्या अध्यक्षीय भाषणाचा होता. पण प्रस्तुत ग्रंथ जवळजवळ पूर्ण झाल्यावर ते भाषण प्रसिद्ध झाले (२२३).

## ब – भूगोलाचे स्वरूप सुधारण्याचे प्रयत्न

एक गोष्ट पुन्हापुन्हा सूचित केली गेली आहे की, भूगोलाच्या स्वरूपासंबंधीचा प्रश्न अगदी गौण आहे; आवश्यकता आहे ती भूगोलकारांनी केवळ कार्य करत रहाण्याची. भूगोलावर तशी खूपच चर्चा व विचारविनिमय झालेली आहेत (Es ist vial herumgedoktert worden an der geographic), अशी तक्रार करून पेंख म्हणतो की कोणत्याही शास्त्राची प्रगती त्याच्या पद्धतितंत्रविषयक लिखाणांवर अवलंबून नसते, तर ती पद्धतिनुसार कार्य करण्यावर अवलंबून असते (१६३, ५०). पण, ज्या पेंकने निदान आठ वेगवेगळे

पद्धतितंत्रविषयक चर्चा-लेख प्रसिद्ध केले त्या हेतूने " आपण चालत आहोत तोपर्यंत आपण कोठे जायचे ठरविले आहे या गोष्टीला काहीच महत्त्व " असे म्हणण्याचा खासच नव्हता, येवढे गृहीत धरण्यास हरकत नाही. ज्यांना अधिकृतरित्या " भूगोलकार " म्हणून मान्यता मिळालेली आहे अशा या क्षेत्रातील सभासदांच्या एकाच बैठकीत प्रबंध वाचले जात असताना तेथील काही श्रोत्यांना सकृत्दर्शनी त्यांचा संबंध भूशास्त्र, हवामानशास्त्र, मृत्तिकाशास्त्र, अर्थशास्त्र, इतिहास किंवा राजनीतिशास्त्र यांच्याशी असावा हे कळत असेल, तरी भूगोलक्षेत्रातील प्रत्येक अभ्यासक कोणते कार्य करण्याच्या प्रयत्नात आहे हे समजून घेण्यासाठी आपले निश्चित क्षेत्र कोणते हे आपणास माहीत असणे आवश्यक आहे.

जो जो आपले व्यावसायिक जीवन भूगोलक्षेत्रास वाहून घेण्याचा प्रस्ताव करतो, त्या प्रत्येक व्यक्तीच्या नजरेसमोर या क्षेत्राच्या स्वरूपाचे व व्याप्तीचे स्पष्ट चित्र असणे अधिक महत्त्वाचे आहे. स्वतःला भूगोलकार म्हणविणाऱ्या प्रत्येकासमोर असा नेमून दिलेल्या मर्यादांचा आराखडा असलाच पाहिजे आणि त्याने त्या चौकटीत राहूनच कार्य केले पाहिजे असा याचा अर्थ होत नाही. शास्त्रीय क्षेत्रांमध्ये अशा मर्यादा नेमून देण्याचा अथवा त्या चौकटीत राहून करावयाच्या कार्याचे स्वरूप ठरवून देण्याचा अधिकार कोणाही अन्य व्यक्तीला अगर मंडळीला दिलेला नसतो. तरीही हे क्षेत्र कसे आहे व कसे असावे यासंबंधीचे काही पूर्वग्रह बरोबर घेऊनच जे भूगोलक्षेत्रात प्रवेश करतात, ते भूगोलाच्या प्रत्यक्ष स्वरूपाचा आपल्या पूर्व-कल्पनांशी विरोध असल्याचे पाहून, असमाधानाच्या जाणीवेने व्यथित होतात; ही गोष्ट अनुभवाने अगदी स्पष्ट झालेली आहे. हे त्यांचे असमाधान स्वतःसंबंधीचे असो वा आपल्या सहकाऱ्यांसंबंधीचे असो, ते बुद्धिशक्तीच्या दुःखद अपव्ययाचे लक्षण आहे येवढे खरे. असा अपव्यय होणे हे त्या व्यक्तीच्या आणि एकूण क्षेत्राच्याही परिणामकारक विकासास विघातक असते. म्हणून, तरुण अभ्यासकांना कोणत्याही विशिष्ट क्षेत्राकडे आकर्षून घेणाऱ्यांचे एक प्रमुख कर्तव्य असते. त्यांनी या तरुणांच्या नजरेपुढे त्या क्षेत्राचे असे अचूक चित्र उभे करावे, की नंतर त्यांचा भ्रमनिरास होण्याची शक्यताच राहू नये. अर्थात, आपल्या क्षेत्राचे स्वरूप आपणास माहीत नसेल, तर आपल्याकडून हे कर्तव्य पार पाडले जाणार नाही.

अलीकडील काही दशकांत झालेल्या अमेरिकी भूगोलज्ञांच्या भूगोलाच्या स्वरूपासंबंधीच्या बऱ्याच चर्चा वाचल्या अगर ऐकल्या असता, त्यांच्या पोटी सुधारणा घडवून आणण्याचा हेतू असल्याचे लक्षात आल्याशिवाय रहाणार नाही. म्हणजे, एक गोष्ट उघड आहे, की भूगोल-क्षेत्रासंबंधी, निदान त्याच्या प्रचलित अवस्थेसंबंधी, एकप्रकारचा सार्वत्रिक असंतोष आहे. काही अंशांनी तरी, ही लक्षणे युरोपातील, आणि विशेषतः जर्मनीतील, भूगोलकारांच्या साहित्यातील अशाच प्रकारच्या लक्षणांचे प्रतिध्वनी आहेत.

एखाद्या ज्ञानक्षेत्राताच्या सद्यस्थितीबद्दल असंतोषाची भावना असणे वेगळे, आणि त्या क्षेत्राच्या मूलभूत स्वरूपाबद्दल असंतोष असणे वेगळे. हा दुसरा प्रकार त्या क्षेत्राच्या आरोग्यसंपन्नतेचे व जोमाचे लक्षण असते, हे सांगण्याची गरज नाही. तरीही, अशा भावना

दांडगाईच्या स्वैर प्रतिक्रियांनी व्यक्त केल्या जाणे हा काही त्यांच्या प्रगल्भतेचा पुरावा नव्हे ! एखाद्या चाणाक्ष तरुणाला खिडकीच्या तावदानातील रंगीत काचांच्या तुकड्यांच्या रचनेत दोष दिसण्याचा संभव आहे. हा वादाचा मुद्दा प्रत्यक्षपणे दाखवून देण्यासाठी त्या वादग्रस्त ठिकाणांवर अचूक नेम धरून खडे मारल्याने, फार तर लक्षणीय प्रक्षोभ निर्माण होईल ; पण खिडकीत सुधारणा होण्यासाठी काही केले, असे होणार नाही ! अशाप्रकारच्या पुष्कळ बाबींत हंबोल्टचे पुढील विधान चपखलपणे लागू पडतेसे वाटते : " ज्या क्षेत्रात मी स्वतः काहीच प्रयत्न केलेले नाहीत, त्या क्षेत्रात इतरांनी केलेल्या प्रयत्नांतील दोष, केवळ त्यांच्या प्रयत्नांना मिळालेले यश संशयास्पद आहे येवढ्या कारणावरून, दाखवत बसण्याची मला सवय नाही " ( ६०, I, ६८).

जर्मन भूगोलज्ञांपैकी एका दांडगाईखोर सुधारणावाद्याशी चर्चा करताना, ग्राडमानने पुढील प्रश्न त्याच्यापुढे टाकला. " नवे वर्ष उजाडताच कोणी नवा सुधारक उपटतो, पूर्वीच्या सर्व कार्यावर अथपासून इतिपर्यंत निंदेची झोड उठवितो, आणि या मोडतोडीतून अगदी नवीनच इमारत उभी करण्याची जबाबदारी आपल्या शिरावर असल्याचा आव आणतो, असल्याकारणासाठी आपल्या या शास्त्राचे अगदी उघडेवाघडे प्रदर्शन सर्व जगापुढे मांडण्याचा हा प्रकार अगदी अटळच आहे का ? " (२५१, परिक्षण, ५५२ f).

या क्षेत्राच्या वर्तमानस्थितीबद्दल सर्वतोपरी असमाधान वाटणे ही अशी एक घटना आहे, की तिच्या स्पष्टिकरणाच्या जंजाळात स्वतः लेखक व त्याचा टीका-विषय हे दोघेही अडकून पडतात. ही गोष्ट आम्ही आधीच सूचविलेली आहे आणि पुढे भूगोलाची आमुलाग्र सुधारणा घडवून आणण्याचा प्रयत्न करणाऱ्या व बऱ्याच गाजलेल्या एकदोन प्रस्तावांचा विचार करू, तेव्हा त्याचे प्रत्यक्ष प्रमाणही देऊ. ही शक्यता सतत मनात बाळगणे इष्ट असले, तरी या क्षेत्रात सुधारणा सुचविणारा कोणताही प्रस्ताव अशाच कोणत्यातरी कारणाकडे बोट दाखवून तो निकालात काढण्याचा आमचा विचार नाही; कारण, कोणताच अभ्यासक आपले हे क्षेत्र परिपूर्ण असल्याचा दावा करू शकणार नाही. जेव्हा अलीकडच्या काळातील प्रत्येक महत्त्वाच्या प्रस्तावाचे आम्ही विश्लेषण करू तेव्हा ते भूगोलविषयक विचारांच्या ऐतिहासिक विकासाच्या संदर्भावर, त्या क्षेत्राच्या तर्कसिद्ध संकल्पनांवर आणि त्या प्रस्तावाच्या स्वतःच्या गुणवत्तेवर आधारलेले असेल.

भूगोलाच्या सुधारणेसाठी आग्रहाने पुढे मांडलेल्या या विविध प्रकारच्या सूचनांतून अनेक वेगवेगळ्या दिशा दाखविल्या गेल्याचे दिसून येईल. जर्मन विचारांतील प्रचलित जीवनविषयक तत्त्वज्ञानाचा (Weltanschaung) या कल्पनेत तर दुहेरी आविष्कार दिसून येतो. कोणत्याही प्रदेशाच्या रूपधेयांच्या इतिहासकालीन विकासाला कारणीभूत झालेल्या व्यक्तींच्या महत्त्वावर भूगोलकारांनी विशेष भर द्यावा अशी मागणी हा एक अविष्कार, तर भूगोलाने राष्ट्रीय हिताचीच सेवा केली पाहिजे अशी मागणी हा दुसरा आविष्कार (उदाहरणार्थ श्रोफर). जर्मनीच्या हिताच्या दृष्टीने भूगोलाचा अभ्यास करण्याच्या बाबतीत जर्मन

भूगोलकार उणे पडले असे सूचविण्यात आले, तर खुद्द जर्मनीतील वडीलधाऱ्या भूगोलकारांना जसा धक्का बसेल तसाच तो पहिल्या जागतिक युद्धाचा काल व युद्धोत्तर काल यांतील जर्मन-भूगोलविषयक साहित्याचा परिचय असणाऱ्या कोणाही परकी अभ्यासकालाही बसेल, जर्मनीतील ही चळवळ अमेरिकेवर काही प्रत्यक्ष ठसा उमटविणारी नाही, असे गृहीत धरून, त्यासंबंधी अधिक विचार करण्याची आपणास गरज नाही. (याविषयक अधिक गोडी असणाऱ्या वाचकांनी हेटनरच्या, १७५, ३४१ ते ४३ आणि प्लेवीच्या १७७, २६६ ff या ग्रंथांतील प्रस्तुतविषयावरील परखड चर्चा पहाव्या).

त्या देशातील लोकांची अधिक महत्त्वाची दुसरी एक प्रवृत्ती आहे. हे लोक काही तरी " समस्या " निर्माण करणारे घटक भूगोलक्षेत्रात घुसडण्याच्या प्रयत्नात असतात. प्रदेशाच्या स्वरूपाचे " केवल वर्णन ", त्यात अर्थशोधनाचा थोडा मालमसाला घालूनही, प्रथमदर्शनी तरी समस्येचा भास निर्माण करू शकणार नाही. निदान तो शब्द अन्य शास्त्रांतून ज्या अर्थाने वापरला जातो त्या अर्थाने ती समस्या नसते. म्हणून, ' कालांतर ' हा एक घटक म्हणून त्याची भर घालणे आवश्यक समजले गेले. याचाच अर्थ, आजच्या परिस्थितीची पूर्वीच्या परिस्थितीशी तुलना करणे, किंवा कोणत्याही प्रदेशातील कोणत्याही एका घटकातील विशिष्ट बदलाचा परिणाम काय होतो याचा अभ्यास करणे, किंवा सर्वसाधारणपणे भूगोलाला ' स्थिर ' राहू न देता ' गतिमान ' करणे असा होतो.

भूगोलाला शास्त्र म्हणून मान्यता मिळालेली नसल्यामुळे, भूगोलसुधारणेचे बाकीचे दखलपात्र प्रयत्न भूगोलाचे सरळ एक शास्त्र बनवावयाचे या तीव्रतर व निश्चित हेतूच्या प्रेरणेतून निर्माण झाल्यासारखे दिसतात. म्हणून, भूगोलाला शास्त्र म्हणून प्रतिष्ठा मिळवावयाची असेल, तर त्यानेही प्रथमतः फक्त निरीक्षणीय घटनांचाच अभ्यास करण्याची मर्यादा मान्य केली पाहिजे. भूगोलाला अशा घटना दर्शनीय " भूदृश्यातून " मिळतात. काही गोष्टी दर्शनीय नसूनही निरीक्षणीय असतात असा कोणी दावा केला तर भूगोलाला मूर्त वस्तूंची मर्यादा मान्य करावी लागेल. कारण मूर्त घटनांचे, काही अंशाने तरी, अचूकपणे व निश्चितपणे निरीक्षण करणे व मापन करणे शक्य होते, याविरुद्ध अमूर्त घटनांचे तसे करणे शक्य होत नाहीत.

दुसरी एक सूचना एका गृहीतकावर आधारलेली आहे. प्रत्येक विशिष्ट शास्त्राला स्वतःच्या अशा काही वस्तू अगर घटना अभ्यासावयाच्या असतात. म्हणून भूगोलशास्त्राने काही प्रयत्न करून आपला असा एक वेगळा अभ्यासविषयक शोधला पाहिजे. भूक्षेत्रात त्याला आढळणाऱ्या बहुतेक सर्व दृश्य व भौतिक वस्तूंवर, त्याची सर्वतोपरी छाननी केलेली नसली तरीही, ती आपलीच मालमत्ता आहे असा दावा अन्य शास्त्रांनी अगोदरच लावलेला आहे. ' एक शक्यता अशी आहे, की अन्य शास्त्रांनी अद्यापि ज्यावर अधिकार सांगितलेला नाही अशा ज्या वस्तू भूक्षेत्रात आढळतील त्या भूगोलकारांनी वेचून घ्याव्या आणि ही आपली मालमत्ता म्हणून त्यांवर अधिकार सांगावा.

पण अन्य काही भूगोलकार असे आग्रहपूर्वक म्हणतात, की भूगोलाच्या अनुरूप अभ्यासवस्तू भू-भागांच्या स्वरूपात असून तिलाच ते प्रदेश असे म्हणतात. पण ही वस्तू मूर्त व एकात्म असली तरच, इतर शास्त्रे जशी त्यांच्या त्यांच्या वस्तूंचा अभ्यास करतात, त्याप्रमाणे या वस्तूंचाही अभ्यास करता येईल म्हणजेच वर्गीकरणानुरूप प्रकारांची मांडणी करणे, त्यांच्या संबंधीची तत्त्वे व नियम विकसित करणे या गोष्टी शक्य होतील. समजा, एखाद्याने या शास्त्राच्या प्रमुख कार्यक्षेत्राची कल्पना मान्य केली, पण वरील गृहीत तत्त्व अमान्य केले, तर त्याने केलेला प्रदेशांचा अभ्यास शास्त्र म्हणून मान्य होणार नाही. कदाचित, कलेच्या क्षेत्रातील एक प्रकार म्हणून तो मान्य होईल, पण तो " भूगोलाच्या शास्त्रातून " वगळला जाईल.

प्राध्यापक व्हाइटहेड यांच्या विचारसरणीत त्रुटी आहे असे आव्हान त्यांच्या विद्यार्थ्याने त्यांना दिले, तेव्हा त्यांनी काढलेले उद्‌गार या ठिकाणी आठवल्याशिवाय रहात नाहीत. ते म्हणाले, " या ठिकाणी कशाची गरज असेल तर ती एका चपखल शब्दप्रयोगाची ". भूक्षेत्ररूपी वस्तूच्या या चक्रव्यूहातून सुटका करून घेण्यास त्या भाग्यवान द्व्यर्थी शब्दांपैकी एकाची–भूदृश्य (Landscape) या शब्दाची–चांगलीच मदत झालेली आहे. भूदृश्य हे दृष्टिगोचर दृश्य असल्यामुळे, त्यात सर्व दृष्टिगोचर दृश्येच असल्यामुळे, त्यात सर्व दृश्य भौतिक वस्तूंचा समावेश होतो, आणि विविध अव्याख्यात मार्गांनी ते मर्यादितही करता येते, म्हणूनच त्याला एकात्म मूर्त वस्तू म्हटले जाते. पण, त्याच्या इंग्रजी नाही तरी जर्मन स्वरूपात, तेच भूदृश्य भूपृष्ठाचे, प्रांताचे वा प्रदेशाचे मर्यादित क्षेत्रही असते. अर्थात, प्रदेश अथवा भूदृश्य ही एक आकार व रचना असलेली एकात्म मूर्त वस्तू आहे; आणि म्हणूनच त्याचे वर्गीकरण करणे व त्यातील संबंधयोगांविषयीची शास्त्रीय तत्त्वे विकसित करणे या गोष्टी शक्य आहेत.

## क – प्रस्तुत अभ्यासग्रंथाचा हेतू

या ग्रंथात ज्याचे प्रतिपादन करण्याचा प्रयत्न आहे त्या विषयाचे, म्हणजेच भूगोलाच्या स्वरूपाचे, तपशीलवार परीक्षण, भूगोल हे एक शास्त्र आहे, अथवा ते तसे असणे आवश्यक आहे, इत्यादि कोणत्याच गृहीतत्त्वावर आधारलेले नाही. पृथ्वीशी संबंधीत असे कोणत्यातरी एका प्रकारचे ज्ञान म्हणजे भूगोल येवढेच गृहीत धरून, ते नेमके कोणत्या प्रकारचे ज्ञान आहे याचा शोध घेण्याचा आम्ही प्रयत्न करणार आहोत. ते एक नियमबद्ध शास्त्र आहे, की ती एक कला आहे, किंवा कोणत्या विशिष्ट अर्थाने ती शास्त्र अगर कला आहे, का दोन्हीही आहे ? शीर्षकांना चिकटलेल्या मूल्यविषयक संकल्पनांपासून दूर राहून वरील प्रश्नांना आपल्याला तोंड द्यावयाचे आहे. डग्लस जॉनसनच्या शब्दात विचारावयाचे झाले तर भूगोलाला शास्त्राची उच्चप्रतिष्ठा मिळविण्याची आकांक्षा बाळगता येईल का ? अथवा त्याच्या बरोबरीच्या स्थानावर हक्क सांगण्याचा आव त्याने आणावा का ? की इतिहास,

अर्थशास्त्र आणि समाजशास्त्रे यांच्याबरोबरीचे म्हणजे थोडे खालचे असले तरी मानाचे स्थान मान्य करावे ?, असे प्रश्न आम्ही स्वतःला विचारणार नाही. कारण, त्यामुळे निर्माण होणारी सहज प्रतिक्रिया जॉनसनने सांगितली आहे. " भूगोलाचे आजपर्यंत झाले नाही असे अंतर्बाह्य अन्वेषण केले जात नाही तोपर्यंत शास्त्रांच्या बरोबरीचे स्थान सोडण्यास भूगोलाने उघड नकार द्यावा " (१०३, २२०). यामुळे होते काय, तर भूगोलाला सतत समर्थकाची भूमिका घ्यावी लागते, आणि जे कदाचित कधीच साध्य होण्याचा संभव नाही ते घडवून आणण्याचा नित्य प्रयत्न करत रहावे लागते.

या प्रश्नाच्या एका बाजूपुरती तरी आपली भूमिका स्पष्ट करण्यास हरकत दिसत नाही. " भू-शास्त्र व वनस्पतिशास्त्र ही ज्या अर्थाने शास्त्रे आहेत ", त्याच अर्थाने भूगोल हे शास्त्र होणे जितके अशक्य कोटीतील आहे, त्याच अर्थाने भू-शास्त्र ज्या अर्थाने शास्त्र आहे त्याच अर्थाने वनस्पतिशास्त्र हे शास्त्र होणे, किंवा याच्या विरूद्ध प्रकार होणे, अशक्य कोटीतील आहे. तसेच या दोन्ही शास्त्रांना पदार्थ विज्ञान अथवा रसायनशास्त्र यांच्या अर्थाने शास्त्र होणे अशक्य आहे. म्हणूनच, भूगोलाचे जे काही स्वरूप आहे त्यापेक्षा अगदी वेगळ्या स्वरूपात रूपांतर करण्याचे कोणाही उत्साही अभ्यासकाचे प्रयत्न निष्फळच ठरतील. भूगोल हा सन्मानित नसला तरी तो प्राचीन आहे, म्हणूनच आदरणीयही आहे. भूगोल हा काही अमेरिकी भूशास्त्राच्या पोटी जन्माला आलेला नवजात विषय नव्हे, की प्रत्येक अमेरिकी पिढीतील भूगोलकारांनी तो मन मानेल तसा बदलून घ्यावा ! कोणत्याही शास्त्रविषयासंबंधी प्रत्येकाने आपले मन मोकळे ठेवावे हे मान्य केले, तरी प्रतिवर्षी आपली भूगोलाची संकल्पना आपल्या लहरीप्रमाणे बदलण्याचे स्वातंत्र्य आपल्यास कोणीच देणार नाही, असा दावा एका अज्ञात भूगोलज्ञाने केला आहे (पार्किन्सच्या ग्रंथातील अवतरणे पहा. १०५, २२२).

कोणत्याही प्रतिष्ठित क्षेत्रात, त्या क्षेत्राची योग्य व्याख्या करण्याचा प्रश्न हे काही सृजनशील कार्य मानले जात नाही. म्हणजेच, ते पूर्वमान्य गृहीतत्त्वांवरून तर्कशुद्ध विचारसरणीने सिद्ध करावयाचे एखादे प्रमेय, अथवा प्रत्यक्ष ज्ञानक्षेत्रातील एखादी अनुसंधान समस्या, या सारखे सृजनशील अवघड कार्य नव्हे. कोणत्याही विषयाचे सकलशास्त्रांतर्गत स्थान निश्चित करण्याचा प्रश्न हे संबंधी शास्त्रशाखेच्या विशिष्ट ज्ञानाच्या कक्षेबाहेरचे कार्य आहे. अर्थातच, तो " शास्त्रविषयक उपपत्तीचा, म्हणजेच प्रज्ञान विषयक उपपत्तीचा ", विषय आहे, असा दावा तत्त्वज्ञ क्राफ्ट याने भूगोल क्षेत्राचे क्रान्तिक परीक्षण करत असता केला आहे. या क्रान्तिक परीक्षणाचा तपशीलवार संदर्भ पुढे यावयाचाच आहे. अशा प्रकारच्या शास्त्राच्या उपपत्तीसंबंधाच्या अनुसंधानाचे कार्य भूगोलाचे स्वरूप कसे असणे इष्ट आहे ते ठरवून देणे हे नसून, त्यात कशाकशाचा अंतर्भाव होतो ते निश्चित करणे हे आहे (१६६, १ ते ३). तसेच हेटनरनेही १९०५ मध्ये असे म्हटले आहे, की " कोणत्याही शास्त्राची बांधणी ही त्याच्या गतकालिन वाढीतून निर्माण झालेली असते. पण, शास्त्रांच्या ज्या संक्षिप्त पदनामांचा कल गतकालिन विकासाची दखल न घेण्याकडेच असतो, त्यांच्या

नशिबी वैफल्य येणार हे आधी ठरल्यासारखेच असते. भूगोलाचे पद्धतितंत्रविषयक साहित्य अशा पूर्वमान्य संकल्पनांनी खच्चून भरलेले आहे हे त्याचे दुर्दैवच म्हटले पाहिजे " (१२६, ५४५).

" काटेकोर तर्कसंगती " समोर असताना अंधपणे " रूढीलाच " चिकटून राहण्याचा हा प्रकार आहे (२२२), असा लायलीने वरील दृष्टीकोनावर शिक्का मारला आहे. त्याने समर्थन केलेली भूगोलाची संकल्पना तर्कदृष्ट्या भक्कम आहे असे दाखविता येण्यासारखे असले (या प्रश्नाकडे आपल्याला पुढे वळावयाचे आहेच), तरी एखाद्या अभ्यासक्षेत्राच्या गतकालिन उत्क्रांतीवर " रूढी " असा केवळ शिक्का मारून त्याचे सत्त्वहरण केल्याने हा वाद जिंकता येणार नाही. संयुक्त संस्थानांच्या रहिवाशांच्या उगमस्थानांचा विचार करत असता, एकतर या लोकांनी विविध युरोपीय व आफ्रीकी भाषा बोलाव्या, नाहीतर एकूण लोकसंख्येचा जेवढा हिस्सा एका भाषिकांचा असेल त्याप्रमाणे तिला प्रतिनिधित्व देऊन तयार केलेली एक मिश्रभाषा बोलावी, असा दावा अभ्यासकाने करावयास हरकत नाही. पण " राजमान्य इंग्रजीशी " जवळीक करणारी कोणतीतरी एक भाषा आमच्या शाळांनी शिकविलीच पाहिजे ही केवळ एक " रूढी " असूनही ती शाळांनी मान्य केलेली आहे.

कोणत्याही शास्त्र शाखेची विशिष्ट व्याप्ती तर्कदृष्ट्या समर्थनीय असली तरी, त्यावर त्यातील ज्ञानाची अभिवृद्धी तितकीशी अवलंबून नसते, तर भूतकाळातून सुरू होऊन वर्तमानकाळामधून पुढे सरकून भविष्यकाळापर्यंत पोहोचणाऱ्या अखंड जीवन स्त्रोतावर त्या शाखेची अभिवृद्धी अधिक अवलंबून असते. एखाद्या शास्त्राच्या, अथवा कोणत्याही विषयाच्या, इतिहासात सुशिक्षित वर्गाच्या सामान्य ज्ञानातून काही थोड्या स्वयंभू " आचार्यांच्या " कार्यावर इतका भर दिला जात असतो, ते पाहून कोणालाही वाटावे, की त्यापैकी प्रत्येकाने शून्यातून सुरुवात करून येवढे मोठे यश एका हाती प्राप्त करून घेतले असले पाहिजे. भूगोलक्षेत्रात असे मनावर ठसणारे उदाहरण अलेक्झांडर हंबोल्टचे आहे. कोणीही मार्गदर्शक आचार्य नसलेला अग्रेसर कार्यकर्ता, अमेरिकेचे अन्वेषण करून स्वगृही परत येणारा व प्राकृतिक भूगोलाची प्रतिष्ठापना करणारा एकमेव पुरुष, अशा स्वरूपात सहसा त्याचे चित्र रेखाटले जाते. वस्तुस्थिती वेगळी आहे आणि तिचे परीक्षणही आपण करणार आहोत. तरुण फॉर्स्टरची मदत झाली नसती तर हंबोल्ट भूगोलकार झाला असता का, असाच प्रश्न विचारणे योग्य ठरेल. या तरुण फॉर्स्टरचे सर्व भौगोलिक कार्य वृद्ध फॉर्स्टरच्या कार्यावर आधारलेले होते. वृद्ध फॉर्स्टरचे पूर्वाचार्य आम्हाला माहीत नाहीत येवढेच ! शिवाय, हंबोल्ट आपल्या कार्याच्या सुरुवातीपासून शेवटापर्यंत अक्षरशः अन्य भूगोलकारांच्या समुदायावर अवलंबून होता असे त्याच्या लिखाणातील संदर्भसमुच्चयावरून दिसून येते आणि त्यात समकालिनांबरोबरच पूर्वकालिनांचाही उल्लेख आहे.

याच्याविरूद्ध, भूगोलज्ञांच्या प्रत्येक नव्या पिढीने किंवा प्रत्येक वेगळ्या भूगोलज्ञाने, ज्या सूचनांची प्रत्यक्ष उदाहरणे अथवा त्या विषयाच्या पूर्वकालिन विकासाच्या अभ्यासाने चाचणी

झालेले नाही अशा नव्या नव्या सूचना पुढे आणल्या, तर हेटनर म्हणतो त्याप्रमाणे, भूगोलकारांच्या मनात एक प्रकारची अस्वस्थतेची व असुरक्षिततेची भावना निर्माण होते व या क्षेत्राच्या यशस्वी मशागतीला खीळ पडते; इतकेच नव्हे तर, अन्य क्षेत्रातील कार्यकर्ते या एकूण विषयाबद्दलच साशंक होतात (१५२, ५२ f, १६७, २६५; १६८, ४९० f). अमेरिकी भूगोलकारांना असल्या परिणामाचा चांगलाच परिचय झालेला आहे ! प्रथम एकदा प्राकृतिक भूगोलाकडें, तर नंतर पर्यावरणवादाकडे, आज भूदृश्यांच्या अभ्यासाकडे, तर उद्या कलापूर्ण स्थलवर्णनाकडे, आणि नंतर कोणीकडे ' तरी ! अशाप्रकाराचे दांडगाईने सुकाणू फिरविण्याचे खटाटोप असेच पुढेही चालू रहाणार असतील, तर आपल्या भूगोलाचे हे तारू, सतत बदलत्या ध्येयामुळे, म्हणजेच ध्येयशून्यतेमुळे, नुसतेच भरकटत राहील आणि कोठेच पोहोचणार नाही.'

एक भूगोलकार या नात्याने, प्रस्तुत लेखकाचा भूगोल क्षेत्रविषयक दृष्टिकोण आवडणारे कोणी वाचक असलेच तर फार थोडे असणार, हे या संपूर्ण ग्रंथाच्या उभारणीत एक गृहीततत्त्व म्हणूनच लेखकाने मान्य केले आहे. आपल्या मंडळाने अध्यक्ष पदासाठी निवडलेल्या आपल्याच क्षेत्रातील आचार्यांचा असा दृष्टिकोणविषयक प्रस्ताव मांडण्याचा एक राखीव अधिकार आहे असे कोणीही गृहीत धरणार. तरीही, अन्य भूगोलकारांना भूगोल कसा दिसतो, किंवा या पूर्वीच्यांना तो कसा दिसला, याचे यथार्थ चित्र पुढे ठेवणे, हाच प्रस्तुत लेखकाचा हेतू आहे. कोणत्याही विशिष्ट कालखंडातील अथवा कोणत्याही एका देशातील भूगोलकार या संपूर्ण क्षेत्राच्या एखाद्या लहान भागाचेच प्रतिनिधित्व करतात. म्हणूनच आपले हे परीक्षण अन्य कालखंडात व अन्य देशांतही विस्तारणे आवश्यक होणार आहे. तेव्हा, आपल्याला योग्य मार्गाने जावयाचे असेल– अथवा नुकत्याच झालेल्या एका चक्री-चर्चेत सुचविल्याप्रमाणे योग्य मार्गावर पुन्हा परत यावयाचे असेल– तर आपल्याला प्रथम भूतकाळाचे सिंहावलोकन करावे लागेल; आणि त्यावरून रूढ मार्गाने जाणारा भूगोल कोणत्या दिशेने चालला आहे हे समजून घ्यावे लागेल. अर्थातच, भूतकालीन विकासावस्थेत भूगोलाचे स्वरूप कसे होते हे समजून घेणे हे आपले पहिले कर्तव्य ठरेल.

म्हणूनच नित्याचा क्रम पालटून, शास्त्राच्या स्वरूपासंबंधीच्या कोणत्याही एका संकल्पनेपासून सुरूवात न करता, भूगोलक्षेत्र जसे निर्माण होत गेले तसेच आपण त्याचे परीक्षण करणार आहोत, त्याचे आवश्यक गुणविशेष निश्चित केल्यावर, विविध ज्ञानशाखांच्या संदर्भात त्याचे परीक्षण करत जाणार आहोत. या क्षेत्राचे आवश्यक गुणविशेष निश्चित केल्यावर विविध ज्ञानशाखांच्या संदर्भात त्याचे तर्कसिद्ध स्थान कोठे आहे ते शोधून पहाण्याचा प्रयत्न करणार आहोत. (c/o क्राफ्ट १६६, ३). अर्थात, या ग्रंथाच्या तीन भागांपैकी पहिला भाग " भूगोल म्हणजे काय ? " या प्रश्नासंबंधीचा असेल (प्रकरणे २ ते ४).

---

१. हे वाक्य लिहिले गेल्यानंतर, या प्रश्नाचे आणखी एक उत्तर ' भूविज्ञानाकडे ' असे आधीच दिले गेलेले आहे (२२२, २५२ ff) पण नंतर मला असे सांगण्यात आले, की तसे म्हणण्याचा त्या लेखकाचा हेतू नव्हता.

अशारितीने पाया तयार झाल्यावर भूगोलाच्या सुधारणेसाठी केल्या गेलेल्या विविध सुचनांची तपासणी करणे आपणास शक्य होईल. आजच्या भूगोलापुढे आलेल्या प्रमुख सूचनांच्या परीक्षणाने या एकूण अभ्यासग्रंथाचा सुमारे निम्मा भाग व्यापलेला आहे (प्रकरणे ५ ते १०). येथे, एक गोष्ट वाचकांच्या लक्षात येईल. वर दिलेल्या विभाग ' ब ' मध्ये उल्लेखिलेल्या अशा सूचनांच्या संक्षिप्त विधानांनी त्या सूचना करणाऱ्या अभ्यासकांच्या विचारांना निदान त्यांची रूपरेषा सादर करण्यापुरता न्याय दिला आहे, असेही म्हणता येणार नाही. यापैकी कित्येक अभ्यासकांनी भूगोलविषयक अनुसंधानात स्पृहणीय भर टाकलेली आहे. म्हणून, त्यांनी केलेल्या भूगोलातील सुधारणासंबंधी सूचनांचा आपल्याला काळजीपूर्वक विचार केला पाहिजे. उलटपक्षी, आपल्या सूचना केवळ अधिकार म्हणून मान्य न केल्या जाता त्यांची क्रान्तिक परीक्षा केली जावी अशी अपेक्षा त्यांनी स्वतःच केलेली असावी; निदान, तसे आपण गृहीत धरावे, हे बरे. बहुतेक बाबतीत, कोणत्याही औपपत्तिक सूचनेची अर्थवत्ता, जेथे तिचे प्रत्यक्ष उपयोजन झालेले असेल तेथे, अगदी स्पष्टपणे पडताळून पहाता येते. म्हणून आपल्या परिक्षणात त्या त्या मार्गानुसार रचलेल्या प्रत्यक्ष कृतींचाही आढावा घ्यावा लागेल. वरील दोनही बाबतीत, त्या त्या ग्रंथातील भूगोलाच्या स्वरुपाविषयींच्या कल्पना समर्थनीय आहेत अगर नाहीत येवढ्या एकाच गोष्टीपुरता आपला त्या ग्रंथांशी संबंध आहे, ही गोष्ट सतत मनात बाळगण्याची वाचकांना विशेष विनंती आहे. या ग्रंथासोबत जोडलेल्या संदर्भसूचीवरून बहुश्रुत वाचकांच्या ही गोष्ट सहज लक्षात येईल, की ज्यांनी काही विशेष कार्य करून प्रतिष्ठा संपादन केली आहे, अशा भूगोलकारांपुरतेच हे संदर्भ मर्यादित आहेत. या लेखकांचे ज्येष्ठत्व, बहुधा सर्वच बाबतीत, त्यांच्या पद्धतितंत्रविषयक लिखाणांव्यतिरिक्त अन्य लिखाणांवर आधारलेले असल्यामुळे या ग्रंथातील कोणत्याच चर्चांचा त्यांच्या कार्यांवर परिणाम होण्याची शक्यता नाही. या ग्रंथकारांच्या पद्धतितंत्रविषयक विचारांची चिकित्सा करण्यापुरताच आपला त्यांच्यांशी संबंध आहे. प्रश्न असा उद्भवतो, की हे त्यांचे विचार म्हणचे, तर्कशास्त्राच्या भाषेत अथवा वास्तवाच्या भाषेत केलेली, भूगोलाच्या स्वरुपासंबंधीची भक्कम विधाने आहेत का भूगोलक्षेत्रात सुधारणा करण्यासंबंधीच्या मान्य होण्यासारख्या सूचना आहेत ? या प्रश्नांची उत्तरे अस्तिपक्षी मिळण्यासारखी नसतील, तर ज्याच्या आधारांवर भूगोलाचे विस्तृत व एकसंध क्षेत्र विकसित होण्याची शक्यता आहे अशा तर्कसिद्ध व भक्कम पायाभूत तत्त्वांचाच विचार करणे आवश्यक ठरेल.

शेवटी, निष्कर्षांच्या स्वरुपात एवंगुण विशिष्ट भूगोलक्षेत्राचा एकूण ज्ञान-क्षेत्राशी संबंध प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करण्यास हरकत नाही; म्हणजेच, भूगोल हे कोणत्याप्रकारचे अभ्यासक्षेत्र आहे हे निश्चित करण्याचा प्रयत्न करण्यास हरकत नाही (प्रकरणे ११ व १२). त्याला प्रत्यक्षात शास्त्र म्हणावयाचे अगर नाही या प्रश्नाचे उत्तर परिभाषेत विशेष रस घेणाऱ्यांच्या मतांवर सोपवू या; कारण, एकदा भूगोल हे कोणत्या प्रकारचे अभ्यासक्षेत्र आहे याचा निर्णय झाल्यावर त्याच्या शिर्षकाची चिंता करत बसण्याची आपल्यास गरज नाही.

प्रस्तुत लेखकाला एक गोष्ट येथे स्पष्ट करावयाची आहे. त्याच्याच सहकाऱ्यांनी केलेल्या सूचनांची चिकित्सा करत असताना, त्यावर तर्कदुष्ट वादंग माजविण्याचा त्याचा हेतू नाही; म्हणजेच, त्यांनी केलेल्या विधानांतील स्पष्टपणात किंचितही उणीव असल्याची संधी साधून त्यावर हल्ला चढविण्याची त्याची इच्छा नाही, पण मांडल्या गेलेल्या सूचनांमागील हेतू समजून घेण्याची मात्र त्याची धडपड आहे. विशेषेकरून अलीकडच्या काळातील, जर्मन भूगोलज्ञांच्या पद्धतितंत्रविषयक चर्चांना दुर्दैवाने वैयक्तिक वादविवादांचे स्वरूप आले. तसा प्रकार अमेरिकी भूगोलात सुरू करण्याची लेखकाची मुळीच इच्छा नाही. ओप्स्ट प्रमाणेच प्रस्तुत लेखकाचाही प्रयत्न शक्यतोवर जास्तीत जास्त समझोता व एकवाक्यता करण्याच्या दिशेने राहील. तो भूगोलाची कोणतीही एक दिशा आपली म्हणून प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करणार नाही, तर भौगोलिक कार्यासाठी एक सर्वमान्य पाया शक्य असल्याचे दाखवून देईल; म्हणजेच, तो प्रत्यक्ष भूगोलविषयक कार्याला अत्यधिक प्रमाणात चालना मिळेल असा प्रयत्न करील– आणि हाच या ग्रंथाचा मुख्य उद्देश आहे (१७८, १ ते ३).

## ड – ऐतिहासिक सर्वेक्षणाची गरज

आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या भूगोलाच्या इतिहाससंबंधीच्या अभ्यासलेखांचे त्रोटक परीक्षण करत असता जॉन के राईट् याने असा शेरा मारला, अशा विषयाचे यथास्थित विवेचन करणाऱ्या ग्रंथांची इंग्रजीत एकंदरीने उणीवच आहे (९) अमेरिकी भूगोलाच्या इतिहाससंबंधीं विवेचन करणारे पुष्कळ उत्कृष्ट ग्रंथ आपल्याकडे आहेत. त्यातही डब्लू. एम्. डेव्हिस (१०२, १०४), डग्लस जॉन्सन (१०३) आणि कोल्बी (१०७) यांचे ग्रंथ विशेष उल्लेखनीय आहेत. तसेच अमेरिकी भूगोलाच्या अलीकडील विकाससंबंधीच्या जर्मन साहित्यातील दोन वेगवेगळ्या प्रकाशनांकडेही लक्ष द्यावयास हरकत नाही. त्यांपैकी एक कॅलिफोर्निया विद्यापीठाकडे ब्रॉक याने लिहिलेला असून, दुसरा त्याच संस्थेत काम केलेल्या फायफरने लिहिलेला आहे (१०८, १०९ त्याचबरोबर त्यावरील फ्लाटची मार्मिक टीकाही पहा २२४, १२५). पण, अमेरिकेतील भूगोलाच्या विकासाचे आकलन युरोपात होत गेलेल्या पूर्वकालीन व समकालीन विकासाच्या संदर्भातच होणे शक्य आहे; कारण या विषयाचे सांगोपांग विवेचन आपल्या साहित्यात शोधणे आजतरी व्यर्थ आहे. राइटने १९२५ मध्ये त्यांची उणीव असल्याचा उल्लेख केल्यानंतर, डिकिन्सन व होवार्क यांनी या क्षेत्राचे एक उपयुक्त सर्वेक्षण प्रकाशित केले आहे. पण, दुर्दैवाने, ते जर्मनीतील कार्याच्या परकीयांनी केलेल्या अर्थशोधणावर बहुतांशी अवलंबून असल्याचे दिसते; आणि जर्मनीतील रात्सेलनंतरच्या विकासाची रुपरेषा त्यात अगदीच त्रोटक दिलेली आहे.

आधुनिक भूगोलाचा शास्त्र या नात्याने पाया रचण्याचे कार्य मुख्यतः जर्मन अभ्यासकांनी केले, याबद्दल वाद असण्याचे कारण नाही. कोणत्याही देशापासून सुरूवात केली, तरी तेथील भूगोलाच्या विकासाचा अभ्यास करत असताना, एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीच्या काळात हंबोल्ट आणि रिटर यांनी केलेल्या कार्यापर्यंत मागे जावेच लागते. शिवाय, पुष्कळशा देशांत

भूगोलाचे कार्य जरी कमी-अधिक प्रमाणात स्वतंत्रपणे चालत असले, तरी त्या त्या देशातील भूगोलविषयक विचारात झालेले महत्त्वाचे बदल हे जर्मन भूगोलातील बदलांचेच आविष्कार असतात; आणि कित्येकदा ते घडून येण्यास फार विलंब झालेला असे, असेही आढळून आले. एक विशेष दुर्दैवाची गोष्ट अशी, की गेल्या शतकभरात जर्मनीत झालेल्या भूगोलविषयक विचारविनिमयाची, निदान रूपरेषा म्हणता येईल असा एकही ग्रंथ इंग्रजीतून उपलब्ध नाही. त्याचा परिणाम असा झाला आहे, की बहुतेक सर्व अमेरिकी भूगोलज्ञ प्रशिक्षित असूनही आपल्या विषयाच्या पद्धतितंत्रविषयक पार्श्वभूमीचे बाबतीत पूर्णपणे अंधारात असतात. याच्या उलट, जर्मन अभ्यासकांच्या हाताशी त्या त्या कालखंडातील अशातऱ्हेचे मूळ लेख तयार असतात, इतकेच नव्हे तर भूगोलविषयक विचाराच्या विकासासंबंधीचे अनेक ऐतिहासिक अभ्यासग्रंथही त्यांना उपलब्ध असतात.

या इतिहासाचे समर्पक निवेदन करावयाचे म्हटले, तर त्यावरच एक ग्रंथ लिहावा लागेल. एक अभ्यासक्षेत्र या नात्याने भूगोलाच्या विकासाच्या प्रत्येक अवस्थेत त्याला प्राप्त झालेली प्रमुख लक्षणे तेवढीच विचारात घ्यावयाची अशी मर्यादा घालणे, आमच्या प्रस्तुत हेतुच्या दृष्टीने आवश्यकच आहे. आमचा संबंध भौगोलिक कार्याच्या विकासाशी नाही किंवा भूगोलविषयक सामग्रीच्या निर्मितीत निरनिराळ्या लेखकांचे वा गटांचे महत्त्व याच्यांशीही नाही, तर भूगोलाच्या स्वरुपाविषयीच्या विचारांना मिळालेली प्रतिष्ठा व त्यांच्यात होत गेलेले बदल यांच्याशी आहे. अर्थातच, या गोष्टींचा शोध भूगोलविषयक ग्रंथाबरोबरच पद्धतितंत्रविषयक ग्रंथांवरूनही घ्यावयाचा आहे.

भूगोलक्षेत्रातील पूर्वीच्या कार्याचे आम्ही जे परीक्षण करणार आहोत ते दोन हेतूंनी करणार. आपण ज्या क्षेत्रात कार्य करतो त्याचे आकलन होण्यास मदत करणे हा एक हेतू. त्या दृष्टीने या अभ्यासग्रंथाच्या महत्त्वावर आम्ही प्रथमच भर दिला आहे आणि भूगोलाच्या पद्धतितंत्राच्या क्षेत्रात सध्या विचाराधीन असलेल्या प्रश्नांसंबंधी आधीच्या लेखकांनी कोणते निष्कर्ष काढले होते हे समजून घेणे, हा दुसरा हेतू. कारण, यातील काही थोड्या अभ्यासलेखांकडे पूर्वीच्या भूगोलकारांचे मुळीच लक्ष गेलेले नाही– आणि बहुतेक बाबतीत पूर्वी वारंवार दुर्लक्ष होत गेले आहे. " या बाबतीत पूर्वकालीनांच्या लेखनाकडे दुर्लक्ष करण्याची आम्हा भूगोलकारांची संवय जोपर्यंत जात नाही, तोपर्यंत या पद्धतितंत्रविषयक गोंधळात सुधारणा होण्याची आशा नाही. ....... कित्येकदा तर, आपल्या शेजाऱ्यानेच जे शिलाखंड अधिक चांगल्या बांधकामाच्या दृष्टिने अपुरे वा निरूपयोगी आहेत हे यापूर्वीच ओळखलेले असते, तेच शिलाखंड वापरून नवीन इमारत उभारण्याचा खटाटोप आम्ही करत असतो. " अशी बॉनने टीका केली आहे (११५, १७ f). ऑप्स्ट म्हणतो, " पद्धतितंत्रातील कोणत्याही प्रकारची प्रगती भूतकालावरच आधारावी लागते. म्हणून, भूतकालीन समज आणि संकल्पना यांचे ज्ञान आणि त्यांचे विवेचन झाल्याशिवाय पद्धतितंत्रविषयक कोणताच बदल घडवून आणण्याचा प्रयत्न होता कामा नये. " (१७८, ३).

भूगोल कसा असावा याविषयीच्या पूर्वप्रतिष्ठित संकल्पना बरोबर घेऊनच याप्रकारचा अभ्यास करण्यास कोणी प्रवृत्त झाला व या संज्ञांपुरते आपल्याशी सहमत असलेले भूगोलकार विरूद्ध भूगोलाचा वेगळा दृष्टिकोन असणारे भूगोलकार असा पट त्याने मांडला, तर त्याच्या ऐतिहासिक अभ्यासाने आपले वरील दोनही हेतू साध्य होण्याची शक्यता नाही. कोणत्याही पद्धतितंत्रविषयक वादविवादात सापडतील तेथून समर्थक युक्तिवाद हुडकून घेण्याचा—मग तो युक्तिवाद वर्तमानकालीन असो वा भूतकालीन असो— कोणीही प्रयत्न करणारच, ही गोष्ट निश्चित आहे. पण, अशाप्रकारचे विवेचक ग्रंथ व ऐतिहासिक अभ्यास-ग्रंथ यांची गल्लत केली जाऊ नये. कारण, ऐतिहासिक अभ्यासाचा उद्देश भूतकालीन वस्तुस्थितीचे वस्तुनिष्ठ प्रतिपादन करणे हा असतो. उलटपक्षी दुसऱ्या प्रकारात, त्या विशिष्ट वादाचा हेतू साध्य व्हावा म्हणून पूर्वकालीन भौगोलिक विकासाला अथवा भूगोलकारांच्या विचारांना विकृत रूप देण्यातच या वादांची परिणती होते. म्हणूनच, मानवी बुद्धीला शक्य होतील तेवढी, आपली वैयक्तिक विशिष्ट मते बाजूला ठेवून पूर्वकालीन भूगोलकाराच्या संकल्पनांचे विवेचन करण्याचा आपण प्रयत्न करू या.



## प्रकरण २ रे

# ऐतिहासिक विकासानुसार भूगोलाचे स्वरूप

## अ–आधुनिक भूगोलाचा अभिजात-पूर्व कालखंड

एक अभ्यासक्षेत्र म्हणून भूगोलाची मुळे प्राचीन* अभिजात कालखंडापर्यंत जाऊन पोहोचत असली तरी १७५० ते १८५० या शतकभरात झालेल्या भूगोलविषयक कार्यामुळेच त्याला आधुनिक शास्त्र म्हणून प्रतिष्ठा मिळाली. वरील कालखंडाचा उत्तरार्ध, म्हणजेच हंबोल्ट व रिटर यांचा काल, हा सामान्यतः भूगोलाचा " अभिजात कालखंड " म्हणून बोलला जातो. हे दोघे समकालीन पण अगदी विरुद्ध दिशांनी कार्य करणारे होते. या दोघांपैकी प्रत्येकाने केलेली असाधारण कामगिरी, आणि त्यांच्या कार्याचा नंतरच्या सर्वच भूगोलावर पडलेला प्रभाव यामुळे आधुनिक भूगोलाचे 'आद्यगुरू' म्हणून–आणि तेवढ्याच अर्थाने "संस्थापक" म्हणून–आपण त्यांची जी संभावना करतो ती निःसंशयपणे समर्थनीय ठरते. पण अशाप्रकारच्या पदव्या चिकटविताना, पूर्वकालीन कार्यकर्त्यांच्या महत्त्वाकडे नकळत दुर्लक्ष केले जाते. या संस्थापकांसाठी पाया तयार करण्याचे काम त्यांच्याही पूर्वाचार्यांनी केलेले असते असे म्हणण्यास हरकत नाही. " कार्ल रिटरचेही कोणी पूर्वज होतेच " (Carl Ritter hat auch Seine Vorganger) असे उद्गार पिशेलच्या नावावर उद्धृत केले जातात ; आणि ते विधान हंबोल्टलाही तितकेच लागू पडणारे आहे. अशा पूर्वाचार्यांपैकी प्राचीन कालखंडातील भूगोलकार, अथवा १८०० पूर्वीच्या दोन-तीन शतकांतील भूगोलकार यांच्याशी आपणास येथे कर्तव्य नाही. कमीजास्त प्रमाणात फुटकळ पण उपयुक्त अशा अभ्यासाचे रुपांतर एका स्वतंत्र शास्त्रात करण्याचा ज्यांनी जाणीव पूर्वक प्रयत्न केला, अशा अभ्यासकांशीच आपणास येथे कर्तव्य आहे. १८ व्या शतकाच्या उत्तरार्धातील असे भूगोलकार संख्येने कमी असले, तरी त्यांच्याकडे दुर्लक्ष करण्याइतके ते कमी नव्हते खास ! या भूगोलकारांनी आपला हेतू पूर्णपणे साध्य केला होता असे ठामपणे म्हणणे अवघड असले, तरी त्यांनी आज आपल्याला माहीत असलेल्या भूगोलशास्त्राचा ढोबळ आराखडा तयार करून ठेवला. ही कामगिरी त्यांनी त्या शतकारंभीच, म्हणजे हंबोल्ट व रिटर यांचे भूगोलग्रंथ प्रकाशित होण्यापूर्वी जरी पार पाडली होती, तरीही त्या आराखड्याची निश्चित रूपरेषा त्यांना प्रस्थापित करता आली नव्हती. आणि या कामगिरीसाठीच, म्हणजेच आधुनिक भूगोलशास्त्राची प्रतिष्ठापना केली म्हणून, आपण हंबोल्ट आणि रिटर यांचे ऋणी राहिले पाहिजे. पण या भूगोलाच्या बहुतेक सर्व पायाभूत संकल्पना–या ग्रंथात ज्या संकल्पनांचे आपल्याला परीक्षण करावयाचे आहे त्यांचाही त्यात समावेश होतो–हंबोल्ट व रिटर यांच्या लगतच्या भूतकाळात होऊन गेलेल्या जर्मन भूगोलकारांच्या लेखनात सापडण्याची

---

* पुरवणी टीप क्रमांक २ पहा.

शक्यता आहे. अर्थातच, या दोघांपैकी कोणीही जन्माला आला नसता तरी, तशा स्थितीतही इ. स. १८०० नंतर झालेल्या भूगोलाच्या विकासाचे स्वरूप शेवटी, बऱ्याच सावकाशीने का होईना, आज आपल्याला माहीत असलेल्या भूगोलाच्या स्वरूपाप्रमाणेच झाले असते, असे म्हणणे फारसे अतिशयोक्तीचे ठरणार नाही.

प्राचीन ' अभिजात ' कालखंडातील आणि ' पुनरुज्जीवन ' कालखंडातील भूगोलाचा वारसा प्राप्त झालेले १८ व्या शतकातील भूगोलकार, जगाच्या निरनिराळ्या भागात निरनिराळ्या स्वरुपात असणाऱ्या व जगाचे ज्ञान होण्याच्या दृष्टीने अर्थपूर्ण वाटणाऱ्या घटनांचा विचार ओघाओघानेच करत असत. स्ट्रॅबोच्या सुप्रसिद्ध विधानाचा ते पुनरुच्चार करत : " शासनकला आणि सामाजिक जीवन यांच्या दृष्टीने भूगोलाचे मोठे महत्त्व आहेच ; पण त्याबरोबरच, जमिनीवरील आणि सागरावरील रहिवासी आणि जगाच्या निरनिराळ्या भागातील वनस्पती, फळे व अन्य विशेष गोष्टी यांचीही ओळख भूगोल करून देत असतो. या ज्ञानाचे संपादन व संस्करण करणारा मनुष्य हा जीवन आणि सुख या संबंधीच्या कूट प्रश्नांची उकल करण्यास उत्सुक असलेला मनुष्य म्हणून ओळखला जातो. (३८, प्रस्तावना). [१]

इमान्युअल कांटच्या " प्राकृतिक भूगोलाचा " स्ट्रॅबोच्या विधानात समाविष्ट असलेल्या सर्व मूलतत्त्वांशी संबंध असे. या प्राकृतिक भूगोलाच्या पायावरच कांट आपल्या अन्यप्रकारच्या भूगोलांची उभारणी करत असे. त्यात राजकीय, व्यापारविषयक नैतिक (चालरीती संबंधी) व देवविषयक भूगोलांचा आणि प्रत्येक विशिष्ट देशांच्या वर्णनांचाही समावेश होत असे. (४०, § ५) आपल्या जगासंबंधीच्या प्रतिबोधांचे पुरेसे आकलन होण्यासाठी प्राकृतिक भूगोल हा आवश्यक प्राथमिक अभ्यास आहे ; मग ते प्रतिबोध प्रत्यक्ष प्रवासांतून निर्माण झालेले असोत अथवा अप्रत्यक्षपणे वाचनातून आलेले असोत ! (§ २ व § ४ चा शेवट) थोडक्यात सांगावयाचे तर, " त्यामुळे आपल्या प्रतिबोधांचे योग्यप्रकारे संकलन होते, बौद्धिक आनंदात भर पडते आणि सामाजिक प्रबोधनासाठी संपन्न सामग्री हाती येते. " (६५ या उताऱ्यातील विचार जरी कांटचे असले, तरी शब्द रिंकच्या तोंडचे आहेत, तळटीप ३ पहा).

स्ट्रॅबो आणि कांट यांची ही विधाने आधुनिक शास्त्रांच्या भाषेत भाषांतरित करावीत इतक्या तोलामोलाची आहेत, " घरकोंबड्या वाचकांच्या मनांतील सर्वसाधारण कुतूहल " असा ज्याचा उल्लेख लायलीने केला आहे, तशा प्रकारचे कुतूहलही कांटच्या मते शास्त्रविरोधक नव्हते. उलट, जगाच्या ज्ञानाची अभिलाषा करणारे असले कुतूहलच अशा ज्ञानाचा पाठपुरावा करावयाची व ते ज्ञान संघटीत करण्याचे प्रयत्न करण्याची प्रेरणा देते. अर्थातच

---

२. मूळ ग्रंथावरून मी स्वतः ज्यांची खातरजमा केलेली आहे असेच संदर्भ या पुस्तकात मी नोंदवलेले आहेत, अर्थात, अन्य सर्व संदर्भ टीकाकारांच्या लिखाणावर विसंबून, म्हणजे अप्रत्यक्षपणे मान्य केले आहेत. हे स्पष्ट होईल अशी अपेक्षा आहे.

हे हेतू साध्य होण्यासाठी विद्यार्थ्यांनी स्वतंत्रपणे आणि गटागटांनी विशेष ज्ञान संपादन करणे आवश्यक आहे. हे विशेषज्ञान संपादन करण्याचे अनेक मार्ग कांटला मान्य होते. पण वस्तूंचे प्रकारान्वये विशेषज्ञान संपादन करण्याचे महत्त्व मान्य करत असतानाच (आणि हेच त्याचे मत निसर्गशास्त्रांच्या क्षेत्रात पुढे प्रभावी ठरावयाचे होते.) अशा प्रकारचे विशिष्टज्ञान भूगोलाच्या बाबतीत शक्य होणार नाही, असे त्याला वाटले. कारण, भूगोलशास्त्राची एकमेव अभ्यासवस्तू पृथ्वी ही असून, ती अखिल विश्वात आपल्यापुरती तरी अद्वितीयच आहे. भूगोलाचा विशिष्टज्ञान संपादनाचा त्याने आखलेला आकृतिबंध आपल्याला पुढे विचारात घ्यावयाचाच आहे. (पहा ४ ब).

१७ व्या व १८ व्या शतकातील बहुसंख्य लेखकांनी भूगोलाच्या हेतूने भाषांतर शास्त्रीय अभिरूचीच्या परिभाषेत करण्याचा प्रयत्नच केला नव्हता. त्यापेक्षा, भूगोलाच्या व्यावहारिक उपयोगाचाच ते अधिक विचार करत, इतिहासाच्या आकलनासाठी शासनकार्यात व्यावहारिक मदत करण्यासाठी, या व अशाच अन्य हेतूंच्या सिद्धीसाठी वापरावयाचे एक साधन म्हणून भूगोलाभ्यासाच्या मूल्यांवर त्यानी वारंवार भर दिला आहे. या उपयुक्ततावादी दृष्टिकोणामुळेच भूगोलक्षेत्राची शास्त्रदृष्ट्या वाढ कशी खुंटली, हे विझोत्स्की या लेखकाने दाखवून दिले आहे. (१, ९६ ते १३०).

सुरवातीच्या, पण अयशस्वी प्रयत्नांकडे दुर्लक्ष करून, १८ व्या शतकाच्या उत्तरार्धातील, लहान पण, वाढत्या संख्येच्या लेखकांचा विचार आपल्याला करावा लागेल. या लेखकांनी भूगोलाला त्याच्या दुय्यम स्थानावरून स्वतंत्र शास्त्राच्या वरच्या पातळीवर नेण्याचा प्रयत्न केला. भूगोलाच्या या नव्या अवताराला " शुद्ध भूगोल " (Reine Geography) असे नाव दिले. (या उलट, नंतरच्या काळात यूरोपात व अमेरिकेत याच संज्ञेचा जो उपयोग केला गेला तो पहाता, प्रस्तुत संदर्भातच हे नाव अधिक समर्पक आहे, हे वाचकांच्या लक्षात येईलच.)

भूगोलाने आपला अभ्यासविषय जे हे जग त्याचा विचार त्यातील राजकीय विभागांच्या परिभाषेत न करता त्याहून अधिक वास्तव व शाश्वत अशा नैसर्गिक विभागांच्या परिभाषेतच करावा अशा मागणीच्या रुपाने या चळचळीचा प्रथमोच्चार झालेला आढळतो. म्हणून, भूगोलात जगाची विभागणी राज्यांच्या राजकीय हद्दीनुसार न करता देशांच्या नैसर्गिक सीमांनी केली जावी अशा मागणीच्या रुपाने या संकल्पनेचा प्रथमोच्चार झालेला दिसतो. या मताचा उच्चार, वास्तविक ते स्ट्रॅबोच्या मताच्या पडसादाचे द्योतक होते, भूगोलज्ञ आणि विधिज्ञ (विशेषतः ग्रोशियस्) अशा दोन्ही प्रकारच्या लेखकांनी १६ व्या शतकापासूनच करावयास सुरूवात केली होती (१, १९३ : ५,४४ ff). पण जोपर्यंत भूगोल ही इतिहास आणि शासन यांची दासी होती, तोपर्यंत या मागणीच्या दृष्टीने फारच थोडी प्रगती होऊ शकली. राजकीय हद्दीत होणाऱ्या सतत बदलांमुळे, भूगोलाच्या कार्याचे मूल्य केवळ तात्कालिक असल्याचे दिसते, असा युक्तिवाद केला जात असला, तरी, जो पर्यंत राजकीय प्रदेशांची माहिती पुरविणे हाच

भूगोल शिक्षकाचा प्रमुख उद्योग मानला जात होता, तोपर्यंत हा युक्तिवाद असंबद्ध होता. त्याकाळात, मध्ययूरोपचा, म्हणजेच इटली-जर्मनीचा, नकाशा म्हणजे शेकडो राज्यांच्या वेड्यावाकड्या ठिगळांची गोधडी होती. अशा काळात, वरील मागणीत अंतर्भूत असलेले अवघड कार्य साधण्याच्या दृष्टीने स्वाभाविक प्रदेशांचा विचार करावयास भूगोल-शिक्षकाला क्वचितच फुरसत मिळत असे.

दुसऱ्या बाजूने, शास्त्रीय भूगोलाचा विकास करण्याच्या प्रयत्नांत असलेल्यांना एक गोष्ट स्पष्ट होऊ लागली की राजकीय विभागांच्या सहाय्याने जगाच्या निरनिराळ्या भागांच्या ज्ञानाचे संघटन करण्याची रूढपद्धती मुळीच समाधानकारक नाही. या काळातील, किंवा त्या काळांतील यूरोपचा राजकीय नकाशा असो, की संयुक्त संस्थानांचा तो अद्ययावत् राजकीय नकाशा असो, प्रादेशिक भूगोलाचा विकास करण्याच्या प्रयत्नांचा गंभीरपणे विचार करणाऱ्या कोणाही अभ्यासकाने ही राजकीय विभागांची परिभाषा निदान "सर्वसाधारणपणे समाधानकारक" असल्याचेही कधी मान्य केले नाही, असे म्हटले असता अतिशयोक्ती होणार नाही.

राजकीय विभागाहून वेगळ्या विभागांचा विचार करण्याच्या प्रयत्नांतून एक नवीनच अडचण उद्‌भवली. ती म्हणजे, भू-क्षेत्राच्या विभागणीची तितकीच निर्णायक पद्धती शोधणे. ही अडचण तेव्हाही होती आणि आताही आहेच. अठराव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास अनेक भूगोलाभ्यासकांनी पुढे मांडलेल्या एका उपपत्तीने या दीर्घकाल जाणवणाऱ्या प्रश्नाला उत्तर दिले असे वाटले ; तेच पर्वतक्रमबंधांच्या अखंड जाळ्याचे तत्त्व होय (पहा : 1, विझोत्सकीचे 'Der Zusammenhang der Gebirge' हे प्रकरण). हे तत्त्व जर्मनीत तत्काल उचलून धरले गेले, आणि गाटेररने त्या आधारेच जगाचे भूखंडे व प्रदेश असे दोन प्राकृतिक विभाग (Gebiete) केले. यापूर्वी जर्मनी, हॉलंड आणि इटली या देशात झालेले अशा प्रकारचे या पूर्वीपासूनचे प्रयत्न दुर्लक्षित राहिले होते, तरी गाटेररच्या या कार्याचा त्याच्या समकालीन व उत्तरकालीन अभ्यासकांवर, विशेषेकरून हंबोल्टवर, पडलेला प्रभाव लक्षणीय होता (द्वारा रिक्टॉफेन ३.६७१). म्हणून भूगोलाची सातत्याने सुधारणा होण्याचे कार्य त्याच्या १७७३-७५ च्या दरम्यान प्रकाशित झालेल्या या ग्रंथापासून सुरू झाले, अशी नोंद करावयास हरकत नाही (1, 201 ff).

या कालखंडात तत्त्वज्ञ इमान्युअल-कांट याने कोनिग्ज बर्ग विद्यापीठात दिलेल्या "प्राकृतिक भूगोलावरील" क्रमिक व्याख्यानमालेमुळे शास्त्रीय भूगोलाच्या विकासाला थोड्या निराळ्या प्रकारची प्रेरणा मिळाली. या व्याख्यानमालेची १७५६ ते १७९६ या काळात सुमारे अठ्ठेचाळीस सत्रे झाली. (१४, cf). अर्थात गेर्लांटने म्हटल्याप्रमाणे त्याच्या तत्त्वज्ञानासाठी आवश्यक असलेला भौतिक ज्ञानाकडे पहाण्याचा एक दृष्टिकोण येवढेच कांटच्या दृष्टीने भूगोलाचे महत्त्व होते (१२). या विषयाचे संघटन आणि त्याची वाढ अगदीच तुटपूंजी असल्याचे पाहून, त्याने विविध आणि विस्तृत संदर्भग्रंथांतून मिळविलेल्या सामग्रीचे संकलन आणि संपादन करण्याकडे पुष्कळच लक्ष पुरविले. तसेच, अनेक कूटप्रश्नांवरही त्याने सखोल विचार केला—उदाहरणार्थ पृथ्वीच्या परिवलनामुळे होणारा वाऱ्यांचा दिशाबदल (३९, १३).

भूगोलक्षेत्रातील कांटच्या कार्याच्या ऐतिहासिक महत्त्वाचे मूल्यमापन करणे अवघड आहे. चाळीस वर्षांच्या त्या कालखंडातील लोकप्रिय झालेल्या अनेक व्याख्यानमालां- पैकी प्राकृतिक भूगोलावरील व्याख्यानमाला अभ्यासकांनी फार मोठ्या संख्येने ऐकली. इ. स. १८०० मध्ये त्या व्याख्यानमालेचे प्रकाशन होण्यापूर्वीच त्याच्या बहुतांशी पूर्ण असलेल्या प्रती वाचनासाठी फिरत होत्या. शिवाय हर्डरसारख्या आधीच्या अभ्यासकांनीही त्याच्या विचारांचा बराच प्रचार केला. या प्रतींच्या प्रकाशनापूर्वी अप्रत्यक्ष पद्धतीने असो, की १८०१ ते १८०५ या काळात त्याचे प्रत्यक्ष प्रकाशन झाल्यावर असो, हंबोल्ट व रिटर या दोघांवरही या व्याख्यानांचा महत्त्वपूर्ण प्रभाव पडलेला होता, हे आपणास पुढे कळून येणारच आहे.

कांटच्या या अभ्यासक्रमाचा बराच मोठा भाग फारेनियस् याने एका शतकापूर्वीच घालून दिलेल्या सामान्य भूगोलाच्या रूपरेषेच्या अनुकरणातून आलेला होता. बऱ्याच उशीरा लुलॉफने फारेनियसचे प्रथम अनुकरण केले (१७७५ मधील जर्मन भाषांतराद्वारे). लुलॉफकडून घेतलेल्या विपुल सामग्री व्यतिरिक्त, कांटने बर्गमानच्या ग्रंथाचाही उपयोग केला (हा ग्रंथ १७६६ साली स्वीडिश भाषेत व १७६९ मध्ये जर्मन भाषेत प्रकाशित झाला.) तसेच, त्याने ब्याश, बुफान, आणि विशेषेकरून ब्युशिंग, यांच्या लेखनांचा उपयोग केला. (४०, टिपणे ५५१ ff, १४, २८५ ff). पण, कांटने केलेले वेगवगेळ्या देशांचे त्रोटक विवेचन ब्याश किंवा बुफान् यांपैकी कोणाच्याच प्रेरणेने केलेले दिसत नाहीत ; कारण, तसे करताना त्याने ब्यूशिंगची राजकीय विभागणीची रूढ पद्धती बदलून टाकली. एक गोष्ट निश्चित की त्याच्या या अभ्यासक्रमाची रूपरेषा आणि त्याची सामग्री गाटेररचा ग्रंथ प्रकाशित होण्यापूर्वीच सुप्रतिष्ठित झालेली होती (३९, II, १ ते १२ ; १४, २७, ३१ f ; १५).[१]

---

[१. जवळ जवळ १०० वर्षेपर्यंत, प्राकृतिक भूगोलावरील कांटच्या या व्याख्यानांच्या प्रकाशित झालेल्या अनेक आवृत्त्यांच्या अधिकृतपणा विषयी अनिश्चितता होती. पण, कांटप्रणीत तत्त्वज्ञानाचा एक पुरस्कर्ता आडिकस याने परिश्रमपूर्वक केलेल्या असाधारण अनुसंधानाने वस्तुस्थिती निर्णायकरीतीने प्रस्थापित केली, असे दिसते, त्याचा सारांश असा. (१४ ; १५ ; द्वारा गेडानचे मत ४०, ५०९ ff). प्रकाशनासाठी म्हणून आपल्या व्याख्यानांची लिखित प्रत स्वतः कांटने कधीच केली नाही, हे खरे असले, तरी त्याच्याजवळ निदान एक हस्तलिखित पूर्ण प्रत होती. तरीही, तो आपली व्याख्याने लिहून घेण्यास सांगत असे तेव्हा या प्रतीपेक्षा वेगळा मजकूर बारंवार सांगत असे, ही गोष्ट उघड आहे. शिवाय काही विद्यार्थ्यांनी काही थोडी मूळ लिखितेही सुरक्षित ठेवलेली आहेत, कोनिग्जबर्ग येथील " एक विशेष उद्योगशाखा " म्हणून ज्याचे वर्णन आडिकसने केले अशा ठिकाणी तयार केलेल्या हस्तलिखित प्रतीही मोठ्या संख्येने उपलब्ध आहेत. या खास प्रती निरनिराळ्या वर्षातील निरनिराळ्या विद्यार्थ्यांनी तयार केलेल्या टिपणांची सरमिसळ करून विद्यार्थ्यांना विकण्यासाठी तयार केलेल्या असत. १८०१ मध्ये, म्हणजे कांटच्या मृत्यूपूर्वी तीन वर्षे, कोणा एका गोफर फोल्मर या नावाच्या गृहस्थाने अशाच मूळप्रतीवरून " कांटचा भूगोल " या नावाने लिहिलेल्या सहा खंडांच्या ग्रंथमालेतील पहिला खंड प्रसिद्ध केला. कांटच्या व्याख्यानांवरून हा ग्रंथ संपादित केलेला असूनही, या खंडात कांटने प्रतिपादलेल्या एकूण सामग्रीचा फक्त एक-पंचमांश काही बदल न करता घेतला गेला आहे असे दाखवून दिले गेल्यामुळे, आणि स्वतः कांटनेच त्या ग्रंथाच्या अधिकृतपणाचा इन्कार केलेला असल्यामुळे, ही आवृत्ती बाजूला ठेवणे आपल्यास प्राप्त आहे. दुर्दैव असे, की पिशेलने केलेली कांटच्या भूगोलावरील टीका याच फोल्मर-प्रतीवर

(तळटीप–चालू)

आधारलेली होती. कांटने एफ्. टी. रिंक याला आपल्या हाताशी असलेल्या अनेक हस्तलिखितांवरून एक " अधिकृत संपादित आवृत्ती " तयार करण्याची विनंती केली. पण, रिंकने तयार केलेली व १८०२ मध्ये प्रसिद्ध झालेली, ही आवृत्ती कांट स्वतः तपासू शकला नाही, इतका तो त्यावेळी वार्धक्याने जर्जर झालेला होता. वर वर्णन केलेल्या आवृत्त्यांसारख्या वीसाहून अधिक आवृत्त्यांची तुलना करून आडिकसने असा निर्णय घेतला, की रिंकच्या आवृत्तीचे प्रामणण्य सामान्यतः शंकातीत आहे. त्यात दोष इतकाच होता, की ती वीस वर्षांएवढ्या प्रदीर्घ कालखंडात पसरलेल्या संदर्भसामग्रीवरून तयार केलेली होती. पहिल्या खंडाचा बहुतेक सर्वभाग (§ १ ते ५२, § ११ व १४ वगळून). कांटच्या १७७५ मधील व्याख्यानांच्या पुष्कळच विश्वसनीय टिपणांवरून तयार केलेला होता. या हस्तलिखितांच्या समासात कांटने स्वतःच केलेल्या दुरुस्त्याही लिहिलेल्या होत्या. पहिल्या खंडाचा उरलेला भाग आणि संपूर्ण दुसरा खंड (Teil), कांटच्या स्वतःच्या हस्तलिखितावरूनच तयार केलेला होता. पण या हस्तलिखितांचा उशीरात उशीराचा लेखनकाल १७५९ होता. शिवाय ११ व १४ ही प्रकरणे व सर्व तळटीपा व संदर्भ रिंकने आपल्या पदरची घातलेली आहेत ; इतकेच नाही तर साहित्यिक दृष्टिकोनातून त्यात काही सुधारणाही करण्याचे स्वातंत्र्य घेतलेले होते. असे उपद्व्याप करण्याने बहुतांशी अपयशच त्याच्या पदरी पडले असले तरी, मूळ अर्थात त्याने फरक केलेला दिसत नाही.

आडिकसला तर असे वाटते, की, काय घडते आहे हे कळण्याइतका जर कांट भानावर असता तर, त्याने रिंकला दुसरा खंड प्रसिद्ध करण्याची परवानगी देण्याचेच नाकारले असते ; कारण, त्यासाठी वापरलेली सामग्री कालबाह्य झालेली होती, व त्यातील बऱ्याच बाबी कांटने तोंडी व्याख्यानांतून स्वतःच गाळलेल्या अथवा बदललेल्या होत्या. पण, पहिल्या भागात ( § १ ते ५२ ) त्याची नंतरची व्याख्याने बहुतांशी सादर केलेली आहेत. (प्रस्तुत ग्रंथासाठी निवडलेले विशेष महत्त्वाचे सर्व संबंध याच पहिल्या भागातून घेतलेले आहेत. सर्वच अवतरणात भाषेपुरती दुरुस्ती केलेली असली, तरी मूळ अर्थ बदलणार नाही अशी काळजीही घेतलेली आहे. आडिकसच्या सूचनांवरूनच एका हस्तलिखितप्रतीचा यासाठी उपयोग केलेला आहे. अडिकसच्या मते बहुधा हीच हस्तलिखित प्रत रिंकनेही वापरलेली असावी.)

१७६५–६६ च्या आपल्या अभ्यासक्रमासाठी, त्याने आखलेला कार्यक्रम जाहीर झाला तेव्हापासूनच, आपल्या रूपरेषेत बदल करण्याची कांटची योजना होती. ही गोष्ट सर्वांनाच माहीत झालेली होती. प्राकृतिक भूगोल बराचसा आखडता घेऊन, एकूण कालमर्यादेच्या जवळ जवळ दोनतृतीयांशा इतका वेळ राजनैतिक आणि नैतिक भूगोलासाठी द्यावयाची त्याची योजना होती. पण, नंतरच्या विद्यार्थ्यांच्या टिपणांच्या परीक्षणांवरून आडिकसने असा निष्कर्ष काढला, की, हे सर्व करण्यास लागणारा वेळ न मिळाल्यामुळे, मुळचीच रूपरेषा जवळ जवळ मूळच्या स्वरूपात चालू राहिली.

कांटच्या व्याख्यानांच्या या रिंकप्रणीत पाठाच्या पुढे प्रसिद्ध झालेल्या विविध आवृत्तींतून त्याने केलेल्या आणि सहज दृष्टोत्पत्तीस येणाऱ्या चुका संपादकांनी दुरुस्त केल्या आहेत. आणि तसे करताना मूळ अर्थात फरक पडणार नाही याचीही त्यांनी काळजी घेतली आहे. बहुधा एक पुष्कळशी समाधानकारक प्रत बर्लिनच्या शास्त्र–आकादमीने प्रसिद्ध केलेल्या आवृत्तीत दिसून येते (४०). पण उपलब्ध असलेल्या हस्तलिखितांवरून कांटच्या व्याख्यानांची एक अधिक प्रमाणभूत प्रत तयार केली जावी, ही आडिकसची सूचना मात्र कोणीच उचलून धरलेली दिसत नाही.

भूगोलशास्त्राच्या सांप्रतच्या प्रगतीकडे पहाता, कांटच्या कार्याचे महत्त्व त्याच्या ऐतिहासिक अभिरूची पलीकडे नाही, हे आडिकसचे अनुमान निःसंशयपणे खरे आहे. भूगोलज्ञांपैकी गेर्लाटने कांटच्या भूगोलविषयक आणि मानव वंशशास्त्रविषयक कार्याचे विशेष तपशीलवार परीक्षण केले, व १९०१ मध्ये दिलेली ही बारा व्याख्यानांची मालिका पुढे प्रकाशितही झाली (१२). कांटच्या अभ्यासाचा एक भाग–म्हणजेच, भूगोलशास्त्राचा अन्य शास्त्रांशी संबंध स्पष्ट करणारी त्याची संकल्पना–आमच्या दृष्टीने आजही मूलगामी महत्त्वाची आहे, ही गोष्ट याच ग्रंथात पुढे स्पष्ट केलेली आहे. एक गोष्ट येथे विशेषेकरून लक्षात घेतली पाहिजे, की रिंकने या भागाच्या प्रतिपादनाला आडिकसने अभ्यासिलेल्या मूळ हस्तलिखित संदर्भसामग्रीतून पुष्टीच मिळाली आहे.]

" अभिजात " कालखंडाच्या नंतरच्या विकासाच्या विविध टप्प्यांचे वर्णन येथे करत बसणे शक्य होणार नाही. पण, प्रगतीला प्रेरक ठरलेल्या निरनिराळ्या अंतर्गत कारणांचा, त्रोटक पण सूचक, उल्लेख करणे शक्य होणार आहे. खरे महत्त्व आहे ते या कालखंडात झालेल्या विविध भौतिक शास्त्रांत झालेल्या जलद प्रगतीला. विशेषतः, तर्कशुद्ध व अचूक वायुभारमापन पद्धतींच्या विकासामुळे भूपृष्ठाची लंब, उंची मोजणे शक्य झाले. त्यातही १७७२ मध्ये प्रसिद्ध झालेल्या आपल्या ग्रंथात प्रतिपादलेली ल्यूकची पद्धती लक्षणीय आहे. (मार्थे १५, २० : पिशेल ६६, I, ३२९ f). या आणि नंतरच्या कालखंडातील पुष्कळशा भूगोलज्ञांच्या मूलगामी दृष्टिकोणावर त्सूरिश येथील पेस्तालोत्ती नावाच्या थोर शिक्षणसुधारकाच्या मतांचा चांगलाच प्रभाव पडलेला होता. पेस्तालोत्सीने रूसोचा तात्त्विक दृष्टिकोण जर्मन शाळांत आणला (२५, ३० ; १, २६० ff). पर्वत व नद्या यांच्या आधारे फ्रान्सच्या अनेक विभागात केलेल्या तथाकथित " स्वाभाविक विभागणी " चा व भौगोलिक विचारात झालेल्या उपरोक्त बदलांचा निकट संबंध–मग हा संबंध कार्यरूप असो, की कारणरूप असो. याच्या थोड्या नंतरच्या, म्हणजेच नेपोलियनच्या युद्धांच्या, काळात राजकीय सरहद्दीत वारंवार, आणि मूलभूत, फरक होत गेले. त्यामुळेच राजकीय हद्दीसारख्या बदलत्या परिस्थितीवर आधारलेली भौगोलिक पाठ्यपुस्तके कशी निरूपयोगी ठरतात हे सिद्ध झाले. अशारीतीने जगाच्या प्राकृतिक वर्णनांवर आधारलेल्या भूगोलग्रंथांचा मार्ग मोकळा होण्यास या सर्व गोष्टींची मदतच झाली (१, २५७ ते २६६).

अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात, म्हणजे हंबोल्ट व रिटर यांच्या पूर्वीच्या काळात, जे थोडेच, पण क्रियाशील लेखक, भूगोलाला शास्त्र म्हणून प्रतिष्ठा मिळवून देण्याची खटपट करत होते, त्यांच्या भूगोलक्षेत्राच्या स्वरूपाच्या संकल्पनेवर आपले लक्ष या प्रकरणात केन्द्रित करावयाचे आहे. या कालखंडाला निश्चित मर्यादा घालण्याची आवश्यकता नाही. तो एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या एक-दोन दशकांतही समाक्रमण करण्याची शक्यता आहे, असे गृहीत धरण्यास हरकत नाही. इ. स. १७९९ मध्ये, हंबोल्ट वृत्तान्तर्गत अमेरिकेच्या आपल्या अतिमहत्त्वाच्या प्रवासावर गेला. त्यापूर्वी त्याने निदान एक भौगोलिक लेख प्रसिद्ध केलेला होता. तरीही, १८०४ मध्ये तो प्रवासावरून परत येईतोपर्यंत या क्षेत्रातील कोणतेही महत्त्वाचे प्रकाशन त्याने केलेले नव्हते. याच वर्षी, रिटरचे नावही भौगोलिक क्षेत्रात प्रथम चमकले. मार्थेच्या मते तर, या दोघांनाही या क्षेत्रात प्रभावी स्थान प्राप्त झाले तेव्हा १८२० साल उजाडले होते. (२५, ६०).

अठराव्या शतकाच्या उत्तरार्धातील भूगोलाला मिळालेला वारसा, सारांशाने, मानवाला परिचित असलेल्या घटनांपुरताच, म्हणजे भूपृष्ठापुरताच मर्यादित होता. थोड्याशा व्यापक अर्थाने, वातावरणात काही थोड्या उंचीपर्यंत आणि घन भूमीत जेथे जेथे मनुष्य घुसू शकला तितक्या खोलीवर हे पृष्ठ विस्तारलेले होते. मानवाशी संबंधित जग (Welt) किंवा प्रत्ययकारी भूक्षेत्र, असे प्राकृतिक भूगोलाच्या अभ्यासक्षेत्राचे वर्णन कांटने केलेले आहे. एक वस्तू या अर्थाने पृथ्वीचा अभ्यास हा गणिताचे क्षेत्र आहे. पण त्याच्या विविध विभागात जे भेद निर्माण झालेले दिसतात तेवढ्यापुरतेच पृथ्वीचे विवेचन प्राकृतिक भूगोलात येथे

(४०, I,§ २.७) या कालखंडातील बहुतेक सर्व भूगोल ग्रंथात पृथ्वी या वस्तूचा विचार फक्त एका प्रकरणात केलेला असे. कांट त्याला गणिती भूगोल (Mathematische Vorbegriffe) असे नाव देत असे. भूगोलाचा प्रत्यक्ष अभ्यास भूपृष्ठापुरता मर्यादित असे. भूकवच (Erdoberfläche)या विशिष्ट संज्ञेचा वारंवार उच्चार केला जाई. १८२० मध्ये, विल्हेल्मीने " भूपृष्ठाचा अभ्यास म्हणजे भूगोल." अशी या क्षेत्राची निश्चित मर्यादाच घालून दिली.[४]

भूपृष्ठावरील विशिष्ट प्रकारच्या घटनांचा " सामान्य " अभ्यास व विशिष्ट प्रदेशात आढळणाऱ्या विविध घटनांचे वर्णन, अशा दोनही प्रकारांचा एकाच भूगोलग्रंथात या काळात समावेश केला जात असे. भूगोलाभ्यासाच्या या दोन प्रकारांचा एकाच क्षेत्रात समावेश केल्यामुळे जितकी वादावादी झाली तितके वादंग भूगोलाच्या पद्धतीतंत्रासंबंधीच्या दुसऱ्या कोणत्याही एका कूटप्रश्नावर माजले नाही, ही गोष्ट निःसंशय आहे. या दोनही प्रकारांचा समावेश आधुनिक भूगोलात करण्यात येऊ लागला, तो हंबोल्ट व रिटर यांच्या आपापसात घडलेल्या युतीचा परिणाम नव्हे, ही गोष्ट महत्त्वाची आहे. उलट अशाप्रकारचे मतभेद प्राचीन कालखंडातील भूगोलकारांतही होते, असे मत भूगोलाच्या इतिहासासंबंधीच्या पहिल्याच संक्षिप्त विवेचनात हेटनरने मांडले आहे (२, ३०६ f : अधिक विस्तृतपणे १६१, ३३ f). एकंदरीने, या दोनही प्रकारांचा परस्पराशी सामना देण्याकडे, आणि भूगोलक्षेत्रातच राहून, परस्परांचे स्थान आळीपाळीने बळकावण्याकडे, कल असलेला दिसतो. यावरून, हेटनरने असे सुचविले आहे, की हे दोन प्रकार म्हणजे निरनिराळ्या दोन शास्त्रांचे प्रतिनिधी नसून, एकाच शास्त्रातील अभ्यासाच्या दोन दिशा आहेत, या वस्तुस्थितीचा हा पुरावा आहे. १६५० मध्ये फारेनियस याने या दोन दिशांमधील फरक स्पष्ट शब्दात मांडला (१०, १०० f. मूळचा बर्नार्ट फारेन या नावाचा जर्मन रहिवासी, त्यावेळी आम्स्टरडामचा रहिवासी झाला होता.) त्याच्या काळातील बहुतेक लेखक मुख्यतः निरनिराळ्या राज्यांची वर्णने करणे हीच भूगोलाची मर्यादा मानत असत–अर्थातच, त्या राज्यांच्या राज्यघटनांचा त्यात बऱ्याच प्रमाणात अंतर्भाव केलेला असे. याविरुद्ध, फारेनियसने एकूण भूगोलक्षेत्राचे " सामान्य अथवा जागतिक भूगोल " (General or Universal Geography) आणि " विशेष भूगोल " (Special Geography) अथवा क्षेत्रवर्णनपर भूगोल (Chorography) असे दोन भाग केले. (या संदर्भात हंबोल्टने फारेनियस संबंधी केलेली चर्चा पहा ६०, I, ६०). १६५० साली, म्हणजे वयाच्या अठ्ठाविसाव्या वर्षीच, त्याला अकाली मृत्यू

४. अन्यप्रकारे उल्लेख केलेला नाही तोपर्यंत, या कालखंडातील संबंधित ऐतिहासिक पुरावा विझोत्स्कीच्या " शुद्ध भूगोल " (Die reine Geographie) या प्रकरणावरून घेतलेला आहे, असे समजावे. येथे त्याची मांडणी कालक्रमवार केली आहे. (१, १९३-२६६). वाचकांनी प्रथम हे विशेषण शब्दार्थाने कोठेच गृहीत धरू नये. कारण, ऐतिहासिक अग्रक्रमाबद्दलचे निर्णय नेहमीच धोक्याचे असतात, आणि आपला त्याच्याशी येथे संबंधही नाही. हा कालखंड संपण्यापूर्वी कोणत्या कल्पना विकसित झालेल्या होत्या तेवढेच आपल्याला निश्चित करावयाचे आहे.

आल्यामुळे त्याला दुसऱ्या भागाचा अभ्यास करता आला नाही, त्याने आधीच प्रसिद्ध केलेल्या " जपानचा इतिहास व भूगोल " या ग्रंथावरून भूगोलक्षेत्राच्या या विभागाबद्दलचीही त्याची अभिरुची कमी दर्जाची नव्हती हे सूचित झालेले आहे.

फारेनियसने वापरलेल्या " सामान्य " आणि " विशेष " भूगोल या संज्ञा नंतरच्या काळात भूगोल क्षेत्राच्या या दोन स्वरूपांच्या समानार्थी प्रमाणित संज्ञा म्हणून सर्व युरोपभर मान्य झाल्या. तरी नंतरच्या पुष्कळशा लेखकांना त्या असमाधानकारक वाटल्या. पुढील एका विभागात सांगितल्याप्रमाणे, जर्मन लेखकांनी " सामान्य भूगोलाचे " वर्णन करण्यासाठी क्रमबद्ध (Systematic) या विशेषणाचा सातत्याने वापर केला, आणि त्याचाच आधार घेऊन या देशातही " क्रमबद्ध भूगोल " (Systematic Geography) ही संज्ञा रूढ झाली. " विशेष भूगोल " या संज्ञेची जागा बव्हंशी भूविज्ञान (Länder-kunde) या जर्मन संज्ञेने घेतली. त्यांतून उघड दिसणाऱ्या अर्थांच्या गैरसोयीकडे काणाडोळा करूनही, " विशेष भूगोल "–किंवा आता जर्मनीव्यतिरिक्त यूरोपभर सर्वमान्य झालेल्या " प्रादेशिक भूगोल " (Regional Geography) अशा अजर्मन संज्ञांना मान्यता न मिळता, भूविज्ञान (Länderkunde) ही संज्ञाच जर्मनीत अधिक लोकप्रिय झाली (प्रकरण ११ इ पहा).

फारेनियसच्या पाठोपाठ लुलोफ्स आणि बर्गमान यांनीही आपले लक्ष क्रमबद्ध भूगोलावरच केंद्रित केले. कांटने काहीसे त्यांचे आधार घेऊनच प्रादेशिक भूगोलाचे (Länderkunde) स्थान सूचित केले. तथापि, अशा प्रकारच्या प्रादेशिक अभ्यासांची त्याने केलेली सुरुवात त्यानेच केलेल्या क्रमबद्ध अभ्यासांवर ठामपणे आधारलेली नव्हती (४०, I § ३, II Abs ३) गाटेररने १७७३-७५ या काळात, क्रुगने १८०० मध्ये व विशेषेकरून बुशरने १८१२ मध्ये, भूगोलाच्या या दोन शाखांतील भेद आणखी स्पष्ट शब्दात सांगितले.

जरी या काळातील क्रमबद्ध अभ्यास भूगोलाला शास्त्र म्हणून प्रतिष्ठा मिळवून देण्याचे कामी प्रगती होण्यास मदत करणारे होते. तरी, प्लेवीच्या मते, त्यांपैकी बऱ्याच अभ्यासांचा, आणि विशेषेकरून बर्गमानच्या अभ्यासांचा कल भूगोलापासून फारकत करण्याकडे व अन्य शास्त्राचे अभ्यास बनण्याकडे होता. उलटपक्षी, शास्त्रीय दृष्टी असलेल्या थोर भौगोलिक दृष्टीच्या प्रवाशांतील पहिला जोन राइनहोल्ट फोर्स्टर याने भूगोलाला पोषक असलेल्या ' स्थूल दर्शी ' (Macroscopic) दृष्टीचा सातत्याने पाठपुरावा केला आणि अभ्यासलेल्या प्रत्येक प्रकारच्या घटनेच्या प्रादेशिक संबंधांचे स्पष्टीकरण देण्याचा प्रयत्न केला. जे. आर्. फोर्स्टर, आणि विशेषेकरून त्याचा मुलगा जोर्ज, यांचे कार्य हंबोल्टच्या मते फार महत्त्वाचे होते. आणि हंबोल्टवर त्यांचा निश्चितपणे प्रभाव पडलेला

होता, हेही आपल्याला दिसून येणारच आहे. इतरांबरोबर प्लेवीही थोरल्या फोर्स्टरला, कालक्रमानुसार, अभिजात कालखंडातील श्रेष्ठ भूगोलकारांपैकी सर्वप्रथम भूगोलकार असे मानतो (८, २२ ते २६).[५]

एक आधुनिक शास्त्र म्हणून भूगोलाचा विकास होत असताना, सुरवातीच्या कालखंडातील एक वैशिष्ट्य म्हणजे भूगोलातील द्वैतवाद होय. सामान्य भूगोल किंवा क्रमबद्ध भूगोल आणि Länderkunde किंवा प्रादेशिक भूगोल ही भूगोलाची विभागणी हे या द्वैतवादाचे प्रातिनिधिक स्वरूप होते. मात्र, भूगोलातील या द्वैतवादाचा संबंध भूगोलात समाविष्ट करावयाच्या विषयांच्या संदर्भातील १८९० मधील द्वैतवादाशी घालून घोटाळा करू नये. पण वाग्नरने अशी आगाऊ सूचना दिलेली असूनही असा संबंध अनेकदा घातला जातो येवढे खरे (८०, ३७५).

समाविष्ट विषयांच्या परिभाषेत बोलावयाचे झाले, तर १८ व्या शतकातील ग्रंथकारांनी एकूण विषयाचे तीन विभाग कल्पिले होते : " गणिती भूगोल " (Mathematical Geography), " प्राकृतिक भूगोल " (Physical Geography) व " ऐतिहासिक " (Historical) किंवा " राजकीय " अशा विविध नावांनी ओळखला जाणारा भूगोल. मात्र, या संज्ञांच्या अर्थांचा त्या ज्या अर्थांनी आज वापरल्या जात आहेत त्या अर्थांनी (अथवा कांटने वापरल्या त्या अर्थांनी) गोंधळ उडू न देण्याची खबरदारी घेतली पाहिजे. गणिती भूगोलात एक खगोल म्हणून केलेल्या पृथ्वीच्या अभ्यासाचा समावेश बहुतांशाने गणिती भूगोलात केला जात असे ; आपण मागे पाहिले त्यावरून त्याचे महत्त्वही गौण मानले जात असे ; आणि प्रत्यक्षात अभ्यासाचा हा भाग खगोल शास्त्रज्ञांवरच मुख्यत्वे सोपविलेला असे. त्स्वायन याने १८०८ मध्ये लिहिलेल्या आणि बुट्ट याने १८११ मध्ये लिहिलेल्या भूगोलाच्या रूपरेषेतून हा भाग निश्चयपूर्वक वगळलेला होता.

---

५. तसे पहाता, जोहान (१७२९ ते ९८) राइनहोल्ट आणि जोर्ज (१७५४-९४) या फोर्स्टर पितापुत्रांना एकमेकापासून विभक्त करणे अशक्यच आहे ; कारण महत्त्वाचे सर्वच प्रवास दोघांनी मिळून केले. वडिलांनी लिहिलेले पुष्कळसे ग्रंथ मुलाने जर्मनीत प्रसिद्ध केले ; आणि मुलाने आपली अभ्यासपद्धती वडिलांकडून उचललेली होती. वयाच्या चाळिसाव्या वर्षी जोर्ज फोर्स्टरचे निधन झाल्यावरही वडील जीवंत होते. मूळचे जर्मन असूनही दोघांचेही वास्तव्य काही काळ इग्लंडमध्ये होते. वडील दोन वर्षे पर्यंत इंग्लंडमध्ये निसर्गेतिहासाचे प्राध्यापक होते. कॅप्टन कुकच्या १७७२ ते ७५ च्या मोहिमेत ते दोघेही सामील झाले होते. नंतर काही वर्षांनी ते जर्मनीला परतले. कूक् बरोबरच्या प्रवासात जे. आर्. फोर्स्टर यांनी केलेली ' निरीक्षणे ' इंग्लिशभाषेत इंग्लडमध्येच प्रसिद्ध झालेली होती, तरीही त्यांच्या मुलाने केलेले जर्मन भाषांतरच कितीतरी अधिक प्रभावी ठरले (४१ : इंग्लिश लेखक डिकिन्सन व होवार्थ हे तर फक्त जर्मन आवृत्तीचाच उल्लेख करतात ; १०, १७२). बहुतेक सर्व अभ्यासकांचा असाच निष्कर्ष आहे, की थोरले फोर्स्टर हेच आघाडीवरील अधिक महत्त्वाचे प्रवासी होते. (द्वारा ए. डव्ह १६). प्लेवीचे असे मत आहे, की हंबोल्टला आपला मित्र जोर्ज फोर्स्टर याच्याबद्दलच्या व्यक्तिगत प्रेमामुळे त्याने त्याच्या मित्राच्या ग्रंथातील संदर्भ वारंवार दिलेले आहे आणि तसे करताना त्याला विशेष प्रिय नसलेल्या जोर्जच्या वडिलांकडे दुर्लक्ष केले आहे (८, २२ ते २६, या संदर्भात हंबोल्टने जे. आर. फोर्स्टर याना लिहिलेली पत्रेही लक्षात घ्यावी : १७).

प्राकृतिक भूगोलात अंतर्भूत असलेले विषय आणि ज्याला सामाजिक भूगोल या नावाने संबोधता येईल त्यातील अंतर्भूत विषय या दोहोतील विरोध हाच विरोधातील प्रमुख मुद्दा होता. सामाजिक घटनांपेक्षा भिन्न अशा भौतिक घटनांचा अभ्यास करण्याच्या शास्त्रीय पद्धतींच्या विकासात फार जलदीने वाढ होत गेल्यामुळे या दोहोतील विरोध अधिकच स्पष्ट होत गेला. या वेळीच एक एकमुखी भूगोलशास्त्र निर्माण करण्याच्या प्रयत्नात, ज्याला त्या काळात " प्राकृतिक भूगोल " म्हणत असत तेवढ्यापुरतेच भूगोलक्षेत्र मर्यादित ठेवावे अशाही एका सूचनेचा त्यात अंतर्भाव होता. मात्र, आजचा विद्यार्थी तत्कालिन लेखकांच्या विषयशीर्षकांवरून प्रतिपाद्य विषयांची कल्पना करू लागला, तर त्यांच्या ग्रंथांबद्दल तो काहीतरी चुकीच्या कल्पना करून घेण्याचा संभव आहे. या कालखंडातील सर्वच ग्रंथकारांनी–त्यांच्यातच कांट, फोर्स्टर व नंतर हंबोल्ट, यांचा समावेश होतो–प्राकृतिक भूगोल ही संज्ञा, नंतरच्या काळात ज्याला प्राकृतिक अथवा नैसर्गिक पर्यावरण असे म्हटले गेले आहे तेवढ्यापुरतीच, मर्यादित नव्हती. त्यात मानवाचे वंश, त्याचे सर्वसाधारण नैसर्गिक कार्य याचाही समावेश होत असे. अशा प्रकारे, भूपृष्ठांन्तर्गत रूपधेयांपैकी एक रूपधेय (Endboden) येवढ्याच अर्थाने मानवाचा विचार कांटने केला असे नसून पृथ्वीवर बदल घडवून आणणाऱ्या पाच प्रमुख कारकांपैकी एक कारक या अर्थानेही त्याने मानवाचा विचार केला (४०, II § १ ते ७, I § ७४). खरे म्हणजे, त्याचा हेतू आणि त्यातील समाविष्ट विषय या दृष्टींनी पहाता, कांटचा " प्राकृतिक भूगोल " हा मानव वंशकेंद्री (Anthropocentric) होता असे समजण्यास हरकत नाही ; आणि याच दृष्टिकोणाचा वारसा रिटरने कांटकडून घेतला (असे बेकरचे मत आहे. ५, ५३).

नैसर्गिक किंवा अमानव रूपधेयांचा भूगोल आणि मानवी रूपधेयांचा भूगोल हा जो भेद आम्हाला आज सुपरिचित आहे तसा भेद या कालखंडातील फारच थोड्या लेखकांनी केला. मात्र तसा भेद केल्याचे जे. एम. एफ. शूल्त्से (१७८७) व रूल्ह (१८११) यांच्या ग्रंथात सापडण्याची शक्यता आहे. कारण, या आणि या नंतरच्या कालखंडातील–म्हणजेच एकोणिसाव्या शतकाच्या मध्यापर्यंत–बहुतांश लेखक " निसर्ग " (Nature) ही संज्ञा " मानवी " याच्या विरुद्धार्थी संज्ञा म्हणून वापरत नसत, तर ज्यांचा अनुभव बाह्येंद्रियांनी घेता येतो याच्या उलट अंतःकरणाच्या भावना आणि कल्पना असे सूचित करण्यासाठी या संज्ञा वापरत. माझ्या माहितीप्रमाणे, या काळातील एकाही भूगोलकाराने पृथ्वीवरील मानवी अथवा जीवविषयक रूपधेयांना भूगोलक्षेत्रात स्थान देण्याबाबत आक्षेप घेतला नाही. पण १८१० मध्ये जेव्हा होमायरने–कदाचित आणखी काहींनीही–" शुद्ध भूगोल " (reine Geographie) याचा भूपृष्ठ-परिस्थितींपुरता मर्यादित भूगोल असा अर्थ लावला तेव्हा कल त्या दिशेने झुकू लागला. हवामान, खनिजसंपत्ती आणि प्राणिजीवन यांचा अभ्यास अनुक्रमे निसर्गज्ञान (Naturkunde), निसर्गवर्णन (Naturbeschreibung) आणि प्रादेशिक ज्ञान (Länderkunde) या विभागांवर सोपविलेला होता (१,२२१).

ज्या शास्त्रीय भूगोलाचा विकास करण्याचा प्रयत्न तत्कालिन भूगोलकार करत होते, त्यात समाविष्ट असलेले दोन भाग–म्हणजेच, प्राकृतिक व सामाजिक असे दोन विभाग–काही अंशी भिन्न आहेत, हे त्यांच्या लक्षात आलेले होते. तरीही, त्याप्रकारच्या घटना एका स्थळी आढळतात म्हणून त्यांचे साहचर्य घडले आहे असे ते मानत नसत, तर त्या घटनांतील अन्योन्य संबंधयोगामुळे त्यांच्यात कार्यकारण भावाचे नाते जडले आहे, असेच ते मानत असत, माणसांचे निरनिराळे गट आणि त्यांच्या नैसर्गिक पर्यावरणाची विशिष्ट लक्षणे या दोहोंतील अन्योन्य संबंधयोगात अभिरूची घेणे हा भूगोलाचा एक अनुरूप अभ्यासविषय आहे असे नेहमीच मानले जात आले आहे, यात संशय नाही. उदाहरणार्थ : " पर्वत प्रदेशातील मनुष्य कृतीने व सातत्याने स्वतःच्या स्वातंत्र्यावर व मातृभूमीवर धैर्याने प्रेम करत असतो, " अशी नोंद कांटने केली आहे (४०, II ६४). गाटेरर व त्याच्या अनुयायांनीही अशा प्रकारच्या संबंधांची चर्चा केलेली आहे (५, ४८ ते ५३). कांटने भूगोलाच्या सामाजिक शाखा त्यांच्या प्राकृतिक शाखांशी असलेल्या संबंधांवर नामनिर्देशपूर्वक आधारल्या. भूमीतील (Boden) भेदांमुळे, पुष्कळ बाबतीत धर्म व देव-विषयक कल्पनात बदल घडून आलेले आहेत (४०, I, १९), या बाबतीत, १७८५ मध्ये म्यूलर व १८०३ मध्ये शूल्स, आणि पुढील दशकातील अन्य लेखक यांनीही त्याचेच अनुयायित्व पत्करले. पण, हे संबंधयोग भूगोलाभ्यासाचे प्रत्यक्ष व स्वतंत्र विषय आहेत असे मानून त्यांच्या संबंधी विचार करावा असे या कालखंडातील कोणाही अभ्यासकाला सुचले नाही, असे मला दिसून आले.

या कालखंडाच्या उत्तरार्धात, भूपृष्ठावरील सजीव आणि निर्जीव अशा सर्वच घटनांचे गुंतागुंतीने गुंफलेले अन्योन्य संबंधयोग हे एकाच अखंड आणि पूर्णवस्तूच्या विविध भागांचे फलनकारी संबंध आहेत असे सामान्यपणे मानले जात असे. वस्तूंच्या वर्गानुसार त्यांची क्रमवार मांडणी केली–उदाहरणार्थ लीनायसच्या पद्धतीने–तर, कोणत्याही एका क्रमबंधाची उभारणी [६] न होता सृष्टीची काही भागांत विभागणी केली जाईल. पण प्राकृतिक भूगोलांत संपूर्ण भूमीची कल्पना क्षेत्रांच्या (Räume) परिभाषेत यावयाची आहे, असे कांटचे मत होते (द्वारा प्लेवी. ८, ३९). पण एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभी पुढे आलेल्या या संकल्पनेला त्या काळात प्रचलित असलेल्या तत्त्वज्ञानविषयक एक जीव दृष्टिकोणाचा असा काही समर्थ आधार मिळाला, की " पृथ्वी हा एकजीव आहे या सत्यस्थितीबद्दल कोणाही शास्त्रज्ञाच्या मनात शंका उरलेली नाही " असे स्पष्ट विधान बूदने १८११ मध्ये केले (१.२३०). त्याचप्रमाणे, कोणत्याही एका विशिष्ट क्षेत्राच्या मर्यादित असलेला परस्पर संबद्ध घटनांचा संयोग म्हणजे केवळ त्यांची गोळाबेरीज नसते, तर ती एक परस्पर निगडित " पूर्ण वस्तू " असते, असे मत क्राउज, तसेच बूद, यांनी १८११ मध्ये मांडले.

कोणत्याही एका विशिष्ट जागेत अथवा क्षेत्रात असणाऱ्या सर्व घटनांची एकात्मता, ज्याला आपण उभ्यापातळीतील समष्टी अगर एकात्मता असेही नाव देऊ शकू, आणि शेजारच्या अन्य एककांहून एक वेगळे एकक या अर्थाने आडव्या पातळीतील एकात्मता या दोन संकल्पनांतील

६. अर्थात्, डार्विनने जीवशास्त्रासाठी एक एकमुखी पद्धती सादर केली, त्याच्या पुष्कळच आधी कांटने हे लिहिले. पण, कांटने लिनायससंबंधी मांडलेले हे विचार चुकीचे आहेत असे गेर्लांटचे मत आहे. (१२)

भेद त्या कालखंडातील, किंवा खरेतर नंतरच्या कोणत्याही कालखंडातील, फारच थोडे लेखक स्पष्ट करून सांगतात. १८२७ मध्ये बुकर म्हणतो त्याप्रमाणे, भूगोलातील जुन्या परंपरांशी स्पर्धा करणाऱ्या नव्या परंपरेच्या प्रवर्तकांवर ही दुसरी संकल्पना लादली गेली, ही गोष्ट एका अर्थी खरी आहे (५१, ८६ f). राजकीय हद्दीनी अगदी काटेकोरपणे व्याख्यात असलेल्या राज्यांच्या निश्चित स्वरूपाच्या क्षेत्रीय एककांचे ऐवजी निसर्गातच कोणत्यातरी प्रकारे व्याख्यात असलेली, पण पहिल्या इतकीच निश्चित स्वरूपाची एकके नवभूगोलाला पाहिजे होती. अशा निश्चित स्वरूपाच्या नैसर्गिक हद्दी पर्वतराजींच्या जाळ्यांनी काटेकोरपणे विभक्त केलेली पाणलोटखोरी, आणि अर्थातच समुद्र, यांतून मिळतील असे काही काळ तरी वाटले. भूपृष्ठाच्या प्रत्यक्ष स्थितीच्या ज्ञानात भर पडत गेली, तशी या सिद्धान्ताची असमर्थता स्पष्ट होऊ लागली. या ' स्वाभाविक विभागांसाठी '' स्वाभाविक मर्यादा ' शोधण्याचा प्रश्न अधिकच अवघड झाला. ' कोरड्या हद्दींचे ' (जल विभाजन रेषांचे) समर्थक आणि ' ओल्या हद्दींचे ' (नद्यांचे) समर्थक यां दोन पक्षांतील प्रदीर्घ वादात शिरण्याची, किंवा त्यांच्यांत समन्वय साधण्याचीही, आपणास गरज नाही. वरील सर्वसाधारण सिद्धान्ताला नैसर्गिक तत्त्वज्ञानातील संकल्पनांचा मोठ्या प्रमाणात पाठिंबा असल्यासारखे दिसले ; आणि या कालखंडांच्या शेवटी तर जवळ जवळ सर्वच भूगोलज्ञांवर या संकल्पनांचा लक्षणीय प्रभाव पडलेला होता. खरे म्हणजे, त्या काळातील भूगोल ग्रंथांतून या कल्पनेकडे झुकणाऱ्या संकल्पनेचा आविष्कार राजकीय पुढाऱ्यांनी–निदान त्यांचा विशिष्ट हेतू साधण्यास त्याचा उपयोग होत असे तेव्हा तरी–उचलूनच धरला. याच आधारावर डाल्टनने क्रान्तिकारक फ्रान्सची सरहद्द ऱ्हाइनपर्यंत वाढविण्याच्या कल्पनेचे समर्थन केले. (I, २५८ f : द्वारा : नंतरच्या कालखंडातील अशाच राजकीय युक्तिवादांवर दिलेली स्योररची प्रदीर्घ तळटीप. ६८, ३६३).

१७७३ इतक्या आधी, '' भूपृष्ठाचे स्वाभाविक विभाग '' या संकल्पनेची ओळख गाटेररने परिणामकारकरीतीने करून दिली, तरी त्यातील प्रत्येक विभाग हे आपल्यापुरते एक नैसर्गिक एककच असते ही संकल्पना मात्र, १८०५ पर्यंत म्हणजे होमायरचा ग्रंथ प्रकाशित होईपर्यंत, स्पष्टपणे पुढे आली नाही. आपल्या पूर्वाचार्यांप्रमाणेच होमायरलाही, कदाचित, या एकतेतून भूरूपांच्या एकतेपेक्षा अधिक काहीच सुचवावयाचे नव्हते. एखाद्या क्षेत्रातील सर्व घटनांची एकसंघ बेरीज केली तर त्या क्षेत्राचे एक स्वतंत्र एककच तयार होते, व ते एकक त्याच्या शेजारच्या क्षेत्रांपासून भिन्न असते ही संकल्पना, म्हणजेच संयुक्त एकतेची संकल्पना, १८०८ ते १८११ यांच्या दरम्यान त्स्वॉयन् याने व १८११ मध्ये बूद्र याने, मोठ्या आवेशाने पुढे मांडली. बूद्र्च्या दृष्टीने स्वतंत्र भूप्रदेश आणि त्यातील घटकप्रांत हे ' सजीव ' होते. प्रत्येक सजीवाप्रमाणे त्याची एक जड बाजू होती–तीच अचेतन सृष्टी–आणि दुसरी मानसिक बाजू होती–तीच मानवासह सर्व सचेत सृष्टी–असेही त्याचे मत होते, '' ही एकक क्षेत्रे (Raume) त्यांच्यांतील रहिवाशांना आत्मसात करतात, आणि तितक्याच सातत्याने तेथील रहिवासी आपापल्या क्षेत्रांना आत्मसात करण्याच्या प्रयत्नात असतात (१. २३१).

पण, त्याकाळातील अन्य काही लेखकांनी या संकल्पना निःशंकपणे मान्य केल्या नाहीत. " नैसर्गिक प्रदेश " निश्चितपणे प्रस्थापित करणे अव्यवहार्य आहे, या मुद्यावर रूल्ह फोन लिलिअन्स्टर्न याने ताबडतोब म्हणजे १८११ मध्येच त्वॉयनूच्या सिद्धान्ताला विरोध केला. एका दशकानंतर विल्हेम्ही आणि झेल्टन यांनी एकक क्षेत्रांच्या मर्यादा कोणत्याही एकाप्रकारच्या घटनेवरून ठरवावयाच्या नसतात, असे आग्रहपूर्वक सांगितले. अनेकविध घटनांपैकी प्रत्येकाच्या मर्यादा काटेकोर नसून क्रमाने बदलत जाणाऱ्या असतात, आणि सर्वांचा एकत्र विचार केला असता त्या सहसंपाती नसल्याचे दिसून येते. अशा ठिकाणी निश्चित मर्यादा घालून देण्यातील अडचणही त्यांनी ओळखली होती. विल्हेल्मी म्हणतो, " तथापि केवळ अवस्थांतराचा पट्टा किंवा सीमा लक्षात न घेता, त्या विशिष्ट प्राकृतिक स्वरूपाचा पूर्णरूपाने विचार केला (म्हणजेच, कोणत्याही क्षेत्रातील सर्व कारकांचा साकल्याने विचार केला), तर निसर्गाची रूपे तत्काल स्पष्ट होतात आणि ती वेगवेगळी व्यक्त झालेली दिसतात (बुशर वरून. ५१, ८९ ; तसेच १. २४५).

या संकल्पनेच्या संदर्भात एक सर्वांगीण टीकाटिप्पणी ए. एल. बुशर याने १८२७ मध्ये केली. पंधरा वर्षापूर्वी त्याने लिहिलेल्या एका चर्चा लेखात, स्वाभाविक सीमांच्या या संकल्पनेला आणि, वरवर पहाता, प्रदेश हीच स्वाभाविक एकके होत या संकल्पनेलाही तो चिकटून होता (मात्र यातील दुसरा मुद्दा त्याने स्पष्ट केलेला नव्हता) तथापि रूल्हने केलेल्या त्वॉयनूच्या मतावरील क्रान्तिक चर्चा वाचून, त्याच्या मनावर मोठाच परिणाम झाला ; खंडाच्या विभागांच्या स्वाभाविक मर्यादा निश्चित करण्याच्या प्रयत्नात असताना त्याला स्वतःला आलेल्या अडचणींमुळे त्वॉयनूच्या सिद्धांन्ताबाबत तो अधिकच साशंक झाला ; आणि झेल्टन्, व विशेषतः विल्हेल्मीने, केलेल्या चर्चेमुळे त्यातील मूलभूत भ्रामक कल्पना उघडया झाल्या, असे त्याला वाटले (वास्तविक त्या दोघांपैकी कोणी तसा अंतिम निष्कर्ष काढलेला नव्हता).[७] या व अशा भूगोलविषयक कूटप्रश्नांच्या आस्थेमुळेच, एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या पादात प्रसिद्ध झालेल्या सुमारे चाळीस जर्मन भूगोलविषयक पाठ्य पुस्तकांचे क्रान्तिक परीक्षण करण्याचा त्याने प्रयत्न केला. या लक्षणीय अभ्यासग्रंथाचे मूल्य बर्ग-हाऊसला ताबडतोब पटले (५५, संपादकाची तळटीप, पान ५१६). भौगोलिक पद्धतीतंत्रावरील क्रान्तिक ग्रंथामधील उच्चश्रेणीच्या गुणवत्तेचा तो ग्रंथ आहे. विझोत्स्कीने लिहिलेल्या अभिजात-पूर्व कालखंडाचे पर्यवेक्षण करणाऱ्या ग्रंथाच्या उपसंहारात, या ग्रंथासंबंधीच्या चर्चेला प्रमुख स्थान दिलेले आहे, ते योग्यच आहे. बुशरने स्वाभाविक सीमा व स्वाभाविक प्रदेश या संकल्पनांवर चढविलेल्या हल्ल्यात केलेला युक्तिवाद इतका समर्पक आहे की, अगदी अद्यतन ग्रंथकारालाही या विषयात आता अधिक भर घालण्यास जागा राहिलेली

७. बुशर (५१, ३४, ३७, ४४, ८९ ff, ११६ ff). विल्हेल्मीने आपला ग्रंथ निनावीच प्रसिद्ध केला असल्यामुळे बुशरला त्याचे नाव माहीत नव्हते. त्या ग्रंथकाराचे नाव विझोत्स्कीवरून येथे घेतलेले आहे (१, २४३-४७).

नाही.[८] अलीकडच्या जर्मन अथवा अमेरिकन भूगोलज्ञांनी बुशरच्या उपरोक्त अभ्यासग्रंथाकडे सरसकट दुर्लक्ष केले नसते, तर प्रस्तुत ग्रंथाच्या पुढील प्रकरणात आलेली, प्रदेश ही स्वाभाविक व मूर्तस्वरूप एकके आहेत या विषयावरील पुष्कळशी चर्चा अनावश्यक ठरली असती.[९]

अभिजातपूर्व कालखंडातील प्रादेशिक भूगोलाच्या पद्धतीतंत्राचे क्रांतिकारी प्रवचन या दृष्टीने पहाता, बुशरचा अभ्यासग्रंथ, एका अर्थी, बंद तोंडाच्या मार्गाचे द्योतक आहे. कारण, या सत्य आणि स्वाभाविक विभागांसाठी चाललेल्या प्रदीर्घ शोधाला त्याने सुरवातीपासूनच 'व्यर्थ' म्हणून दोष दिला. तरीही, राजकीय विभागांचा वापर करण्याचा फेरविचार करण्यास तो तयार नव्हता. उलटपक्षी अशा प्रकारच्या सीमा अथवा तसे विभाग प्रस्थापित करण्याची गरज नाही, असेच त्याने सूचित केले, प्रादेशिक अभ्यासांची गरज काही विशिष्ट हेतूंच्या सिद्धीसाठी असते आणि अशा अभ्यासांसाठी अभ्यासकांच्या सोईने संबंधित क्षेत्रांना स्वैरपणे हद्दी देणे शक्य असते, (५१, ८४ ते ९३). असे त्यांचे मत होते. अर्थातच, घटनांच्या वेगवेगळ्या प्रकारांचा क्रमबद्ध अभ्यास हेच भूगोलाच्या कार्याचे सार आहे ; मात्र, त्यापैकी प्रत्येकाचा संबंध भूपृष्ठाशी असला पाहिजे. बुशरचा शेवटचा अभ्यास-लेख थेट अभिजात कालखंडात मोडत असल्यामुळे, त्या संदर्भात या निष्कर्षांचा विचार करण्याची संधी आपल्याला पुन्हा मिळणारच आहे.

अभिजात पूर्वकालातील दुसरी काही लक्षणे, संक्षेपाने का होईनात पण, नोंदविण्यासारखी आहेत. होमायरने एखाद्या क्षेत्राच्या अवलोकनाने प्रेक्षकाच्या अंतःकरणावर उमटणाऱ्या ठशावर भर दिला. कारण, त्याच्या मते, भूक्षेत्रदृश्याच्या (Landschaft) सौंदर्यबोधक पण भौगोलिक लक्षणांचा अभ्यास हा भूगोलाभ्यासाचाच भाग होता. भूगोलातील या शब्दाच्या अर्थासंबंधीचा गोंधळ निर्माण करणाऱ्या सुरूवातीच्या लेखकांपैकी तो एक होता. त्यानेच भूक्षेत्रदृश्य (Landschaft) या शब्दाची (Gegend) व (Land) या दोहोंच्या दरम्यानचे आकारमान असलेला भूप्रदेशाचा भाग, अशी निश्चित स्वरूपाची व्याख्या केली (१, २११ व २२०). हंबोल्टच्या मते, निसर्गाचे सौंदर्यबोधक वर्णन हा प्रकार विकसित करणाऱ्या

---

८. बुशरने पूर्वी केलेल्या चर्चेच्या आधारावर क्षेत्रीय एकात्मतेची संकल्पना पुढे मांडणाऱ्यांच्या यादीत त्स्वायन् बरोबर बूशरचेही नाव बूर्गरने घातलेले आहे. बूर्गरच्या मते हे दोघे हंबोल्ट आणि रिटर यांचे अग्रदूत होते. पण, बुशरने नंतर घेतलेल्या जोरदार विरूद्धपवित्र्याचा त्याने उल्लेख केलेला नाही. वास्तविक विझोल्सकीने तसे स्पष्ट शब्दात सुचविलेले आहे आणि विझोत्स्कीचा अंशतः आधार बूर्गरने घेतलेला आहे (११, ११ f).

९. याच कालखंडात प्रसिद्ध झालेल्या अनेक पाठ्यपुस्तकांतून जगाच्या नकाशासाठी व मध्य अक्षांशांतील क्षेत्रांच्या नकाशांसाठी मर्काटोरचे प्रक्षेपण वापरलेले आढळते. इतर काही मुद्यांबरोबर या गोष्टीवरही त्याने चढविलेल्या जोरदार हल्ल्याचा समावेश बुशरच्या टीकालेखांत करण्यात आला आहे. (५१, ५३ ते ५६). तसेच, एकाच अभ्यासक्रमात इतिहास आणि भूगोल या दोन विषयांची सांगड घालण्याच्या प्रयत्नांविरूद्ध त्याने मांडलेले मुद्देही समयोचित होते, याचा येथे उल्लेख करणे आवश्यक आहेसे वाटते (५१, २३७ ते ४२).

सर्वसाधारण लेखांपैकी रोसो, बुफो, बर्नार्डित सेंट-पिरी (Paulet Verginia या ग्रंथात), शाटोब्रिआन्द, प्लेफेअर आणि गटे, आणि भूगोल-लेखकांत विशेषेकरून जॉन फोर्स्टर, हे प्रमुख होते. (४३, १३ ; ५२, २७ ; आणि ६०, II, ६५ ते ७५).

या नव्या भूगोलशास्त्राच्या विकासपद्धतीचा असा एक परिणाम झाला, की भूगोलाचे इतिहासाशी अगदी जवळचे नाते आहे, हे सहजपणे भूगोलज्ञांच्या लक्षात आले. तरीही त्या भूगोलाच्या प्रवर्तकांनी भूगोलही इतिहासाची बटीक होता कामा नये, तर ही दोनही शास्त्रे " विषय-भगिनी " म्हणून मानली जावीत, अशी आग्रही भूमिका त्यानी घेतली. या दोनही क्षेत्रांची तुलना स्पष्ट शब्दांत मांडण्याचे काम प्रथम कांटने केले. ते त्याचे कार्य नंतरच्या एका विभागात आपल्याला पहावयाचे आहेच. भौगोलिक अभ्यासात ऐतिहासिक विवेचन पद्धतीचा किती मर्यादेपर्यंत अंतर्भाव करावा याची चर्चा रूल्हने १८११ त व विशेषेकरून बुशरने १८२७ मध्ये केली (५१, २१७ ff).

नव भूगोलशास्त्राला त्याची पायाभूत तत्त्वे राजकीय रूपधेयांपेक्षा प्राकृतिक रूपधेयांमध्येच अधिक पक्केपणी सापडलेली होती. असे असूनही, मूळ राजकीय भूगोलातील काही विशिष्ट कूटप्रश्न या नव्या शास्त्रातून गळाले नाहीत—अर्थात, आज आपण राजकीय भूगोल हा शब्द ज्या अर्थाने वापरत, तोच येथेही अभिप्रेत आहे. मूळ भूगोलविषयक कल्पनेत राजकीय व ऐतिहासिक भूगोलाव्यतिरिक्त अन्य गोष्टींचा अंतर्भावच होत नव्हता. आणि याच दोन क्षेत्रांचा अभ्यास करण्यास लागणारा अधिक भक्कम पाया या नव्या मार्गाने पुरविला, असा नव भूगोलाचाही दावा होता. या कालखंडात निरनिराळ्या राज्यांच्या क्षेत्रफळात होत असलेल्या अकल्पित फरकांमुळे, भूगोलज्ञांचे लक्ष सतत या प्रश्नाकडे वेधलेले असे. यामुळेच प्राकृतिक भूगोलाच्या अभ्यासाची चौकट म्हणून विकसित झालेली " नैसर्गिक सीमांची " संकल्पना अगदी साहजीकपणे राजकीय भूगोलासाठी, आणि राजकीय व्यवहारातही राबवली जाऊ लागली (१, २५८-५९). मग, " नैसर्गिक सीमांमध्ये " भाषिक सीमांचाही अंतर्भाव होऊ लागला तसा त्या संज्ञेच्या अर्थाचा आणखी गोंधळ उडू लागला, ही त्याची एकप्रकारे उपनिष्पत्तीच होती. कारण, युरोपीय देशांपैकी एका देशाच्या शासकाने हीच संकल्पना मोठ्या जोमाने पुढे मांडली आहे—अर्थात, त्यातही असंबद्धतेचा अंश आहेच.

भूगोल या नव्या शास्त्राने पृथ्वीवरील प्राकृतिक रूपधेयांच्या अधिक शाश्वत आधारावर पाय रोवण्याचा प्रयत्न चालू ठेवला. प्रामुख्याने मानवाशी असलेला त्यांचा संबंध लक्षात घ्यावयाचा, हे त्या कालखंडाचे एक खास लक्षण होते. या संपूर्ण कालखंडातील बहूतेक सर्व ग्रंथकार, जाणतेपणी असो की अजाणतेपणी असो, कांटचे अनुकरण करत असत, व मानवाच्या दृष्टीने त्यांच्या अंतिम महत्वाच्या भाषेत या प्राकृतिक रूपधेयांचेही विवेचन करत असत. म्यूलरने १७८५ मध्ये व कायसरने १८१० मध्ये पृथ्वीचा अभ्यास " मानवाचे वसतिस्थान " (Wohnsitz) या नात्यानेच झाला पाहिजे, या गोष्टीवर विशेष भर दिला. या दृष्टीकोणाच्या विरूद्ध दिशेनेही झोका गेलेला होता. कोणत्याही स्पष्टीकरणाशिवाय केलेले शुद्ध वर्णन हाच " शुद्ध भूगोलाचा " (Reine Geography) विषय आहे, असे

प्रतिपादन करणाऱ्या होमायरने भूरूपवर्णनावरच भर दिला. अर्थातच, इतर सर्व रूपधेयांचा विचार उपयोजनात्मक भूगोलात केला जात असे (प्लेवी ८, १९).

वस्तूंच्या सापेक्षस्थानासंबंधी विवेचन भूगोलात केले जाते, अशी आणखी एक भूगोलविषयक संकल्पना याच काळात बोलून दाखविली जात असे. ती लिंडनरने १८०६ मध्ये पुढे मांडली आणि त्याच वर्षी रिटरने तिला आवेशाने विरोधही केला.

शेवटी भूगोलाच्या शास्त्राची उभारणी करण्याचे कामी जाणीवपूर्वक प्रयत्न करणाऱ्या अभ्यासकांनी सर्वच शास्त्रीय कार्याच्या दोन अंगभूत तत्त्वांच्या महत्त्वावर वारंवार भर दिला, अशी पुस्ती येथे जोडण्यास हरकत नाही. या पूर्वीच्या कालखंडांचे विशेष लक्षण म्हणजे शब्द प्रामाण्यावरील अन्धश्रद्धा आणि १८ व्या शतकातील कार्याचे विशेष लक्षण म्हणजे गृहित वस्तुस्थितींच्या क्रमबंधांची पूर्वकल्पित रचना, या दोन तत्त्वांविरूद्ध प्रत्यक्ष वस्तुस्थिती प्रथमच निश्चित करून घेण्याच्या महत्त्वावर या कालखंडाच्या शेवटी अभ्यासकांनी भर दिला. तसेच मिळालेल्या माहितीच्या उगमस्थानांचा नामनिर्देश करणे आवश्यक आहे यावरही त्यांनी आपल्या लिखाणांतून भर दिला (१, २५५).

तरीही, "शुद्ध भूगोल" या नावाचे हे नवे शास्त्र भूगोलाने मिळविलेल्या प्रत्यक्ष यशापेक्षा त्याच्या हेतूंचे व आकांक्षांचे द्योतक होते. वस्तुस्थिती प्रथम प्रस्थापित केल्या पाहिजेत असे आवर्जून सांगितले जात असूनही, काही थोडे अपवाद वगळता, या कालखंडातील भूगोलकारांनी वस्तुस्थितींची चाचणीही न घेता त्यांच्यावर आधारलेल्या पूर्वकल्पित क्रमबंधांची उभारणी करण्याचा सपाटा सुरू केला ; आणि विशेष असे, की त्यांतील अनेक संकल्पनांचा वारसा आजही चालू आहे—क्वचित त्यांची नव्याने पुनर्रचना करण्यात आली आहे इतकेच ! प्रदेश सजीव असतात असे बुटाने प्रतिपादन केल्यापासून, गेल्या सव्वा शतकात, माझ्या माहितीप्रमाणे, एकही भूगोलकाराने कोणत्याही एका प्रदेशाच्या सजीवत्वाचे स्वरूप प्रस्थापित करण्याच्या मनःपूर्वक प्रयत्न केलेला नाही. आणि तरीही अत्याधुनिक प्रकारच्या प्रचलित पाठ्यपुस्तकांतून या पूर्वकल्पित गृहित तत्त्वाचाच पुनरुद्धार केलेला असतो, हे ही आपल्या लक्षात येईल. शास्त्रीय प्रामाणिकपणाला जागून देशांची नैसर्गिक प्रदेशात विभागणी करणे शक्य नसल्याचे बुशरने घोषित केल्यापासून, गेल्या शतकभरात, त्याच्या पद्धतीतील अथवा युक्तिवादातील दोषस्थळे दाखवण्याचा, किंवा त्याला जे अशक्य कोटीतील वाटले ते शक्य कोटीत आणून दाखवण्याचा गंभीर प्रयत्न कोणीही केल्याचे आढळून येत नाही. तरीही, प्रदेश ही निश्चितस्वरूपाचे एकात्म अस्तित्व असलेली एक वस्तू असते, ही संकल्पना बहुतेक आधुनिक भूगोलकारांच्या लिखाणात प्रामुख्याने दिसून येते.

## ब—अभिजात कालखंड : हंबोल्ट व रिटर

भूगोलाच्या या नव्या शास्त्रातील बहुतांश औपपत्तिक संकल्पनांचा विकास अठराव्या शतकातील भूगोलज्ञांनी केला, तर त्यांच्या "कल्पना, मागण्या आणि आकांक्षा यांचे वस्तुस्थितीत रूपांतर" करण्याचे कार्य मुख्यतः अलेक्झांडर फोन हंबोल्ट व कार्ल रिटर या

दोघांनी केले.[१०] सर्वच देशांतील आधुनिक भूगोल केवळ दोन व्यक्तींचा इतका ऋणी असावा ही वस्तुस्थितीच असाधारण आहे. आणि या दोनही व्यक्ती एकाच देशात, एकाच काळात–सतत ३० वर्षे एकाच शहरात–राहणाऱ्या होत्या.

ही परिस्थिती योगायोगाने आलेली नव्हती. भूगोलशास्त्राचे हे दोघे " संस्थापक " पुष्कळ अंशी आपल्या पूर्वाचार्यांवर, आणि समान पूर्वाचार्यांवर, अवलंबून होते. शिवाय, रिटरने वारंवार, आणि ठामपणे सांगितले, आणि त्याच्या विद्यार्थ्यांपैकी कोणीही त्याविषयी शंका प्रदर्शित केली नाही, की आपल्याहून दहावर्षांनी वडिल असलेला हंबोल्ट हाच आपला गुरू होता. पिशेलने तर, रिटरच्या या विधानाला जोरदार पुष्टी दिली व वर असेही म्हटले, की हंबोल्टचे कार्य आधी झाले नसते, तर रिटरला आपले कार्य कधीच करता आले नसते (६६, I, ३२४ ; ४९ I, ५४) रिटरच्या या विधानात थोडीफार अतिशयोक्ती असावी असे आपल्याला वाटले, तरी हंबोल्टच्या संकल्पनांचाच प्रतिध्वनी रिटरने असंख्य ठिकाणी उमटविला ही गोष्टच त्या विधानातील गर्भित सत्य प्रत्ययास आणून देते.[११] तसेच त्याने हंबोल्टच्या लिखाणांतून दिलेले निश्चित स्वरूपाचे शेकडो संदर्भही हीच गोष्ट स्पष्ट करतात. हे संदर्भ म्हणजे केवळ एखाद्या पुस्तकी पंडिताने केलेली टिपणे नव्हती, अशी ग्वाही स्वतः हंबोल्टने त्याबाबत दिलेली आहे. स्वतःच्या " मध्य आशिया " नामक शेवटच्या ग्रंथाच्या प्रस्तावनेत आधी प्रसिद्ध झालेल्या या विषयासंबंधी तपशीलवार माहिती देणाऱ्या लेखमालांचा संदर्भ देऊन, हंबोल्ट असे म्हणतो, की " आशियातील पर्वतक्रमबंधासाठी जी परिभाषा मी सुचविली होती आणि त्यांच्यात अन्योन्य संबंध नाहीत अशा अर्थाचे जे भूशास्त्रीय विचार मी मांडले होते, त्यांचे विवेचन माझे तपोवृद्ध व ख्यातनाम मित्र एम्. कार्ल रिटर यांनी मोठ्या अधिकारवाणीने आपल्या आशिया नावाच्या महान् ग्रंथात केलेले आहे. " (५९, I, XLVIII).

हंबोल्टने स्वतःच्या लिखाणाच्या पुष्ट्यर्थ रिटरच्या लिखाणाचा वारंवार उपयोग केलेला असला, –' मध्य आशिया ' या त्याच्या ग्रंथासाठी रिटरवरुन त्याने घेतलेले संदर्भ शंभरांहून किती तरी अधिक असावेत.–तरी त्याची वयाने लहान असणाऱ्या या विद्यार्थ्याशी गाठ पडण्यापूर्वीच व रिटरने आपले पहिले लिखाण प्रसिद्ध करण्यापूर्वीच, हंबोल्टच्या

१०. हे शब्द विझोल्स्कीच्या लेखातून घेतले आहेत (१।२५७). पिशेल, रिक्टोफेन, हेटनर आणि पेंक इत्यादी बहुतेक लेखकांच्या निर्णयानुसार, भूगोलक्षेत्रातील हंबोल्टचे महत्त्व रिटरच्या बरोबरीचेच नव्हे तर त्याच्यापेक्षाही अधिक होते. विशेषतः पेंक पहा (१३७, ५८ ते ७६).

११. इतिहास व भूगोल यांच्या तुलनेसंबंधीचे रिटरचे, त्याच्या १८३१ मधील एका व्याख्यानातील, विधान उदाहरणासाठी घेता येण्यासारखे आहे (५०, १५२ f) ते हंबोल्टच्या बर्लिन येथे १८२७-२८ साली दिलेल्या व्याख्यानातील विधानाशी ताडून पहावे (५२, १४). अर्थात, ही दोन्हीही विधाने कांटच्या अभ्यासातून स्वतंत्रपणे निर्माण झाली असण्याची शक्यता आहेच. भूगोलाच्या या दोन संस्थापकांच्या कार्यांतील समान घटक तपशीलवार तपासून पहाणे हाच एखाद्या अनुसंधानात्मक प्रबंधाचा मोठा रंजक विषय होईल. ड्योरिंगने या संदर्भात केलेले संक्षिप्त विधान त्याने केलेल्या हंबोल्टच्या लिखाणाच्या सखोल अभ्यासाचा परिपाक असला, तरी त्याच्या रिटरच्या लिखाणाचा अभ्यास तुटपुंजाच होता (२२, १६० ते ६३).

भूगोलविषयक सामान्य संकल्पना दृढ झालेल्या होत्या, हे उघड आहे. हंबोल्टने भूगोल-क्षेत्रासाठी प्रशिक्षण घेतले नव्हते, आणि विज्ञानक्षेत्रासाठीही घेतले नव्हते. त्याचे प्रशिक्षण सरकारी नोकरीसाठी झाले होते ; आणि ते तंत्रशास्त्र, अर्थशास्त्र, इतिहास, भाषाशास्त्र इत्यादि विषयांच्या क्षेत्रात झालेले होते. पण निसर्गाभ्यासाची त्याला असलेली अभिरूची प्रभावी होती. खाणींचा पर्यवेक्षक म्हणून काम करत असताना, भूमिगत वनस्पतींच्या अभ्यासाशी त्याचा संबंध आला ; आणि जॉर्ज फोर्स्टरशी त्याचा निकट संबंध आल्यामुळे या अभिरूचीला भूगोलाची दिशा मिळाली. विशेषतः या दोघांनी मिळून ऱ्हाइन्लंड व इंग्लड या प्रदेशांच्या १७९० मध्ये केलेल्या प्रवासामुळे, शास्त्रीय संशोधनासाठी प्रवास करण्याची महत्त्वाकांक्षा हंबोल्टच्या मनात जागृत झाली, आणि त्याने फोर्स्टरच्या भौगोलिक अभ्यासांच्या पद्धतींची ओळख करून घेतली (४७, I, ४१ ; ६० II, ७२ ; द्वारा २०, I, ९५ ते १०८ ; ८, २३-२४). पण हंबोल्टच्या भूगोलविषयक संकल्पनेवर यापूर्वीच, अप्रत्यक्षपणे, कांटची छाया पडलेली असण्याचा दाट संभव आहे (२०, I, ४६ ते ५० ff).

सरकारी नोकरीच्या अल्पशा काळात, हंबोल्टने एक-दोन भूगोलविषयक लेखांसह अनेक शास्त्रीय लेख प्रसिद्ध केले. पण, अर्थातच, त्याचे प्रमुख ग्रंथ हे त्याच्या १७९९ ते १८०४ यांच्या दरम्यानच्या काळातील विषुववृत्तीय अमेरिकेच्या प्रवासाचे आणि १८२९ मधील त्याच्या मध्य आशियातील प्रवासांचे फलित होते. त्याचे भौगोलिक कार्य हे त्याने स्वतः पाहिलेल्या प्रदेशांपुरते आणि त्याने स्वतः केलेल्या निरीक्षणांपुरतेच मर्यादित होते असे समजणे चुकीचे ठरेल. त्याच्या साठवर्षांहून मोठ्या कृतिशील भौगोलिक कार्याच्या प्रदीर्घ कालखंडात प्रत्यक्ष भूशोधनासाठी त्याने पुरी पाच वर्षेही खर्च केली नाहीत. (अर्थात, प्रशियाच्या राजाचा एक अत्यंत क्रियाशील खाजगी कारभारी या नात्याने त्याच्या उत्तरायुष्यातील बराचसा काळ राजकीय प्रश्न हाताळण्यातच जात असे हे खरे आहे.) " कॉसमॉसच्या " लिखाणापूर्वी, हंबोल्टच्या पुष्कळशा अभ्यासलेखांचे विषय सर्व क्षेत्रात विखुरलेले होते. अर्थातच, ते असंख्य अन्य संशोधकांच्या व शास्त्रज्ञांच्या लिखाणांच्या उपयोगावरच अवलंबून लिहिलेले असत, खरे म्हणजे, हंबोल्ट हा रिटर इतकाच ग्रंथ भांडार व ग्रंथाभ्यास यांवर अवलंबून राहणारा भूगोलज्ञ होता.

भूगोलज्ञ या नात्याने रिटरच्या सर्वच जीवनकार्यावर हंबोल्टचा प्रभाव पडलेला. तरीही, १८०७ मध्ये या दोघांचा वैयक्तिक सम्पर्क कित्येक आठवडेपर्यंत आला, त्यावेळी आलेला क्रान्तिकारी प्रत्ययच या तरूण विद्यार्थ्याचे लक्ष भूगोलाकडे वेधून घेण्यास कारणीभूत झाला, हे पिशेलचे विधान अतिशयोक्तिपूर्ण वाटते. पिशेल नंतरच्या ग्रंथकारांनी जरी त्याचा वारंवार उच्चार केलेला असला, आणि पिशेलचे ते विधान सर्वमान्य झालेले असले, तरी " रिटर इतिहासाकडून भूगोलाकडे वळला " हे पिशेलचे सर्वसाधारण अनुमान रिटरच्या जीवनातील वस्तुस्थितीवरून सिद्ध होत नाही, असे रात्सेलने दाखवून दिले आहे (२६, ४२३, ३८९ ff). बहुधा, रिटरइतके बुद्धिपुरस्सर भूगोलाचे शिक्षण त्याच्या समकालीन दुसऱ्या कोणत्याही विद्यार्थ्याने, आणि काही-थोडे वगळता

नंतरच्या अभ्यासकांनीही, घेतलेले नसावे.[११] लहानपणापासून ते तहत विद्यापीठात प्रवेश मिळेतोपर्यंत तो श्नेफेन्थाल येथील एका शाळेत राहात असे. या शाळेत रूसो व पेस्तालॉत्सी यांच्या मतप्रणालीप्रमाणे सर्व शिक्षणक्रम पार पाडला जात असे. फेरफटका करत असताना व दूर सहलीवर जाताना त्याने निसर्गाचे प्रत्यक्ष निरीक्षण करून जगाचे ज्ञान संपादन केले. या संपूर्ण कालावधीत हा तरूण विद्यार्थी श्री. जे सी. एफ्. गुट्‌मुट्‌स यांच्या खास वैयक्तिक देखरेखीखाली होता. या शिक्षकाला विशेषेकरून निसर्गाभ्यासाची व भूगोलाची आवड होती. आणि त्याने स्वतः भूगोलाच्या विकासाला थोडाफार हातभारही लावला होता (रात्सेल २६, ३८३, ३८८ ff ; प्लेवी ८. ३९). या काळात कार्ल रिटरच्या खास आवडीचा अभ्यासविषय भूगोल हाच होता. नंतर विद्यापीठातील कालावधीत, त्याचे लक्ष मुख्यतः निसर्गशास्त्रे व त्यांबरोबर इतिहास व देवदैवते या विषयांनी वेधून घेतले. विद्यापीठातून बाहेर पडल्यावरही त्याच्या या विषयांच्या अभ्यासात खंड पडला नाही. कारण, एका कुटुंबातील खाजगी शिक्षक या नात्याने त्याच्या पुढील वीस वर्षांच्या जीवनक्रमात त्याला भौतिकशास्त्रे, इतिहास व भूगोल या विषयांचा अभ्यास करणे प्राप्त होते, आणि तशी संधीही त्याला मिळत गेली. याच काळात त्याने ऱ्हाइनलंड, स्वित्सर्लंड इत्यादि प्रदेशांत क्षेत्र निरीक्षणासाठी पुष्कळ प्रवास केले, आणि त्या त्या वेळी मोठ्या काळजीपूर्वक व तपशीलवार निरीक्षणेही केली. तसेच त्या काळातील अनेक प्रतिष्ठित विद्वानांच्या निकट सहवासाचीही संधी मिळाली. या विद्वानांत शरीर रचना शास्त्रज्ञ झोमरिंग, भूशास्त्रज्ञ एबल व शिक्षण सुधारकांतील धुरीण पेस्तालॉत्सी हे त्याच्या दृष्टीने विशेष महत्त्वाचे होते.

थोडक्यात, रिटरच्या अनुसंधानकार्याची पूर्व-तयारी अति-विस्तृत क्षेत्रात पसरलेली होती, असा निष्कर्ष काढावयास हरकत नाही ; कारण, एका बाजूने भौतिकशास्त्रे व विशेषकरून निसर्गाभ्यासाच्या निरीक्षणात्मक पद्धती यांचा प्रभाव त्यांवर दिसत होता ; तर दुसऱ्या बाजूने, कांटचा एक अनुयायी हर्डर याच्या लिखाणाच्या वाचनामुळे, मानवी समस्यासंबंधीची, म्हणजेच इतिहास व भूगोल या विषयांची, त्याची आवड सतत वाढत होती. या दोन गोष्टींमुळे त्याच्या पूर्वायुष्यातील अभ्यासक्षेत्राचा त्याच्या अंतिम लक्ष्याशी दुवा सांधला गेला. (c/o श्मिट् ७, ७८ f आणि ४१. ४). इ. स. १८०७ मध्ये झालेल्या हंबोल्टच्या भेटीमुळे त्याची भूगोलविषयक अभिरूची अधिक चेतवली गेली, यात संशय नाही ; कारण,

११. अन्यथा सूचित केले नसलेले रिटरच्या चरित्रासंबंधीचे तपशील रिटरच्याच दैनंदिनीच्या आधारे लिहिलेल्या क्रामरच्या अधिकृत ग्रंथातून घेतलेले आहेत (२४). रात्सेलने " रिटरचे जीवन व कार्य " या आपल्या क्रान्तिक पुस्तिकेत हे सर्व तपशील सारांश रूपाने दिलेले आहेत (२६). येथे ही हकीकत तुलनेने आधिक तपशीलवार दिली आहे ती सर्व इंग्रजी पुस्तकांतून सामान्यपणे आढळणारे गैरसमज दूर व्हावेत या श्रद्धेतून. डिकिन्सन व होवार्थ (१०, १५० ते १६१) यांना रिटरचे महत्त्व मान्य होते. पण, त्याच्या चरित्रातील महत्त्वाच्या विविध तपशीलाबाबत त्यांना चुकीचे मार्गदर्शन झालेले असावे (पहा : क्रामर २४ II ३५). आणि त्याला कारण बहुधा गागे या अमेरिकन लेखकाने लिहिलेले रिटरचे चरित्र असावे.

हंबोल्टनेच भौतिक परिस्थितीचा मनुष्यजीवनाशी असलेला संबंध स्पष्ट शब्दात साकार केलेला होता. हे खरे असले तरीही, भूगोलविषयक कार्य चालू ठेवावयाचे का इतिहासाकडे वळावयाचे याचा निर्णय पुढील निदान दहा वर्षेपर्यंत तरी रिटर देऊ शकला नव्हता.

प्राथमिक विद्यार्थ्यांसाठी लिहिलेली अभ्यासमालिका वगळली तरी, त्याची पहिली प्रकाशने यूरोपच्या भूगोलाचे विवेचन करणारी होती. १८०४ ते १८०७ या दरम्यान प्रसिद्ध झालेल्या या ग्रंथांचा जर्मनीत लक्षणीय प्रभाव पडलेला होता. यापैकी एकाचे, म्हणजे यूरोपच्या क्रमबद्ध भूगोलाचा संक्षिप्त अभ्यास या पुस्तकाचे तर फ्रान्समध्येही मोठ्या उत्साहाने परीक्षण करण्यात आले. स्वतंत्र घटनाप्रकारांचा विचार करणारा हा अभ्यास स्पष्टीकरणात्मक टीका जोडलेल्या सहा नकाशांवर आधारलेला होता. थोड्या वर्षांनी, हंबोल्टनेही अशाप्रकारचेच नकाशे प्रसिद्ध केले, पण रिटरच्या या नकाशांत " पहिला प्राकृतिक नकाशासंग्रह " ग्रथित झाला (८, ३० : पहा : क्रामर २४, I, २५५). हे सर्व भौगोलिक अभ्यास-ग्रंथ जरी त्या सुप्रसिद्ध भेटीपूर्वी प्रसिद्ध झाले असले, तरीही हंबोल्टच्या लेखनाने रिटर आधीच प्रभावित झालेला होता, असे मानण्यास सबळ पुरावा आहे ; कारण, याच काळात रिटरने एके ठिकाणी असे लिहिले आहे की, आपण " हंबोल्टचे सर्व प्रकाशित लिखाण बकासुरी आधाशीपणाने गिळंकृत केलेले होते " (२४, I, १६७).

पुढील काही वर्षांच्या काळात, रिटरने एक अगदी सर्वांगपरिपूर्ण असा जगाचा क्रमबद्ध भूगोल " प्राकृतिक भूगोलाची हस्तपुस्तिका " या नावाने लिहून काढला. याच ग्रंथाने आपल्या भौगालिक कार्याला पूर्णविराम द्यावयाचा व त्या ग्रंथाचा उपयोग इतिहासविषयक अभ्यासांतील दुवे सांधण्यासाठी करावयाचा, असा त्याचा हेतू होता ; कारण, आपल्या उर्वरित आयुष्याचा विनियोग इतिहासाभ्यासाठी करावयाचा त्याचा मानस होता. पण, कोणत्या तरी कारणाने रिटरने हा ग्रंथ प्रसिद्ध न करण्याचा निर्णय घेतला. या पुस्तकाचे हस्तलिखित रिटरच्या विनंतीवरून भूशास्त्रज्ञ फोन बुख् याने वाचले आणि त्यावर प्रखर टीका केली, हेही कदाचित्, त्याचे कारण असू शकेल. तरीही त्याने आपले हस्तलिखित मुक्तहस्ताने आपल्या सहकाऱ्यांना वाचावयास दिले, व त्याच्या अनेक सहकाऱ्यांनी त्यातील काही भागांचा उपयोगही करून घेतला. परिणामी, त्याचे हे लिखाण त्या काळातील अनेक पाठ्यपुस्तकांतून अवतरले. काही ग्रंथात मूळ लेखकाचे नाव सूचित केलेले होते, पण काहींनी तेवढीही तसदी घेतली नव्हती. (२४, I, २०५ ते २०७, २५८ ते २६८).

याच काळात आशियासंबंधींच्या त्याच्या अभ्यासांनी रिटरला इतिहासक्षेत्राकडे नेले. त्याने प्राचीन इतिहासाचा एक प्रदीर्घ अभ्यास ग्रंथ लिहिला. (पुढे १८२० मध्ये हा ग्रंथ प्रसिद्ध झाला). रात्सेलच्या मताने " केवळ ऐतिहासिक स्वरूपाचे रिटरचे हे एकमेव लेखन होते "(२६, ४१०). वर वर पहाता तरी, आपल्या कार्याचा सांधा बदलून इतिहास कार्याला संपूर्णपणे वाहून घेण्याचा त्याचा विचार चालूच होता. आपल्या भौगालिक कार्याची सांगता करण्याच्या हेतूने, संपूर्ण जगाची विभागणी स्वाभाविक प्रदेशांत करता येईल, अशी एक योजना त्याने आखली. मुळात, या भूगोलाचे (Erdkunde) चार खंड व्हावयाचे होते. पुढे,

त्याला याच ग्रंथांचा इतिहासविषयक अभ्यासांसाठी भक्कम पाया म्हणून उपयोग करावयाचा होता. गॉटिंजेन विद्यापीठात काम करत असतानाच येथेच त्याने एकाच वेळी इतिहासविषयक आणि धातुशास्त्रविषयक प्रगत अभ्यासक्रम पूर्ण केले–पूर्वनियोजित कार्यक्रमानुसार आफ्रिका खंडासंबंधीचा पहिला ग्रंथखंड पूर्ण केला. पण, आशिया खंडासंबंधी मिळविलेल्या सामग्रीचा प्रचंड ढीग एकाच ग्रंथखंडात न सामावण्याची शक्यता त्याच्या लवकरच लक्षात आली. अर्थातच, वरील ग्रंथाचा दुसरा खंड हा आशियाच्या अभ्यासाचा केवळ एक भाग म्हणून त्याने प्रसिद्ध केला. १८१७ व १८१८ मधील या दोन खंडाच्या प्रकाशनाने त्याची विद्वानांच्या जगात फार मोठी छाप पडली. मार्थे म्हणतो की, रिटरला तात्काल व " निर्विवादपणे भूगोल क्षेत्रातील सुधारक व त्या क्षेत्राला शास्त्राची प्रतिष्ठा प्राप्त करून देणारा पहिला आचार्य " या नात्याने मान्यता मिळाली. (२५, ६ : तसेच क्रामर पहा : २४, I, ३७७ f, ४०४ f ; रात्सेल २६, ६८९ f ; स्पिट ७, ८६).

विद्यापीठातील कोणतीही एक अधिकाराची जागा त्याला मिळण्यापूर्वीच, तात्त्विक भूगोलाचा आचार्य ही पदवी रिटरला निश्चितपणे प्राप्त झालेली होती. त्याने फ्रँकफुर्ट येथील माध्यमिक विद्यालयात एक वर्षपर्यंत इतिहास व भूगोल या विषयांच्या अध्यापकाचे काम केले. त्यानंतर बर्लिनमधील अनेक अधिकाऱ्यांच्या प्रयत्नांना यश आले. असे प्रयत्न करणाऱ्यात अलेक्झांडर हंबोल्टचा भाऊ विल्हेल्म हंबोल्ट हा ही एक होता. लष्करी महाविद्यालय आणि विद्यापीठ अशी दोनही ठिकाणांच्या प्राध्यापकाची जागा एकाच वेळी रिटरला देण्यात आली. १८२० मध्ये, विद्यापीठाचा पहिला भूगोल विषयाचा प्राध्यापक म्हणून रिटर बर्लिन येथे दाखल झाला. आपले भूगोलक्षेत्रातील कार्य " पूर्ण करून ", नंतर इतिहासक्षेत्राला वाहून घेण्याची आपली योजना केवळ असाध्य आहे ही गोष्ट त्याला नेमकी केव्हा कळून चुकली, हे स्पष्ट होत नाही. तरी, एकोणचाळीस वर्षांच्या आपल्या उर्वरित आयुष्यात तो बर्लिनमध्ये सतत भूगोलक्षेत्रातच कार्य करत राहिला. तरीही Erekunde (भूविज्ञान) या ग्रंथाच्या नंतरच्या खंडात त्याची इतिहास विषयाची आवड अधिकाधिक स्पष्ट होऊ लागली, हे येथे नमूद करण्यास हरकत नाही. [११]

---

१३. २४ II, ८५ दुय्यम दर्जाचे काही एतद्विषयक संदर्भग्रंथ हंबोल्ट व रिटर यांचे संबंध अगदी वेगळ्या स्वरूपात रंगवितात. इतकेच काय, मूलता त्यांचे हे संबंध व्यक्तिगत स्वरूपाचे नव्हतेच, असेही काहींनी सुचविले आहे. पण क्रामरच्या विधानाचे खंडन केलेले मला कोठेच आढळले नाही. शक्यता अशी आहे की, तृतीय व्यक्तींना लिहिलेल्या खाजगी पत्रांतील या दोन प्राचार्यांनी परस्परांसंबंधी त्यांनी केलेले उल्लेख काही जणांनी उद्धृतही केलेले आहेत. पण, ते क्रामरच्या विधानाला पुष्टी देणारेच आहेत (पहा २०, II, १३१ ; १९ III ४०, ६२, ८९). पण, या सर्वांवरून असेच मत होते की, त्यांचे हे संबंध, पूर्णतया नसेल तरी बव्हंशी, दोघांच्या आवडीचा एकमेव विषय जो भूगोल विषय त्याच्यापुरतेच मर्यादित होते. रात्सेलने सुचविल्याप्रमाणे, एकाने केलेली दुसऱ्याची स्तुती नेहमीच अतिशयोक्तीच्या उच्च स्वरात असे–जणू काही, दोघांनाही ऐकावयास कमी येत असे. निदान त्या काळात तरी, हे सर्व चांगल्या अर्थाने घेतले जाई. तसा त्यांच्या मूलभूत प्रामाणिकपणाबद्दल शंका घेण्याला काही आधारही मिळत नाही. उलटपक्षी, रात्सेल म्हणतो त्याप्रमाणे, या दोघांच्या स्वभावातील भिन्नता, त्यांची सामाजिक आणि धार्मिक भिन्न पार्श्वभूमी आणि व्यवसायाबाहेरील कार्यांचा वेगळेपणा, या सर्व गोष्टींमुळे दोघांचा वैयक्तिक निकट स्नेह जमावा ही गोष्ट अशक्य कोटीतीलच होती (२६, ४२३ ff).

रिटरने भूगोलक्षेत्रात घातलेल्या भरीचे मूल्यमापन करण्याची ही जागा नव्हे, आणि तशा प्रयत्नांची आवश्यकताही नाही. इतिहासक्षेत्रात वावरणाऱ्या कोणाही भूगोलज्ञांचे ग्रंथ रिटरच्या ग्रंथाइतके वारंवार, आणि बहुधा क्रान्तिकपणेही चर्चिले गेले नसतील. पुढील परिच्छेदातून उध्दृत केलेले अभ्यास लेखांतील संदर्भ हे केवळ एखाद्या " परंपरागत " श्रेष्ठ व्यक्तीला वाहिलेल्या आदरांजली नव्हेत. हंबोल्टच्या भाषणांतील उतारे वगळता, बाकीचे रिटरच्या ग्रंथांच्या क्रान्तिक परीक्षणांतूनच घेतलेले आहेत. या टीकाकारांनी रिटरची दोषस्थळे दाखविण्यास, अथवा स्वतः रिटरने जाहीर केलेल्या उद्दिष्टांच्या पूर्ततेच्या दृष्टिने तो कोणत्या बाबतीत अपुरा पडला आहे हे दाखविण्यासही, त्यांनी कमी केलेले नाही. ज्या अभ्यासकांनी त्याच्या कार्याचे असे अंतर्बाह्य परीक्षण केले आहे तेच कार्याचे " अधिकारी " स्वरुप मान्य करण्याबाबत हंबोल्टशी एक मुखाने सहमत होत असलेले दिसतात. रिटरच्या कार्याच्या टीकात्मक अभ्यासलेखकांपैकी पेशेल, मार्थे, रात्सेल, होझेल, आणि विझोत्स्की यांची परीक्षणे विशेष महत्त्वाची आहेत. (६६, I, ३३६ ff; २५; २६, ४०५ ते ४२८; २७; १, २६७ ते ३२३.)

हंबोल्ट आणि रिटर यांच्या व्यक्तिगत स्वभावातील आणि, त्याचाच परिणाम म्हणून, त्यांच्या कार्यातील वास्तविक फरक लक्षात घेऊन आणि विशेषेकरून त्यांच्या भूगोल-विषयक दृष्टिकोणातील तथाकथित विरोध लक्षात घेऊन, हंबोल्टचे मत अधिक पूर्णत्वाने समजून घेणे न्याय्य होईल. बर्लिन विद्यापीठातील १८२७-२८ च्या आपल्या व्याख्यानमालेत हंबोल्टने त्याचा सर्वप्रथम उच्चार केलेला मला आढळून आला. रिटरच्या ' भूविज्ञान ' (Erdkunde) या ग्रंथाची ओळख करून देताना वास्तविक त्याच्या स्तुतिपर चार शब्द बोलण्याचा प्रसंग होता. तरीही हंबोल्टने हे प्रशस्तिपर शब्दावडंबर रचण्यात मर्यादा ठेवली नाही. " चालू शतकात निर्माण झालेला या प्रकारचा, म्हणजे तौलनिक भूगोलातील हा सर्वश्रेष्ठ असा उत्स्फुर्त ग्रंथ आहे. स्थानिक लोकांच्या जीवनावर व त्यांच्या भवितव्यावर भूदृश्याचा प्रभाव कसा पडतो याचे ज्यात प्रतिपादन केलेले आहे असा हा पहिलाच ग्रंथ आहे " असा गौरवपूर्ण उल्लेख केला. १८३२ साली त्याने रिटरला लिहिलेल्या एका खाजगी पत्रातही, रिटरच्या आशियाविषयक ग्रंथांबद्दल – वास्तविक तेव्हा पहिले दोनच खंड प्रसिद्ध झालेले होते–आपणास वाटत असलेले मोठे कौतुक स्पष्ट शब्दांत त्याने लिहून कळविले ; आणि त्यात असेही लिहिले की, या ग्रंथाचे स्तुतिपाठ राजापुढे आणि सर्वच दरबारी मंडळींच्या उपस्थितीत गातांना व " अशा प्रकारचा ग्रंथ गेल्या तीस वर्षात झाला नाही असे त्याचे कौतुक करताना मला फार आनंद झाला " (२४, II, १२०). हंबोल्टने आपले दरबारातील वजन खर्च करून रिटरवरील कामाचा बोजा, अर्थात लष्करी विद्यालयातील कामाचा भार हे येथे गृहीत आहे, कमी करविला. हेतू हा होता की, रिटरने भूविज्ञान (Erdkunde) या ग्रंथाचे लिखाण पूर्ण करावे (२४, II, ३२ f ; २०, II, १२७). हंबोल्टने रिटरबद्दलचे आपले मत पुढेही बदलले नाही, हे त्याच्या नंतरच्या

लिखाणांतून प्रसिद्ध झालेल्या अनेक विधानांवरुन स्पष्ट होते. " आपल्या काळातील, शास्त्रविषयाचे सर्वश्रेष्ठ व अतिभव्य स्मारक " हे गुत्तिआतूच रिटरच्या ग्रंथासंबंधीचे निर्णायक मत, हंबोल्टने स्वतःच्या " मध्य आशिया " या ग्रंथाच्या प्रस्तावनेतच मान्य केले आहे. (५९, I, xiviii f). १८४५ साली प्रसिद्ध झालेल्या ' कॉसमॉस ' या आपल्या ग्रंथाच्या पहिल्या खंडात तो लिहितो की, " विविध कटिबंधांमधून गोळा केलेल्या वास्तव सामग्रीचा संचय संकलक (combinierden) प्रज्ञेकडे सोपविला आणि सकृत्‌दर्शनीच त्याचे ग्रहण करता आले, तरच तौलनिक भूगोल पूर्णतिची पातळी गाठू शकतो. हीच गोष्ट कार्ल रिटरच्या महान व उत्स्फुर्त ग्रंथाने दाखवून दिलेली आहे ". फोंनियसने आखलेल्या योजनेची तो स्वतः पूर्तता करू शकला नाही ; पण, निदान त्यातील एका भागाची पूर्तता रिटरच्या ग्रंथाने केली आहे. अशा आशयाचा संदर्भ वरील खंडातच पुढे हंबोल्टने खालील शब्दांत केलेला आहे. " भूगोलाचे मानवी इतिहासावरील प्रतिक्षेप लोकांच्या स्वभावविशेषांशी व त्यांच्या सांस्कृतिक प्रगतीला मिळालेल्या वळणांशी भूरुपांचा संबंध कसा पोहोचतो याचे यथार्थ दर्शन घडविणारे अधिकारी हातानी जोपासलेले तौलानिक भूगोलाचे अति विस्तृत स्वरुप पहावयाचे भाग्य आमच्या कालखंडासाठीच नियतीने जणू राखून ठेवलेले होते. " (६०, I, ६० तळटीपेत केलेल्या रिटरच्या उल्लेखासह पहा).

भूगोलक्षेत्रात जे वेगळे वळण आणण्याचा प्रयत्न रिटर करत होता, त्याचा सुस्पष्ट उल्लेख १८०४ नंतरच्या त्याच्या अनेक लेखांतून आला आहे. वारंवार उच्चारले गेलेले त्याचे पहिले तत्त्व होते ; " भूगोल हे अनुभवजन्य शास्त्र असले पाहिजे. " ते तर्कसिद्ध तत्त्वांवरुन – म्हणजेच तत्त्वज्ञानातून–काढलेल्या अनुभवावर आधारलेले किंवा ' सामान्य भूगोलाच्या ' पूर्वकल्पित उपपत्तींवर आधारलेले शास्त्र असता कामा नये. " एकच मूलभूत नियम संपूर्ण ग्रंथाला सत्याची प्रतिष्ठा मिळवून देत असतो तो असा–एका मताकडून अथवा एका कृतक प्रमेयाकडून निरीक्षणाकडे अशी त्याची गती रहाता कामा नये, तर एका निरिक्षणातून दुसऱ्या निरीक्षणाकडे अशी त्याची प्रगती होत गेली असली पाहिजे " (४९, I, २३).*

म्हणूनच, तात्त्विक विवेचनांकडून भूरुपांच्या क्रमबंधाकडे, अशा वळणाने जाणारे सर्व प्रयत्न पूर्णपणे रोखणे ही रिटरच्या भूगोलक्षेत्रातील सुधारणांची पहिली प्रमुख पायरी होती. पर्वतांचे एक अखंड जाळे आहे हा वाद दृश्यवस्तुस्थितींच्या नोंदी विरुद्ध असून, सर्वसाधारणपणे गृहीत धरली गेलेली पर्वतांच्या शिखरभागरेषा आणि पाणलोटक्षेत्रांचे विभाजन यांची सुसंगती नाही, हे दाखवून देणाऱ्या पहिल्या लेखकांपैकी तो एक होता. कांटच्या विश्वासंबंधीचा अंतिमहेतुवादात्मक दृष्टिकोन त्याने हर्डद्वारा मिळविला असला तरी आणि त्या पार्श्वभूमीतून त्याच्या भूगोलाभ्यासांना हेतू प्राप्त झाले असले, तरी कांटप्रमाणे जागतिक ज्ञानाची उपपत्ती प्रस्थापित करण्यासाठी भूगोताभ्यासाची

* पृष्ठांक ३४ वर वर्णन केल्याप्रमाणे, पूर्व गृहीत उपपत्तींच्या आधारे केलेल्या युक्तिवादाचा विरोधात.

आवश्यकता आहे, असे मानणारा तो केवळ तत्त्वज्ञानी नव्हता (c/o आडिकस १३, ७५ f, १९० f ; गेलर्ट १२). पृथ्वीवरील मानवी आणि अमानवी घटनांच्या संबंधांचे नियम असले पाहिजेत, अशी त्याची ठाम समजूत असूनही, ते प्रस्थापित करण्याची त्याने कधी घाई केली नाही. उलट, अशी अशी धारणा होती, की विविध प्रदेशांतून निरीक्षणांत आलेल्या सर्व वस्तुस्थिती आणि संबंधयोगांचे संकलन करता आले तर त्यांच्या सहाय्याने अशा नियमांचे विधान करणे शक्य होईल. पण, अशा प्रकारचे नियम प्रस्थापित करण्याचे त्याचे - कदाचित त्याच्याबरोबर इतरांचेही - प्रयत्न निष्फळ ठरले होते. " प्रत्यक्ष पृथ्वीकडूनच असे नियम कोणते ते आपण समजून घेतले पाहिजेत ". (४९, I, ४).

अशारीतीने " आराम-खुर्चीतील भूगोल " असे ज्याचे वर्णन करणे योग्य ठरेल अशा भूगोलाचा रिटर हा पहिला विरोधक होता. उलटपक्षी, तो भूशोधक व क्षेत्रकार्यकर्ताही नव्हता. तो एक अभ्यासक व अध्यापक होता. या अर्थाने हेटनर म्हणतो त्याप्रमाणे, रिटर हा ग्रंथालयात बसून अभ्यास करणाऱ्या भूगोलकारांचा प्रतिनिधी होता (२, ३१०). त्याच्या ग्रंथातील निरीक्षणे त्याने स्वतः प्रत्यक्षपणे केलेली नसली, तरी ती ज्यांनी प्रत्यक्षपणे निरीक्षणे केली होती अशा लेखकांच्या ग्रंथातून गोळा केलेली होती. याचा अर्थ असा नव्हे की त्याने कधी प्रवास करून निरीक्षणे केलीच नाहीत. उलटपक्षी, त्याने आयुष्यभर युरोपच्या निरनिराळ्या भागांतून प्रवास केला, व तपशीलवार निरीक्षणेही केली (२४, I, २७, २७१ ते ३३१, II, ६४ ते ८३). पण दुर्दैवाने, आपल्या आशियाच्या अभ्यासातच तो इतका गुंतून पडला होता की, युरोपसंबंधीच्या ग्रंथखंडाच्या लिखाणास तो सुरुवातच करू शकला नाही. त्यामुळे स्वतःच्या प्रवासांत केलेली तपशीलवार निरीक्षणे " इतरांनी केलेल्या निरीक्षणांचे अर्थ समजून घेण्यापुरतीच " त्याला उपयोगी पडली.

रिटर इतर अभ्यासकांच्या निरीक्षणांवर आपला ग्रंथ आधारत असतानाही, त्याच्या आधीच्या लेखकांना जी सामग्री पुरेशी वाटली तेवढ्या मर्यादित सामग्रीने त्याचे समाधान झाले नाही. संदर्भित प्रश्नावर मिळण्यासारखा असेल तो सर्व काळांतील व सर्व देशांतील प्रत्यक्ष निरीक्षणांचा विश्वसनीय पुरावा जास्तीत जास्त मोठ्या संख्येने व विविधतेने गोळा करावयाचा, मग त्यांचे अभिप्राय सुसंवादी असोत वा विसंवादी असोत, ते सर्व एकत्र आणून त्यांची तुलना करावयाची व त्यातूनच अचूकपणाची सर्वोच्च पातळी गाठावयाची, अशी त्याची योजना होती (४९, I, २३). ही सामग्री शास्त्रज्ञ, प्रवासी अथवा सामान्य प्रवासी यांच्या पुरती मर्यादित नव्हती, तर ती विविध शास्त्रांचा विशेष अभ्यास करणाऱ्या पुष्कळ शास्त्रांच्या लेखनांतूनही मिळवलेली होती, हे रिटरच्या ग्रंथाच्या प्रस्तावनेवरून, अथवा त्याने ठिकठिकाणी दिलेल्या तळटीपांवरून सहज लक्षात येण्यासारखी आहे.

बर्लिन विद्यापीठाच्या १८२७-२८ च्या आपल्या हिवाळी व्याख्यानमालेत, हंबोल्टने जेव्हा संदर्भांचा उपयोग कसा करावा याची चर्चा केली, तेव्हा त्याच्या नजरेसमोर स्वतःच्या कार्यपद्धतीबरोबरच रिटरची कार्यपद्धतीही असावी, अशी केवळ शक्यताच नव्हे तर खात्री वाटते. " शतकानुशतके झालेल्या निरीक्षणांच्या तुलनेने पहाता, एका व्यक्तीने केलेली निरीक्षणे अपुरी असणे स्वाभाविकच आहे. म्हणून अन्य लोकांची निरीक्षणे एकत्र करणे महत्त्वाचे आहेच, पण त्याबरोबरच, भौतिकशास्त्राच्या कोणत्यातरी अन्य शाखेच्या अभ्यासात मन गुंतवणे तितकेच महत्त्वाचे मानले पाहिजे. कारण, याच एका मार्गाने अन्यांनी केलेली निरीक्षणे समजून घेण्यास आपल्यास मदत होईल. अशारीतीने, यासाठी लागणारा वेळ व शक्ती खर्च करणे ज्यांना शक्य आहे, त्यांनी सर्व प्रवासवर्णनांचा अभ्यास करणे, आणि त्याबरोबरच सर्व प्रबंधांचाही अभ्यास करणे, हीच सर्वश्रेष्ठ अभ्यासपद्धती ठरेल ; कारण, विशेष बाबींच्या अभ्यासांतूनच सामान्य नियमांची ओळख पटणे शक्य होते " (५२, ५६).

रिटरच्या ' आशिया ' या ग्रंथाची पाने चाळत असताना, ज्यांच्या आधाराने त्याने विषय प्रतिपादन केले त्या संदर्भांची प्रचंड संख्या आणि त्यांची विविधता यांचा कोणाच्याही मनावर प्रभाव पडल्याशिवाय रहाणार नाही. या संदर्भ ग्रंथात–ज्यांचा मान केवळ स्तुतीनेच नव्हे तर प्रत्यक्ष उपयोगानेही राखला गेला होता अशा–हंबोल्ट व बुख यांच्यासारख्या समकालीन शास्त्रज्ञांचेही ग्रंथ होते, आणि शास्त्राभ्यास न केलेल्या पूर्वकालीन प्रवाशांचीही प्रवासवृत्ते होती. इतकेच काय, ते आपल्या विज्ञानशाखेतील चांगले तज्ञ असले तरी निराळ्याप्रकारच्या घटनांच्या परस्पर संबंधांच्या अभ्यासास आवश्यक असे " ज्ञानवैदग्ध्य " त्यांच्याजवळ नसल्याची तक्रार ज्या शास्त्राभ्यासक प्रवाशांविरुद्ध हंबोल्टने केली होती, अशा प्रवाशांच्या ग्रंथाचाही रिटरने संदर्भासाठी उपयोग केला (४७, I, ४). याशिवाय, मध्ययुगातील आणि प्राचीन अभिजात कालखंडातील लेखकांच्या लेखणीतून उतरलेल्या ग्रंथांचाही त्यात समावेश होता. हंबोल्टने आपल्या लेखनासाठी वापरलेल्या त्याच प्रकारच्या संदर्भांचा, आणि पुष्कळशा बाबतीत त्या मुळ ग्रंथाचाही, या मोठ्या प्रमाणात समावेश केलेला आहे. यात अभिप्रेत असलेल्या संचयाच्या अमर्यादपणामुळे संपूर्ण जगाचा भूगोल लिहून पूर्ण करण्याचा आपल्या मूळ हेतूची पूर्तता करणे रिटरला शक्य झाले नाही. इतकेच नव्हे तर, प्रस्थापित झालेल्या मानवी व भौतिक वस्तुस्थितींचा सहसंबंध दाखविण्याच्या त्याच्या विशिष्ट हेतूंपासून त्याचे लक्ष विचलित झाले. हे जरी खरे असले तरी, कोणत्याही परिस्थितीत सत्यस्थिती प्रस्थापित करण्यासाठी लागणारा सर्व उपलब्ध पुरावा तुलनेसाठी आपण एकत्र आणला आहे, येवढेतरी त्याला अभिमानाने सांगणे शक्य झाले. या बाबतीत त्याला मिळालेल्या यशाची पावती देणाऱ्या पहिल्या अनेक विद्वानांपैकी हंबोल्ट हा एक होता व त्याला व्यक्तिशः परिचित असलेल्या विभागाचा, म्हणजे मध्य आशियाचा, त्याने अभिप्रायात विशेषत्त्वाने उल्लेख केलेला

आहे. १८३२ साली प्रसिद्ध झालेल्या आशियासंबंधी पहिल्या खंडाच्या दुसऱ्या आवृत्तीची प्रत जेव्हा रिटरने हंबोल्टकडे पाठविली, तेव्हा हंबोल्टने लिहिले : " तुमच्या आशियाविषयक प्रचंड कार्याने मी इतका भारावून गेलो आहे, की त्याचे कौतुक करण्यास मला शब्दच सापडत नाहीत. गेली दोन वर्षे मी स्वतःच मध्य आशियाच्या व तत्संबंधी मिळालेल्या संदर्भांचा उपयोग करण्यात पुरा बुडून गेलो होतो. पण तीन दिवसात अखंडपणे वाचून काढलेल्या तुमच्या ग्रंथाने कितीतरी गोष्टी स्पष्ट करून टाकल्या आहेत. गेल्या कित्येक शतकांतून निरीक्षणास आलेली प्रत्येक गोष्ट तुम्हाला माहिती असावी असे दिसते. तुमच्या विशिष्ट धोरणी बुद्धीने प्रत्येक बाब तुम्ही क्रमाने मांडू शकता ; त्यामुळे वारंवार वापरून जुन्या झालेल्या माहितीतूनही, तुम्हाला नवी व भव्य दृश्ये सतत सापडतात, आणि मग, तुम्ही त्या सर्व गोष्टींची विलोभनीय निर्मळतेने फेर मांडणी करू शकता " (१४, I, १२०).

पण, केवळ माहितीचे पर्वतप्राय ढीग जमा करणे येवढाच काही रिटरचा हेतू नव्हता. तर ही भूमितिश्रेणीने वाढणारी प्रचंड निरीक्षणे भूवंटन शास्त्राच्या (किंवा स्थल क्रमाच्या) तत्त्वानुसार मांडून दाखविणे आवश्यक होते. म्हणून क्षितिजपातळी व–उंचीचा विचार करता–लंबपातळी अशा दोनही अर्थानि त्याने त्यांचा विचार केला (४९, I, २४). पण, केवळ प्रत्येक देशासंबंधीच्या वस्तुस्थितींचा संचय करणे येवढाच याचा अर्थ नव्हता ; तर विविध रूपांमधील अन्योन्यजीवी संबंध कार्यकारणभावांच्या परिभाषेत सांगावे (२४, I, २५० f) व या बहुविध रूपांतूनच त्या क्षेत्राचे सारस्वरूप साकार करावे, अशी त्याची इच्छा होती (८. ३२). " सरलाकडून संयुक्ताकडे " जात जात, परस्पर संबंधी रूपधेयांचे साकल्याने दर्शन हेच त्या क्षेत्राच्या वेगळेपणाचे लक्षण होय, हे प्रस्थापित करण्याची त्याची इच्छा होती (४९, I, २४). त्याने केलेल्या असंख्य विधानांचा अनुवाद सुत्ररूपाने करावयाचा झाल्यास, " निसर्गविषयक निरीक्षणांना क्रमबद्ध करण्याचा त्याचा विचार होता, " असे आपल्यास म्हणावे लागेल (४९, II, xvff).

या बाबतीतील रिटरचे हेतू त्याला स्वतःला वाटत होते तितके तीव्र विरोधात नव्हते. मोठा फरक होता तो ज्याप्रमाणात त्याने या कल्पना प्रत्यक्षात उरतविल्या त्यात, अर्थात, त्याचाही हा प्रयत्न अगदी परिपूर्ण होता अशातला भाग नाही. दुसऱ्या काही बाबतीत मात्र, त्याने घेतलेला पवित्रा स्पष्टपणे विरोधी होता. राजकीय राज्ये हे एकक मानण्याऐवजी " स्वाभाविक प्रदेश " हे एकक मानताना त्याने केवळ भूगोल–(Reine Geographie, Pure geography) आंदोलनाचे अनुकरण केले हे खरे असले, तरी वरकरणी सोप्या वाटणाऱ्या पण अशक्य कोटीतील अशा केवळ पर्वतराजींच्या अथवा पाणलोट क्षेत्राच्या सहाय्याने विभाग ठरविण्याच्या पद्धतीला त्याचा विरोध होता. त्याने स्वतःच केलेल्या औपपत्तिक विधीन्वये विभाग पाडले ते भूपृष्ठाच्या उंचसखलपणा दाखविणाऱ्या परिभाषेत. (विशेषतः नदीखोऱ्याचे ' वरचा ', ' मधला ' आणि ' खालचा '

असे तीन विभाग तो पाडत असे.) ; पण सहारा इतर प्रदेशांपासून वेगळा काढताना व त्याचे हवामान, वनस्पती इत्यादींच्या संदर्भात त्यांचे पोट-विभाग पाडताना त्याने इतर कारकांनाही प्रत्यक्ष कृतीने मान्यता दिली (४९, I, ९५९ ff). हे करत असतानाही, स्वाभाविक विभाग पाडण्याची एखादी उपपत्ती आपण तयार करण्याऐवजी, तशा विभागणीसाठी निसर्गाचा अभ्यास करावा हेच योग्य, या त्याच्या मूळ सिद्धान्ताशी तो एकनिष्ठ राहिला. (४९, I, ४).

' ओली ' व ' सुकी ' मर्यादा-रेषा यांच्या सापेक्ष महत्त्वासंबंधी जेव्हा वाद माजला होता तेव्हा आपल्या समकालीनांच्या लक्षात एक गोष्ट आणून दिली, की मर्यादा आखणे हे भूगोलाचा वास्तव हेतू साध्य करण्याचे, म्हणजेच प्रदेशांच्या समाविष्ट घटकांचे आकलन करून घेण्याचे, केवळ एक साधन आहे. याच दृष्टिकोणावर भर देण्यासाठी त्याने आणखी एक शब्दसमूह वापरला. स्वतंत्रपणे जरी तो पूर्णार्थाचा नसला, तरी ज्या संदर्भात तो वापरला गेला, तो संदर्भ बहुधा पुरेसा स्पष्ट अर्थाचा असला पाहिजे. त्या संदर्भाकडे दुर्लक्ष झाले नव्हते तोपर्यंत पुढील दशकांतून त्याची वारंवार होत राहिलेली पुनरावृत्ती समर्थनीय ठरते. त्याने सूचित केलेला शब्दसमूह असा होता : भूगोल हा " पार्थिव वस्तूंनी व्यापलेल्या भूपृष्ठाच्या क्षेत्रांचा " अभ्यास आहे (der irdiseh erfüllten Räume der Erdoberfläche."). म्हणजे, केवळ भूपृष्ठाचे विभाग या अर्थाने पृथ्वीच्या क्षेत्रांचा त्यांच्यापुरताच अभ्यास करावयाचा नसतो, तसेच ते क्षेत्र व्यापणाऱ्या वस्तूंचाही त्यांच्यापुरता अभ्यास करावयाचा नसतो. अन्योन्य संबंध असतानाच पृथ्वीशीही संबंधित असलेल्या क्षेत्रव्यापी घटनांचा परिणाम म्हणून त्या त्या क्षेत्रांना प्राप्त होणाऱ्या विशिष्ट स्वरूपाच्या परिभाषेत भूपृष्ठावरील क्षेत्रांचा अभ्यास करावयाचा असतो (५७, १५२). [१४]

---

१४. " एकोणिसाव्या शतकात जर्मनीतील भूगोलक्षेत्रात गाजलेला पद्धतितंत्रविषयक वाद " या नावाखाली लायलीने अलीकडेच केलेल्या चर्चेत वरील शब्दसमुहाचे " क्षेत्रव्यापी पार्थिववस्तूंचे शास्त्र " असे चुकीचे भाषांतर केलेले आढळते (२२२, २५१). अर्थातच त्याने हा शब्दसमूह रिटरच्या नावावर दिलेला नाही, तर गेर्लांटच्या प्रबंधातील चर्चेच्या संदर्भात त्याचा उल्लेख " दीर्घकाळ प्रचलित असलेली एक वाऱ्यावरची व्याख्या " या शब्दात त्याचा उल्लेख केलेला आहे. पन्नासहून अधिक पानांच्या व उत्तम छपाईच्या या निबंधाची पाने बारकाईने तपासल्यावर–कारण त्यात पानांचा निश्चित संदर्भ दिलेला नाही–गेर्लांटने रिटरची व्याख्या जशीच्या तशी उद्धृत केलेली आढळून येते (७६, xvi). पण त्याच्या मूळ लेखकाचा उल्लेख गेर्लांटनेही केलेला आढळत नाही. कदाचित्, रिटरच्या ग्रंथातील सर्व परिचित अवतरणांपैकी ते एक असल्यामुळे, वाचक ते सहज ओळखतीलच असे त्याने गृहीत धरलेले असावे. अर्थात, यामुळे निर्माण होणाऱ्या गैरसमजाला गेर्लांट निदान अंशतातरी जबाबदार आहेच, असे म्हटल्यास वावगे होणार नाही. गेर्लांटने रिटरच्या संकल्पनेची गैररचना केली व त्याच्या आधारावर त्याने रिटरची व्याख्या ' निकालात काढली '. म्हणजेच, रिटरच्या इष्ट अर्थाचा गेर्लांटने लावलेला चुकीचा अन्वय लायलीने केलेल्या भाषांतरात तंतोतंत उमटलेला आहे.

लायलीची ही पुस्तिका व्यवस्थितपणे लिहिलेली असूनही, एकंदरीने, प्रत्यक्ष पानांच्या संदर्भांचा उल्लेख नसल्यामुळे, मूळची विधाने भाषांतरित अथवा अनुवादित करून दिलेली असल्यास ती हुडकून काढणे अवघड होऊन बसते. त्यातही अन्वयार्थ लावताना अनेक चुका झालेल्या असल्यामुळे, आपल्या या ऐतिहासिक सर्वेक्षणात योग्य त्या ठिकाणी तळटीपेच्या रूपाने तिकडे लक्ष वेधणे लेखकाला आवश्यक वाटले.*

* पुरवणी टीप ३ पहा.

या सर्वच बाबतीत रिटरचा भूगोलविषयक दृष्टिकोण आणि हंबोल्टचा दृष्टिकोण यांच्यात मूलभूत फरक नव्हता. यातील बरेचसे विचार सन १८०४ इतक्या आधी (२४, I, २५४) बोलून दाखविले होते. हे लक्षात घेता, इ. १८०७ मध्ये झालेल्या त्यांच्या वैयक्तिक संपर्काच्या काळातच, "कोणत्याही प्रदेशातील मानवी घटनांची स्थानिक परिसरातील नैसर्गिक शक्तीच्या संयोगाशी एकवाक्यता दाखविणे हेच भूगोलशास्त्राचे महानकार्य असल्याचे स्पष्ट ज्ञान झाले", हे पिशेलचे विधान कोणीही बिनविरोध मान्य करणार नाही (६६, I, ३२४, ३४१ : तसेच डोरिंग पहा २२, १६० ते १६३). मात्र, रिटरने हंबोल्टच्या या कल्पना हंबोल्टच्या लिखाणावरुन आधीच स्वीकारलेल्या असण्याची शक्यता आहे. हंबोल्टच्या लिखाणाचा परिचय त्याला जर आधीपासूनच झालेला असेल, तर अनेक आठवडेपर्यंत चाललेले त्याचे व हंबोल्टचे संभाषण त्याच्या संकल्पनांना दुजोरा देण्यास व त्या अधिक सुस्पष्ट करण्यास उपयोगी पडलेही असेल (२४, I, १६५ ते १६७). आणखी असे, की प्राकृतिक भूगोलात येवढी लक्षणीय प्रगती घडवून आणण्याचे कार्य हंबोल्टने आधीच केले नसते, तर ऐतिहासिक घटनांचा संबंध भौतिक घटनांशी जोडण्याचे कार्य रिटरला अशक्यप्राय झाले असते, असे जेव्हा पिशेल म्हणतो तेव्हा तो रिटरनेच अनेकवार केलेल्या विधानांचा केवळ पुनरूच्चार करतोसे दिसते. म्हणूनच, "कोणीही कार्ल रिटर अलेक्झांडर व्ही हंबोल्टच्या आधी होऊच शकला नसता, त्याला हंबोल्टच्या मागूनच येणे प्राप्त होते"[१५] (६६, I, ३२४).

उलटपक्षी, आधुनिक भूगोलाच्या या दोन संस्थापकांच्या मनोवृत्तींतील व जगाकडे पहाण्याच्या दृष्टिकोणांतील महदंतरांमुळे, त्यांच्या कार्यास फारच वेगळा रंग येत गेला ; आणि त्यांच्या त्यांच्या अनुयायांच्या कार्यांत तर हा फरक मौलिक स्वरूपाचा बनून राहिला. म्हणूनच, त्यांच्यानंतरच्या काळातील अभ्यासकांचा कल या दोन महापुरूषांच्या मतभेदांवर अधिक भर देण्याकडे, इतकेच काय, त्यांच्यात विरोध असल्याचा जावई-शोध लावण्याकडे, असणे अगदी स्वाभाविक होते. पण परस्परांच्या कार्याचा परस्परांना पूर्ण परिचय असूनही या भेदांची जाणीव मात्र या दोघांना कधीच झालेली नव्हती. अशाप्रकारचा विरोध कितीही मनोरंजक व नाट्यपूर्ण वाटला तरीही वरकरणी दिसणारे भेद अतिशयोक्तीने मौलिक विरोध म्हणून मांडणे ही गोष्ट ऐतिहासिक वास्तवतेच्या भूमिकेला मानवणारी नाही.*

---

१५. हंबोल्ट अमेरिकेहून परतला या गोष्टीला ४० वर्षे पूर्ण झाल्याचा स्मृतिदिन साजरा केला गेला. त्या समारंभातील व्याख्यानात रिटरने हंबोल्टला अगदी संपूर्ण प्रशस्तिपत्र दिलेले आढळते (प्रकाशित zeitscher. f. allegm. Erdk., Berlin. १८४४, ३८८ ff ; अंशतः पुनःप्रकाशित २०, I, ४६९ यात) प्रसंग सत्कार समारंभाचा असल्याने प्रशस्तीतील काहीसा अतिशयोक्तीचा सूर क्षम्य मानावयास हरकत नाही.

* पुरवणी टीप क्रमांक ४ पहा.

माझ्या वरील निष्कर्षात्मक लिखाणानंतर रात्सेलने जवळजवळ असेच विधान केल्याचे मला आढळून आले आहे. हंबोल्टचे पुष्कळशे भौगोलिक कार्य, व त्यामागचे तत्त्वज्ञानही, अनेक बाबतीत रिटरच्या कार्याशी व तत्त्वज्ञानाशी मिळते-जुळते आहे, या गोष्टीवर त्याने त्यात विशेष भर दिला आहे (२६, A.D. Biog ६९० f).

रिटरच्या सर्वप्रकारच्या टीकाकारांना न्याय द्यावयाचा झाला तर, असे म्हणावे लागेल, की त्याच्या विविधरंगानी नटलेल्या लिखाणांच्या सागरातून कोणालाही कोणत्याही प्रकारच्या निर्णयाचे वरकरणी समर्थन करता आले असते. कधी तो शास्त्रज्ञाच्या भूमिकेतून लिही, तर कधी तत्त्वज्ञाच्या! खरे म्हणजे, शास्त्र व तत्त्व यांची पूर्णपणे फारकत करणे शक्य असते हे रिटर अगर हंबोल्ट यां दोघांपैकी कोणाच्याच लक्षात आलेले नसावे. काही वेळा तर, रिटर अध्यात्म-पंडिताच्या भूमिकेतूनही लिहित असे. आणखी असे की, आपण वापरत असलेले शब्द काळजीपूर्वक निवडलेले असणे आवश्यक आहे ही गोष्ट, दुर्दैवाने, त्याच्या गावीही नव्हती. "आपल्या भाषेच्या लवचिकपणाला व संदिग्धतेला बंदिस्त करण्याचा त्याने कधी प्रयत्नच केला नाही." (प्लेवी ८, २८). आपल्या 'भूविज्ञानाचे' वर्णन "साधारणपणे तुलनात्मक" अशा शब्दात करत असताना, रिटरच्या मनात नेमके कोणते हेतू होते याबद्दल अनेक लेखकांनी वाद घातलेला आहे; आणि एकंदरीने त्यांतून असा निष्कर्ष निघालेला दिसतो की, आपण या शब्दांतून काही विशिष्ट अर्थ शोधू नये, हे बरे, म्हणजे, त्याच्या मनात काही सर्वसामान्य हेतू होते, आणि आधीच्या लेखकांच्या विचारांशी त्यांचा विरोध असल्याने ते हेतू स्पष्ट करण्याची त्याची इच्छा होती इतकाच त्यातून बोध घ्यावयाचा आहे. (पहा-हेटनर २, ३१० ; प्लेवी ८, २८ ff).

समकालीन लेखकांच्या विचारांशी असलेल्या ज्ञात संबंधांपासून आणि त्यांच्या संदर्भित पाठांपासून विभक्त केलेल्या चार ठसठशीत अवतरणांच्या आधारवर ज्यांच्या कार्याचा व कार्यपद्धतीचा अंदाज बांधता येतो अशाप्रकारच्या लेखकांपैकी रिटर हा लेखक नव्हता. तशाप्रकारे तयार केलेले रिटरचे चित्र कदाचित परिणामकारकही ठरेल. पण, त्यात त्याच्या एखाद्या व्यंगचित्राइतकाच सत्याचा अंश असेल. आपल्यालाही रिटरच्या कार्याचा व्यापक अभ्यास करत बसण्याची गरज नाही. पूर्वीच्या अनेक अभ्यासकांनी केलेल्या अशाप्रकारच्या अंतर्बाह्य परीक्षणांच्या आधारे आपण रिटरच्या कार्याचे मूल्यमापन केल्यास काम भागण्यासारखे

आहे. अर्थात, त्यांचे निष्कर्ष प्रत्येक बाबतीत मूळ ग्रंथांतील संदर्भ पाहूनच आपल्यास मान्य करावे लागतील. अशा संदर्भात त्याचे प्रत्यक्ष भौगोलिक लेखन व त्याबरोबरच त्याचे पद्धतितंत्रविषयक अभ्यास या दोहोंचाही अंतर्भाव असणे आवश्यक आहे ; कारण, त्याच्या प्रत्यक्ष भौगोलिक लेखनांत त्याच्या पद्धतितंत्राचा आविष्कार तितक्याच समर्थपणे झालेला दिसतो.

विशेषतः, हंबोल्टच्या किंवा रिटरच्या–किंवा कोणाही अन्य ग्रंथकर्त्याच्या–भौगोलिक कार्याचे स्वरूप त्यांनीच केलेल्या अंतिम हेतू संबंधीच्या विधानांच्या आधारे निश्चित करण्याचा प्रयत्न करण्याची चूक आपण टाळली पाहिजे. हिंदवी द्वीपांकडे जावयाचा जवळचा मार्ग शोधून काढण्याच्या महत्त्वाकांक्षेने कोलंबस अटलांटिक ओलांडण्यास निघाला, आणि बाह्यतः तरी आपल्याला या कार्यात यश आले आहे अशा समजुतीतच त्याचा अंत झाला. तरीही, हिंदवी द्वीपांशी संबंध जोडण्यात त्याला आलेल्या अपयशाच्या मापाने त्याच्या कार्याचे ऐतिहासिक महत्त्व आपण मोजणे योग्य नव्हे ; कारण, तेवढ्यापुरताच विचार केला तर, भौगोलिक व वांशिक परिभाषेत कायम स्वरूपाचा गोंधळ निर्माण करण्यापलीकडे कोणतीच भर पडणार नाही.

नंतरच्या कालखंडातील लेखक एका निराळ्या तत्त्वज्ञाननिष्ठ वातावरणात वावरत होते. त्यामुळे तत्कालीन लेखकांनी रिटरच्या कार्याचे अवमूल्यन करण्याचा प्रयत्न केला. त्यांनी त्याच्या तत्त्वज्ञानविषयक संकल्पनांवर, आणि विशेषतः त्याच्या भक्तिप्रधान पण अंतिमहेतुवादी दृष्टिकोणावर हल्ला चढविला. लेखकाची संकल्पना शुद्ध शास्त्रीय स्वरूपाची असून तिचा विश्वाच्या तत्त्वज्ञानाधिष्ठित संकल्पनेशी विरोध आहे. हा तत्त्वज्ञानविषयक प्राथमिक स्वरूपाचा प्रश्न आपल्याला इथे चर्चेला घेणे शक्य होणार नाही. तरीही एक गोष्ट येथे सांगणे जरूर आहे की, प्रत्येक शास्त्रज्ञाचे शास्त्रविषयक एक तत्त्वज्ञान असतेच ; पण हे तत्त्वज्ञान म्हणजे प्रत्यक्ष शास्त्र नसते किंवा शास्त्रफलही नसते. विशेषतः फ्रयोबेलने केलेल्या रिटरच्या ग्रंथावरील टीकेसंबंधाने चर्चा करत असताना, रिटरनेही दोन संकल्पनांतील हा भेद ओळखलेला होता असे दिसते. फ्रयोबेलने रिटरच्या अंतिमहेतुवादी दृष्टिकोणावर घेतलेल्या आक्षेपाला रिटरने तत्त्वज्ञानाच्या भाषेतच न्याय्य उत्तर दिलेले आहे–वास्तविक हा दृष्टिकोण, म्हणजे एक तर्कवाद नव्हता तर ते सरळ सरळ शास्त्रविषयक एक गृहीत तत्त्व होते ; आणि ते निराधार असूनही आग्रहाने मांडले जात असे

(५५, ५१७).[१६] आपल्या दृष्टीने त्याचे तत्त्वज्ञान जरी अग्राह्य असले, तरी त्याच्या विधानांचा आदर करावयास काय हरकत आहे ? उलटपक्षी, रिटर स्वतःच्या शास्त्रीय पद्धतींवर व संकल्पनांवर झालेल्या हल्ल्यांना उत्तर देताना शास्त्रीय परिभाषेच्या मर्यादितच वावरत असे.

कोणाही लेखकाच्या शास्त्रीय लेखनांवर टीका करताना, त्याच्या त्या लिखाणांतून कोणत्या विशिष्ट शास्त्रासंबंधीच्या तत्त्वज्ञानाचा आविष्कार झाला आहे हा प्रश्न विचारात घेतला जाणे योग्य नव्हे, तर या लेखकाच्या विशिष्ट तत्त्वज्ञानाचा परिणाम त्याच्या लिखाणांवर किती खोलवर झालेला दिसतो हा प्रश्न विचारात घेतला जाणे योग्य ठरेल–इतर लेखकांबरोबरच प्लेवीनेही या गोष्टीची दखल घेतलेली आहे. एखाद्याचे तत्त्वज्ञान–अंतिम हेतुवादी असूनही तो अस्सल भारदस्त अनुसंधान करू शकेल–उदा. लिबनित्सने केले तशाप्रकारचे (८. ७० f). रिटरचे गुयोत सारखे काही शिष्य तर भौगोलिक सामग्रीचे स्पष्टीकरण देण्यासाठीही अंतिम हेतुवादी कारकांचा अवलंब करत असत (६४). मात्र, रिटरने स्वतः अशा पद्धतींचा अवलंब करण्याचा अपराध कधीच केला नाही, याबाबत तरी अधिकारी टीकाकारांचे दुमत नाही. इतकेच नव्हे तर, अशा पद्धतींचा त्याने जोरदार शब्दात धिक्कारच केला (मार्थे २५, २१ f ; विझोत्सकी १, २९७ ते ३०४).

साधारणपणे, शास्त्रांच्या आधारे ज्यांचे स्पष्टीकरण देणे अशक्य झाले अशा काही गोष्टींचा अन्वयार्थ तत्वज्ञानाच्या भूमिकेवरुन लावण्याच्या प्रयत्नात असताना रिटरच्या भूगोलात अंतिम हेतूवाद डोकावताना आढळतो, असे म्हणण्यास हरकत दिसत नाही. एकोणविसाव्या शतकाच्या उत्तरार्धात अनेक शास्त्रीय टीकाकारांनी ज्यांच्याकडे भयचकित नजरेने बोटे दाखविली अशी काही विधाने, आणि स्वतःच तशा अवस्थेत

---

१६. रिटरच्या अंतिमहेतुवादी दृष्टिकोणावर हल्ला चढवून प्रयोबेलने "उघड उघड मर्माघात केला." हा लायलीचा टीकात्मक निष्कर्ष (२२२, २४५) सिद्ध करणारा पुरावा निदान प्रस्तुत लेखकाला तरी कोठे मिळाला नाही. ज्यांना याबाबत विशेष आस्था असेल त्यांना त्याचा निर्णय स्वतःच तात्काळ देता येण्यासारखा आहे. कारण लायलीने या मुद्यावरील रिटरचे उत्तर जवळ जवळ सगळेच उद्धृत केलेले आहे. फक्त रिटरने स्वतः उद्धृत केलेला प्रयोबेलचा गाई व माणसे यांचा दृष्टान्त व त्याला रिटरने दिलेले सरळ उत्तर हा भाग या चर्चेचे सार असूनही लायलीने तो गाळला आहे (२४४). या संदर्भातच, याच प्रयोबेलने, सुमारे पाव शतकानंतर, स्वतःच केलेल्या एका लांबलचक विधानाकडे लक्ष वेधणे अनाठाई होणार नाही. "निसर्ग–आणि इतिहास ...... यांचा निर्णयपद्धतींच्या भौतिकप्रकारांनुरोधाने अभ्यास करणे आवश्यक आहे ; असे मानले तरी, एकाच लेखकाने नैसर्गिक जगाचे व त्याबरोबरच सांस्कृतिक जगाचे परीक्षण नैतिक मूल्यांच्या अनुरोधाने करू नये असे अनुमान काढणे चुकीचे होईल. लेखकाचा हा अधिकार काढून घेणे, म्हणजेच त्याच्या तर्कबुद्धीवर निर्बंध घालणे, हास्यास्पद ठरेल. . . . . . अर्थात् या सर्व गोष्टी तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात नवीन नाहीत. पण, आपण तत्त्वज्ञानी नाही असे अभिमानाने सांगणारे काही तरूण भौतिकशास्त्रज्ञ आपल्यामध्ये आहेत. ते ज्या विषयांकडे मनोमन डोळे-झाक करत असतात तसे विषय अस्तित्वातच नसतात असे समजण्याची चूक ते करत असतात (६२, I, ७९ f.).

सापडलेल्या पुष्कळशा प्रथमश्रेणीच्या विद्यमान शास्त्रज्ञांचे उत्तर या दोहोंची एकमेकांशी तुलना होण्यासारखी आहे. रिटरच्या मते तीन भौगोलिक वस्तुस्थितींचे शास्त्रीय स्पष्टीकरण देणे शक्य होत नाही–आणि आजही ते शक्य झालेले नाही. त्या तीन वस्तुस्थिती अशा : (१) निदान आजच्या आमच्या ज्ञानानुसार, पृथ्वीचे विश्वातील अद्वितीयत्व, (२) मनुष्य या नावाने ओळखल्या जाणाऱ्या एका अद्वितीय प्राण्याचे निवासस्थान अशा नात्याने पृथ्वीचे स्थान, (३) आणि जगाच्या प्रमुख भूमि-एककांचे त्यांच्या लक्षणानुसार वर्गीकरण–म्हणजेच भौगोलिक वस्तुस्थितींच्या ढिगाऱ्याचे मूलभूत स्पष्टीकरण.

एक गोष्ट निश्चित आहे, की स्वतःच्याच शास्त्रीय ग्रंथांतून प्रतिपादिल्या गेलेल्या कूटप्रश्नांसंबंधींचे व तत्वज्ञानविषयक विचार स्वतंत्र प्रकाशनांद्वारे मांडावयाचे हा वर्तमान शास्त्रज्ञांचा एक नित्याचा प्रघातच होऊन बसला आहे. पण, एका शतकापूर्वीच्या बुद्धिवंतांच्या जगात अशा प्रत्यक्ष विभागणीची आवश्यकता त्यांना वाटत नसे ; आणि आजही हा भेद आपण तसा महत्वाचा मानत नाही. एक आधुनिक अभ्यासक , श्मिट, असा निष्कर्ष काढतो की, " शाश्वताच्या चिंतनाकडे वळलेल्या अंतःकरणाचे निश्वास रिटरच्या प्रतिपादनांतून जागोजागी विखुरलेले असले, आणि त्याचा अतिरिक्त उत्साह त्याच्या धर्मनिष्ठ जीवनविषयक तत्वज्ञानामुळे उद्दीपित झालेला असला, तरीही आपल्या अनुसंधानकार्यांत पूर्वकल्पित मतांचा आधार घेऊन पुढे जाण्याचा प्रयत्न तो कधीच करत नाही. सत्यस्थिती आणि त्यांतील संबंध यांचे शुद्ध वस्तुनिष्ठ आणि संयमशील आकलन यावरच त्याच्या शास्त्रीय कार्यपद्धतीचा रोख असतो. परमेश्वरी विश्वाची आखणी समजून घेण्याच्या हेतूनेच रिटर पृथ्वीचे ज्ञान संपादन करण्याची धडपड करत होता. पण त्यासाठी, भौतिक शास्त्रज्ञ ज्या उत्क्रांतितत्वाच्या मार्गाने प्रयत्न करतात, त्या मार्गाखेरीज इतर कोणत्याही मार्गाचा अवलंब त्याने केला नाही " (७, ८५).

आजचे बहुतेक टीकाकार श्मिटच्या या निष्कर्षाला जरतारी झालर जोडू इच्छितील, हे खरे आहे. तरीही, रिटरच्या अंतिमहेतुवादी विधानांनी आधुनिक शास्त्रज्ञांच्या मनात उडविलेली खळबळ, आणि रिटरच्या कार्यातील त्या विधानांचे महत्व यांची तुलना केली असता ' मिया मूठभर आणि दाढी हातभर ' असा काहीसा प्रकार झालेला दिसतो. त्याने केलेले भूखंडासंबंधीचे विवेचन याबाबतीत उदाहरणादाखल घेता येण्यासारखे आहे. त्यातही विशेषतः, १८२६ मधील एक आणि १८५७ सालचे दुसरे अशा बर्लिन येथील दोन शास्त्रपीठात दिलेल्या व्याख्यानांचा उल्लेख करता येण्यासारखा आहे (हीच व्याख्याने पुढे एकत्रीत करून प्रसिद्धही करण्यात आली (५०, १०३ ते १२८, २०६ ते २४६). त्यात एकूण ६५ पृष्ठांत वेगवेगळ्या खंडांचे आकारमान, आकार, रचना आणि हवामानविषयक परिस्थिती यांचे वर्णन लेखकाने केले आहे. या सर्व विवेचनातून खंडांच्या निरनिराळ्या भागांची संपूर्ण खंडांच्या संदर्भात कशी मांडणी झालेली असते या विषयाचा एखादा नियम " व्याख्याबद्ध " करण्याचा त्याचा प्रयत्न आहे (२२०) ; आणि विशेषतः इतिहासाच्या

कालखंडात वेगवेगळ्या भूखंडांतील लोकांचा विकास त्या त्या प्राकृतिक परिसरामुळे कसा निश्चित झाला, हेही दाखविण्याचा त्याचा प्रयत्न आहे. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धातील शास्त्रमान्य पूर्वकल्पित परिणामवादाचा पुरस्कार करणाऱ्यांची मने अस्वस्थ करणारे एखादे विधान शोधावयाचे झाले तर ते अत्यंत काळजीने व क्रान्तिक नजरेनेच पहाणे आवश्यक आहे. पहिल्या व्याख्यानाच्या सुरुवातीला, पृथ्वीची योजना "मानवजातीची तात्कालिक संगोपन शाला" म्हणूनच झालेली होती अशी श्रद्धा त्याने निश्चितच प्रकट केलेली आहे (१०४); आणि दुसऱ्या व्याख्यानाच्या शेवटी एक वाक्य असे सूचित करते, की पृथ्वीवरील प्रत्येक खंडाचे विशिष्ट स्वरूप व स्थान हा या योजनेचा एक भाग होता ; आणि या योजनेमुळेच प्रत्येक खंडाला जगाच्या इतिहासाच्या प्रवाहातील आपले विशिष्टकार्य पार पाडण्याची दिशा मिळाली–आणि हीच गोष्ट त्याने केलेल्या तपशीलवार विवेचनाने निर्देशित केलेली आहे (२४३). [१७]

---

१७. या दोनही विधानांच्या लायलीने केलेल्या भाषांतरामुळे वाचकांचा गैरसमज होण्याची शक्यता आहे. पहिल्या अवतरणातील महत्त्वाचे वाक्यांश, ते गाळले असल्याचे सूचित न करताच, वगळले गेल्यामुळे त्या वाक्याच्या मूळ अर्थात गंभीर स्वरूपाचा फरक पडला आहे. हे खाली दिलेल्या मूळच्या व्याख्यानातील संपूर्ण अवतरणाच्या परीक्षणाना सहज लक्षात येण्यासारखे आहे (अवतरणातील कंसात घातलेले शब्द गाळलेले भाग दाखवितात).

"In der Gesamterscheinungen der Natur und der Geschiehte treten die Einwirklungen dieser tellurischen Anordnung des Planeten und seiner Verhältnisse überall hervor, da er (Zum Schanplatz der Natur und ihre kräfte wie) zum Träger der Völker von anfang an eingerichtet ward, als Heimath, Wohnart und temporäre Entwiklungsanstalt für das Menschengeschlecht, (das ohne diese Bedingung nischt gedacht werden Kann)." दुसऱ्या शब्दात सांगावयाचे झाले तर, एखाद्याने "भूगोलाला निसर्गाचा, आणि त्याबरोबर मानवाचाही, अभ्यास अभिप्रेत आहे" असे म्हटले, तर "भूगोलाला मानवाचा अभ्यास अभिप्रेत आहे" असे अवतरण त्याच्या नावावर देता येणे शक्य आहे.

दुसऱ्या अवतरणातही "अनादि कालापासून" हा वाक्यांश वाक्याच्या मध्यभागातून काढून तो जेथे जोर देण्यासाठी वापरला जातो तेथे म्हणजे, वाक्याच्या सुरूवातीलाच घातला आहे. इंग्रजीप्रमाणे जर्मन भाषेतही अशी वाक्यरचना रुढ असल्यामुळे, तसा जोर देण्याचा हेतू रिटरच्या मनात नव्हता असेच आपण गृहीत धरले पाहिजे. त्यातील मूळचे शब्द रिटरच्या निबंधांच्या पुनर्मुद्रित प्रतीत सहज सापडणारे आहेत (५०, १०४ व २४३). येथे ते, लायलीने ज्याचा संदर्भ घेतला, त्या दुर्लभप्रतीतून उद्धृत केलेले, आणि मूळच्या स्वरुपात मुळीही बदल न करता घेतलेले, आढळते). लेखकाने केलेल्या अशाप्रकारच्या श्रद्धाविष्काराकडे जे कानाडोळा करु शकतात तेच हंबोल्टप्रमाणे त्या निबंधांचे त्यात ग्रंथित असलेल्या शास्त्रीय विषयांपुरतेच परीक्षण करू शकतात.

या संदर्भात हंबोल्टची टीकाही रिटरला वाटणाऱ्या मानवी भूगोलसंबंधीच्या आवडीवर प्रकाश टाकते. खंडाच्या आकाराचा त्याच्या हवामानावर व वनस्पतिजीवनावर फार खोलवर परिणाम होतो—या गोष्टीचे त्याने स्वतःच केलेल्या आग्रहपूर्वक प्रतिपादनाकडे लक्ष वेधून, पुढे युरोपच्या दंतुरकिनाऱ्याचा व द्वीपकल्पाकारांचा तिकडील सांस्कृतिक विकासाशी संबंध पोहोचतो असे दाखविण्याचा स्ट्रॅबोने कसा प्रयत्न केलेला आहे याची हंबोल्टने चर्चा केली. नंतर तो अशी पुस्ती जोडतो, की " अलिकडेच एम्. रिटर या भूगोलज्ञाने मोठ्या बुद्धिचातुर्याने युरोपच्या तीन द्वीपकल्पांचे आशियाच्या तीन द्वीपकल्पांशी असलेले प्राकृतिक व राजकीय लक्षणांतील साम्य स्पष्टकरून दाखविले आहे ; आणि याच दोन गटांत अगदी भिन्न घडणींच्या संस्कृतींची विकासकेंद्रे असल्याचे दिसून येते " (५९, I, ६७ व तळटीप).

असे असले तरी, काही बाबतीत रिटरच्या लेखनावर अणि विशेषेकरून त्याच्या अनुयायांवर, रिटरच्या तत्त्वज्ञानाचा परिणाम झालाच. त्याच्या हेतूंची गती नेहमीच वेगवेगळ्या वस्तुस्थितींकडून घटनेच्या संपूर्णरूपाकडे अशी असे. कोणत्याही घटनेच्या आंतर संबंधाचा मागोवा तिच्या अंतिम हेतूपर्यंत घेण्यापेक्षा घटनेतील शक्तींची संगती शोधणे आणि याच मार्गाने शेवटी संपूर्णरूपाचा हेतू सूचित करणे, हेच त्याच्या विवेचनाचे प्रयोजन असे (विज्ञोत्स्की १.३०४). अर्थात हा हेतू पृथ्वीवरील सर्वश्रेष्ठ प्राण्यात, म्हणजे माणसात, अगदी विशेषेकरून निश्चितपणे सापडलाच पाहिजे ; कारण माणूस हा एकच प्राणी असा आहे, की ज्याला संपूर्णाच्या संघटनेची कल्पना करता येते (ही गोष्ट गाईसारख्या प्राण्यातही सापडण्यास हरकत नाही असे समजणे तर्कदृष्ट्या चूकीचे आहे, असे उत्तर (५५, ५१८) त्याने फ्रयोबेलला दिलेले होते). म्हणूनच त्याचे पृथ्वीसंबंधीचे विवेचन तर्कसंगतीने मानवाभोवती केन्द्रित होत असे.

त्याच्या १८०४ मधील पहिल्या भौगोलिक प्रकाशनातही हा दृष्टिकोण आढळून येण्यासारखा आहे. आपल्या " भूविज्ञान " (Erdkunde) या ग्रंथाच्या प्रस्तावनेत ग्रंथ-हेतूचे विधान करत असताना, तो विशेषत्वाने पुढील शब्दांत स्पष्ट झाला आहे. " सर्वसाधारणपणे पृथ्वी-पृष्ठावरील अतिमहत्त्वाच्या भौगोलिक-प्राकृतिक परिस्थितींचे त्यांच्या (किंवा तिच्या) नैसर्गिक सुसंगती (Naturzusammenhang) असलेल्या आंतरसंबंधानुसार प्रतिपादन करणे, आणि ते (पृथ्वीपृष्ठ) त्याच्या अत्यावश्यक लक्षणांच्या आणि प्रमुख रूपरेखांच्या परिभाषेत—विशेषतः मानवाची पितृभूमी या

नात्याने, मनाने व शरीराने विकास पावत असलेल्या मानवजातीवर पडणाऱ्या अत्यंत विविध स्वरूपाच्या त्याच्या (पृथ्वी पृष्ठाच्या) प्रभावाच्या परिभाषेत सादर करणे (४९, I,V). १८

भूगोलाच्या या संकल्पनेने पृथ्वी हे मानवाचे घर आहे या गोष्टीवर मूख्यतः भर दिलेला असला तरीही, या संकल्पनेत भूगोल या दृष्टिकोणाला बांधला गेला नाही. " मानव वगळला तरी, म्हणजे त्याच्या व्यतिरिक्त आणि त्याचा अवतार भूतलावर होण्यापूर्वीपासून, पृथ्वी हा नैसर्गिक घटनांचाच रंगमंच आहे. अर्थात्, तिच्या रूपधारणेचे नियम मानवाच्या आगमनामुळे निर्माण झाले असण्याची शक्यताच नाही. म्हणून, पृथ्वीसंबंधीच्या शास्त्राचे नियम काय आहेत, हे पृथ्वीकडूनच समजावून घेतले पाहिजेत (४९, I, ४). Erdkunde च्या पहिल्या खंडात, वरकरणी तरी, मानवाचा काही संदर्भ न घेता आफ्रिकेतील प्रदेशांचे विवरण केले आहे (C/o प्लेवी-८, ७० f). पण नंतरच्या खंडात रिटरने आपले लक्ष मानवावर इतक्या मोठ्या प्रमाणात केंद्रित केले, की मानव आणि निसर्ग यांचे एकूण साहचर्य प्रस्थापित करणे या त्याच्या मूळ हेतूचा त्याला विसर पडला, असे हेटनरला आढळून आले (C/o मार्थे २५, १८ ; रात्सेल २६). तरीही, आपण ज्याला प्रादेशिक भूरूपे म्हणतो त्यांच्याच तपशीलवार अभ्यासांतून त्याने भूगोलाची प्राकृतिक मूलतत्त्वे प्रस्थापित केली, हे त्याच्या अनेक यशांपैकी प्रमुख यश आहे, असे मार्थेचे मत आहे. (२५, २४ ff).

---

१८. रिटरचे मूळचे विधानच सुस्पष्ट नसल्यामुळे इंग्रजी भाषांतर करताना काही किरकोळ फरक होण्याची शक्यता आहेच. वर दिलेले भाषांतर दोन जर्मन अभ्यासकांनी तपासून पाहिलेले आहे. लायलीच्या अवतरणातील काटछाटीमुळे (२२२, २४३), व्याकरणदृष्ट्या मूळविधानाचे भाषांतर करणेच अशक्य झाले, ही गोष्ट मूळ विधानाच्या खाली दिलेल्या आवृत्तीवरून सहज लक्षात येईल. लायलीने गाळलेले भाग कंसात घातले आहेत. आपला ' भूविज्ञान ' (Erdkunde) हा ग्रंथ लिहिण्याचा हेतू रिटर पुढील शब्दात देतो : die (allgemein) wichtigsten, geographisch-physikalischen Verhältnisse der Erd (oberfläsche in ihrem Natur zusammenhange und zwar ihren wesentlichen Zügen ünd Hauftumrissen nach) darzustellen, (inbesodere als Vaterland der Völker in dessen mannigfaltigstem Einflusse auf Körperlich und geistig sich Entwikelnde Mensch-heit. " (re, I, V). मूळचे लांबलचक आडवळणी विधान भाषांतराला थोडे अवघड झाले आहे, हे मान्य आहे ; पण, काटछाटीमुळे त्याचे व्याकरणच नष्ट झाले आहे, ही गोष्ट लक्षात येण्यासारखी आहे. यातून एक पूर्णविधान करावयाचेच झाले तर, त्यातील व्याकरणाची रूपे व विभक्तिप्रत्यय यांच्याकडे पूर्ण दुर्लक्ष करण्याशिवाय मार्गच रहाणार नाही. परिणामी, तयार झालेले हे विधान रिटरच्या विधानापेक्षा सोपे असेल, पण, ते रिटरचे नसेल! व्याकरणदृष्ट्या पहाता, या विधानाचा गाभा " die . . . . geographisch-physickalischen Verhältnisse der Erdoberfläche in ihrem Naturzusemmanhange darzustellen. " या शब्दात आहे, हे अगदी स्पष्ट आहे. व्याकरणाचे नियम गुंडाळून ठेवावयाचे म्हटले तरीही, रिटरच्या लिखाणाशी परिचित असलेला कोणीही वाचक रिटर भूगोलाचा हेतू सांगत असताना " Zusammenhang " (सुसंगती) या शब्दाचा कोणत्याच रूपात उपयोग न करता तो सांगू शकला असता, हे मान्यच करणार नाही. याच प्रस्तावनेच्या पुढच्या भागात प्रत्येक पानावर २-३ वेळा, आणि अशी ओळीने कित्येक पानांवर, या शब्दाची पुनरावृत्ती केलेली आहे. . हंबोल्टच्या भूगोलविषयक संकल्पनेतही हा शब्द कमी महत्त्वाचा नव्हता हे आपण पुढे पहाणारच आहोत.

" प्रदेश म्हणजे भूपृष्ठाचे नैसर्गिक विभाग " ही रूढ संकल्पना आणखी पुढे आणणे ही गोष्ट रिटरला त्याच्या विशिष्ट तात्त्विक दृष्टिकोणामुळे–पण त्याबरोबरच आपल्या संकल्पनांचे काटेकोरपणे तर्कशुद्ध परीक्षण करण्याची टाळाटाळ केल्यामुळेही–शक्य झाले. रिटरच्या तत्त्वज्ञानाचा इन्कार करणाऱ्या भूगोलतज्ञांच्या मतांवरही येवढ्या एका बाबतीत रिटरच्या निर्सगाविषयक तत्त्वज्ञानाचा प्रभाव पडत राहिलाच, असे हेटनरने बारंबार सूचित केले आहे (१९०८ साली ; ३०० ७ ते १३ ; त्याचीच आवृत्ती १६१, २९९ ते ३०६).

शेवटी असा निष्कर्ष काढण्यास हरकत नाही, की त्याच्या लेखनाच्या विरुद्ध असणारी अंतिमहेतुवादी तत्त्वे त्याच्या शिकवणीतूनच त्याच्या विद्यार्थ्यांच्या मनांवर अधिक समर्थपणे ठसविली जात. या संबंधीचा पुरावा त्याच्या मृत्यूनंतर लवकरच प्रसिद्ध झालेल्या त्याच्या व्याख्यानांच्या संग्रहात (६१) सापडतो ; आणि त्याच्या विद्यार्थ्यांच्या लिखाणांतून तर तो कितीतरी अधिक प्रमाणात सापडतो.

एक गोष्ट निःसंशय आहे, की रिटरच्या लिखाणापेक्षा हंबोल्टचे लिखाण वाचत असतानाच, आधुनिक शास्त्रज्ञाला आपण आपल्या घरात वावरत असल्यासारखे वाटते. हंबोल्टच्या काही विधानांवरुन तो वास्तववादी नसला पाहिजे असा निष्कर्ष पिशेलने काढला, तरीही हंबोल्टने विचारांचा गोंधळ टाळला याबद्दल त्याने धन्योद्‌गार काढले आहेत ; कारण " कोणत्यातरी रूपातील धार्मिक प्रकाशात शास्त्रीय संशोधनांचे प्रतिपादन करावयाचे ही गोष्ट वास्तववादी शास्त्रज्ञांच्या बाबतीत, अथवा त्यांच्या विरोधकांच्या बाबतीतही, असामान्य नाही. " (६६, I, ३०५). पण एका बाबतीत, म्हणजे उदारमतवादी हंबोल्टची क्रान्तिक दृष्टी थोडी विकृत झाली होती, " हे पिशेलच्या निश्चितपणे नजरेला आलेले होते. हंबोल्ट " मानववंशाच्या एकात्मेची " उपपत्ती मोठ्या जोमाने व आग्रहाने मांडत असे. ही संकल्पना ख्रिश्चन धर्मसंघटनेतूनच प्रभावी झाली व गुलामांचा व्यापार ही अमापसंपत्तीमुळे या धर्माला झालेली एक विकृती होती असे मानून त्याकडे दुर्लक्ष करण्यास हरकत नाही, असे त्याचे मत होते. " मानवांचे वंशांनुसार वर्गवारी करणारे विरोधी कृतक प्रमेय " निर्दयतेचे तर लक्षण आहेच, पण ते असत्यही आहे ", असा त्याने त्यावर लक्षणारोपही केलेला होता (५२, १८३-८४ ; ६०, I, ३८५ f आणि त्यावरील तळटीप). फ्योबेल आणि पिशेल यांनी ज्या तत्त्वांधारे टीका केली त्या तत्त्वांपेक्षा हंबोल्टने प्रतिपादलेल्या वंशविषयक तत्त्वांना आजचे मानववंशशास्त्रज्ञ अधिक दुजोरा देतात. तरीही मूलतः त्यांनी केलेली टीका समर्थनीयच ठरते ; कारण, या विषयावरील हंबोल्टची मते अशास्त्रीय विचारांनीच अधिक प्रभावित झालेली होती. तारुण्यात हंबोल्टला जी बौद्धिक प्रेरणा मिळाली ती जवळ जवळ निरपवादपणे एका ज्यू-बुद्धिमंतांच्या लहानशा मंडळाकडून मिळाली होती. त्यांनाच उद्देशून गटे, फोर्स्टर आदि

टीकाकारांनी " बर्लिनचा वांझ परिसर " असे म्हटले आहे. त्या मंडळींकडूनच हंबोल्टला कांट आणि लेसिंग यांच्याबद्दल माहिती मिळाली होती (ल्योबेनबर्ग व डोव्ह या दोघांचेही असेच मत आहे. विषुववृत्तीय अमेरिकेत त्याला प्रथमच दिसलेल्या गुलामांच्या व्यापाराच्या अमानुष दृश्यांचे व आपल्या मनावर झालेल्या त्यांच्या परिणामांचे त्याने स्वतःच वर्णन केले आहे. या वांशिक प्रश्नावरील आपली मते त्याने आपल्या राजकीय वर्तुळांत आणि शास्त्रीय लिखाणांतून वांरवार आणि जोमाने मांडली. आपल्या Kosmos (विश्व) या सर्वोत्कृष्ट ग्रंथातील " विश्वाच्या नैसर्गिक घटनांच्या सर्वसामान्य प्रतिपादनाचा उपसंहार करण्यासाठी आपला बंधू विल्हेम व्ही. हंबोल्ट याच्या एका अवतरणाची निवड केली आहे. " संपूर्ण इतिहासकाळात सतत वाढत्या प्रमाणात दृष्टोत्पत्तीस येणाऱ्या एका कल्पनेकडे, म्हणजेच मानवतेच्या संकल्पनेकडे, लक्ष वेधले जावे असे आम्हाला वाटते. धर्म, राष्ट्रीयत्व, वर्ण अशा कल्पनांना दूर सारून, निकटसंबंधी एकच एक महान् वंश आणि आंतरिक शक्तींचा मुक्त विकास करण्याच्या एकमेव हेतुसिद्धीसाठी अस्तित्वात आलेले एक पूर्णतत्त्व, या दृष्टीनेच अखिल मानवजातीचे विवेचन केले जावे (६०, I, ३८५ f). "

---

१९. यूरोप व अमेरिका यांच्या इतिहासात हंबोल्टच्या या प्रश्नासंबंधीच्या क्रियाशील कार्यालाही एक विशेष महत्त्व आहे. लागोपाठ प्रशियाच्या दोन राजांच्या दरबारी सरदार व खाजगी कारभारी म्हणून त्याने काम केले. त्याने आपल्या ऐन तारूण्यात फ्रेंच राज्यक्रांतीतून " १७८९ च्या कल्पना " संपादन केल्या. आणि १८०४ मधील सहा आठवड्याच्या संयुक्त संस्थानातील वास्तव्यात त्यांना खतपाणी मिळाले. त्यापैकी अर्धाअधिक काळ तर त्याने संस्थानांचा तत्कालीन अध्यक्ष टॉमस जेफरसन याच्या सहवासात घालविला. याच कल्पना त्याने आयुष्यभर जतन करून ठेवल्या (२०, I, ३९३ ff ; II २९३, २९५). पन्नास वर्षांनंतर युरोपातील राजकीय परिस्थितीमुळे निराश होऊन, " बुद्धिवादी स्वातंत्र्याचा भक्कम पाया " या भावनेनेच तो संयुक्त संस्थानांकडे पाहु लागला. पण, गुलामगिरीच्या शापामुळे तो पाया उखडून तर टाकला जाणार नाहीना अशी त्याला भीती वाटू लागली (१९, I, १६). म्हणूनच, त्याने १८५६ सालच्या फ्रीमाँटयांच्या अध्यक्षीय मोहिमेत आपल्या नावाचा उपयोग केला जाण्यास परवानगी दिली. या निवडणुकीचा निकाल जरी निराशाजनक ठरला, तरी पुढच्याच वर्षी, प्रशियात गुलामगिरीला बंदी घालणारा कायदा लागू करण्यात त्याला यश आले. पुढे तर, त्याने त्या काळात राजकीय गुन्हेगार मानला गेलेल्या फ्रयोबेलच्या मताला मूलतः पाठिंबा देणारे एक ' प्रकटन ' प्रसिद्ध केले, आणि गुलामगिरीवरील आपला हल्ला मोठा धैर्याने चालू ठेवला (त्या दोघांचा मतभेद होता तो शास्त्रशुद्ध तर्कवादाबाबत ; पण त्यातील मूलभूत विचारांबाबत त्यांचे एकमतच होते (C/o फ्रयोबेल, २८, I, ३०३). १८४० साली ज्यूंच्या विरुद्ध बंधने घालण्यासाठी होणाऱ्या कायद्याला विरोध करण्याच्या कामी त्याने हिरीरीने व परिणामकारकरीतीने भाग घेतला. सुमारे एका शतकापूर्वी हंबोल्टने केलेले एक विधान आजच्या जर्मनीस तितक्याच उत्कटत्वाने लागू आहे, हे पाहून १९३८ च्या जर्मनीत हे लिखाण करणारा प्रस्तुत टीकाकार या गोष्टीचा खेद करण्यापलीकडे काय करू शकणार ! हंबोल्ट म्हणतो : " अशाप्रकारचा अन्वयार्थ लावण्यामुळे केवढ्या अघोरी कल्पनांना पुष्टी मिळते, हे अंधारयुगाच्या इतिहासाने दाखवून दिलेले आहे " (२०, II, १९१ ff).

हंबोल्टच्या शास्त्रीय लिखाणात त्याचे तत्त्वज्ञानविषयक विचार वारंवार कसे डोकावतात, हे इतर अभ्यासकांप्रमाणे पिशेलच्याही लक्षात आले नाही. रिटरने काहीशा धार्मिक सुरात विशद केलेल्या संकल्पना आणि हंबोल्टचे हे विचार या दोहोत असलेले साम्यही त्याच्या लक्षात येऊ शकले नाही. हंबोल्टच्या मते भूगोल-क्षेत्राचा अभ्यास हे स्वयंपूर्ण साध्य नव्हते, तर "एकच सचेत स्वयंपूर्ण" या दृष्टीने "विश्वातील सुसंवादी एकात्मता", "विविधत्वातील एकत्व" समजून घेण्याचे ते एक साधन होते (६०, I, ४ ff). "या विश्वात्मक जीवाकडे (Weltorganismus) पहाण्याची अंतर्दृष्टी एक प्रकारचा अध्यात्मिक आनंद मिळवून देते ; इतकेच नव्हे तर, दैवाचे निर्दय आघात होत असतानाही कोणतीच बाह्य शक्ती हिरावून घेऊ शकणार नाही असे आंतरिक स्वातंत्र्य त्यातून प्राप्त होते." (४४, ३२; C/o ६०, II ८९ ff).

ही सृष्टीची एकात्मता म्हणजे मानवकेंद्री अंतिमहेतूवादी एकात्मता नव्हे, असे हंबोल्टचे मत होते .–रिटर ज्या संदर्भात "दैवी गूढांच्या" शोधांसंबंधी लिहितो, त्याच संदर्भात हंबोल्ट निसर्ग शक्तींच्या गूढ क्रीडांच्या आकलनासंबंधी लिहितो (४४, ३२ ;५०, २२८)–हंबोल्टच्या मते ही एकता म्हणजे एकूण निसर्गात दिसून येणारी संतुलित एकात्मता होय ; या एकात्मतेचा मनुष्य हा केवळ एक भाग आहे (ड्योरिंगने घेतलेली अनेक अवतरणे या संदर्भात लक्षणिय आहेत (२२, १८ व ३७ ff व ५९). अमेझॉनच्या अरण्यांतून व अँडीजच्या उंच कटकांवरून भटकत असता, एका ध्रुवापासून दुसऱ्या ध्रुवापर्यंत संपूर्ण सृष्टी कशी एकाच प्राणतत्त्वाने सचेत झाली आहे, दगडांत, वनस्पतींत, प्राण्यात आणि मानवांच्या छातीच्या भात्यांतही एकच एक जीवनतत्त्व ओतलेले आहे, हे माझ्या प्रत्ययाला आले. (रेडरने उद्धृत केलेल्या पत्रांवरून २३, ११६). हंबोल्टच्या विचारांच्या या उत्क्रांतीचे एक कारण त्याचा गटेशी असलेला व्यक्तिगत घनिष्ट संबंध हे होय ! (२०, I, १८७-२०१). "सर्वच घटनांत सजीव संगती असते" या गटेच्या आणि त्या सर्वच 'अद्‌भूतरम्यतावादी' पिढीच्या मताशी हंबोल्ट सहमत होता. आधुनिक भूगोलाच्या या दोनही संस्थापकांत हे एक साधारण लक्षण आढळते (प्लेवी ८, ४९-५१).

दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर, हंबोल्ट आणि रिटर हे दोघेही त्यांच्या तत्त्वज्ञानविषयक दृष्टिकोणापुरते पहाता, त्यांच्या काळाचे ते प्रतिनिधी होते.–दोघांवरही, विशेषतः कांट व रोसो यांच्या विचारप्रणालींचा प्रभाव पडलेला होता. रिटरच्या मते धार्मिक स्वभावानुसार, ज्यात मानवी व नैसर्गिक घटना परस्पर संबद्ध आहेत, अशा नियमबद्ध आणि क्रमबद्ध विश्वाची संकल्पना मांडावयाची झाली, तर तिच्या पुष्टर्थ दैवी हेतू व योजना गृहीत धरणे आवश्यक आहे, व ते प्रस्थापित करण्याचा शास्त्रज्ञाने प्रयत्न केला पाहिजे. हे गृहीतत्त्व मान्य केल्यावर, केवळ एखादी गुंतागुंतीची विश्वव्यापी यंत्रणा निर्माण करणे हा त्यामागील अंतिम हेतू असू शकणार नाही. हा हेतू विश्वातील सर्वश्रेष्ठ जीवाच्या जीवनातच आढळणे शक्य आहे. अर्थात्, विश्वाच्या मुळाशी असलेली व्यवस्था अथवा त्याचे मूळ कारण जाणून घेण्याची पात्रता एकाच जीवात आहे–तोच मनुष्य. उलटपक्षी, याच तत्त्वज्ञाननिष्ठ संकल्पनेचा

संवादी सूर हंबोल्टला धार्मिक भावनेपेक्षा त्याच्या सौंदर्यबोधक भावनेतून सापडला. रोसो व सेंटपीरी यांच्या लिखाणातील " निर्सगाची सुसंवादी " वर्णने त्याच्या हृदयाला स्पर्श करुन गेली, तर अभ्दुतरम्यतावादाच्या आंदोलनातून जन्माला आलेली भूक्षेत्रदृश्याची (Landschaft) संकल्पना त्याला गटेच्या लिखाणातून मिळाली. (C/o रेडर २३, १३४ ते १३८).[२०]

आधुनिक भूगोलाच्या या दोनही संस्थापकांच्या तत्त्वज्ञानविषयक दृष्टिकोणांची ही तुलना जरी उद्‌बोधक वाटली, तरी येथे त्याच्याशी आपला संबंध नाही. महत्त्वाचा मुद्दा हा आहे की, दोघांचेही आपापल्या साहित्य आणि तत्त्वज्ञान विषयक पूर्वाचार्यांशी मतभेद होते ; कारण, दोघेही आपापल्या तत्त्वज्ञानविषयक संकल्पनांचे निदर्शन करण्यासाठी प्रयत्नशील असत. पण त्यासाठी त्यांनी कांटप्रमाणे अनुमाननिष्ठ तर्कशास्त्राचा अवलंब केला नाही, की सेंट पीरीप्रमाणे निसर्ग दृश्यांच्या वैयक्तिक अनुभवांच्या भावनोत्कट वर्णनांचाही उपयोग केला नाही, तर निसर्ग निरीक्षणांच्या वस्तुनिष्ठ वर्णनांवर भर दिला. एक गोष्ट सत्य आहे की, आपण दुर्लक्षित केलेच पाहिजेत असे काही अपवाद रिटरच्या लिखाणात असतील तर ते, थोड्या कमी प्रमाणात, तसे हंबोल्टच्या लिखाणातही आहेत (C/o डोव्ह. २१). आधुनिक शास्त्रज्ञांना या दोघाही अभ्यासकांच्या सर्वच लिखाणांतून जशा तत्त्वज्ञानविषयक संकल्पना वारंवार आढळतात, तशा गोष्टी अलीकडील अशाप्रकारच्या ग्रंथातून सामान्यतः गाळलेल्या असतात. पण, आधुनिक विज्ञानाचे धार्मिक तत्त्वज्ञानाशी जसे कटु-संघर्ष झाले, तसे गंभीर स्वरुपाचे संघर्ष सौंदर्यशोधक दृष्टिकोणाशी होण्याचा प्रसंग आधुनिक विज्ञानावर कधीच आला नाही. कदाचित्, याच कारणामुळे आजच्या शास्त्रज्ञ वाचकांना हंबोल्टची ' जागतिक दृष्टिकोणाची ' स्पष्टीकरणे, अशाच गोष्टींच्या रिटरच्या स्पष्टीकरणासारखी विशेष खटकत नाहीत.

सामान्यतः असे म्हणता येईल, की रिटर किंवा हंबोल्ट या दोघांनाही शास्त्र व तत्त्वज्ञान यांच्यात संघर्ष आहे असे कधीच वाटले नाही. रिटरला असे आढळून आले की, भूगोल व इतिहास या दोहोंचे प्रयत्न कल्पनांची सांगड घालण्याच्या दिशेने चालू असतात (die combination und das Mass), म्हणून नाईलाजाने त्यांना तत्त्वज्ञान सांगावेच लागते. (५०, १५२). तसेच, हंबोल्ट हा कांट व फिश्टे यांच्या ग्रंथाचा अभ्यासक असूनही,

२०. अमेरिकेचा प्रवास करण्यापूर्वी हंबोल्टचा गटेशी व्यक्तिगत आणि निकट संबंध आलेला होता. याचे श्रेय, अर्थातच, त्याचा भाऊ विल्हेल्म आणि गटे यांच्यातील निकट मैत्रीला दिले पाहिजे. १७९५ ते १८२७ या काळातील अलेक्झांडर हंबोल्ट आणि गटे यांनी एकमेकांना लिहिलेल्या सुमारे तीस पत्रांच्या प्रकाशनाने, हंबोल्ट व गटे यांच्या भेटीतून झालेल्या विचारांच्या देवाण-घेवाणीची काहीशी कल्पना येते (१८, २८९-३१४). हंबोल्टने आपल्या प्रवासवर्णनांचा पहिला खंड ' वृत्तान्तर्गत जगाचे निसर्गचित्र ' (Das Natur Gemälde der Tropen Welt.) गटेला अर्पण केलेला होता. त्याने त्याच्या ६ फेब्रुवारी १८०६ च्या पत्रात, आपली ' आदरभावना व कृतज्ञता ' अशाप्रकारे व्यक्त करण्याची, बराच काळ मनात घोळत असलेली, योजना बोलून दाखविली आहे.

" ज्याच्या संदर्भाने प्रत्येक गोष्टीचा विचार करता येईल असे एखादे सुगमतर आणि उच्चतर तत्त्वज्ञान आवश्यक आहे, अशी गरज त्याला भासली. म्हणूनच शेलिंगने केलेल्या निसर्ग-तत्त्वज्ञानाचे त्याने मोठ्या उत्साहाने स्वागत केले." " खरे निसर्ग-तत्त्वज्ञान भौतिक अनुसंधान कार्यास कधीच जाचक होत नाही." उलट, ते तत्त्वज्ञान " अनुसंधान कार्यातील निष्कर्षांना मूलतत्त्वांकडे परत नेते आणि त्याबरोबरच नव्या निष्कर्षांसाठी पाया तयार करते," असे आपले ठाम मत असल्याचे त्याने १८०५ मध्ये शेलिंगला लिहिलेल्या एका पत्रात, आणि त्यानंतर दोन वर्षांनी एका प्रकाशनात स्पष्ट केले (२०, I, २२८ f ; ४१, v). पण पुष्कळसे अभ्यासक जेव्हा भौतिक अभ्यासांऐवजी " केवल विचारांनाच " प्राधान्य देऊ लागले आणि अनुसंधान कार्याशिवाय शास्त्र-निर्मिती होऊ शकते असा विचार मांडू लागले, तेव्हा निसर्ग-तत्त्वज्ञानाच्या या " मूढ " प्रकारावर काही वर्षांनी त्यानेच कडाडून हल्ला चढविला, हेही खरे आहे (२०, I, २३०).

निरीक्षणांची व प्रयोगांची हेटाळणी करणारे आणि हाताला धूळ लागू न देता भौतिकशास्त्रांचा अभ्यास करणारे हे " मुख्यवट्यातील " तत्त्वज्ञान आणि रिटरचे कार्य यांचा काही संबंध होता असे हंबोल्टने कधीच म्हटले नाही, हे बर्लिन विद्यापीठातील आपल्या एका व्याख्यानात रिटरच्या कार्याचा गौरव करुन व लगेच त्यासंबंधी चर्चा करुन त्याने स्पष्टपणे सुचविले आहे : " विश्वाचे वर्णन भौतिक तत्त्वज्ञानासंबंधीची समर्पक सामग्री पुरविते ; पण त्याची पायाभूत तत्त्वे अनेक प्रकारांनी शोधावयाची असतात. अशा प्रयत्नांत मलातरी दोष दिसत नाही. माझ्या स्वतः पुरते म्हणाल तर, मी हा प्रयत्न अधिक भौतिक पद्धतींनी करणे मान्य केले असते. या प्रकारच्या निसर्ग-तत्त्वज्ञानात भ्रामक वस्तुस्थितींपासून सावध राहिले पाहिजे, आणि फार प्रयत्नांनी त्या टाळल्या पाहिजेत. म्हणूनच, भौतिकवादाच्या पुरस्कर्त्यांनी व अध्यात्मवादाच्या पुरस्कर्त्यांनी एकमेकांची हेटाळणी करता कामा नये ; कारण, त्यांच्या संयुक्त प्रयत्नांतूनच मानवाला उच्चतम ध्येय गाठता येणे शक्य होणार आहे " (५२, १५).

हंबोल्ट व रिटर या दोघांच्याही मते, सृष्टीच्या एकात्मतेची संकल्पना, निसर्गातील सर्वच विविध रूपधेयांमध्ये कार्यकारणभावांचा परस्पर संबंध असतो, ही गोष्ट गृहीत धरते. निर्सगघटनांचा अभ्यास होतो तो ही सलगता व एकात्मता प्रस्थापित करण्याच्या हेतूनेच. दोघांच्याही दृष्टीने, सृष्टीच्या एकात्मतेत सचेतनांबरोबर अचेतनांचा, मानवांबरोबर अमानवांचा, आणि भौतिकांबरोबर अभौतिकांचा समावेश होतो, हा गृहीत-सिद्धान्त होता. यांपैकी कोणालाही वगळणे हे स्वैरपणाचे लक्षण आहे इतकेच नव्हे तर, स्वयंपूर्णाच्या सलगतेला व एकात्मतेला बाध आणणारे आहे. १८०४ मधील आपल्या पहिल्याच प्रकाशनात ' शुद्ध भूगोलातील ' एका नव्या वळणाला त्याने जोरकस विरोध केला. कारण त्याच्या मते त्यात नैसर्गिक भूक्षेत्र दृश्यांवर (Naturlische Landschaft) अवास्तव भर देण्याकडे कल होता. भूगोलात कोणत्याही एकाक्षेत्रातील उपस्थित परिस्थितीचे वर्णन व

विवेचन आलेच पाहिजे असा त्याचा आग्रह होता (24, I, 250 ff). (प्लेवी ८, ३२). पण एक गोष्ट खरीच : मानवासंबंधीच्या अतिरिक्त अभिरुचीमुळे मानवी घटकांवर त्याने इतका भर दिला, की त्याचा मूळ हेतू साध्य करण्यातच त्याला शेवटी अपयश आले. (मार्थे २५, २१ : रात्सेल २६).

हंबोल्टच्या शास्त्रविषयक दृष्टीला, त्याच्या स्वतःच्या अंतःकरणाच्या बाहेर फक्त विश्वाची मर्यादा होती, व त्यालाच तो निसर्ग म्हणत असे. गटे व रिटर हे तर त्याला " चालती बोलती शिक्षण संस्था " म्हणत (२०, I, १९८ : २४, I, १५४). तो स्वतःच ज्याला भूगोलविषयक लिखाण असे मानत नसे तेवढे त्याच्या एकूण लिखाणातून वगळले तर, स्वतःच्या कार्यक्षेत्रासंबंधीची त्याची दृष्टी इतकी विस्तृत व समृद्ध होती, कोणत्याही एका भूगोल प्रकाराच्या वादाची बीजे–गेर्लांडच्या भूभौतिकशास्त्रापासून ते थेट बान्झेच्या सौंदर्यबोधक्षम भूगोलापर्यंत सर्वांची बीजे–हंबोल्टच्या लिखाणात सापडू शकतात. " कार्यकारण संबंधाच्या या महान शृंखलेत कोणती वस्तू वा घटना स्वतंत्रपणे अभ्यासणे शक्यच नाही " (४४, ३९). " निसर्गाच्या निरीक्षणांचे सर्वोच्च ध्येय आपल्या स्वतःच्या निसर्गाचे ज्ञान करून घेणे हेच असते ;आणि म्हणूनच आम्ही आमच्या वर्णनाचा उपसंहार मानवांच्या वंशांसंबंधीच्या विवेचनाने करत आहोत " (५२, १३, १८१ ते १९०). यालाच अनुसरुन, Kosmos या त्याच्या ग्रंथातील क्रमबद्ध भूगोलाचा त्याचा आराखडा–त्याकाळातील रूढ शब्द ' प्राकृतिक भूगोल ' असा होता–मानवविषयक विभागानेच संपलेला आहे (६०, I, ३७८-८६). मानवविषयक विवेचनात " त्याच्या भौतिक बाजूंबरोबरच त्याच्या अध्यात्मिक बाजूंचाही समावेश झालेला नसतो का ! " (६०, I, ६९) म्हणूनच नीतिविषयक आणि सौंदर्यविषयक प्रश्न हा त्याच्या मानवसंबंधी विवेचनाचा एक भाग असे (पहा ४४, २४ ; आणि ४७, I, ३४८-५२).*

हंबोल्टच्या प्रादेशिक वर्णनांतून मानव व त्याचे कार्य यांच्या संबंधीचा मजकूर थोडाच सापडेल. त्याचे कारण त्याने स्वतःच दिलेले आहे. तो म्हणतो, की त्याच्या विषुववृत्तीय अमेरिकेच्या प्रवासात तो प्रामुख्याने अशा क्षेत्रांत गेला होता, की " संस्कारांचा स्पर्शही न झालेल्या त्या राक्षसी निसर्गात मनुष्य व त्याच्या कृती कोठे गडप झाल्या होत्या " (४७, I, ३२). सर्व सुशिक्षित लोकांना गोडी वाटेल असे सर्वसामान्य परिणामाचे प्रतिपादन तो करतो. असे करण्यात, तेथील हवामान आणि शेतजमिनीच्या आणि वनस्पति-झाडीच्या स्वरुपाप्रमाणे बदलणारे ग्रामीण भागाचे दृश्य यांचे वर्णन करणे येवढाच त्याचा हेतू नसून, तेथील हवामानाचा जीवसृष्टीवर होणारा परिणाम, वनस्पतिकुलाबरोबरच मानवी वंशानांही विभक्त करणाऱ्या पर्वत व नद्या यांच्या दिशा, भिन्न अक्षांशांत स्थायिक झालेल्या लोकांच्या परिसरातील बदल आणि कमी-अधिक प्रमाणात त्यांच्या बुद्धिगुणांच्या संवर्धनाला पोषक होणाऱ्या परिस्थितींतील बदल, या सर्वांचे वर्णन करणे " हाही त्याचा हेतू होता. " असे लक्ष देण्याइतक्या पात्रतेच्या गोष्टींची यादी मी फाजील लांबविली आहे अशी भीती मला कधीच

*पुरवणी टीप क्र. ५ पहा.

वाटली नाही. कारण, एका विशेषश्रेष्ठ गुणाने सांप्रतची संस्कृती पुरातन संस्कृतीपेक्षा वेगळी आहे. आमचा संकल्पना-संचय फार विस्तृत असल्यामुळे वास्तविक आणि बौद्धिक जगांतील संबंध आपल्याला अधिक स्पष्टपणे कळू शकतात. आज ज्या गोष्टीसंबंधीची आमची अभिरूची आधिक विस्तृत व विकसित झाली आहे ; त्याच गोष्टीसंबंधी पूर्वी काही थोड्या विद्वानांनाच आस्था वाटत असे ; कारण, अतिशय संकुचित दृष्टिकोणामुळे एकाच प्रकारच्या गोष्टी एकमेकांपासून भिन्न आहेत असे पूर्वी मानले जात असे " (४७, I, १४).

लोकवस्ती असलेल्या प्रदेशांची वर्णने करताना आपले हेतू सफल करण्याचा हंबोल्टचा प्रयत्न सातत्याने चालू असे. निसर्ग वर्णनांचे आणि निसर्ग घटनांच्या अन्वयार्थाचे अविभाज्य घटक म्हणून मानव, त्याची संस्कृती व त्याचे कार्य यांचा समावेश केलेला होता. (मध्य आशियाच्या बाबतीत मात्र, त्याच्या अभ्यासांवर रशियन सरकारने घातलेल्या निश्चित बंधनांच्या मर्यादा पडलेल्या होत्या).

हंबोल्ट व रिटर या दोघांनीही, वेगवेगळ्या क्षेत्रांच्या विवेचनात संपूर्ण सृष्टीच्या एकात्मतेची संकल्पना गोविलेली आहे. निदान, मी ज्याला ' लंब '.असे म्हटले आहे त्या अर्थाने तरी ती खासच गोविलेली आहे. कोणत्याही एका क्षेत्रातील सर्व रूपधेयांच्या परस्पर संबंधातून एक नैसर्गिक एकात्म जटिल तयार होतो–मग हा जटिल म्हणजे एक स्वयंपूर्ण एकक म्हणून त्याचा विचार करा, अथवा त्याला जग नावाच्या एका निसर्गसिद्ध स्वयंपूर्णाचा एक भाग माना.* हंबोल्टच्या मताने जगाचा प्रत्येक भाग ही संपूर्ण जगाच्या एकात्मतेची प्रतिमा आहे (६०, II, ८९). या मुद्यावर रिटरने केलेले विधाने अधिक भरदार आहेत. अर्थात, दोघेही आपापल्या पूर्वाचार्यांनी सुचविलेल्या मार्गांचेच अनुकरण करत असतात, हे आपण यापूर्वीच पाहिले आहे.

या एकात्मतेचा अभ्यास कसा करावा ? कोणत्याही एका प्रदेशाचा अभ्यास त्या एकूण प्रदेशाच्या प्रतिपादनाशी निगडित असावा, निदान अभ्यासाची सुरूवात त्या एकूण क्षेत्राच्या विवेचनाने व्हावी, असे या शास्त्राच्या संस्थापकांपैकी एकाचेही मत नव्हते, ही गोष्ट सांगण्याचीही आवश्यकता नाही. सृष्टीतील सर्वच वस्तू व शक्ती यांचा परस्पर संबंध असल्यामुळे त्यांचे एक पूर्णरुप तयार होते, ही गोष्ट दोघांनीही सुरुवातीपासूनच गृहीत धरलेली होती (येथे, आपल्या अंतकरणाच्या बाहेर असलेली ती सृष्टी, असा अर्थ अभिप्रेत आहे). प्रथम, प्रत्येक वेगळ्या रुपधेयाचे दुसऱ्या रुपधेयांशी संबंध असतात त्यांचे अनुसंधान करावयाचे, आणि मग त्यांची प्रत्यक्ष संबंध-योगानुसार मांडणी करुन एक पूर्णरुप तयार करावयाचे, या पद्धतीनेच ही गोष्ट शास्त्रदृष्ट्या सिद्ध करणे शक्य आहे, हे दोघांनीही तत्त्वतः व प्रत्यक्षकृतीने मान्य केलेले होते. म्हणजे, ही सर्व रुपधेये वेगवेगळी लक्षात घेण्याऐवजी त्यांच्या परस्पर संबंधांच्या स्वरुपांतच त्यांचा प्रतिबोध झाला, तर त्या सर्वांचे एकच एकात्म पूर्णरुप बौद्धिक पातळीवर निर्माण करणे शक्य आहे. त्या स्वयंपूर्णालाच निसर्ग असे म्हणतात. अशा स्वरुपाचे प्रतिबोधन करणे हेच शास्त्रीय भूगोलकाराचे महत्त्वाचे कार्य होय (६०, I, ४ ff : C/o प्लेवी ८, ३९).

---

* पुरवणी टीप क्र. ६ पहा.

या पूर्वी केलेली सर्व विधाने रिटरच्या हेतूचे स्पष्ट चित्रण करतात. या गोष्टीला केवळ त्याच्या कार्याशी अधिक परिचय असलेल्या लोकांच्या मतांचा आधार आहे असे नव्हे, तर त्याच्या प्रत्यक्ष ग्रंथांच्या अथवा त्याच्या पद्धति-तंत्रविषयक चर्चांच्या थोड्याशा परीक्षणानेही मिळण्यासारखा आहे. त्याच्याच विरुद्ध जाणारी आहेत असे वाटावे अशी काही विधाने त्याच्या लिखाणात निश्चित मिळतील. उदाहरणार्थ, सुमारे एकशतकापूर्वीच, त्या काळचा एक तरुण विद्यार्थी प्र्योबेल याने रिटरची एक-दोन विधाने संदर्भातून बाजूला करुन वेगळी मांडून दाखविल्यामुळे, प्रथम पृथक्करण न करताच संकलन करण्याची पद्धती रिटरने अवलंबिलेली होती असा भास निर्माण केला (५४, ५०२, ५०४). ' साकल्य ' तत्त्वानुसार ' संशोधकाला कोणत्याही पूर्णवस्तूचे भाग करण्याची बंदी असते ', कारण त्यामुळे त्यांच्यातील सलगपणा आणि त्याबरोबरच त्यांचे सारस्वरुप नष्ट होते (२२२, २५७). संकलनाच्या आधी पृथक्करण करणे जरुर असते हेही न कळण्याइतका रिटर सामान्य बुद्धीचा नव्हता, हे प्र्योबेलने अवतरण म्हणून घेतलेल्या व ज्याच्यावर त्याने आपला तर्क आधारला त्या वाक्यानंतरच्या परिच्छेदाच्या वाचनाने सहज लक्षात येण्यासारखे आहे (४९, I, ३). खरे तर, आपल्या ग्रंथाच्या प्रस्तावनेत त्याने स्पष्ट-शब्दांत मांडलेले तत्त्व त्याच्या ग्रंथाच्या भागांभागांतून स्पष्ट झालेले आहे : " ही कार्यपद्धती सरलांकडून संयुक्तांकडे, अंशांकडून पूर्णांकडे नेणारीच असली पाहिजे " (४९, I, २४). पण " बांधणी बरोबरच संयोगीकरण " या रिटरच्या पद्धतीत " पृथक्करण केवळ अबोधपणे गृहीत धरलेले आहे " (प्र्योबेल ५४, ५०४) असा आरोप जेव्हा त्याच्यावर केला गेला, तेव्हा त्याला प्रत्युत्तर देताना रिटरने धरसोड करावी हेही त्याच्या व्यक्तिगत स्वभावाला धरुनच होते. काहींना असे वाटले, की रिटर प्र्योबेलला संदर्भातील पाने पुन्हा लक्षपूर्वक वाचावयास सांगेल. पण, प्रत्यक्षात मात्र, संकलनपद्धतीचे प्रतिपादन करणाऱ्या ग्रंथकाराला संकलनाची उभारणी पृथक्करणातूनच व्हावयाची असते हे तत्त्व नव्याने सांगण्याची आवश्यकता नाही हे माझ्या टीकाकाराच्या लक्षात यावयास पाहिजे होते (५५, ५४५) अशी केवळ सूचना करून रिटरने समाधान मानले. नंतरच्या टीकाकारांनी तर, पृथक्करणाच्या पलीकडे जाऊन संकलन करण्यात रिटरला यश आले होते का, अशी शंका प्रदर्शित करण्यासही कमी केले नाही.

विशिष्ट भूक्षेत्रे ही स्वतंत्र एकके मानून त्यांच्यातील समतल-एकात्मतेच्या संकल्पनेलाही रिटरने पाठिंबा काही अटीवर दिलेला होता. खंडांना तो कधीकधी ' अवयव ' असे संबोधत असे व त्यांच्या व्यक्तित्वावरही भर देत असे, पण प्र्योबेलला दिलेल्या उत्तरात या संज्ञा ' शब्दार्थाने ' न घेता ' सादृश्यार्थाने ' घ्याव्या असा आग्रह त्याने धरलेला दिसतो. (पृथ्वीवरील समान घटनांच्या क्रमबंधांबद्दल लिहिताना प्र्योबेलनेही हीच संज्ञा वापरली आहे, त्याप्रमाणेच रिटरने वापरली हे लक्षात येईलच (५४, ४९५). ' स्वतंत्र ' या शब्दाने त्याचे पूर्ण समाधान झालेले नव्हते. म्हणूनच, जेव्हा जेव्हा दुसरा चांगलासा शब्द त्याला सुचत असे तेव्हा तो पहिला सोडून देत असे. तरीही सर्व लक्षण विशेषांच्या दृष्टीने पहाता खंड हे " नैसर्गिक

स्वयंपूर्ण " आहे, अशीच रिटरची कल्पना होती (५५, ५५८ f). तसेच निदान काही बाबतीत तरी, खंडांच्या विभागांबद्दल (die Länder) त्याने असे लिहिलेले आहे की, हे खंडरुप सावयवाचे केवळ तुकडे नसून ते त्याचे ' अवयव ' या अर्थाने ' वेगळे भाग ' आहेत (C/o ब्यूर्गर ११, १४-१९). या सर्व संकल्पना जरी रिटरच्या अंतिम-हेतुवादाच्या, तत्त्वज्ञानाच्या साच्यात बसत असल्या, तरी त्या संकल्पना म्हणजे अशा प्रकारच्या तत्त्वज्ञानाचे आवश्यक निष्कर्ष नव्हेत, किंवा त्या संकल्पनांना अशाप्रकारच्या पुष्टीचीही जरुरी नाही. कसेही असो, या संज्ञांचा अक्षरशः अर्थ घेता कामा नये, ऐवढे निश्चित आहे (C/o हयोत्सेल, २७).

हंबोल्टने ही संकल्पना विचारातच घेतलेली दिसत नाही. ड्योरिंगने या चर्चेचा विषय असा काढला : रिटरच्या दृष्टीने प्रत्येक स्वतंत्र क्षेत्राला त्याचे विशिष्ट पण निश्चित मूल्य असते, तर हंबोल्टच्या मते प्रत्येक स्वतंत्र क्षेत्र हे ' नियम आणि कार्यकारणभाव ' या महान् विश्व-विषयाचेच एक भिन्नरुप असते (२२, १६२). जगाच्या कानाकोपऱ्यांतून दिसणारा निसर्ग त्या पूर्णरुपाचेच प्रतिबिंब आहे. सेंद्रियांच्या स्वरुपांची निरनिराळ्या आणि विविध संयोगांच्या रुपाने सतत पुनरावृत्ती होत असते (६०, H, ८९). एका अर्थी, प्रादेशिक विभागणीचा प्रश्न हंबोल्टच्या पुढे कधीच उभा राहिला नाही ; कारण, जगाच्या विविध प्रदेशांच्या किंवा जगाच्या एखाद्या मोठ्या विभागाच्या प्रदेशांच्या संघटनेतून एक क्रमबंध निर्माण करण्याचा प्रयत्न त्याने कधीच केला नाही. पण भौगोलिक अभ्यासांचे या पद्धतीचे संघटन आवश्यक आहे हे त्याला कळून चुकले होते, हे आपण पुढे पहाणार आहोत.

आपल्याला भासविला जातो तितका हा तत्त्वज्ञान विषयक प्रश्न महत्त्वाचा नाही कारण प्रस्तुत चर्चेशी असंबद्ध आहे. भूगोलाच्या या दोन संस्थापकांचे तत्त्वज्ञान विषयक दृष्टिकोन बाजूला ठेवून, त्यांच्या प्रत्यक्ष कार्यावर परिणाम करणारा त्याचा भाग तेवढाच लक्षात घेऊ ; या दोघांनी भौगोलिक कार्याला लावलेल्या वळणात कोणते प्रमुख भेद आहेत ?

भूगोलशास्त्राच्या अनुरुप समाविष्ट विषयांसंबंधाने त्या दोघांत काही मूलभूत विरोध असल्याचे दाखविणे चुकीचे आहे, हे आपणाला आढळून आले. तरी, त्यांच्या कार्याच्या स्वरुपातील भेदांमुळेच नंतर केल्या गेलेल्या अर्थानुसंधानांतून एक महत्त्वाचा भेद निर्माण झाला, ही गोष्ट खरीच. हंबोल्टने मानवाच्या भूगोलातील क्रमबद्ध विचारसरणी आपल्या लिखाणांतून ठिकठिकाणी मांडलेली असली (पेशेल ६६, I, ३५१-५५) तरी त्याचे क्रमबद्ध भूगोलावरील अभ्यासलेख मुख्यतः अमानव रुपधेयांपुरतेच मर्यादित असत. उलटपक्षी, रिटरने आपल्या लिखाणांत अमानव घटनांसंबंधीच्या अभिरुचीला मानवविषयक अभिरुचीच्या तुलनेने गौणत्व दिले. आणि त्याचे श्रेष्ठ ग्रंथ तर प्रादेशिक भूगोलाच्या स्वरुपातच सादर केले गेले आहेत. पुढे त्याच्या पद्धति तंत्रावरील अभ्यास लेखांत भूगोलाच्या घटनांच्या वर्गनिष्ठ संघटनेपेक्षा भूगोलाच्या प्रादेशिक संघटनेच्या

महत्त्वावर त्याने वारंवार आणि जास्त भर दिला. या दुहेरी विरोधाचा परिणाम म्हणूनच भूगोलातील द्वैतवादाच्या दोन प्रकारांत गोंधळ उडालेला दिसतो–अर्थात, मानवाचा भूगोल व निसर्गाचा (अमानव) भूगोल यांच्यांतील भेद क्रमबद्ध भूगोल आणि प्रादेशिक भूगोल यांच्यांतील भेदांत समाविष्ट असतात, ही गल्लत–त्याचा आम्ही आधीच उल्लेख केलेला आहे.

हे दोन वाद वेगवेगळे केले तर, भूगोलात मानव व अमानव रुपधेयांचा अंतर्भाव करण्याने हंबोल्ट अथवा रिटर यांच्यापैकी कोणाच्याच विचारांतून द्वैतवादाचा प्रश्न उद्‌भवला नसता, हे आम्ही यापूर्वीच दाखवून दिले आहे. उलट, सृष्टीतील एकात्मतेच्या त्यांच्या मूलभूत संकल्पनेच्या दृष्टीने तसे करणे निर्विवादपणे आवश्यक होते.

पण, द्वैतवादाचा दुसरा प्रकार दोघांनीही निःसंशयपणे मान्य केलेला होता ; कारण, त्यांच्या मते, भौगोलिक सामग्रीचा अभ्यास व तिचे संघटन करण्याच्या पद्धतींतील तो मूलभूत विरोध होता. पद्धतींतील या द्वैतवादामुळेच भूगोलाच्या इतिहासात अनेक वेळा या वादग्रस्त प्रश्नाची वारंवार पुनरावृत्ती झालेली आहे. तरी, आजही तो प्रश्न मिटलेला नाही. यापैकी कोणती तरी एक पद्धती भूगोलक्षेत्रातून वगळण्याच्या सोप्या मार्गाने हा प्रश्न सोडवू इच्छिणाऱ्या भूगोलकारांचीही कधी वाण पडली नाही. भूगोलक्षेत्र हे फक्त आणि पूर्णपणे क्रमबद्ध अभ्यासांसाठी असावे की प्रादेशिक अभ्यासांसाठीच मर्यादित ठेवावे या प्रश्नाच्या संदर्भात आधुनिक भूगोलाच्या या दोनही संस्थापकांनी कोणती भूमिका घेतलेली होती ? आणि त्यांनी आपल्या तात्त्विक स्वरुपाच्या विचारांतून व परिपाठांतून ती कशी स्पष्ट केली ?

रिटरने आपल्या कार्यांतून व पद्धतीतंत्रविषयक विधानांतूनही प्रादेशिक संघटनावर विशेषजोर दिला. त्यामुळेच जगातील प्रत्येक वर्गीकृत घटकाच्या क्रमबद्ध अभ्यासात त्याला फारशी गोडी नव्हती, असे मत बनविण्याकडे वाचकाचा कल होतो. पण, भूगोलाच्या विकास कालातील एक प्रमुख अभ्यासक म्हणून सामान्यतः ओळखल्या जाणाऱ्या एका व्यक्तीचे आकलन करून घ्यावयाचे असेल, तर आपला निष्कर्ष त्याच्या ग्रंथाच्या केवळ रुपरेषेवर व त्याच्या पद्धतितंत्रातून घेतलेल्या काही संदर्भरहित वाक्यांवर आधारणे न्याय्य नाही. म्हणून एका शतकापूर्वीच्या त्याच्या तरुण टीकाकाराने केले होते त्याच्यापेक्षाही अधिक काळजीपूर्वक रीतीने त्याच्या कार्याचे परीक्षण करणे प्राप्त आहे (फ्योबेल : ५४).

प्रस्तुत प्रश्नाचा दुसऱ्या एका संबंधित प्रश्नाशी गोंधळ होऊ देता कामा नये, कारण आपण त्याची चर्चा आधीच केलेली आहे. तो प्रश्न म्हणजे, एखाद्या क्षेत्रात परस्पर साहचर्याने असलेल्या विविध कारकांचे प्राथमिक पृथक्करण न करता, रिटर त्यांच्या संकलनाच्या प्रयत्नात असे, असा युक्तिवाद. या प्रश्नाचे उत्तर देणे सोपे आहे. संदर्भित लिखाणातून बाजूला काढलेल्या रिटरच्या काही विधानांवरून तो काहीही म्हणत असल्यासारखे आम्हाला वाटले, तरी लागोपाठ अनेक पिढ्यांनी ज्याला भूगोलाचा आचार्य मानले तो मनुष्य मूर्ख होता असे मानावयाचे का ? पण हे सर्व मान्य करूनही प्रस्तुतचा प्रश्न शिल्लक राहातोच, कारण तो अगदी खरा आहे.

रिटरने केलेली पद्धतितंत्रविषयक चर्चा ही आपल्या शास्त्राच्या एका शाखेचा समतोल अभ्यास आहे, असे समजण्यापेक्षा, पूर्वीच्या भूगोलज्ञानाची शास्त्ररूपात पुनर्रचना करण्याच्या प्रयत्नात असलेल्या एका सुधारकाचा तो सुधार कार्यक्रम आहे, या दृष्टीने याच्याकडे पहाणे चांगले. काही विशिष्ट पूर्वाभ्यासकांनी केलेल्या अभ्यासावरून त्याला असे दिसून आले, की निसर्गातील परस्परसंबद्ध घटनांची स्वतंत्र वर्गवारीने विभागणी करणे आणि नंतर जगभर पसरलेल्या त्या घटनांचा स्वतंत्रपणे अभ्यास करणे ही बौद्धिक (' व्यक्तिनिष्ठ ') प्रक्रिया निसर्गनिर्मित घटनांच्या प्रत्यक्ष समाकर्षणाचे विदारण करणारी होती (४९, I, २०). हा निष्कर्ष काढण्यासाठी हेतुवादाचाही आधार घेण्याची गरज नाही. एक गोष्ट रिटरच्या लक्षात येऊन चुकली होती, की जेव्हा प्रत्येक घटनेचा अभ्यास तिच्याच विविधरूपांच्या आणि प्रक्रियांच्या संदर्भात केला जातो, तेव्हा तो परिणामी अभ्यास अन्यशास्त्रांतील अशाच अभ्यासांशी तुलना करून पहाण्यासारखा असतो ; इतकेच नव्हे तर, तो दुसऱ्या एका शास्त्राचा भाग असावा, असा भास होतो. अशा विभक्त अभ्यासांचा केवळ ' संग्रह ' केल्याने एक सलग भूगोल तयार होणार नाही, आणि एका विशिष्ट प्रदेशाचे त्यातील प्रत्येक घटनेच्या अनुरोधाने केलेले अभ्यास एकत्र केले तरी ते कोणत्याच प्रकारचे शास्त्र होणार नाही. [२१]

म्हणूनच रिटर पुन्हा पुन्हा आग्रहाने सांगत असे की, पृथ्वीविषयक अभ्यासाची योग्य पद्धती म्हणजे " प्रत्यक्ष पृथ्वीकडे तिच्या नियमासंबंधी केलेली विचारणा " होय. त्या शास्त्राने " वस्तु निष्ठ " (आमच्या मते अनुभवजन्य म्हणणे बरे) पद्धतीचाच उपयोग केला पाहिजे. त्यामुळे " निसर्गरचनांच्या प्रमुख प्रकारांवर लक्ष केन्द्रित केले जाते " व प्रत्यक्ष निसर्गातच रुजलेल्या संबंधयोगांची चिकित्सा करणारी ही पद्धती आपणास नैसर्गिक क्रमबंधांचाच मार्ग दाखविते (४९, I, २० ; c/o विझोत्स्की १, २७३ ff ; ब्यूर्गर ११, १५).

अशा विधानांच्या आधारे, प्रत्येक स्वतंत्र रूपधेयाच्या क्रमबद्ध अभ्यासाच्या महत्त्वाकडे दुर्लक्ष केल्याचा आरोप, फ्र्योबेल प्रमाणे, इतर कोणीही केला असता. पण, असेही खात्रीपूर्वक म्हणता येईल, की याच्या विरुद्धार्थाची सूचक विधानेही सापडू शकतील. मात्र, ती अधिक

---

२१. रिटरने संग्रह हा शब्द वारंवार वापरला आहे, (जर्मन भाषेतही तोच शब्द त्याच स्वरूपात त्याने वापरला) व त्यातून त्याला आपल्या कार्यपद्धतीशी विरोध सुचवावयाचा आहे–फ्र्योबेलने दिलेल्या उत्तरात त्याचा लक्षणीय वापर केलेला आहे (जर्मन भाषेत व लॅटीन मध्येही) (५५, ५०८, ५१३). त्या लेखातील स्वतःच्याच हेतूसंबंधी रिटरने केलेल्या विधानांचा अनुवाद करत असता, वेगळे असले तरी, सुसंगत असलेले तीन हेतू एकाच वाक्यात गोविलेले असूनही त्यांपैकी दोन लायलीने गाळलेले आहेत; इतकेच नव्हे तर, आपला ग्रंथ कसा नाही हे ज्या शब्दात रिटरने पुढे सुचविले आहे, नेमक्या त्याच शब्दात रिटरला स्वतःच्या ग्रंथाचे वर्णन वदवावयास लावण्याची करामतही लायलीने केली आहे (२२२, २४५).

बारकाईने शोधावी लागतील. उदाहरणार्थ : " या पृथ्वीचा पृष्ठभाग, त्याचे खोलगट भाग, त्यांवरील उंचभाग यांचे मोजमाप केले पाहिजे ; आणि तिच्या रूपांची त्यांच्या महत्त्वाच्या लक्षणांनुसार मांडणी केली पाहिजे (४९, I, ४). तसेच बर्लिनच्या " शास्त्राभ्यास संस्थेपुढे " दिलेल्या १८२८ व १८३३ सालांच्या व्याख्यानांत त्याने स्वतंत्र घटनाप्रकारांच्या अभ्यासांच्या आवश्यकतेची विस्तृत व सखोल चर्चा केलेली आढळून येईल (५०, १२९ ff ; १५२ ff).

तरीही, नंतरच्या काळातील बहुतेक टीकाकारांना एक गोष्ट जाणवली. रिटरचे प्रादेशिक भूगोलासंबंधीचे कार्यक्रमबद्ध अभ्यासांवर अधिक पक्केपणाने आधारलेले असते, तर जास्त प्रभावी ठरले असते. मात्र, त्यांतून निर्माण झालेल्या विलंबामुळे त्याच्या व्याप्तीवर मर्यादा पडल्या असत्या. पण ही टीका रिटरच्या जीवनकालात कधीच परिणामकारक रीतीने करण्यात आली नाही. फारतर, ब्यूशरच्या १८२७ मधील लक्षणीय टीकालेखात ती सूचित होती असे म्हणता येईल (आणि त्याचा उल्लेखही यापूर्वी आलेला आहे.), पण तिचा रोख रिटरविरुद्ध निश्चितच नव्हता. त्या लेखात (Erdkunde) या ग्रंथाचा उल्लेख क्वचितच आला आहे. उलट, त्याच्या आधी रिटरने लिहिलेल्या यूरोपच्या क्रमबद्ध भूगोलाचा तपशीलवार विचार त्या टीकेत केलेला असून, क्रमबद्ध भूगोलाच्या अचुक दृष्टिकोनाचे एक प्रमुख उदाहरण म्हणूनच त्याचे विवेचन केलेले आहे (५१, ९३ f). पण, यातून ब्यूशरला नंतरच्या त्याच्या कार्यावरील टीका सूचित करावयाची होती, अथवा रिटरला या टीकेची माहिती झालेली होती काय, याची मला कल्पना नाही. १८३६ साली छापलेल्या Berghaus Annalen मधील त्याच्या स्वतःच्याच लेखाला दिलेल्या संपादकीय तळटीपेत (५५, १५६) रिटरचे लक्ष या टीकेकडे निश्चितच वेधले गेले होते. इतकेच नव्हे तर, मार्थे व विझोत्स्की या दोघांनीही ब्यूशरच्या अभ्यासलेखाचे महत्त्व मान्य केलेले असूनही, त्यात Erdkunde या ग्रंथासंबंधी काही टीका सूचित असल्याचे अनुमान दोघांपैकी एकानेही केलेले दिसत नाही.

त्यापेक्षा, शैक्षणिक भूगोलाचा दोनच वर्षांचा अनुभव असलेला एक तरुण अभ्यासक, ज्यूलिअस फ्रयोबल, याचा टीकात्मक निबंधच लोकांना अधिक माहित झालेला होता. (फ्रयोबलच्या स्वतःच्या कार्यक्रमासाठी पहा विभाग ३- अ). रिटरच्या प्रशस्तीवरून बर्गहाऊसने तो लेख आपल्या Annalen या मासिकात छापला ; आणि त्याच अंकात रिटरने स्वतः त्यावर केलेली प्रतिटीकाही छापली. त्यामुळे शैक्षणिक जगताचे लक्ष त्यावर अधिकच केंद्रित झाले (५४, ५५) त्यावेळपर्यंत कोणतेच खास यश संपादन न केलेल्या एका तरुण विद्यार्थ्याला आपल्या गुरुचाच विरोधक म्हणून शैक्षणिक जगाच्या प्रकाश झोतात अकस्मात ढकलण्यात आले. त्यामुळे आपल्याला वाटलेले आश्चर्य व आपल्या मनाची गांगरलेली अवस्था याचे वर्णन, पन्नास वर्षांनंतर, फ्रयोबलने स्वतः केलेले आहे. फ्रयोबेलच्या या टीकालेखावर प्रतिटीका करत असताना, फ्रयोबलला मूर्खात काढण्याची सुवर्णसंधी आलेली होती. तरी रिटरने तिकडे दुर्लक्ष केले, इतकेच काय, " निर्विवादपणे चतुरबुद्धीच्या एका

अभ्यासकाने भूगोलाची प्रगती व्हावी या प्रामाणिक इच्छेने मांडलेले उत्कट विचार, " अशी त्याची प्रशस्ती केली. हेच रिटरच्या स्वभावाचे मनोवेधक दर्शन आहे (५५, ५०६ f). पुढे लवकरच प्रयोबल बर्लिनला आल्यावर रिटरने त्याचे आस्थेवाइकपणे स्वागत तर केलेच, पण त्याला आवश्यक असलेली जीवनवृत्ती, म्हणजे Erdkunde चे नकाशे तयार करण्याचे कामही दिले. हंबोल्टनेही केलेल्या आपल्या स्वागताचे वर्णन प्रयोबलने असेच वेधकपणे केलेले आहे. ज्या लेखाचा ' रिटरवर केलेली उद्धट टीका ' असा उल्लेख स्वतः प्रयोबलनेच पुढे केला, त्या टीकालेखावर हंबाल्टने उघडपणे अनुकूल मत दिलेले आहे. पण प्रयोबेलने केलेल्या त्याच्या वर्णनात ते स्पष्टपणे मांडलेले नाही. त्यामुळेच प्रत्यक्ष घटनेनंतर पन्नास वर्षांनी लिहिलेल्या वैयक्तिक आठवणी, यापलिकडे त्याला अधिक महत्त्व देता येण्यासारखे नाही (२८, I, ६० ff).

प्रयोबेलने आपल्या टीकेने अनेकांचे लक्ष वेधून घेतले, तिचा रिटरच्या भूगोलविषयक मतांवर अथवा समकालीन तज्ञांच्या मनांवर झालेला नक्त परिणाम शून्यच होता. प्रयोबलच्या टीकेत सत्याचा कितीही अंश असला, तरी ती नजरेआड राहिली ; याचे मुख्य कारण असे, की ती रिटरच्या कार्याच्या अगदी मर्यादित अभ्यासावर आधारलेली होती. त्यामुळेच गोळी एका बाजूला आणि नेम दुसऱ्या बाजूला असा प्रकार घडला. याच्याबरोबर विरुद्ध प्रकार ब्यूशरच्या टीकेबाबत घडला ; कारण रिटरच्या ग्रंथाच्या काळजीपूर्वक अभ्यासावर ती टीका आधारलेली होती (c/o मार्थे २५, २९ f : बर्गहाऊसने काहीशा खोचकपणे प्रयोबलचे लक्ष तिकडे वेधलेले असूनही ब्यूशरच्या टीकेची दखल आपल्या नंतरच्या लेखात प्रयोबलने घेतलेली नाही).

प्रयोबेलच्या टीकेचा रोख रिटरच्या " दृष्टिकोणावर " व " प्रतिपादन पद्धतीवर " होता. तरीही त्याच्या विवेचनात रिटरच्या पद्धतितंत्रविषयक निबंधांची दखलच घेतली गेली नाही, आणि ती त्या वेळेपर्यंत प्रसिद्ध झालेल्या Erdkunde या ग्रंथाच्या दोन खंडापुरतीच मर्यादित राहिली. पहिल्या खंडाच्या प्रस्तावनेतील काही वाक्यांच्या (आणि त्यातील काही बाबतीत तर त्याचा गैरसमजच झालेला होता) आधारावर त्याने एकूण ग्रंथाच्या मूल्याबाबत काही क्रान्तिक निष्कर्ष काढले. या पूर्वीच म्हटल्याप्रमाणे, एकाच बाबतीत, आणि तेही एकेक वाक्य त्यांच्या मूळ संदर्भापासून वेगळे काढून पाहिल्यावरच, त्याची टीका समर्थनीय ठरते. रिटरने वापरलेल्या " तुलनात्मक " या शब्दाबाबत प्रयोबेलने केलेली चर्चा, आणि रिटरने त्या टीकेला दिलेले प्रत्युत्तर, या दोहोंतूनही त्या प्रश्नाचा उलगडा होत नाही. कारण प्लेवी म्हणतो त्याप्रमाणे, प्रत्येक पक्ष दुसरा काय म्हणतो ते विचारात घेता, दुसऱ्याच गृहीतगोष्टींपासून प्रारंभ करत राहिला (८, ३८). रिटरला अचूक शब्दांची निवड करण्याची सवय नसल्याने, भूगोलतज्ञांच्या मनाला आधीपासूनच छेडणाऱ्या एका प्रश्नात आणखी गोंधळाची भर पडली, यात संशय नाही. या प्रश्नावर नंतरच्या अनेक अभ्यासकांतही लठ्ठालठ्ठी होत राहिली. या एकूण प्रश्नावरील सर्वस्पर्शी आणि उद्‌बोधक चर्चा प्लेवीने आपल्या " तौलनिक भूगोल या संकल्पनेची चिकित्सा " (Untersuchungen aber den Begriff ' vergleichenden ' Erdkunde) या ग्रंथात केली आहे (८).

येथे विचारासाठी घेतलेल्या प्रश्नाबाबत–म्हणजेच क्रमबद्ध अभ्यासांचे प्रादेशिक भूगोलाशी असलेल्या संबंधाबाबत–रिटरने केलेल्या तात्त्विक विधानांत उघडपणे विवाद्य असे मुद्दे आहेत. ज्यांनी क्रमबद्ध अभ्यासात विशेष प्राविण्य संपादन केलेले होते, आणि, तरीही, ज्यांना परस्परसंबंध असलेल्या कारकांतून एक प्रादेशिक आकृतिबंध तयार करण्याची कल्पनाही सुचलेली नव्हती, त्यांच्याविरुद्ध प्रतिक्रिया म्हणून, परस्पर संबंधित घटनांनी भरलेल्या क्षेत्रांचा प्रथम अभ्यास करण्याचे आवाहन रिटरने केले. असा सर्व जगाचा क्षेत्रीय अभ्यास पूर्ण झाला, म्हणजे क्रमबद्ध भूगोलाच्या सामान्य तत्त्वांचा यशस्वी विकास करण्यास आवश्यक असलेली सामग्री आयतीच हाताशी येईल, असे त्याने ठामपणे सांगितले (४९, I, ७५). या पद्धतितंत्रविषयक तत्त्वावर आपला विश्वास असल्याचे रिटरने, आपल्या नंतरच्या अनेक लेखांतून विशेषतः आपल्या १८३३ मधील निबंधांतून आग्रहपूर्वक प्रतिपादन केले आहे (५०, १८१).

हीच प्रमेयरूपात सांगितलेली तत्त्वे रिटरच्या ' भूगोलाची ' (Erdkunde) पायाभूत तत्त्वे असावीत असे गृहीत धरताना, त्याच्या टीकाकारांनी त्याच्या अन्य विधानांकडे जाणीवपूर्वक काणाडोळा तरी केलेला असावा किंवा त्याबाबत ते अज्ञानात तरी असावेत. सत्यस्थिती अशी आहे, की आपल्या पद्धतितंत्रविषयक चर्चेत, व अन्य ठिकाणीही, त्याने याच्या विरुद्धपद्धतीची आवश्यकता प्रतिपादलेली आहे. आणि प्रत्यक्ष परिपाठात तर, बऱ्याच प्रमाणात त्याने तिचा अवलंबही केला आहे. यूरोपच्या प्रमुख रूपधेयांचा त्याने आधीच अभ्यास केलेला होता ; आणि यापूर्वी आम्ही या गोष्टीचा उल्लेख केलेला आहे. ब्यूशरने तर क्रमबद्ध अभ्यासाचा नमुना आणि सामान्य भूगोलाची मार्गदर्शिका म्हणूनच त्याचा उल्लेख केलेला आहे. हा नंतरचा भाग जरी कधीच प्रकाशित झालेला नसला तरी, त्यातील अनेक विभाग अनेक पाठ्यपुस्तकांतून घेण्यात आले होते ; काही ठिकाणी तर मूळ लेखकाचा नामनिर्देशही केलेला होता. तसेच Erdkunde च्या प्रस्तावनेत वेगवेगळ्या रूपधेयांच्या प्रकारांची क्रमबंधात्मक चर्चा सुमारे पन्नास पानांत केलेली आहे. फ्रयोबेलच्या टीकेला प्रत्युत्तर देताना, रिटरला या दोन गोष्टीकडे बोट दाखविता आले असते. फ्रयोबलने या लिखाणाकडे दुर्लक्ष केलेले असले, तरी आपल्याला भौगोलिक लिखाणात वापरता येतील अशा सर्वसामान्य संकल्पना व तत्त्वे हंबोल्ट प्रमाणेच अन्य काही लेखकांना रिटरच्या या लिखाणात आढळली होती–आणि ही गोष्ट तपशीलवार संदर्भासह रिटरने दाखवून दिली होती (५५, १११). नंतरच्या रिटर लिखित खंडातून किमान चोवीस क्रमबद्ध अभ्यास मार्थेने मोजलेले होते. त्यातले काही तर प्रत्येकी शंभर पानांचे आहेत, आणि त्यात विशेषेकरून खनिजे व शेतीच्या वनस्पती यांचा विचार केलेला आहे. काही बाबतीत तर पुढच्या ग्रंथखंडातून येणाऱ्या काही अभ्यासांचा संदर्भ रिटरने दिला आहे–ते खंड मात्र कधीच प्रकाशित झाले नाहीत.*

---

* पुरवणी टीप क्र. ७ पहा.

याशिवाय शास्त्राभ्यासक संस्थेपुढें (Academy of Sciences) १८२६ व १८२८ मध्ये वाचलेल्या त्याच्या निबंधांत क्रमबद्ध अभ्यासांच्या पद्धतितंत्रविषयक चर्चेचाही अंतर्भाव आहे (५०, १०३-२८ आणि १२९-५१). उदाहरणार्थ घटनांच्या विविध प्रकारांनी व्यापलेल्या क्षेत्रांच्या भौमितिक स्वरूपांच्या अभ्यासांसंबंधी चर्चा आली आहे. ही चर्चा म्हणजे " आकृतिबंधांच्या " अभ्यासाचे सुरुवातीच्या काळातील एक उदाहरण आहे. शेवटी तर, तत्पूर्वीच्या दशकात त्याने स्वतः दिलेल्या सामान्य (क्रमबद्ध) भूगोलावरील व्याख्यानांचा निर्देश करणे त्याला शक्य झाले. कारण ही व्याख्याने गेल्या दशकात त्याच्या शेकडो विद्यार्थ्यांनी ऐकलेली होती. ती जरी त्याने स्वतः प्रकाशित केली नसली, तरी बर्गहाऊजच्या ' भूवर्णनाची मूलतत्त्वे ' (Elementen der Erdbeschreibung) या ग्रंथाच्या रूपाने थोडया बदललेल्या स्वरूपात तीच व्याख्याने लोकांच्या पुढे आलेली होती. आणि याच पुस्तकाची प्रयोबलने ' भूगोलक्षेत्रातील अभ्यासकाने काय केले पाहिजे याचा उत्तम नमुना ' या शब्दांत स्तुती केलेली होती (५४, ५००, ५०५). Annalen (वार्षिक घटनांची नोंद) या नियतकालिकाचा संपादक या नात्याने स्वतः बर्गहाऊजनेच वरील विधानाची दोन ठिकाणी तळटीपा देऊन मोठ्या जोरदार शब्दात खातरजमा केली आहे ; आणि त्याच ठिकाणी त्याच्या ' मूलतत्त्वांच्या ' (Elementen च्या) कोणत्याही वाचकास हे सत्य अगदी स्वच्छ दिसणारे आहे, असे सुचविण्यासही तो विसरला नाही (५१३, ५१६).[२२] रिटरच्या लक्षातही आला नसेल इतका हा सर्व प्रकार हास्यास्पद होता. पुढच्याच वर्षी ' आशिया ' च्या पहिल्या खंडाच्या प्रस्तावनेत हेच विधान उद्धृत करून बर्गहाऊजने केलेले विषयांतर्गत संघटन हा जरी आपल्या (रिटरच्या) व्याख्यानांचा परिणाम असला, तरी प्राथमिक अभ्यासकाच्या दृष्टीने प्रतिपादनाच्या रीतीत बरीच सुधारणा करण्याचे श्रेय बर्गहाऊजलाच दिले पाहिजे, असे विधान रिटरने केलेले आहे (४९, II, XV, आणि २० f). पण, ल्यूद या टीकाकाराला मूळ प्रतीशी तुलना केल्यावर असे स्पष्ट दिसून आले की, बर्गहाऊजने रिटरच्या व्याख्यानमालेचा उतारा जसाच्या तसा घेतला होता आणि काही पानांवर तर शब्दन् शब्द लिहून घेतलेला होता (प्लेवी ८, ५९).

---

२२. रिटरच्या बचावासाठी लायलीने केलेल्या प्रतिपादनात या पुराव्यांच्या यादीचा संदर्भ एकाच ठिकाणी पुढे दिलेल्या वाक्यात आला आहे. " उत्तरादाखल त्याने, म्हणजे रिटरने, प्रयोबलला अभिप्रेत असलेली विश्लेषण पद्धती आपल्या व्याख्यानांतून आपण पूर्वीपासून अवलंबत आलो आहे, याची आठवण त्याने प्रयोबलला करून दिली " (२१२, २४५). पण, या ' अप्रकाशित व्याख्यानांचा ' प्रभाव रिटरच्या नंतरच्या कालावर फारच थोडा पडलेला दिसतो, हा पुढे लायलीने केलेला उल्लेख चुकीचा आहे (२४८). ही व्याख्याने " सामान्य भूगोल " (Algemeine Erdkunde) या नावाने एका खंडात प्रसिद्ध झाली. या ग्रंथाचा जर्मन साहित्यात वारंवार संदर्भ दिला जातो (६१).

स्वतः तरुण असताना रिटरने आपल्यापेक्षा वडीलधाऱ्या माणसांवर टीका करण्याचा आव आणला, याबद्दल एका समीक्षकाने त्याच्यावर कडक शब्दात ताशेरे झाडले होते. वास्तविक, रिटरच्या या लेखात टीकेबरोबरच विधायक सामग्रीही सादर केलेली होती. त्याच रिटरने प्रयोबेल संबंधी वैयक्तिक प्रतिटीका करताना, त्याने अत्यंत सभ्यपणे, पण तितक्याच खोचकपणे सुचविले, की कोणाच्याही कार्यासंबंधी क्रान्तिक निर्णय देण्यापूर्वी त्याच्या कार्याचा पुरेसा परिचय करून घेणे आवश्यक असते (५५, ५२०). प्रयोबलची टीका अप्रगल्भ होती व ती चुकीच्या माहितीवर आधारलेली होती. त्यामुळेच ' त्यात काही सत्याचाही भाग आहे ' ही गोष्ट रिटरच्या समकालीन अभ्यासकांच्या नजरेतून सुटली याचे नवल वाटत नाही. उलटपक्षी, प्रयोबलने ज्या पद्धतीवर टीकास्त्र उगारले त्याच पद्धतितंत्राचा अवलंब पुष्कळांनी केलेला दिसतो. संपूर्ण क्षेत्राचा विचार करणाऱ्या पद्धतितंत्रावर रिटरने सतत दिलेला भर, तसेच एकाबाजूला Erdkunde चे एकोणीस खंड तर दुसऱ्या बाजूला त्याच्या नावावर प्रसिद्ध झालेले किरकोळ क्रमबद्ध अभ्यास या दोहोंतील संख्यात्मक विरोध या गोष्टींमुळे त्याच्या अनुयायांच्या मनावर त्याच्या पद्धतीचे एक खास चित्र ठसविले गेले होते, ही गोष्ट निर्विवाद आहे. एक रेक्लसचे लक्षणीय उदाहरण वगळले तर, रिटरने केलेल्या क्रमबद्ध अभ्यासात भर घालण्याचा प्रयत्न त्याच्या अनुयायांनी फारच थोडा केला. आणि आपल्या प्रादेशिक अभ्यासांतही आधीपासून उपलब्ध असलेल्या क्रमबद्ध सामग्रीचा उपयोग या अनुयायांनी रिटरपेक्षाही कमी केला. एकंदरीने रिटरच्या अनुयायांनी केलेले कार्य फारच थोड्या मोलाचे ठरले, ही वस्तुस्थितीच प्रयोबलने Erdkunde विरुद्ध केलेल्या युक्तिवादाच्या सत्यतेचे प्रात्यक्षिक आहे. " आधीच्या भागात क्रमबद्ध अभ्यास केलेले नसल्यामुळे या ग्रंथाला शास्त्रीय मूल्य प्राप्त होऊ शकले नाही " हा प्रयोबलने Erdkunde विरुद्ध मांडलेला मुद्दा कितीही अतिशयोक्तीचा वाटला तरी अखेर खरा ठरला, असेच म्हणावे लागेल. पुढे कित्येक दशके जर्मनीतील व विशेषतः रशियातील प्रवासी शास्त्रज्ञ व भूगोलज्ञ यांना रिटरचा ग्रंथ म्हणजे " आशिया संबंधीच्या वस्तुस्थितींची सारभूत नोंद आहे " असेच आढळून आले (मार्थे २५, २५). असे असूनही आधुनिक अभ्यासकांना त्यात फारच थोड्या महत्त्वाच्या गोष्टी सापडतात. इतकेच काय, त्या ग्रंथाचा उपयोग ऐतिहासिक भूगोल लिहिणाऱ्यांनाही (भूगोलाचा इतिहास लिहिणाऱ्यांना नव्हे) होत नाही. उलटपक्षी, यापूर्वीच अभ्यासकांना प्रथम जगाचा क्रमबद्ध भूगोल पुरवावयाचा, हा आपला आधीचा प्रयत्न असफल झाला होता असे बुशचे मत झाल्याचे रिटरला आढळून आले होते म्हणून या ग्रंथाच्या . . . . . इ. सापेक्ष यशापयशावरून, क्रमबद्ध भूगोल व प्रादेशिक भूगोल यांच्या अभ्यासाचा योग्य क्रम कोणता याविषयी स्पष्ट निष्कर्ष काढण्यास मदत होत नाही (C/o मार्थे २५, २३).

हंबोल्टचा दृष्टिकोन यापेक्षा अनेक बाबतीत वेगळा होता, ही गोष्ट निःसंशय आहे. भूगोल हे एक स्वतंत्र साध्य आहे, असे म्हणणे रिटरप्रमाणेच त्यालाही मान्य नव्हते. एकूण विश्वाची एकात्मता प्रस्थापित करण्याच्या दृष्टीने कोणत्याही क्षेत्रातील परस्परसंबंधांच्या संदर्भात विशिष्ट प्रकारच्या घटनांचा क्रमबद्ध अभ्यास करणे हे, स्वतंत्र क्षेत्रांचा संपूर्ण अभ्यास करण्यापेक्षा, अधिक महत्त्वाचे आहे असे, निदान त्यावेळीतरी, त्याला दिसून आले (६०, I, ६५, ४७, I, २). त्याने दोनही प्रकारचे अनेक अभ्यास केलेले असले तरीही, ' कॉस्मास ' या ग्रंथातील प्राकृतिक भूगोल पूर्ण करण्याचा त्याचा प्रयत्न होता. म्हणजेच या दोन हेतूंपैकी क्रमबद्धअभ्यास हा हेतूच अधिक महत्त्वाचा असल्याचे त्याचे आधीचे विधान या प्रयत्नाने त्याने प्रत्यक्ष सिद्ध केले. मात्र, त्या सुप्रसिद्ध अवतरणाचा संदर्भ घेताना, त्याला ' प्राकृतिक भूवर्णन ' (' Physische Erdbeschreibung ') या शब्दप्रयोगाचा कोणता अर्थ अभिप्रेत होता हे नीट समजून घेणे आवश्यक आहे. कारण ' जगाचे भौतिकज्ञान ' या व अशा पुष्कळशा शब्दांचा प्रयोग करूनच, शेवटी हा शब्दप्रयोग त्याने मान्य केलेला होता. त्या त्या अभ्यासकाच्या मानसिक जगाच्या बाहेरच्या जगातील सर्व पार्थिव घटना त्याच्या या संज्ञेच्या कक्षेत समाविष्ट झालेल्या होत्या, हे आपण यापूर्वीच पाहिले आहे. मनुष्य व त्याची संस्कृती या घटनांप्रमाणेच सेंद्रिय व निरींद्रिय घटनांही त्यात येतात. वनस्पतिशास्त्र व प्राणिशास्त्राचे काही विभाग यांबाबत त्याच्या मनांत भावपूर्ण प्रेम असूनही प्रत्यक्ष त्या त्या स्वतंत्र घटनांच्या प्रकारांविषयी त्याला मूलतः कोणतीच अभिरुची नव्हती. पण, विविधप्रकारांच्या घटनांच्या परस्पर संबंधांबाबत त्याला विशेष अभिरुची होती. उदाहरणार्थ वनस्पतींच्या विविध प्रकारांचे परस्परांशी असलेले संबंध, हवामान, भूस्वरूपे शेतजमीन यांच्या भिन्न प्रकारांशी त्यांचे संबंध, प्राणिजीवनाशी व मानवीजीवनाशी त्यांचे संबंध, इत्यादि. सृष्टीतील वस्तुजातांचे त्यांच्या अंगभूत लक्षणविशेषांच्या भाषेत त्यांचे वर्गीकरण करणे शक्य आहे. शिवाय या विविधप्रकारच्या वस्तुजातांची मांडणी, वितरण, व परस्परसंबंध याबाबतही त्यांचे काही प्रकार पडत असल्याचे प्रत्ययास येते. म्हणूनच, " अशाप्रकारांचे स्वरूप, त्यांच्या संबंधयोगांचे नियम, आणि अचेतन सृष्टीशी जीवसृष्टीला जखडून टाकणारी शाश्वत बंधने निश्चित करणे हीच प्राकृतिक भूगोलातील मोठी समस्या आहे." (४७, I, २ ते ६ ; अवतरण सहाव्यापानावरून : ४४, २ ff, ३३ ते ३६). अमेरिकेला जावयास निघण्याच्या दिवशी लिहिलेल्या एका पत्रात त्याने उल्लेख केलेल्या आपल्या ध्येयरूप तत्त्वांना तो आपल्या संपूर्ण भौगोलिक कार्यात प्रामाणिकपणे जागला. " विविध निसर्गशक्तींचे परस्पर संबंध आणि अचेतन सृष्टीचे सचेतन व वनस्पतिसृष्टींशी असलेले संबंध यांच्यांतील सुसंगतीवर माझे लक्ष नित्य रोखलेले राहील." (८१, ६०५ ते ६०७ : रिव्टहोफेनने उद्धृत केले त्यावरून). कॉसमॉसच्या पहिल्या खंडात हंबोल्टने प्राकृतिक भूगोलाचे वर्णन अधिक स्पष्टपणे केले आहे ; " जे जे क्षेत्रीय दृष्ट्या एकत्र असते " त्या सर्वाचा अभ्यास म्हणजेच प्राकृतिक भूगोल होय. ज्यांच्या साहचर्यामुळे एक नैसर्गिक पूर्णरूप निर्माण होते अशा इतर सर्व घटनांशी असलेल्या परस्पर संबंधरूपाने क्षेत्राक्षेत्रांतून मांडल्या गेलेल्या विविध घटना हाच त्याचा अभ्यास विषय असतो (६०, I, ४९ ते ७२ ; अवतरण ५० पानावरून ; C/o २०, I, २७४ ; २२, १२९ ff).

अन्यशास्त्रांच्या आकृतिबंधांच्या अनुकरणाने भूगोलाची रचना करण्याचा जे प्रयत्न करत असत त्याना विरोध करून, निसर्गाच्या अभ्यासाशी संबंधित असलेल्या इतर सर्व शास्त्रांपेक्षा भूगोलाचा दृष्टिकोण वेगळाच आहे, असे हंबोल्ट प्रतिपादन करत असे. सर्व स्वतंत्र निसर्गशास्त्रे–पार्थिव घटनांशी संबंधित असणारी पदार्थ विषयक शास्त्रे व जीवविषयक शास्त्रे अशा नावांनी ज्यांना आपण ओळखतो ती सर्व शास्त्रे–" वेगवेगळे प्राणी, वनस्पती, जडवस्तू, किंवा अश्मावशेष यांचा त्या त्या वस्तूंचे स्वरूप, रचना व प्रक्रिया एतद्विषयक अभ्यास करतात ", आणि त्यांच्यातील आंतरिक साम्य लक्षात घेऊन त्यांची जाती व कुले अशी मांडणी करतात. उलट, भूगोलात हे सर्व पदार्थ जसे एकत्र अस्तित्वात असतात तसेच आणि एकाच क्षेत्रात त्यांचे कार्यकारण भावाने संबंध आलेले असतात त्यात्र अवस्थेत, त्यांचा विचार करण्यात येतो. पदार्थ शास्त्रात अथवा वनस्पतिशास्त्रात " निसर्गातील पदार्थांचे त्यांच्या प्रकारानुरूप त्यांचे विभाग पाडलेले असतात. " या उलट सर्व पदार्थांकडे एक नैसर्गिक पूर्णरूप या दृष्टीने भूगोल पहात असतो, कारण त्यांचा क्षेत्रीय संबंध अंशतः पृथ्वी या वस्तूशी व अंशतः जगाशी आलेला असतो. जगाच्या वर्णनात (Welterbeschreibung हा शब्द कांटकडून घेतलेला आहे) " सृष्टिमात्राचा म्हणजेच त्या क्षेत्रात असलेल्या सर्वांचा (त्यात वास्तवातील सर्व पदार्थ व शक्ती आल्याच) एकसमयावच्छेदेकरून अस्तित्वात असलेला ' सृष्टवस्तुसंघ ' (Natur ganzen) या स्वरूपात अभ्यास " करावयाचा असतो. शेवटी, पृथ्वीचा अभ्यास करणारा जो तिसरा दृष्टिकोन आहे त्याच्याशी भूगोलाचा निकटचा संबंध असतो. हा तिसरा दृष्टिकोन म्हणजेच, सर्वच घटनांत कालक्रमानुसार होत जाणाऱ्या बदलाशी संबंधित असा ऐतिहासिक दृष्टिकोण होय (४२, ५२, १४, ६०, I, ४९ ff).

अशाच प्रकारची भूगोल व इतिहास यांची तुलना करणारी विधाने रिटरच्या लिखाणांतूनही सापडू शकतील. त्यात त्याच्या–१८०४ मधील पहिल्या प्रकाशनाचाही अंतर्भाव करण्यास हरकत नाही. इतिहासासाठी गुणितसंख्येने उपस्थित असलेल्या ऐतिहासिक वस्तुस्थितींचा क्रम लावण्यासाठी पुरविलेली चौकट कालक्रमबंधाची असते, पण भूगोलासाठी पुरवलेला सांगाडा क्षेत्रात्मक (Raum) असतो. विविधप्रकारच्या घटना एकसंघपणे मांडण्याचा दोनही शास्त्रांचा प्रयत्न असला तरी प्रत्येकाचा प्रयत्न त्या घटना आपापल्या चौकटीत बसविण्याचा असतो (२४, I, २५० f ; ५०, १५२ f). या कल्पनांची उसनवारी रिटरने हंबोल्टकडून किती प्रमाणात केली हे आपण सांगू शकत नाही. कांटने अशाच प्रकारच्या कल्पना आपल्या प्राकृति भूगोलासंबंधीच्या व्याख्यानात बोलून दाखविल्या होत्या. पण ती व्याख्याने १८०१-१८०२ पर्यंत प्रकाशित झालेली नव्हती. त्यामुळे त्या दोघांपैकी प्रत्येकजण कांटवर किती अवलंबून होता हेही आम्ही सांगू शकत नाही. (हंबोल्टने आपल्या १८२७-२८ च्या व्याख्यानमालेत कांटचा उल्लेख केलेला दिसतो. पण त्याने स्वतःच्या भूगोलविषयक संकल्पनेचे विधान प्रथम १७९३ मध्ये प्रकाशित केलेले होते व नंतरचे सर्व पाठभेद त्या आवृत्तीवरच आधारलेले होते (४२).

म्हणून हंबोल्टच्या समजुतीप्रमाणे विजातीयता हे भूगोलाचे एक अटळ लक्षण आहे. उलटपक्षी, एक प्रामुख्याने प्रयोगशील शास्त्रज्ञ (याचा अर्थ तो शास्त्रज्ञ शास्त्राचा उपयोग प्रत्यक्ष व्यवहारात करत होता असा करू नये) या नात्याने त्याने एक गोष्ट ओळखली होती, ती अशी :-परस्परांच्या संबंधात असलेल्या गोष्टींच्या संचयाचा ज्यात समावेश होतो असे एक पूर्णरूप समजून घेण्यासाठी, त्यातील निदान काही गोष्टींचे त्यातीलच काही गोष्टींशी असणारे संबंध आधी समजून घेणे अगत्याचे आहे. या संकल्पनेमुळेच त्याच्या क्रमबद्ध भूगोलातील अभ्यासांचे लक्ष त्या क्षेत्रातील अन्य सर्व घटनांच्या संबंधात असलेल्या विशेषप्रकाराच्या घटनांवर–विशेषेकरून वनस्पतींवर–केंद्रित झालेले असे. " प्रत्यक्ष वनस्पति–शास्त्रात वनस्पतींचे स्वरूप, त्यांची सेंद्रिय घडण, आणि त्यांचे इतर वनस्पतींशी संबंध यांचा विचार होत असतो ; तर, वनस्पतींच्या भूगोलात वर्णनात्मक वनस्पतिशास्त्र हे त्याच्या हवामान शास्त्राशी असलेल्या संबंधापुरतेच मर्यादित असते. " वनस्पती भूगोलाचा विकास होण्यासाठी, समुद्रसपाटीपासून उंची व तपमान यांचे मापन करण्याची साधने व वनस्पतिविषयक ज्ञान यांच्या संयोगाची आवश्यकता आहे. अर्थातच, पदार्थशास्त्रज्ञांच्या पद्धती आणि वनस्पतिशास्त्रज्ञांच्या पद्धती यांचा संयोग करण्याचे तंत्र सिद्ध होईपर्यंत हा विकास लांबणीवर पडला, म्हणूनच, वनस्पतिभूगोलात व प्राणिभूगोलात आम्ही वनस्पती व प्राणी यांच्या संबंधाने विशेष काही न सांगता, वनस्पती व प्राणी यांनी व्यापलेल्या भूपृष्ठासंबंधी विशेष माहिती सांगत असतो. (५२, १६८ ते १७१ : तसेच C/o १९, I, ६४, ७४).

दुसऱ्या शब्दात सांगावयाचे झाले तर, हंबोल्टने एक गोष्ट ओळखली होती, की भूगोल क्षेत्रातील क्रमबद्ध अभ्यास कोणत्यातरी एकाच वस्तुप्रकारावर केंद्रित झालेला असला पाहिजे असे मानले तरी तो अभ्यास कोणत्याच अर्थाने त्या प्रकारापुरता मर्यादित राहू शकत नाही ; कारण त्याप्रकारच्या वस्तूंचा विचार अन्य भौगोलिक घटनांशी असलेल्या त्यांच्या संबंधयोगांच्या संदर्भात व्हावयाचा असतो. म्हणूनच, प्रत्येक क्षेत्र दुसऱ्यापासून विभक्त राहील अशा रीतीने तयार केलेल्या अतिविवक्षित ज्ञानक्षेत्रांची यादी केल्याने त्याच्या प्राकृतिक भूगोलाची संपूर्ण विभागणी करणे शक्य झाले नसते. कारण प्रत्येक विभागात एक रूपधेयसंचच अवधानकेंद्र मानलेला असला, तरी त्याचे संबंध अन्य रूपधेयसंचाशी पोहोचत असल्याने त्याचे कार्य अन्य सर्वच विभागात पोहोचलेले असते. हे संबंध योग, ऐतिहासिक कालक्रमांवर न आधारता त्यांच्या क्षेत्रीय स्थानांवर आधारलेले असल्यामुळे या सर्व अभ्यासांचे एकीकरण करण्यासाठी वापरावयाचे पायाभूत तत्त्व भूवंटनात्मक असणे आवश्यक आहे. (C/o ड्योरिंग २२, ५१ ते ५९).

तो ज्यांना भूगोल असे नाव देतो त्या सर्व अभ्यासांत हा भूवंटनात्मक दृष्टिकोण हंबोल्टने सातत्याने व आग्रहपूर्वक राखलेला आहे. त्याने बर्गहाऊजच्या मदतीने आखलेल्या एका पाठ्यपुस्तकात (हे पाठ्यपुस्तक इंग्रज अधिकाऱ्यांच्या विनंतीवरून तयार केलेले असून, ते भारतीय शाळांतून वापरण्यासाठी होते), वनस्पतिशास्त्र अथवा प्राणिशास्त्र यावरील पाठ्यपुस्तकांतून घालण्यासारखी कोणतीही सामग्री घालण्यास त्याने नकार दिला. " प्राकृतिक भूगोलावरील ग्रंथाशी त्या सेंद्रियवस्तूंच्या ऊर्जा व सामग्री अथवा त्यांचे शरीरकार्य यापैकी कशाशीही संबंध येता कामा नये. त्या सर्व गोष्टींचे पूर्वज्ञान तेथे गृहीत धरलेच पाहिजे. " (बर्गहाऊजने उद्धृत केल्यावरून १९, III, ९४).

म्हणून, क्रमबद्ध भूगोलाच्या विकासात हंबोल्टने टाकलेली भर त्याने लिहिलेल्या ग्रंथाच्या मूल्यात तर सापडणार आहेच, पण त्याबरोबरच, भौगोलिक क्षेत्रातील क्रमबद्ध, पण भूवंटनात्मक, अभ्यास व अन्य विशिष्ट शास्त्रांतील क्रमबद्ध अभ्यास या दोहोंतील भेदांचे स्पष्ट चित्र त्याने उभे केले, या वस्तुस्थितीतही ती भर आढळणार आहे. काही काळपर्यंत त्याला वनस्पतिशास्त्र, भूशास्त्र अशा काही विशेष शास्त्रांतील एक महत्त्वपूर्ण व्यक्ती म्हणून मान मिळाला होता ; पण, तो केवळ त्याच्या कार्याचा अर्थ चुकीचा लावला गेल्यामुळे मिळाला होता, ही गोष्ट त्याने स्वतःच स्पष्ट केली आहे. तसे पाहिले तर, नंतरच्या काळातील त्या शास्त्रांतील तज्ञांचा त्यांच्या शास्त्रांत विशेष महत्त्वाचे म्हणता येईल असे कार्य हंबोल्टने केलेले नाही हा निर्णय म्हणजे हंबोल्टच्या त्या ग्रंथाच्या उद्दिष्टांचा केवळ प्रतिध्वनी होता (पिशेल ६६, I, ३१०). स्वतंत्र क्षेत्रातील क्रमबद्ध अभ्यासांवर भर देण्याऐवजी, हंबोल्ट आपल्या ग्रंथात बव्हंशी भूवंटनात्मक दृष्टिकोणालाच चिकटून राहिला. या वस्तुस्थितीमुळेच क्रमबद्ध भूगोलातील अनेक शास्त्रांचा, विशेषेकरून हवामानशास्त्र आणि वनस्पति-भूगोल यांचा पाया तो घालू शकला (पिशेल ६६, I, ३१६, f, ३२८ ff, ग्रीजबाक २०, III ; २३२ ते २६८ ; हेटनर २, ३०६ ; १६१, ८५ f).

या उलट, क्रमबद्ध भूगोलातील भूवंटनात्मक अभ्यासापुरतेच–म्हणजे हंबोल्ट ज्याला " प्राकृतिक भूगोल " असे नाव देतो त्याच्या पुरतेच-एकूण भूगोल क्षेत्र मर्यादित आहे असे त्याचे मत होते, असे समजणे म्हणजे त्याच्या भूगोलक्षेत्रविषयक संकल्पनेचा पूर्णपणे विपर्यास करण्यासारखे आहे. त्याचे स्वतःचे लिखाण त्याने स्वतःच केलेल्या क्षेत्रीय निरीक्षणांवर आधारलेले होते ; आणि ते त्याने शास्त्रज्ञ व प्रवासी अशा दोनही प्रकारच्या अनेकानेक लेखकांच्या निरीक्षणांच्या आधारे समृद्ध केलेले होते. म्हणूनच, जगाचा प्रादेशिक भूगोल, किंवा एखाद्या खंडाचा प्रादेशिक भूगोल स्वतः लिहला नसला, तरीही क्रमबद्ध भूगोलाच्या संगतीनेच अशाप्रकारचे प्रादेशिक अभ्यास लिहिले जाण्याची आवश्यकता त्याने मान्य केलेली होती ; ही गोष्ट १८४८ मध्ये त्याने भारतात वापरण्यासाठी आखलेल्या भूगोलाच्या पाठ्यपुस्तकांच्या आराखड्यावरून सिद्ध होते ; कारण, त्यात या पाठ्यपुस्तकांतील " विशेष भूगोल : प्रदेशवर्णन " (Specialle Geographische : Länder—beschreibung) हा त्या पुस्तकाचा दुसरा भाग " प्राकृतिक भूवर्णन " (Physicallische Erdbeschreibung) या पहिल्या भागाशी सुसंगत होता. (१९, III, ५५–६१).[२३] हाच दृष्टिकोण

२३. सदरच्या आराखड्याच्या बऱ्याच पोटभागांचे तपशील हंबोल्टने स्वतःच तयार केलेले होते. उरलेल्या पोटभागांचे तपशील व संपूर्ण दुसऱ्या भागाची रूपरेखा तयार करण्याचे काम त्याने बर्गहाऊसवर सोपविलेले होते, हे उघड आहे. इंग्रजांच्या ज्या मंडळीने त्याला हे काम करण्याची विनंती केली होती, व ते हिंदीत भाषांतरित करण्याचाही ज्यांचा मनोदय होता, त्या मंडळींनी ती सर्वच योजना नंतर रद्द केली. त्यामुळे हे पुस्तक कधीच पूर्ण झाले नाही. (१९, III, ३४ ते २०४ Passim).

व्हेरे-नियसच्या भूगोलाच्या आराखड्याच्या हंबोल्टने केलेल्या चर्चेत त्याने सूचित केलेला आहे. (६०, I, ६० ; ५२, १४ व २६). तसाच तो त्याने त्याचा " थोर व सुविख्यात " मित्र रिटर याच्या ग्रंथासंबंधी दिलेल्या अनेक संदर्भांवरून स्पष्ट झाला आहे. या दृष्टीने पहाता, ज्यांच्यातील परस्पर संबंधित घटनांचा त्याने साकल्याने विचार केलेला आहे अशी वेगवेगळ्या प्रदेशांची त्याने केलेली असंख्य स्पष्टीकरणात्मक वर्णने अधिक बोलकी आहेत.

हंबोल्टने केलेले अशाप्रकारचे पुष्कळसे प्रादेशिक अभ्यास त्याच्या प्रवास वृत्तान्तांत जागोजाग विखुरलेले आहेत (४७). दुसरे काही त्याच्या Ansichten der Natur (निसर्गदृश्ये) या ग्रंथात आढळतील (४५ : विशेष उल्लेखनीय म्हणजे Das Hochland Von Coxamarca (कोक्सामार्काचे पठार) ३११ ते ३३४.) अशा प्रादेशिक वर्णनांचा एक उत्कृष्ट संग्रह हंबोल्टच्या विविध लेखनांतून निवडलेल्या लेखांच्या एका खंडात प्रसिद्ध झालेला आहे (४८). हंबोल्ट अशा वर्णनांचे महत्त्व क्रमबद्ध अभ्यासांच्या तुलनेने कमी लेखत असला, तरी ते शून्य महत्त्वाचे आहेत असे त्याने कधीच मानले नाही, ही गोष्ट अशा प्रकारच्या अभ्यासांत येणाऱ्या अडचणींची आणि त्या सोडविण्याच्या त्याच्या पद्धतींची त्याने जी तपशीलवार चर्चा केलेली आहे, त्यावरून दिसून येणारी आहे (४५, X f ; ४७, I, १३७ ff : आणि विशेषत : ' कॉसमॉस ' मधील Anregungs mittel zum Natur Studien (निसर्गाभ्यासासाठी प्रोत्साहन) हा भाग ६०, II, १ ते १३४).

हंबोल्टच्या मते " प्रत्येक हवामान-निष्ठ विभागाची केवळ स्वतःची अशी एक विशिष्ट नैसर्गिक रूपाकृती असते. तसेच प्रत्येक वनस्पतिनिष्ठ विभागाचे ; त्याच्या विशेष उपयुक्तते व्यतिरिक्त एक विशिष्ट (निश्चित) स्वरूप असते. " जगाच्या निरनिराळ्या प्रदेशांच्या त्या त्या स्वाभाविक स्वरूपांचे आकलन करून घेणे हा त्याचा हेतू होता ; कारण, त्यांचा " मानववंशाच्या इतिहासाशी, आणि त्यांच्या संस्कृतीच्या इतिहासांशी-ही, अति निकटसंबंध असतो. " (४३, ११ ते १४ ; कॉसमॉस ६०, II, ९० ff : c/o ग्रिजबाक, २०, II २६७). मानवाला जेथे किमान महत्त्व अशा प्रदेशांचा अभ्यास करणे हंबोल्टला पसंत असले, तरी त्याचे लक्ष अमानव रूपधेयांपुरते मर्यादित नव्हते किंवा दृष्टिगोचर भूदृश्यांच्या रूपधेयांपुरतेही मर्यादित नव्हते. उदाहरणार्थ : आता व्हेनेझ्वेलाचा एक भाग असलेल्या आराया द्वीपकल्पावरील त्याच्या निरीक्षणांच्या कक्षेत खगोलविषयक व वातावरणविषयक परिस्थिती, वनस्पती व प्राणी, खारदलदली व त्यांवर अवलंबून असलेली मिठागरे, मोती काढण्याचा व्यवसाय, तेथे असणाऱ्या विविध मानववंशातील लोकांची शारीरिक लक्षणे आणि विशेषेकरून स्पेनच्या तुलनेने बदललेल्या स्वाभाविक परिस्थितीचा परिणाम दाखविणारे तिकडेच जन्मलेल्या स्पॅनिश वसाहतकारांच्या स्वरूपात आणि रूढीत पडणारे फरक या सर्वांचा समावेश झालेला होता. या परिसराची उंचपठारी प्रदेशांतील अथवा अमेरिकी संयुक्त संस्थानांतील परिसरांशी त्याने विरोधात्मक तुलना केली. तिकडे युरोपीय वसाहतकारांना युरोपमधील परिसराशी साम्य असलेले आढळले. तसेच त्याने त्यांची प्राचीन फोनिशियनांच्या व ग्रीकांच्या वसाहतींच्या स्वरूपांशीही तुलना केली (४७, I, पुस्तक २ रे, प्रकरण ४ थे).

अधिकतर शास्त्रीय म्हणून गणल्या जाणाऱ्या हंबोल्टच्या ग्रंथातही अशाप्रकारचेच विचार आढळतील. " ग्रीसच्या हवामानाचा तेथील रहिवाश्यांवर केवढा जबरदस्त प्रभाव दिसून येतो ! ऑक्सस्, टैग्रिस, एजियन् समुद्र यांच्या परिसरांतील त्या सुभग सुंदर भूभागांवर ज्यांनी वसाहती केल्या त्यांच्यांतच नैतिक औदार्य आणि संवेदनक्षम सहभावना यांची प्रथम जागृती झालेली दिसत नाही का ? आणि आमच्या पूर्वजांनी प्रथम याच सौम्य परिसरांच्या दऱ्यांतून सभ्याचाराचे धडे घेतले नाहीत का ? " प्राकृतिक जगाचा वैचारिकप्रभाव, भौतिक व अध्यात्मिक यांचे गूढ परस्पर संबंध यांमुळे उच्च पातळीवरून केलेल्या निसर्गाभ्यासाला अगदी क्वचित लक्षात भरणारी एक आगळी मोहकता प्राप्त होते. (४३, १३ f). रिटरच्या अनुयायांनी आणि विशेषतः कापने केलेल्या अशाप्रकारच्या सूचनांवर पिशेलने आक्षेप घेतला तेव्हा त्याला हंबोल्टच्या लिखाणातील अशाप्रकारच्या विधानांचा विसर पडलेला असावा. " कोणत्याही भूदृश्याचे उमटणारे ठसे आणि तेथील लोकांचे वैचारिक आविष्कार यांचा कार्यकारण संबंध असतोच " या गृहीत प्रमेयावर पिशेलच्या हल्ल्याचा विशेष रोख होता (६६, I, ४०४).

उलटपक्षी हंबोल्टने केलेल्या प्रादेशिक वर्णनांनी प्रादेशिक भूगोलात नवीन पर्व सुरू केले. त्या क्षेत्राचे चित्र साकारण्यात त्याला यश आले, इतकेच नव्हे तर, निसर्गशक्तींच्या लीलांचे वर्णन करून तो प्रदेश सचेत करण्यातही त्याला यश आले. अशारीतीने, या निरीक्षणांचा उच्चतर पातळीवरील त्या रूपाकृतीशी संबंध कसा पोहोचतो याचे प्रात्यक्षिकच त्याने दाखविले. हंबोल्टनंतरचे भूगोलज्ञ प्राकृतिक घटनांच्या अन्योन्य संबंधांचा विचार करत असत, इतकेच नव्हे तर, त्या दृशांचा व ऐतिहासिक घटनांचा अन्योन्यसंबंध यावरही विचार करत. क्यूबा आणि मेक्सिको यांच्या प्रादेशिक अभ्यासांत तर भूगोलाला वैज्ञानिक उंची आलेली आहे असे पिशेलला आढळून आले (नवस्पेन ४६). एक गोष्ट निश्चित, की या अभ्यासांपुरतीच, हंबोल्टच्या सामाजिक परिसरासंबंधीच्या अभिरूचीशी तुलनाकरून पहाता, त्याची प्राकृतिक परिसरासंबंधीची अभिरूची गौणच होती. हेटनरच्या मते तर त्यातील बरीच सामग्री भूगोलाभ्यासात घालण्यासारखी नव्हतीच (१६१, ८४). हंबोल्ट स्वतःच, वरकरणीतरी, त्याना राजकीय अर्थशास्त्रासंबंधीचे अभ्यास असे मानत असे. हंबोल्टने ज्या पद्धतीने विविध क्षेत्रांच्या आर्थिक, सामाजिक, राजकीय परिस्थितींतील भेदांचे नैसर्गिक परिस्थितीतील भेदांच्या संदर्भात वर्णन केले, त्या पद्धतीचे खरेखुरे अनुकरण फक्त भूगोलज्ञांनी केले; अर्थशास्त्रज्ञांनी केले नाही की राजकारणशास्त्रज्ञांनीही केले नाही. आणि त्यामुळे भूगोलकारांनी अशा नमुन्याचे प्रादेशिक अभ्यास करणे हे भूगोलाचेच कार्य करून टाकले, असे पिशेलचे मत आहे. (६६, I, ३३६ ते ४४).

अर्थशास्त्र व आर्थिक भूगोल यांच्या विकासांविषयीच्या अभ्यासग्रंथात श्मिटने हंबोल्टच्या या न्यूस्पेनच्या अभ्यासाला " प्रदेशाच्या प्राकृतिक स्वरूपावर आधारलेला शास्त्रशुद्ध राजकीय व आर्थिक भूगोल " असे शीर्षक दिले आहे (७, ७४). अशारीतीने, हंबोल्टने एका बाजुला प्रादेशिक आर्थिक भूगोलात मोलाची भर टाकली, तर दुसऱ्याबाजुने, अपुऱ्या असलेल्या

Geographische Producten Kunde (भौगोलिक अर्थशास्त्र) या आपल्या ग्रंथात रिटरने आर्थिक भूगोलाच्या क्षेत्रात प्रथमच क्रमबद्ध अभ्यासांची सुरुवात केली. या दोहोंतील विरोधाभास आपण लक्षात घेण्यासारखा आहे (श्मिट ७, ८४ या ग्रंथातील आधी उल्लेख ErdKunde मधील क्रमबद्ध अभ्यासाविषयीचा संदर्भ आणि ५०, १८२ ते २०६).

साधारणपणे, या दोन संस्थापकांमध्ये त्यांनी केलेल्या प्रत्यक्ष विकासकार्यात दोन महत्त्वाचे भेद असल्याचे आपण मानावयास हरकत नाही. संपूर्ण जगाचा प्रादेशिक भूगोल लिहिण्याच्या रिटरच्या महत्त्वाकांक्षेमुळे – त्याच्या प्रदीर्घ आयुष्यात त्याला आशिया व आफ्रिका खंडापलीकडे जाता आले नाही – सापेक्षतः विस्तृत प्रदेशांचा विचार करणे त्याला भाग पडले. तरी कोणत्याही एका प्रदेशातील सर्व संबंधित घटनांचा अभ्यास त्याला पूर्णपणे करता आला नाही.[२४] याच्या विरुद्ध हंबोल्टने स्वतः पाहिलेल्या प्रदेशांची अगदी तपशीलवार वर्णने दिली आहेत; त्यातील काही प्रदेश तर अगदीच लहान होते. त्यामुळेच सापेक्षतेने – म्हणजे त्याकाळात उपलब्ध असलेल्या निरीक्षणांच्या साधनांच्या कक्षेत येईल तेवढे – त्या त्या प्रदेशाचे परिपूर्ण चित्र तो रेखाटू शकला. हे साध्य करण्यासाठी, त्याने त्या त्या क्षेत्रातील प्रत्येक अर्थपूर्ण रूपधेयाचा विचार केला. इतकेच नव्हे तर, त्या क्षेत्राच्या प्रत्येक भिन्न विभागातील अशा सर्व स्वतंत्र लक्षणांचे एकत्रीकरण केले, आणि शेवटी, त्या विविध भागांचे एकूण क्षेत्राच्या संदर्भात असलेले अन्योन्यसंबंध त्याने दाखवून दिले (४७, I, १३७ ff). खरोखरी काही विशिष्ट लघुक्षेत्रांकडे त्याने पुरविलेल्या लक्षाचा विचार करता, ' सूक्ष्म भूगोलाच्या ' (Micro Geography) अभ्यासकांनी हंबोल्ट हाच आमच्या क्षेत्रातील आघाडीचा वीर आहे अशी घोषणा केली, ती समर्थनीय वाटते.

या दोन संस्थापकांच्या मतांतील दुसरा आणि अधिक महत्त्वाचा फरक आम्ही यापूर्वीच सूचित केला आहे. रिटरने तात्त्विकदृष्ट्या, आणि अंशतः कृतीनेही, अशी आग्रही भूमिका घेतली, की जगाच्या एकूण विभागांपैकी प्रत्येक विभागात आढळणाऱ्या व परस्पर संबंधित असलेल्या सर्व घटनांचा अभ्यास भूगोलात प्रथम व्हावा. त्यानंतर, त्यांच्या आधारानेच स्वतंत्र घटनाप्रकारांच्या संबंधांचा क्रमबद्ध अभ्यास करणे शक्य होईल. प्रयोबलने जाहीर

---

२४. हे विधान कामचलावू म्हणूनच केलेले आहे. कारण, रिटरच्या ErdKunde च्या सर्व १९ खंडांचा आपण पूर्ण परिचय करून घेतला आहे असा आव आणण्याचे धाडस लेखकाला करता येणार नाही. मात्र, या ग्रंथाच्या रूपरेषेवरून, ग्रंथाच्या काही भागांवर धावती नजर टाकून आणि अन्य अभ्यासकांच्या विधानांवरून, आमचे वरील विधान समर्थनीय ठरते. रिटरने आपल्या वर्ण्यप्रदेशातील किरकोळ तपशीलांचा कधीच विचार केला नाही, असा अर्थ करणेही बरोबर नाही. उदाहरणार्थ : अल्ताईच्या खाणकाम उद्योगाच्या प्रदेशातील खेड्यांचे व मळ्यावरील वसतींचे त्याने केलेले वर्णन – म्हणजेच " वसतींचा भूगोल " (Siedlungs Geographie) या ग्रंथाचे आरंभीचे भाग – या दृष्टीने लक्षात घेण्यासारखे आहेत (४९, II, ८४७).

केलेले मत याच्या अगदी विरुद्ध होते. त्याअन्वये प्रथमच एकेका घटनाप्रकारचा क्रमबद्ध अभ्यास अखिल जगाच्या संदर्भात पूर्ण करणे जरूर होते. हंबोल्ट हा व्यवहारी शास्त्रज्ञ असल्याने, आपल्याला करणे शक्य आहे तेच काम हाती घ्यावे, असे त्याचे मत आहे हे उघड दिसते. घटनांच्या कोणत्याही दोन गटांचे, उदाहरणार्थ वनस्पती आणि उंचसखलपणा यांचे, संबंध विचारात घेणे त्याला सहज शक्य होते, त्याच्या मते, एकत्र आढळणाऱ्या सर्व घटनांचा एकाच वेळी विचार करणे इतके सोपे झाले नसते. शिवाय संपूर्ण जगाचे प्रादेशिक सर्वेक्षण होई तो थांबणेही त्याला शक्य नव्हते. त्यापेक्षा शक्यतेवढ्या पूर्णांशाने ज्यांचा त्याने अभ्यास केलेला होता त्याभूभागांचे स्पष्टीकरणात्मक वर्णन देणे हे आपले कर्तव्य आहे, असे हंबोल्टला वाटले. हा हेतू साध्य होण्यासाठी क्रमबद्ध भूगोलाची पूर्तता होण्याची वाट पहाणे हे व्यवहार्य नव्हते. आपल्या प्रादेशिक वर्णनांतून आपण केलेल्या क्रमबद्ध अभ्यासांचे निष्कर्ष आपणच उपयोगात आणून त्याने प्रादेशिक अर्थशोधनाचे ' आदर्श ' निर्माण केलेले आहेत. (हेटनर १६१, ८६).

या त्यांच्या मतभेदांतून निर्माण झालेले अंतिम परिणाम जितके उद्‌बोधक आहेत तितकेच ते विरोधाभासात्मक आहेत. रिटरने क्रमबद्ध अभ्यासांकडे केलेले सापेक्ष दुर्लक्ष, त्याच्याच प्रादेशिक अभ्यासांचे अवमूल्यन करण्यास कारणीभूत झाले; इतकेच काय, त्यांतून एक अशी परंपरा निर्माण झाली, आणि तात्काल तिने भूगोलाला अशा मर्यादा घातल्या, की त्यामुळे प्रादेशिक भूगोलाचीच प्रगती होणे अशक्य झाले. हंबोल्टच्या बाबतीतही, त्याच्यामते सर्वप्रथम महत्त्वाच्या असलेल्या विश्वविषयक प्रमेयास शास्त्र अथवा तत्त्वज्ञान यांपैकी कोणत्याच क्षेत्रात फारसे महत्त्वाचे स्थान राहिले नाही. क्रमबद्ध भूगोलातील त्याचे अभ्यास त्या क्षेत्राच्या विकासाच्या इतिहासात त्या काळात जरी फार महत्त्वाचे होते, तरी ते केव्हाच कालबाह्य झालेले आहेत. प्रादेशिक भूगोलातही रिटरपेक्षा हंबोल्टच आघाडीवर होता. तरीही, ज्याला आता " तौलनिक प्रादेशिक भूगोल " असे म्हटले जाते त्या भूगोल क्षेत्रातील त्याने केलेल्या अभ्यासांबाबतही हीच गोष्ट अंशतः खरी आहे (हेटनर १६१, ४०३, प्लेवी ८, ४६ ते ५५). पण, त्याने कमी महत्त्वाचा भाग म्हणून सूचित केला होता त्याच भागाची म्हणजे विषुववृत्तीय अमेरिका व मेक्सिको या स्वतंत्र प्रदेशांची, त्याने अधिकारवाणीने केलेली पृथकरणात्मक आणि संकलनात्मक विवेचक वर्णने मात्र भूगोलात शाश्वत मूल्ये मिळवून राहिली. प्रादेशिक भूगोलातील सर्वच सफल अभ्यासांच्याबाबत लेहमान म्हणतो तेच खरे आहे ; असे अभ्यास कधीच कालबाह्य होत नाहीत. त्यांच्यांतूनच ऐतिहासिक भूगोलाला अनन्यसामान्य सामग्री पुरविली जाते (१११, २३९ ; c/o सॉर ८४, १८५).

नंतरच्या काळात भूगोलविषयक विचारांना लागलेल्या अन्य काही वळणावर हंबोल्ट व रिटर यांच्या कार्यांचे काही परिणाम झाले. त्यांचाही येथे संक्षेपाने विचार करणे आवश्यक आहे. भूगोलाच्या सौंदर्यबोधक्षम बाजूबद्दल हंबोल्टला नेहमीच आस्था वाटत असे. कारण, त्याच्या मते, " शास्त्रशुद्ध निसर्गाभ्यासाला प्रेरणा देण्याचे आणि त्याच्या मर्यादा विस्तृत

करण्याचे ते एक साधन होते ", अशाप्रकारच्या वर्णनांचे कित्ते त्याला गटे, रोसो व सेंट पीरी व अनेक फ्रेंच व इंग्रज प्रवाशांच्या वर्णनांतून मिळाले असले, तरी विशेषेकरून त्याचा " सुविख्यात गुरू व मित्र जॉर्ज फोर्स्टर " याने या दिशेने अत्यंत परिणामकारक रीतीने केलेल्या आद्य प्रयत्नांचा कित्ताच त्याच्यापुढे होता (६०, II, ७४). भूगोलाचे हे क्षेत्र शास्त्रीय भूगोलाच्या क्षेत्रापासून वेगळे मानले जाऊ नये, असा हंबोल्टचा आग्रह होता. हंबोल्टचे अशा प्रकारचे अभ्यास व रिटरचे ऐतिहासिक भौगोलिक अभ्यास यांचा एक गट करून त्याला " अशास्त्रीय–इतिहास-तत्त्वज्ञान-निष्ठ भूगोल " (non-scientific Historical-Philosophical Geography) असे नाव द्यावे, या फ्रयोबलच्या निश्चितस्वरूपाच्या मागणीचा हम्बोल्टवर काहीही परिणाम झाला नाही, ही गोष्ट उघड आहे (५६, ७, ff). हम्बोल्टने ' कॉसमॉस ' च्या दुसऱ्या खंडात, फ्रयोबलच्या निबंधाचा प्रत्यक्ष उल्लेख न करताही, त्याच्या सूचनांना निश्चित प्रत्युत्तर दिलेले आहे. निसर्गवर्णनांच्या लेखकाने स्वतःच्या भावना त्यात प्रकट करावयाच्या नसतात. उलट, त्याच्या भोवतालच्या बाह्य निसर्गाचे वस्तुनिष्ठपणे शब्दांकन करावयाचे असते, आणि वाचकांच्या भावनांना पूर्ण स्वातंत्र्य द्यावयाचे असते. ललित लेखकांची वर्णने ज्या अर्थाने कलात्मक असतात त्या अर्थाने भूगोलज्ञांची वर्णने कलात्मक असावी अशी अपेक्षा नसते, असा निष्कर्ष या चर्चेवरून आपल्याला काढण्यास हरकत नाही. भूगोलाच्या या सौंदर्यबोधक्षम बाजूत लेखकाने " काव्यमय " शब्दप्रयोगांची भर घालावयाची नसते, तर केवळ प्रत्यक्ष निसर्गदृश्याचे वास्तव चित्रण करण्याचे आपले कार्य आपल्या भाषाप्रभुत्वाच्या सहाय्याने जेवढे शक्य होईल तेवढे चांगले करावयाचे असते. " कल्पना शक्तीचा जीवंत झरा आटू न देता, निसर्गदृश्यांची वर्णने काटेकोरपणे मर्यादित करणे आणि शास्त्रीयदृष्ट्या निर्दोष करणे शक्य आहे. " मात्र, हा सौंदर्यबोध इंद्रिय व अतींद्रिय यांच्या परस्पर संबंधांच्या प्रतिष्ठित स्थिरभावनेतून आणि विश्वव्यापकता, परस्परानुबंधी मर्यादा आणि सृष्टिजीवनाची एकात्मता यांच्या संवेदनेतून निर्माण झालेला असला पाहिजे. येथे सामान्यपणे दिसणाऱ्या दृश्याच्या वर्णनाने केवळ बौद्धिक आनंद मिळवावयाचा नाही, तर त्या " भूदृश्यातील निसर्गशक्तींच्या सुसंवादी आंतरक्रीडांचे " कितीतरी अधिक आकलन करून घ्यावयाचे आहे. (६०, I, ३४ ; II, ७२ ते ७४ ; c/o ड्योरिंग २२, ८९ ; पिशेल ६६, I, ३३६ f ; ग्रीजबाक २०, III, २५१ ff ; डोव्हचे मत मात्र असे होते, की ज्या गोष्टीला त्याने तात्त्विक विरोध केला, तेच करण्याचा, म्हणजे वर्णनांना काव्यमय स्वरूप देण्याचा, गुन्हा हंबोल्टने स्वतःच केलेला होता ; २१).

प्राकृतिक भूगोलाची व्याप्ती कुठवर समजावयाची ; त्यात संपूर्ण पृथ्वीचा समावेश होतो, की तो फक्त भूपृष्ठापुरताच मर्यादित आहे ; या प्रश्नांना हंबोल्ट अथवा रिटर यांपैकी एकानेही रेखीव उत्तर दिलेले नाही. यापैकी पहिले उत्तरच बरोबर आहे असे सुचविणारी विधाने, गेर्लाटप्रमाणेच अन्य वाचकांनाही, रिटरच्या विधानांतून सापडणे शक्य आहे, हे निःसंशय. पण, हेही तितकेच खरे आहे, की त्याच्या पद्धतितंत्रविषयक चर्चांतील बहुतांश भागांत, आणि

एकूण त्याच्या सर्वच कार्यात, त्याने केलेल्या पृथ्वीच्या व्याख्येशी हे उत्तर विरोधात्मक आहे. ज्या ज्या पृथ्वीचे त्याने निसर्गशक्तींच्या प्रदर्शनाचे स्थान असे, आणि विशेषेकरून मनुष्याचे वसतिस्थान असे, वर्णन केले आहे, ती पृथ्वी या या वस्तूऐवढी नसून, तिच्या आच्छादक पृष्ठाऐवढीच होती.* Erdkunde म्हणजे ' भूविज्ञान ' असा शब्दप्रयोग प्रथम रूढ करण्यास रिटरच कारणीभूत झाला. हाही रिटरचा एक स्वभावविशेष होता असेच म्हटले पाहिजे. पण, हेटनर म्हणतो त्याप्रमाणे त्याची संकल्पना स्पष्ट करण्याच्या दृष्टीने तो अगदीच दरिद्री होता. Geographie या परकी शब्दाऐवजी वापरण्यासाठी आणि हंबोल्टला मान्य असणाऱ्या Erd beschreibung (भूवर्णन) या शास्त्रीयदृष्ट्या कमी अर्थोत्पादक शब्दाऐवजी उपयोगात आणण्यासाठी, एक प्रतिशब्द म्हणून रिटरने या शब्दाचा प्रयोग केला होता. तरीही नंतरच्या अभ्यासकांनी त्या शब्दाचा ' भूशास्त्र ' (Earth Science) हा शब्दशः अर्थच मान्य केला.

विश्वाच्या एकात्मतेचे आपले प्रमेय प्रस्थापित करण्यासाठी, हंबोल्टने आपल्या निरीक्षणाच्या कक्षेत संपूर्ण विश्वाचा अंतर्भाव केला ; पण त्यातच Erd beschreibung (भूवर्णन) हा ' भूसंबंधी ' अथवा पार्थिव (irdisch) म्हणून वेगळा पोटभाग काढला (६०, I, ५१८). त्याचे स्वतःचे अनुसंधानकार्य बहुतांशी पृथ्वीपुरतेच मर्यादित होते, ऐवढेच नव्हे तर, पृथ्वीच्या त्याला माहीत असलेल्या भागापुरतेच, म्हणजेच भूपृष्ठापुरते, मर्यादित होते (ड्योरिंग २२, ५५). परिणामतः, अभिजात कालखंडापूर्वीच्या भूगोलज्ञांचा भूगोलाचे क्षेत्र भूपृष्ठापुरतेच मर्यादित ठेवण्याकडे असलेला कल अभिजात कालखंडातही चालू ठेवला गेला.

दुसऱ्या एका बाबतीत म्हणजे ज्याला विविधप्रकारच्या घटनांच्या वितरणाचा अभ्यास असे नाव देता येईल – किंवा सारतः ' वस्तूंचा स्थलनिर्देश ' असे ज्याला म्हणता येईल – त्या क्षेत्राच्या रिटरने विचारांत घेतलेल्या मर्यादांपलीकडे हम्बोल्टचे प्रत्यक्ष कार्य विस्तारलेले दिसते (ड्योरिंग २२, ६४ ff). कदाचित घटनांसंबंधीचा त्याचा हा अभ्यास म्हणजे परस्परसंबंधित घटनांच्या क्रमबद्ध अभ्यासांसाठी आवश्यक असलेले प्राथमिक व शोधक समीक्षण आहे असे त्याचे मत असावे. काहीही असो, तो त्याच्या भूगोलाचा एक भाग होता, हे विसरून चालणार नाही.

शेवटी एक गोष्ट येथे सांगितली पाहिजे. फार पुढे नाही तरी, एकोणीसाव्या शतकाच्या मध्यावर दोन कारणांनी रिटरचा प्रभाव फारच अधिक महत्त्वाचा ठरला. निदान, जर्मन विश्वविद्यालयांतील भूगोलाच्या एकमेव पीठाचा एकमेव अधिकारी या नात्याने त्याच्या निकटवर्ती विद्यार्थ्यांच्या वर्तुळापलीकडेही त्याचा बराच मोठा प्रभाव पडत असे. उलट, काही काळ तरी, स्वतःला भूगोलज्ञ न मानणाऱ्या लोकांवरच अधिक होता. दुसरे असे, की रिटर आपल्या पद्धति तंत्रविषयक स्वतंत्र पत्रकांतून भूगोलाचे स्वरूप व त्या क्षेत्रातील समस्या या विषयीच्या आपल्या मतांचे वारंवार विवेचन करत असे. उलट, हंबोल्टने केलेल्या

* पुरवणी टीप क्र. ८ पहा.

एतद्विषयक चर्चा त्याच्या सर्वसामान्य लिखाणातच विखुरलेल्या आहेत. कदाचित याच कारणाने, भूगोलाचा अन्य शास्त्रांशी असलेला संबंध दाखविणारी त्याची संकल्पना सुमारे एक शतकभर अडगळीत पडून होती.[२५]

## क–१९ व्या शतकाच्या उत्तरार्धातील बदलते दृष्टिकोन

भूगोलाच्या विकासातील ' अभिजात ' कालखंड हंबोल्ट आणि रिटर या दोघांच्याही मृत्युबरोबर म्हणजे १८५९ मध्ये संपुष्टात आला, असे सोईस्करपणे समजण्यास हरकत नाही. याच्याच पुढच्या दशकात, रिटरने प्रस्थापित केलेल्या परंपरेने शैक्षणिक भूगोल प्रभावित झालेला होता. भूगोलक्षेत्राच्या " ऐतिहासिक " बाजूवरच अधिक भर देण्याकडे रिटरपेक्षा त्याच्या अनुयायांचाच अधिक कल असल्यामुळे, क्रमबद्ध भूगोलापेक्षा मुख्यतः मानवाशी संबंधित असलेल्या प्रादेशिक भूगोलाच्या दिशेने जाणारा प्रवाहच या क्षेत्रात निर्माण झाला; असे कोणाही टीकाकारास बोलून दाखविण्यास हरकत नाही. पिशेलच्या मते आन्सर्ट काप हा रिटरचा " एकांडा पण प्रशंसनिय शिष्य " होता. कापला अधिक विस्तृत क्षेत्रात, म्हणजे राजकीय समस्यासंबंधीही अभिरुची होती. त्यामुळे १८४४ नंतर, फ्रयोबलप्रमाणे त्यालाही शिस्तीच्या बडग्यामुळे स्वदेश सोडून यु. एस्. ए. कडे धाव घ्यावी लागली. तेथे तो कपाशीचा शेतकरी म्हणून टेक्सासमधल्या एका जर्मन वसाहतीत स्थायीक झाला, आणि बरकरणी तरी भूगोलाभ्यासाचा नाद, १८६५ साली पुन्हा मायदेशी परत जाईतोपर्यंत, त्याने सोडून दिला. (पहा : पिशेलचे परिशीलन. ६६, I, ३९९ ते ४१३, ४१८ ; तसेच फ्रयोबल २८, I, ८७७ व पुढे ; चरित्रविषयक वस्तुस्थिती २९ मधून). रिटरचा शिष्य नसला तरी, कापचा एक फ्रेंच-स्विस अनुयायी अर्नोल्ड गुयोत् हाही यू. एस्. ए. मध्ये आला होता. त्याने, या देशातील बहुधा पहिलेच, भूगोलासन प्रिन्स्टन् विद्यापीठात भूषविले. याचे फारसे वजन

२५. हंबोल्टने या संकल्पनेचे विवेचन कॉसमॉस या आपल्या ग्रंथातील " प्राकृतिक भूवर्णनाच्या मर्यादा व त्याचे सशास्त्र प्रतिपादन " (Begrenzung und Wissenschaftliche Behandlung einer physischen Weltbeschreibung) असे शीर्षक असलेल्या एका प्रकरणात पूर्णपणे केलेले आहे (६०, I, ४९ ते ७०). पण त्यापूर्वीच लॅटिनमध्ये प्रसिद्ध झालेल्या दोन अभ्यासलेखात ती संकल्पना संक्षिप्तपणे मांडलेली होती ; आणि यांपैकी पहिला लेख तर १७९३ मध्येच प्रसिद्ध झालेला होता (४३). हंबोल्टच्या पद्धतितंत्राचे अगदी परिपूर्ण प्रतिपादन ब्योरिंगच्या एका प्रबंधात आढळते. परिश्रमपूर्वक तयार केलेल्या, परिपूर्ण आणि सुव्यवस्थित विवेचन असलेल्या या प्रबंधाचा बराच मोठा भाग अवतरणांनी व माझ्या मते विश्वसनीय, अनुवादांनी तयार झालेला आहे (२२). कॉसमॉसच्या पहिल्या खंडातही हंबोल्टने केलेल्या क्रमबद्ध भूगोलाच्या रूपरेषेचेही प्रतिपादन आहे. त्याने केलेले भूगोलक्षेत्राचे संक्षिप्त सर्वेक्षण १८२७-२८ सालच्या हिवाळ्यात बर्लिन विद्यापीठात झालेल्या, त्याच्या व्याख्यानमालेच्या अगदी अलीकडे प्रकाशित झालेल्या, प्रतीत पहावयास मिळते (५२) या प्रकाशनाची आवृत्ती ही त्याच्या व्याख्यानाची शब्दशः आवृत्ती होती की काय हे मला माहीत नाही. तरी, त्यात प्रतिपादलेल्या संकल्पना, स्पष्टीकरणे व विधाने ही सर्व निःसंशयपणे हंबोल्टच्या अन्य लिखाणात आढळणाऱ्या तत्सम गोष्टींचे अचुक अनुवाद आहेत).

पडलेले दिसत नाही ; याचे कारण तपशीलांचा अन्वयार्थ लावत असतानाही त्याच्यावर हेतुवादाची छाया ठेवण्याची त्याला खोड होती (६४). [२६]

रिटरचे विद्यार्थी व अनुयायी यांच्यामध्ये सर्वात यशस्वी ठरला तो फ्रेंच भूगोलज्ञ एलिजी रेक्लस. जेरार्डिन व ब्रून्हे यांच्यामते रिटरच्या हाताखाली रेक्लसने १८५१ साली जो अभ्यास केला, त्यामुळेच तो भूगोलकार बनला. त्याने आपली प्रमुख तत्त्वे व कल्पना रिटरकडून घेतल्या (३०, ६७ ते ६९, ७१). रेक्लस रिटरच्या तात्त्विक प्रमेयांपेक्षा त्याच्या पद्धतीचेच अधिक अवलंबन करत असे, हे लक्षात घेणेही उद्‌बोधक ठरते. त्याने प्रथम क्रमबद्ध भूगोलातील मर्यादित अभ्यासांनी पूर्वतयारी केली, नंतर सामान्य क्रमबद्ध भूगोल पूर्ण केला, आणि इतके झाल्यानंतरच, त्याने जगाचे सर्वसाधारण सर्वेक्षण पूर्णत्वाने करण्याचे काम हाती घेतले. पण, रिटरपेक्षा त्याचे वेगळेपण असे होते, की त्याच्या क्रमबद्ध अभ्यासांनी, म्हणजे प्राकृतिक भूगोलाच्या एका प्रमुख अंगाने, त्याला ख्याती मिळवून दिली (La Terre : १८६६-६७ मध्ये प्रसिद्ध झाला. त्यानंतर त्याचे इंग्रजी भाषांतरही झाले). जेरार्डिन व ब्रून्हे यांना जरी या ग्रंथात त्याच्यावर रिटरचा प्रभाव पडला असल्याचे दिसले, तरी अन्य अभ्यासकांना इतरही काही ग्रंथकारांचा, विशेषेकरून इंग्रज अभ्यासक मेरी सॉमरव्हील हिचा, त्याच्यावर प्रभाव पडलेला असल्याचे आढळून आले. रेक्लस हा रिटरचा एक विद्यार्थी व अनुयायी होता ही गोष्ट न मानता, रिटर-संप्रदायातील अन्य ग्रंथांशी या ग्रंथाची विरोधदर्शक तुलनाकरून, त्या वेळेपर्यंत जर्मन भाषेत लिहिल्या गेलेल्या कोणत्याही अशा विषयावरील ग्रंथापेक्षा तो ग्रंथ श्रेष्ठ होता, अशी प्रशंसा स्प्योररने केली आहे.* (६८, ३३१. पिशेलने केलेल्या व वर उद्धृत केलेल्या विधानाचे बाबतीतही हीच गोष्ट खरी आहे). पण हेटनरला मात्र या ग्रंथावर स्पष्टपणे रिटरचाच प्रभाव पडलेला असल्याचे दिसून आले (१६१, १०८). "रेक्लस हा फ्रान्सचा रिटर होता " हे श्मिटचे विधान त्याच्या " जगाचा नवा भूगोल" (Novelle geographic Universelle, म्हणजेच The New Geography of the World) १८७५ ते १८९४ या १९ खंडात्मक प्रादेशिक सर्वेक्षणाच्या अभ्यासावर आधारलेले होते, यात शंकाच नाही. जरी, या ग्रंथाची उभारणी रिटरच्या Erdkunde या ग्रंथाच्या अनुकरणाने केलेली होती, तरी " ऐवढा मोठा विस्तृत ग्रंथ पूर्ण करण्याकरता लागणारे शिस्तबद्ध संघटन, आणि पृथ्वीच्या प्रत्येक क्षेत्रात असणारे प्रकृती व संस्कृती यांतील निकट सरूपसाहचर्य ", या दोनही बाबतीत त्याच्या ग्रंथाला खूपच अधिक यश मिळाले (७, १५१ ते ५३).

---

२६. तरीही अलीकडे पुन्हा प्रकाशित झालेले त्याचे लिखाण " दक्षिण ॲपॅलेशियन् बाबत काही टीका-टिप्पणी " विशेष लक्षणीय आहे. राल्फ एच्. ब्राउन याला त्या प्रदेशाच्या ऐतिहासिक भूगोलाच्या संदर्भात बरीच मूल्यवान सामग्री या लिखाणात सापडली. (६५). त्याने रिटरच्या स्मरणार्थ " कार्ल रिटर " या विषयावर येथील अमेरिकी भूगोलज्ञ व संख्याशास्त्रज्ञांच्या मंडळापुढे १८६० साली एक व्याख्यान दिले** त्याचाही येथे उल्लेख करावयास हरकत नाही.

* पुरवणी टीप क्र. ९ पहा.

** पुरवणी टीप क्र. १० पहा.

अन्य काही क्षेत्रातही रिटरचा प्रभाव असाच महत्त्वाचा होता. लष्करी महाविद्यालयातील भूगोलात सर्वाधिक रस घेणारा विद्यार्थी मोल्के, याच्या लष्करासंबंधीच्या भौगालिक योजना प्रभावी-महत्त्वाच्या ठरल्या. पण त्याच्या कितीतरी आधी, रिटरने विविध भौगालिक अभ्यासलेख प्रसिद्ध केले होते (श्मिट् ७, ८६). त्याचप्रमाणे मानवी घटनांच्या क्रमाशी भूगोलाच्या असलेल्या अर्थपूर्ण संबंधांकडे इतिहासकाराचे लक्ष वेधून घेण्याचे कामीही रिटरचाच प्रभाव कारणीभूत झाला. सुविख्यात इतिहासकार इ. कर्टियस् हा एकेकाळचा रिटरचा विद्यार्थीच होता. त्याच्याही ग्रंथावर रिटरचा अशा प्रकारचा विशेष प्रभाव पडलेला दिसत असल्याची नोंद मार्थेने केलेली आहे. (२५, तळटीप १०). हंबोल्ट जरी कोणत्याच विद्यापीठाचा सन्मान्य पदाधिकारी नव्हता आणि शैक्षणिक क्षेत्रात त्याचे निकटवर्ती अनुयायी असे कोणीच नव्हते, तरी विद्यापीठाबाहेरील क्षेत्रात–आणि जर्मनीबाहेरही–याचा प्रभाव रिटरच्या तुलनेने कितीतरी पटीने अधिक होता. " रिटरच्या पश्चात् एका लहानशा कालखंडात वास्तव भूगोलशास्त्राचे खरे प्रतिनिधी, म्हणजे शास्त्रीय दृष्टी असलेले प्रवासी, हंबोल्टचाच आदर्श पुढे ठेवत असत, " असे हेटनरला आढळून आले (२. ३१३).

जर्मन भूगोलाचा विकास वेगाने होत गेला तो १९ व्या शतकाच्या अंतिम तृतीयांश व चतुर्थांश भागात. तो सुरू होण्यापूर्वीचा हा रिटर-पश्चात् कालखंड म्हणजे एक मध्यंतरातील संक्षिप्त घटना होती. हा कालखंड बऱ्याच बाबतीत भूगोलक्षेत्राच्या विकासातील एक क्रांतिक कालखंड मानला जावयास हरकत नाही. हंबोल्ट आणि रिटर यानी भूगोलाचा जो पाया घालून दिला त्यांतून, निदान दर्शनी तरी, भूगोलाचे एकसंघ क्षेत्र प्रस्थापित झाले नाही. त्यांच्या अनुयायांनी या संस्थापकांपैकी प्रत्येकाच्या मतांचे विशिष्ट पैलू अतिशयोक्तीने ताणले, किंवा या क्षेत्राच्या स्वरुपासंबंधीच्या नव्या संकल्पना त्यात घुसडण्याचा प्रयत्न केला. परिणाम असा झाला की त्याच प्रमाणात एका क्षेत्राला अनेक दिशांनी तडे गेले, आणि एक ज्ञानशाखा या नात्याने भूगोलाच्या प्रतिष्ठेला गंभीर धोका मात्र निर्माण झाला. रिटरच्या मृत्युनंतर कोणत्याच जर्मन विद्यापीठात भूगोलाचा प्राध्यापक राहिला नाही. भूगोलाला विश्वविद्यालयीन हे उच्चस्थान मिळवून देण्याचे व नंतरच्या कालात या क्षेत्रात विकास घडवून आणण्याचे कार्य रिटरचे अनुयायी म्हणवून घेणाऱ्या " ऐतिहासिक भूगोलज्ञांनी " केले नाही, तर भू-शास्त्राचे प्रशिक्षण घेतलेल्या भूगोलाभ्यासकांनीच मुख्यतः केले. त्यामुळे, अमानव रूपधेयांच्या अभ्यासांत–म्हणजेच आज ज्याला ' प्राकृतिक भूगोल ' असे आपण नाव देतो त्या शाखेत–विशेष प्राविण्य मिळविण्याकडेच त्यांचा कल असे (c/o पेंक १२९, ६३५ f). या कालखंडात भूगोलाचे शिक्षणक्षेत्रातील स्थान कसे उंचावत गेले, अथवा त्यात सृजनक्षमकार्य किती केले गेले या गोष्टींचा आपणास येथे विचार करावयाचा नाही ; कारण, या क्षेत्राच्या पद्धतीतंत्रातील भासमान विरोधाचा धोका कसा टाळावयाचा आणि शास्त्राचे एक स्वतंत्र क्षेत्र म्हणून त्याला प्रतिष्ठा कशी मिळवून द्यावयाची हाच एक प्रमुख विचारणीय प्रश्न या कालात निर्माण झालेला होता.

नुकत्याच आधी होऊन गेलेल्या ' कल्पनारम्य ' कालखंडातील तत्त्वज्ञाननिष्ठ संकल्पना ग्रहण करण्याच्या दृष्टीने एकोणिसाव्या शतकाच्या अंतिम पर्वातील सर्वसाधारण शास्त्रीय वातावरण मुळीच अनुकूल नव्हते—मग त्या संकल्पना रिटरच्या असोत की हंबोल्टच्या असोत. हा बदल अभिजात कालखंडाचा शेवट होण्यापूर्वीच स्पष्ट होऊ लागला होता. खरे म्हणजे, भूगोलविषयक कल्पनांत पडत जाणारे फरक लक्षात घेता, भूगोलाच्या विकासकालाचे आपण हे स्वेच्छेने केलेले विभाग परस्परांवर अतिक्रमण करत असलेले दिसतात. काही बाबतीत तर हे अतिक्रमण इतक्या मोठ्या प्रमाणात झालेले आहे, की अभिजात-उत्तर कालखंडातील काही संकल्पना अभिजात पूर्व कालखंडातील एका शेवटच्या भूगोलज्ञाने, म्हणजे बुशरने, बोलून दाखवलेल्या सापडतात. बुशरच्या समकालीनांच्या लेखनांत ' नैसर्गिक हद्दी ' व ' नैसर्गिक प्रदेश ' या संज्ञांचा वापर केला गेला होता व त्यांना निरूत्तर करणारा हल्ला बुशरने चढविला होता, याचा उल्लेख पूर्वी आलेलाच आहे. बुशरने या चर्चेत शरीररचनाशास्त्र व शरीर कार्यशास्त्र यांचे दाखले देऊन—आणि आपण देत असलेले दाखले अपूर्ण आहेत याची जाणीव ठेवून—तसाच काही खास हेतू असल्याशिवाय, भूगोलज्ञांनी पृथ्वीचे क्षेत्रीय विभाग पाडण्याची आवश्यकताच नाही, असा नकारात्मक निष्कर्ष त्याने काढला होता. त्या ऐवजी भूगोलकारांनी घटनांच्या भाषेत भूगोलाचा, म्हणजेच क्रमबद्ध भूगोलाचा, अभ्यास करावा असे त्याने सुचविले (५१, ९०-९४). हा अभ्यास कशारीतीने करावा याचे उदाहरण म्हणून त्याने रिटरच्या १८०६ मधील अभ्यासलेखांचा उपयोग केलेला असला आणि अन्यत्रही रिटरच्या कार्याचा गौरवपूर्ण उल्लेख केला असला तरी, त्याची ही टीका रिटरच्या ' भूविज्ञान ' (Erdkunde) च्या खंडांना निःसंशयपणे लागू पडते ; मग हे त्याच्या लक्षात आलेले असो वा नसो.

बुशरच्या या अभ्यासलेखाचा प्रभाव बर्गहाऊजवर पडला होता, व मार्थेलाही तो लेख परिचित होता, या गोष्टी उघड आहेत. तरी, त्या अभ्यासलेखाला भूगोलविषयक कल्पनांच्या विकासक्रमात काही महत्त्वाचा अर्थ प्राप्त झाला, ही गोष्ट स्पष्ट होत नाही. कदाचित्, त्याचे प्रकाशन एका छोट्याशा प्रांतीय मुद्रणसंस्थेने केले, हे त्याचे कारण असेल (c/o अशा संदर्भात स्योररची चर्चा, ६८, ३६५). याच्या उलट, अगदी अशाच प्रकारची मते, काही वर्षानंतर, फ्रयोबेलने त्याकाळातील एका प्रमुख भूगोलवृत्तपत्रिकेतून प्रसिद्ध केली. त्याने मात्र भूगोलक्षेत्रात चांगली खळबळ उडवून दिली. विशेषेकरून ती टीका थेट रिटरवर रोखलेली असल्यामुळे, व ती रिटरच्या प्रतिटीकेसह पुन्हा प्रकाशित झाल्यामुळे, त्याला आणखीच प्रसिद्धी मिळाली.

पण, हा वाद म्हणजे पेल्यातील वादळ ठरले. कारण, फ्रयोबेलने केलेल्या त्या मागण्या " कोणताही ठसा मागे न ठेवता " विरून गेल्या. त्यामुळे, हेटनरने भौगोलिक विचारांचा विकासेतिहास लिहिताना त्यातील एतद्विषयक प्रतिपादनात या वादाचा उल्लेखही केला नाही (२, ३०५). अर्थात, तसे मानणेही अतिशयोक्तीच ठरेल. कारण, बर्गहाऊसच्या

वृत्तपत्रिकेतून प्रसिद्ध झालेले दोन लेख तरी भौगोलिक वाङ्मयात बरेच महत्त्वाचे स्थान व्यापून राहिले होते. आणि, जाणीवपूर्वक असो वा नसो, नंतरच्या अभ्यासकांवर त्याचा प्रभावही पडलेला असावा. (याबरोबरच विभाग III A पहा). ज्याचे प्रतिपादन करण्याचा प्र्योबेल प्रयत्न करत होता तो दृष्टिकोण शेवटी निश्चितच आघाडीला आला. प्लेवीने तर नव्या युगाचा दूत म्हणून प्र्योबेलचे स्वागत केले. तेव्हा बुशर हा त्या युगाचा अग्रदूत होता अशी आपण पुस्ती जोडू, म्हणजे झाले (५१, ५९ f).

प्लेवी म्हणतो त्याप्रमाणे, शास्त्रीय विचारांवर अधिकार गाजवणारा शास्त्रीयक्षेत्रातील नवा दृष्टिकोण पुढील गोष्टींमुळे लक्षणीय होता :–निरनिराळ्या शास्त्रांचा विशेषक्षेत्रसंपादनाकडे वाढता ओढा, " शास्त्रीय नियमांच्या " विकासावर दिला जाणारा वाढता भर, आणि शास्त्रांची कोणत्याही विशिष्ट जागतिक दृष्टिकोणापासून (Weltanschauung)–विशेषतः भौगोलिक दृष्टिकोणापासून–जाणीवपूर्वक केली गेलेली फारकत. या शेवटच्या मतात तर एक निश्चित तत्त्वज्ञाननिष्ठ गृहीततत्त्व समाविष्ट असे. या वास्तविक व यांत्रिक विश्वातील इतर वस्तूंप्रमाणेच " मनुष्य " ही पण एक " वस्तू " आहे, म्हणजे तोही एक " अणूंच्या हालचालींची गोळाबेरीज " आहे, असे मानून त्याचा अभ्यास करावयाचा (प्लेवी ८, ६०, ६६ f).

भौगोलिक कार्यातील हा पालट पिशेल व रिक्टोफेन् या दोघांच्या लिखाणांमुळेच मुख्यतः झाला असे जर्मन भूगोलज्ञ सामान्यतः मानत आले आहेत. १८६६ साली व त्यानंतर पिशेलने प्रसिद्ध केलेल्या निबंधांतून ही चळवळ उगम पावली. त्यांतील बऱ्याच निबंधांचा संग्रह " Naue Probleme der Vergleichenden Erdkunde als Versuch einer Morphologie der Erdoberfläche " (भूपृष्ठ रचनाशास्त्राचे प्रयत्नपूर्वक प्रतिपादन करत असताना निर्माण होणाऱ्या तौलनिक भूगोलातील नव्या समस्या) या नावाने १८७० साली प्रसिद्ध झाला (६७). " या ग्रंथामुळे भूगोलात पुन्हा शास्त्रीय चैतन्य संचार करू लागले, असे म्हणतात ते बरोबरच आहे " (१८९, २४). आपल्या शिकवणीने व या ग्रंथाच्या माध्यमाने पिशेलने भूगोलाभ्यासकांना प्रामुख्याने भूरूपांच्या रचनाशास्त्राचा अभ्यास करण्याचा मार्ग दाखविला. मात्र, त्याचे भौगोलिक कार्य भूगोलाच्या या विभागापुरतेच मर्यादित नाही. भूरूपांचा मानवी इतिहासावर पडणाऱ्या प्रभावाचा अभ्यास करण्यातही त्याला गोडी वाटत असे. आणि मार्थेच्या मते, भूरूपांच्या प्रभावाच्या या मर्यादा अधिक रेखीव आणि निरुंद करण्यात त्याला, रिटरपेक्षाही अधिक, यश आले (२५, २२). वस्तुतः विद्यापीठातील त्याच्या अधिकारपदामुळे, त्याला अधिक ग्रंथनिर्मिती करणे शक्य झाले असते. पण लवकरच, म्हणजे वयाच्या एकोणपन्नासाव्या वर्षी, झालेल्या त्याच्या अकाली निधनामुळे हे कार्य अपुरे राहिले. (पिशेलने केलेल्या भरीव कार्याच्या अधिक समर्पक विवेचनासाठी व त्याच्या संक्षिप्त चरित्रासाठी रात्सेलचा अभ्यासलेख पहा (३१). तसेच, श्मिटने या संदर्भात केलेली संक्षिप्त विधानेही पहा (७, १४७-४९) व ड्योरिंगची विधाने (२२, १६३-६५).

ज्या शास्त्रीय भूरूपवर्णनांचा अभ्यास करण्याची पिशेलची खटपट होती, त्याचा पाया भूशास्त्राचा खास अभ्यास केलेल्या भूगोलज्ञांनीच घातलेला होता. त्यातही रिक्टोफेनने लिहिलेले व १८७७ मध्ये प्रसिद्ध झालेले त्याचे चीनविषयक अभ्यासग्रंथ विशेष लक्षणीय आहेत (प्लेवी ८, ७४ ; हेटनर १६१, ९९ ; आणि विशेषतः ३२ ; पेंक १२८, ४३ ते ५१ व १३७ ; आणि श्मिट ७, १३५-१३६). रिक्टोफेनने दाखवून दिलेल्या दिशेने अभ्यास करणाऱ्या त्याच्या दोन अनुयायांचा उल्लेख करावयास हरकत नाही. त्यातील एक पेंक–याने भूशास्त्राचे प्रशिक्षण घेतलेले होते–याने लिहिलेला "Die Morphologie der Erdoberfläche" (भूपृष्ठाचे रचनाशास्त्र) हा अभिजात ग्रंथ १८९४ साली प्रथम प्रसिद्ध झाला. त्याचेच अनेक शिष्य आजही या क्षेत्रात कार्यशील आहेत. दुसरा डब्ल्यू. एम्. डेव्हिस या अमेरिकी अनुयायाचे काही ग्रंथ तर जर्मन साहित्यात समाविष्ट झालेले आहेत, याची नोंद आम्ही घेतलेलीच आहे.

परिणाम असा झाला की, भूगोलाचे प्रमुख क्षेत्र म्हणून भूरूपवर्णनाला प्रतिनिधित्व ज्यात प्राप्त झाले असा एक दीर्घ कालखंड जर्मनीत सुरू झाला व कालांतराने डेव्हिसच्या मार्गदर्शनाखाली तो अमेरिकेतही सुरू झाला (फिलिप्सन १४३, ९१). यामुळे जर्मनीत, या विषयाचा भूगोलात होत असलेला समावेश अनिवर्तनीयपणे प्रतिष्ठित झाला, असे दिसते ; मग त्या विरूद्ध कोणतेही तार्किक आक्षेप घेतले गेलेले असोत ! पण, अमेरिकेत, भूगोल व भूशास्त्र यांच्या संदर्भात भूरूप-वर्णनाचे स्थान अद्याप अनिश्चितच राहिले आहे [या प्रश्नाच्या अधिक चर्चेसाठी ११ व्या प्रकरणातील विभाग (ग) पहा].

भूरूपवर्णनाबाबत काहीही मतमतांतरे असोत, एक गोष्ट सामन्यपणे मान्य झालेली आहे. काही काळ तरी, पिशेलच्या नेतृत्वाखाली भूगोलाचा ओढा इतर निसर्गशास्त्रांच्या क्षेत्रात अतिक्रमण करण्याकडे दिसू लागला. वास्तविक, अन्य शास्त्रांनी त्या त्या क्षेत्रांवर दीर्घकालपर्यंत हक्क सांगितला व त्याची मशागतही केलेली होती. आता मात्र, भौतिक शास्त्रांच्या क्षेत्रात मोडणाऱ्या आणि पृथ्वीशी संबंधित असणाऱ्या सर्वच गोष्टींवर भूगोल आपला हक्क सांगणार की काय, अशी स्थिती काही काळपर्यंत निर्माण झाली (हेटनर २, ३१४ f) याच्या उलट मानवी भूगोलात मानवजातीवर्णन, शेतीसाठी जमिनीचा वापर, व्यापार, व लोकांची स्थलांतरे यांचा अंतर्भाव होत असे. उदाहरणार्थ : रिक्टोफेनने केलेले चीन व कॅलिफोर्निया यांचे अभ्यास (६९). या मानवी भूगोलाचे प्रतिपादन मुख्यत्वाने भूरूपांच्या संदर्भात, किंवा प्रादेशिक भूगोलाच्या अभ्यासांच्या मयदित, होत असे. प्रादेशिक अभ्यासांच्या विकासात, रिटरपासून रात्सेलपर्यंत झालेल्या बदलांतील दुवा म्हणून किर्शॉफचा विशेष उल्लेख करण्यास हरकत नाही. (३३ ; ३४).

या परिस्थितीचा एक महत्त्वाचा परिणाम असा, की भूगोलातील दोन प्रकारच्या द्वैतवादांची एकत्र भेसळ केल्याने माजलेला गोंधळ. क्रमबद्ध, प्राकृतिक भूगोल म्हणजेच आताचा अमानव घटकांचा भूगोल, आणि प्रादेशिक म्हणजेच मानव घटकांचा भूगोल. या गोंधळांचा

उल्लेख या आधी केलेलाच आहे. भूगोलात मानवाच्या अभ्यासाच्या अंर्तभावाचे समर्थन करण्यासाठी आणि त्याबरोबरच, त्या दिशेने होणाऱ्या अनिर्बंध विस्ताराला अडसर घालण्यासाठी या दोनही विभागांच्या स्वतंत्र हेतूंचे विधान करणे आवश्यक झाले. नैसर्गिक रूपधेयांचा अभ्यास स्वाधिकारानेच होत राहिला – मग त्या दिशेने कितीही विस्तार झाला तरी चिंता करण्याचे कारण नाही, असे मानले जाई. पण मानवी रूपधेयांचा अभ्यास फक्त त्यांचा नैसर्गिक रूपधेयांशी असलेल्या संबंधांच्या भाषेतच होत राहिला. या मताचे विधान कमी जास्तपणे स्पष्ट स्वरूपात प्रथम वाग्नेर, किर्शोफ व न्यूमान यांनी केले (हेटनरचे मत २, ३१६).

भूगोलक्षेत्राची विभागणी घटनांच्या दोन गटांत होणे आवश्यकच आहे असा विभागणीवर परखडपणे भर देणाऱ्यांनी तर्काचा आधार घेऊन विकासाला दोन विरुद्ध दिशा दाखविल्या. त्यांपैकी ज्याचे परिणाम अधिक महत्त्वाचे ठरले त्या मताचा मागोवा रात्सेलपासून सेम्पलद्वारा अमेरिकेपर्यंत घेता येतो. तेथे त्याचा तर्कशुद्ध व अंतिम आविष्कार " मानव आणि त्याचा नैसर्गिक परिसर यांचा अन्योन्य संबंध म्हणजेच मानवी पर्यावरणशास्त्राचे क्षेत्र हेच भूगोलाचे खरे क्षेत्र होय " या बॅरोच्या व्याख्येतून झाला (२०८). याच मताचे पडसाद इंग्लंडमध्ये (१९३) व जपानमध्ये (११०) उमटले. अमेरिकेत या मताला फारच महत्त्व आले असल्यामुळे, पुढे त्याचा तपशीलवार विचार आपल्याला करावा लागणारच आहे.

याच्याविरुद्ध दिशेचा निष्कर्ष – म्हणजेच मानवाला भूगोलातून पूर्णपणे वगळावा हे मत – खूपच आधी म्हणजे गेर्लांटच्या १८८७ च्या प्रबंधात, आग्रहपूर्वक मांडला गेला होता (७६). जेव्हा " भौतिक शास्त्रांच्या मार्गांनी भूगोलाचा विचार करण्यास पूर्ण मोकळीक होती अशा काळात " (ब्यूर्गर ११. २४), जरी त्याचे विधान केले गेले असले, आणि तो त्यामागील २० वर्षांच्या भूगोलविषयक विचारांच्या आंदोलनांचा तर्कशुद्ध निष्कर्ष असे दिसत असले, तरी त्याला मूलतः पोषक प्रतिसाद मिळाला नाही. हर्मान वाग्नेरने आपल्या लांबलचक टीकेत म्हटल्याप्रमाणे, गेर्लांटच्या वरकरणी तर्कशुद्ध प्रमेयाचे अटळ निष्कर्ष कार्यवाहीत आणावयाचे झाले, तर भूगोलातून इतक्या गोष्टींना फाटा द्यावा लागेल, की उरलेल्या क्षेत्रावरून ज्या भूगोलाचे नाव हे क्षेत्र प्रदीर्घ कालपर्यंत सांगत आले आहे तेच हे भूगोल क्षेत्र असे ओळखूही येणार नाही. हंबोल्टच्या, व त्याबरोबरच रिटरच्या, बऱ्याचशा भूगोलाला ज्यामुळे ' समुद्रास्तृप्यन्तु ' करावे लागेल अशा या प्रमेयाचा विचार करण्याची आवश्यकता फारशी कोणाला वाटली नाही (सुपान ७८, १५३ ; हेटनर २, ३१५ f). खरे पहाता गेर्लांटने ज्या वादाची सुरूवात करून दिली त्या वादाच्या नंतरच्या भौगोलिक विचारांच्या विकासावर झालेल्या एखाद्या निश्चित परिणामाकडे बोट दाखविणे अवघड होईल. म्हणून, आणि अन्य प्रश्नांच्या संदर्भात या नावाचा पुन्हा विचार करावयाची संधी पुढे मिळणार असल्यामुळे (प्रकरण ३ रे, विभाग ' अ ' व ' ब ') त्यातील मागण्यांचे परीक्षण येथे करण्याची आवश्यकता नाही.

प्राकृतिक भूगोलाचे सघन संस्करण करण्याच्या दिशेने ज्या आंदोलनाला सुमारे दोन दशकांपूर्वी पिशेलने प्रेरणा दिली तो झोका अत्युच्च बिंदूला पोहोचला तेव्हाच " भूगोल हे एक शुद्ध भौतिकशास्त्र आहे " ही घोषणा करण्यात आली. गेर्लांटच्या प्रस्तावाचे हे ऐतिहासिक महत्त्व वाग्नेरने काही वर्षांनंतर सुचविले (८०, ३७४-७५). श्मिटने म्हटल्याप्रमाणे या आंदोलनाच्या प्रवाहाशी " अगदी सुसंबद्ध " असेच हे गेर्लांटचे मत होते (७, १५६). तरीही कोणताच भूरचनाशास्त्रज्ञ त्याच्या तर्कसिद्ध टोकापर्यंत ते ताणण्यास उत्सुक नव्हता. खरे पहाता, शक्यता अशी आहे की, त्याच्या या तर्कटामुळेच भूगोलाचा तोल किती ढळला आहे ही गोष्ट विचारवंतांना कळून चुकली असावी.

प्रत्यक्ष भूगोलकार्यात आणि पद्धतितंत्राच्या विचारसरणीतही याचे प्रति-आंदोलन आधीच सुरू झाले होते. Anthropogeographie oder " grundzinge der anwendung der Erdkunde auf die Geschichte ", (इतिहासाच्या आधाराने करावयाच्या भूगोलाच्या उपायोजनाची मूलतत्वे अथवा मानववंशीय भूगोल), या नावाचा रात्सेलने १८८२ साली प्रसिद्ध केलेला ग्रंथ हा पद्धतितंत्रांच्या विकासावर अप्रत्यक्षपणे प्रभाव पाडणारी भूगोलाच्या इतिहासातील एक प्रमुख घटना होती (७२). तेव्हापासून रात्सेलच्या नावाशी " मानवाचा भूगोल " (Anthropo geography) हा शब्दप्रयोग निगडित झाला. ती संज्ञा सर्व निसर्गशास्त्रांतील, आणि विशेषतः प्राणिशास्त्रातील, त्याने संपादिलेल्या पार्श्वभूमीची प्रतिमा स्पष्ट करणारी असली, तरी ती गैरसमज निर्माण करणारी आहे. " मानवाचा भूगोल " या संज्ञेचा अर्थ व्यक्ती आणि वंश यांच्या परिभाषेत लिहिलेला मानवी भूगोल म्हणजेच मानववंशशास्त्रीय भूगोल, असा होतो. प्रत्यक्षात मात्र भूमीच्या संदर्भात मानवाने केलेले कार्य, विशेषेकरून मानवाच्या सामाजिक जीवनातील निर्मिती या प्रमुख हेतूंबद्दल त्याला विशेष आस्था वाटत असे—या बाबतीत कदाचित मॉरित्स वाग्नेरला धन्यवाद द्यावे लागतील (श्मिट ७, १५७ ते ६१).

अर्थातच, रिटरप्रमाणे, रात्सेलनेही निसर्गशास्त्रांचा अभ्यास केलेला होता. त्यामुळेच, भूगोलातून मानवाचा अभ्यास व भौतिक शास्त्रे यांच्यामधील दुवा सांधणारे एक क्षेत्र त्याच्या हाती आले. रिटरच्या बाबतीत जे घडले ते रात्सेलच्या बाबतीतही घडले. रात्सेलचे पुष्कळसे कार्य मानवी भूगोलाच्या (Human Geography) क्षेत्रातच झाले, ही वस्तुस्थिती असल्यामुळे, पुष्कळांनी त्याच्या पूर्वायुष्याच्या पार्श्वभूमीकडे डोळेझाक केली. म्हणूनच, " त्याने वर्तमानपत्रद्वारा भूगोलक्षेत्रात प्रवेश केला " या सॉरच्या विधानाला धड अर्धसत्यही म्हणता येणार नाही (८४, १६६). रात्सेलच्याच सांगण्याप्रमाणे पहाता, त्याचा व्यवसाय त्याच्या निसर्गप्रेमामुळेच निवडला गेला. " कोणत्यातरी एका प्रकारच्या शास्त्राभ्यासाला वाहून घेण्याच्या " त्याच्या पहिल्या ध्येयाशी त्याने कधीच प्रतारणा केली नाही. त्याने प्राणिशास्त्रातील, भूशास्त्रातील व तौलनिक शरीररचनाशास्त्रातील ' पंडित ' ही पदवी (Doctorate) संपादन केली होती. त्याने प्राणिशास्त्रातील आपले संशोधन दक्षिण फ्रान्समध्येही चालू ठेवले होते. पण पैसे मिळवण्याचे एक साधन म्हणून Kolnische

Zeitung (वसाहतींचे वृत्तपत्र) या वर्तमानपत्रासाठी प्रवासवर्णनेही पाठवत असे. याचा परिणाम असा झाला, की त्या वर्तमानपत्राच्या शास्त्रीय विषयांसाठी प्रवासी बातमीदार म्हणून त्याची नेमणूक झाली. या संधीचा फायदा घेऊन त्याने भूगोलाभ्यासक बनावे असा कार्ल आन्द्रे याने त्याला सल्ला दिला. प्रथम जरी, प्राणिशास्त्रज्ञ या नात्याने, त्याने यू. एस. ए., मेक्सिको व युरोपिय देश यांतून सहा वर्षेपर्यंत प्रवास केला, तरी नंतर त्याने आपले क्षेत्र खरोखरच बदलले. त्याची पहिली काही प्रकाशने अर्थातच प्राणिशास्त्रासंबंधी आहेत. त्याच्या भूगोलविषयक कार्यात आल्प्समधील हिममर्यादांच्या प्राकृतीक अभ्यासांचा समावेश होतो (३५).

मानवी भूगोल शास्त्रीय पायावर प्रतिष्ठित करणे हा रात्सेलचा हेतू होता. रात्सेल " निसर्गशास्त्रांनी घालून दिलेल्या दिशेला प्रामाणिक राहिला ". तसे करण्यात त्याला रिटरपेक्षा कितीतरी अधिक यश आले, असा निष्कर्ष श्मिटने काढला. विविध घटना सुसंघटित करून, व तद्‌विषयक संकल्पना आणि हाती आलेल्या निर्णयांचे अर्थवाही संबंध प्रस्थापित करून, मानवी भूगोलाच्या या विभागाला, म्हणजेच सांस्कृतिक भूगोलाला एक शास्त्रशुद्ध क्रमबंध म्हणून प्रतिष्ठा त्याने मिळवून दिली, हेच त्याचे महत्कार्य होय (७, १५८). सामान्यपणे मूलतः तो रिटरचा अनुयायी होता असे मानले जाते. तरी एका अर्थी, हंबोल्टने आपल्या प्राकृतिक भूगोलाच्या अंतिम विभागात सुचविलेल्या तत्त्वानुसार केलेला मानवाच्या भूगोलाचा पहिला आणि मोठा क्रमबद्ध अभ्यास रात्सेलच्या ' मानववंशीय भूगोलाच्या ' रूपाने (Anthropogeography) प्रकट झाला. तेव्हापासून त्याच्या कार्यावर टीकेची झोड उठविली गेली होती. तरी, मानव आणि अमानव अशा दोनही प्रकारच्या भूगोलाच्या बाजू क्रमबद्ध अभ्यासांचे विषय होऊ शकतात याचे प्रात्यक्षिक त्याच्या लिखाणातून झाले व त्यावरूनच प्रादेशिक भूगोलातील गोष्टींचा अन्वयार्थ अधिक विश्वसनीय रीतीने लावता येऊ लागला. हे त्याच्या कार्याचे महत्त्व त्या टीकेमुळे कमी होत नाही. [रात्सेलच्या कार्याच्या संपूर्ण रसग्रहणासाठी विशेषतः हासर्टचा अभ्यास-लेख पहा (३६)].*

एका महत्त्वाच्या बाबतीत मात्र, रात्सेलचा दृष्टिकोण, हंबोल्टच्या दृष्टिकोनापेक्षा वेगळा होता. नैसर्गिक शास्त्रांच्या दृष्टिकोणापासून हेतुपुरःसर सुरूवात करून पृथ्वीच्या नैसर्गिक परिस्थितींच्या भाषेतच रात्सेलने आपला मानववंशीय भूगोल प्रथम सुसंघटित केला ; आणि नंतर, त्यांचा अभ्यास मानवी संस्कृतींशी असलेल्या त्यांच्या संबंधातून केला. मूलतः प्राकृतिक भूगोलाशी संबंध ठेवणाऱ्या भूगोलज्ञांना ही कार्यपद्धतीच प्रिय होती. तरी, किर्शॉफ सारख्या अन्य काही भूगोलज्ञांनी मानवी भूगोलाचा अभ्यास याच्या विरुद्ध पद्धतीने केलेला होता. मानवी परिस्थितींचा नैसर्गिक परिस्थितींच्या संदर्भात अभ्यास केला होता. आपल्या ग्रंथाच्या दुसऱ्या खंडात रात्सेलनेही बऱ्याच अंशी या व्यस्तक्रमाचाच अवलंब केला. पण त्याच्या पुष्कळशा शिष्यांनी, त्यांतील विशेष उल्लेखनीय म्हणजे या देशातील

---

* पुरवणी टीप ११ पहा.

सेम्पलने, रात्सेलने प्रथमपासून घालून दिलेली दिशाच कायम राखली.* आणि अशा रीतीने मानवी भूगोलासंबंधीची एक कार्यपद्धती प्रस्थापित केली. मानवी भूगोला वरील या कार्यपद्धतीचा प्रभाव काही दशकेपर्यंत, निदान या देशात तरी, टिकून होता. तथापि, जर्मन भूगोलज्ञांनी आपली कार्यपद्धती खूप आधीपासून बदलून टाकली होती. त्याचे श्रेय विशेषतः हेटनर आणि श्लूटर यांच्या प्रयत्नास द्यावे लागेल. (१३० ; १३१). दरम्यानच्या काळात, नैसर्गिक पर्यावरणाचा मानवावर पडणाऱ्या प्रभावाच्या भाषेत मानवी भूगोलाचा अभ्यास होता. त्यामुळेच, " अशा संबंधयोगांचा अभ्यास हेच भूगोलाचे सार आहे " या संकल्पनेच्या दिशेने वाटचाल सुरू झाली. ही संकल्पना सामान्यतः, पण बहुधा चुकीनेच, रात्सेलच्या नावाशी जोडली जाते (विशेषतः " रिक्टोफेन, रात्सेल आणि त्यांचे समकालीन " यांच्या विरुद्ध श्लूटर असा सामना रंगविण्याचा डिकिन्सनचा प्रयत्न गैरसमज निर्माण करणारा आहे (२०२, २ ; C/o श्लूटर १३१, ५०७ f).

क्रमबद्ध मानवी भूगोलातील एका महत्त्वाच्या अभ्यासग्रंथाच्या प्रकाशनाच्या नंतरच्या वर्षात, रिक्टोफेनने आपल्या लायब्त्सिग येथील उद्घाटनाच्या भाषणात जे विधान सादर केले त्याला आधुनिक जर्मन भूगोलाचे कार्यक्रमान्वित विधान होण्याचा मान मिळाला (७३). १८७७ साली चीनवर लिहिलेल्या पहिल्या खंडाच्या उपसंहारात त्याने केलेल्या विधानाने रिटर व हम्बोल्ट या दोघांनाही मान्य असलेल्या भूगोलाच्या संकल्पनेचे पुनर्विधान करण्याचा त्याचा प्रयत्न होता (६९, I, ७२९-३९). पण हेट्नर म्हणतो त्याप्रमाणे, या विधानाने भूगोलावर घातलेल्या मर्यादांचे उल्लंघन त्याच्याकडून त्याच ग्रंथात झालेले दिसते (१२६, ५६०). त्याच वर्षी, क्षेत्रीय अथवा भूवंटनात्मक तत्त्व हाच भूगोलाचा प्रभावी निकष असावा, असे मत मार्थेने स्पष्टपणे मांडले ; आणि असे करताना, ग्रीक भूगोलकारांकडून उचललेल्या आणि पिशेल आदि पूर्वीच्या अनेक ग्रंथकारांनी वापरलेल्या भूवंटनशास्त्र आणि क्षेत्रवर्णनी भूगोल याच शब्दांचा त्याने आग्रहपूर्वक वापर केला. त्याबरोबरच, हंबोल्टच्या भूगोलाचा एक विशेष भाग मानला गेलेल्या वितरणाच्या अभ्यासावरही मार्थेने भर दिला. आणि " वस्तूंच्या स्थलादि अभ्यास म्हणजे भूगोल " अशी साध्या भाषेतली सुटसुटीत व्याख्या त्याने तयार केली (७० ; विशेषतः ४२६-२९). मार्थे स्वतःच ज्या समितीचा सभासद होता तिने मांडलेल्या, आणि १८८२ च्या व्हेनिस येथील आंतरराष्ट्रीय भूगोलपरिषदेने मान्यता दिलेल्या, भूगोलाच्या स्वरूपासंबंधीच्या एका विधानात मार्थेच्या या संकल्पनेचा पुनरुच्चार झालेला आढळतो (७१, ६७९).

मग, रिक्टोफेनने आपल्या युगप्रवर्तक भाषणात मार्थेची ही भूवंटनात्मक संकल्पना उचलून धरली, आणि तिलाच आपल्या भूगोलविषयक संकल्पनेचे पायाभूत तत्त्व केले (हेटनर १२६, ५५२). या व्याख्यानात रिक्टोफेनने आपण स्वतः " हंबोल्ट व रिटर यांच्या कल्पना

*सेम्पलचा येथे दिलेला संदर्भ चुकीचा आहे, तिच्या कार्यात या दोन्ही पद्धती प्रात्यक्षिकासह प्रस्तुत आहेत (२०५).

वृद्धिंगत करणारे त्यांचे प्रत्यक्ष वारस आहोत आणि सुसंगत अर्थाने पिशेलच्या आकांक्षांची पूर्तता करत आहोत ", असे दाखवून दिले. विकासमार्गात स्वतःला चपखळपणे बसवण्याइतके आणि स्वतःचे स्थान निश्चित करण्याइतके भक्कम आणि निर्लेप इतिहासज्ञान त्याच्याजवळ होते, " असे प्लेवीने म्हटले आहे (८, ७३ ; तसेच पेंक १२८, ४३ ते ५१ पहा).

रिक्टोफेनने भूशास्त्राचे प्रशिक्षण घेतलेले होते, आणि भूगोलज्ञ म्हणून त्याला भूरूपरचनाशास्त्राची विशेष गोडी होती. शास्त्र-अकादमीसाठी त्याची निवड झाल्यावर इतिहासप्रेमी रिटरच्या " इतिहास-तत्वज्ञान " गटात सामील होण्याऐवजी, " शास्त्र-गणित " गटात सामील होणे त्याने पसंत केले (८१, ६०५). तरीही भौगोलिक विचारांच्या विकासात रिटरच्या कार्याचे मूल्य त्याने बरोबर ओळखलेले होते. हंबोल्ट व रिटर यांच्या पार्श्वभूमीवर त्याचे व्याख्यान वाचले, तर एक गोष्ट सहज लक्षात येईल की त्यांच्यांतील विरोधापेक्षा त्यांच्या संकल्पना व त्यांचे कार्य यातील साम्यातच त्याला कितीतरी अधिक गोडी वाटली. म्हणूनच हंबोल्टच्या पावलावर पाऊल टाकून भूगोल व निसर्ग-शास्त्रे यांच्यांतील निकट संबंध पुन्हा प्रस्थापित करणे त्याला शक्य झाले ". त्याबरोबरच रिटरच्या कार्यक्रमाचीही त्याच्या खास जागी पुन्हा नियुक्ती करू शकला (श्मिट ७, १५३-५६ ; C/o ड्योरिंग २२, १६५ f ; हेटनर १२६, ५५२ f ; आणि ३२).

रिक्टोफेनच्या विशिष्ट विधानांचा विचार करण्याची येथे गरज नाही. हेटनरने नंतर दाखवून दिल्याप्रमाणे, जरी त्याने भूगोलविषयक विचारांना भविष्यकाळासाठी दिशा दाखवून दिली, तरी त्याला त्या क्षेत्राची रेखीव संकल्पना बांधण्यात यश आले नाही. पण, सारभूत विचार त्याच्या चर्चेतून स्पष्ट झालेलेच होते ; भूपृष्ठाच्या निरनिराळ्या भागांतील कार्यकारणभावाने संबद्ध असलेल्या घटनांमधील फरकांचा अभ्यास भूगोलाला करावयाचा असतो (१६१, १०६ f ; ७१, २५ ff). त्याचप्रमाणे क्रमबद्ध भूगोल व प्रादेशिक भूगोल यांचा एकमेकाशी संबंध आणि त्या दोघांचा एकूण क्षेत्राशी संबंध याबाबतचे रिक्टोफेनचे विवेचन भूगोलविषयक विचारांच्या विकासात तितकेच महत्त्वाचे ठरले. एखाद्या क्षेत्रातील घटनांच्या कार्यकारण संबंधांचे आकलन होण्यास मदत करणे हाच क्रमबद्ध भूगोलाचा प्रत्यक्ष हेतू आहे (४२ f). या आकलनाचे स्वरूप काही तत्त्वांच्या रूपाने व्यक्त करता येईल ; आणि या तत्त्वांचे वेगवेगळ्या प्रदेशांचा अन्वयार्थ लावण्याचे कामी उपयोजन करता येईल. यालाच भूवंटनशास्त्र असे म्हणतात (स्पष्टीकरण न देता केलेले वर्णन म्हणजे क्षेत्रवर्णनी भूगोल हा पहिला टप्पा. यातूनच क्रमबद्ध भूगोलासाठी सामग्री पुरवलेली असते. आणि क्रमबद्ध भूगोलाचा आधार घेऊन स्पष्टीकरणे देत केलेला प्रदेशाचा अभ्यास म्हणजेच भूवंटनशास्त्र हा शेवटचा टप्पा. असे भेद रिक्टोफेन करत असला तरी, या भेदकल्पनेचे अनुकरण झालेले दिसत नाही).

भूगोलक्षेत्रातील मोठा भेद म्हणजेच क्रमबद्ध भूगोल व प्रादेशिक भूगोल (भूवंटनशास्त्र) यांमधील भेद. हा अभ्यासाच्या सामग्रीतील फरक नव्हता–भूगोलक्षेत्रात अभ्यासाच्या सामग्रीवर मर्यादा घालणे अशक्य आहे हे रिक्टोफेनने ओळखलेले होते–तर तो अभ्यासांच्या पद्धतीतील फरक होता. सामग्रीचे स्वरूप संकीर्ण असल्यामुळे क्रमबद्ध अभ्यासात त्यांच्या

अभ्यास वर्गवारीने करावा लागतो. आणि याच आधारावर रिक्टोफेन दोन प्रमुख गट न मानता तीन गट मानतो. भौतिक घटना, जीवविषयक घटना आणि मानवी घटना. मानव हीही एक जीववस्तू आहे. मग त्याचाही, काही मर्यादिपर्यंत, इतर प्राण्यांच्या अभ्यासात समावेश करण्यास हरकत नाही. हे खरे असले, तरी त्याचे भूपृष्ठाशी असलेले संबंध अन्य प्राण्यांच्या दृष्टींनी महत्त्वाच्या नसलेल्या अनेकविध गोष्टींनी नियंत्रित असतात. या वस्तुस्थितीमुळेच, मानवाच्या अगदी निराळ्या प्रकाराने विचार करणे आवश्यक असते. भूवंटनात्मक अभ्यासात, घटनांच्या सर्व गटांमध्ये असलेल्या कार्यकारण संबंधामुळे ते कोणत्याही एका एककाच्या अभ्यासासाठी एकत्रित करता येतात. शास्त्राच्या कोणत्याच संकुचित कल्पनेने जखडलेला नसल्याने, हंबोल्टप्रमाणेच, रिक्टोफेनलाही एकत्र अस्तित्वात असलेल्या आणि कार्यकारणसंबंधांनी एकत्र बांधल्या गेलेल्या विविध प्रकारच्या वस्तूंचा अभ्यास करणारे एकच शास्त्र असावे यात वावगे काहीच दिसले नाही.

## ड–प्रचलित भूगोलाची लगतची पार्श्वभूमी

रिक्टोफेनने भूगोलासाठी घालून दिलेला कार्यक्रम आणि नंतर हेटनरने भरीस टाकलेले त्याचे संपूर्ण विवरण (प्रथम १८९५ मध्ये आणि १९०५ मध्ये अगदी पूर्णपणे) या दोन गोष्टींमुळे, क्रमबद्ध भूगोलाच्या निष्कर्षांच्या भाषेत प्रदेशांचे अन्वयार्थ लावणारे अभ्यास प्रादेशिक भूगोलाच्या क्षेत्रात करण्याचा मार्ग तयार झाला. वास्तविक ही गोष्ट भूगोलाला नवी नव्हती. हे एक प्रकारे हंबोल्टच्या पद्धतीकडे परत वळण्यासारखेच होते (२, ३०९, किंवा १६०, ८६). प्रथम रिटरच्या अनुयायांनी क्रमबद्ध भूगोलाकडे किमान लक्ष देऊन प्रादेशिक भूगोलाचा अभ्यास चालू ठेवल्यामुळे, व नंतर पिशेलच्या अनुयायांनी प्रामुख्याने क्रमबद्ध भूगोलालाच वाहून घेतल्यामुळे, या तत्त्वाकडे जरी दुर्लक्ष झालेले होते, तरी ते पूर्णतया दृष्टीआड कधीच झालेले नव्हते. पण रिक्टोफेनने आपल्या व्याख्यानात क्रमबद्ध भूगोलाकडे तपशीलवार लक्ष दिल्यामुळे, प्रादेशिक भूगोलाला गौणत्व आले, असा सूपानचा समज झाला. म्हणूनच १८८९ साली, प्रादेशिक भूगोलाची मशागत वारंवार होत जावी असे आग्रहाचे आवाहन सुपानने केले (७८).[२७] त्याचप्रमाणे, प्रत्यक्ष उदाहरणे घालून देऊन, तसेच आपल्या पद्धतितंत्रविषयक विधानांनी आणि Geographische Zeitschrift या १८९५ साली स्वतःच सुरू केलेल्या " भौगोलिक नियतकालिकातील "

२७. वाग्नेरने आपले पद्धतितंत्रविषयक निवेदन सादर केले तेव्हाच, म्हणजे १८८२ इतक्या पूर्वी, प्रादेशिक भूगोलाच्या महत्त्वाची चर्चा केली. १८९१ च्या त्याच्या निवेदनातील सुमारे दहा पाने तर या विषयालाच वाहिलेली होती (८०, ३८५ ते ९५). या दुसऱ्यात त्याने प्रथम आपल्या पहिल्या निवेदनाचा ओझरता उल्लेख केला असून त्यालाच एक तळटीप जोडली (३७५). याच निवेदनाच्या संदर्भात लायलीने " प्रादेशिक भूगोल . . हा आता कुठे, म्हणजे १८९१ साली, वाग्नेरच्या नजरेत येऊ लागला आहे ". असे विधान केले आणि " ही नजरही फक्त ओझरती आहे " अशी त्यावर टीप दिली. (२२२, २५६).

प्रकाशनांनी, अशा तीनही प्रकारांनी , हेटनरने प्रादेशिक अभ्यासांना मोठ्या जोमाने प्रोत्साहन दिले. तरीही, भूगोलाच्या या शाखेला क्रमबद्ध, विशेषतः भूरुपरचनाशास्त्रविषयक, अभ्यासांच्या बरोबरीचे स्थान, सापेक्षपणे, अलीकडच्या काळापर्यंत मिळविता आले नाही. विशेषतः पहिल्या जागतिक महायुद्धामुळे युरोपीय क्षेत्रांच्या, त्यातही जर्मनीच्या ताब्यातील क्षेत्रांच्या, एकूण स्वरुपावर जर्मन विद्वानांचे लक्ष केंद्रित झाल्यावर त्या शाखेला तसे महत्त्व प्राप्त होऊ लागले. प्रादेशिक भूगोलाचा पुरस्कर्ता म्हणून हेटनरचा वारंवार उल्लेख होत असतो, ही वस्तुस्थिती असली, तरी त्याने क्रमबद्ध भूगोलाच्या विकासकार्याचा उत्साहभंग केला असा गैरसमज करुन घेणे योग्य नाही. गेल्या सुमारे चाळीसपेक्षा अधिक वर्षांच्या काळात या दोन प्रकारांपैकी कोणत्यातरी एकाच प्रकारावर आळीपाळीने कमीजास्त भर दिला जात असतानाच, या दोनही दृष्टिकोणातून भूगोलविषयक अनुसंधान कार्य झाले पाहिजे अशी भूमिका हेटनरने सातत्याने घेतलेली आहे (१२१, २ ; C/o २, ३१०). १९०३ मध्ये त्याने केलेला पहिला पद्धतितंत्रविषयक तपशीलवार अभ्यास क्रमबद्ध प्राकृतिक भूगोलाची पायाभूत संकल्पना व तत्त्वे यांच्यापुरताच मर्यादित होता (१२३). १९०७ सालच्या अभ्यासात त्याने क्रमबद्ध मानवी भूगोलासंबंधी विचार केला (१३०) आणि १९०५ नंतरच्या पुष्कळशा अन्य लेखांतून, त्याने क्रमबद्ध अथवा सर्वसामान्य भूगोल हाही भूगोलाचाच एक समन्वयकारी भाग आहे असे प्रतिपादन करुन, त्या शाखेच्या महत्त्वावरही भर दिला (विशेषतः १४०). शेवटी, बऱ्याच अलीकडच्या वर्षांत, त्याने स्वतः भौगोलिक रुपधेयांच्या विविधप्रकारांचे विवेचन करणारे तपशीलवार क्रमबद्ध प्रबंध सादर केले. प्रथम भूरचनांवर (३६१) व नंतर हवामानावर (३६२) प्रबंध लिहिले ; व शेवटी संपूर्ण क्रमबद्ध भूगोलाचा समावेश करणारा एक चार खंडांचा ग्रंथ (३६३) त्याने प्रसिद्ध केला. त्याने चौथ्या खंडाच्या केवळ शंभर पानांपेक्षाही लहान भागात मानवी भूगोल आटोपता घेतला आहे. भूगोल क्षेत्राच्या मानवी भूगोल या भागाला एक संपूर्ण खंड वहाण्याची एक योजना हेटनरने आखून ठेवली आहे. त्याचे हस्तलिखितही जवळ जवळ पूर्ण आहे. या ग्रंथाचे प्रकाशन कोणत्याही कारणाने आडून राहू नये अशी देशोदेशींच्या भूगोलज्ञांची इच्छा असणार.*

या दोन प्रकारांच्या भौगोलिक कार्यातील परस्परसंबंधांबाबतच्या चर्चेत, हेटनरने थोड्याशा अपरिचित परिभाषेचा प्रथमच वापर केला. ती परिभाषा अशारीतीने बनवलेली होती, की त्यामुळे या दोन प्रकारांत काटेकोर भेद असा नाहीच या गोष्टीवर भर देणे सुलभ व्हावे. कोणत्याही विस्तृत क्षेत्राचा प्रादेशिक अभ्यास करत असता, वेगवेगळ्या भौगोलिक रुपधेयांतील उल्लेखनीय फरकांचा क्रमबद्ध पद्धतीने अभ्यास करणे अशक्यच आहे. उलटपक्षी, कोणत्याही एका विशिष्ट प्रकारच्या रुपधेयाचा क्रमबद्ध अभ्यास केवळ तेवढ्या एकाच प्रकारच्या संदर्भात केला जात नाही, तर त्या रुपधेयाच्या अन्य, एक वा अनेक,

---

* पुरवणी टीप १२ पहा.

रुपधेयांशी असलेल्या वितरणात्मक संबंधांच्या संदर्भात केला जातो – म्हणजेच, त्यांच्यापैकी प्रत्येक प्रकार निरनिराळ्या क्षेत्रात जसा बदलत जातो, तसे त्यांचे परस्पर संबंधही बदलतात. क्रमबद्ध भूगोलातील अभ्यास आणि एकाच वस्तूच्या अभ्यासाला वाहिलेला विशिष्ट क्रमबद्ध शास्त्रांनी केलेले अभ्यास या दोहोंतील भेदांवर भर देण्याचा त्यांचा हेतू होता. वास्तविक हा भेद हंबोल्टने यापूर्वीच स्पष्टपणे मांडलेला होता, आणि तरीही तो आता नजरेआड झालेला होता. (विशेष पहा ६०, I, ४८ ff ; हेटनरच्या भूगोलविषयक मतांचा हंबोल्टच्या मतांशी असलेल्या संबंधांसाठी पहा ड्योरिंग २२, १६६ ते ६८).

एकोणीसाव्या शतकातील जर्मन साहित्यात व्हेरेनियसने प्रथम वापरलेल्या " सामान्य भूगोल " आणि " विशिष्ट भूगोल " (Special Geography and General Geography) या संज्ञांची भूगोलाच्या बऱ्याच मोठ्या भागातून उचलबांगडी झाली आणि त्यांची जागा अनुक्रमे allgemeine Erkunde व Länderkunde या दोन संज्ञांनी घेतली. अर्थातच त्यामागे परदेशी उद्‌गमाच्या शब्दाचे उच्चाटन करण्याची उत्कट भावना होती. पण भौगोलिक अभ्यासाच्या या दोन प्रकारांच्या दरम्यान एक मोठी दरी असते येवढी गैरसूचना देऊनच या दोन संज्ञा थांबल्या नाहीत, तर " पृथ्वीचे सामान्य शास्त्र " (General Science of the Earth – allgemeine Erkunde) या संज्ञेतून भूगोल या शब्दाशी सामान्यतः निगडित असलेल्या संकल्पनेपेक्षा अगदी वेगळी संकल्पना व्यक्त होऊ लागली. "Erkunde" हे Geography (भूगोल) या शब्दाचे केवळ जर्मनीकरण आहे, ही गोष्टच लोक विसरुन गेले, आणि एकाने तर ती संज्ञा शब्दार्थनिच मान्य करुन " संपूर्ण पृथ्वीचा अभ्यास करण्याचे महत्कार्य भूगोलाला करावयाचे आहे असे अनुमान त्यावरुन काढले ", अशी टीका पेंकने अगदी अलीकडेच या संदर्भात केली आहे. ज्याच्या हाताखाली हेटनरने अभ्यास केला, त्या गेर्लांटनेच या विचारधारेचा तिच्या अंतिम निष्कर्षापर्यंत मागोवा घेण्याचा प्रयत्न केला होता. वरवर पहाता, रिक्टोफेनही त्यामुळे गोंधळून गेला होता (९०, I, ३९). हेटनरला जाणवलेला याचा एक दुष्परिणाम असा होता, की संपूर्ण पृथ्वीचा अभ्यास करण्याच्या कल्पनेने भूगोलज्ञ भारावून जात, पण तसे करत असताना त्यातील भूवंटनात्मक दृष्टिकोणच गमावून बसत. त्यामुळे, वाग्नेर समजत होता त्यापेक्षाही अधिक व्दैतवादी स्वरूप भूगोलाला प्राप्त झाले ; आणि प्रादेशिक भूगोलाभ्यासासाठी आवश्यक असलेल्या घटनांचे अन्योन्य संबंध स्पष्ट करणाऱ्या सामान्य संकल्पना आणि तत्त्वे निर्माण करण्याचे काम क्रमबद्ध भूगोलाच्या अभ्यासकांकडून होईनासे झाले. भूगोलक्षेत्राच्या पूर्णतया भिन्न अशा या दोन

प्रकारच्या लेखनकार्यात होत असलेल्या या विभागणीवर मात करण्यासाठी भूवंटनात्मक संकल्पना ही प्रादेशिक अभ्यासात मानली जाते तितकीच क्रमबद्ध अभ्यासातही प्रभावी मानली गेली पाहिजे, आणि हंबोल्टच्या लिखाणातही ती तशी आहे, असे हेटनर मानत आला. आपल्या या दृष्टिकोणावर अधिक भर देता यावा म्हणूनच, त्याने आपल्या क्रमबद्ध, किंवा सामान्य, भूगोलाच्या रुपरेषेला तौलानिक प्रादेशिक भूगोल (Verglei chende Länderkunde) हेच शीर्षक दिले. या ग्रंथाचा आराखडा १८८९ साली, म्हणजे गेर्लांटने आपले मत मांडल्यावर दोनच वर्षांनी, पूर्ण झाला होता. भूगोलाभ्यासाच्या या प्रकारच्या Länderkunde किंवा प्रादेशिंक भूगोलाशी असलेला प्रत्यक्ष संबंध त्याने आपल्या १८९५ व १८९८ च्या अभ्यासलेखात स्पष्टपणे मांडला आहे. ज्या लेखांच्या सहाय्याने हेटनरने या दोन प्रकारांचा परस्परसंबंध अगदी पूर्णत्त्वाने स्पष्ट केला त्या आपल्या पद्धतितंत्रविषयक अभ्यासांतून ही संज्ञा जरी त्याने गाळली होती (१६१, ३९८ ते ४०४), तरी चाळीस वर्षांपूर्वी लिहिलेल्या या रुपरेषेची सांगता करताना मात्र त्याने ते मूळचेच शीर्षक कायम केले. [२८]

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धाचा हा कालखंड सोडून पुढे जाण्यापूर्वी 'अभिजात कालखंड' व 'अभिजातपूर्व कालखंड' यांतील भूगोलाची काही खास लक्षणे येथे लक्षात घेणे आवश्यक आहे; कारण, निदान काही काळ तरी ती नजरेआड झालेली होती. भूगोलातील पूर्णरुपतेची (Ganzheit) संकल्पना ही त्यापैकीच एक आहे. भूगोलाच्या इतिहासात ब्यूर्गरने या संकल्पनेच्या विकासाचे सर्वेक्षण केले आहे. पण, या कालखंडात जर्मन भूगोलात ती महत्त्वाची मानली जात असे याबाबत फारच थोडा विश्वसनीय पुरावा त्याने सादर केला आहे. पृथ्वी ही एक सेंद्रिय स्वयंपूर्ण (वस्तू) आहे, या रिटरच्या संकल्पनेचा पुनरुद्धार रात्सेलने काही

---

२८. मूळच्या हस्तलिखिताबद्दलचा हा आदरभाव दुर्दैवीच म्हटला पाहिजे, असे पेंकने मत दिले. आपल्या "सामान्य भूगोलाच्या" ग्रंथातून समुद्रांचा अभ्यास वगळलेला असल्यामुळे "तौलनिक प्रादेशिक भूगोल" हे नावच उचित आहे असे मानण्यास हे आणखी एक कारण आहे अशी भलावणही हेटनरने केली (पेंक ९०, I, ३८ ते ४० ; II, ३१-३२ ; हेटनर ३६४, IV, प्रस्तावना). पण, हेटनरच्या या संज्ञेमुळे एका अमेरिकन अभ्यासकाचा पूर्णपणे गैरसमज झाला (C/o २२२, २५६) ही गोष्ट पेंकने घेतलेल्या आक्षेपाला पुष्टी देणारीच आहे. पण, पेंकने जसा समजून घेतला तसा त्याने शीर्षकापलीकडचा अर्थ समजून घेतला असता, तर हेटनरला काय म्हणावयाचे आहे हे समजण्यास नड पडणार नव्हती. काही असो, एका परकीय भाषेतील शब्दप्रयोगांच्या या वादात आपल्याला शिरावयाची जरुरी नाही.

या पत्रिकेत वापरलेल्या संज्ञा आता अमेरिकेतील भूगोलात पुष्कळच मान्यता पावल्या आहेत, आणि लॅटिनोभ्दव अन्य भाषांत त्यांचा तात्काळ वापरही होऊ लागला. पण, त्याच संज्ञा जर्मनमध्ये भाषांतरित करताना मात्र यथार्थ प्रतिसंज्ञा मिळू शकत नाहीत. सुदैवाने, इंग्रजी भाषा कोणत्याही एकाच विशिष्ट भाषेत निर्माण झालेले शब्द वापरण्यास बांधलेली नाही.

संदर्भात केलेला असला, आणि ती संकल्पना व्हिडाल डी. लब्लाक या फ्रेंच ग्रंथकाराला विशेष प्रिय असली, तरी एकंदरीने फारच थोड्या जर्मन अभ्यासकांनी तिची दखल घेतलेली होती (१८४, ५). गूढ गृहीत कल्पना आणि गैरसमज निर्माण करणारे दृष्टान्त यांच्या ऐवजी प्रत्यक्ष व अचूक वर्णनांनाच शास्त्रविषयांत वाढती मागणी होती. या संकल्पनेविरुद्ध गेर्लांटने केलेला युक्तिवाद परिणामकारक तर होताच, पण तो वरील गोष्टींचेच प्रतिबिंब होता. शेवटी गेर्लांटने असा निष्कर्ष काढला, की पृथ्वी ही एक " सेंद्रिय वस्तु " नसून, तो " विश्वातील वस्तूंपासूनच बनलेला एक जटिल आहे " (७६, iv).

एक गोष्ट निश्चित, की एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धातील जर्मन भूगोलज्ञांनी भूक्षेत्रातील विविध घटनांच्या परस्पर संबंधांचा अभ्यास करण्याची पद्धती चालूच ठेवली. विविध प्रकारच्या घटनांच्या कार्यकारण भावात्मक अन्योन्य संबंधांतून निर्माण होणारी क्षेत्राची एकात्मता रिक्टोफेनच्या लक्षात आलेली होती (७३, १६ f, ६७), आणि प्रदेशाच्या काही विशेष लक्षणांचे प्रतिपादन करण्याऐवजी, सर्वच महत्त्वाच्या रुपधेयांच्या अन्योन्यसंबंधांच्या संयोगातून निर्माण होणाऱ्या एकूण स्वरुपाचे प्रतिपादन करण्याला प्रादेशिक भूगोलात अधिक महत्त्व आहे, या गोष्टीवर हेटनर व अन्य भूगोलज्ञांनी अधिक भर दिला (१६१,२१७). तरीही हे एकूण स्वरूप म्हणजे हंबोल्ट व रिटर इत्यादि पूर्वीच्या ग्रंथकारांच्या तत्त्वज्ञानातून मान्यता पावलेली ' एकरुपता ' (Einheit) किंवा ' पूर्णरुपता ' (Ganzheit) नव्हती.

त्याचप्रमाणे, एक स्वतंत्र प्रदेश हे आपल्यापरीने एक स्वतंत्र एकक आहे, म्हणजेच एक " स्वयंपूर्ण " एक "सेंद्रिय वस्तू " आहे ही संकल्पनाही या कालखंडात आढळत नाही. एकात्मतेच्या व पूर्णतेच्या या दोनही बाजू अलीकडच्या काही दशकांत विशेषतः जागतिक युद्धानंतर, भूगोलक्षेत्रात पुन्हा आणल्या गेल्या आहेत. पण, विकासाची ही दिशा इतकी विलंबित आहे, की " रिटरच्या मार्गाकडे परत चला " या आंदोलनाचा तो परिणाम आहे असे मानावे की नाही असा संशय निर्माण होतो; कारण, रिक्टोफेन व रिटर या दोघांनीही या तत्त्वांचा अगदी मर्यादित पुरस्कार केला होता.[२१] एक गोष्ट निश्चित आहे, की

२१. १८९८ साली एके ठिकाणी, हेटनरने असे लिहिले आहे, की रिक्टोफेनने प्रस्थापित केलेल्या मतांना " काही बाबतीपुरते रिटरच्या मार्गाचे अनुकरण " (in gewisser Hinsicht eine Rückkehr Zu Ritter) असे म्हणावयास हरकत नाही (२, ३१७). विशेष म्हणजे, हेटनरने त्यातील विशेषणांच्या अर्थांचे स्पष्टीकरण स्वतःच केलेले आहे. हे लक्षात घेता लायलीने घेतलेला या अवतरणाचा उतारा अपुरा होता; कारण, त्यातील " रिटरच्या मार्गाचे अनुकरण " येवढ्याच शब्दांचा उतारा घेऊन अवतरणातील विशेषणात्मक वाक्यांश गाळला आहे (२२२, २५८). रिटरचा " पूर्णत्वाचा दृष्टिकोण " प्रादेशिक भूगोलात परत आणण्यास हेटनर कारणीभूत झाला असे सिद्ध करणारा पुरावा हेटनरच्या या किंवा अन्य लिखाणांत सापडण्यासारखा आहे, हे लायली सांगत नाही ; आणि प्रस्तुत लेखकालाही कोठे आढळला नाही. लायलीने सूचित केल्याप्रमाणे प्रदेशाच्या स्वयंपूर्णत्त्वाचा दृष्टिकोण आजच्या अमेरिकी भूगोलात उपस्थित असेलच तर त्याचा मागोवा सॉर मार्फत श्लूटरपर्यंत घेता येईल.

रिक्टोफेन अथवा हेटनर या दोघांपैकी कोणीच आणि कधीच या संकल्पनांना पाठिंबा दिला नाही. उलट, पुढे आपण चर्चा करणार आहोत त्यावरुन असे दिसून येईल, की हेटनरने तर त्यांना वारंवार आव्हान दिले आहे.'' त्यानेच एके ठिकाणी असे सुचविले आहे, की या संकल्पनेचा मागोवा रिटरच्या अंतिम हेतुवादी संकल्पनांपर्यंत घेता येईल (१६१, ३०६), आणि ते तर फक्त रात्सेलमार्फत शक्य आहे, हेही गृहीत आहे (१२६, ५५७ : तसेच लेवी पहा ८, ७२ आणि ब्यूर्गर पहा ११, ७६). "पृथ्वी एकात्म आहे" व "पृथ्वी ही एक सेंद्रिय वस्तू आहे", या संकल्पना व्हिडाल-ड-ला ब्लाकने रात्सेलपासून उचलल्या हे तर उघडच आहे. पण, असे करताना त्या संकल्पना भूगोलात नवीनच होत्या असे समजण्याची व्हिडालने चूक केली (१८४, ५) अशी एक शक्यता आहे, कि या संकल्पनांचा अलिकडेच झालेला उल्लेखनीय विकास हंबोल्ट आणि रिटर यांच्या कल्पनांतून उगम पावलेला नव्हता, तर एका स्वरुप सांस्कृतिक घटनेची ती पुनरावृत्ती होती. या घटनेनेच एका विशिष्ट देशाच्या विशिष्ट काळातील सर्वसाधारण

३०. रिक्टोफेन व हेटनर यांनी या संकल्पनांच्या विकासाला मदत केली असे विधान ब्यूर्गर करु शकला याचे कारण तो या संज्ञांच्या वेगवेगळ्या वापरांतील अर्थभेद ओळखू शकला नाही (११, २६, ७६). रिक्टोफेन आणि हेटनर या दोघांच्याही मताने कोणत्याही एका स्थळातील कारकांची गोळाबेरीज केली असता सर्व मिळून एक यंत्रणा तयार होते. त्यातील कोणताही एक कारक गाळला, तर ती यंत्रणा समजून घेणे अशक्य होते. त्याच्याही पुढे जाऊन हेटनरचे मत असे होते, की पृथ्वीवरील प्रत्येक स्थळी (Erdstelle) ही यंत्रणा अद्वितीयच असते. म्हणून त्या स्थळावर "स्वतंत्र व्यक्तिमत्त्वाचा शिक्का मारला जातो." (१६१, २१७) पण ब्यूर्गरने येथे जोडलेली "प्रदेश या अर्थाने" (as a Landschaft) या शब्दप्रयोगाची पुस्ती समर्थनीय असल्याचा पुरावा मला त्या संदर्भात, किंवा अन्यत्रही आढळला नाही. उलटपक्षी, याच संकल्पनेवरील प्रत्यक्ष चर्चेत हेटनरने असा स्पष्ट निर्देश केला आहे, हे स्वतंत्र व्यक्तिमत्त्व त्या एका स्थळाचे असते त्या सर्व प्रदेशाचे नव्हे (२६९) आणि ब्यूर्गरने या लेखाची संदर्भग्रंथांच्या यादीत नोंद केलेली आहे. येथे हेही सांगण्यास हरकत नाही, की हेटनरने लिहिलेल्या आधीच्या लेखांपैकी एकात एखाद्या स्थानिक क्षेत्राचा एकूण भूपृष्ठाशी असलेला संबंध आणि एका मोठ्या सेंद्रिय वस्तूशी त्याच्या एका अवयवाचा संबंध या दोहोंची एकमेकांशी तुलना होण्यासारखी आहे, असे त्याने दाखविले आहे. मात्र, ब्यूर्गर किंवा लायली या दोघांनीही या लेखाचा संदर्भ घेतलेला नाही. अर्थात, त्यावरुन त्याची धरसोडवृत्ती उघड होते. पण, हे स्थानिक क्षेत्र म्हणजे एक विशिष्ट एकक आहे अथवा पृथ्वी ही एक सेंद्रिय वस्तू आहे, असे सुचविण्याचा त्याचा हेतू दिसत नाही. कारण, यानंतर याच विषयासंबंधी लिहिलेल्या लेखांत या सर्वच संज्ञा गाळून टाकल्या आहेत, म्हणून त्यांकडे आपण दुर्लक्ष करणे बरे.

तत्त्वज्ञानविषयक संकल्पना भूगोलक्षेत्रातही घुसडल्या गेल्या. जर्मनीतील युद्धोत्तर वातावरणात " एकता " आणि " समष्टि " या संकल्पना बलवत्तर होत्या". [११] *

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धातील शास्त्रीय दृष्टिचा विचार करता, ज्यांचा हंबोल्टने उल्लेखनीय विकास केला तशा प्रकारच्या भूदृश्यांच्या सौंदर्यबोधक स्वरुपाच्या चिंतनास, बरवर पहाता तरी, फारसा अवकाश नव्हता. रात्सेल, ओपेल व विमार येवढ्या तिघांचा उल्लेखनीय अपवाद या सदराखाली ब्यूर्गरने निर्देश केला आहे (७४). यांतील शेवटच्या दोघांनी तर हंबोल्टने केलेल्या " भूक्षेत्रदृश्य " (Landschaff) या संज्ञेचा निरीक्षणीय दृश्य या अर्थाने केलेला वापर तसाच चालू ठेवला.

थोडक्यात, एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात, विशिष्ट क्षेत्रांशी निगडित असलेल्या प्राकृतिक शास्त्रांच्या विकासाच्या प्रभावाखाली, निदान काही काळ तरी, भूगोलाचे एका अगदी निराळ्याच क्षेत्रात रुपांतर होत होते. हे नवे स्वरुप हंबोल्ट आणि रिटर यांनी वारसा म्हणून घेतलेल्या व विकसित केलेल्या भूगोलाच्या स्वरुपापेक्षा अगदी वेगळेच होते. क्रमबद्ध अभ्यासांवर भर दिल्यामुळे भूगोलाचे दोन समान भाग झाल्यासारखे दिसत होते. त्यांपैकी एक प्राकृतिक शास्त्र होते तर दुसरे सामाजिक शास्त्र होते. या दोघांची गाठ फक्त प्रादेशिक अभ्यासांत पडत असे. पण या प्रादेशिक अभ्यासांनी शास्त्राचे आकार घेतल्याचे कधीच दिसले नाही. मात्र, या कालखंडाच्या शेवटी प्रतिक्रियेला सुरूवात झालेली होती. शेवटी भूगोलाने घेतलेले वळण पूर्वीच्याच दिशेचे होते. नवीन शतक उजाडले तेव्हा " आशय आणि पद्धतितंत्र या बाबतीत " भूगोलाचे हेतू मोठ्या प्रमाणात " हंबोल्टने घालून दिलेल्या संकल्पनांशी " सुसंगत होते, असे विधान रिक्टोफेनने १९०३ साली केले आहे (३, ६७३, ६८९). त्यावेळी आणि भूगोलाच्या एकूण इतिहासात, भूगोलाचा संबंध कार्यकारणभावाने संबंधित असलेल्या भेदानुसार केलेल्या भूक्षेत्रांच्या (Erdraume) अभ्यासांशीच होता. अर्थात भूगोल हे क्षेत्रीय भेदाभेदांचेच शास्त्र होते व आहे (हेटनर २, ३२०).

१९०५ साली हेटनरला असे आढळून आले, की जर्मन भूगोलकार रिक्टोफेनचे भूगोलासंबंधीचे हे विधान मान्य करण्याच्या नादात होते. तरीही, रिक्टोफेनला आपल्या संकल्पनेची पद्धतितंत्रविषयक रेखीव व्याख्या देण्यात पूर्ण यश आलेले नव्हते, त्याने एकैक हेतूने त्याचा पाठपुरावा केलेला नव्हता, आणि त्याने १९०३ च्या आपल्या भाषणात मूळ मुद्दाच काहीसा अस्पष्ट करून टाकला होता, असे हेटनरला व अन्य भूगोलज्ञांनाही, वाटू

---

११. जर्मन भूगोल एका नव्या कालखंडात प्रवेश करत असल्याचे ते निदर्शकच आहे. अर्थातच, या कालखंडात काही उल्लेखनीय बदलांची अपेक्षा करण्यास हरकत नाही. पण, अशी सूचना ज्यांतून मिळाली ती उगमस्थाने सूचित करण्याचे मी टाळत आहे, कारण सावधानतेची सूचना मला वेळीच मिळाली आहे. अशा उगमस्थानांत भूगोलज्ञांबरोबर अभूगोलज्ञांचाही समावेश आहे.

* अर्थातच, विसाव्या शतकाच्या चौथ्या दशकात.

लागले (१२६, ५५२-५३, ५६० ; १६१, १०६). म्हणून, भूगोलाचे पद्धतितंत्रविषयक भक्कम विवरण करावयाचे कठिण कार्य आपण होऊनच आपल्या शिरावर घेतले. त्यात त्याला स्वतःच मनाशी निष्कर्षरुपाने तयार केलेली कोणीतरी भूगोलाची संकल्पना विषद करावयाची नव्हती, आजतागायत विकास होत आलेली, भूगोलाच्या क्षेत्राचे काटेकोर प्रतिपादन करणारी संकल्पना विषद करावयाची होती. म्हणजे तो केवळ रिक्टोफेनचाच आधार घेणार होता असे नव्हे, तर प्रत्यक्षपणे व अप्रत्यक्षपणेही, तो रिटर हंबोल्ट आणि अभिजातपूर्व कालखंडातील त्यांच्या पूर्वाचार्यांचाही यासाठी आधार घेणार होता. तो हंबोल्टवर किती अवलंबून होता हे त्याच्या असंख्य परिच्छेदातून स्पष्ट होणारे आहे. काही परिच्छेदांत त्याने तसे सूचितही केलेले आहे (C/o १६३, ८५ ff). आधुनिक भूगोलाच्या दोन संस्थापकांच्या भूगोलविषयक विचारांच्या हेटनरने केलेल्या संश्लेषणावरुन, हंबोल्ट हा रिटरच्या बरोबरीचाच नव्हे तर त्याच्यापेक्षाही पुढारलेला होता, असा निष्कर्ष ड्योरिंगने काढला आहे (२२, १६३).

आपल्या १९०५ सालापासून आजतागायत (म्हणजे १९३९ पर्यंत) प्रसिद्ध केलेल्या पद्धतितंत्रविषयक चर्चालेखांच्या संपूर्ण प्रदीर्घ मालिकेतून–इतकेच नव्हे तर, प्रकाशनाच्या वाटेवर असलेल्या पुढील अभ्यासलेखांतूनही – भूगोलाची संकल्पना हा भूगोलाच्या कालक्रमानुसार होत गेलेल्या विकासाचा परिपाक आहे, ही गोष्ट हेटनरने सातत्याने स्पष्ट करण्याचा प्रयत्न केलेला आहे. त्या अर्थाने, या संकल्पना आपल्या प्रस्तुत भूगोलविषयक विचारांच्या विकासाच्या इतिहासाच्या अभ्यासाच्या उन्नतम बिंदूचे द्योतक आहेत. क्रमाक्रमाने उत्क्रांत होत गेलेल्या या संकल्पनेला तर्कशुद्ध पाया घालून देणे हाच हेटनरच्या अभ्यास लेखांचा हेतू असल्यामुळे, पुढील परिच्छेदात आपण त्याच्याच मतांचे परीक्षण करू या.

आमचे हे ऐतिहासिक पर्यवेक्षण थोडक्यात आवरते घ्यावयास हरकत नाही. रिक्टोफेनने १८८३ साली मांडलेला दृष्टिकोण पेंक, श्लूटर, आणि सर्वात जास्त हेटनर यांनी रिक्टोफेनच्या विचारांच्या लावलेल्या अन्वयार्थासह बहुसंख्य अभ्यासकांनी मान्य केला. परिणामी, विसाव्या शतकाच्या प्रथम पर्वात, या पूर्वी कधीच साधली नव्हती इतक्या मोठ्या प्रमाणात, पायाभूत संकल्पनांची एकात्मता साधली गेल्याचा ठसा जर्मन भूगोलावर उमटलेला आहे. हेटनरचे पद्धति-तंत्रविषयक अभ्यासलेख तर भूगोलक्षेत्रातील अभिजात लेखन मानले जाते या गोष्टीकडे कोणाही जर्मन पंडिताला दुर्लक्ष करता येणार नाही. ग्मोल्शने १९२४ साली असे लिहिले, की "जर्मनीतील बहुतेक सर्व शास्त्रीय भूगोलकार समरूप संकल्पनांवर येऊन पोहोचलेले आहेत." निदान याबाबतीत, हेटनरच्या कार्याला कमी धन्यवाद देऊन चालणार नाही. (२३७, ५६ ; C/o बाऊन १५५, ६ ते ८ ; आणि जर्मनीतील विद्यापीठ पातळीवरील भूगोल विभागाच्या एकवीस प्रतिनिधींनी Heidelberger Tagung मध्ये केलेले विधान, १३८).

त्याचप्रमाणे, हेटनर आणि त्याच्या समकालीनांच्या पद्धतीतंत्रविषयक अभ्यासांचा अन्यदेशीय भूगोलज्ञांच्या सकल्पनांवरही उल्लेखनीय प्रभाव पडलेला आहे. जर्मनीबाहेरील युरोपीय राष्ट्रांच्या ज्या भूगोलज्ञांनी भूगोलाच्या स्वरूपाच्या संबंधात समरूप विचार मांडलेले आहेत त्यांची यादी पुढे दिल्याप्रमाणे करता येईल. रशियात बर्ग (९७, १०३), व त्याचा शिष्य एस्टोनियाचा मार्कस (१९१, १२ ff), फिनलंडमध्ये ग्रान्से (२७०, २९६), नार्वेत अर्स्टल (ब्राऊनचे मत) आणि स्वीडनचा हेल्गे नेल्सन (डेगीरच्या अवतरणाधारे ; डेगीर स्वतःही मार्थेच्या संकल्पनेशी समरूप संकल्पना मांडतो), बेल्जियाम मधे मिशोट आणि इटलीत गिआनो त्रपानी मारिनेली (झ्योल्सच्या मताने), आणि अल्मागिए (१८८), चिझोल्म (१९२) आणि हर्बर्टसन (झ्योल्श पहा) यांनी हेटनरच्या मतांची ग्रेटब्रिटनला ओळख करून देण्याचा प्रयत्न केला. इनोयूच्या मते जपानचे अनेक भूगोलज्ञ हेटनरच्याच मतांचे अनुकरण करतात, त्यात कोमाकी, बातानूकीं, व साहजिकच स्वतः निवेदक म्हणजे इनोयू, यांचा समावेश होतो. अमेरिकेला या भूवंटनात्मक संकल्पनेची प्रथम ओळख करून देणारा होता फेनमान (२०६) तसेच डब्ल्यू. एम. डेव्हिस याच्या अखेरच्या काही लेखांतून तशीच ओळख करून दिलेली आढळते ; मात्र त्याच्या आधीच्या अधिक सुविख्यात विधानांतून डोकावणारा विरोधी सूर लक्षात भरणारा आहे (१०२, २०९ f ;C/०२०३). याशिवाय, या संकल्पना आणखी कित्येक लेखकांच्या लेखनांतून, त्यातही वेलिंग्टन जोन्सच्या लेखनांतून, विशेषत्वाने व्यक्त होतात. तरीही सॉरने सुमारे दशकापूर्वी मोठ्या परिणामकारक रीतीने त्याचे प्रतिपादन करीतोपर्यंत, अमेरिकन् भूगोलज्ञांनी एकंदरीने दुर्लक्षच केले (२११, ८४). तेव्हापासून मात्र संयुक्त संस्थानांतील, बहुसंख्य नसल्यातरी, पुष्कळशा क्रियाशील संशोधकांची हीच सर्वसामान्य संकल्पना होऊन राहिली आहे.

गेल्या पिढीत, भूगोलक्षेत्रातील एकमत हे जर्मनीतील भूगोलाचे खास लक्षण मानले जात होते. पण, जर्मनीव्यतिरिक्त अन्य देशांत भूगोलाच्या अभ्यासक्षेत्राचे स्वरूप व व्याप्ती याबाबतींत सर्वसाधारण एकमत झालेले नव्हते. बहुतांश देशांत मतमतांतरांचे लक्षणीय भेदच नव्हे तर वादही आहेत. म्हणूनच, जर्मनीबाहेरच्या भूगोलज्ञांनी आपल्या क्षेत्राच्या पद्धतितंत्राचा अभ्यास करण्याबाबत फारच उदासीनता दाखविली आहे, ही घटना अर्थपूर्ण आहे, अशाप्रकारची टीका अलीकडेच केलेल्या सर्वेक्षणात स्टॅम्पने केलेली आहे (२००).* याचा अर्थ, ते आपापसात यासंबंधात वारंवार चर्चा करत नाहीत अथवा आपली वैयक्तिक मतेही प्रसिद्ध करत नाहीत, असा होत नाही.

व्हीडाल-ड-ला-ब्लाक याच्या हुकुमी प्रभावाखाली प्रस्थापित झालेली फ्रेंच भूगोलातील एकवाक्यता तुलनात्मकदृष्ट्या मोठ्याप्रमाणात होती, हा यासंदर्भातील एक अपवाद म्हणूनच नजरेत भरतो. व्हीडाल, ब्रून्हे आणि उमांगो यांचा प्रादेशिक भूगोलाच्या विकासावरील प्रभाव महत्त्वाचा असला, तरी तो त्यांच्या स्वतःच्या आणि त्यांच्या विद्यार्थ्यांच्याही अभ्यासांचा परिपाक आहे ; न होऊन, ती भूगोलाच्या स्वरूपाची त्यांनी केलेल्या चर्चेची परिणती नव्हे

* जोशिया सी. स्टॅम्पचा 'The Economist' हा ग्रंथ.

(C/o सॉर ८४, १७१, १८० f). या लेखकांनी भूगोलक्षेत्रात केलेली कामगिरी वेगळी काढून, फक्त भूगोलाबद्दल त्यांना काय म्हणावयाचे आहे येवढेच एखाद्याने वाचले, तर रात्सेलच्या मताच्या सुधारून वाढविलेल्या आवृत्त्यांचे स्थान त्यांच्या मतांना द्यावे लागेल. या दृष्टीने पहाता वॉलॉक्सचा " भूगोलाचे शास्त्र " (Les Sciences geographiques) हा ग्रंथ बऱ्याच बाबतीत भूगोलक्षेत्राचे एक मौल्यवान आणि सांगोपांग पृथक्करण ठरले ; आणि प्रस्तुत ग्रंथाच्या पुढच्या काही प्रकरणात वरील ग्रंथाचा वारंवार संदर्भ घेतला जाईल (१८६). म्हणूनच, एक गोष्ट येथे स्पष्टपणे नमूद केली पाहिजे, की फ्रेंच भूगोलातील प्रचलित विचारांचे सर्वेक्षण करण्याचा यथायोग्य प्रयत्न येथे करता आला नाही. तथापि, त्या देशात झालेल्या कार्याच्या म्यूसेटने अलीकडेच केलेल्या एका सर्वेक्षणात वाचकाला काही महत्त्वाचे संदर्भ सापडतील (९३). "

आपल्या क्षेत्राचे स्वरूप व मर्यादा निश्चित करण्याचा प्रयत्न करण्याच्या बाबतीत, कदाचित, ब्रिटिश भूगोलज्ञांनी किमान लक्ष दिलेले आहे. चिझोल्मचे १९०८ मधील उद्घाटनाचे, प्रामुख्याने हेटनरवर आधारलेले, भाषण फारच थोडे प्रभावी ठरले. झ्योल्ला व हंडूरे (उट्रेक्ट) यांच्या एक गोष्ट लक्षात येऊन चुकली, की वेगवेगळ्या ब्रिटिश भूगोलज्ञांनी विभिन्न मते मांडली, तरीही " पर्यावरणवादी संकल्पनेचा " प्रभाव बहुतेक सर्वांवर पडला आहेच (९८ ; ९९ ; १००). इंग्लंडच्या भूगोलविषयक कार्यात सुलभपणा नाही, या गोष्टीसाठी निदान एका ब्रिटिश भूगोलज्ञाने, म्हणजे डिकिन्सनने, खेद व्यक्त केला आहे (१०१). रॉक्स्बीच्या १९३० च्या अध्यक्षीय भाषणात आधीच्या जर्मन भूगोलज्ञांच्या संकल्पनांचे परीक्षण केलेले असून, त्या संकल्पनांचा व्हिडाल व ब्रून्हे यांनी लावलेला अन्वयार्थही स्पष्ट केला आहे ; आणि या सर्वांवरून त्याने काढलेल्या निष्कर्षाचे विधान जवळ जवळ बॅरोच्या विधानासारखेच आहे. रात्सेलनंतरच्या भूगोलज्ञांना त्याने एका तळटीपेतच गुंडाळले आहे (१९५, २८२ f). पुढच्याच वर्षी, मृदावरणावर नव्हे तर, जलावरणावर आधारित स्वाभाविक प्रदेशांच्या परिभाषेत भूगोलातील एकात्मता प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला. अर्थात, ही त्याची संकल्पना हर्बर्टसनची केवळ उसनवारीकरून मांडली गेली होती, हे निःसंशय (१९६)

३२. (Geographische Zeitschrift) च्या अलीकडील अंकात (१९३८, पाने २४१ ते ३१५) निरनिराळ्या देशांतील भूगोलाच्या आजच्या परिस्थितीचे परीक्षण करणारी वेगवेगळ्या लेखकांच्या लेखांची एक मालिका प्रसिद्ध झाली आहे, तिकडे लक्ष देणे आवश्यक आहे. त्यांतील काही देशांसंबंधी विचार करणाऱ्या लेखात भूगोलाच्या स्वरूपासंबंधीच्या वेगवेगळ्या दृष्टिकोणांची काही थोडी चर्चा केलेली आढळेल ; उदा. युनायटेड स्टेटस् (१०८), नेदर्लंडस् (९२), फ्रान्स (९३) आणि विशेषेकरून ग्रेटब्रिटन् (१०१) व जपान (११०). इतर अभ्यासलेखांतून या प्रश्नाचा प्रत्यक्षपणे ऊहापोह केलेला नाही ; पण, त्या त्या देशात झालेल्या भौगोलिक कार्याचे सामान्य दर्शन त्यात घडविलेले आहे. उदा. जर्मनी, इटली, पोलंड व स्कँडिनेव्हियातील देश (९१ ; ९४ ; ९५ ; ९६ ;)*.

* पुरवणी टीप क्र. १३ पहा.

ब्रियानच्या "सांस्कृतिक भूदृश्ये" (Cultural Landscapes) या ग्रंथावरून रात्सेलपासून पुढच्या काळात जर्मनीत झालेल्या विकासाशी त्याचा परिचय नव्हता असे दिसते (२००, C/o डिकिन्सनची टीका १०१). उलटपक्षी, पासार्जच्या परंपरेच्या कार्याची प्रदीर्घ चर्चा उन्स्टेडच्या प्रादेशिक भूगोलाच्या अभ्यासात केली गेली आहे (३०९). स्टॅम्पने आर्थिक भूगोलाच्या आपल्या सर्वेक्षणात अमेरिकी, फ्रेंच आणि जर्मन दृष्टिकोणाचा विचार केलेला आहे (२००).* गेल्या दोन-तीन वर्षांत मात्र क्रो व डिकिन्सन यांनी अगदी अलीकडच्या जर्मन मतांकडे साक्षेपी लक्ष पुरवलेले दिसते. अर्थात हाही, अंशतः का होईना पण, अमेरिकेतून मिळालेल्या प्रेरणेचा परिणाम असावा (२०१, २०२)." **

हाती असलेल्या समस्येचा अभ्यास करण्याऐवजी आपल्या क्षेत्राच्या स्वरूपावर चर्चा व वादविवाद करण्याकडेच अमेरिकी भूगोलज्ञांचा अधिक ओढा असतो, ही गोष्ट सर्वश्रुत आहे. आधीच्या अभ्यासकांच्या निष्कर्षांचा योग्य तो परामर्ष घेऊन, त्यांचाही ज्यांत समावेश केलेला आहे असे या समस्येचे विद्वत्ताप्रचुर मनःपूर्वक अभ्यास ज्यांचा आधी उल्लेख झालाच आहे अशी दोन-तीन अध्यक्षीय भाषणे व कार्ल सॉरचे सुविख्यात चर्चा लेख येवढ्यापुरतेच मुख्यतः मर्यादित आहेत. सॉरचे पद्धतितंत्र जर्मन लेखकांच्या अभ्यासांवरून घेतलेले असल्यामुळे, ते बऱ्याच अंशी श्लूटरवर आधारित आहे. त्याने हेटनरच्या पद्धतितंत्रविषयक अभ्यासांची संभावना "कदाचित्, भूगोलज्ञ जास्तीत जास्त काय करण्याच्या प्रयत्नात आहेत त्याची सर्वोत्तम प्रशस्तिपत्रे येथे सापडतील" (८४, १८२), या शब्दात केलेली असली, तरी अन्यथा त्याने त्यांच्याकडे बहुशः दुर्लक्षच केले आहे. कदाचित् श्लूटरकडून हेटनरनेही आपली मते उचलली आहेत, असा सॉरने हेटनरविषयी ग्रह करून घेतला, हेच त्याचे कारण असावे. [ तळटीप क्रमांक ४८ पहा ]

---

*जोशिया सी. स्टॅम्पचे The Economist.

११. डिकिन्सनचा अभ्यासलेख "युनायटेड स्टेटस्, जर्मनी व फ्रान्स या देशांतील भूगोलविषयक प्रचलित प्रवृत्ती" या विषयाच्या समीक्षणावर आधारण्याचा त्याचा विचार होता. पण, प्रत्यक्षात जर्मनीतील भूगोलासंबंधीची प्रातिनिधिक संकल्पना म्हणून श्लुटरची संकल्पना पुढे मांडत असताना, त्याने भूगोलक्षेत्रातील श्लूटरच्या महत्त्वावर अवास्तव भर दिला आहे. श्लूटरची संकल्पना आणि हेटनरची संकल्पना यांचा एकत्र उल्लेख करणे ही चुकीची दुरूस्ती असेल, तर ती अपुरी आहे. कारण, श्लूटरच्या संकल्पनातील बहुतेक सर्व खास मुद्यांना हेटनरने विरोधच केला आहे याचा उल्लेखही न करता त्याच मुद्यांचे त्याने तपशीलवार विवेचन केले आहे. पण, दोघांचे एकमत असलेल्या मुद्यांवर त्याने कोणतीच चर्चा केलेली नाही. तसेच युनायटेड स्टेटस् मधील भूगोलाची चर्चा करतानाही फक्त एकाच विद्यापीठातील भूगोलज्ञांचे कार्य व त्यांच्या संकल्पना, येवढ्यापुरतीच ही चर्चा मर्यादित आहे. अर्थातच, त्या गटाला प्रातिनिधिक गट असे निश्चितच म्हणता येणार नाही.

** पुरवणी टीप क्रमांक १४ पहा.

अमेरिकी भूगोलज्ञांपैकी बहुसंख्य लेखकांनी जरी याविषयावर लिहिलेले नसले, तरी भूगोलाची सुयोग्य व्याख्या व व्याप्ती काय असावी या संबंधीची विभिन्न, पण ठाम मते बोलून दाखविलेली आहेत (C/o पार्किनचे सर्वेक्षण " अमेरिकी भूगोलज्ञांचा भूगोल " ; १०५). काही विशिष्ट अभ्यासपत्रकांवर, " ते भूगोलच नव्हते " असे कारण देऊन केलेल्या कडक टीका नेहमीच पहावयास मिळतात. या विषयासंबंधीची अत्यंत विवाद्य मते महाविद्यालयीन पाठ्यपुस्तकांतून खुशाल प्रसिद्ध केली जातात (C/o क्रोची टीका २०१, १० f). तेव्हा, भूगोलाच्या स्वरुपासंबंधी केलेल्या सांगोपांग आणि विद्वत्तापूर्ण चर्चालेखांतून आढळणाऱ्या त्यांच्या निर्णयाचा परिपूर्ण फायदा घेण्याची संधी आम्हाला मिळावी, अशी या टीकाकारांकडे कोणी मागणी केली तर ती समर्थनीयच होईल असे वाटते.

भूगोल हे जगाच्या क्षेत्रीय भेदाभेदांच्या अभ्यासांशी संबंधित असलेले भूवंटनात्मक शास्त्र आहे असे मान्य करताना, जर्मनीतील भूगोलज्ञ आणि त्यांच्याशी याबाबतीत सहमत असणारे अन्यदेशीय भूगोलज्ञ, आपण एका जुन्या क्षेत्राचीच पण नवीन संकल्पना मांडत आहोत, ही गोष्ट मान्य करण्यास तयार नाहीत. उलटपक्षी, हेटनर व सॉर यांच्यासह पुष्कळच लेखकांच्या हे लक्षात आलेले आहे, की ही संकल्पना हिरोडोटस आणि स्ट्रॅबो यासारख्या अगदी प्राचीन भूगोलज्ञांच्या कार्यावरुनही अनुमानरुपाने मांडता येण्यासारखी आहे (१६१, १२२ ; २११,२५). आधुनिक भूगोल हा " अतिप्राचीन भूगोलाचा आधुनिक आविष्कार आहे ", असा सॉरने निष्कर्ष काढला आहे. म्हणूनच, प्राचीन भूगोलात सरसकट वापरलेली ' भूवंटनशास्त्र ' किंवा प्रदेशविषयक शास्त्र ही संज्ञाच योग्य आहे (आणि त्याचेच पुनरुत्थान मार्थे व रिक्टोफेन यांनी केलेले आहे).

● ● ●

## प्रकरण ३ रे

# ऐतिहासिक विकासमार्गापासून विचलन

### अ – शास्त्रीय भूगोलाच्या रचनेचे प्रयत्न

आतापर्यंत आपण केलेल्या जर्मनीतील भौगोलिक विचारांच्या विकासाच्या सिंहावलोकनात, भूगोलाच्या संकल्पनेत काही महत्त्वाचे फरक करण्याची मागणी करणाऱ्या मूलगामी सूचनांचा विचार आपण अगदीच ओझरता केला; कारण, त्यांचा नगण्य इतकाच परिणाम नंतरच्या विचारांवर झाला होता. पद्धतितंत्रविषयकवाद आपल्यापुरते जरी कमी महत्त्वाचे वाटले, तरी त्यांतूनही अर्थपूर्ण निष्कर्ष सूचित होण्याची शक्यता आहे, अशी टीका लायलीने अलीकडेच केली आहे. १८३० साली प्र्योबेलने केलेल्या, आणि अर्धशतकानंतर गेर्लांटने केलेल्या, प्रस्तावांच्या मुळाशी असलेल्या पायाभूत वृत्तीचा उल्लेख भूगोलाच्या स्वरुपासंबंधीच्या चर्चांतून वारंवार केला जातो, विशेषतः तोंडी चर्चांतून केला जातो. प्र्योबेल व गेर्लांट या दोघांनीही आपापली मते पूर्णपणे छापून प्रसिद्ध केली आहेत, आणि दोघांच्याही प्रत्यक्ष कार्याशी त्यांच्या पद्धतितंत्राचा किती संबंध आहे याविषयी निर्णय घेता येईल इतका पुरावा त्यांच्या नंतरच्या लेखनांतून मिळतो. म्हणूनच त्यांच्या कार्यक्रमाचे आणखी बारकाईने परीक्षण करण्याने आपला फायदा होण्याची शक्यता आहे. मात्र, ज्या पार्श्वभूमीतून त्यांचा उगम झाला ती आणि त्यांचे जे परिणाम झाले ते, अशा दोन्ही गोष्टींच्या प्रकाशात हे परीक्षण होणे आवश्यक आहे.

ज्या क्षेत्रात सुधारणा घडवून आणण्याच्या प्रयत्नात प्र्योबेल होता, त्या क्षेत्राचे त्याचे ज्ञान अगदीच मर्यादित होते, आणि तशा ज्ञानावर त्याचा कार्यक्रम आखलेला होता, या गोष्टीचा उल्लेख आम्ही आधीच केलेला आहे. १८३२ मध्ये बर्लिनला येण्यापूर्वी त्याने केलेल्या भूगोलविषयाच्या पूर्वतयारीत, त्याने भूरूपदर्शक नकाशे व अन्य नकाशे तयार करण्याचा घेतलेला प्रत्यक्ष अनुभव, विद्यापीठात केलेला भूगोलाभ्यासाखेरीज अन्य भौतिक शास्त्रांचा अभ्यास, –केवळ योगायोगाने त्याच्या अंगावर पडलेले आणि गरजेपोटी त्याला स्वीकारावे लागलेले–प्रवास वर्णन-ग्रंथांचे सामान्य वाचन करण्याचे काम, आणि शेवटी पेरू, बोलिव्हिया व प्लाट खोऱ्यांतील प्रदेशांचा एक भौगोलिक मार्गदर्शक तयार करण्याचे काम, इतक्या गोष्टींचा समावेश होतो. यापैकी भौगोलिक पाठ्यपुस्तक त्याला गास्पारी, गुत्समुटस् आणि इतर काही जणांनी मिळून संपादित केलेल्या "Handbuch der Erdschdreibung" (भूवर्णनाचा मार्गदर्शक, ५३) या वीस खंडांच्या ग्रंथमालेची पूर्तता करण्यासाठी लिहिणे आवश्यक होते. बऱ्याच बाबतीत ही ग्रंथमाला गाटरार व रिटर यांच्याही पूर्वीच्या काळात

प्रसिद्ध झालेल्या ग्रंथाच्या प्रकारात मोडणारी होती (दुसऱ्या एका संदर्भात याच ग्रंथमालेचे वर्णन " रूढ पद्धतीच्या ज्ञानकोशवजा प्रबंधांपैकी एक " या शब्दांत केले आहे ते अगदी बरोबर आहे. (२२२: तळटीप क्र. १). त्या ग्रंथात प्रत्येक देशाच्या लहान लहान राजकीय विभागात करावयाच्या प्रमाणीकृत विभागणीबरोबरच संक्षिप्त प्रतिपादनाद्वारे त्याच्या स्वाभाविक प्रदेशांचीही ओळख करून देण्याचा प्रयत्न फ्र्योबलने केला. अर्थातच, कित्येक वर्षांनंतर या गोष्टीचा उल्लेख करताना त्याला अभिमान वाटला असल्यास नवल नाही. हाती घेतलेले हे काम पूर्ण करण्यास लागणारा वर्षा दोन वर्षांचा अवधी संपेतोपर्यंत प्रादेशिक भूगोलात काय चुकते हे त्याच्या लक्षात आले होते. त्यामुळेच, त्याचा या क्षेत्रातील अगदी पहिला ग्रंथ प्रकाशित झाला त्याबरोबरच त्याचा प्रादेशिक भूगोलाच्या सुधारणेचा कार्यक्रमही लोकांपुढे आला (२८, I, ४०-६६).

म्हणूनच, प्रत्यक्ष भूगोलाचा पाया न घेता ' प्राकृतिक ' शास्त्रांशी तुलना हा पाया घेऊन भूगोल शास्त्राची रचना करण्याचा प्रयत्न ज्यांनी केला अशा गेल्या शतकातील अनेक अभ्यासकांत फ्र्योबेल हा पहिला होता. भूगोल अथवा Erdkunde हे शास्त्र आपल्या नावाच्या शब्दशः भाषांतराशी सुसंगत असणे आवश्यक आहे, आणि ते फक्त " प्राकृतिक शास्त्रच " होऊ शकेल, या दोन गृहीत तत्त्वांपासून सुरूवात करून ही विचारमाला तर्कशुद्ध म्हणता येईल अशा एका कार्यक्रमापर्यंत पोहोचविली व छापलीही. अर्थात, तसे करताना त्यांच्या विचारांचा काहीसा गोंधळ उडला नाही असे नाही (५४, ४९९ f पानावरील चर्चेची तुलना ५०५ f पानावरील चर्चेशी करून पहा.). या कार्यक्रमान्वये भूगोलाचे दोन भाग पडतात. त्यातील, प्रकारांवरून वर्गीकरण केलेल्या प्रत्येक रूपधेयाचा स्वतंत्र अभ्यास एक प्राकृतिक शास्त्र या नात्याने भूगोलात समाविष्ट असतात. मानव व पृथ्वी या दोहोतील संबंधांचे द्योतक असलेल्या त्या दोहोंच्या संबंधीच्या सर्व बाह्य वस्तुस्थितींच्या भाषेत पृथ्वीचे एक रूपधेय या नात्याने केलेल्या मानवाच्या अभ्यासाचा समावेश त्याने या प्राकृतिक शास्त्रातच केला. असे करण्यासाठी त्याने हंबोल्टच्या दृष्टिकोणाचे व त्याच्या परिभाषेचे अंशतः अनुकरण केले. (५४, ४९५, ५०४; ५६, २ ते ४ व ६).[३४]

याच्या उलट भूगोलाचे ज्या बाजू " प्राकृतिक शास्त्रांच्या " चौकटीत बसू शकत नसत– यात " सौंदर्यबोधक भूगोल " (Aesthetic geography), ऐतिहासिक घटनांचा भूगोलाशी संबंध, आणि वरवर पहाता प्रादेशिक भूगोलही यांचा समावेश केला जात असे– त्या सर्वांना

३४. भूगोलाच्या " प्राकृतिक शास्त्र " विभागात फ्र्योबेलने मानवी वस्तुस्थितींचा समावेश केला व त्याचे समर्थन करण्यासाठी तर्कशुद्ध विचारांवर आधारलेले अनेक मुद्देही त्याने मांडले आहेत. त्या सर्वांचा विचार करता, फ्र्योबेलने आपल्या भूगोलाच्या शास्त्रीय विभागात मानवजातिवर्णनाचा समावेश केवळ रूढीच्या दडपणामुळे केला असे विधान लायलीने वारंवार केले असले, तरी ते सत्य मानावे इतका वस्तुनिष्ठ पुरावा मिळत नाही. (सत्यस्थिती अशी आहे की, मानवी घटनांचे बरेच विस्तृत क्षेत्र फ्र्योबेलने भूगोलात समाविष्ट केलेले होते (२२२, २४७, २५१).

त्याने " उपयोजनात्मक भूगोल " (Applied geography) अथवा " ऐतिहासिक-तात्त्विक भूगोल " (Historical physical geography) याचाच एक प्रकार म्हणून मान्यता दिली. मात्र, हे दोनही दृष्टिकोण त्यांच्या त्यांच्या स्वतंत्र पद्धतीने विकसित व्हावयाचे होते, म्हणजेच, पहिल्यात विश्लेषणात्मक पद्धतीचे आणि दुसऱ्यात संश्लेषणात्मक पद्धतीचे अनुकरण करावयाचे होते. प्रत्येक विभाग आपल्यापरीने स्वतंत्र क्रमबंध म्हणून संघटित करणे शक्य होते; पण दोहोंचा संयोग होणे शक्य नाही, हेही उघड होते (५६, १०). अर्थात, यावरून कोणाचीही अशी कल्पना होण्यास हरकत नाही की, भूगोल हे क्षेत्र द्वैतात्मक आहे इतकेच नव्हे तर, त्याचे दोन भिन्न प्रकारांत पूर्ण विभाजन झालेलेच आहे. ३५

प्र्योबेलच्या लेखनातील या भूगोलविषयक दृष्टिकोणाचा पुढे कोणता परिणाम झालेला दिसतो ? ज्याचा कार्यक्रम इतक्या स्वच्छपणे आखण्यात आला होता त्याचा– म्हणजेच भूगोलाच्या ' शास्त्रीय ' प्रकाराचा – पाठपुरावा करताना लेखकाला कोणतीच अडचण पडली नसावी असे प्लेवी गृहीत धरतो, कारण प्र्योबेलच्या नंतरच्या कार्याशी त्याचा परिचय झालेला

---

३५. भूगोलक्षेत्राचे हे दोन प्रकारांत विभाजन ही प्र्योबेलची " प्राकृतिक शास्त्राधिष्ठित भूगोल " सुरक्षित राखण्याची जगद्वेष्टी युक्ती होती; आणि त्यासाठीच त्याने " ऐतिहासिक तात्त्विक भूगोल " या प्रकारात या अभ्यासक्षेत्राच्या भक्ताना त्यांच्या आवडीच्या क्षेत्राची मनसोक्त अप्रतिष्ठा करण्याचा परवाना दिला " (२४७), या लायलीच्या अनुमानाला पुष्टी देणारा पुरावा प्र्योबेलच्या लिखाणात प्रस्तुत लेखकाला कोठे सापडला नाही. खरोखरच तसे असेल तर तो एक दैवदुर्विलासच म्हटला पाहिजे; कारण, खुद्द प्र्योबेलचीच नंतरची प्रकाशने, भूगोल या क्षेत्रात जमा करावयाचीच असतील , तर ती या दुसऱ्या प्रकारात घालावी लागतील. पण, प्र्योबेलचा असा उपहास करण्याचे कारणच काय ! येथे विचाराधीन असलेल्या दोहोंपैकी एकाही लेखात त्याच्या एतद्विषयक प्रामाणिकपणाबद्दल शंका घेण्यास जागा दिसत नाही. मानवाच्या अभ्यासाची पृथ्वीच्या अभ्यासाशी सांगड घातल्याबद्दल त्याने केलेली रिटरची प्रशंसा (५४, ५०४) जरी क्षणभर नजरेआड केली, तरीही हंबोल्टच्या लिखाणाचा बहुतांश भाग केराच्या टोपलीत टाकावयास तो सिद्ध झाला होता असे समजण्याचे कारण नाही. निश्चित स्वरूपाचे संदर्भ देण्याबाबतच्या प्र्योबेलच्या निष्काळजीपणामुळेच त्याच्या काही वाक्यांनी पुढील पिढीत गोंधळ माजविला. " निसर्ग वर्णन विद्येचा बृहस्पती " (Der Meister in der Naturschilderung), या वाक्यांशाने अलेक्झांडर, फोन, हम्बोल्ट या विद्वानाचा निर्देश आपण करतो आहोत हे न ओळखणारी वाचकांची पिढी पुढे आपली वाक्ये वाचणार आहे आणि त्यामुळे वरील वाक्यांश्यापुढील संपूर्ण परिच्छेदात हंबोल्टच्या " निसर्गरूपवर्णनाचे " अनेक प्रतिध्वनी उमटलेले आहेत याची दखल घेण्यास ते बिचारे वाचक असमर्थ ठरणार आहेत, ही गोष्ट प्र्योबेलच्या ध्यानीमनीही आली नव्हती, हे गृहीत धरणे प्राप्त आहे. भूगोलाच्या या शास्त्रबाह्यप्रकाराची चर्चा करताना जे एकमेव निश्चितस्वरूपाचे अवतरण प्र्योबेलने दिलेले आहे ते हम्बोल्टचे आहे, पण तेही संदर्भ न देताच उद्धृत केलेले आहे; आणि योगायोगाने मूळ लेखकाच्या निष्कर्षाच्या अगदी विरुद्धार्थाचा निष्कर्ष काढण्यासाठी फ्रॉयूबेलने त्याचा उपयोग केला आहे (५६, ७; हम्बोल्टचा मूळ लेख ४३, १७). त्यानंतर काही वर्षांनी प्र्योबेलने एक लेख लिहिला व त्या हम्बोल्टच्या " निसर्ग दृश्ये " (Ansichten der Natur), या ग्रंथाचा " शास्त्रबाह्य प्रकाराच्या भूगोलाचा एक आदर्श नमुना " या शब्दात गौरवपूर्ण नामनिर्देश केलेला आहे. कोणाच्या मनात वरील मुद्याबाबत काही कुशंका असेलच तर सदरच्या लेखाने ती दूर होण्यास हरकत नाही. (५७).

नव्हता (८, ६०). खरोखर, मी पाहिलेल्या भूगोलाच्या सर्वच ऐतिहासिक अभ्यासलेखातून प्रयोबेलचे नाव या एका अरचित उल्लेखानंतर पूर्णपणे अदृश्य झालेले दिसते. नंतरच्या दशकात घेतल्या गेलेल्या आढाव्यांतून त्याच्या नावाचे उल्लेख असले, तरी ती नावे एकाच व्यक्तीची आहेत हे ओळखणेही कठीण होते. तसा दुवा फक्त त्याच्या आत्मचरित्रावरून मिळतो.

१८३२ नंतरच्या दशकात फ्रॉय्बेल झूरिच येथे भूगोल व धातुशास्त्र हे विषय शिकवत असे. वरवर पहाता असे दिसते की, ज्यातून पृथ्वीच्या शास्त्राची उभारणी करता येईल अशा क्रमबद्ध भूगोलाच्या एका सर्वांगीण अभ्यासग्रंथाची पूर्वतयारी करण्याचे कामी बराच काळ खर्च केला. पण तो ग्रंथ तो कधीच पूर्ण करू शकला नाही. ''

---

३६. झूरिचमधे असताना प्रयोबेल व त्याचा एक सहकारी मित्र अशा दोघांनी " तात्त्विक भूगोलाच्या विभागासंबंधी माहिती " (Mitteilungen ans dem Gebiete der theoretischen Erdkunde), या नावाचे एक नियतकालिक सुरू केले व तेच त्याचे संपादनही करू लागले. पण, फक्त चार अंक निघेतोपर्यंतच ते तग धरू शकले. ते अंक आता फारच थोड्या ठिकाणी उपलब्ध आहेत. दुर्दैवाने, प्रस्तुत ग्रंथ लिहून पुरा होईतोपर्यंत मला त्याची एकही प्रत पहावयास मिळाली नाही. त्यातील प्रयोबेलच्या प्रास्ताविक लेखात (५७), त्याने भूगोलाच्या रूपरेषेचे केलेले प्रतिपादन त्यानेच १८३२ मध्ये केलेल्या प्रतिपादनापेक्षा अधिक परिपूर्ण व अधिक प्रगल्भ विवेचन करणारे आहे असे वाटते. व्यापक अर्थाने त्याने भूगोलाची व्याख्या केली आहे, ती अशी : " क्षेत्रीय साहचर्यामुळे काही अंशी भूपृष्ठाचे घटक समजले जातात अशा पार्थिव घटनांचे शास्त्र म्हणजे भूगोल " एकूण भूगोलाची दोन प्रकारांत विभागणी करण्याऐवजी येथे त्याने चार वेगवेगळे प्रकार मानले आहेत : (१) पार्थिव घटनांच्या साहचर्याचा शुद्धशास्त्रीय दृष्टीकोणातून विचार करून त्यांचा अभ्यास ज्यात केलेला असतो तो " शुद्ध भूगोल "; (२) ज्यात घटनांचा नैतिक-व्यावहारिक भूमिकेतून अभ्यास केलेला असतो तो " राजनैतिक भूगोल " – यालाच कदाचित त्याने ' सांख्यिक ' भूगोल म्हटले असावे; (३) ज्यात नैतिक–तात्त्विक भूमिकेवरून अभ्यास केलेला असतो तो " ऐतिहासिक भूगोल "; आणि (४) ज्यात सौंदर्य बोधक दृष्टिकोणातून अभ्यास केलेला असतो तो " रूपवर्णनात्मक भूगोल ". मानववंशांच्या व लोकांच्या वस्तुनिष्ठ अभ्यासांची आणि एक पार्थिव घटना या नात्याने राज्यांच्या भूगोलांची गणना शुद्ध शास्त्रीय भूगोलात केलेली होती. भूगोल म्हणजे पृथ्वीचे संपूर्ण शास्त्र नव्हे. भू-विषयक प्रमेये आणि पृथ्वीचा इतिहास या दोहोंपासून भूवर्णन (Erdbeschreibung) या अर्थाने भूगोल हा भिन्नच राखला पाहिजे. (हंबोल्टवर आधारित, ४२) पहिल्या खंडाची हम्बोल्टच्या नावे लिहिलेली अर्पण-पत्रिका लक्षवेधी आहे. ज्याने पृथ्वीवरील नैसर्गिक घटनांतील आत्यंतिक समाकर्षणांचा अन्वयार्थ लावून एका विशिष्ट समस्येचा विचार करणाऱ्या " एक विशिष्ट समस्या या नात्याने पृथ्वीवरील नैसर्गिक घटनांमधील आत्यतिक समाकर्षणाचा अन्वयार्थ लावून ज्याने एका स्वतंत्र शास्त्राला जन्म दिला त्या अध्वर्यूला–" (Dem Ersten, Welcher dem grossen Zusammenhang der Natur erscheinungen an Erde als besondere Aufgabe einer eigenen Wissenschaft aufgefasst hat—). त्याच ग्रंथातील दुसऱ्या लेखात त्याने भूरूपांची व्याख्या करण्याच्या समस्येवर उत्कृष्ट चर्चा केली व निष्कर्षही काढला. एका अलीकडील भूगोलविषयक सभेत प्रस्तुत लेखकाने त्याच निष्कर्षाचा न कळत पुनरुच्चार केला " भूपृष्ठाच्या उंच सखलपणाचा भौगोलिक अभ्यास भूशास्त्राच्या कचाट्यातून पूर्णपणे व निस्संदिग्धपणे सोडविणे आवश्यक आहे (५८, ४७६).

स्फटिक शास्त्रावरील त्याचा अभ्यासप्रबंध–अर्थात, त्याच्या अध्यापनाच्या दुसऱ्या क्षेत्रातील त्याच्या कार्याचा एक भाग– वगळला, तर सुरूवातीच्या काळातील त्याचा पेरू आदि देशांवरील मार्गदर्शक ग्रंथ आणि 'वालिसेर आल्प्समधील काही दूरच्या दऱ्यांचा अभ्यास' येवढेच, ज्याला उघडपणे भौगोलिक म्हणता येईल असे, अनुसंधानात्मक प्रकाशन आपल्या संपूर्ण आयुष्यात त्याने केलेले दिसते. तो ग्रंथ तेथील भूरुपांचा नकाशा तयार करणे आणि तेथील लोकांचा मानववंशशास्त्रीय अभ्यास करणे या दोन गोष्टींशी मुख्यतः संबंधित होता. त्याने केलेल्या भाषिक तुलनेतून, हे लोक पुरातन केल्टिक टोळी जमातींचे अवशिष्ट भाग आहेत असा निष्कर्ष काढला (२८, I, ७१ ते ९०). अर्थात, हा अभ्यास काटेकोरपणे " प्राकृतिक शास्त्र " या अर्थाने भूगोल क्षेत्रात मोडतो, असे कोणीच मानण्याची शक्यता नाही.

झूरिच येथे अध्यापनाचे कार्य एक दशकपर्यंत केल्यानंतर, फ्रयोबेलने आपल्या पदाचा राजीनामा दिला, व त्याने राजकीय क्षेत्रातील क्रान्तीच्या प्रचारकार्याला स्वतःला वाहून घेतले, त्यानंतर, तो शैक्षणिक क्षेत्राकडे कधीच वळला नाही. १८४८ च्या अकालान्तिक फ्रँकफुर्ट-विधिमंडळात सेवा केल्यानंतर, व्हिएन्नाच्या गोळीबारातून कसाबसा सुटून, तो अमेरिकेत परागदा झाला. तेथे त्याने मुख्यतः फिरता बातमीदार म्हणून दहा वर्षे काढली. उत्तर अमेरिका खंडांच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत अनेकदा प्रवास केला, इतकेच नव्हे तर, मध्य अमेरिकेतील काही देशांतूनही तो भटकला, पण त्याने आपल्या पहिल्या वहिल्या भूगोलग्रंथात ज्यांच्याबद्दल लिहिले त्या दक्षिण अमेरिकेतील देशांना त्याने एकदाही भेट दिली नाही. त्याने लिहिलेल्या द्विखंडात्मक प्रवासगाथेवर बर्लिन येथील भूगोलाभ्यास मंडळाच्या नियतकालिकात नॉयमानने त्याचे पुरस्कारात्मक परीक्षण लिहिले. खरेतर, वाचण्यास आजही गोडी लागावी असे ते लिखाण आहे (६२).

या ग्रंथाचा बराच मोठा भाग, जरी संयुक्त संस्थानांच्या सामाजिक व राजकीय समस्यासंबंधीचा असला, आणि स्वतः लेखकानेच जरी हा ग्रंथ शास्त्रीय स्वरूपाचा मानला जाऊ नये असे निस्संदिग्धपणे सूचित केलेले असले, तरीही त्यात खूपच भौगोलिक सामग्री दिलेली आढळते. त्याने एका लहानशा प्रकरणात उत्तर अमेरिकेच्या पश्चिम भागातील पर्वतक्रमबंधांचा क्रमबद्ध अभ्यास केलेला आहे. त्याने स्वतःच ज्याची शास्त्रीय भूगोल म्हणून व्याख्या केलेली होती तशा प्रकारच्या भौगोलिक लिखाणात ज्याचा निर्विवादपणे समावेश करता येईल असा येवढा एकच अभ्यासलेख फ्रयोबेलने आपल्या आयुष्यात लिहिला. (या लेखामुळे उत्तर अमेरिकेच्या प्राकृतिक भूगोलात पडलेली भर, नॉयमान समजतो त्यापेक्षाही अधिक अर्थपूर्ण होती की काय हे ठरविणे मला शक्य होणार नाही. पण, डिसेंबर १३-१४

तारखांच्या १८५४ च्या ' कॅलिफोर्निया क्रॉनिकल ' मध्ये त्याला प्रसिद्धी देण्यात आलेली होती हे लक्षात घेणे उद्बोधक ठरेल ). पण, त्यानेच केलेल्या " उपयोजनात्मक भूगोल " या विभागात चपखलपणे बसू शकतील अशी अनेक सुंदर प्रदेशवर्णने वर उल्लेख केलेल्या त्याच्या लिखाणापेक्षा अधिक मोलाची आहेत. या वर्णनांतून, आजच्या ऐतिहासिक भूगोलकाराला गेल्या शतकाच्या मध्याच्या सुमाराची, आपल्या देशाच्या नैऋत्य भागाची, एका प्रशिक्षित भूगोलकारने लिहिलेली भौगोलिक माहिती मिळते. " ज्यातून ' भूदृश्ये ' आकार घेतात, त्या भूरुपात्मक घटकांची सुसंगती व एकात्मता " याचे दर्शन घडविणाऱ्या लिम्पिआस खोऱ्याच्या सृष्टिसौंदर्याचे वर्णन वाचत असता ' हे सर्व हंबोल्टचा शिष्य लिहितो आहे ' हे कोणत्याही माहितगार वाचकाच्या लक्षात येण्यासारखे आहे. (६२, II, ३८२).

जर्मनीला परत आल्यावर पुढच्याच वर्षी, फ्रयोबेलने राजकीय अभ्यासांचे अनेक खंड प्रसिद्ध केले. त्यापैकी काहीतर उघडउघड भौगोलिक पायावरच उभारलेले आहेत. त्यातही, अमेरिकेचा युरोपच्या राजकीय-भौगोलिक परिस्थितींशी असलेला संबंध दाखविणारा अभ्यास विशेष उल्लेखनीय आहे (६३). जीवनाच्या शेवटच्या पर्वात त्याने लिहिलेला हा ग्रंथ तोपर्यंत त्याने केलेल्या सर्व लिखाणांहून अधिक महत्त्वाचा आहे, असे तो स्वतःच मानत असे, व हंबोल्टलाही तो मौलिक असल्याचे आढळून आले (२८, II, २८). म्हणूनच, ऐतिहासिक भौगोलिक बुद्धिबळक्रीडेतील कुशल खेडाळू आणि " इतिहास व भूगोल याचा संयोग घडविण्याच्या कलेतील एक श्रेष्ठ तंत्रज्ञ ", अशा शब्दात फ्रयोबेलच्या गुणविशेषांचे वर्णन स्पोररने केले आहे (६८, ४१५). स्पोररच्या या लेखाकडे, त्यातील रिटरवरील व त्याच्या अनुयायांवरील टीकेच्या निमित्ताने लायलीने, लक्ष वेधले आहे. खरोखर आपल्याला असे म्हणण्यास हरकत नाही, की भूगोल लेखनाच्या पहिल्या पर्वातच ज्या फ्रयोबेलने १९ व्या शतकाच्या उत्तरार्धात अवतरलेल्या " शुद्ध शास्त्रीय " भूगोलाचा उद्घोषक म्हणून प्रवेश केला, तोच फ्रयोबेल आपल्या जीवनाच्या उत्तरपर्वातील अत्यंत महत्त्वाच्या अभ्यास ग्रंथामुळे विसाव्या शतकातील युद्धोत्तर-कालाच्या भूगोलाच्या भू-राजनैतिक परंपरेचा अग्रदूत म्हणून पुढे आला.

आपल्या प्रदीर्घ आणि कार्यशील जीवनाच्या उत्तर-भागात फ्रयोबेलने भूगोलक्षेत्रात कोणतीच भर टाकलेली दिसत नाही. दहा वर्षांहून अधिक काळपर्यंत प्रसिद्धी खात्याचा प्रमुख म्हणून, व्हिएन्ना, स्टुटगार्ड आणि म्यूनिक येथील विविध जर्मन शासनांचा खास सल्लागार म्हणून, आणि शेवटी, सुमारे १६ वर्षेपर्यंत, जर्मन राष्ट्रीय शासनाच्या स्मर्ना व अल्जीर्स येथील वकिलातींतील अधिकारी म्हणून फ्रयोबेलने सेवा केली.

या असामान्य व्यक्तीच्या चरित्राचा आढावा घेत असताना, तो भूगोलक्षेत्रातच कार्य करत राहिला असता तर कोणत्याही उच्चपदाला पोहोचला असता, असे आश्चर्य व्यक्त केल्याशिवाय रहावत नाही ! त्याच्या संशयातीत योग्यतेचा व उत्साहाचा विचार करता, त्याकाळातील या क्षेत्रातील कोणाही अभ्यासका इतकाच त्याचाही प्रभाव या क्षेत्राच्या विकासावर पडलेला दिसला असता, ही गोष्ट अगदी शक्यकोटीतील वाटते. पण, मानवी घटनांबद्दल प्र्योबेलला वाटणारा जिव्हाळा इतका प्रभावी होता, की त्यामुळे, ज्याचे त्याने स्वतःच शास्त्रीय म्हणून वर्णन केले, त्या संकुचित क्षेत्रात स्वतःला कोंडून घेणे त्याला शक्य तरी झाले असते का, अशी शंका आल्याशिवाय रहात नाही. या मुद्यावर कोणी काहीही कल्पना लढवोत एक गोष्ट सत्य आहे, की स्वतःच्याच त्या क्षेत्रातील कार्यावर अथवा त्याक्षेत्राच्या इतिहासाच्या अभ्यासावर न आधारलेला, भूगोलक्षेत्रासाठी त्याने सुचविलेला क्रांतिकारक कार्यक्रम त्या एकूण क्षेत्राच्या विकासावर प्रभाव पाडू शकला नाहीच, पण त्याच्या नंतरच्या स्वतःच्या कार्यक्रमावरही फारसा प्रभाव पाडू शकला नाही.

गेर्लांटने घोषित केलेल्या भूगोलक्षेत्रातील मूलगामी कार्यक्रमाचा त्याच्या पूर्वायुष्याशी, प्र्योबेलच्या कार्यक्रमाइतकाही, संबंध नव्हता, तसेच त्याच्या उत्तरायुष्यातील अभ्यासलेखांवरही त्या कार्यक्रमाचा फारच थोडा प्रभाव पडलेला दिसतो. आधिही आणि नंतरही ज्यांचा विचार मानवजातिवर्णनात्मक म्हणून करता येण्यासारखा आहे असे मानवजातीचे वर्णन करणारे अभ्यास लेख हेच त्याचे खास कार्यक्षेत्र होते (वाग्नेर, ८०, ३८४). गेर्लांटच्या बाबतीतही पूर्वजीवनाची पार्श्वभूमी महत्त्वाची आहे. ही पार्श्वभूमी सापरच्या सहानुभूतिपूर्ण अभ्यासलेखात आढळण्यासारखी आहे (३७). गेर्लांटचे भूगोलविषयाचे शिक्षण विद्यापीठ पातळीवर झालेले नव्हते, आणि ही वस्तुस्थिती काही असाधारण नव्हती. १९ व्या शतकाच्या उत्तरार्धात, भूगोलक्षेत्राचा ज्यांनी विकास घडवून आणला त्यातील बहुतेकजण प्रथम गणित, भूशास्त्र, प्राणिशास्त्र किंवा इतिहास या विषयाचे प्रशिक्षण घेतलेले पण नंतर भूगोलक्षेत्रात प्रवेश करणारे असेच होते (पेंक ९०, I. ३८). बहुतेक बाबतीत हा विषयपालट त्या व्यक्तींना भूगोलक्षेत्राविषयी निर्माण झालेल्या गोडीचा परिणाम होता. तो भूगोलक्षेत्रातील त्यांच्या प्रकाशनांच्या रूपानेच प्रथम लोकांपुढे आला. गेर्लांटचा भूगोलाशी संबंध " भूगोलविषयक वार्षिक ग्रंथ " (Geographische Jahrbuch) या नियतकालिकासाठी लिहिलेल्या मानवजातिवर्णनक्षेत्रातील कार्याचे सर्वेक्षण करणाऱ्या त्याच्या लेखापुरताच मर्यादित होता. तसेच निरनिराळ्या माध्यमिक शाळांतून भूगोलाचा पाठ्यक्रम शिकविण्याचे त्याच्या नशिबी आल्यामुळेही हा संबंध आला. आणि मग १८७५ मध्ये स्ट्रासबुर्गच्या जर्मन विद्यापीठाने या बेचाळीस वर्षाच्या मानवजातिशास्त्रज्ञ आणि भाषाशास्त्रज्ञाला आपल्या भूगोल शाखेचे अध्यक्ष पद बहाल केले. सापरला हा प्रयोग जरी यशस्वी झाल्याखारखे वाटले, तरी गेर्लांटच्या स्वतःच्याच निवेदनावरून मिळणारा पुरावा त्याच्या अगदी उलट आहे. ज्या क्षेत्रात त्याचे

आगमन इतक्या उशीरा झाले होते, त्याच क्षेत्राचे स्वरूप पालटून टाकणाऱ्या क्रांतिकारी सूचना इतरांपुढे स्पष्टकरून सांगताना तो लिहतो, " सामान्य माणसाच्याही लक्षात भरणारे भूगोलाचे अशास्त्रीय स्वरूप हेच माझ्या जीवनांला व कर्तृत्वाला आलेल्या कडवटपणाचे कारण होते (७६, xiii) " गेर्लांटचे ते प्रदीर्घ निवेदन पूर्णपणे वाचल्यावर, खरोखरच, ज्या क्षेत्रात अध्यापन करण्यासाठी त्याची नेमणूक झालेली होती त्या क्षेत्राचा नीटसा अर्थ तरी त्याला कळला होता का, असा प्रश्न विचारावासा वाटल्याशिवाय रहाणार नाही. दुसऱ्या शब्दात विचारावयाचे झाले तर, शास्त्रीय क्षेत्रातील त्याच्या स्वतःच्या विचारपद्धतीत आणि हंबोल्ट व रिटर यांनी विकसित केलेल्या भूगोलक्षेत्राच्या विचारपद्धतीत जो विरोध होता त्यातून निर्माण झालेल्या वैयक्तिक समस्येत त्याच्या भूगोलाचीही समस्या गुंतून पडलेली नव्हती ना ?

गेर्लांटच्या वैयक्तिक समस्येचे स्पष्टीकरण काहीही असो, त्याच्या कार्यक्रमाची रूपरेषा स्पष्ट करणाऱ्या त्याच्या १८८७ सालच्या प्रबंधाने ती सुटली नाही येवढे खरे. पुढील संपूर्ण वीस वर्षांच्या काळात, अभ्यासक्रमात मानवाच्या भूगोलाचा समावेश करण्याची आपली पद्धत चालूच ठेवली. या कालखंडातील त्याच्या लिखाणांपैकी फारच थोडे लिखाण, ज्या क्षेत्राची मर्यादा भूगोलाला घालण्याचा त्याचा प्रस्ताव होता, त्या क्षेत्रमर्यादित समाविष्ट करणे शक्य झाले असते, असे आढळून येईल. सापरने उल्लेख केलेले त्याचे प्रमुख कार्य म्हणजे " अल्सास-लोरेन " या जर्मनीच्या प्रांतांचे भौगोलिक वर्णन (Geographische Schilderung des Reichslandes Elsass lotheringen). ते १८९४ साली प्रसिद्ध झाले. या ग्रंथात मानवी लोकसंख्येवर विवेचन करण्यात आले, पण, तत्त्वनिष्ठेच्या नावाखाली राजकीय भूगोल वगळण्यात आला– म्हणजे डेन्मार्कच्या राजपुत्राचे पात्र वगळून केलेला हा हॅम्लेटचा नाटकाचा प्रयोग होता ; कारण, भौगोलिक एकक या नात्याने या प्रदेशाच्या स्वतंत्र विवेचनाचे एकमेव समर्थन त्याच्या राजकीय भूगोलातच सापडण्यासारखे आहे.

कांटने भूगोलक्षेत्रसंबंधी व मानवजातिशास्त्रसंबंधी केलेल्या कार्यांचे गेर्लांटने केलेले परीक्षण वाचल्यावर–ही त्याची व्याख्यानमाला १९०१ मध्ये गुंफली गेली. त्याने स्वतःच्याच पहिल्या प्रमेयाला तात्त्विकदृष्ट्या रजा दिली की काय, अशी शंका आल्याशिवाय रहात नाही. " प्राकृतिक क्षेत्रात –ज्यात मानवाचाही अंतर्भाव होतो असे आपल्याला दिसून आले तो–हे निसर्गाचे सामान्य व सारांश वर्णन असल्याने, तो इतिहासाचा व शक्य त्या सर्व प्रकारच्या भूगोलांचा पाया आहे, (१२, ५०४), हे या महान तत्त्ववेत्त्याचे (कांटचे) विधान प्रत्येक भूगोलशास्त्रज्ञाने हृदयात ठसवावे असे आहे ". असे गेर्लांट आग्रहाने सांगतांना ऐकिले म्हणजे कोणाच्यातरी शद्बांचा हा अस्फुट प्रतिध्वनी उमटतो आहे असा भास झाल्याशिवाय रहात नाही. रात्सेलने असेच म्हटले असते आणि रिक्टोफेनने तसे म्हटलेलेही आहे. सॅपर अशीही माहिती पुरवितो की त्याच सुमारास गेर्लांटची चार मोठे ग्रंथ लिहिण्याची योजना आखलेली होती : (१) निरींद्रिय पृथ्वीचा भूगोल या अर्थाने भूभौतिकशास्त्र, (२) वनस्पतिसृष्टिचा भूगोल, (३) प्राणि-सृष्टिचा भूगोल, (४) आणि मानवी सृष्टिचा भूगोल या अर्थाने समाजशास्त्र.

येथे वाचकवर्गाला एक प्रश्न सहजच विचारावासा वाटेल, की ज्या कार्यक्रमाला त्याच्या प्रवक्त्याच्या आधीच्या कार्यात स्थान नव्हते आणि नंतरच्या त्याच्या कार्यावरही ज्याचा काहीच प्रभाव पडलेला दिसत नव्हता, अशा एका कार्यक्रमाने भूगोलाच्या व्याप्ती व मर्यादा घालण्याचा प्रयत्न केला तरी त्याची अधिक चर्चा करण्याची जरुरीच काय ! पण संबंधीत क्षेत्रांचा विकासेतिहास लक्षात न घेता, केवळ तार्किक विवेचनावर आधारलेली एक शास्त्र-संकल्पना शास्त्रांच्या एका विशिष्ट गटाने विकसित केलेली होती. तिच्याच परिभाषेत भूगोलशास्त्राचीही रूपरेषा सांगोपांग विचाराअंती आखण्याचा गेर्लांटचाही प्रयत्न होता. यादृष्टीने पहाता त्याचा कार्यक्रम महत्त्वपूर्ण आहे हे निश्चित. या दृष्टिने तो फ्रयोबेलचा तर्कनिष्ठ वारस आहे; पण, या संकल्पनेचे सातत्य पूर्णपणे राखण्यात गेर्लांटला यश न आल्यामुळे, लायलीनेही या संकल्पनेला आवश्यक त्या सुधारणेची पुस्ती जोडली (२२२, २५० ff).

एक गोष्ट निश्चित आहे की, आपण " रुढिवादा " विरूद्ध " तर्कवाद " उभा करत असल्याचे गेर्लांटने कधीच कबूल केले नाही. उलट भूगोलाच्या ऐतिहासिक विकासाचा आपण भरपूर विचार केलेला आहे असा त्याचा दावा होता (xii). या दाव्याच्या समर्थनार्थ देता येण्यासारखा एकच पुरावा त्याच्या जवळ होता. ज्यात त्याला संपूर्ण भूगोल मर्यादित करावयाचा त्या तत्त्वांच्या शोधार्थ त्याने पूर्वाचार्यांच्या लिखाणातून काही संदर्भ घेतलेले होते. (उदाहरणार्थ हंबोल्टच्या ग्रंथातील संदर्भ पाने xxi, xxii इत्यादि). हे फुटकळ संदर्भ हाच त्याचा पुरावा होता. " आपण फक्त विकासाचा प्रमुख प्रवाह तेवढाच लक्षात घेतलेला आहे. अर्थातच, तात्कालिक परिस्थितींना ऐतिहासिक दृष्ट्या महत्व नसल्यामुळे त्यांचा विचारच केलेला नाही ". ही त्याची त्या संबंधीची सफाई आज वाचताना तरी काहीशी उपहासगर्भ वाटते.

गेर्लांटच्या प्रबंधाचा येथे विचार करण्याची आपल्याला गरज नाही. ज्या दोन प्रमुख क्षेत्रांवर तो आधारलेला आहे त्यावर लक्ष केंद्रित करून आपले काम भागण्यासारखे आहे. एकात त्याने शास्त्राच्या सामान्य स्वरुपाचे विधान केलेले आहे ; आणि दुसऱ्यांत ज्या ' भू ' चे नाव भूगोलाने घेतलेले आहे त्या पृथ्वीच्या स्वरुपाचे विधान केले आहे (V f). ही दोन विचार क्षेत्रे " भूगोलाचे शास्त्र " या नावाने एकत्र एका चौकटीत बसवण्यासाठी त्याच्या लांबलचक प्रतिपादनाचा बराच मोठा भाग खर्ची पडलेला आहे.[३७]

---

३७. लायलीने केलेल्या गेर्लांटच्या प्रबंधाच्या परिशीलनात त्याचा संपूर्ण सारांश आला आहे, तसा वाचकाचा ग्रह होण्याची शक्यता असली तरी, असे समजणे योग्य होणार नाही. कारण, त्याने " यावर गेर्लांटने तात्काळ हल्ला चढविला ......... ", किंवा " गेर्लांट आता या मुद्याकडे वळतो ...... ", हे आणि असेच शब्दप्रयोग करून प्रबंधाची पानेच्या पाने गाळलेली आहेत, आणि या गाळलेल्या पानांतच गेर्लांटने काही महत्वाचे मुद्दे मांडलेले आहेत, तरी लायलीने त्यांचा कोठेच उल्लेख केलेला नाही. गेर्लांटने काही अभ्यासलेख विचारात घेणे कसे इष्ट आहे याचे समर्थन करण्याचा प्रयत्न या गाळलेल्या पानातच केलेला आहे. आणि नेमके तेवढेच लायलीने दृष्टीआड केलेले आहे (७६, viii, xiii, xxi, xxv).

भूगोलाच्या पद्धतितंत्रातील या प्रकारच्या दृष्टिकोणाचे हे खास लक्षण समजले पाहिजे. तदनुसार, शास्त्राच्या स्वरूपासंबंधीचे विचारक्षेत्र काही निरपवाद विधानांनी पुढे मांडलेले असते; मात्र तसे ते मांडताना त्याच्या समर्थनार्थ केलेली चर्चा व दिलेले संदर्भ पूर्णतया गाळलेले असतात (v आणि xxix). गेर्लांटने केलेल्या काहीशा दीर्घसूत्री व्याख्येचा येथे पुनरुच्चार करण्याची आवश्यकता नाही; कारण वाग्नेर व लायली या अगदी विरूद्ध विरूद्ध दृष्टिकोण असणाऱ्या दोन अभ्यासकांनी ती व्याख्या भौतिक शास्त्राचे वर्णन या अर्थाने मान्यच केली आहे. आणि एखादे विचारक्षेत्र एकदा मान्य केल्यावर, तदनुषंगाने येणारे पुष्कळसे मुद्दे, तर्कदृष्ट्या बरोबर असतात म्हणून मान्य केलेच पाहिजेत, ही गोष्टही वाग्नेरला मान्य आहे. पण तथाकथित भौतिकशास्त्रांनाच फक्त शास्त्रीय प्रतिष्ठा बहाल करणारे शास्त्राचे विधान मान्य करण्यास आपण बांधलेले नाही, असे त्याला वाटते (७७, ४२१ ff). प्रमुख विचारक्षेत्र अशारीतीने अमान्य केल्यावर, त्यावर रचलेला चर्चेचा डोलारा आपोआपच कोसळतो.

यावरून, शास्त्राच्या सामान्य व्याख्येच्या पायावर एखाद्या विशिष्ट ज्ञानक्षेत्राची संकल्पना उभारण्याचा प्रयत्न केल्याने कसा तोटा होतो, हे ताबडतोब लक्षात येते. शास्त्राचे स्वरूप हा शास्त्रविषयक प्रश्न नसून तो एक तत्त्वज्ञानविषयक प्रश्न आहे. शास्त्रज्ञ स्वतःच आपल्या भूमिकेवरून त्याचे समाधानकारक उत्तर देण्यास अपात्र आहेत. निरनिराळ्या शास्त्रज्ञांनी दिलेल्या उत्तरांतील महदंतरतच त्यांच्या याविषयीच्या अपात्रतेचे प्रतिबिंब दिसते. भूगोलाच्या प्रत्यक्ष व्याप्तीबाबतच्या मतांत भूगोलज्ञांतही मोठेच मतभेद असलेले दिसतात. पण, सर्व साधारणपणे शास्त्र म्हणजे काय याची व्याख्या करण्याचा ते प्रयत्न करतात तेव्हा त्यांच्यात जे मतभेद दिसून येतात त्यांच्या तुलनेने व्याप्तीबाबतचे मतभेद किरकोळ वाटतात. आणखी असे की, या प्रश्नासंबंधीचा दृष्टीकोण कालाच्या प्रवाहात समूळ बदलण्याची शक्यता असते. फ्रयोबेलने सांगितलेल्या कार्यक्रमाची तुलना गेर्लांटने सांगितलेल्या कार्यक्रमाशी केल्यास अशाबदलांचेच प्रतिबिंब त्यात उमटलेले दिसेल. लायलीने अचूकपणे हेरल्याप्रमाणे दोनही बाबतीत " एकोणिसाव्या शतकातील निसर्गशास्त्रज्ञानी उठविलेल्या आवाजाचे ते प्रतिध्वनी आहेत " (२२२, २५०). पण फ्रयोबेलच्या काळात " निसर्गशात्रात " मानवाचा वस्तुनिष्ठ अभ्यास समाविष्ट करण्यास हरकत घेतली जात नव्हती; पण, पन्नास वर्षांनंतर मात्र, नैसर्गिक ही संकल्पना इतकी संकुचित करण्यात आली की मानवाचा अभ्यास त्यातून वगळावाच लागला. पुढे, लायलीने, वाग्नेरशी नकळत सहमत होऊन, असेही सूचविले, की गेर्लांटची स्वतःची शास्त्रविषयक संकल्पना याहूनही संकुचित आहे. त्याने केलेल्या तर्कवादाचा भर " भौतिकशास्त्रांच्या काटेकोर तर्कपद्धतीवर आहे ". अर्थातच, अशा संकल्पनेला स्थिर-स्वरुपाचे निष्कर्ष व निश्चिततेचे नियम यांची गरज असते. मानवी भूगोलात तर केवळ संभाव्यतेचे विवेचन केलेले असते, म्हणून ते शास्त्रच होऊ शकत नाही.

(xxix, C/o वाग्नेर ७७, ४३९ f). विद्युत्‌रेणूंच्या अभ्यासाने त्यांची असंख्य अनिश्चितरूपे उघडकीला आल्यामुळे भौतिक व रसायन शास्त्रज्ञांना आपल्या शास्त्रविषयक कल्पना बदलणे भाग पडले. हे शास्त्रात संभाव्यतेचाही विचार असू शकतो ही कल्पना आज आपल्याला साधीसोपी वाटेल. पण, गेर्लांटच्या काळात ' संभाव्यतेचे विवेचन करते ते शास्त्र ' हे तत्त्वच न्याय्य गृहीत प्रमेय म्हणून निर्विवादपणे मान्य होण्यासारखे होते.

आपल्या मूलभूत गृहीत प्रमेयात गेर्लांटने भूगोलाचे क्षेत्र भूगोल या नावातूनच अनुमान पद्धतीने सिद्ध केले आहे. त्याला ' भूवर्णन ' म्हणा अथवा ' भूविज्ञान ' म्हणा, कोणी काही म्हटले तरी, भूगोल हे भूविषयक शास्त्र आहे, हे निश्चित. (या व्युत्पत्तिसिद्ध निष्कर्षाला आधार म्हणून, कांट, रिटर आणि दुसऱ्या एक दोन लेखकांच्या संकल्पनांचे संदर्भ घेतले आहेत (ix) –त्यांच्या कार्यांचे संदर्भ घेतलेले नाहीत, हे लक्षात घेण्यासारखे आहे). म्हणजे सारभूत प्रश्न असा उपस्थित होतो, की पृथ्वी म्हणजे तरी काय ? त्याचे असे स्पष्ट मत होते, की या प्रश्नाचे उत्तर कोणत्याही प्रमेयाच्या भाषेत देऊन चालणार नाही. –उदा. पृथ्वी ही एक सेंद्रिय वस्तू आहे– एखादा विशिष्ट मानवकेंद्री दृष्टिकोण पुढे ठेवूनही त्याचे उत्तर देता येणार नाही. –उदा. पृथ्वी म्हणजे मानवाचे निवासस्थान– पृथ्वीकडे वस्तुनिष्ठ शास्त्रीय भूमिकेतून पहाता, गेर्लांटला असे आढळून आले, की या विश्वातील कोट्यावधी वस्तूंप्रमाणे पृथ्वी हीही एक वस्तूच आहे. पृथ्वी हा परिवर्तनावस्थेत असलेल्या सृष्ट पदार्थांचा एक मोठा जटिल आहे. विविध-शक्तींनी त्यांना एकत्र बांधल्यामुळे व त्यांचे अन्योन्यसंबंध प्रस्थापित केल्यामुळे, त्यांचे एक स्वयंपूर्ण एकक झाले आहे. तरीही त्यावर काही बाह्य शक्तींचे कार्य चालू आहे, आणि अशा शक्तींपैकी सूर्य ही एक विशेष लक्षात घेण्यासारखी शक्ती आहे. म्हणून अशा शक्तींचे परस्पर संबंध आणि पार्थिव पदार्थांत होणारी परिणामी परिवर्तने यांचा अभ्यास हाच भूगोलाचा विषय आणि तेच त्याचे प्रयोजन होय. हा विषय जरी फार विस्तृत असला तरी त्यातूनच एक परिपूर्ण एकक बनते. (vii)[१८]

---

१८. एखाद्याला असे वाटण्याची शक्यता आहे, गेर्लांटचे हे विधान त्यानेच नंतर घेतलेल्या आक्षेपांशी विसंगत आहे. भिन्नजातीय घटनांतील परस्पर संबंधाच्या अभ्यासांवर तो आक्षेप घेत असे (xvii, Li). म्हणूनच लायलीने केले त्याप्रमाणेच, " Complex Kosmischer Materie ", या वाक्यांशाचे भाषांतर " सामग्रीची जोडणी " असे भाषांतर करण्याने त्याच्या तर्कप्रतिपादनात एकप्रकारे सुधारणाच केल्यासारखे होणार आहे (२२२, २५०). पण असे करण्यात मूळ विधान थोडे बदलते आहे, हे विसरून चालणार नाही.

त्याच्याच दोन प्रमुख विचारक्षेत्रातील विसंगतीमुळे गेर्लांट ज्या तार्किक अडचणीत सापडला, त्या सर्वांचे परीक्षण करत बसण्याची आपल्याला गरज नाही. मूळ कारणाचा स्पष्ट शब्दांत नामनिर्देश न करताच, या अडचणीची चर्चा वाग्नेरने केली आहे.[३९] थोडक्यात सांगावयाचे झाले, तर ही विचारक्षेत्रे दोन महत्वाच्या दृष्टिकोनातून विसंगत वाटतात. "भूविज्ञानातील" समाविष्ट विषयांच्या संदर्भात आणि त्याच्या अभ्यास पद्धतीच्या संदर्भात ही विसंगती दिसते.

पृथ्वी हा भूगोलाचा अभ्यास-विषय आहे, या व्याख्येस अनुसरुन गेर्लांटच्या मते भूगोलातील विषयांश तरी काय असावेत ? जर परस्पर संबंधित विकासाच्या एका अवस्थेत असलेल्या पार्थिव सामग्रीत खडक, पाणी, आणि हवा यांचा समावेश होत असेल, तर त्यांच्याच रूपांतरांतून निर्माण झालेल्या वनस्पती त्या सामग्रींतून वगळणे शक्य होईल कां ? खडक, पाणी, हवा यांचे रुपांतर घडविणाऱ्या शक्तीत वनस्पती व प्राणी यांच्या जीवशक्तीचा समावेश होतो ही गोष्ट जर उघड आहे, तर ज्या सामग्रींतून मानव प्राणी निर्माण झाला ती, आणि जिचे रूपांतर तो संस्कारित उत्पादनात करत असतो तीही, पार्थिव सामग्री आहे ही गोष्टही तितकीच उघड आहे. अर्थातच, ज्या मानवी कार्यशक्तीने भूपृष्ठाच्या बऱ्याच मोठ्या क्षेत्राचा तोंडवळाही बदलून टाकला, ती सुद्धा या पार्थिव सामग्रीत बदल घडवून आणणारी एक शक्ती आहे. मानव आणि मानवी कार्यशक्ती या गोष्टी पृथ्वीवरील, म्हणजे पार्थिव, नव्हेतच असा युक्तिवाद करणे, हे पुराणप्रिय धार्मिक दृष्टिकोनाच्या दिशेने झालेले प्रत्यावर्तन ठरेल ! गेर्लांटने आपल्या विचार क्षेत्रांचे स्पष्टीकरण देताना म्हटल्याप्रमाणे पृथ्वीची सर्व सामग्री व तिच्या सर्व शक्ती या सर्वांचे मिळून एक परिपूर्ण एकक (einheitlitches Ganzes

---

३९. वाग्नेरने मांडलेल्या मुद्यांपैकी पुष्कळांचा काही पानांतून विचार होणार असला, तरी त्या सर्वांचाच येथे उल्लेख करणे शक्य होणार नाही. पण, त्याच्या सर्वच मुद्यांचा व्यापक विचार केवळ त्याच्या अनुवादाने होणार नाही (२२२, २५६), हे लायलीचे विधान अवमूल्यनकारक आहे. गेर्लांटच्या प्रमेयाविरूद्ध निदान बारा तर्कनिष्ठ आक्षेप वाग्नेरने उभे केले आहेत. त्यापैकी लायलीने केलेल्या अनुवादात फक्त तीन्हींचाच उल्लेख आहे. वनस्पति आणि प्राणि यांचा भूगोलासंबंधी केलेला तर्कवाद वाग्नेरच्या टीकेच्या दृष्टिने कमी महत्वाचा मानावा तर "वाग्नेरचे तेवढेच उत्तर तर्कशुद्ध आहे....." (२२२, २१५) असे लायलीनेच म्हटले आहे. याचा अर्थ त्याला "मान्यता" आहे, असे गृहित धरूनही, हे मूल्यांकन अपुरेच वाटते. कारण प्रत्यक्ष उल्लेख न करता निदान आणखी एक मुद्दा तरी त्याने मान्य केलेला आहे. (ग्रंथाच्या ४१ पानावरील तळटीप पहावी).

(v) होत असेल, तर यापैकी काही सामग्री व शक्ती वगळून शिल्लक राहिलेल्यांचे एक परिपूर्ण एकक करावयाचे, ही गोष्ट कोणालाच जमणार नाही. [४०]

आपल्या " शास्त्रीय भूगोलात " मानवाचा समावेश करणे कसे आवश्यक आहे याचे स्पष्टीकरण देताना फ्रयोबेलने केलेल्या युक्तिवादाचा सारांश वरील परिच्छेदात आलेल्या युक्तिवादासारखाच आहे. गेर्लांटला या युक्तिवादाची उपयुक्तता प्राणी आणि वनस्पती यांच्या पुरतीच पटली. म्हणूनच त्याने आपल्या अधिक मर्यादित ' भूविज्ञानात ' त्यांचा अंशतः समावेश केला. पण हा युक्तिवाद तर्काधारे अधिक ताणणे त्याला शक्य नव्हते. कारण तसे केल्याने, गेर्लांटच्या दुसऱ्या महत्त्वाच्या विचारक्षेत्राशी, म्हणजे शास्त्राच्या स्वरूपाशी, त्याचा संघर्ष होऊ लागला. त्याने केलेल्या शास्त्राच्या व्याख्येत मानवी घटनांचा समावेश होऊच शकत नव्हता. म्हणूनच मानवाची भूगोलातून हकालपट्टी करणे प्राप्त होते. दुसऱ्या शब्दात असे म्हणता येईल की शास्त्राच्या चौकटीत बसवण्यासाठी वस्तुस्थिती दुमडलीच पाहिजे, पण सर्व वस्तुस्थितीचा समावेश होईल अशी शास्त्राची चौकट तयार केली जाणार नाही. ग्रंथाचा हा भाग लिहिला जात असतानाच इंग्रजी रेडिओवरून वारंवार ऐकू येत असलेले एक पद, या दृष्टीकोणाचे उदाहरण म्हणून येथे देण्यासारखे आहे.

" कोंबड्याच्या मादीला अंड्याचा आकार खर कोण सांगतो,
अंड्याचा पेला पण जवळ नसतो,
आणि गुरुजींना पुसावे तर त्यांचा पत्ताच नसतो ! "

या तार्किक समस्येतून सुटका करून घेण्यासाठी गेर्लांटने एक तडजोड मान्य केली. एका विचार-क्षेत्राच्या समर्थनार्थ दुसऱ्या क्षेत्रात मानवी घटनांचा बळी दिला ; आणि " शास्त्रीय विधींशी " ते अधिक जुळते घेणारे आहेत असा युक्तिवाद करून अमानव प्राण्यांचा समावेश त्या पहिल्या क्षेत्राच्या आधारानेच याच क्षेत्रात करण्याची सूट मिळविली (xxiv f). मानवाला या क्षेत्रातून वगळण्यासाठी त्याने केलेल्या युक्तिवादाशी हे विसंगत आहे, ही गोष्ट अगदी उघड होती; कारण, जीवशास्त्राच्या पद्धती व भौतिक शास्त्रांच्या पद्धती एकसारख्या असत नाहीत. (सर्व भौतिक शास्त्रांचा समावेश एकाप्रकारच्या पद्धतींत करता येतो हे त्याचे मतही तशा प्रात्यक्षिकांच्या अभावी आक्षेपार्ह आहे).

म्हणून, गेर्लांटच्या समकालीनांचे असे मत होते की, त्याच्या शास्त्राच्या संकल्पनेत पृथ्वीचा समावेश करून घ्यावयाचा असेल, तर त्याने वनस्पती व प्राणिसृष्टी वगळून पृथ्वीची एक वेगळीच संकल्पना मांडणे आवश्यक होते. तशी आणखीही एका विच्छेदनाची जरूरी

४०. गेर्लांटच्या विचार क्षेत्राबर आधारलेला वाग्नेरचा युक्तिवाद थोडक्यात हा असा होता. (७७, ४२६ f) आणि लायलीने याचेच वर्णन " एक अत्यंत नाजुक तर्कसूत्र " या शब्दांत केलेले आहे (२२२, २२५ f). पण त्याच युक्तिवादाचा संक्षेप एका साम्यानुमानाने करण्याचा प्रयत्न करतेवेळी लायलीने त्यातील महत्त्वाचे भाग वगळले. त्यामुळे " परस्पर संबंधित सामग्रीचा जटिल " व " सामग्रीची केवळ एक जोडणी " यांच्या अर्थातील बदलाकडे पूर्ण दुर्लक्ष झाले.

इ-१५५७-१० अ.

होती. आपल्या अतिशिथिल व्याख्येत बसविलेल्या ' उपयोजनात्मक ' पण ' अशास्त्रीय ' भूगोलात प्रादेशिक अभ्यासही घुसडण्याची प्रयोबेलने तयारी दाखविल्यामुळे प्रयोबेलच्या संकल्पनेत कोणतीच काट-छाट करण्याची गरज पडली नाही. याविरुद्ध फक्त (मानवेतर) अवकाशस्थ घटना संयोगांचा समावेश भूगोलात केलेला होता. हा प्रादेशिक भूगोल (Länderkunde) त्याच्या भूगोलाच्या तीन विभागांपैकी एक होता (xxx, xxxv). पण, प्रथम वाग्नेर आणि नंतर हेटनर, या दोघांनीही असे मत दिले, की गेर्लांटच्या या कडक व्याख्येत अशा (प्रादेशिक) अभ्यासांचा तर्कदृष्ट्या समावेश करणे शक्यच नाही (७७, ४४३; २, ३१५ f). [४१]

गेर्लांटचा प्रबंध वाचणाऱ्या सर्वांनाच एक गोष्ट स्पष्ट जाणवू लागली. तर्कदृष्ट्या पहावयाचे म्हणजे, त्याच्या प्रमेयातून वनस्पतिसृष्टीचा आणि प्राणिसृष्टीचा भूगोल, इतकेच नव्हे तर, प्रादेशिक भूगोलही गाळावा लागणार आहे. परिणामी, त्याच्या प्रमेयाची यापेक्षा विचक्षणा करण्याची कोणा भूगोलज्ञांना गरजच वाटली नाही. थोडक्यात सांगावयाचे तर, रिटरच्या आणि त्याच्या अनुयायांचे सर्व कार्य, हंबोल्टच्या कार्याचा बहुतांश भाग, आणि साधारणतः त्यांच्या पूर्वीच्या काळात झालेले जवळजवळ सर्वच भौगोलिक साहित्य, ' निष्कारण ओझे ' म्हणून ' समुद्रास्तुप्यन्तु करण्याची' त्यांची तयारी नव्हती; तसेच शास्त्रीय संघटना व नियतकालिके आणि भूगोलज्ञांच्या वर्तमान पिढीचे प्रशिक्षण या सर्वांवर पाणी सोडण्यासही ते तयार नव्हते. [४२]

---

४१. लायलीने या चर्चेत या मुद्यावरील गेर्लांटचा युक्तिवाद नीटसा लक्षात घेतला नाही (७६, xxx, xxxv). वरवर पहाता तरी त्याने वाग्नेरचीच टीका मान्य केली असे दिसते —मग ते त्याने जाणीवपूर्वक केलेले असो वा ते सहजगत्या घडलेले असो— कारण, त्याने प्रथम " भू-भौतिकशास्त्राला निरीक्षणात्मक सामग्री पुरविणारे उगमस्थान " अशा शब्दात गेर्लांट प्रणीत भूगोलक्षेत्राच्या या महत्त्वाच्या भागाच्या व्याप्तीचा संक्षेप केला, आणि नंतर संथपणे तो सगळा भागच चर्चेतून गाळून टाकला (२५४, तळटीप).

४२. गेर्लांटचा प्रस्ताव मान्य करावयाचा झाला, तर त्यातून अपेक्षित असलेल्या परिणामांचा विचारही वाग्नेरच्या चर्चेत आलेला आहे. गेर्लांटने प्रस्तावाच्या सुपरिणामांच्या चर्चेसाठी दहा पाने खर्ची घातली आहेत. वाग्नेरनेही त्याच्या दुष्परिणामांची समांतर चर्चा केलेली आहे (xliii ते liii). पण लायलीने या दुसऱ्या भागाचा उल्लेखही न करता, त्याने पहिल्या भागावरच असा अभिप्राय दिला आहे, की वाग्नेरच्या या टीकेतून एक प्रच्छन्न शंका नजरेला येते. विद्यालयांतून व विद्यापीठांतून भूगोलाला मिळालेल्या प्रतिष्ठेला बाध येईल अशी भीती वाग्नेरला वाटत असावी (२२२, २५६). प्रत्यक्षात ही शंका लेडी गोडिवाच्या मिषाने प्रदर्शित करण्यात आली. वाग्नेरने आपल्या टीकेच्या या भागाची सुरुवात ' मी असे ठामपणे म्हणण्याचे धार्ष्ट्य करतो ' (Ich zu behaften……). अशा शब्दांनी केली. आणि पुढे त्याने असे विधान केले आहे, की " यामुळे विद्यालयांतून होत असलेल्या आपल्या या शास्त्राच्या विकासाला चांगलाच तडाखा बसेल अशी मला वाटणारी भीती मी लपवू शकत नाही " (Ich Kann Befurchtung nicht underdruche, dass man der Entwiklung unserer Diziplin auf den schulen einen schweren schlag ………… erteilen wurde). पुन्हा त्याने त्याचा उल्लेख ' एक धोका ' (ein Gejar) असा केला आहे (७७, ४४२ f). त्याचप्रमाणे नंतरच्या एका निवेदनात या चर्चेचा उल्लेख करताना वाग्नेर लिहितो, " म्हणूनच माझी ही भीती मी लपवून ठेवलेली नाही. " (Ich habe damals aus meiner Beturuchtung kein Hehl gemacht) (८०, ३९५).

आपल्या इतिहाससंबंधीच्या अभ्यासग्रंथात हेटरने या प्रबंधासंबंधी विचार केला, पण तो ' हे प्रमेय भूगोल क्षेत्राच्या ऐतिहासिक विकासाशी सुसंगत नाही ', हे प्रतिपादन करण्यापुरताच मर्यादित ठेवला, आणि हे त्याचे करणे बरोबरही होते. १९०५ साली हेटनरने या प्रबंधासंबंधी एक पूर्णपणे पद्धतितंत्रात्मक विवेचन प्रसिद्ध केले व त्यात त्याने त्या प्रबंधात ग्रथित असलेल्या तर्कसिद्ध मागण्यांचाही विचार केला (१२६, ५४६ ते ४९ आणि १३२, ६९४ ते ९६). तसेच १९०४ साली आपल्या देशात सेंटलुइ येथे भरलेल्या ' कला आणि विज्ञान ' परिषदेपुढे दिलेल्या एका व्याख्यानात, पेंकनेही या युक्तिवादावर हल्ला चढविला होता. (जर्मनीत प्रसिद्ध झालेल्या पत्रकावरून १२५, ३ ff ; हे व्याख्यान आपल्या देशात प्रसिद्ध झाले अगर नाही हे मला माहीत नाही )*.

म्हणून, तर्कदृष्ट्या गेर्लांटने एक प्रमेय मांडले नाही, तर परस्पर विरोधी दोन प्रमेये मांडली, असे म्हणण्यास हरकत नाही. एखाद्याने त्याच्या पृथ्वीच्या व्याख्येचाच सातत्याने अनुनय केला असता, तर भूगोल क्षेत्रात ज्या गोष्टींचा अभ्यास सामान्यतः होत होता त्या सर्वांचा अभ्यास आणि –भूशास्त्राचा नाही तरी– भू-भौतिकशास्त्राचा अभ्यास, या सर्वांचा अभ्यास पृथ्वीचा अभ्यास या नात्याने भूगोलात समावेश करावा लागलाच असता, पण मग, गेर्लांटने शास्त्र या शब्दाची जी व्याख्या केली आहे त्या अर्थाने ते भूगोलशास्त्र झाले नसते. उलटपक्षी लायलीने केले त्याप्रमाणे, एखाद्याने त्याच्या दुसऱ्या विचार-क्षेत्राचाच अनुनय करावयाचा ठरविले असते, तर " भौतिक शास्त्राच्या " काटेकोर " तर्कभाषेत " भूगोल हे पृथ्वीचे भौतिकशास्त्र, म्हणजेच भू-भौतिकशास्त्र, आहे असेही त्याला सिद्ध करता आले असते. पण हेच सिद्ध करावयाचे होते, तर त्यासाठी पन्नास वर्षांचा काळ आणि पन्नास पानाहून मोठा प्रबंध खर्ची घालण्याची काय गरज होती, अशी शंका मनात आल्याशिवाय रहात नाही.

ऐतिहासिक दृष्ट्या वस्तुस्थिती अशी आहे, की गेर्लांटच्या समकालीनानाच या दोन्ही पर्यायांपैकी कोणाही एकाची वाटचाल कोणत्या अंतिम निष्कर्षाच्या दिशने होणार आहे, हे स्पष्ट दिसत होते. तत्पूर्वीच्या भूगोलकारांची पद्धतितंत्रविषयक विधाने व तत्कालीन भूगोलाची सर्वसाधारण रूपरेषा यांत सामान्यपणे पृथ्वीरूप वस्तूचा अंतर्भाव होत होता, हेही त्यांनी ओळखले होते. त्याबरोबरच, भूगोलकारानी भू-भौतिक शास्त्रात टाकलेली भर नगण्य होती, आणि भूगोल क्षेत्राचे ज्ञान आणि प्रशिक्षण घेणारा कोणताही अभ्यासक भू-भौतिक शास्त्रात त्याने कार्य करावे इतका सुसज्ज होऊ शकत नसे, या गोष्टी लक्षात येण्याइतके ते भूगोलाकार वास्तववादी होते. (वाग्नेर ७७, ४२६ ff). जरी काही थोडे आपल्या भूगोलाच्या व्याख्येत पृथ्वी-वस्तूच्या अभ्यासाचा समावेश करतच राहिले– विशेषतः, रिक्टोफेन बर्लिन विद्यापीठाच्या रेक्टरपदावरून १९०५ साली दिलेल्या आपल्या व्याख्यानात

* पुरवणी टीप क्रमांक १५ पहा.

या संकल्पनेकडे परत वळलेला दिसला–तरी प्रत्यक्ष परिपाठात, जर्मनीतीलच काय पण अन्य सर्वच देशातील, भूगोलकारांनी भूगोलविषयक अभ्यास भूपृष्ठापुरतेच मर्यादित ठेवले. भूपृष्ठावरील घटनांचे, निदान भूरूपांचे, संपूर्ण स्पष्टीकरण देताना भूगर्भाच्या अभ्यासाने काढलेल्या अनुमानांचाच आधार घ्यावा लागेल. याची त्यांना जाणीव होती हे निश्चित. पण, एखाद्या वस्तूवर एखादी शास्त्रशाखा अवलंबून असेल, तर त्या शास्त्रात त्या संपूर्ण वस्तूचा समावेश केलाच पाहिजे, हा आग्रह त्यांना मान्य नव्हता. या संदर्भात बुशर म्हणतो तेच खरे. प्रत्येक शास्त्र अन्य मदतनीस शास्त्रांवर अवलंबून असतेच. पण, एखादे शास्त्र दुसऱ्या एका शास्त्राचे मदतनीस शास्त्र म्हणून उपयोगी पडते येवढ्याच कारणाने त्याचे स्वतंत्र अस्तित्व नष्ट होते असे नाही (५१, २३९) स्पष्टच बोलावयाचे झाले तर, कोणतीही शास्त्रशाखा अन्य कोणत्याच शास्त्रशाखांवर अवलंबून नसणारे स्वयंपूर्ण एकक असू शकणार नाही.

अभ्यास लेखांच्या एका ग्रंथात विषय प्रवेश या नात्याने गेर्लांटचे प्रमेय दिलेले आहे. त्याच ग्रंथात भू-भौतिक शास्त्राच्या अभ्यासांचीही उदाहरणे आहेत. पण भूपृष्ठरूपांच्या अभ्यासांचा आधार म्हणून भूगर्भाच्या अभ्यासांचा उपयोग करता येईल, किंवा याच्या उलट प्रकार करता येईल, असे आश्वासनपूर्वक प्रतिपादन करणे कोणालाही शक्य झाले नाही, ही वस्तुस्थिती आहे–आणि त्याचे तपशीलवार स्पष्टीकरण वाग्नेरने त्या ग्रंथात केलेले आहे (४२४ f). भूपृष्ठाच्या उंचसखल आकारांचा अभ्यास भूखंडांच्या घटनांच्या स्पष्टीकरणाने सुरू करणे हेच तर्काला धरून आहे, असे गेर्लांटचे मत होते. तरीही या अर्धशतकाच्या अशा अभ्यासांतून खंडांच्या विशिष्ट आकारांचे कोणते 'निश्चित' स्पष्टीकरण आज आपल्या हाती आले आहे. (xxxv).

भूगोलाचे रूपांतर भू-भौतिकशास्त्रात केले तर त्यामुळे होणाऱ्या दुष्परिणामांचे भवितव्य गेर्लांटच्या काही समकालीनांना याहीपेक्षा स्वच्छपणे दिसत होते. ते हंम्बोल्टचे अनुयायी असल्यामुळे, भौतिकशास्त्रे व समाजशास्त्रे यांचे अभ्यास विषय असलेले आणि कृत्रिमकारणे दाखवून एकमेकांपासून भिन्न मानले गेलेले, असे वस्तुस्थितीचे विविध विभाग सांधणारा दुवा या स्वरूपात अखिल शास्त्रीय क्षेत्राला भूगोलाने देऊ केलेले मूल्यही त्यांना स्पष्ट दिसत होते (c/o पेंक १५८, ५४) वर्गवार मांडणीने मिळणारे भौतिक वस्तुस्थितींचे ज्ञान अथवा विशिष्ट क्षेत्रात त्यांच्या मानव निरपेक्ष संयोग संबंधांचे मिळणारे ज्ञान–अशी भूगोलाची व्याख्या गेर्लांटच्या मूळ प्रबंधात आहे.–या रूपांत भूगोलाने फक्त कच्ची सामग्री पुरवण्याचे काम केले, तर ते विविध दुवे सांधण्याचे कार्य करण्याची जबाबदारी समाजशास्त्रे आपण होऊन पार पाडतील असा गेर्लांटला विश्वास वाटत असला, तरी त्याचे समकालीन याबाबतीत त्याच्याशी सहमत नव्हते. ( xxxvi f).

" ज्या शास्त्रांना मदत करण्याचे काम भूगोल करत असतो अशा शास्त्रांनी " फायदा घ्यावा म्हणून " स्वतःच्या शास्त्राभ्यासासाठी ज्या गोष्टींवर भूगोलकारांचे लक्ष केंद्रित झालेले असते " त्यांचा म्हणजेच " प्रदेशाचा निसर्ग व त्याची उत्पादनक्षमता " (xxxii) यांचे " सशास्त्र विवेचन " भूगोलकाराने करावयाचे असते, असे असेल, तर ही " नैसर्गिक उत्पादनक्षमता " –किंवा अमानवसृष्ट उत्पादनक्षमता– म्हणजे तरी काय, असा स्पष्ट सवाल वाग्नेरने टाकला आहे (४३८ f). (गेर्लांटच्या सुधारित प्रमेयानुसार तर या उत्पादनक्षमतेच्या विवेचनात वनस्पती सृष्टीचाही विचार करू नये). (तसेच पार्शची चर्चा पहा. संदर्भ ८०, ३७६ वर आहे). हाच प्रश्न अमेरिकेतील भूगोलकारांच्या अनेक चक्री चर्चा-सत्रांत उपस्थित केला गेला आहे. अमेझॉन खोऱ्याचा " शुद्ध भूगोल " लिहला जाण्याच्या शक्यतेबाबत झालेली चर्चा पुष्कळ वाचकांना आठवतच असेल. मृत्तिका व हवामान यांचा एक विशिष्ट प्रकारचा संयोग काही पिकांच्या दृष्टीने फार सृजनशील असेल, तर दुसऱ्या काही पिकांच्या दृष्टीने त्याची सृजनशीलता फारच कमी असेल. विशिष्ट लोकांना इष्ट वाटणाऱ्या विशिष्ट पिकांच्या संदर्भात विचार केला तरच " उत्पादनक्षमता " या संकल्पनेला काही अर्थ प्राप्त होतो. शेतीच्या पिकांचे व पद्धतींचे कल्पनेने शक्य होतील तेवढे सर्व संयोग करून व प्रत्येकाकरता एक स्वतंत्र नकाशा काढूनच कोणत्याही एका प्रदेशाच्या नैसर्गिक उत्पादनक्षमतेचे नकाशीकरण शक्य होईल.

शिवाय गेर्लांटच्या वेगवेगळ्या टीकाकारांनी असाही एक आक्षेप घेतला आहे. वरील सर्व अडचणी दूर केल्या, आणि भूगोल म्हणजे पृथ्वीच्या फक्त भौतिक बाजूंचा विचार करणारे शास्त्र, शब्दशः अर्थाने पृथ्वीच्या पदार्थशास्त्राच्या परिभाषेत केलेला विचार, असे भूगोलाचे स्वरूप निश्चित केले तरीही प्रत्यक्ष पदार्थशास्त्रात जेवढी एकवाक्यता असते त्यापेक्षा अधिक एकवाक्यता या नव्या शास्त्रात निर्माण होण्याची शक्यता नाही. म्हणजे ते शास्त्र भौतिक शास्त्रांची एक शाखा होणार नाही, तर पृथ्वी या एकाच वस्तूच्या उपयोजनासाठी वापरावयाच्या भौतिक शास्त्रांच्या सर्व विभागांचा तो एक संग्रह तयार होईल. " अमेरिकी भूभौतिक संमेलनाच्या " अनेक विभागांच्या संदर्भावरून ही गोष्ट अगदी स्पष्टपणे सिद्ध झाली आहे. या संघटनेच्या नावातच असे सूचित केलेले आहे, की ही एक शास्त्रशाखा नसून, काही विशिष्ट परस्पर संबंध असलेल्या अनेक शास्त्रशाखांचे ते एक संमेलन आहे. वातावरणशास्त्र, भूकंपनशास्त्र, ज्वालामुखीशास्त्र, पार्थिव चुंबकीयशास्त्र, भूघटनाशास्त्र आणि जलावरणशास्त्र. ही सर्व एकत्र आणली, तर पृथ्वीवरील विविध भौतिक घटनांच्या उपयोजनासाठी भौतिकशास्त्रांच्या बऱ्याच शाखांची केलेली एक गोळा बेरीज आपल्या हाती लागेल. हे एकत्रीकरण केवळ उपयोजनक्षेत्र म्हणूनच केलेले आहे. अर्थातच शुद्धशास्त्राच्या भाषेत बोलावयाचे झाले, तर ते (भूभौतिकशास्त्र) भौतिक शास्त्राच्या अतिभिन्न शाखांचे प्रातिनिधिक स्वरूप होईल. या शाखांतून ज्या प्रकारच्या घटनांचा अभ्यास केला जातो व ज्या प्रकारच्या पद्धती त्यांच्या अभ्यासासाठी आवश्यक आहेत त्यांच्यात विधर्मीयता असते. आणि अशी विधर्मीयता पदार्थ शास्त्राच्या क्षेत्रात सर्वत्रच दिसून येते, पण अशी

शाखांची गोळाबेरीज केल्याने ' एक भौतिक भू-विज्ञान ' होणार नाही, तर अनेक ' भौतिक भू-विज्ञाने ' निर्माण होतील. त्यातीलच एक, ज्याला सामान्यतः भूभौतिकशास्त्र असे म्हणतात, तेही असेल. आणि ही सगळी एकत्र घालण्याचा खटाटोप केलाच, तर आपण पुन्हा एकूण पदार्थ शास्त्राच्या क्षेत्राकडेच परत येऊ.

त्याचप्रमाणे, आणखी एक गोष्ट गेर्लांटच्या टीकाकारांच्या लक्षात आलेली होती. शास्त्राच्या एका विशिष्ट संकल्पनेच्या पायावर भूगोलाची तर्कसिद्ध इमारत उभी करण्याच्या नादात या समस्येचा विचार गेर्लांटने शास्त्राच्या सामान्य दृष्टिकोणातून केला नव्हता. मानव व अमानव घटनांमध्ये काही परस्पर संबंध आहेत व त्यांचा अभ्यास शास्त्रांच्या काही क्षेत्रांतून झाला पाहिजे हे त्याने ओळखले होते, तरी अशा क्षेत्रांना शास्त्रीय असे म्हणण्यास तो तयार नव्हता (c/o वाग्नेर ७७, ४२१). कारण, ज्या क्षेत्रांत अशा विधर्मी घटनांच्या अन्योन्य संबंधांचा अभ्यास केला जाईल तेथे दोनही पद्धतींचा वापर करणे आवश्यक होईल. पण, एकाच शास्त्र मर्यादेत दोन विधर्मी पद्धतींचा मेळ घालणे अशक्य होईल, असे त्याला वाटले. हे पद्धतीतील द्वैत सामाजिक शास्त्रांवरच का लादले जावे ? किंवा दुसऱ्या बाजूने असाही विचार करता येईल. जर सामाजिक शास्त्रांना या दोन्ही पद्धती वापराव्या लागतात व वापरता येतात, तर भूगोलालाही त्या वापरण्यास काय हरकत आहे ?

उदाहरणार्थः रात्सेलने जेव्हा, लोकसमाज पर्वतांमुळे विभक्त होतात यासंबंधी, एक भौगोलिक नियम मांडण्याचा प्रयत्न केला, तेव्हा गेर्लांटने त्याला मोठ्या आवेशाने विरोध केला. तो म्हणतो, " हा नियम वास्तविक मानव व पर्वत यांच्या अन्योन्य संबंधांचा नसून, पर्वत सान्निध्याच्या प्रेरणेने मानवाने दिलेल्या मानसिक प्रतिक्रियांसंबंधीचा आहे. म्हणूनच तो भौगोलिक क्षेत्रात मोडत नसून पूर्णपणे मानसशास्त्र व शरीरशास्त्र यांच्या कक्षेतील आहे. " (xxx).

तरीपण, आपल्या चर्चेच्या दुसऱ्या भागात गेर्लांट आपल्या तत्त्वाशी अधिक प्रामाणिक असल्याचे दिसून येते. कारण, तो असे सूचवितो, की असे संबंधयोग विचारातच घ्यावयाचे नसतात—मात्र, कोणत्या अन्य ज्ञानक्षेत्रांत त्यांचा विचार व्हावा हे तो कोठेच सुचवत नाही. " एखादे क्षेत्र व्यापून रहाणाऱ्या विधर्मी गोष्टींचे एक निराळे शास्त्र होऊ शकत नाही, याला कारण त्यांच्यांतील विधर्मीयता हेच असते " (xvii). या त्याच्या विधानाचे महत्त्व, त्याच्या निबंधाच्या अखेरच्या भागात त्याने दिलेले उदाहरण वाचेतोपर्यंत, पूर्णपणे स्पष्ट होत नाही. " रोम टायबरवर वसले आहे आणि प्राग मोल्डावर आहे, या वस्तुस्थितींवरून कोणत्या प्रकारचे अंतस्थ संबंध स्पष्ट होतात ? नदी व नगर या अगदी विधर्मी संकल्पना असल्यामुळे, भूगोलाला त्या तर्कदृष्ट्या एकत्र आणणे कधीच शक्य होणार नाही. " कारण असे, की ही विशिष्ट मोल्डा नदी प्राग या विशिष्ट नगराच्या रचनेसाठी आवश्यकच होती असे म्हणता येणार नाही, किंवा उलटही विधान करता येणार नाही. म्हणजेच " त्यांचे अंतस्थ संबंध अस्तित्वात नसतात " (Li ).

हेरोडोटस व स्ट्रॅबो यांच्या काळापासूनच्या–हंबोल्ट, रिटर व त्यांच्या अनुयायांसह–सर्वच भूगोलकारांनी या प्रश्नाला दिलेले उत्तर इतके उघड आहे, की अशा प्रश्नाला उत्तर देण्याची जवळजवळ आवश्यकताच राहिलेली नाही, असे वाटते. प्राग नगरीची या विशिष्ट स्थळी रचना करताना नगरमार्ग व प्रासाद याचे मोल्डा नदीच्या विशिष्ट स्वरूपाशी झालेले संश्लेषण मानवनिर्मित आहे, हे खरेच! तथापि, बोहेमियन खोऱ्याचे आर्थिक आणि राजकीय केंद्र जरी एल्बच्या उगमाकडील कोणत्याही दुसऱ्या उपप्रवाहावर विकसित होणे शक्य असले, तरी त्या शहराचे–नाव प्राग असो वा नसो–स्वरूप मात्र आजच्या त्याच्या स्वरूपापेक्षा महत्त्वाच्या बाबतीत क्वचितच वेगळे दिसले असते. शिवाय, आपल्या प्रमेयाला बाह्यतः जुळती म्हणून जी उदाहरणे गेर्लांटने निवडली त्यांच्या पलीकडची काही उदाहरणे आपण घेतली, तर कोलोन नगराला विशिष्ट स्वरूपाच्या ऱ्हाइनची आवश्यकता नव्हती, अगर न्यूयॉर्कचा उपसागर व न्यूयॉर्क शहर यांचा अर्थाअर्थी काहीच संबंध नव्हता असे तो ठामपणे म्हणू शकला असता का ?

गेर्लांटने आपल्या प्रमेयाच्या पुष्ट्यर्थ निवडलेली खास उदाहरणे आपल्याला दोन भिन्न मार्गांच्या तिकटीवर आणून सोडतात. त्याने काढलेल्या तर्कसिद्ध निष्कर्षांचा पाठपुरावा करणाऱ्यांना पार्थिव घटनांचा अभ्यास परस्पर भिन्न प्रकारांनी करावा लागेल. स्कँडिनेव्हियातील उंचीच्या निरनिराळ्या क्रमिक टप्प्यांवरील लोकवस्तींतील विरोध, किंवा आल्प्सच्या उंचीच्या निरनिराळ्या टप्प्यांवरील भूमि-उपयोजनांतील भेद, यांचा ते रात्सेल करतो त्याप्रमाणे विचार करणार नाहीत (७२, I, ४०३ ते ४०४). तसेच, अँडीजवरील उंचीच्या विविध क्रमिक पट्टांतील नैसर्गिक वनस्पतींतील फरक किंवा विविध हवामान पट्ट्यातील फरक यांचाही विचार ते हंबोल्ट करतो त्या पद्धतीने करणार नाहीत. (४३, ४४). अभ्यासकांचा आणखी एक मोठा गट दुसऱ्या बाजूला असलेला दिसतो. या गटाने, अगदी पूर्वीच्या कालापासून, वस्तुस्थितीतच अशा प्रकारचे विधर्मी घटक एकत्र असलेले पाहिलेले आहेत यालाच हंबोल्ट Nature (निसर्ग) असे म्हणतो. या घटना केवळ एकमेकांच्या सान्निध्यात असतात इतकेच नव्हे, तर त्यांच्यात कार्यकारण संबंधही प्रस्थापित झालेले असतात. अशा घटना जेथे परस्परसंबंधात अस्तित्वात असतात त्या भूक्षेत्रांच्या अभ्यासालाच त्यांनी आपल्याला वाहून घेतलेले आहे. पुरातन कालापासूनच त्यांनी केलेल्या अशा अभ्यासांनाच लोक भूगोल या नावाने संबोधत आलेले आहेत; आणि ज्ञान जगतानेही त्या नावाने त्यास मान्यता दिलेली आहे. हा अभ्यास म्हणजे एक स्वतंत्र शास्त्र आहे की नाही, हा प्रश्न त्यांच्या मते गौण आहे. तरीही, या अभ्यासक्षेत्रावर प्रथम पासूनच भूगोल आपला अधिकार सांगत आला आहे, व त्याला मान्यताही लाभलेली आहे.

" भौतिक शास्त्राचा काटेकोर तर्कवाद " ज्याच्या दिशेने आपल्याला नेत असतो त्याच अंतिम निष्कर्षाला आपण येऊन पोहोचलेले आहोत.–अर्थात, हा निष्कर्ष सुरुवातीपासूनच अगदी स्पष्ट दिसत होता, असेही कोणी म्हणू शकेल. पृथ्वीच्या भौतिक शास्त्राचा अभ्यास

होणे जितके आवश्यक आहे, तितकेच अशा भौतिक क्षेत्रापासून आज शतकानुशतके ज्याला शास्त्रज्ञांनी, आणि सामान्य जनांनीही, भूगोल असे नाव दिले ते क्षेत्र कसे सर्वतोपरी वेगळे आहे हे समजून घेणेही अगत्याचे आहे. त्या चर्चेच्या वेळी, आणि नंतरही गुंडाळण्यात आलेले हे गेर्लांटचे प्रमेय भूगोलाचे रूपांतर एका " काटेकोर ", निदान तत्त्वतः, भौतिक शास्त्रात करण्याच्या प्रयत्नांची क्रमविरुद्धसिद्धता म्हणून निश्चितच नजरेसमोर राहील.

## ब – पृथ्वीग्रहाचे शास्त्र म्हणजे भूगोल

गेर्लांटच्या प्रबंधाने आणखी एका कूट प्रश्नावर प्रकाश टाकला; तो प्रश्न असाः ' भूगोल ' या नावाने सुचविल्याप्रमाणे, भूगोलाच्या क्षेत्रात संपूर्ण पृथ्वी या वस्तूंचा समावेश होतो, की ज्याचा आपल्याशी प्रत्यक्ष संबंध येतो तेवढ्यापुरतेच त्याचे क्षेत्र मर्यादित आहे. रिक्टोफेनच्या आधीच्या बहुतेक सर्वच पद्धतितंत्रविषयक चर्चांतून पहिले मत गृहीत धरलेले असे; इतकेच नव्हे तर, पूर्वीच्या भूगोलविषयक पाठ्यपुस्तकांचा आरंभ सहसा ' पृथ्वी या वस्तूचा अभ्यास ' या प्रकरणानेच होत असे आणि आजच्या काही थोड्या पाठ्यपुस्तकांवरून तरी ते खरे असल्याचे दिसून येते. उलटपक्षी हे काही थोडे भूगोलकार वगळता उरलेल्या, बहूतेक सर्वच भूगोलकारांनी आपले प्रत्यक्ष भूगोलविषयक अभ्यास अगदी निरुंदशा कवचाच्या कक्षेत येणाऱ्या घटनांपुरतेच मर्यादित ठेवलेले होते. अशारीतीने पूर्वीच्या परिपाठातही ' भूगोल हा जगाचा अभ्यास ' होता, आणि याच अर्थाने सामान्यतः ' भूगोल ' ही संज्ञा ओळखली जाते.

पण, ' पृथ्वीचा अभ्यास ' असे स्वतः म्हणवून घेणारे शास्त्र पृथ्वीच्या फक्त कवचाच्या अभ्यासापुरते मर्यादित करण्याचा प्रयत्न करणे ही तत्त्वहीनता आहे, येवढी गोष्ट निर्विवाद आहे. खरे पहाता, भूगोलकारांच्या परिपाठामुळेच या क्षेत्राची अशी व्याख्या तयार झाली होती, हे रिक्टोफेनच्याही लक्षात आलेले होते. म्हणूनच, त्याने वरील मर्यादेचे तर्कदृष्ट्या समर्थन करण्याचा प्रयत्न आपल्या १८८३ च्या लायप्त्सिग येथील व्याख्यानात केला. पेंकला हे " अविस्मरणीय व्याख्यान " जरी पूर्णपणे निर्णायक आहे असे वाटले (१२८, ४५ f ), तरी हेटनरसारख्या अन्य अभ्यासकांना, या प्रमेयाच्या सिद्धतेसाठी आवश्यक तेवढा तर्कशुद्ध पुरावा रिक्टोफेनला मिळालेला नव्हता आणि नंतरच्या काळात रिक्टोफेन स्वतःच त्यापासून दूर जात होता, असे वाटले. (३, ६७९ f, ६८९f)[४३]

---

४३. " सामाजिक शास्त्रांचा अद्यतन विकास " या ग्रंथात सॉरने लिहिलेल्या प्रकरणात रिक्टोफेनने बर्लिन येथे १९०३ मध्ये रेक्टर पदावरून दिलेल्या व्याख्यानात " भूगोल म्हणजे भूपृष्ठाचे शास्त्र " या भूमिकेचे समर्थपणे प्रतिपादन केलेले आहे, असा उल्लेख आहे (८४, १७७). तो वास्तविक रिक्टोफेनच्या १८८३ साली लायप्त्सिग येथे दिलेल्या व्याख्यानाचा उल्लेख असे गृहीत धरण्यास हरकत दिसत नाही (७३).

गेर्लांटने केलेली रिक्टोफेनच्या व्याख्यानाची चर्चा तशी फारशी उपयुक्त नाही. मूळच्या युक्तिवादातच स्पष्टपणाचा काहीसा अभाव असल्यामुळे, रिक्टोफेनच्या हेतूचा विपर्यास करणारा त्याचा अन्वयार्थ गेर्लांटला लावता आला.[४४] पण माझ्या मते, पृथ्वी हा एक अभ्यासविषय समजून तिच्याकडे पहाण्याचा या विशेष पद्धतीने गेर्लांटने भूगोल व भू-भौतिकशास्त्र यांच्या दृष्टीकोणातील मूलभूत भिन्नतेची गुरूकिल्लीच आपल्या हाती दिली आहे. आज भूगोलकारांना या प्रश्नाचा बाऊ वाटत नसला, तरी त्याविषयी अद्यापही

---

४४. गेर्लांटची ही प्रश्न हाताळण्याची पद्धती उद्‌बोधक आहे. विविध शास्त्राच्या दृष्टीने भूपृष्ठाच्या महत्त्वाची रिक्टोफेनने केलेली चर्चा निदान तेरा पानेपर्यंत पसरलेली आहे (७३, ७-८, ११-१६, १८-२४). पण, गेर्लांटने लावलेला अन्वयार्थ मात्र केवळ एकाच परिच्छेदांवर, खरे म्हणजे एका वाक्यांशावर आधारलेला आहे (७६, xii-xiv; " gern gesohen Genossen auf dem felde der Geographie " ) " भौगोलिक क्षेत्राबाहेरून आलेले अतिथी आहेत असे खुशाल समजावे ! " Genos (म्हणजे ' सोबती ' ) हा शब्द Gast (म्हणजे ' अतिथी ' ) याचा समानार्थी शब्द आहे असे सुचवून, तो रिक्टोफेनच्या लिखाणाचा असा अर्थ लावतो, की भूशास्त्र अथवा अर्थशास्त्र यांच्यापेक्षा भूगोलाचाच भूपृष्ठावर निरपवाद अधिकार आहे. पण, मूळच्या व्याख्यानाच्या नंतरच्या पानांतून स्पष्ट झालेला एकूण विचार आणि काही विविक्षित विधाने यावरून, अनेक शास्त्रांना भूपृष्ठाच्या मर्यादितच अभ्यास करणे आवश्यक आहे, अशी स्पष्ट मान्यता रिक्टोफेनने दिलेली दिसते. आश्चर्याची गोष्ट अशी, की रिक्टोफेनच्या नावावर दिलेल्या या युक्तिवादावर हल्ला चढविताना गेर्लांटने त्यातीलच काही मुद्यांचा उपयोग केला आहे ! मूळ विधानातच काही विसंगती होती ! ही गोष्ट मान्य झाली, तर " भौगोलिक क्षेत्राबाहेरील " (auf der felde der Geographie) हा शब्दप्रयोग योग्य होता का एवढाच प्रश्न उपस्थित होतो, आणि तो बदलला, अथवा काढून टाकला, तर मूळ प्रश्नच नाहीसा होतो.

रिक्टोफेनच्या युक्तिवादाचा चुकीचा अन्वय गेर्लांटने लावला हे मान्य करूनही लायली असे निवेदन करतो, की रिक्टोफेन स्वतः जे लिहीत असे त्याच्याविरुद्ध तो स्वतःच बोलत असे. भूगोल व भूशास्त्र यांच्यामधील " लक्ष्मण-रेषा " (Solomonic assignment) आखण्याचे बाजुलाच राहिले, उलट रिक्टोफेनने असे घोषित केले, की " या दोन शास्त्रांच्या अभ्यासवस्तुमधील क्षेत्रात (घनभूमीचा पृष्ठभाग) एक निदान्‌रेषा काढण्याची इच्छा प्रदर्शित करणे हेच अव्यवहार्यतेचे व हेतुशून्यतेचे लक्षण आहे " (७३, १८). पण शेवटी, भूगोलज्ञ आणि भूशास्त्रज्ञ यांच्या कार्यक्षेत्रात व तत्संबंधी समस्यांत एक निश्चित काटेकोर रेषा आपणच घालून दिली असाही दावा गेर्लांटनेच करावा, हा केवढा विनोद ! (७६, xxii). ज्या तर्क पद्धतीने तो नंतरच्या निर्णयाप्रत येऊन पोहोचला तो त्याच्या निबंधाचा महत्त्वाचा भाग असूनही त्याचा, अथवा त्यावर वाग्नेरने घेतलेल्या आक्षेपांचा, नंतरच्या प्रतिपादनात उल्लेखही नाही. भूशास्त्रात फक्त ' भूकवचातील वस्तूंचा ' (das Gewerdene), त्या ज्या अवस्थेत आढळतात तसा, अभ्यास केला जातो, तर भूगोलात त्यांचा विकास घडवून आणणाऱ्या ' शक्तींचा ' (das werden) अभ्यास करावयाचा असतो (७७, ४२९f ) या दोन शास्त्रांच्या अभ्यासक्षेत्रांत गेर्लांटने दाखविलेला भेद फारच थोड्या शास्त्रज्ञांना मान्य होण्याची शक्यता आहे, असे वाग्नेरने आपले मत या संदर्भात दिलेले आहे .

बराचसा अनिश्चितपणा असल्यामुळे, त्याचा येथे थोडा फार विचार करणे समर्थनीयच ठरणार आहे.

" पृथ्वी म्हणजे काय ? " या मूलगामी प्रश्नाचे वस्तुनिष्ठ व शास्त्रशुद्ध उत्तर देण्यासाठी, गेर्लांटने हेतुवादी तसेच मानव केंद्री दृष्टिकोण बाजूला सारले, इतकेच नव्हे तर, सूचितार्थाने त्याने पृथ्वी-केंद्री दृष्टिकोणही बाजूला सारला. पृथ्वीकडे वैश्विक दृष्टिकोणातून पाहिल्यामुळे, पृथ्वी ही विश्वातील अशासारख्या अनेकानेक एककांपैकी एक आहे असे त्याने मानले (viii). या दृष्टिकोणातून पाहिल्यामुळे पृथ्वी या वस्तूचा निश्चितपणे भूविज्ञानात समावेश करता येईल, किंबहुना पृथ्वीच्या पृष्ठभागापेक्षा तिच्या अंतर्भागाचे महत्त्व फारच अधिक असल्यासारखे दिसेल. यावरून कोणीही असा निष्कर्ष काढू शकेल, की प्रत्यक्षात आमचे लक्ष भूपृष्ठाच्या अभ्यासावरच अधिक प्रमाणात केंद्रित झालेले असते हा केवळ अंतर्भागांचे प्रत्यक्ष निरीक्षण करण्यास आम्ही असमर्थ असल्याचा परिणाम आहे. हे खरे असले तरी, त्याबरोबरच, अंतर्गत पृष्ठीय आणि बाह्य अशा सर्व शक्तींनी पृथ्वीच्या गर्भातील सामग्रीत घडवून आणलेल्या बदलांचा आविष्कार पृष्ठभागावर पहावयास मिळतो ही वस्तुस्थिती याला कारणीभूत आहेच.

हा दृष्टिकोण तर्कदृष्ट्या जरी समर्थ वाटला, तरी तो दिसतो तितका वस्तुनिष्ठ व वास्तववादी आहे का असे विचारणे अन्यायाचे ठरणार नाही. विश्वातील विविध वस्तूंचे सापेक्ष महत्त्व त्यांच्या वस्तुमानावरून निश्चित करावे लागेल. असे केले नाही तर, अनेक नक्षत्र पुंजांपैकी एकामधील लक्षावधी तारांपैकी एका लहानशा ताऱ्याच्या ग्रहकुलातील लहान ग्रहांपैकी एक असलेल्या पृथ्वीसंबंधाने त्या शास्त्राने विचार करणे जितके स्वैरपणाचे होईल तितकेच पृथ्वी म्हणजे मानवाचे निवासस्थान हे वर्णनही स्वैरपणाचे होईल. तरीही एकप्रकारे दोनही विधाने सत्य आहेत. जसे आमचे हे भू-गोलशास्त्र आहे तसे मंगळगोलशास्त्र नाही, ही वस्तुस्थितीच पृथ्वीचे अद्वितीयत्व सिद्ध करणाऱ्या त्या दोन वस्तुनिष्ठ वस्तुस्थितींचे प्रतिबिंब आहे. अर्थातच, खगोलशास्त्राच्या कक्षेतील विश्व-गोलकांपैकी एकाचीच अनेक भूविज्ञानांच्या अभ्यासाचे क्षेत्र म्हणून निवड झाली, ही गोष्टही समर्थनीय ठरते.

पृथ्वी हे मानवाचे निवासस्थान आहे ही वस्तुस्थिती त्या दोन वस्तुस्थितींपैकी एक आहे. शब्दच्छल करूनही ही वस्तुस्थिती टाळता येणारी नाही. शेवटी, शास्त्र झाले तरी काही एखादी अमूर्त कल्पना नव्हे. मनुष्य ज्या विश्वात रहातो त्या विश्वाच्या ज्ञानसंपादनासाठी त्याने केलेले शास्त्र हे एक अन्वेषण आहे. या विश्वातील मानवाचे वसतिस्थान या नात्याने पृथ्वीचे स्थान अद्वितीय आहे आमच्याच सूर्याचा असाच दुसरा एखादा ग्रह असता, अथवा दुसऱ्या एखाद्या सूर्याचा ग्रह सर्व महत्त्वाच्या बाबतीत आमच्या ग्रहासारखाच आहे हे माहिती झाले असते, तर अशा ग्रहांच्या अभ्यासासाठी आम्ही एक स्वतंत्र शास्त्र रचले

असते. तरीही, ज्या ग्रहावर आम्ही राहतो, इतकेच नव्हे तर, त्याचा आम्ही एक अंशच बनून राहिलो आहे त्या आगळ्या ग्रहासाठी एक स्वतंत्र शास्त्र असण्याची आवश्यकता कमी झाली नसती. भू-सदृश ग्रहाच्या तौलिनिक शास्त्रात पृथ्वीकडे आम्ही अधिक अवकाशस्थ भूमिकेतून पाहू, आणि त्या दृष्टिकोणातून पृथ्वीसाठी एक स्वतंत्र शास्त्राची आवश्यकता तितकीशी समर्थनीय ठरणार नाही. अर्थातच, अशा स्वतंत्र शास्त्राच्या समर्थनाचा मुख्याधार त्याची भू-केंद्री भूमिका येवढाच असतो.

खरे पहाता येथपर्यंत झालेला विचार केवळ तात्त्विक स्वरूपाचा आहे. पण, आमच्या विश्वसंबंधी शास्त्रात–आपला दृष्टीकोण कितीही अलिप्ततावादी ठेवावयाचा म्हटले तरी– पृथ्वीचे स्थान अद्वितीयच आहे. पृथ्वी-समान ग्रह अस्तित्त्वात असण्याच्या शक्यतेसंबंधी केवढेही तर्क वितर्क लढविले गेले–आणि अलीकडेच जीन्सने केलेल्या गणितावरून अशी शक्यता फारच कमी असावीसे दिसते–असूनही, आमच्या शास्त्राना तत्सम दुसरा ग्रह माहीत नाही. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर, कोणत्याच विशिष्ट ग्रहाशी व ताऱ्याशी कोणते खास नाते नसलेला, पण त्या सर्व ग्रह-ताऱ्यांचे ज्ञान आमच्या इतकेच असणारा एखादा अवकाश-शास्त्रज्ञ पृथ्वीचा हा लघु-ग्रह म्हणजे एक अद्वितीय व असाधारण वस्तूच आहे असेच मानेल. हा असा एकच ग्रह आहे, की त्याच्या पृष्ठावरील तपमान अशा एका अतिनिरुंद कक्षेपर्यंत खाली आलेले दिसते, की तेथे एकाच वेळी विविध पदार्थ घन, द्रव व वायू अशा तीनही अवस्थेत एकत्र अस्तित्त्वात राहू शकतात. या आणि अन्य कारकांचा परिणाम म्हणून, या कारकांच्या बदलत्या अन्योन्य प्रतिक्रियातील गुणिततर बहुविधता आणि त्यांचे भिन्न भिन्न परिणाम ज्या एका ग्रहाच्या पृष्ठभागावर झालेले पहावयास मिळतात असा हा एकच अवकाशस्थ गोल आहे. शिवाय कोट्यावधी प्रजातिभेद व व्यक्तिभेद यांमधून प्रतीत होणारी जीवन या नावाची घटना फक्त याच ग्रहावर पहावयास मिळू शकते. आणि शेवटची–पण, आमच्या या शास्त्रज्ञाला त्यासंबंधी निर्विकार राहून न चालण्याजोगी– गोष्ट म्हणजे, (आजच्या एकूण शास्त्रज्ञानाच्या कक्षेचा विचार करता) येवढ्या एकाच ग्रहावर शास्त्रांचा अभ्यास करण्याची पात्रता असलेला प्राणी अस्तित्त्वात असू शकतो. म्हणजे स्वतःचे अस्तित्व सिद्ध करण्यासाठी तरी आमच्या या अवकाश-शास्त्रज्ञाला पृथ्वीवरच अवतरावे लागेल कारण फक्त पृथ्वीवरच त्याला त्याचे घर सापडू शकेल.

वरील परिच्छेदावरून, एक गोष्ट बाचकांच्या सहजच लक्षात आली असेल, की शास्त्राच्या दृष्टीने पृथ्वी या ग्रहाची अद्वितीयता फक्त तिच्या पृष्ठावरील व पृष्ठाजवळील परिस्थितीच्या परिभाषेत स्पष्ट करून सांगता येते. आमच्या पृथ्वी संबंधीच्या आत्मीयतेचे अद्वितीयत्त्व तिच्या पृष्ठासंबंधी आम्हास वाटणाऱ्या अनुपम जवळिकी पुरतेच मर्यादित आहे. तरीही, 'पृष्ठाचे सम्यक् ज्ञान होण्यासाठी अंतर्भागाच्या ज्ञानाची आवश्यकता आहेच', असा युक्तिवाद

कोणी केला, तर त्यासाठी अंतर्भागात खणावे लागेल अगदी बौद्धिकदृष्ट्या जितके खोल जाणे शक्य आहे तेथपर्यंत खणावे लागेल. पण, पृथ्वी या अद्वितीय ग्रहाला वाहून घेतलेले आमचे (भूगोल) शास्त्र भूपृष्ठ म्हणजे ज्यात पृथ्वीवरील अद्वितीय घटना आढळतात ते पृथ्वीचे बाह्य सालीसारखे कवच, हेच आपले अभ्यास क्षेत्र आहे असे मानते. विश्वाच्या पृथ्वीनामक एका सूक्ष्म अंशाला निरपवादपणे वाहून घेतलेल्या शास्त्राच्या प्रतिष्ठेला पृथ्वीकेंद्री दृष्टीकोण अभिप्रेतच आहे. पण त्याचा हा दृष्टिकोण ग्रह या नावाच्या खगोल शास्त्रांतर्गत एककावर केंद्रित झालेला नसून, पृथ्वी या वस्तूच्या केवळ एका गृहीत भागावरच केंद्रित झालेला आहे; आणि मनुष्य अनादिकालापासून स्वतःला याच जगाचे एक अंग मानत आला आहे. अगदी अलीकडेच, आजपर्यंत ज्या ग्रह गोलाला पृथ्वी या नावाने संबोधत आला, त्या पृथ्वीचे हे त्याचे जग म्हणजे केवळ बाह्य कवच आहे, हे त्याला समजून आले आहे (c/o श्मिट् ३९६, २ f).

भूगोलाला साधारणपणे नेमून दिलेल्या अभ्यास क्षेत्राचे निःसंदिग्ध वर्णन करणारा कोणताही एक शब्द आपल्या सामान्य भाषेत नाही, ही वस्तुस्थिती वरील वाक्यात उल्लेखिलेल्या आपल्या पृथ्वीविषयक ज्ञानात कराव्या लागणाऱ्या बदलाच्या रूपाने स्पष्ट होत असण्याची शक्यता आहे; आणि त्यामुळेच, जी कृत्रिम आहे असे दिसते आणि जिच्या अर्थाची व्याख्याही धड होत नाही असे वाटते, अशी एक संज्ञा–म्हणजे ' भूपृष्ठ ' ही संज्ञा वापरणे भाग पडते. उलट, लेहमानाने अलीकडेच एक गोष्ट लक्षात आणून दिलेली आहे. विद्वान् मंडळी सोडून दिली तर, आपण सर्वजण ' जग ' या शब्दाचा अर्थ काय करतो ? विशेषकरून ' जगप्रवास ', ' जगाचा नकाशा ', ' जागतिक व्यापार ', ' जगव्यापी ', ' जागतिक युद्ध ' इत्यादी संयुक्त-शब्दातून साधारणपणे वापरल्या गेलेल्या ' जग ' या शब्दाचा अर्थ काय होतो ? अशा शब्द प्रयोगात ' जग ' या संज्ञेचा अर्थ काय होतो हे प्रत्येकाला कळते. त्यात सामावणाऱ्या अवकाशाच्या भौतिक विस्तारासंबंधी वरीलपैकी कोणत्याच बाबतीत कसली अनिश्चितता असल्याचे भासत नाही. त्यात पृथ्वी-गर्भाचा जसा अंतर्भाव होत नाही, तसाच तिच्या चंद्राचा अथवा अन्य " ज्योतिर्गोलांचा " त्यात समावेश केला जात नाही; तर मानवी अनुभूतीच्या कक्षेत असेल इतक्या उंचीचे वातावरण व तितक्याच खोलीपर्यंतची भूमी यांनी बनविलेले आपल्या पृथ्वीचे बाह्य कवच, येवढाच सरळ-साधा अर्थ आमच्या ' जग ' या संज्ञेत अभिप्रेत आहे (११३, २१८ f, २३५; c/o कांट II, A)*

भूगोलाचा भौतिक व्याप हा सरळ जागाऐवढा आहे असे मानले–आणि आजपर्यंतचा परिपाठही तसाच आहे–तर ' भूपृष्ठ ' या संज्ञेची अगदी काटेकोर व्याख्या करण्याची गरजच उरत नाही. ' जीवन ' या संज्ञेची अगदी अचूक व्याख्या करणे अत्यंत अवघड आहे हे निदर्शनास आल्यावरही, जीवशास्त्रज्ञांना ' जीवक्षेत्राचा ' अभ्यास करण्यास अडचण पडत

---

* पुरवणी टीपा क्रमांक १६ पहा.

नाही. त्याचप्रमाणे, 'जग' आणि भूगर्भ यांच्यामधील काटेकोर मर्यादा रेषा प्रस्थापित करण्याचा खटाटोप करण्याची गरज भूगोलज्ञानानाही नाही. पृष्ठीय घटनांच्या स्पष्टीकरणाकरिता भूगर्भातील परिस्थितीच्या अभ्यासाने काढलेल्या अनुमानांची गरजच असेल, तर ज्याला अधिक खोलात जाणे शक्य आहे असा भूगोलज्ञ आज घालून दिलेल्या खोलीच्या मर्यादा रेषावर थांबणार नाही, हे गृहीतच आहे. भूपृष्ठाच्या, म्हणजे जगाच्या, अभ्यासामागची आपली भूमिका जोपर्यंत तो सोडत नाही तोपर्यंत अशाप्रकारच्या मर्यादा घालण्याची आवश्यकताच नाही (c/o मार्थे २५, ९).

भूपृष्ठ हे भौगोलिक अभ्यासांचे राज्य असेल, आणि साकल्याने विचारात घेतले तर ते फक्त भूगोलाचेच अभ्यासक्षेत्र असेल, तर पृथ्वीसंबंधीच्या सर्वच शास्त्रांचे ते संमेलनक्षेत्र असणार, उदा. हवामान शास्त्र, भूशास्त्र, भू-भौतिकशास्त्र (मर्यादित अर्थाने), भूगोल, अर्थशास्त्र इत्यादी. रिक्टोफेननेही हीच गोष्ट सूचविली होती (७३, ११ ते २४: c/o १८९, ७ ff). याचा अर्थ असा नव्हे, की या क्षेत्रात प्रवेश करणारे अन्य कोणतेही शास्त्र भूगोलाच्या घरचा पाहुणा असतो. रिक्टोफेनने अनवधानाने केलेल्या एका शब्दप्रयोगाचा गैर अर्थ लावून, गेर्लांटने तशा अर्थाचे एक विधान रिक्टोफेनचे विधान म्हणून ठोकून दिले. उलट, भूपृष्ठाच्या कोणत्या ना कोणत्या भागात वावरणारे त्यापैकी प्रत्येक शास्त्रही भूगोलाबरोबरच स्वतःच्या घरात वावरत असते. प्रत्येकाचे लक्ष भूपृष्ठाकडेच असले, तरी ते वेगवेगळ्या दृष्टीकोणांतून तेथे केंद्रित झालेले असते. उदाहरणार्थ अश्मावशेषशास्त्र आणि खनिजशास्त्र ही दोनही शास्त्रे खडकांचाच अभ्यास, पण अगदी भिन्न दृष्टिकोणांतून, करत असतात. भौगोलिक दृष्टिकोण आणि त्याच वस्तूंचा अभ्यास करणाऱ्या अन्य शास्त्रांचे दृष्टिकोण यांतील फरक हंबोल्टने सविधान स्पष्ट केलेले आहेत. पण, तत्कालीन अन्य भूगोलकारांप्रमाणे रिक्टोफेननेही त्या विधानांकडे दुर्लक्ष केले आणि त्यामुळेच त्याला या फरकांचे स्पष्टीकरण देता आले नाही. याच वेळी, म्हणजे १९०५ मध्ये, हेटनरनेही हे मत अगदी स्पष्ट शब्दांत बोलून दाखविले. पृथ्वी या वस्तूच्या भूगोलक्षेत्रातील स्थानासंबंधी चाललेल्या चर्चेला आता केवळ तात्त्विक चर्चेपेक्षा अधिक महत्त्व राहिलेले नाही; कारण, भूभौतिकशास्त्रात विशिष्ट तंत्राची आवश्यकता असल्याने, त्याप्रकारच्या अभ्यासांत भर टाकणे भूगोलज्ञांना सहजपणे साधणार नाही, ही वाग्नेरची भविष्यवाणी खरी ठरली आहे. परिणामतः भूभौतिकशास्त्र हे पदार्थशास्त्र व भूशास्त्र यांच्याशी निकट संबंध असणारे, पण स्वतंत्र, शास्त्र आहे, ही गोष्ट ठामपणाने प्रस्थापित झालेली आहे.[४५]

---

४५. "भूपृष्ठासंबंधी भौतिक घटना" आणि "संपूर्ण पृथ्वी या वस्तूसंबंधी समस्यांचा एकगट" ही भूगोल व भूभौतिकशास्त्र यामधील भेद दाखविणारी विधाने अगदी काही खळखळ न करताच मान्य झाली असे नाही–, असे लायली म्हणतो. (२२२, २५६).

## क – भूगोल म्हणजे संबंधयोगांचे शास्त्र*

भूगोल हा निसर्ग आणि मानव यांच्यातील संबंध योगांचा अभ्यास आहे या संकल्पनेने अमेरिकी भूगोलावर सुमारे पन्नास वर्षेपर्यंत प्रभुत्त्व गाजविले. तरीही, भौगोलिक विचारांच्या ऐतिहासिक विकासाच्या या रूपरेषेत त्या संकल्पनेकडे थोडे लक्ष पुरविलेले दिसते, असा ग्रह पुष्कळशा वाचकांचा होण्याची शक्यता आहे. इंग्लंड व अमेरिकेतील भूगोल-क्षेत्रातील अनुसंधान कार्य लक्षात घेता, आणि विशेषतः शाळांमध्ये असलेले या संकल्पनांचे महत्त्व लक्षात घेता, त्या संकल्पनेकडे खास लक्ष पुरविणे आवश्यकच आहे.

स्ट्रॅबोच्या ग्रंथातून उद्‌धृत केलेल्या वचनाच्या अनुवादानुसार, वनस्पती, फळे, रहिवासी आणि पृथ्वीवरील प्रदेशांची विविध लक्षणे यांच्यातील गुंतागुंतीचे संबंधयोग समजून घेण्याचा सतत प्रयत्न करणारे भूगोलज्ञच आपल्या विषयाचा शास्त्राची एक शाखा म्हणून विकास करण्यात हिरीरीने लक्ष घालत होते; ही गोष्ट वर झालेल्या संपूर्ण चर्चेतून सर्वांच्या लक्षात आलीच असेल. कोणत्याही शास्त्रातील संबंधी घटनांच्या अभ्यासात, त्यांच्यामध्ये आढळणाऱ्या परस्परसंबंधांच्या अभ्यासाचा अंतर्भाव होतोच. विशेषकरून भूगोलात, अशा संबंध योगांनीच विजातीय व अन्यथा असंबद्ध घटनांमधील दुवा सांधण्याचे काम केले आहे; आणि त्यामुळे एकाच अभ्यासक्षेत्रात त्यांचे एकीकरण करणेही शक्य झाले आहे. पण, जेव्हा एखाद्या क्षेत्रातील अन्योन्य संबंधांत असणाऱ्या घटनांवर लक्ष केंद्रित करण्याऐवजी त्यांच्यात संबंध प्रस्थापित करणाऱ्या दुव्यांवरच आपण लक्ष केंद्रित करू लागतो, तेव्हा मात्र आपण त्या अभ्यासाला एक निराळीच दिशा देत असतो.

जेव्हा भूगोल हा संपूर्ण विषयच त्याचा तोल ढळावा इतका मार्गभ्रष्ट झाला, तेव्हाच भूगोलाची व्याख्या संबंधयोगांच्या भाषेत करण्याच्या कल्पनेचा विकास होऊ लागला, हे आपल्याला दिसून आलेलेच आहे. ही स्थिती गेल्या शतकाच्या उत्तरार्धात आली होती. त्या काळच्या विशिष्ट विकास प्रवाहानुसार, भूगोलक्षेत्रातही मानवी घटना अस्थायी समजल्या जाऊ लागल्या होत्या. पण, त्याच काळात, आपल्या क्षेत्रात त्यांचा अभ्यास आग्रहपूर्वक टिकवून धरण्याचा प्रयत्नही होऊ लागला (c/o हेटनर १२६, ५४८; १३०, ४१४; आणि श्लूटर १२७, ११). त्याच अर्धशतकाच्या उत्तर भागात, जेव्हा समतोल दृष्टिकोण पुन्हा प्रस्थापित झाला तेव्हा ही संकल्पना आपोआपच गळून पडली. गेल्या दोन दशकांतील जर्मनीतील पद्धतितंत्रविषयक चर्चातून तिचा क्वचितच उल्लेख झालेला दिसू लागला.

सर्वच देशांतील आधुनिक भूगोल हा जर्मनीत विकसित झालेल्या भूगोलावर मूलतः अवलंबून असतो. असे असले तरी, ज्या एका विशिष्ट संकल्पनेचा प्रभाव जर्मन विचारांवर फारच थोड्राकाळ टिकून राहिला, त्या संकल्पनेची हुकूमत फ्रान्स, इग्लंड, अमेरिका आणि वरवर

* हे शीर्षक पुढे दिल्याप्रमाणे वाचावे. " निसर्ग व मानव यांच्यामधील संबंधयोगांचे शास्त्र, या अर्थाची भूगोलाची व्याख्या.

पहाता जपान, या देशांतील बहुतांश भूगोलकारांच्या पद्धतितंत्रावर आणि पुष्कळशा परिपाठांवर चालावी, ही वस्तुस्थिती खासच असामान्य आहे. सांस्कृतिक विकासाच्या सरळ स्पष्टीकरणांचा अंतर्भाव वास्तविक तितकेसे विश्वसनीय नसलेल्या ऐतिहासिक निष्कर्षांपैकी एक म्हणूनच करावयाची प्रथा आहे. पण फ्रेडरिश रात्सेल याच्या मानववंशीय भूगोलशाखेत नजरेत भरावे असे कार्य करणाऱ्या परदेशी अभ्यासकांच्या एका लहान गटाने विशेष लक्ष घातले, व त्यामुळेच वर सांगितलेली विशिष्ट परिस्थिती जर्मनी बाहेरच्या देशांत निर्माण झाली असावी. क्रमबद्ध (सामान्य) मानवी भूगोलास प्रतिष्ठा मिळवून देण्याच्या दृष्टीने फार महत्त्वाचे असले, तरीही रात्सेलचे हे पद्धतितंत्र–मग ते त्याच्या कार्याद्वारे स्पष्ट झालेले असो वा त्याच्या पद्धतितंत्रविषयक विधानांतून स्पष्ट झालेले असो–वर्तमान जर्मन भूगोलाच्या पद्धतितंत्रावर कसलाच महत्त्वाचा परिणाम करून गेलेले दिसत नाही.

पण, हे विधान बहुतेक सर्व इंग्रजी भाषिक भूगोलकारांनी गृहीत धरलेल्या गोष्टींशी विरोध दर्शविणारे आहे. जर्मन लेखकांनीही रात्सेलला विरोध असल्याचे उघडपणे बोलून दाखविलेले नाही. तरीही रात्सेलच्या कार्याची दखल पद्धतितंत्र चर्चांतून फारच थोडी घेतली जाते, या वस्तुस्थितीवरून वरील अनुमान काढता येण्यासारखे आहे. तसेच कित्येकांच्या वैयक्तिक विधानांमुळे याच निष्कर्षाला पुष्टी मिळते. उलटपक्षी रात्सेलच्या लेखनाच्या काही विभागांची सेम्पलने मुळीच दखल घेतलेली नाही, तरी जर्मन भूगोलात त्यांनाच महत्त्व प्राप्त झाले. विशेषतः सौंदर्यबोधक बाजूची विशेष गोडी असणाऱ्या अनेक भूगोलकारांनी रात्सेलच्या प्रादेशिक अभ्यासांना पुष्कळच मान दिला आहे. सापेक्षपणे मत द्यावयाचे झाले तर रात्सेलचे महत्त्व राजकीय भूगोलाच्या क्षेत्रातच सर्वाधिक होते. एल्. गुम्लोव्हिच या समाज शास्त्रज्ञाचे असे मत आहे, की " गेल्या शतकभरातील संपूर्ण राजनीतिशास्त्रविषयक तात्त्विक साहित्यात राज्यविषयक जितके ज्ञान सामावलेले आहे, त्यापेक्षा अधिक, आणि अधिक महत्त्वाचेही, ज्ञान एकट्या रात्सेलच्या ग्रंथातून ग्रथित आहे ". (अवतरण ७, १६०). या विधानात अंशतः अतिशयोक्ती असेल असे मान्य करूनही, आधुनिक भूगोलाच्या या विशिष्ट शाखेचा पाया घातल्याचे श्रेय रात्सेलकडे जाते, ही गोष्ट सर्वामुखी मान्य झालेली असली पाहिजे (२१६, ७८९).

फ्रान्समध्ये इतिहास आणि भूगोल यांचे निकट साहचर्य असल्यामुळेच, व्हिदाल-द-ल ब्लाक्, बॉलॉक आणि ब्रुने यांनी रात्सेलच्या कार्याकडे इतके क्रियाशील लक्ष पुरविले, असे म्हणावयास हरकत नाही. रात्सेलचा निदान एक तरी लेख फ्रान्समध्ये फ्रेंच भाषेत प्रसिद्ध झालेला होता. त्याच्या ग्रंथाचे प्रदीर्घ सारांश आणि त्यांची परीक्षणे वारंवार प्रसिद्ध होत असत. परिणामी, बराच काळपर्यंत, रात्सेलच्या विधानांवर व दृष्टिकोणावर टीका टिप्पणी करणे, त्यात आवश्यक त्या सुधारणा करणे व दुरुस्ती सुचविणे या गोष्टींत फ्रेंच भूगोलज्ञ पुष्कळच रस घेऊ शकले. ब्रुनेने आपल्या १९२५ मध्ये प्रसिद्ध झालेल्या भूगोलाच्या संक्षिप्त रूपरेषेत, रात्सेलसाठी चारपानांहून अधिक जागा राखली; पण, रिक्टोफेनसाठी फक्त

अर्धे पान दिले. अलिकडच्या जर्मन भूगोलज्ञांना तर रात्सेलचे कार्य विस्तारून व सुधारून सांगणारे प्रवचनकार असे म्हणून निकालात काढले (८३). खरे पहाता, " विसाव्या शतकातील जर्मन भूगोलावरील रिक्टोफेनचा प्रभाव रात्सेलच्या प्रभावाच्या तुलनेने, खूपच अधिक महत्त्वाचा होता. " (८४, १८३) हे स्लॅरचे विधानच बरोबर आहे.

ब्रूनेचे पद्धतितंत्रविषयक विचार जितके नियामक स्वरूपाचे आहेत त्यापेक्षाही ते अधिक सूचक स्वरूपाचे आहेत, असेच म्हणावे लागेल. त्याच्या संकल्पनांचे तपशीलवार चित्रण त्याच्या " मानवी भूगोल " (la Giographic humaine) या ग्रंथात आढळते. त्यात भूगोलाच्या द्वैतवादी संकल्पनेच्या सुधारित रूपाचे प्रतिपादन मुख्यत्वे केलेले आहे; आणि त्यातही मानवीभूगोलाचा बराच मोठा भाग संबंधयोगांच्या भाषेतच व्याख्याबद्ध केलेला आहे (१८२, c/o मिशोटचा टीकाग्रंथ १८९, ११ ते १४, ३१ ते ३३. तसेच पुढे येणारा सातव्या प्रकरणाचा ' क ' विभाग पहा). फ्रेंच भूगोलातील अत्यंत सांगोपांग असा पद्धतितंत्रविषयक अभ्यास, आणि " भूगोल म्हणजे संबंधयोगांचा अभ्यास " या संकल्पनेचे अत्यंत समर्थ प्रतिपादन, या गोष्टी वॅलॉक्च्या ' भूगोलाचे शास्त्र ' (les Sciences geographiques) या ग्रंथात आढळतात. (पण याच ग्रंथात प्राकृतिक भूगोलाची व्याख्या वितरणाच्या भाषेत केलेली आहे). पण, एकूण फ्रेंच भूगोलाने घेतलेले वळण निश्चित करण्याच्या दृष्टीने हे ग्रंथ कमी महत्त्वाचे ठरतात. त्यापेक्षा व्हिदालने आणि त्याच्या अनुयायांनी विकसित केलेले आणि अगदी लक्षणीय विस्ताराने मांडलेली भूगोलाची संकल्पना अधिक महत्त्वाची आहे. त्यातही, त्यांचे फ्रान्सच्या विशिष्ट प्रदेशांचे विशेष अभ्यास प्रामुख्याने उल्लेखनीय आहेत.*

रात्सेलचा सर्वोत्तम शिष्य एलन सेम्पल ही अमेरिकी स्त्री होती. तिच्या शिकवणीतून आणि प्रकाशनांद्वारे तिचा विशेष प्रभाव तिच्या स्वतःच्या देशात तर पडलाच, पण ब्रिटनमध्येही पडला. विशेष म्हणजे, त्याच ब्रिटनमध्ये चिझोल्मने मोठ्या उत्साहभराने केलेल्या हेटनर प्रणीत पद्धतितंत्राच्या चर्चेकडे (१९२) कोणी लक्षही दिले नव्हते. आणि हर्बर्टसन्च्या प्रादेशिक भूगोलाच्या संकल्पनांना कोणी विरोध केला तर कोणी त्याविषयी अनास्था दाखविली. अमेरिकेपुरता विचार केला तर सेम्पलची " भौगोलिक प्रभावाची " संकल्पना आणि डेव्हिसने जर्मनीतूनच आणलेली अप्रच्छन्न द्वैतवादी संकल्पना या दोहोंच्या साहचर्याने पद्धतितंत्रविषयक विचारांची दिशा, निदान एका पिढीपुरती तरी निश्चित झाली. फेनमानच्या भाषणाचा एकच उल्लेखनीय अपवाद वगळला, तर अमेरिकी भूगोलज्ञ संघाच्या १९०६ ते १९२६ च्या दरम्यानच्या अध्यक्षीय भाषणांतून वारंवार हाच विचार बोलून दाखविण्यात आला; आणि तोच सेम्पल आणि व्हिटबेक् टॉमस् यांच्या ग्रंथातून पूर्ण विकसित रूपात मांडला गेला. (२०४ व २१५) ** अगदी अलीकडेपर्यंत विद्यापीठांतून अधिकार गाजविणारा हा

---

* पुरवणी टीप क्रमांक १७ पहा.

** पुरवणी टीप क्रमांक १८ पहा.

विचार अध्यापक-विद्यालयांतून व माध्यमिक-शाळांतून आजही आपला प्रभाव टिकवून आहे. त्याविरुद्ध घेतलेले आक्षेपही गेल्या एक तपभरात अमेरिकी प्रकाशनांतून बारंवार मांडले गेले आहे. तरीही ही " पर्यावरणवादी संकल्पना " आपल्याला नीट, आणि काहीशी तपशीलवार, तपासून पाहिली पाहिजे. (विशेषतः सॉर २०९, १८ f; ८४, १६५ ते ७५; ८५, ६२२ आणि नंतर जेम्सचे २८६, ८१८; हार्टशॉर्नचे २१६, ७९५-९९; २१८, १६८ ff; आणि हॉलचे २९०, १२५ f; आणि अलीकडेच इंग्लंडमधील डिकिन्सनचे २०२)*.

मानवी रहिवासी व मानवी व्यवसाय यांचा पडणारा प्रभाव या परिभाषेत पर्यावरणवादी संकल्पना अगदी अलीकडेपर्यंत मांडली जात असे. नैसर्गिक परिस्थितीचा अभ्यास स्वतंत्रपणे केला जात असे, तेव्हा त्यांच्या मर्यादांचा विचार केला जात नसे; इतकेच नव्हे तर, " हाच खरा शुद्ध भूगोल " असेही सुचविले गेले होते. पुष्कळसे भूगोलज्ञ, आणि त्याहीपेक्षा अधिक समाजशास्त्रज्ञ, नैसर्गिक पर्यावरण हाच " एकमेव भौगोलिक कारक " आहे अशी भाषा बोलू लागले, अर्थातच मानवी भूगोल म्हणजे या कारकाचा मानवावर पडणाऱ्या प्रभावाचा अभ्यास, असा अर्थ झाला. म्हणूनच, भूगोल द्वैतवादी आहे असे म्हणावयाचे ते केवळ त्यात नैसर्गिक व मानवी अशा दोनही प्रकारांच्या घटनांचा अभ्यास केला जात असतो म्हणून नव्हे, किंवा त्यात भौतिक शास्त्रांबरोबरच सामाजिक शास्त्रांच्या तंत्रांचाही उपयोग करावा लागतो म्हणूनही नव्हे—कारण, कोणतेच शास्त्र स्वतःच्या खास पद्धतींनी स्वतःला बांधून घेऊ शकत नाही– तर नैसर्गिक घटनांचा अभ्यास आणि मानवी घटनांचा अभ्यास करण्याचे भूगोलाचे मूळ दृष्टिकोणच भिन्न असतात, या अर्थाने, हेटनरने १९०५ मध्ये असे सुचविले, की " द्वैतवादी " (Dualistic) या शब्दाने त्याच्या जर्मन भाषेतील शब्दशः भाषांतराचा (Zwie spatig) दुसरा म्हणजे ' दुहेरी ' (Discordant) हाच अर्थ ध्वनित केला आहे. पण, यामुळे भूगोलाची तर्कसिद्ध एकात्मता दुभंगते. उलटपक्षी निसर्ग आणि मानव या संकल्पना भूवंटनाच्या शास्त्रीय दृष्टिकोणातूनच निर्माण होतात असे मानले, तर सर्व महत्त्वाच्या बाबतीत तरी भूगोल एक जिनसी आहे. (१२६, ५४८, ५५४).

१९०७ साली प्रसिद्ध झालेल्या त्याच्याच एका चर्चेत हेटनरने अशी टिप्पणी केलेली आहे, की प्रथम नैसर्गिक घटकांचा विचार करून त्यावरून मानवी घटनांचे स्पष्टीकरण देण्याचा प्रयत्न, हा प्रकार बिनबुडाचा आहे. नैसर्गिक घटकांचा अभ्यास केल्याने " आपण फार तर संभाव्यतेपर्यंत पोहोचू शकतो. पण, निर्णय घेण्याचे काम माणसाने करावयाचे असते . . . . . प्रत्यक्ष अस्तित्त्वात असणाऱ्या कार्यकारणसंबंध योगांचे निश्चित स्वरूपाचे व सशास्त्र ज्ञान पाहिजे असेल, तर प्रथम मानवी वस्तुस्थितीपासून सुरूवात करणे, नंतर त्यांचे वर्गीकरण करणे व शेवटी त्यांच्या भौगोलिक मुळांपर्यंत त्यांचा मागोवा घेणे, एवढ्या एकाच मार्गाने ते साधणे शक्य आहे. " (१३०, ४१३ ते १४ : त्याचीच आवृत्ती १६१, १४३ : तसेच पहा श्लूटर १३१, ५०६ f). जवळजवळ हाच युक्तिवाद बॅरोच्या १९२२ सालच्या

* इंग्लंडमध्येच फोर्डचे ४२५, ४३१ व ई. जी. आर् टेलरचे ४२९.

अध्यक्षीय भाषणात आलेला दिसेल. त्याची सूचना अशी, की भूगोलाचा अभ्यास करताना " प्रथम मानवाने परिसराशी घातलेला मेळ व नंतर त्याचे पर्यावरण या क्रमाने जावे, याच्या विरुद्ध क्रमाने जाऊ नये. पहिल्या मार्गाने सर्व अनुस्यूत घटकांचा यथोचित समाचार घेतला जाण्याची शक्यता अधिक आहे; आणि त्या पर्यावरणातील घटकांना त्यांच्या अंगी नसलेला निर्णायक प्रभाव चिकटविण्याचा धोका किमान आहे " (२०८, ३).

बॅरोने काढलेल्या भूगोलाच्या पर्यावरणवादी संकल्पनेच्या या सुधारित आवृत्तीचा आणखी एक परिणाम झाला. त्यामुळे ' द्वैतवादाची ' समस्या सोडविण्यास मदत झाली, असे उघड दिसते, पण, हे साधण्यासाठी त्याने प्राकृतिक भूगोलाचा अभ्यास मुळापासूनच गाळून टाकला. नैसर्गिक लक्षणे असोत की मानवी लक्षणे असोत, त्या दोहोंचाही अभ्यास त्याच्या अन्योन्य संबंधांच्या संदर्भात करावयाचा असतो; म्हणजे भूगोल हा निरपवादपणे मानवी भूगोलच असतो. बॅरोचेच शब्द वापरावयाचे झाले तर, भूगोल हे " मानवाच्या पर्यावरणाचे शास्त्र " आहे. सारांश भूगोल हे एक सामाजिक शास्त्र आहे. वनस्पती-पर्यावरण शास्त्र हे एक प्रकारचे जीवशास्त्र आहे. या जीवशास्त्राचा संबंध जसा अन्य भौतिक शास्त्रांशी राहिला, तसाच भूगोल या समाजशास्त्राचा संबंध अन्य निसर्ग शास्त्रांशी राहील (c/o पेंक १६३, ३६). म्हणजेच, या संकल्पनेमुळे भूगोलाने, आजपर्यंतच्या त्याच्या इतिहासात घेतल्या होत्या त्यांपेक्षा, वेगळीच तात्त्विक भूमिका घेतल्यासारखी दिसते, आणि ही भूमिका म्हणजे गेर्लांटने सुचविलेल्या भूमिकेचे जवळजवळ दुसरे टोक होते. जपानात भूगोलज्ञांच्या एका गटाने बॅरोच्या संकल्पनेचे तर्कसिद्ध निष्कर्ष अगदी निश्चित शब्दांत मांडलेले आहेत. त्यांचे असे ठाम मत झाले आहे, की प्राकृतिक भूगोल हा एकूण भूगोलक्षेत्राचा एक भाग आहे, हे मानण्याची आवश्यकताच राहिली नाही, कारण तो भाग अन्य शास्त्रांत ग्रथित केलेला सापडेलच. मग, तो वगळून जो भाग भूगोल क्षेत्रात शिल्लक राहातो तो निरपवादपणे मानवी भूगोलच असतो (११०). प्रत्यक्ष परिपाठात मात्र अशी विभागणी होऊ शकत नाही ; कारण, मनुष्याने त्याच्या पर्यावरणाशी त्याने केलेल्या हातमिळवणीचा विचार करावयाचा असेल, तर त्या पर्यावरणाचे ज्ञान असणे आवश्यकच आहे. फरक इतकाच की, हे ज्ञान गौण असल्याने त्याचा स्वतंत्रपणे अभ्यास करण्याची गरज नाही.*

भूगोल म्हणजे फक्त मानवाचा भूगोल या संकल्पनेचे अधिक बारकाईने परीक्षण केले असता त्यातील बाह्यांगी दिसणारी एकता ही तितकीशी खरी नसते, असे दिसून येईल. पहिल्याप्रमाणे, मनुष्यांवर पडणाऱ्या भौगोलिक प्रभावांच्या भाषेत विचार करावयाचा झाला, तर मानववंशीय भूगोल या स्वरूपात भूगोल हा संबंधयोगांचा केवळ एक संग्रहच होतो. या सहसंबंधांचे प्रत्येक नैसर्गिक कारकाच्या आधारावर निरनिराळ्या प्रकारांत वर्गीकरण करणे शक्य होते पण सर्व प्रकारांच्या संबंध योगांना संघटित एकात्मरूप द्यावयाचे म्हटले, तर या गोष्टीला त्या त्या संग्रहांतून आधार सापडत नसत; तसेच हे सर्व प्रकारचे संग्रह एकत्रित केले तरीही त्यांत एकात्मता येत नसे. म्हणूनच, पदवी परीक्षेसाठी अभ्यास

* पुरवणी टीप क्रमांक १९ पहा.

करणाऱ्या विद्यार्थ्यांनी सेम्पलच्या मोठ्या ग्रंथांचे वर्णन, ते विश्वकोशाच्या स्वरूपाचे आहेत, अशा तक्रारीच्या रूपाने केले असेल तर त्यात आश्चर्य करण्यासारखे काहीच नव्हते ! बहुधा, अनुसंधान कार्य करणाऱ्या बहुतेक सर्वच अभ्यासकांना, केवळ तेवढेच नसले तरी, त्या ग्रंथाचे मूल्य प्रामुख्याने संदर्भ ग्रंथ म्हणूनच जाणवत असावे (२०४). ज्या अन्य अभ्यासांत सेम्पलला संघटित एकरूपता प्रस्थापित करण्यात यश आले, त्यांतील सुसंगती मूलतः ऐतिहासिक स्वरूपाची होती, असे आढळून येईल. उलटपक्षी, ऐतिहासिक दृष्टिकोणातून पाहिले तर हे ग्रंथ केवळ एकांगी आहेत.

म्हणून सेम्पलने आपल्या " अमेरिकेचा इतिहास आणि त्याचे भौगोलिक प्रभाव " या ग्रंथात म्हणजे परिपाठात ही पर्यावरणवादी संकल्पना –अर्थात मानवाचा निसर्गाशी संबंध– उलट क्रमाने वापरली. त्यातील विषय संघटना सामाजिक शास्त्रांच्या परिभाषेतच केली. अशा आधारांवर रचलेल्या या भूगोलातील एकात्मता एका अर्थाने एकूण सामाजिक शास्त्रातून जेवढ्या प्रमाणात एकात्मता असते त्याच प्रमाणात होती, तर दुसऱ्या अर्थाने या भूगोलातील एकात्मता अगदीच अपुरी होती. त्यातील संबंध योगांच्या संग्रहांची संघटना सामाजिक शास्त्रांच्या संघटनेच्या परिभाषेत केलेली असली, तरी त्यापैकी प्रत्येक संग्रहात पूर्ण वस्तूच्या एका अंगाचेच प्रतिपादन केलेले असते. भूगोलाच्या या दृष्टिकोणाचा परिणाम ब्रिटिश भूगोलज्ञांच्या कार्यात विस्कळितपणा निर्माण करण्यात झाला आहे, असा उल्लेख डिकिन्सनने अलीकडेच केला आहे (१०१, २६०-६७-६९).

भूगोलाच्या अशा व्याख्येची आणखीही एक सुधारित आवृत्ती आहे. या व्याख्येने भूगोलक्षेत्राचे वर्णन प्रदेशातल्या प्रदेशात असलेल्या संबंध योगांचा किंवा प्रदेशांप्रदेशांतील सांधेजोडीचा अभ्यास असे केले जाते. या व्याख्येमुळे सामग्रीचे संघटन सुलभ होते यात शंकाच नाही; तरीही दिसायला ते केवळ स्वैर आहे. भूगोलातील विचार मुख्यतः संबंधयोगांचाच असेल, तर तर्कदृष्ट्या संघटन हे संबंधयोगांच्या लक्षणांच्या भाषेत असणार, हे गृहीतच आहे. ज्या विशिष्ट स्थळी ते आढळतात त्या स्थळांचा विचार अशा वर्णनांत अनाठायी ठरेल. कोणत्याही परिस्थितीत, प्रादेशिक वर्गीकरणातून ही दृष्टी मर्यादित करण्याची एक सोयीस्कर पद्धती मिळाली असली, तरी प्रदेशांतर्गत संबंधयोगांची सर्वंकश संघटना करण्यासाठी लागणारे आधार त्यातून मिळण्याची शक्यता नाही.

अशारीतीने, भूगोलाचे अंतर्गत एकीकरण करण्यासाठी लागणारा तर्कसिद्ध आधार पर्यावरणवादी संकल्पनेतून मिळत नाही. निदान, भूगोलाला इतर ज्ञानक्षेत्रांपासून वेगळे काढण्याचे कार्य तरी या संकल्पनेने साधले काय, याचाही विचार आपल्याला केला पाहिजे. पुढे १९२० च्या दशकात जो निष्कर्ष या देशातील पर्यावरणवादी भूगोलकारांनी अंगिकारला, त्याचे प्रतिपादन हेटनरने १९०७ मध्येच केले होते, हे आपण पाहिलेलेच आहे. संबंधयोगांच्या अभ्यासाची कार्यपद्धती मानवाकडून निसर्गाकडे नेणारी असावी, याच्या विरूद्ध असू नये; असाच निष्कर्ष त्याचाही होता. 'पृथ्वीच्या स्वरूपावर मानव

अवलंबून असतो ' या प्रश्नाच्या उत्तरापर्यंत कोणतेही एक शास्त्र येऊन पोहोचू शकेल काय ? हा प्रश्न उपस्थित करून हेटनरने हाच युक्तिवाद पुढेही चालविला. या प्रश्नाचे उत्तर देण्याचे कार्य हे कोणत्या एका शास्त्राचे अधिकारक्षेत्र असू शकणार नाही, मानवाचा अभ्यास करणाऱ्या विविध संश्लेषणात्मक शास्त्रांना विविध देश व स्थळे यांत दिसणाऱ्या भिन्न सामाजिक स्थिती समजून घ्यावयाच्या असतील तर त्यांचे भूपृष्ठाच्या नैसर्गिक स्वरूपाशी असलेले संबंध प्रथम प्रस्थापित करावे लागतील. ऐतिहासिक वृत्तान्तातूनही नैसर्गिक परिस्थिती विचारात घेतली गेली तरच वेगवेगळ्या घटना समजावून घेता येतील व त्यांचे स्पष्टीकरण देता येईल. उदा. एखाद्या मोहिमेचा मार्ग, एखाद्या शांततातहामुळे झालेले अधिराज्यांतील बदल . . . . इ. त्याबरोबरच मानवाच्या ऐतिहासिक विकासाचा संपूर्ण मार्ग समजून घेण्याचा, अथवा त्याचे स्पष्टीकरण देण्याचा, त्याचा मानसही साध्य होईल. अशाप्रकारचे अभ्यास अन्य शास्त्रांनी केलेले असल्यास त्याची असूया भूगोलाध्यापकानी धरणे इष्ट नाही; उलटपक्षी आपण त्याचा आनंदच मानावा, धन्यवादपूर्वक त्यांच्या निष्कर्षांना मान्यता द्यावी. इतकेच नव्हे तर त्यांना त्या कामी मदत करण्यास पुढे व्हावे. मात्र, अशी मदत देत असतानाही आपल्या विचारांचा गुरूत्त्वमध्ये भूगोलातच राहील याची काळजी घेतली पाहिजे (१३०, ४२२).

मानव व निसर्ग यांच्यामधील संबंधयोगांचा अभ्यास आपणही करत आहोत असे गृहीत धरून कार्य करणाऱ्या अन्य शास्त्रातील अभ्यासकांना अतिक्रामक मानणारे भूगोलज्ञ पुष्कळ आहेत, ही गोष्ट अमान्य करता येणारी नाही. पण, ' भूगोलाला स्वतःचे अभ्यास क्षेत्र होतेच कोठे ? ' अशी शंका प्रदर्शित करणाऱ्या अन्य क्षेत्रांतील अभ्यासकांची संख्या त्यातूनही मोठी आहे. कारण, भूगोलाची व्याख्या एका विशिष्ट वस्तुस्थिति-मंडलाच्या भाषेत न करता, सर्व संबंधयोग कार्यकारणभावात्मकच आहेत असे गृहीत धरून त्या संबंधांच्या भाषेतच भूगोलाची व्याख्या केली तर तशा भूगोलाचे स्वरूप केवळ एखाद्या बांडगूळासारखे होणार (हेटनर १३०, ४२३).

क्षणभर हे तात्त्विक परीक्षण बाजूला ठेवून, भूगोलक्षेत्रात निर्माण होत असलेल्या कार्याच्या स्वरूपाचे परीक्षण आपण केले, तरी अन्यक्षेत्रांतील सहकाऱ्यांनी आपल्यावर केलेले समर्थनीय ठरावेत असा पुष्कळच पुरावा पुढे येणार आहे, ही गोष्ट अमान्य करता येण्यासारखी नाही. दोन संलग्न शास्त्रांच्या सरहद्दी निश्चितपणे आखलेल्या असल्या पाहिजेत आणि तेथे संरक्षक दलाने गस्त घालत राहिले पाहिजे, अशी अपेक्षा कोणीच करणार नाही, हे निश्चित. तसेच, प्रत्येक क्षेत्रातील काही अभ्यासक या मर्यादेनजीकच्या भागात कार्यमग्न असताना, त्याने शेजारच्या क्षेत्रात अनवधानाने पदक्षेप करणे ही गोष्ट स्वाभाविक आहे आणि उचितही आहे. भूगोलक्षेत्राचा अनेकानेक शास्त्रांशी निकटचा संबंध आहे यात संशयच नाही. पण भूगोल हे एक स्वतंत्र अभ्यासक्षेत्र असेलच तर त्यातील बहूतेक सर्व कार्यकर्ते बहुतेक सर्वकाळ आपल्याक्षेत्राच्या मर्यादेतच काम करताना दिसतील असे गृहीत धरणे अगदी न्याय्य आहे. वस्तुतः ही परिस्थिती गेल्या पिढीतील जर्मन भूगोलज्ञांच्या बाबतीत, आणि

मोठ्या प्रमाणात फ्रान्समधील व्हिडाल-द-ल ब्लाकच्या अनुयायांच्या बाबतीतही, खरी असल्याचे दिसून येते (येथे भूरूपशास्त्राच्या बाबतीत असाच युक्तिवाद केला जाईल तेव्हा त्याकडे दुर्लक्ष करणे शक्य होईल असे गृहीत आहे). उलटपक्षी, ज्यांचे बहुतेक सर्वकार्य उघडपणे ' संबंधयोगवादी ' संकल्पनेच्या प्रभावाखालीच झाले, त्यांपैकी बहुतेक सर्वांनी आपले कार्य, निश्चितपणे दुसऱ्या क्षेत्राच्या हद्दीत नाही तरी निदान, ज्यांना संक्रामक म्हणावे लागेल अशा विभागातच केलेले आहे. अगदी आघाडीच्या कार्यकर्त्यांचा उल्लेख करावयाचा म्हटले तरी, सेम्पल, ब्रून्हे, हटिंग्टन, टायलर यांनी प्रसिद्ध केलेले सर्व प्रमुख ग्रंथ अगदी उघडपणे भूगोल व इतिहास यांची भेसळ म्हणूनच निर्देशित केले जातात; आणि शेवटच्या दोघांनी तर विविध अन्य क्षेत्रांतून संशोधन केलेलेही आहे. जर कोणा वाचकाला हे अपवाद असल्याची शंका येत असेल तर आमच्या मंडळाच्या नियतकालिकांचे खंड त्यांनी चाळून पहावे, म्हणजे, ज्या लेखांना भूगोलाइतकेच अन्य क्षेत्रांतीलही आहेत असे म्हणता येईल, असे लहान लहान अभ्यासलेख बहुसंख्येने असलेले त्याला आढळतील. अन्य क्षेत्रांतील अभ्यासक या अभ्यासांकडे कोणत्या दृष्टीने पहातात याच्याशी आपल्याला कर्तव्य नाही. कारण, कधी त्यांना त्यांच्या क्षेत्रातही उपयोगी पडतील अशा संकल्पना व अशा पद्धती त्या अभ्यासात गवसतात, तर कधी त्यांच्या क्षेत्रातील आवश्यक तेवढी पार्श्वभूमी लेखकाला नाही अशी तक्रारही ते करतात. म्हणून ' या आपल्या अभ्यासांतून "अन्य क्षेत्रापासून भूगोलाचे वेगळेपण कसे दाखवून देता येईल ? " या प्रश्नाचे उत्तर सापडत नाही ' या आक्षेपापुरताच आपला या वादाशी संबंध आहे.

या परिस्थितीचा आणखी एक अनिष्टतर परिणाम होतो. अन्य क्षेत्रातील अभ्यासकांना भूगोलाकडे एका निराळ्याच दृष्टिने पहाण्याची सवय लागलेली आहे. भूगोल हा सरळ सरळ पर्यावरणात्मक निश्चयवाद, म्हणजेच पूर्वनियतिवादाचा एक यांत्रिक प्रकार, आहे असे ते समजतात. (८४, १७४). पुष्कळशा टीकाकारांच्या अन्याय्य हल्ल्याकडे आपण दुर्लक्ष करावयाचे ठरविले – कारण, व्हिटबेक व टोमास यांनी म्हटल्याप्रमाणे, त्या टीका अ-भूगोलज्ञांच्या कार्यावर आधारलेल्या आहेत (२१५)– तरी फेरबरच्या भौगोलिक कार्यावर झालेल्या टीकेतील पुष्कळसे मुद्दे खंडन न करता येण्याइतके समर्थ आहेत. विशेष असे, की हे परीक्षण तपशीलवार आणि क्रान्तिक असूनही मित्रत्वाच्या भावनेने केलेले आहे (१८५; तसेच c/o टोमास २१०). केवळ काही विशेषणे घुसडल्याने, म्हणजेच " संभाव्यता " वगैरे वगैरे भाषेत बोलून, या अनिष्ट परिणामाचे निर्मूलन करता येण्यासारखे नाही. कारण श्लूटर, मिशोट, सॉर या सर्वांनीच एक गोष्ट मान्य केली आहे, आणि ती खरीही आहे. एकदा का एखाद्या शास्त्राच्या क्षेत्राची व्याख्या कार्यकारणभावात्मक संबंधयोगांच्या भाषेत मांडली गेली, की असे संबंधयोग त्यांच्या मागावर राहून शोधण्याचेच ' शिक्षण ' अभ्यासकांना दिले जाते, इतकेच नव्हे तर, त्याची निःपक्षपाती वृत्ती मारून त्याला थेट पूर्वनियुक्त तत्त्वांच्या मार्गाने जाणे भाग पडते. कारण, पर्यावरणाशी केलेल्या हातमिळवणीची प्रत्यक्ष उदाहरणे दाखवून

देण्यात हमखास यश असते, हे उघड आहे, निदान ते अगदी सोपे आहे (१२७, ११ f; १८९, ११ ते १५; १८४, १७१ ते ७३; ८५, ६२२). या सिद्धान्ताशी प्रत्यक्ष प्रमाणे द्यावयाची झाली, तर आपल्या भौगोलिक साहित्यात अशी कितीतरी उदाहरणे सापडतील. यातील काही एकांतीक प्रकार तर, वास्तविक जेथे अत्यंत संयम हितकारक असतो अशा विभागात म्हणजे, शालेय भूगोलातूनही प्रसारित केले जातात. या प्रकारच्या असंख्य उदाहरणांची एक यादीच मी अन्यत्र प्रसिद्ध केलेली आहे (२१८) [४६].

शेवटी असेही म्हणावे लागते, की " भूगोल म्हणजे संबंध योगांचा अभ्यास " या संकल्पनेला भूगोल-विषयासाठी " पूरेशी आकलनीय उद्दिष्टे " पुरविण्यात यश आले नाही. अर्थात, त्याच्या अभ्यासासाठी मूर्त घटना, स्वतंत्र व कार्यक्षम पद्धती अथवा कार्य नियमावली यांपैकी काहीच देता आले नाही (सॉर ८४, १७३ f).

या तर्कसिद्ध आणि व्यावहारिक अडचणींमुळे हेटनर, श्लूटर आणि त्यांच्या पाठोपाठ मिशोट, सॉर व दुसऱ्या अनेकांनी असा निष्कर्ष काढला, की कोणत्याही स्वतंत्र शास्त्राला कार्यकारण-भावात्मक-संबंध हे आपले उद्दिष्ट ठेवता येणार नाही, तर त्या शास्त्राला एका विशिष्ट वस्तुस्थितिचक्राला वाहून घ्यावे लागेल ; म्हणजेच, प्रथम ते प्रस्थापित करावे लागेल आणि नंतर कार्यकारणभावांचे संबंधयोग शोधण्यासाठी त्यांचे क्रमवार वर्णन करावे लागेल (१३०, ४२३) [४७].

## ड–भूगोल म्हणजे वंटनशास्त्र

आधुनिक भूगोलाच्या अभिजात पूर्वकालखंडातच, साररूपाने भूगोल हे वितरणाचे शास्त्र आहे, ही गोष्ट सूचित करण्यात आली होती. स्वतंत्रपणे आणि परस्पर संबंधांच्या संयोगात विविध घटनांच्या भूपृष्ठीय वंटनाचा अभ्यास करणे हेच या क्षेत्राचे उद्दिष्ट आहे. ड्योरिंगच्या लक्षात हीही गोष्ट आलेली होती, की अशा अभ्यासांनी हंबोल्टच्या एकूण अभ्यासाचा अल्पांश व्यापलेला होता (२२, ६४ ff). भूगोल क्षेत्राविषयीच्या या

---

४६. " शाळा व समाज " या प्रकाशनातील हा संदर्भित लेख वाचकांनी पाहिलेला असण्याची शक्यता आहे, कारण मूळ ग्रंथापेक्षा या प्रकाशनाचा खप खूपच जास्त आहे. हे लक्षात घेऊनच त्यातील एका चुकीची दुरुस्ती दप्तरीदाखल करण्याची वाचकांनी मला परवानगी द्यावी. माझ्या एका वाक्याचा अनुवाद करताना लेखकांनी अगदी अभावितपणे मूळात बदल केला आहे, असे मला कळते. हा बदल दिसण्यात गौण असला, तरी त्यातून सारांशाने मूळ विधानाच्या विरुद्ध अर्थ निर्माण होतो (२१८, १७२).

४७. फार अगोदरच, म्हणजे १८९५ व १८९७ मध्ये, हेटनरने भूगोल हा संबंधयोगांचा अभ्यास आहे या संकल्पनेला अन्य युक्तिवादाच्या ओघात आक्षेप घेतलेला होता. श्लूटरनेही हेटरनच्या याच आक्षेपांचा उल्लेख करून त्या संकल्पनेवर अधिक तपशीलवार टीका केलेली होती (भौगोलिक नियतकालिक : I, ३७३ f; III, ६२५; V, ६६ f ).

दृष्टिकोणाचे फार जोरदार प्रतिपादन मार्थे याने केले, आणि " कोणत्या गोष्टी कोठे आहेत " याचा अभ्यास म्हणजे भूगोल असे भूगोलाचे सरळ साधे वर्णनही त्यानेच केले (७०, ४२६ ff). अगदी अलिकडे द. गेडर याने त्याचे पुनःप्रतिपादन केले. तरी अन्य बाबतीत गेडरचे हेटनरशीच साम्य आहे. एके काळी श्लूटरने हेटनरवर या संकल्पनेला पाठिंबा दिल्याचा आरोप केला होता. हेटनरने उत्तरादाखल आपल्या आधीच्याच युक्तिवादाची केवळ पुनरावृत्ती केली (त्याचाही उल्लेख पुढे येणार आहे), आणि तेवढीच गोष्ट त्याच्या लिखाणाविषयी पूर्णपणे गैरसमज झालेला असल्याचे दाखवून देण्यास पुरेशी होती.

वंटनाचा अभ्यास हाच जर भूगोलाचे स्वरूप निश्चित करणारा मूलभूत अभ्यास असेल, आणि तो अन्य हेतूंच्या दृष्टीने केवळ प्रासंगिक नसेल, तर तेच त्याचे अन्य क्षेत्रांपासून भिन्नत्व सिद्ध करणारे लक्षण असले पाहिजे. या आवश्यक निष्कर्षामुळे कित्येकांचा असा समज झाला आहे, की एखाद्या वनस्पतिशास्त्रज्ञाने एखाद्या वनस्पतिचे क्षेत्रीय वितरण निश्चित केले, अथवा एखाद्या भूशास्त्रज्ञाने एखाद्या ज्वालामूखीचे स्थान निश्चित केले, अथवा एखाद्या समाज शास्त्रज्ञाने एखाद्या संख्या कोष्टकाचा उपयोग करून न थांबता एखाद्या देशाच्या लोकसंख्येचे वितरण नकाशाच्या सहाय्याने स्पष्ट केले, तर तेवढ्याने तो वनस्पतिशास्त्रज्ञ, भूशास्त्रज्ञ किंवा समाजशास्त्रज्ञ भूगोलकार बनतो –निदान, तो भूगोलक्षेत्रात कार्य करतो आहे असे मानले जाते. पण या उदाहरण-मालिकेवरून मिशोटने काढलेल्या निष्कर्षाप्रमाणे पहाता, यातील प्रत्येक अभ्यासक आपला अभ्यासविषय असलेल्या त्या विशिष्ट घटनेचे आकलन होण्यास आवश्यक तेवढाच अभ्यास, भूगोलाच्या दृष्टिकोणातून नव्हे तर, त्याच्याच शास्त्राच्या दृष्टिकोणातून करत असतो. जिला भूपृष्ठावर काही स्थान आहे अशा कोणत्याही घटनेचा विचार करणारे कोणतेही शास्त्र अवगामी पद्धतीचा अवलंब करून त्या घटनेच्या स्वरूपावर व विकासावर नियंत्रण ठेवणारे संबंधयोग प्रस्थापित करण्याच्या प्रयत्नात असेल, तर कोणतीही तत्त्वे ठामपणे मांडण्यापूर्वी बहुधा त्याला त्या घटनेचे स्थल निश्चित करावे लागेल (१८९, १५ ते १७).

आपल्या अगदी पहिल्या, म्हणजे १८९५ मधील, पॅद्धतितंत्रविषयक चर्चेपासून सुरुवात करून, हेटनरने भूगोलाच्या या संकल्पनेवर अशाप्रकारचेच आक्षेप पुन्हा पुन्हा घेतलेले आहेत. " स्थलपरत्वे वितरण हेही त्या वस्तूचे एक लक्षण आहे. म्हणून, अशा वंटनाचा समावेश त्या त्या क्रमबद्ध शास्त्रातील (भूगोलातील नव्हे) संशोधनाच्या व प्रतिपादनाच्या कक्षेत करणे आवश्यक आहे. " असे हेटनरने १९०५ मध्येच लिहिलेले आहे. भौगोलिक प्राणिशास्त्रात प्राण्यांच्या एखाद्या विशिष्ट प्रजातीचे व जातीचे वितरण हाच अभ्यासविषय असतो; तर प्राणिशास्त्रविषयक भूगोलात –किंवा सोप्या भाषेत प्राणि भूगोलात– विविध भूभागांच्या प्राणिसंपत्तीत आढळणारा वेगळेपणा हा अभ्यास-विषय असतो. असा या दोहोतील भेद वॉलेसने स्पष्ट केलेला होता, त्यावरच हेटनरने भर दिला. [मिशोटने या दोन शीर्षकांच्या वेगळेपणाच्या महत्त्वाकडे लक्ष वेधले आहे (१८९, ४१ तळटीप)]. नैसर्गिक रूपांच्या दुसऱ्या अनेक उदाहरणांनी या दोन दृष्टिकोणांतील हा भेद हेटनरने स्पष्ट केला

आहे. प्रत्येक बाबतीत त्या त्या क्रमबद्ध शास्त्राचे लक्ष त्या घटनांवर केंद्रित झालेले असते, आणि त्या घटनांचा अभ्यास वंटनानुसार होत असतो. उलट, भूगोलाचे लक्ष खनिज, वनस्पतिज व प्राणिज संपत्तीच्या सांध्यातील भिन्नतेमुळे परस्पर भिन्न दिसणाऱ्या क्षेत्रावर केंद्रित झालेले असते. " कोणत्याही एका क्षेत्रात एकत्र अस्तित्वात असते ते सर्व म्हणजे भूगोल " असे जे भूगोलाचे वर्णन हम्बोल्टने केलेले आहे, त्यावरूनच काढलेल्या सुसंगत उपप्रमेयाचे प्रातिनिधिक स्वरूप म्हणजेच व सांगितलेला भूगोलविषयक दृष्टिकोण होय (६०, I ५०). हीच गोष्ट हेटनरच्या सांस्कृतिक घटनांसंबंधीच्या उदाहरणाने आणखी स्पष्ट होते. " एखादे विशिष्ट उपकरण वा शास्त्र किंवा कोणतीही वस्तू वा रूढी यांच्या वितरणाच्या अभ्यासाला मानव-भूगोल-विषयक अभ्यास असे चुकीने म्हटले जाते. त्याला मानव-भूगोल-विषयक महत्त्व अप्रत्यक्ष रीतीने येण्याची शक्यता असली, तरी तो अधिकांशाने मानवजाति शास्त्रविषयकच असतो; कारण, त्याचा लक्ष्य बिंदू प्रदेश हा नसून संबंधित वस्तू किंवा त्या वस्तूचे उत्पादक व धारक म्हणून लोक, हे असतात (१२६, ५५७ ff) [४८].

---

४८. भूगोल हे " Das wo der Dinge " म्हणजे " वस्तूंचा ठावठिकाण " सांगणारे शास्त्र आहे या संकल्पनेला हेटनरचा पाठिंबा होता, अशी टीका श्लूटर ठामपणे ज्या निबंधाला उद्देशून करत असे त्याच निबंधातून वर दिलेली हेटनरची सर्व अवतरणे उद्धृत केलेली आहेत (१२७, ५३ ते ५६). असा चुकीचा अर्थ लावताना श्लूटरने कशाचाही आधार घेतलेला असला, तरी हेटनरने दिलेल्या उत्तरानंतर कोणताच गैरसमज शिल्लक रहावयास नको होता (१३२, ६९८ f). तरीही, जर्मनीतील पद्धतितंत्रविषयक विचारांची ओळख अमेरिकी भूगोलज्ञांना करून देताना, अनेक वर्षांनतंर, सॉरने त्याच चुकीची आवृत्ती केली. कोणत्याही प्रकारचा पुरावा सादर न करताच, सॉर हेटनरसंबंधी असे उद्गार काढतो, " ' पार्थीव वितरणांचा, त्यांचा विस्तार व त्याचे स्पष्टीकरण यांच्या संदर्भात केलेला सामान्य अभ्यास ' या अर्थाने भूगोलाचे समर्थन हेटनर करत असे " (८४, १८२ आवृत्ती १८८), इतकेच नव्हे तर, " ज्याने सर्वप्रकारांच्या वितरणांच्या अभ्यासाकडेच मुख्यत्वे लक्ष पुरविले " अशा एका भूगोलकाराला त्याने खरोखर पाठीशी घातले (१८५). बहुधा, हेटनरविरुद्ध श्लूटरने केलेल्या टीकेचा आधार सॉरने घेतलेला असावा व त्यामुळेच त्याने त्या टीकेचा निर्वाळा देऊन हेटनरच्या उत्तराकडे दुर्लक्ष केले असावे. प्रत्यक्ष उत्तरात जरी हेटनरच्या उत्तराचा सूगावा कोठेच लागू दिलेला नसला, तरी अन्यत्र एका तळटीपेत हेटनरच्या अनेक पद्धतितंत्रविषयक अभ्यासांबरोबरच त्या उत्तरात्मक लेखाचाही उल्लेख सॉरने केला आहे. सॉरने भूगोलाला लागू न पडणारे म्हणून दिलेले विशिष्ट उदाहरण म्हणजे लांघानचा " स्वयं निर्णयाचा अधिकाराचा भौगोलिक दृष्टिकोणातून केलेला अभ्यास " (३६९) हेच असावे. भूगोलक्षेत्रात सामावून न घेता येण्यासारख्या अभ्यासांची यादी एके ठिकाणी हेटनरने दिलेली आहे. त्यातच त्याचे हेही उदाहरण सहज बसणारे आहे. (सॉरने दिलेल्या याच तळटीपेत या दुसऱ्या लेखाचाही उल्लेख आलेला आहे (१२६, १५८ f ) त्याच टीपेत समाविष्ट असलेल्या तिसऱ्या एका लेखात हेटनरला चिकटविलेल्या या संकल्पनेचेच खंडन आलेले आहे (१५२, ३९ f). ही यादी पूर्ण करण्याच्या दृष्टीने आणखी आठ लेखाचा उल्लेख करावा लागेल. ही सर्व प्रकाशने १८९५ ते १९३५ या दरम्यानची आहेत. कोणतेही स्पष्टीकरण न देता जो दृष्टिकोण हेटनरच्या माथी मारण्यात आला, त्याच दृष्टिकोणाविरुद्ध त्याने घेतलेले तर्काधारित आक्षेप या सर्व लेखांतून सापडतात. (१२१, १०, १२३, २३ f; १८०, १७३ f; १४२,११; १६१, १२३-२४; १६७, ३३९ f; १७५, ३८२; ३६३ Einleitung). ].

इतिहास व भूगोल यांच्या तुलनेवर हेटनरने आपली भूगोलाची सामान्य संकल्पना आधारलेली आहे (तिचा पुढील प्रकरणात सांगोपांग विचार व्हावयाचाच आहे). इतिहासाला जर ' केव्हा ' चे शास्त्र म्हणावयाचे झाले, तर तर्कानि हेच सिद्ध होते की भूगोल हे ' कोठे ' चे शास्त्र होईल, असे या दोहोंच्या तुलनेने सूचित केले जाण्याची शक्यता आहे. अशी त्यावर सॉरची टिप्पणी आहे (८४, १८४). पण हेटनर स्वतः अथवा या दोन्ही क्षेत्रांची तुलना मान्य करणारा मिशोटही, या चुकीच्या जाळ्यात सापडले नाहीत. इतिहासकार ज्या अनेक प्रश्नांची उत्तरे शोधण्याचा नेहमीच प्रयत्नात असतात, त्यांपैकी एक प्रश्न ' केव्हा ' हा असतो. तसेच भूगोलज्ञही संबंधी घटना कोठे आढळतांत या प्रश्नाचे उत्तर मिळविण्याच्या प्रयत्नात असतात. इतिहासकार आपल्या क्षेत्राची व्याख्या केवळ ' काळ ' या एका घटकाधारे केलेली आहे असे कधीच मानत नाही; कारण, एक स्वतंत्र ज्ञानक्षेत्र या नात्याने इतिहास कोणत्याही विशिष्ट घटनांच्या विशेषणात रस घेत नाही, –ते काम त्या त्या क्रमबद्ध शास्त्रावर सोपविलेले असते.– तर विविध प्रकारच्या घटनांचे कालखंडानुसार एकसूत्रीकरण करण्यात इतिहास विशेष रस घेतो (११६, ५४५ f). क्रोबरने दिलेले हे कारणच बरोबर आहे. सॉरने सुचविलेली मर्यादा इतिहासावर पडू शकत नाही आणि अशा प्रकारच्या मर्यादेला इतिहासकारांनीही कधी मान्यता दिलेली नाही (पहा : प्रकरण ७ वे विभाग ' ब ').

शेवटी, वंटनशास्त्र या नात्याने भूगोलावर सॉरने घेतलेल्या अत्यंत महत्त्वाच्या आणि व्यावहारिक आक्षेपांची नोंद घेण्यासही हरकत नाही. यामुळे " अनेक प्रकारच्या वस्तुस्थितींच्या वितरणात्मक आविष्कारांच्या संबंधी " कार्य करण्याबाबत भूगोलज्ञांवर दडपण आणले जाण्याची शक्यता आहे. (आणि प्रत्यक्षानुभवाने प्रस्तुत लेखकाच्याही हे लक्षात आलेले आहे. पहाः प्रकरण १२ वे, विभाग ' ग '). " वास्तविक अशा क्षेत्रात कार्य करण्याची आमची पात्रता इतर पुष्कळांच्या तुलनेने बरीच कमी असते. ". शिवाय " अशा अभ्यासांचा विकास करण्यास लागणारी ज्ञानव्यवस्था कोणालाच माहीत नाही. शेवटचा मुद्दा असा, की अशा संकीर्ण वंटनाभ्यासांतून समलक्ष्य बंधन निर्माण होत नाही." (८४, १८५).

शास्त्रमंडळातील भूगोलाचे खास कार्य वितरणांच्या अभ्यासांतून सापडणार नाही, ही गोष्ट आजचे बहुतेक सर्व भूगोलज्ञ मान्य करतील. तरीही एक अगदी तर्कसिद्ध निष्कर्ष टाळणे अवघड होऊन बसेल. त्या त्या घटना कोठे आढळतात हे समजून घेतल्याशिवाय, कोणताही भूगोलज्ञ कोणत्याही घटनेचा अभ्यास करू शकणार नाही. म्हणून, ' कोठे ? ' चा अभ्यास हा स्वाधिकारानेच भूगोलक्षेत्राचा निदान एक भाग असतो. मुख्यतः क्रमबद्ध भूगोलातील ही एक प्रचलित समस्या असल्याने, आपल्या क्षेत्राच्या त्या बाजूचे परीक्षण करताना याचा

पुन्हा विचार करावाच लागणार आहे (पहाः प्रकरण ११ वे विभाग ' ग '). कोणत्याही भूपृष्ठांतर्गत घटनांचा अभ्यास करणारी क्रमबद्ध शास्त्रे आपल्या कार्याच्या कोणत्यातरी एका भागात ' कोठे ? ' या प्रश्नाचे उत्तर देण्याचा प्रयत्न करतातच. याचाच अर्थ असा, वस्तूंच्या स्थळांची निश्चिती करणे व त्याचे स्पष्टीकरण देणे हे काही भूगोलाचे वेगळेपण सिद्ध करणारे खास कार्य नव्हे, एवढी नोंद तूर्त पूरे आहे.



## प्रकरण ४ थे

# भौगोलिक शास्त्र या अर्थाने भूगोलाच्या ऐतिहासिक संकल्पनेचे समर्थन

### अ–व्यवहारबुद्धीने समर्थन

भूपृष्ठाच्या क्षेत्रीय भेदाभेदांचा अभ्यास भूगोलशास्त्राला पुरेसे कार्य पुरवू शकतो का ? भूगोलाच्या शास्त्राला यापेक्षा अधिक जिव्हाळ्याच्या समस्यांचा शोध घेण्याची जरुरीच वाटत नाही का ? अशा प्रकारचे प्रश्न वारंवार विचारले जातात. अशा शब्दात हा प्रश्न मांडला, की शास्त्राच्या सामान्य स्वरूपासंबंधीची समस्या पुढे उभी रहाते. आणि या प्रश्नाची चर्चा तर या ग्रंथाच्या शेवटच्या प्रकरणापर्यंत पुढे ढकलावयाची असे आम्ही ठरवले आहे. तेव्हा, तूर्त आपण येवढेच गृहीत धरू या, की सर्वकाळांतील सर्वलोकांच्या –यातच अतिश्रेष्ठ विचारवंतांपैकी बहुतेकांचा समावेश करावयाचा आहे– बौद्धिक जिज्ञासेला ज्या ज्या विषयाने गुंतवून ठेवलेले आहे तो तो विषय उच्च पातळीवरून अभ्यास करण्याच्या पात्रतेचा असतो. भूतकाळात कोणत्या गोष्टी कशा होत्या आणि त्याकाळी कोणत्या घटना घडल्या हे समजून घेण्याची उत्कट इच्छा सर्वसाधारण –माणसाला असतेच, आणि त्यातच इतिहासाचे समर्थन आहे. तद्वतच, जगाचे अन्य विभाग कशासारखे आहेत हे जाणून घेण्याची उत्कट इच्छा बहुतेकांना असतेच आणि त्यातच भूवर्णनात्मक (किंवा भूवंटनात्मक) अभ्यास या अर्थाने भूगोलाचे नित्य समर्थन होत आले आहे. शिवाय आपल्याच जीवन कालात जगात कोणत्या घटना घडत आहेत याचे फारच थोडे ज्ञान सामान्य माणसाला असते. तसेच, तो स्वतः ज्या क्षेत्रात रहात असतो त्या क्षेत्राचेही ज्ञान सामान्य माणसाला अपुरेच असते. म्हणूनच, वर्तमान इतिहासाइतकीच स्वदेशाच्या भूगोलाचीही आवश्यकता त्याला वाटत असते.

" आपण ज्या अवकाशात वावरतो तो, म्हणजेच हे पृथ्वीचे पृष्ठ, समजून घेण्यास भूगोल आम्हाला शिकवत असतो, यातच भूगोलाचा हेतू व त्याची असाधारण सार्थकताही आहे " असे व्होल्त्स म्हणतो (२६२, ६३). ज्या जगात आपण राहातो त्या जगाचा अभ्यास गंभीर प्रकृतीच्या विचारवंतांनी करण्याच्या पात्रतेचा असतो, हे सिद्ध करत बसण्याची आवश्यकताच नाही. " भूगोलाने भूक्षेत्रांचा अभ्यास करण्याची जबाबदारी घेतलेली आहे ; कारण त्या विषयांसंबंधी सामान्यजनात जिज्ञासा असते " असे सांगून सॉर पुढे म्हणतो, " भूगोलात अनेक देशांची माहिती दिलेली असते हे प्रत्येक शाळकरी मुलालाही माहीत आहे ". ही वस्तुस्थितीच अशाप्रकारच्या एखाद्या व्याख्येचा भक्कमपणा सिद्ध करण्यास पुरेशी आहे. इतर कोणत्याही शास्त्राने क्षेत्रीय अभ्यासाचा असा अंगिकार केलेला

नाही. ' भूगोल ' या नावानेच, पण थोडी वेगळी, ज्ञानव्यवस्था प्रस्थापित करण्याचा प्रयत्न झाला, तरी त्यामुळे भूगोलाला क्षेत्रीय अभ्यासात वाटत असलेली गोडी नष्ट होण्याची शक्यता नाही. भूगोल हा शब्द चलनात येण्यापूर्वी कितीतरी आधीपासून हा विषय अस्तित्वात होता. भूवंटनविषयक अभिरुचीची व्यापकता व सातत्य आणि या क्षेत्रात भूगोलाने प्रस्थापित केलेला अग्रहक्क या प्रत्यक्षप्रमाणांच्या आधारावरच, या विषयाची एक सर्वसामान्य व्याख्या असणे आवश्यक आहे, असा दावा करण्यास हरकत नाही (२११, २१).

सार्वत्रिक बौद्धिक जिज्ञासेने दिलेल्या सनदेत भूगोलाला बहाल करण्यात आलेल्या अभ्यासविषयाचे स्वरूप अत्यंत गुंतागुंतीचे आहे, ही गोष्ट निर्विवाद आहे. मर्यादित वर्गातील घटनांचा स्वतंत्रपणे विचार करणाऱ्या आणि एकाच विशिष्ट विषयाला वाहून घेतलेल्या शास्त्रांच्या दृष्टिकोणातून पहाणाऱ्यांना, भूगोलाचा अभ्यासविषय, त्याचा आवाखा, त्याचे स्वरूप व त्यातील घटनांची विजातीयता या सर्वच बाबतीत गोंधळात टाकणारा आहे, असे वाटण्याची शक्यता आहे. ही समस्या टाळता येईल अशी सोय त्या सनदेत नाही. अशा या विषयाची स्वतंत्र आणि विशिष्ट पोट-विषयात विभागणी करण्याचा प्रयत्न केला, तर अनेकविध उपशास्त्रांना जन्म देण्याऐवजी तो स्वतःच नष्ट होण्याची भीती अधिक ! व्हिडाल म्हणतो त्याप्रमाणे मनुष्य कोणत्याही क्षेत्रातील परिस्थितीच्या समग्रतेतच पुरा रमतो. " प्रवासाचे व भूशोधनाचे युग सुरू झाले तेव्हापासून, स्थानीय भिन्नतेच्या साहचर्यामुळे घडणाऱ्या सामाजिक भिन्नतेचे दर्शनच माणसाचे लक्ष वेधून घेत आले आहे ". परिणामी, " भूगोलाच्या जन्मकाली त्याचे नामकरण करणाऱ्या बहुतांशी लेखकांच्या दृष्टीने ' देश ' (contree) ही संकल्पना त्यातील रहिवाशांपासून अविभाज्य होती. तेथील लोकांचा आहार आणि त्याच्या जीवनाचे भौतिक पैलू यांनी स्पष्ट होणारे त्या देशाचे विशिष्ट स्वरूप, त्यातील पर्वत, निर्जलप्रदेश, नद्या यासारख्या त्यांच्या परिसरामुळे स्पष्ट होणाऱ्या त्याच देशाच्या विशिष्ट स्वरूपापेक्षा कोणत्याही प्रकारे कमी महत्त्वाचे नसते " (१८४, ३).

' जगाचे वेगवेगळे भाग कशासारखे आहेत हे समजून घेणे ' या भूगोलाच्या कार्यासंबंधी आम्ही केलेल्या विधानाचे अगदी सामान्य स्वरूप पाहून, त्याच्या तितक्याच सामान्य स्वरूपाच्या उत्तरावर आम्ही संतुष्ट आहोत, असे अनुमान काढले जाता कामा नये. उलटपक्षी, अशा सामान्य प्रश्नांना परिपूर्ण, तपशीलवार, अचूक, भक्कम, स्पष्टीकरणात्मक आणि सुसंबद्ध उत्तरे मिळवून देण्याचा प्रयत्न सुरू झाला, की मुरब्बी अभ्यासकांच्या श्रेष्ठ गुणवत्तेवर चांगलाच ताण पडू लागतो.

जगाचा अभ्यास करण्याचे पुष्कळ आणि वेगवेगळे मार्ग आहेत, ही गोष्ट अगदी उघड आहे. व्यक्ती अथवा व्यक्तींचे गट या नात्याने माणसे पूर्णार्थाने कोणत्याही प्रकारे निःशेष पृथ्वी व्यापत नाहीत. प्रत्येकजण जगाच्या सापेक्षतः मर्यादित क्षेत्रात राहतो. म्हणूनच, क्षेत्रनिविष्ट अभ्यास करणे ही जगाच्या अभ्यासाची त्याची एक अत्यंत महत्त्वपूर्ण पद्धती आहे. थोडक्यात, जगाच्या निरनिराळ्या भागात परिस्थिती कशी बदलत जाते या संबंधीची

माणसाची जिज्ञासा तृप्त करण्याच्या हेतूने परिपूर्ण, अचूक आणि सुसंबद्ध ज्ञान पुरवण्याचा प्रयत्न भूगोल करत राहील, तरच भूगोल हा विषय कोणत्याही गोष्टीचा गंभीरपणे विचार करणाऱ्या बुद्धिमंतांचे लक्ष वेधून घेऊ शकेल. भूतकालात परिस्थिती कोणत्या प्रकारची होती या संबंधीची माणसाची जिज्ञासा पूर्ण करण्याचा अशाच प्रकारचा प्रयत्न इतिहास करत असतो. मनुष्य राहातो आणि घटना घडतात. या दोनही गोष्टी एका मर्यादित कालखंडातच एकत्र घडू शकतात, म्हणून इतिहास भूतकालाचा अभ्यास निरनिराळ्या कालखंडांच्या संदर्भात करत असतो. त्याचप्रमाणे, ज्यात अनेक गोष्टींचे निकट साहचर्य घडत असते, अशा मर्यादित क्षेत्रांद्वारेच जगाचा अभ्यास करणे भूगोलालाही बंधनकारक असते.

म्हणूनच, मानवाच्या शिक्षणातील भूगोलाच्या महत्त्वाबाबत कोणी शंका घेईल अशी शक्यता नाही. येथे केवळ शालेय शिक्षण येवढाच अर्थ गृहीत धरलेला नाही, तर मानवाने जगासंबंधीचे स्वतःचे अनुभव अधिकाधिक व्यापक करणे या पूर्णार्थाने शिक्षण हा शब्द येथे वापरला आहे. शिक्षण आणि अनुसंधानकार्य यांच्यातील संबंधांबाबत एक लक्षणीय पण सर्वसामान्य गैरसमज असलेला दिसतो. त्यानुसार, एखादा विषय शिकवण्याच्या दृष्टीने महत्त्वाचा असूनही परिपक्व अभ्यासकांनी त्यासंबंधी अनुसंधान करावे इतक्या पात्रतेचा तो असेलच असे नाही. शिक्षणकार्याला उपयुक्त अशा नव्या आराखड्यात जुन्या ज्ञानाची पुन्हा मांडणी करणे, हे अनुसंधानपातळीवरील कार्य नव्हे, तर ते केवळ शैक्षणिक स्वरूपाचे कार्य आहे. म्हणून ते ज्ञान परिपक्व अभ्यासकांनी लक्ष घालण्याच्या पात्रतेचे नसतेच असा याचा अर्थ करण्याची गरज नाही. पण, प्रादेशिक भूगोल याचा अर्थ जर भौगोलिक सामग्रीची केवळ प्रादेशिक विभागणी येवढाच होत असेल, तर अशा स्वरूपाचा एखादा अभ्यासक्रम कोणत्यातरी एका पातळीवर शिकविण्याच्या पात्रतेचा असेल का ? अशी शंका निर्माण होईल. कोणत्याही एका प्रदेशात एकत्रित असणाऱ्या घटनांचे अन्योन्यसंबंध व स्थानिय-संबंध यांची समुचित समज करून देणे, हे जर प्रादेशिक अभ्यासाचे साध्य असेल, तर असा सर्वांगीण प्रादेशिक अभ्यास ही केवळ संकल्पनात्मक समस्या राहणार नाही, तर त्यासंबंधी मुरब्बी पंडितांच्या प्रगल्भ बुद्धिमत्तेला आव्हान देणाऱ्या अनुसंधानकार्याची आवश्यकता दिसून लागेल. म्हणूनच कोणतेही निष्कर्ष दुसऱ्यांना शिकविण्याच्या पात्रतेचे आहेत हे एकदा मान्य केल्यावर, ती समस्या अनुसंधानपात्र आहे का हा प्रश्नच उद्भवत नाही, हे खरे असले तरी प्रगल्भ अभ्यासकांनी संशोधन करण्याच्या पात्रतेचे नसते तेवढेच विद्यार्थ्यांनी शिकावे, असा आग्रह धरणेही समर्थनीय ठरणार नाही. प्राथमिक असो की विश्वविद्यालयीन असो, कोणत्याही पातळीवर जे जे शिकविण्याचे आपण साहस करतो ते ते अनुसंधान पात्र असतेच. –ते सत्य आहे याची खात्री पटवून घेण्यासाठी मूलभूत अनुसंधान आणि त्याच्या सत्यतेची फेरतपासणी करण्यासाठी आवर्ती अनुसंधान आवश्यकच असते.

ज्याचे उत्तर उघड दिसते असा आणखी एक प्रश्न वारंवार विचारला जात असतो. भूप्रदेशांचे ज्ञान संपादन करण्यासाठी व अशा ज्ञानात भर पडावी म्हणून, फक्त भूगोलज्ञांचीच निवड करणे योग्य आहे काय ? येथे एक गोष्ट निश्चितपणे मान्य करावी लागेल, की इतिहासविषयक प्रशिक्षण न घेतलेले लोकही ज्याप्रमाणे इतिहासाचा अभ्यास करतात व त्याचे लेखनही करतात, तद्वतच प्रदेशविषयक ज्ञान स्वेच्छेने पण समर्थपणे पुरविणारे अनेक अभूगोलज्ञही आहेत. इ. स. १८०० च्या सुमारास उपलब्ध असलेल्या यू. एस. ए. च्या अटलांटिक किनारपट्टीबाबतच्या सर्व भौगोलिक सामग्रीच्या राल्फ ब्राऊन याने अलीकडेच केलेल्या अभ्यासाने असे दाखवून दिले आहे, की अशा प्रकारच्या माहितीसाठी जग फक्त व्यावसायिक भूगोलज्ञानावरच अवलंबून असते असे नाही. त्यांची उणीव भासेल तेव्हा, अथवा आपले प्रमुख कार्य करण्यास ते कुचराई करतील तेव्हा, कोणत्यातरी मिषाने, दुसरे लोक त्यांची उणीव भरून काढू शकतात. पण त्याबरोबरच, या अप्रशिक्षित पर्यटकांनी, निसर्गाभ्यासकांनी, शेतकी विद्यार्थ्यांनी, वाङ्मयीन लेखकांनी व राजकारणी पुरुषांनी गोळा केलेल्या सामग्रीची केवळ विश्वसनीयता तपासून पहाण्यासाठी केवढे परिश्रम करणे आवश्यक होऊन बसते, या गोष्टीचे उदाहरणही याच ग्रंथाच्या रूपाने पहावयास मिळते (३३४).

स्वतःच्या प्रारंभीच्या काळापासून भूगोलाला पर्यटकांच्या व वाङ्मयीन लेखकांच्या परिणामकारक वर्णनांवर अवलंबून रहाणे भाग पडले आहे. त्याबरोबरच प्रशिक्षित अभ्यासकांच्या शास्त्रशुद्ध संख्यात्मक मापने असलेल्या व तर्कदृष्ट्या सुसंबद्ध असलेल्या अभ्यासांचीही मदत तो घेत आला आहे. या विषयाच्या अभ्यासाने हे दोनही विभाग एकत्र आणले आहेत, आणि सरळ साध्या वर्णनांची जागा कार्यकारणसंबंध संबंध शोधून काढणाऱ्या अन्वयार्थदर्शक वर्णनांनी घेतली आहे. याही गोष्टीची दखल हेटनरने घेतलेली आहे (२,३६०).

तरीही, ललित (अथवा वाङ्मयीन) वर्णनकारांशी काही प्रकारचे साम्य असलेले थोडे अवघड काम प्रादेशिक भूगोलकाराला आजही अंगावर घ्यावेच लागते. कोणत्याही भूक्षेत्राचे संकलित वर्णन करणे, हेच ते कार्य होय. हे करत असताना त्या क्षेत्राची अनुभूती निर्माण करणाऱ्या त्या ललित लेखकांच्या श्रेष्ठ गुणांचा त्याला हेवा वाटू लागेल, हे निःसंशय. मला स्वतःला वॉशिंगटन् आयर्व्हिंगने 'आल्हाम्ब्रा' च्या प्रस्तावनेत निर्माण केलेल्या स्पॅनिश मेसेटाच्या अनुभूतीची बरोबरी करणारे दुसरे वर्णन कधीच आढळले नाही. पण भूगोलकाराने असे काम कलावंत आणि लेखक, किंवा कला आणि वाङ्मय क्षेत्रातील अभ्यासक, यांच्यावर सोपविण्यापूर्वी त्यांच्याशी चर्चा करुन त्यांना नेमून दिलेले कार्य ते अंगावर घेण्यास तयार आहेत याविषयी त्याने आधी खात्री करून घ्यावी यातच

त्याचे हित आहे. सर्वच ललित कलाकारांच्या (चित्रकार व ललितलेखक यांसह) मनांवरील त्या भूदृष्याचा वा प्रदेशाचा ठसा व्यक्तिनिष्ठ असतो. आणि तसाच तो इतरांच्यापुढे ठेवण्याचा त्यांचा प्रयत्न असतो. पण, भूगोलकार इतरांच्यापुढे ठेवण्याच्या प्रयत्नात असतो ते वर्णन वस्तुनिष्ठ असल्यामुळे, कलावंतांच्या वर्णनापेक्षा फारच वेगळे असते. केवळ वर्णनाचाच विचार करावयाचा झाला तर, भूगोलकाराची ही पद्धती छायाचित्रणाच्या स्वरूपाची असते, कारण त्यात निरीक्षकाच्या उघड वैयक्तिक प्रतिक्रिया किमान असतात (c/o ब्योर्नर २७४, ३४४ f ), आणि अशी ही मर्यादा कलावंत कधीच मान्य करु शकत नाहीत.[४९] आपला हेतू सिद्ध व्हावा म्हणून भूगोलकार वापरतात ती तंत्रे कलावंतांना अज्ञात असतात. नकाशांच्या साधनाने केलेल्या प्रतिपादनावर भूगोलकार बराच अवलंबून असण्याची शक्यता असते. शिवाय ज्या घटनांचे तो वर्णन करत असतो त्यांच्याच परस्पर संबंधाचे स्पष्टीकरण देऊन, वर्ण्यप्रदेशाच्या एकंदर स्वरूपाचे असे भरीव चित्र त्याने वाचकांपुढे ठेवावे की कोणाही अभूगोलकारास ते जमणारच नाही. कारण त्या प्रदेशाच्या स्वरूपात केवळ प्रथमदर्शनी दिसणाऱ्या गोष्टींचाच तेवढा समावेश होतो असे नाही, तर पाहिलेल्या गोष्टीच्या संबंधयोगांच्या एकूण जटिलाचा त्यात समावेश होत असतो (C/o श्लूटर १४८, १४६ ते ४८, हेटनर १३२, ५६३ ते ६८).

शेवटी एवढेच म्हणावेसे वाटते, की कलाभ्यासी लेखकांचे त्या प्रदेशाच्या स्वरूपाचे प्रतिपादन खूप परिणामकारक असू शकेलही, पण, अशा वर्णनांनी ज्ञानाची शास्त्रीय पातळी गाठावी, अशी अपेक्षा करणे शक्यच होणार नाही. वॉल्टर स्कॉट, अथवा फ्रान्सिस पार्कमन यांची वर्णने पद्धतितंत्रानुसार लिहिलेल्या ऐतिहासिक कथनांना मागे सारतील अशी कोणी अपेक्षाच करणार नाही. तसेच, फक्त प्रशिक्षित भूगोलकारच एखाद्या क्षेत्राचे वस्तुनिष्ठ संख्यात्मक मापने असलेले, शास्त्रशुद्धपद्धतीने अन्वयार्थ प्रतिपादक आणि विश्वसनीय असे प्रतिपादन करू शकतील. यासाठी वर्णनशैलीइतकेच नकाशे, आकृत्या आणि लिखित आधार यांच्या उपयोजनाचे उच्च कौशल्य असावे लागते. तरीही अशा कौशल्यपूर्ण प्रतिपादनांची वाण भौगोलिक साहित्यात मुळीच पडलेली नाही. हा प्रश्न रीतीचा (style) आहे ; आणि ज्ञान-प्रतिपादनाची रीती बदलली म्हणून त्या ज्ञानाचीच विज्ञानक्षेत्रातून उचलबांगडी झाली असे कधीच घडलेले नाही. पेंकने घेतलेल्या आग्रही

---

४९. ज्यांनी भूगोल, अथवा भूगोलाचा एखादा विभाग, ललित लेखनात गणले जावे असे मत मांडले आहे, त्यांनी कलावंत, कलाभ्यासक अथवा ज्ञानोपपत्तीचे अभ्यासक, यांचा याबाबत सल्ला घेतला असल्याचे कोठेच सूचित केलेले नाही. मी या मुद्यावर ज्या विशिष्ट व्यक्तींचा सल्ला घेतला आहे त्यांची यादी येथे देण्याची मलाही जरूर वाटत नाही. कोहेन व क्राप्ट या दोन तत्वज्ञांचे दोन अभ्यासलेख याबाबत उपलब्ध असलेल्या पुष्कळशा ग्रंथसामग्रीत विशेष उल्लेखनीय वाटतात. त्यात, ज्ञानाचे दोन प्रकार या नात्याने शास्त्र व कला यांमधील भेद अगदी स्पष्ट करून मांडले आहेत (११५, १६६, २० f).

भूमिकेनुसार भूगोलाला आपली वस्तुनिष्ठ भूमिका सतत टिकवावयाची असेल, तर वर्णनकाराने आपल्या भावना कोठेही व्यक्त करता कामा नये ; आणि तरीही, सर्व गोष्टी वस्तुनिष्ठपणे कशा समजून घेतल्या हे स्पष्ट केले पाहिजे (१६३, ५०)[५०].

## ब – तर्कनिष्ठ समर्थन

# अन्य शास्त्रांच्या संदर्भात भूगोलाचे स्थान

भूगोलाचा प्रदीर्घ इतिहास लक्षात घेता, भूगोल पूर्वीपासून जसा आहे, तसाच तो साररूपाने पुढेही राहील अशी अपेक्षा करण्यास हरकत दिसत नाही. पण, त्याला जर सृजनशील भविष्यकाळाची आकांक्षा बाळगावयाची असेल, तर तर्कनिष्ठ विश्लेषणाला तोंड देण्याचीही त्याने तयारी दाखविली पाहिजे. शास्त्रविभागांच्या कोणत्याही तर्कशुद्ध मांडणीत तर्कबुद्धीच्या सहाय्यानेच एक स्थान भूगोलाला नेमून दिले जाईल व त्यानुसार त्याच्या स्वरूपाच्या मर्यादा व स्पष्टीकरणे विशेषत्वाने अवलंबून राहातील. – ' सुसंघटित वस्तुनिष्ठ ज्ञान ' या शास्त्राच्या अति विस्तृतार्थानेच " शास्त्र " ही संज्ञा येथे अभिप्रेत आहे, असे आम्ही पुन्हा सांगू इच्छितो.

ज्यांनी ज्यांनी भूगोलक्षेत्र केवळ तर्कसिद्ध विचारांच्या आधारांनीच निश्चित करण्याचा प्रयत्न केला आहे, त्यापैकी फारच थोड्यांनी या मूलभूत गोष्टीकडे पुरेसे लक्ष दिले. असे असले तरी भूगोल कच्च्या पायावर उभा आहे असे म्हणता येणार नाही. भूगोलाच्या

---

५०. यंगहजबंडची भाषांतररूपाने जर्मनीत प्रसिद्ध झालेली मते (२३५) आणि, विशेषेकरून बान्झेची मते (२४६ ; ३३०), अगदी विरूद्ध सूर काढणारी आहेत. ती येवढ्या मोठ्या वादाला कारणीभूत झाली आहेत, की गेल्या दहा-वीस वर्षांतील कोणाही पद्धतितंत्रविषयक लेखकाने त्यावर टीका करण्याची संधी दवडलेली नाही. आम्ही प्रस्तुत प्रश्नाचा त्या तपशीलांविषयी विचार करत नसल्यामुळे, त्या संबंधीच्या प्रमुख संदर्भांची फक्त यादी देणेच उचित होईल. फ्रेड्रिक्सेन (२३०, २३३ ते २३७); क्रेबज् (२२४, ८२ ff); ग्राफ (१५६, ४० ते ४३, ९० ते ९३) ; हासिंगर (२५३); पेंक (१६३, ४९ f); ग्रान्यो (२५२, ५६); क्राफ्ट (१६६, २९ f); बेबल (२६६, २०५ ते ०७); ब्यूर्गर (११, १०४ ते १३); फो गेल (२७१, ७) ; आणि श्मिट् (१८०, ८१ ते ९४) ; हेट्नर (१५२, ५३ ते ५७, १६१, १५१ ते १५३ ; १६७, २७६ आणि विशेषेकरून २६५) ; ग्राडमान (२३६, १३२ f, १३९ ते ४२). तसेच, वरवर पहाता याच्याशी संबंध नसलेल्या पण याला अगदी समांतर असलेल्या दुसऱ्या एका वादाला लायलीने यू. एस. ए. मध्ये तोंड फोडले होते (२२०), आणि त्यावर प्लाटने आपले विचारही प्रकट केले होते (२२१, १३ f, ३३ ते ३६). तसेच विचार क्रावीने इंग्लंडमध्ये आणि अगदी परिपूर्णपणे फींचनेही प्रकट केले (२२३). मात्र पेंकने केलेल्या १९२८ मधील भविष्यवाणीला कोणता लिखित आधार होता हे मला माहीत नाही. तो म्हणतो, " मध्ययुगात भूगौलाचे कलाकौशल्य जोखण्याचा एकदाही प्रयत्न झाला नाही. तरीही, अमेरिकनांनी त्या विषयाला कला विषयांच्या रांगेत बसविले ". " Nicht einmal das Mittelalter hat seine Geographie zu den künsten gezhält. " Aber der Amerikaner stellt sie Zu den ' Arts ' " (१६३, ५०).

इतिहासकालीन आढाव्यात आम्ही नमूद केल्याप्रमाणे, तर्कसिद्ध विचारसरणीच्या सर्वश्रेष्ठ आचार्यांपैकी एकाचे तरी लक्ष आमच्या भूगोलक्षेत्राने कित्येक वर्षेपर्यंत वेधून घेतलेले होते. आपल्या प्राकृतिक भूगोलावरील व्याख्यानांच्या प्रस्तावनेत, इमान्युएल कांट याने शास्त्रीय ज्ञानाच्या विभागणीच्या आराखड्याचे प्रतिपादन केलेले आहे, आणि त्यातच भूगोलाचे स्थानही तर्कपद्धतीने स्पष्ट केलेले आहे. त्या ठिकाणी मांडलेला दृष्टिकोण भूगोलाच्या स्वरूपाची समज येण्यासाठी आणि आतापर्यंत निर्माण केले गेलेल्या एतद्विषयक सर्वच प्रश्नांना उत्तरे देण्यासाठी, अन्य लेखकांच्या दृष्टिने आणि प्रस्तुत लेखकाच्या दृष्टिनेही, अत्यंत समर्पक आहे. म्हणूनच कांटच्या त्या मूळ विधानातून काही भाग येथे विस्ताराने उद्धृत करणे औचित्यपूर्ण ठरेल (४०, I, ६४)[५१].*

" आमच्या ऐहिक ज्ञानाचे दोहोंपैकी कोणत्यातरी एकाप्रकारे वर्गीकरण होऊ शकेल : एक, संकल्पनानुरूप अथवा ते ज्यात प्रत्यक्ष प्राप्त झाले त्या स्थलकालानुरुप प्रतिबोधांचे संकल्पनानुसार वर्गीकरण हे तर्कसिद्ध वर्गीकरण आहे तर स्थलकालानुसार वर्गीकरण हे भौतिक वर्गीकरण आहे. पहिल्या प्रकारातून लिनौसने घालून दिला तसा निसर्गाचा एखादा क्रमबंध निर्माण होतो आणि दुसऱ्या प्रकारातून निसर्गाचे भौगोलिक वर्णन निर्माण होते.

उदाहरणार्थ, गुरे ही प्रथम चतुष्पाद प्राण्यांच्या वर्गात समाविष्ट करावयाची व नंतर ' दुभंगलेले खूर असलेले ' या त्याच वर्गाच्या एका गटात त्यांचा समावेश करावयाचा, असे मी म्हटले तर, हे वर्गीकरण मी माझ्या डोक्याने केलेले आहे, म्हणजेच ते तर्कसिद्ध वर्गीकरण आहे. निसर्गाचा क्रमबंध ही संपूर्ण वस्तुजातीची एकत्र नोंद आहे. त्यात प्रत्येक वस्तूला तिचा तिचा वर्ग नेमून दिलेला असतो मग ती वेगवेगळ्या आणि अतिदूर असलेल्या स्थळी असली तरी चालेल.

उलटपक्षी, भौतिक वर्णनानुसार, पृथ्वीवरील ज्या स्थळांत त्यांचा समावेश होत असेल त्यावरून त्या वस्तूंचा विचार केलेला असतो. जात्यनुरूप वर्गीकरणाच्या निसर्गक्रमबंधाच्या विरूद्ध निसर्गाच्या भौगोलिक वर्णनात, पृथ्वीवरील ज्या स्थळी त्या वस्तू प्रत्यक्ष आढळणाऱ्या असतात ती स्थळे दाखविलेली असतात. उदाहरणार्थ : पाल आणि सुसर हे मूलतः एकच प्रकारचे प्राणी आहेत ; सुसर म्हणजे फार मोठी पालच आहे. पण त्यांचे अस्तित्व भिन्न ठिकाणी असते, सुसर नाइलमध्ये असते तर पाल जमिनीवर. सर्वसाधारणपणे आपण येथे

---

५१. त्यातील तांत्रिक परिभाषेसंबंधीचे खालील विधानही उद्बोधक आहे " भूपृष्ठावरील एकाच स्थळाचे वर्णन म्हणजे ' स्थानिक भूगोल ' (Topography) एखाद्या प्रदेशाचे व त्यातील रूपविशेषांचे वर्णन म्हणजे ' क्षेत्रवर्णनी भूगोल ' (Chorography) आणि सर्व जगाचे वर्णन तो ' जगाचा भूगोल ' (Geography). ही संपूर्ण प्रस्तावनाच मोठी लक्षवेधी आहे. **

* पुरवणी टीपा क्रमांक २० पहा.

** ही परिभाषा मूळात टॉलेमीपासून चालत आलेली आहे (४३३).

निसर्गातील स्थलाचा (schauplatz) विचार करतो. म्हणजेच स्वतः पृथ्वीचा व त्या वस्तू ज्या प्रदेशात प्रत्यक्ष आढळतात त्या प्रदेशांचा विचार करतो. हा विचार आकार साधर्म्याचा विचार करणाऱ्या निसर्गक्रमबंधापेक्षा अगदी भिन्न आहे. . . . ".

" कालानुसार वर्णन म्हणजे इतिहास, तेच वर्णन स्थळानुसार केले म्हणजे भूगोल होतो ". . . . . एक कालाचा विचार करतो तर दुसरा स्थलाचा (Raum) येवढा एकच भेद इतिहास व भूगोल यांच्यात सांगता येतो. पहिल्यात, कालाच्या संदर्भात एका पाठोपाठ येणाऱ्या (nacheinander) घटनांचे निवेदन असते ; तर दुसऱ्यात स्थलपरत्वे एकमेका शेजारी येणाऱ्या (nebeneinander) घटनांचे निवेदन असते. इतिहास हे कथन आहे, भूगोल हे वर्णन आहे. . . .

" भूगोल व इतिहास हे दोनही मिळुन आपल्या प्रतिबोधांचा संपूर्ण परिघ व्यापून टाकतात. भूगोल अवकाशाचा विस्तार व्यापतो, तर इतिहास कालाचा विस्तार व्यापून टाकतो.

जवळ जवळ याच पद्धतीने अलेक्झांडर व्ही. हंबोल्टनेही शास्त्रांमधील भूगोलाच्या स्थानाचे वर्णन केले आहे. सन १७९३ इतक्या आधी, म्हणजे कांटची व्याख्याने प्रसिद्ध होण्यापूर्वी एक दशक आधी, वस्तूंच्या प्रकारानुसार [५१] निसर्गाचा अभ्यास करणाऱ्या शास्त्रांमधील भेद हंबोल्टने स्पष्ट केले आहेत. ते भेद असे : ' निसर्गातील सर्व घटनांचा कालभेदानुसार अभ्यास करणारी शास्त्रे ' (Nature geschichte) व वस्तूंचा त्यांच्या अवकाशस्थ अन्योन्य संबंधानुसार अभ्यास करणारी शास्त्रे [(Geognoise) किंवा कांटच्या अनुकरणाने नंतरच्या काळात यासाठी हंबोल्टने वर्णनात्मक खगोल-शास्त्राचा अंतर्भाव करणारे ते ' जगवर्णन ' (Weltbeschreilung) आणि ' भूवर्णन ' (Erdbeschreilung) अशा संज्ञा वापरल्या.]. यातील शेवटच्या दोन गटांत जसे अधिक साम्य होते तसे साम्य त्या दोहोंपैकी एकाचे दुसऱ्या कोणत्या क्रमबद्ध शास्त्राशी नव्हते, याचीही हंबोल्टने दखल घेतली होती. हंबोल्टच्या ग्रंथाचे परिशीलन करणाऱ्या कोणाही अभ्यासकाला त्याच्या सर्वच अभ्यासलेखांचा त्याच्या या योजनाबद्ध शास्त्रांच्या विभागणीशी सहसंबंध दाखविताना फारशी अडचण पडणार नाही. आणि आपल्या जीवनातील निरनिराळ्या प्रसंगी त्याचा त्याने पुनरुद्धार ही केला आहे, हेही येथे सांगावयास हरकत नाही. शेवटी, त्याच्या ' कॉसमॉस ' या ग्रंथाच्या पहिल्या खंडात या योजनेचा अगदी तपशीलवार उल्लेख आला आहे. (४२ ; ५२ ; ६० ; I; ४८ ते ७३ ; C/o ड्योरिंग २२, ४५ ते ५१) *

---

५२. निसर्गाचा इतिहास, अथवा भूगोल व खगोल यासारखी अवकाश-शास्त्रे यांच्याहून भिन्न असलेल्या निसर्गाच्या सर्वच क्रमबद्ध शास्त्रांचा उल्लेख करण्यासाठी, हंबोल्टने आपल्या १७९३ सालच्या विधानात ' प्राकृतिक वर्णनात्मक शास्त्रे ' (physiographia) अशी संज्ञा वापरली आहे. हा या शब्दाचा वापर त्याच्या अगदी पहिल्या उल्लेखांपैकी एक होता. (४२). पण स्वतःच्याच नंतरच्या लिखाणात त्याने तो टाकून दिल्यासारखे दिसते.

* पुरवणी टीपा क्रमांक २१ पहा.

तसेच आपण मागे पाहिल्याप्रमाणे *, रिटरनेही अगदी स्पष्टपणे भूगोलाच्या इतिहासाशी व क्रमबद्ध शास्त्रांशी असलेल्या संबंधांचे संकल्पन जवळ जवळ याच पद्धतीने केले आहे. मात्र, त्याने त्यांची तुलना हंबोल्ट अथवा कांट यांच्याइतक्या स्पष्ट शब्दांत मांडलेली दिसत नाही. या नंतरच्या भूगोलविषयक मतांच्या अस्थिरतेच्या कालखंडात —म्हणजेच, एकीकडे रिटरच्या परंपरेचा ओघ ऐतिहासिक अभ्यासाच्या दिशेने चालला होता तर पिशेलच्या परंपरेचा ओघ त्याच्या उलट दिशेने चालला होता त्या काळात ; —कांट व हंबोल्ट यांनी व्याख्याबद्ध केलेले भूगोलाचे तर्कसिद्ध स्थान दृष्टीआड गेले, आणि चालू शतकाच्या आरंभाच्या काळापर्यंत भूगोलाला पूर्वीची प्रतिष्ठा प्राप्त होऊ शकली नाही; तसेच इतर देशातून झालेल्या भूगोलाच्या प्रसारातही कांटच्या मतांना फार कमी महत्व दिले गेले. हंबोल्टचा प्रभाव कितीही महत्वाचा दिसत असला —कारण त्याच्या ग्रंथांची अनेक भाषांतून भाषांतरे झाली आहेत —तरी शास्त्रीय क्षेत्रातील भूगोलाच्या स्थानाबाबत त्याने मांडलेल्या मतांकडे दुर्लक्षच झाले.

गतशतकाच्या अंत्यपादात जर्मनीत झालेल्या पद्धतितंत्रविषयक चर्चांनी-विशेषेकरून रिक्टोफेन याच्या लायप्सिक येथील व्याख्यानाने —जर्मनीतील तरूण भूगोलकारांना आपल्या भूगोलक्षेत्रविषयक संकल्पनांच्या आधारभूत व तर्कसिद्ध तत्त्वासंबंधी विचार करण्याची प्रेरणा दिली. त्यातूनच निर्माण झालेल्या वादात जवळजवळ प्रत्येक प्रतिष्ठित जर्मन भूगोलकाराने भाग घेतला. हा भाग अनुसंधानात्मक प्रकाशनांच्या संदर्भात केलेल्या संक्षिप्त विधानांच्या स्वरुपात असो, किंवा अधिक स्वतंत्र पद्धतितंत्रविषयक लेखांच्या स्वरुपात असो ! पण, प्रत्येक भूगोलकाराने या क्षेत्रातील स्वतःच्या संकल्पनांचे केवळ वैयक्तिक स्वरुपाचे स्पष्टीकरण देण्याचा प्रयत्न केला हे जसे इंग्रज व अमेरिकी भूगोलकारांच्या बहुतांश पद्धतितंत्रविषयक व्याख्यानांचे विशेष लक्षण होते, तसे बहुतांश जर्मन अभ्यासकांच्या या प्रश्नावरील अभ्यासलेखांचे विशेष लक्षण म्हणजे ते लेख त्या लिहिल्या गेलेल्या प्रबंधाच्या अभ्यासपूर्ण विवेचनांवर आणि भूगोलविषयक विचारांनी केलेल्या इतिहासकालीन विकासांवर आधारलेले होते. हा विरोध जरी अंशतः अभ्यासकांच्या वृत्तिभेदांतून निर्माण झालेला असला, तरी अंशतः का होईना, भूतकालातील भूगोलविषयक विचार जर्मन भूगोलकारांना सहज उपलब्ध होत असत (कारण ते सहसा त्यांच्याच भाषेत लिहिलेले असत) या वस्तुस्थितितूनही तो विरोध निर्माण झालेला होता.

तरीही, शैक्षणिक क्षेत्रांतून आता सेवानिवृत्त होत असलेल्या —त्यातील पुष्कळसे सेवानिवृत्तीचे वय होण्यापूर्वीच्या— जर्मन भूगोलकारांच्या पिढीने घालून दिलेला विद्वत्तेचा दर्जा आता त्यांच्या नंतरच्या तरुण पिढीतील पुष्कळांना जुनाटपद्धतीचा वाटत असल्याचे अलीकडील साहित्यातून अनेकवार सूचित झालेले दिसून येते. कोणतेही कारण न दाखविता भूतकालीन संकल्पना नाकारण्याचा अधिकार आपल्याला असावा व त्याच्या जागी नव्या संकल्पना मांडण्याचे " स्वातंत्र्य " ही असावे, अशा स्वरूपाच्या मागण्या या नव्या अभ्यासकांनी केल्याचे ऐकिवात आहे. पूर्वीच्या लेखकांचे विचार कोणत्या स्वरूपाचे होते

*पृष्ठ क्र. ७७ पहा.

याविषयीचे अज्ञान अथवा गैरसमज यांवर त्या मागण्या आधारलेल्या असतात असेच तपासणीअंती सिद्ध होते. या बदलांवर अनेक भूगोलकारांनी टीका केलेली तरी दोनही गटांत याला अपवाद नाहीतच असे समजण्याचे कारण नाही. ब्रॉनने, हे लक्षात आणून दिलेच आहे. " सर्व भूतपूर्व कार्यावर सार्वभौमत्वाचा शिक्का मारण्याची " ज्यांना सवय होती असे काहीजण पहिल्या गटात होते, तर ज्यांनी विद्वत्तेची उच्च पातळी गाठली असल्याचे त्यांच्या पद्धतितंत्रविषयक चर्चांवरून स्पष्ट होते असे पुष्कळजण तरुण गटात होते, असेही दिसून येते. म्हणूनच, केवळ वाचकांच्या सोयीसाठी प्रत्येक अभ्यासकांबाबत काहीतरी पूर्व-निर्णय आम्ही सादर करणार नाही. उलट, काही निर्णय त्यांचे त्यांनाच घेता यावेत म्हणून त्यासाठी लागणारा विपुल पुरावा मात्र या ग्रंथाच्या पुढील प्रकरणांतून सादर केला जाईल.

आताच उल्लेख केलेल्या जर्मन भूगोलकारांच्या पद्धतितंत्रविषयक अभ्यासांबाबत कोणाचे काहीही मत असो, संबंधित प्रश्नांचा त्यांनी सखोलपणे व निःशेषपणे उहापोह केला आहे येवढेच निश्चित. अशा स्थितीत, कोणाही विचारवंत अभ्यासकाने त्यांच्या प्रयासांचे परीक्षणही न करता स्वतःचेच निर्णय जाहीर करण्याचे मनात आणावे हे आमच्या विचारशक्तिला पेलणारे नाही. आणि तसे परीक्षण करूनही ते लेखक चुकीच्या मार्गाने चालले होते असे त्या विचारवंतांना आढळून आले, तर त्यांच्या या निष्कर्षांचे त्यांनी स्पष्टीकरण करावे, अशी मागणी करण्याचा आमचा अधिकार आहे.

अलीकडच्या काळातील सर्व जर्मन भूगोलकारांपैकी –आणि तसेच पाहिले तर सर्वच कालखंडातील भूगोलकारांपैकी– कोणाही भूगोलकाराने या प्रश्नावर अल्फ्रेड हेटनर इतका प्रदिर्घ कालापर्यंत आणि इतका सातत्याने विचार केलेला नाही. वर्तमान जर्मन भूगोलज्ञांच्या विचारांतील एकसूत्रता मोठ्या प्रमाणावर सिद्ध करण्याच्या कामी त्याचे प्रभावी महत्त्व अगदी अलीकडे कसोटीला लावले गेले ; आणि तेही त्याच्या शिष्यसंप्रदायात नसलेल्या आल्ब्रेक्ट पेंक या विद्वानाकडून (९०). सुरुवातीपासून आपल्या जीवनाचे ध्येय म्हणून भूगोलक्षेत्राचा अंगिकार हेटनरने केलेला असल्याने, एका क्षेत्राकडून दुसऱ्या क्षेत्राकडे धाव घेणाऱ्या अन्य भूगोलकारांत (पेंक स्वतः अशांपैकीच एक होता) दिसून येणाऱ्या अनिश्चित आणि बदलत्या वृत्तीपासून हेटनर बचावलेला होता. (आमच्या प्रत्यक्ष माहितीवरून आम्हाला आणखी एक गोष्ट येथे सांगता येण्यासारखी आहे. हेटनरने (Doctor) ' पंडित ' ही पदवी जरी गेर्लांटच्या मार्गदर्शनाखाली मिळविली होती, तरी भूगोलक्षेत्राच्या त्याच्या संकल्पनेबाबत तो त्याला नेहमीच विरोध दाखवत आला होता. आपली स्वतःची भूगोल-क्षेत्रविषयक संकल्पना त्याने त्याचा पहिला गुरु किर्शोफ याचेकडून घेतलेली होती). पेंक पुढे असेही सांगतो की, हेटनर हा काही केवळ तात्त्विक चर्चा करणारा पद्धतितंत्रज्ञ नव्हता. हम्बोल्टच्या पावलावर पाऊल टाकून, त्याच्या कार्याची सुरूवात अँडीजमध्ये त्याने केलेल्या शास्त्रशुद्ध प्रायोगिक कार्याने झाली, आणि पुढील कार्य करण्यास त्याला असमर्थ

करण्याइतकी गंभीर शारीरिक जखम झालेली असूनही, त्याने भौगोलिक हेतूंशी असलेले आपले वैयक्तिक संबंध आपल्या पोलादी सामर्थ्याने पुढेही चालू ठेवले. हेटनरचे भूगोलविषयक विचार तेवढ्या एकाच क्षेत्राच्या मर्यादित अनुभवांवर आधारलेले नाहीत. त्याच्या नजरेपुढे संपूर्ण शास्त्रक्षेत्र असे. तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रातील एक टीकाकार या नात्याने ग्राफ म्हणतो, " अलीकडच्या काळातील भूगोलाच्या पद्धतीतंत्राचा विचार करणाऱ्यांपैकी हेटनर हा एकच असा होता, की ज्याने भूगोलाचा तत्त्वज्ञानाशी असलेला संबंध शोधून काढलेला होता (१५६, १०४). झोल्शने ज्यांची संभावना " अभिजात ग्रंथ " या शब्दांनी केली, त्या हेटनरलिखित प्रद्धतितंत्रविषयक प्रबंधांच्या प्रदीर्घ मालिकेतून तो भूगोलक्षेत्राची स्पष्ट आणि एकात्म संकल्पना प्रस्थापित करू शकला ; याचे कारण, त्याच्या चर्चांतून दिसून येणारा स्वच्छ युक्तिवाद, त्याच्या भाषेतील पारदर्शकता, आणि त्याच्या विचारपद्धतींतील एकसूत्रता, या गोष्टी होत (२३७, ५६).

जर्मनीच्या भूगोलक्षेत्रातील हेटनरच्या स्थानाची दखल अमेरिकी भूगोलकारांना नव्हती असे कोणत्याच कारणांनी म्हणता येणार नाही. आधुनिक जर्मनीतील भूगोलकारांच्या संकल्पनांचा अतिप्रभावी अन्वयार्थ, अमेरिके पुरता तरी, सॉरने लावून दिला. पण, तो त्याची (हेटनरची) स्तुती करण्यापलीकडे त्याच्याकडे लक्ष देत नाही.* हे दुर्दैवच म्हटले पाहिजे. हेटनरच्या मतांचा विचार करावयाचा झाल्यास, त्यांचा चुकीचा अन्वयार्थ येथे लावला गेला आहे असेच म्हणावे लागेल. सॉरने प्रतिपादिलेल्या इतर मतांचा विचार केल्यास, असे दिसून येईल की, हेटनरने, व त्याच्या बहुतांश सहकाऱ्यांनीही, ती मते त्याज्य मानलेली आहेत. या आमच्या विधानांचे सोदाहरण समर्थन पुढील काही प्रकरणात आम्हाला करावे लागणारच असल्यामुळे, येथे जर्मनीतील भूगोलकारांनी जे तद्विषयक लाक्षणिक मतप्रदर्शन केले आहे तेवढ्यांची दखल आपल्याला घ्यावयाची आहे. श्पोल्शने हेटनरची प्रशंसा पुढील शब्दांत केलेली आहे. " निःसंशयपणे, तो पद्धतीतंत्रज्ञांचा अग्रणी होता. तसाच सर्वसाधारणपणे जर्मनीच्या भूगोलशास्त्र कक्षेतील एक अतिमहत्वाचा अग्रेसर लेखक होता ". त्याच्या कार्याने " जर्मनीतील भूगोलशास्त्राला अधिक पक्क्या पायावर उभे केले आणि त्याला लोकमान्यताही मिळवून दिली. हाच त्याच्या कार्याचा चिरकालीक लाभ आहे " (३०१, परीक्षण). अशाच प्रकारची मते पेकने मांडली असून, त्याचा उल्लेख वर केलेला आहेच. (तसेच पहा : १६३, ५०). शिवाय फिलिप्सन् (१४०, १४) आणि टिस्सन (१६०, १), यांची ही अशीच मते आहेत. क्रेबूज, तर उघडपणे असेही विधान करतो की, हेटनरच्या निबंधाचा सुद्धा परामर्श घेतला गेला पाहिजे ; पद्धतितंत्रविषयक प्रश्नांच्या चर्चांतून त्यांच्यावर विचारविमर्ष करण्याची टाळाटाळ ही आत्मघातकी ठरेल ! (२५५, २३७).

---

* हे वाक्य पुढीलप्रमाणे वाचावे : 'स्तुती करण्यापलीकडे हेटनरच्या लिखाणाकडे त्याने विशेष लक्ष दिले नाही '.

जे आपल्या पद्धतीतंत्रविषयक चर्चालेखांसाठी हेटनरच्या लिखाणाचा आधार घेतात, अशा जर्मन भूगोलकारांची संख्या इतकी मोठी आहे, की त्यांची यादीही करता येणार नाही. तर त्याच्या शिष्यपरंपरेबाहेरील काही विद्वानांचा उल्लेख येथे करण्यास हरकत दिसत नाही :–ग्राडमान (२३६, १३७), हासिंजर (१४१, ४), फोल्त्स (१५१, २४१), बान्झे (१३३, ७२ ; २४६, ४३) आणि मौल* (१५७, ४४-४९). अलिकडच्या काही वर्षांतील अभ्यासक जुन्या गटातील भूगोलकारांच्या जागतिक दृष्टिकोनावर (Weltanshanung) आक्षेप घेतात, पण त्यांच्या टीकेचा खरा रोख हेटनरवर असतो, ही घटना अर्थपूर्ण आहे.[५१] हेटनर स्वतःचे समर्थन करण्यासाठी पुढे येण्यास तर कचरला नाहीच, उलट अत्यंत औचित्यपूर्ण अशा वस्तुनिष्ठ पद्धतीने तो म्हणतो की, " पद्धतितंत्राच्या रचनाकार्यातील माझ्या प्रयत्नांचे महत्त्व अतिशयोक्तीने सांगितले गेले आहे. तसेच माझी ही संकल्पना ' पूर्णपणे वेगळी ' आहे असे मी स्वतःच मानतो. मात्र जे विकासावस्थेत उपस्थित होते तेच तत्त्व मी स्पष्ट शब्दांत मांडले आहे आणि पद्धतितंत्राच्या आधारे प्रस्थापित केले आहे, अशी माझी खात्री आहे. दुसऱ्या एका टीकाकारावर त्याने केलेली उपहासगर्भ टिप्पणी लक्षात घेण्यासारखी आहे, " एकदा तर त्या बिचाऱ्याने भूगोलाच्या हेटनरीकरणाच्या संदर्भात अगदी रसभरित उद्‌गार काढले आहेत. " (Spricht er doch sogar einmal geschmackvoll von einer Hettner-isierung der Geographie) (१७५, ३८२, ३४१).

*त्याबरोबरच फिलिप्सन (४१७).

५१. जर्मनीतील भूगोलकारांच्या वर्तमान पिढीच्या प्रमुख व्यक्तींना असे आढळून आले, की यापूर्वीच ' इतिहासजमा झालेल्या युगाचे प्रतिनिधित्व हेटनर करत असतो. व हेटनरची शास्त्रविषयक मते एकोणिसाव्या शतकातील " क्रियाशिल उदारमतवाद " (Positivistic Liberation) या तत्त्वावर आधारलेली आहेत '. या नव्या भूगोलकारांची अशी श्रद्धा आहे की, भूगोल हा आता एका निराळ्याच कालखंडात प्रवेश करत आहे. यापुढे भूगोलात मूल्यात्मक संकल्पनांवर आणि समाजांच्या व व्यक्तींच्या सृजनशील प्रभावांवर अधीक भर दिला जाईल. तसेच त्यात ' समानस्थलपरत्वे ' (Gleichortliche) याचा अर्थ विविध भागांचा मेळ व त्यांच्यांमधील कार्यकारी समाकर्षण असा न करता, साकल य सिद्धान्तानुसार (Gestalt Theory) ' समग्रक्षेत्रपरत्वे ' असा केला जाईल. तसेच राजकीय भूगोल ( अथवा राष्ट्रीय भूगोल National Erdkunde) याचा अर्थ जर्मन नजरेने व जर्मन दृष्टिकोणातून पाहिलेला संपूर्ण भूगोल अथवा ' जर्मनी व जग ' असा लावला जाईल. (श्रेफर १७४, ६९ ते ७१, ८५) अशाप्रकारची मते बऱ्याच स्फोटक शब्दांत श्पेटमानने आणि थोड्या नम्र भाषेत, तरी तितक्याच निःसंदिग्धपणे मूरिस व श्रेफर यांनी मांडली आहेत. अलीकडेच भरलेल्या एका भूगोलकारांच्या सभेत जुन्या आणि नव्या पठडीतील परस्पर विरोधी मतांच्या प्रासंगिक प्रदर्शनाचे अभिनंदन श्रोतृवृंदातील वेगवेगळ्या घटकांकडून करण्यात आले. ' जागतिक दृष्टिकोन (Weltanschauung) हे नवोदित तत्त्वज्ञान फक्त जर्मनीतील भूगोलकारांच्या पुरतेच मर्यादित असल्यामुळे, प्रस्तुत अभ्यास ग्रंथात त्या तत्त्वज्ञानाचे परीक्षण करण्याची गरज नाही, असे लेखकास वाटते.

जर्मनी बाहेर, हेटनराचा प्रभाव त्याच्या १९०५ च्या पहिल्या प्रबंधामुळे चिझोल्मवर पडलेला दिसतो (१९३) आणि अगदी अलिकडेच डिकिन्सन आणि होवार्थ यांनीही त्याच्या त्या महत्त्वाला मान्यता दिली आहे. स्थानिक स्वरूपात प्रादेशिक वर्णन करण्याची पद्धती व्हिडाल-द-ल-ब्लाक याने प्रस्थापित केली, तर जग हा पाया धरून रचलेली प्रमुख स्वाभाविक प्रदेशांची संकल्पना हर्बर्टसनने प्रस्थापित केली, हे खरे असले, तरी या दोहोंचा संबंध घालून देण्याचे व त्यांच्या वर्णनांच्या पद्धतींचे तपशीलवार विश्लेषण करण्याचे श्रेय जर्मनीतील भूगोलकारांच्या नव्या पठडीलाच दिले पाहिजे आणि या नव्या पठडीचे नेतृत्व त्यांचा मुरब्बी अग्रणी हेटनर याने केले आहे " (१०, २५१ : तसेच पहा १०१). जपानमध्येही इनोयू आणि अन्य भूगोलकारांनी भूगोलविषय पद्धतितंत्राबाबत हेटनरने केलेल्या कार्याचे प्रभावी महत्त्व ओळखले आहे (११०). वरवर पहाता तरी असे दिसते की, भूगोल या विषयाच्या स्वरूपाची चर्चा करत असता हेटनरच्या कार्याचा विचार करण्याची फारशी आवश्यकता नाही, असे फक्त फ्रान्स व यू. एस्. ए. या दोन देशांतच मानले जाते.

इतर अनेक अभ्यासकांच्या आणि हेटनरच्या कार्यात वेगळेपणा असा की, हेटनरचे पद्धतितंत्रविषयक लिखाण त्याने केलेल्या प्रत्यक्ष भौगोलिक कार्याशी निगडीत होते. वर उल्लेख केल्याप्रमाणे, पद्धतितंत्रविषयक प्रश्नांची चर्चा करण्यापूर्वीच, त्याने दक्षिण अमेरिकेत प्रादेशिक स्वरूपाचा प्रायोगिक अभ्यास केलेला होता. तसेच आपल्या सामान्य भूगोलाची म्हणजेच क्रमबद्ध भूगोलाची, रूपरेषा आखलेली होती, ती अभ्यासिकेत बसून नव्हे तर टिटिकाका सरोवराच्या तीरावर बसून ! या विषयावर नंतर लिहिलेल्या अनेक पद्धतितंत्रविषयक निबंधांतून चाळीस वर्षेपर्यंत चर्चा केल्यावर शेवटी, या अभ्यासकाने प्रत्यक्ष आकार " तौलनिक भूगोल " (Vergleichende Länderkunde) या नावाच्या त्याच्या ग्रंथाच्या रूपाने घेतला. (१६३). याच्याही कितीतरी आधी, त्याच्या प्रादेशिक भूगोलविषयक संकल्पना केवळ तात्त्विक स्वरूपात नव्हे तर ' प्रादेशिक भूगोल ' (Länderkunde ) या आपल्या दोन खंडांच्या ग्रंथात प्रतिपादिलेली होती. अगदी अलीकडेच प्रसिद्ध झालेल्या सदर ग्रंथाच्या आवृत्तीचे परीक्षण करताना इच्योलूशने म्हटले आहे की, या ग्रंथात " त्याने आधीच विकसित केलेल्या तत्त्वांचे उपयोजन केले आणि अशा रीतीने उदाहरणांनी त्याची कसोटीही घेतली ". खरे पहाता, त्याने मांडलेल्या अनेक औपपत्तिक प्रश्नांची बीजे त्याच्या ' प्रादेशिक भूगोल ' या ग्रथांत सापडतात (३०१ परीक्षण).

येथे आपण हेटनरच्या पद्धतितंत्रविषयक अभ्यासांचाच विचार करत आहोत, कारण हेटनरचे ते ग्रंथ प्रस्तुत अभ्यासाच्या पुढील सर्वच प्रकरणांतील चर्चेचे प्रमुख आधार आहेत. या ग्रंथांच्या प्रकाशनांपूर्वी, म्हणजे १८९५ साली, त्यानेच स्थापन केलेल्या " भूगोलविषयक नियतकालिका " ची (Geographische Zeitschrift) ओळख त्याने भूगोलक्षेत्राच्या अनौपचारिक विधानाने करून दिलेली होती (१२१). १८९८ साली भूगोलाच्या विकासाचा एक संक्षिप्त आढावा (२) त्याने प्रसिद्ध केला. त्यामुळे १८७३ साली

सुरू झालेल्या त्याच्या पद्धतितंत्रविषयक निबंधमालेला एक ऐतिहासिक प्रस्तावना मिळाली. त्याच्या चाळीस वर्षांच्या संपादीय कारकीर्दीत ही मालिका अधूनमधून प्रसिद्ध होत असे. या संबंधीचा त्याचा मूलग्रंथ म्हणजे १९०५ साली त्याने प्रकाशित केलेला " भूगोलाचे स्वरूप व त्याच्या पद्धती " (Das Wesen unt Methoden der Geographie)* हा ग्रंथ (१२६). या ग्रंथाचा बराचसा भाग काळजीपूर्वक अभ्यासला तर त्याचा पुरेपूर फायदा आजही पदरात पडल्याशिवाय राहाणार नाही. १९२७ पूर्वी प्रसिद्ध झालेले त्याचे बहुतेक निबंध पुनःसंस्करणानंतर एकत्र संपादित करण्यात आले. त्या खंडाचे नाव आहे " भूगोल– त्याचा इतिहास, त्याचे स्वरूप व त्याच्या पद्धती " [(Die Geographie ihre Geschiehte, ihr Wesen unt ihre Methoden(१६१)]. या ग्रंथाचे वर्णन हेटनरने स्वतःच ' आपले प्रमुख जीवित कार्य ' या शब्दांत केलेले आहे. ' भूगोलविषयक नियतकालिकातील ' आपल्या लेखात या ग्रंथाचा उल्लेख करून इनोयू लिहितो की, "भूगोलविषयक पद्धतितंत्रशास्त्राच्या इतिहासातील सर्वात मौल्यवान ग्रंथ होता ". कदाचित्, जपानी लोकांनी ही औपचारिक सभ्यता होती असे मानले, तरी अगदी उघड असलेली गोष्टच तो बोलून दाखवत होता (११०, २८८). हेटनरच्या या ग्रंथाचे, नंतरच्या त्याच्या चर्चा लेखांच्या पुरवणीसह इंग्रजी भाषांतर कोणी प्रसिद्ध केले, तर ते इंग्रजी बोलणाऱ्या देशांतील भूगोलशास्त्राला उपकारकच ठरणार आहे. आजपर्यंत इंग्रजी भाषेत उपलब्ध असलेल्या कोणत्याही वर्णनापेक्षा हेटनरच्या भूगोलविषयक तत्त्वज्ञानाचे अधिक वास्तव चित्र प्रस्तुत ग्रंथातील प्रदीर्घ उताऱ्यांतून निर्माण होईल, अशी आशा आहे. त्यातून कोणाला हेटनरशीच वाद घालावयाचा असेल, तर अशा अभ्यासकांनी हेटनरच्या " भूगोल " (Die Geography) या ग्रंथात त्याने विषयाची केलेली सांगोपांग चर्चा आणि नंतरच्या काळात त्यानेच केलेली विधाने यांचा प्रथम काळजीपूर्वक अभ्यास करावा. कारण, मूलभूत म्हणून मानल्या गेलेल्या अनेक कल्पनांवर त्या लिखाणांतून आधीच चर्चा झालेली आहे, असे प्रस्तुत लेखकाच्या अनेकदा लक्षात आलेले आहे.[५४]

कांट व हंबोल्ट या दोघांनीही आधी केले होते त्या प्रमाणेच, हेटनरनेही विविध शास्त्रातील भूगोलाचे स्थान विचारात घेऊन शास्त्राच्या कोणत्या विशिष्ट शाखांच्या चिकित्सेपासून प्रारंभ न करता, वस्तुनिष्ट ज्ञानाच्या एकूण क्षेत्राचा परामर्श घेऊनच या विषयाला हात घातला आहे

*पुरवणी टीपा क्रमांक २२ पहा.

५४. सुदैवाने जर्मनेतर अभ्यासकांच्या दृष्टिने हेटनरची लेखनरीती असाधारणपणे सोपी असूनही या लिखाणाचे भाषांतर मात्र तसे असत नाही, याचा मला खेद वाटतो. म्हणून, येवढ्या बाबतीत तरी ते भाषांतर शब्दशः करण्याची आवश्यकता आहे. त्याने १९०५ साली लिहिलेली व आपण स्वतः स्वीकारलेल्या भूमिकेची तीन पाने संक्षिप्त रूपरेषा कित्येक अभ्यासकांना निःसंशयपणे स्वागतार्ह वाटेल. (१२६, ६०३ ff). तसेच, " तौलनिक प्रादेशिक भूगोल " Vergleischender lander kunde) या ग्रंथाच्या प्रस्तावनेत त्याने लिहिलेले संक्षिप्त विधानही उपयुक्त ठरेल. (३६३, I,१ ते ७).

(१११). त्याच्या त्या ख्यातनाम पूर्वाचार्यांनी केलेले विभाग आणि हेटनरने पाडलेले शास्त्रीय क्षेत्राचे प्रमुख भाग, हे मुळात समानच आहेत. त्याने आपले हे विश्लेषण जाहीर करेतोपर्यंत त्याला कांटच्या विश्लेषणाची माहिती झालेली नव्हती. ते जाहीर झाले तेव्हा आणि त्यानंतरही त्याच्या मतांचे हंबोल्टच्या मतांशी असलेले निकट साम्य त्याच्या लक्षात आलेले नव्हते (१२६, ५५१). अशी एक शक्यता आहे की, प्रत्येकजण स्वतंत्रपणे एका मुलतः समान संकल्पनेशी येऊन पोहोचलेला असेल; आणि तसे असलेच तर एखाद्याचा त्या संकल्पनेच्या सामर्थ्याबद्दलचा विश्वास वाढणार आहे. काही असो, हेटनरने ही संकल्पना अधिक पूर्णत्वाने विकसित केलेली आहे, येवढे खरें* प्रस्तुत ग्रंथातील यापुढील बहुतांश चर्चा विज्ञानाच्या अन्य शाखांबरोबर केलेल्या भूगोलाच्या तुलनेवरच आधारलेली असल्यामुळे, हेटनरचे विधान येथेच विस्ताराने मांडले तर ते उपकारकच ठरणार आहे. (हे अगदी अलीकडच्या आणि पूर्णांशाने सादर केलेल्या त्याच्या १९२७ सालच्या विधानावरून उद्धृत केलेले आहे. १६१, ११४ ते १७, १२३ f)**

" वस्तुस्थिती ही एकाचक्षणी त्रिमितीय अवकाश व्यापून रहाणारी आहे. म्हणूनच, तिचा साकल्याने बोध होण्यासाठी आपल्याला तिचे तीन वेगवेगळे दृष्टिकोणातून तिचे परीक्षण करणे प्राप्त आहे. यापैकी कोणत्याही एका दृष्टिकोणातून केलेला विचार एकांगी असल्याने त्यात त्या वस्तुस्थितीचे सर्वांगीण दर्शन सामावू शकणार नाही. यापैकी एका दृष्टिकोणातून पाहिल्यावर आपल्या वस्तूवस्तूंतील संबंध साम्यपरत्वे दिसू लागतात, दुसऱ्यातून पाहिल्यास कालपरत्वे होत गेलेला विकास दृष्टीला पडतो, तर तिसऱ्यातून पाहताना स्थलपरत्वे झालेली विभागणी व मांडणी दृष्टीस भरते. कोणतीच समग्र वस्तुस्थिती क्रमबद्ध शास्त्रांच्या परिघात संपूर्णपणे सामावू शकणार नाही; कारण, क्रमबद्ध शास्त्रे अभ्यास वस्तूंनीच आकारलेली असतात. आणि पुष्कळशा अभ्यासकांचे मत हेच आहे. अन्य काही लेखकांनी ऐतिहासिक शास्त्रांचे समर्थन कालक्रमानुसार होणाऱ्या विकासाच्या स्वतंत्र संकल्पनेवर परिणामकारक रीतीने आधारलेले आहे. इतके करूनही शास्त्र द्विमितीयच रहाते. तिसऱ्या एका दृष्टिकोणातून त्याचा विचार केल्याशिवाय वस्तुस्थितीचा बोध पूर्णत्वाने होणे अशक्य आहे. म्हणजेच, वस्तुस्थितीची अवकाशातील विभागणी व मांडणी होणे आवश्यक असते."

" क्रमबद्ध शास्त्रे कालानुरुप अथवा स्थलानुरुप संबंधयोगांकडे दुर्लक्ष करतात, आणि त्या त्या विषयांतील वस्तुनिष्ठ समानता अथवा सरुपता यातच एकात्मता शोधतात, कारण त्यांचे विचार त्या वस्तू पुरतेच मर्यादित असतात. निसर्गविषयक आणि समाजविषयक शास्त्रांमधील सामान्यभेद हा अशा प्रकारचा क्रमबंधात्मक भेद आहे. निसर्गविषयक शास्त्रांच्या क्षेत्रात आपल्याला खनिजे व खडक या विषयींची शास्त्रे म्हणजेच खनिजशास्त्र

* पुरवणी टीपा क्रमांक २३ पहा.

** पुरवणी टीपा क्रमांक २४ पहा.

आणि अश्मशास्त्र, तसेच वनस्पतींचे शास्त्र म्हणून वनस्पतिशास्त्र, प्राण्यांचे शास्त्र म्हणून प्राणिशास्त्र, आणि यांच्याच बरोबरीने, विशेषकारणपरत्त्वे उपयुक्त-स्वतंत्रशास्त्र म्हणून विकसित झालेले व अवशेषरूप वनस्पती व दगड यांच्या अभ्यासातून निर्माण झालेले पुराणावशेषशास्त्र (Paleon tology), ही शास्त्रे असलेली आढळतात. वस्तू या स्वरूपात पृथ्वीचा अभ्यास आणि तिच्या घटनाचक्रांचा अभ्यास यासाठी भिन्न भिन्न विज्ञाने पुढे आली ही बरीच अलीकडची घटना आहे.[५५] क्रमबद्ध सामाजिक शास्त्रे म्हणजे भाषाविषयक, धर्मविषयक, राज्यविषयक (म्हणजेच राजकारणविषयक), अर्थविषयक इत्यादि शास्त्रे होत."

"ऐतिहासिक शास्त्रांच्या दृष्टीने भौतिक संबंध या केवळ प्रासंगिक महत्त्वाच्या गोष्टी आहेत. इतिहासकार आपल्या अभ्यासासाठी अगदी भिन्नप्रकारांच्या क्रमबंधात्मक वस्तू वा प्रसंग एकत्रित करून, कालस्त्रोतातील त्या प्रसंगांच्या कालिक श्रेणींच्या दृष्टीकोणातून त्यांची एकात्मता सिद्ध करतात. या घटना केवळ योगायोगाने एकामागूनएक घडत गेल्या असत्या आणि त्या घटनांचे विविध गट परस्पर असंबद्ध असते, तर शास्त्राला क्रमबद्ध अभ्यासांवरच समाधान मानणे शक्य झाले असते. पण ज्या घटनेचे आपण 'विकास' या शब्दाने वर्णन करतो त्यांचे विविध कालखंडांतील परस्पर-संबंध व एकाच कालखंडातील त्यांचे विविध संबंध यांतून एका स्वतंत्र ऐतिहासिक अभ्यासांची गरज निर्माण होते. पण, एकाच प्रकारच्या घटना-विकासाचे अभ्यास तेवढ्याच एका प्रकारासाठी वर दिलेले दोनही दृष्टिकोण विचारात घेतात. जसे :-प्राणिजगाचा अभ्यास, कलेचा वाङ्मयाचा अथवा राज्यघटनांचा इतिहास. हे सर्व अभ्यास क्रमबद्ध शास्त्रे व इतिहासनिष्ठ शास्त्रे या दोहोंच्या मधल्या स्थानावर असतात.

"'कालांतरांतून विकास' हे तत्त्व जर स्वतंत्र अभ्यासक्षेत्र म्हणून समर्थनीय ठरते, तर 'अवकाशांतरांतून वस्तूंची मांडणी' हे तत्त्वही त्याच अधिकाराने एका स्वतंत्र अभ्यासक्षेत्राची मागणी करू शकते. भौतिक अथवा क्रमबद्ध शास्त्रे आणि कालक्रमाधिष्ठित अथवा ऐतिहासिक अथवा कालनिष्ठ शास्त्रे अशा शास्त्रांच्या बरोबरीनेच भौगोलिक विस्तारनिष्ठ अथवा अवकाशनिष्ठ शास्त्रांचाही विकास होत गेला पाहिजे."

"मात्र अशाप्रकारची दोन वेगळी शास्त्रे असणे जरूर आहे. एकाचा विषय वस्तूंची विश्वातील मांडणी असा असेल-तेच खगोलशास्त्र-तर दुसऱ्याचा विषय पृथ्वीवर केलेली अवकाशांतरित मांडणी असा असेल ; किंवा भूगर्भाची माहिती आपल्याला नसल्यामुळे, भूपृष्ठावरील स्थलनिष्ठ मांडणी हाच त्याचा विषय असेल असेही आपण म्हणू शकू."

---

५५. येथून पुढे, हेटनर पृथ्वी या समग्र वस्तूच्या अभ्यासाचा विचार करतो, आणि ज्ञानाची एक शाखा म्हणून, 'पृथ्वीचे शास्त्र' तर्कदृष्ट्या विकसित होणे तर्कदृष्ट्या शक्य नाही असेच अनुमान तो काढतो. प्रकरण ३, विभाग 'ब' पहा. अनेक पाने पसरलेला तो भाग आम्ही या अवतरणातून गाळला आहे.

तर्कदृष्ट्या निकट असणारा हा खगोलशास्त्र व भूगोलशास्त्र यातील संबंध प्रथमदर्शनी गोंधळ निर्माण करणारा आहे. पण हंबोल्टच्या विश्वकल्पनेचे ते खास लक्षण होते. गोंधळ होण्याचे एक कारण असे की, खगोलशास्त्र हे यंत्रशास्त्राचे उपयोजनक्षेत्र आहे अशी त्याची चुकीची व्याख्या केली जाते. उलटपक्षी, खगोलक या मूर्त वस्तू आहेत असे समजून केलेला त्यांचा अभ्यास, अशीही व्याख्या केली जाते. खरे पहाता, खगोलांच्या आकाशस्थ मांडणीला व त्यांच्यातील परस्पर संबंधांना यंत्र शास्त्राचे नियम लावणे व आकाशाच्या कोनाकोपऱ्यांचा शोध घेणे, अशा दोन मार्गांनी ग्रहांचा आणि मोठ्या संख्येने ताऱ्यांचा शोध लावणे, हे खगोलशास्त्राचे प्रमुख कार्य होऊन राहिले आहे. त्यापैकी कोणत्याही एका खगोलाची चिकित्सा हा या ज्ञानक्षेत्राचा एक आणि केवळ एक भाग आहे.

भूगोलशास्त्र व खगोलशास्त्र यांच्या तुलनेकडे आपण नंतरच्या एका भागात (प्रकरण ११ वे विभाग 'फ' पहा) वळणारच आहोत. हेटनरने त्यांची तुलना तपशीलवार केली असून, तथाकथित खगोलीय किंवा गणिती, भूगोलाचा बराचसा भाग, वास्तविक पहाता, खगोलशास्त्राचा भाग असतो याची त्याने विशेष दखल घेतली आहे (१११, २७४ f). तसेच या दोन क्षेत्रांमधील तर्कसिद्ध साम्याची दखल डब्लू. एम्.डेविस (१०४, २१३ f) आणि बालाख् (१८६, ६६ ते ६८) या दोघांनीही घेतलेली आहे. पण त्या दोन क्षेत्रांतील एका महत्त्वाच्या फरकाची दखल आपल्याला येथे घेणे जरूर आहे. विश्वावकाशात अगदी स्वतंत्र आणि सुस्पष्टपणे आकारबद्ध वस्तू आहेत; आणि क्रमबद्ध अभ्यासासाठी त्या एकक वस्तू म्हणून निःसंदिग्धपणे मान्य होणेही शक्य आहे. पण, अभ्यासासाठी सहजपणे दिलेल्या वस्तू म्हणून ज्यांचा स्वीकार करणे शक्य होईल अशा भूपृष्ठाने मर्यादित अवकाशात सामावलेल्या वस्तूंची स्वतंत्र भागांत विभागणीच होऊ शकत नाही. इतकेच काय, रिक्त अवकाशाने विभक्त असलेल्या खगोलांच्या विभागणीशी समुद्रामुळे होणाऱ्या भूखंडाच्या दृश्य विभागणीची संगती पूर्णार्थाने लागतच नाही.

म्हणजेच, भूगोल हे अवकाशवंटनाचे दुसरे शास्त्र आहे आणि त्यात भूपृष्ठावर असलेल्या स्थलनिष्ठ मांडणीचा अभ्यास होत असतो. पृथ्वीवरील वेगवेगळ्या स्थळांत जर कोणतेच कार्यकारणसंबंध नसते आणि पृथ्वीवरील त्याच एका क्षेत्रातील विविध घटना परस्परावलंबी नसत्या, तरच स्थल वितरणाची संकल्पना अनावश्यक ठरली असती. पण प्रत्यक्षात, असे संबंधयोग अस्तित्वात आहेत. क्रमबद्ध व ऐतिहासिक शास्त्राद्वारे काही संबंधाचे प्रासंगिक आकलन होऊ शकते, तर काहींचे आकलन मुळीच होऊ शकत नाही. म्हणूनच ' भू ' संबंधी अथवा भूपृष्ठासंबंधी एका स्वतंत्र वंटनशास्त्राची जरूरी आहे.

" काळ अथवा स्थळ यांना प्रमुख स्थान दिले जावे आणि ते शास्त्रीय अभ्यासांसाठी एकात्मतेचे सूत्र मानले जावे, असे ऐतिहासिक भौगोलिक दृष्टिकोणांना आवर्जून सांगावयाचे असते. इतिहास ज्याप्रमाणे वेगवेगळ्या कालखंडांच्या स्वरूपांचा अभ्यास करतो, त्याप्रमाणे भूगोल वेगवेगळ्या क्षेत्रांच्या वा स्थळांच्या स्वरूपांचा अभ्यास करत असतो.

– रिटरच्या शब्दात सांगावयाचे म्हणजे 'पार्थिव आशयांनी व्यापलेल्या पार्थिव अवकाशांच्या' तो अभ्यास असतो–[५६] भूगोलात खंडे, प्रदेश, प्रांत आणि विशिष्ठ स्थळे अशांचा अभ्यास असतो ".

हेटनर रचित या शास्त्रांच्या क्रमबंधावर चर्चा करण्याइतक्या तत्त्वज्ञानाच्या भक्कम पायावर आपण स्वतः उभे आहोत असा विश्वास फारच थोड्या भूगोलकाराना वाटत असे, हे उघड आहे. श्लूयटरने केलेली थोडाफार गोंधळ माजवणारी चर्चा नंतर एका संदर्भासाठी विचारात घ्यावयाचीच आहे. लायटनेगर याने केलेल्या विद्वत्तापूर्ण पण क्लिष्ट तात्त्विक अभ्यासलेखात असा निष्कर्ष काढला आहे की, हेटनरने मांडलेला शास्त्रांचा क्रमबद्ध अगदी समाधानकारक आहे अशातला भाग नाही, आणि तसा समाधानकारक क्रमबंध अद्याप कोणीच मांडू शकला नाही. हेटनरचा हा क्रमबंध निदान तर्कसिद्ध आहे आणि तर्कदृष्ट्या तरी त्यात भूगोलशास्त्र चपखलपणे बसू शकते (१५०, ९१ ते ९५). थोड्या वेगळ्या दृष्टिकोणातून या विषयाचे परीक्षण करण्याचा प्रयत्न केलेल्या पण बव्हंशी हेटनरच्या निष्कर्षांशी सुसंगत असलेल्या निष्कर्षाप्रतच येऊन पोहोचलेल्या अन्य विद्वानांच्या यादीत मिशोट (१८९), लेमान (११३) व श्मिट् (१८०) यांचा उल्लेख करता येईल. कांट व हंबोल्ट यांच्या मतांशी सहमत असलेली शास्त्रांच्या क्रमबंधाची रूपरेषा हेटनरने आखली, तरी तिचा निर्णय करण्याइतके प्रत्यक्ष भूगोलक्षेत्राचे पुरेसे ज्ञान शास्त्रांच्या विभागणी संबंधीच्या कूटप्रश्नात गोडी असणाऱ्या तत्त्वज्ञानवेत्त्यांना क्वचितच असते, ही मोठी दुर्दैवाची गोष्ट आहे. वुण्टने घेतलेला आक्षेप भूगोलाच्या दृष्टीने अगदीच फिरकोळ आहे. हेटनर अमूर्त (गणितशास्त्र), मूर्तामूर्त (भौतिकशास्त्र, रसायनशास्त्र) आणि मूर्त (प्राणीशास्त्र, अर्थशास्त्र इ.) अशी परिभाषा वापरत असे. पण हेटनरच्या प्रमुख प्रमेयाला बाध न येऊ देता –मी येथे घेतले आहे तशा अवतरणांच्या सहाय्याने– हाही भेद काढून टाकणे शक्य आहे, असे स्पष्ट होते; आणि असे केल्याने त्याचे समार्थ्य वाढणारच आहे. वुण्टने स्वतः रचलेल्या शास्त्र श्रेणीत भूगोलाच्या स्थानाबाबत त्याने केलेल्या सूचना त्याच्या भूगोलक्षेत्राच्या अगदी अपुऱ्या ज्ञानावर आधारलेल्या होत्या, ही गोष्ट अगदी उघड आहे. म्हणून त्याचे हे निष्कर्ष कोणी भूगोलज्ञ मान्य करील की नाही याची शंका वाटते (११२, ८८ f, २७७ f. c/o लायटनेगर १५०, ८५). बेंजामिनची भूगोलविषयक चर्चा ' भूगोल हा संबंधयोगांचा अभ्यास आहे '

---

५६. " die irdisch erfüllten (Räume) der Erdoberfläche ". या रिटरच्या शब्दप्रयोगाचे भाषांतर करण्यातील अडचण या पूर्वीच दाखविली गेली आहे. " पार्थिव आशयांनी व्यापलेले पार्थिव अवकाश " असा रिटरचा मूळ प्रयोग आहे. पण Erdoberfläche (पार्थिव किंवा भूपृष्ठसंबंधी) या शब्दाची पुनरावृत्ती टाळण्यासाठी बऱ्याचशा लेखकांनी " वस्तूंनी व्यापलेले अवकाश " अशा शब्दात त्याचाच पुन्हा पुन्हा उल्लेख केला आणि त्यामुळे घोटाळ्यात भरच पडली. रिटरनेच आपल्या चर्चेत स्पष्ट केल्याप्रमाणे त्याच्या " पार्थिव " या संकल्पनेत अभौतिक मानवी घटनांचाही समावेश होतो. पण मग, त्यांचा " वस्तू " म्हणून विचार करणे शक्य होणार नाही. (५०, १५६-५८: c/o क्राफ्ट १६६, ५)*

* पुरवणी टीपा क्रमांक २५ पहा.

या संकल्पनेवर आधारलेली दिसते. त्याचे निष्कर्ष त्या आधारानेच खरे ठरणारे असतील तर ' भूगोल हे एक क्षेत्रवर्णनात्मक शास्त्र आहे ' या संकल्पनेला ते लागू पडणार नाहीत, असे फींचने दाखवून दिलेच आहे (ए. सी. बेंजामिन लिखित " शास्त्राच्या तत्त्वज्ञानाची तोंडओळख ", न्यूयॉर्क १९३७, पान ४०६; या संदर्भाच्या फींचने दिलेल्या निवेदनावरून; २२३, ७).

अलीकडे, भूगोलाच्या पद्धतितंत्रावर लक्षणीय प्रभुत्व असलेल्या तत्त्वज्ञानाच्या निदान दोन जर्मन अभ्यासकांनी भूगोलक्षेत्राच्या स्वरूपावर विचार केलेला आहे. त्यापैकी ग्राफचे मासलेवाइक विवेचन तत्त्वज्ञानविषयक एका विशिष्ट उपपत्तीवर आधारलेले आहे. त्याच्या क्रान्तिक चर्चेत अनेक मौलिक मुद्दे आपल्याला मिळत असले, तरी तत्त्वज्ञानविषयक एका उपपत्तीच्या चाकोरीत एक संपूर्ण शास्त्र क्षेत्र बसविण्याचा त्याचा प्रयत्न, निदान शास्त्रीय दृष्टिकोणातून तरी समाधनकारक वाटत नाही. केवळ वूंटने घेतलेल्या आक्षेपांच्या आधारावर त्याने हेटनर प्रणीत क्रमबंध निकालात काढावा हे त्याच्याच पद्धतीचे खास लक्षण आहे. त्याने असे गृहीत धरले की, एखाद्या तर्कधारेत तत्त्वज्ञानविषयक चूक असल्याचे आढळले, तर त्या तर्कप्रणालीतील पुढील सर्वच निष्कर्ष निकालात निघतात. पण असे गृहीत धरताना तो प्रतिपाद्य मुद्दा एकूण तर्कधारेस आवश्यक असलेला दुवा आहे हे दाखवून देण्याचा प्रयत्न त्याने केलाच नाही (१५६, १० तसेच नंतरची हेटनर बरोबरची चर्चा).

क्राफ्टने शास्त्र या दृष्टीने भूगोलाच्या एकात्मतेचे केलेले परीक्षण संक्षिप्त असले तरी उद्बोधक आहे. त्यात त्याने हेटनरप्रणीत शास्त्रांच्या क्रमबंधावर नामनिर्देशक चर्चा न करता, हेटनरचा भूगोलविषयक प्रमुख निष्कर्ष त्याने मान्य केला आहे. " खडक, वनस्पती, प्राणी आणि मानव हे स्वतःपुरते त्यांच्या त्यांच्या शास्त्रांचे अभ्यासविषय आहेतच; तरीही भूपृष्ठाचे स्वरूप निश्चित करण्याच्या दृष्टीने ते महत्त्वाचे आहेत; आणि याच अर्थाने ते भूगोलाचे घटक विषय आहेत ". यातूनच एकत्रित भूगोलात मानव या विषयाचा किती प्रमाणात विचार करता येईल याचेही स्पष्ट उत्तर मिळते. " भूक्षेत्र (Erdräum ) आणि मानव यांचे परस्परावलंबी संबंधच " मानवासंबंधी भूगोलात कोणत्याप्रकारे विचार विमर्श करावा हे निश्चित करून त्यावरील मर्यादाही दाखवतात " (१६६, ४ f ).

यापुढील चर्चेत मात्र, हेटनरने केलेल्या भूगोलाच्या व्याख्येतील एका महत्त्वाच्या घटकाकडे क्राफ्टने दुर्लक्ष केल्यासारखे दिसते. तो घटक असाः ' समग्र भूपृष्ठ एवढाच भूगोलाचा अभ्यासविषय नसून –इतिहासाशी भूगोलाची तुलना करताना ज्या गोष्टीवर विशेष भर दिला जातो ती म्हणजे– विविध भूक्षेत्रातील भेद ' हाही तितकाच महत्त्वाचा भूगोलाचा अभ्यासविषय आहे. याचा परिणाम असा होतो की, वातावरणशास्त्र जरी भूपृष्ठापुरतेच मर्यादित असले (आपण भूगोलात ज्या अर्थाने शब्द वापरला त्याच अर्थाने तो येथेही समजावा), तरीही ते शास्त्र भूगोलशास्त्राचा भाग होऊ शकत नाही. पण हेच क्रमबद्धशास्त्र

हवामानशास्त्राच्या अभ्यासाला मूलतः आवश्यक आहे. तरीही हवामानशास्त्र हा भूगोलाचा निश्चितपणे एक भाग आहे. मानवाचा अभ्यास भूगोलाच्या कक्षेत आहे असे मान्य केले तरी त्याच्या आधारे, मानवी, म्हणजे सांस्कृतिक, घटनांना भूगोलात येवढे महत्त्वाचे स्थान का दिले जाते या प्रश्नाचे समर्पक उत्तर देता येईल का ? या प्रश्नाचे तर्कसिद्ध उत्तर क्राफ्टला सापडले नाही. पण, वर दिलेल्या दृष्टिकोणातून या प्रश्नाला, निदान अंशतः, उत्तर मिळते. एकूण भूपृष्ठाचा विचार करताना त्याच्या जडण घडणीत, निसर्गाच्या तुलनेने, मानवी घटनांचा भाग अत्यल्प असतो. तरीही भूपृष्ठाच्या भेदाभेद संपन्न स्वरूपाचा विचार करत असता, त्याच घटना एक महत्त्वाचा घटक होऊन रहातात– उदाहरणार्थ जावा व बोर्निओ यांची तुलना.*

## क–भूगोल व इतिहास यांच्या तुलनेचे महत्त्व

या चर्चेतील येवढ्या मोठ्या भागांचे भाषांतर येथे आम्ही केले आहे, ते इतिहास व भूगोल यांच्या तुलनेच्या महत्त्वावर भर देता यावा या मुख्य हेतूनेच. कोणाही भूगोलकारास, विशेषतः प्रादेशिक भूगोलकारास, भूगोलक्षेत्रविषयक संकल्पना विकसित अगर प्रस्थापित करण्याचे कामी अडचणी भासू लागल्या, तर ती संकल्पना त्याने या तुलनेच्या कसाला लावून पहावी, असे येथे सूचित करावयाचे आहे. तसेच ज्या क्षेत्रात तो भूगोलकार वर्षानुवर्षे कार्य करत आला आहे त्यावर एकाएकी अडदांडपणे हल्ला चढविण्यात आला आणि त्या संपूर्ण क्षेत्राचा विकासच ढासळण्याची भीती निर्माण झाली, तर त्याने त्या हल्ल्याचे फेर-वाचन करावे. असे फेर वाचन करताना त्याने त्यात ' भूगोल ' या शब्दाऐवजी ' इतिहास ' हा शब्द वापरावा आणि ' प्रदेश ' या शब्दाऐवजी ' कालखंड ' हा शब्द घालावा. परिणाम असा होईल की तोच प्रति हल्ला इतिहास क्षेत्राचा उच्छेद करण्यास पुरेसा असल्याचे दिसून येईल; आणि इतिहास नावाचे शास्त्रही अशक्य कोटीतील आहे, हे त्याच्या लक्षात येईल. इतिहास हा विविध कालखंडातील असंख्य घटना एकसंघ आकाराने मांडण्याचा एक कथन-प्रकार आहे. म्हणूनच व्यावसायिक इतिहासकारांपेक्षा वाङ्मयीन लेखकांनाच या विषयाचा अधिक चांगल्यारीतीने विकास करणे शक्य झाले. अर्थात, ते त्यांना कालखंडाच्या इतिहासाचा सामान्य अभ्यासक या अर्थाने शक्य झाले, विशिष्ट विषयाच्या इतिहासाचा तज्ञ इतिहासकार म्हणून नव्हे ! यावरून इतिहासकाराची जागा वाङ्मयीन लेखकाने घेण्यास हरकत नाही. हा निष्कर्ष अर्थहीन आहे, हे सिद्ध करत बसण्याचीही आवश्यकता नाही. कारण, प्रशिक्षित अभ्यासकांसाठी राखून एक तंत्रनिष्ठ विषय या अर्थाने इतिहासाची आवश्यकता व समर्थकता पुरेशी सिद्ध झालेलीच आहे.

पण, प्रदेशाच्या भूगोलाप्रमाणेच कालखंडाचा इतिहास हा क्रमबद्ध शास्त्रांपेक्षा फार वेगळ्या प्रकारचा अभ्यास असतो, ही गोष्ट स्पष्ट आहे. ही दुसरी, म्हणजे क्रमबद्ध शास्त्रे जेथे जेथे त्या आढळतील व जेव्हा जेव्हा त्या आढळतील तेथे व तेव्हा समान गोष्टींचीच निवड करतात. मग त्या गोष्टी नैसर्गिक क्षेत्रांतील असोत किंवा सामाजिक क्षेत्रांतील

---

* पुरवणी टीप क्रमांक २६ पहा.

असोत. नंतर तीच शास्त्रे त्या गोष्टींची तुलना करतात व त्यांचा त्यांच्या पुरताच अभ्यास करतात. तसेच सहज स्पष्ट होणाऱ्या संबंधयोगाचाही अभ्यास करतात. यापेक्षा कितीतरी मोठ्या कक्षेतील विविध प्रकारच्या वस्तुस्थितींचा अभ्यास इतिहासकार व भूगोलकार या दोघांनाही करणे प्राप्त असते. क्रोबरच्या सूचनेप्रमाणे घटनांचे वर्णनात्मक एक संधीकरण करण्याचा इतिहासाचा प्रयत्न असतो. क्रमबद्ध शास्त्रांची पद्धती याच्या उलट असते. " घटनांचे रूपांतर प्रक्रिया निर्मितीने करता यावे म्हणून त्यांचे प्रथम विघटन करावयाचे, अशा स्वरूपाची ती एक मूलतः पृथःकरणात्मक कार्यपद्धती आहे ". (११६, ५४५-४६). हेच विधान प्रादेशिक भूगोलाच्या संदर्भातही करता येईल. फरक इतकाच की, इतिहासाचे लक्ष कालाच्या संदर्भात एकसंधान साधण्याकडे असते, तर भूगोलाचे लक्ष हे एकसंधान स्थलाच्या संदर्भात साधण्याकडे असते.[५७] [तसेच c/o फिंच २२३, ६ f ].

आपल्या विषयाच्या शास्त्रीय पायाचा विचार करणारे भूगोलज्ञ जेव्हा भूशास्त्र, प्राणिशास्त्र, अर्थशास्त्र अशा क्रमबद्ध शास्त्राच्या परिभाषेतच ' शास्त्र ' क्षेत्राचा विचार करतात, तेव्हा त्यांना ' प्रादेशिक भूगोलाला ' शास्त्र म्हणून मान्यता मिळण्याची शक्यता आहे का, अशी सकारण शंका येऊ लागते (c/o लायली, २२०, १३१). वर उल्लेखिलेल्या शास्त्रार्थाने ' प्रदेशांचे शास्त्र ' असणे अगदी अशक्य आहे. केवळ वैचारिक साध्य म्हणूनच नव्हे तर कामचलाऊ साध्य म्हणूनही ते अशक्य कोटीतील आहे. पण, भूगोलाने तुलनेसाठी इतिहास क्षेत्राकडे –आणि मूलतः फक्त इतिहासाकडेच– पहावयाचे ठरविले तर मात्र वरील आक्षेप जमीनदोस्त होतात. ' शास्त्र ' या संज्ञेबद्दल विशेष आत्मीयता दाखविणे इष्ट नाही हे मान्य केले, तर भूगोलकारांना निराश होण्याची गरज रहाणार नाही; कारण ज्ञान जगतात इतिहासाच्या बरोबरीचे स्थान भूगोलाला मिळण्यास काही हरकत नाही, हे कोणीही मान्य करील.

कोणी असेही विचारू शकेल की, ही तुलना जर इतकी महत्त्वाची आहे, तर तिला मोठ्या प्रमाणात सर्वमान्यता का मिळत नाही ? एक गोष्ट निश्चित आहे की, या दोहोतील साम्याकडे अगदीच दुर्लक्ष केलेले आहे असे कोठेच दिसणार नाही. बॅरोजने या तुलनेचा उपयोग आपल्या अध्यक्षीय भाषणात केला आहे; पण, ही तुलना जी दिशा दाखवते त्या दिशेने तर्काधारावर ती पुढे नेण्याचा त्याने प्रयत्न केला नाही (२०८, ६). सॉरनेही तुलना एक-दोन ठिकाणी सूचित केलेली आहे (२११, २६, ८४, १७८). पण, तिचा उपयोग तो

---

५७. क्रमबद्ध अथवा सामान्य भूगोल (म्हणजे प्रादेशिक भूगोलाहून भिन्न भूगोल) आणि इतिहास क्षेत्रातील तत्सम कार्य या दोहोत त्यांचे सापेक्ष महत्त्व आणि त्यांच्या विकासाचे स्वरुप या बाबतीत लक्षणीय फरक आहेत. या फरकांची कारणे अनेक असली, तरी त्यामुळे येथे चर्चेसाठी घेतलेल्या त्या दोहोतील तर्कनिष्ठ साम्याबाबत शंका निर्माण होण्याचे कारण नाही, असे दिसून येईल. या फरकांच्या कारणांचा विचार पुढे करावयाचाच आहे (प्रकरण ११–' ग ').

अपेक्षेपेक्षा फारच कमी करतो. 'कोठे ?' हा प्रश्नच भूगोलाचे भिन्नत्वदर्शक लक्षण आहे. याच्या उलट, इतिहासाचा संबंध 'केव्हा ?' या प्रश्नाशी असतो असे ज्या संकल्पनेमुळे मानले जाते ती संकल्पना व हेटनरची संकल्पना या दोहोंचा गोंधळ झाल्यामुळेच, बहुधा सॉर या बाबतीत हेटनरच्या मार्गाने जाण्यापासून परावृत्त झाला असावा. (प्रकरण ३ 'ड'). परिणाम असा झाला की, जर्मनीतील पद्धतितंत्राच्या ज्ञानाबाबत जे केवळ सॉरवरच अवलंबून राहिले, त्यांना या साम्याची जाणीवच झाली नाही. काही थोड्यांनी त्याचा परिणामकारक उपयोग करून घेतलाही आहे. भूगोल हा एक संकीर्ण विषय आहे या विरोधी पक्षाच्या आक्षेपाचे खंडन करण्यासाठी डब्ल्यू. एम्. डेव्हिस याने या तुलनेचा उपयोग केला (१०४, २१३ f). व्हिटरूसीने केलेली भूगोल व इतिहास यांच्या शैक्षणिक मूल्यांची तुलना अशीच सूचक आहे (२१७, ११९). इंग्रजी भूगोलकार क्रोबी याने तर त्याचा चांगलाच उपयोग करून घेतला आहे (२०१, २ f). बहुधा हे ज्ञान त्याने फेअरग्रीव्हकडून घेतलेले असावे (१९४, ८, १८; पण फेअरग्रीव्हने मात्र कोणताच संदर्भ दिलेला नाही).

अमेरिकेतील भूगोलकार आपल्या विषयाच्या वैज्ञानिक स्वरूपाचा विचार करत असतात तेव्हा तुलनेसाठी क्रमबद्ध शास्त्रांचा आधार घेण्याकडे त्यांचा कल असतो. या देशात भूगोलाच्या विशिष्ट प्रकाराने झालेल्या विकासाचा तो नैसर्गिक परिणाम असण्याची पुष्कळच शक्यता आहे. क्रमबद्ध शास्त्रांपैकी एका शास्त्राशी, म्हणजे भूशास्त्राचीच, प्रदीर्घ आणि निकट साहचर्य घडल्यामुळे भूगोलाच्या अशा तौलनिक विचार धारेला इतिहासापासून दूर नेणारे वळण लागले; इतकेच नव्हे तर, हे वळण सर्वच क्रमबद्ध सामाजिक शास्त्रांपासून दूर जाऊन, क्रमबद्ध निसर्ग शास्त्रांकडे झुकू लागले. शास्त्रीय पद्धतीचा दर्जा सुधारण्यास आणि विशेषेकरून विविध बाबींचे मापन व अचूक नकाशीकरण याबाबतीत, या नव्या वळणाची मदत झाली, ही गोष्ट निःसंशय आहे. तरीही, भूगोलक्षेत्राच्या मूलभूत स्वरूपाचा बोध होण्याच्या कामी त्यामुळे काहीच भर पडलेली नाही. शिवाय, या पार्श्वभूमीवरच, अमेरिकी भूगोलातील बरेचसे नवनिर्मितीचे कार्य गृहीत क्षेत्रांच्या सर्वांगीण भौगोलिक अभ्यासाकडे रोखलेले असत नाही, तर वेगवेगळ्या प्रदेशात आढळणाऱ्या विशिष्ट रूपधेयांच्या क्रमबद्ध अभ्यासांकडे त्या कार्यांचा रोख असतो. ती रूपधेये उद्धृत मैदान-प्राय प्रदेश असोत, प्रवाहाची भर असो, तपमानाची कार्यक्षमता असो, बटाटा-शेती असो, पोलाद कारखाने असोत किंवा राजकीय सरहद्दी असोत, ती सर्व त्या त्या प्रदेशांच्या भौगोलिक पार्श्वभूमीतून स्वैरपणे बाजुला काढलेल्या रूपधेयांचीच द्योतक असतात आणि अशारीतीने त्यांना बाजूला काढण्यात त्यांचा क्रमबद्ध अभ्यास करता यावा हाच हेतू असतो. अशाप्रकारचे अभ्यास "क्रमबद्ध भूगोलात" (युरोपीयांच्या "सामान्य भूगोलात") आवश्यक असतात. हे खरे असले तरी, त्यावर अतिरिक्त भर दिला गेल्यामुळे, अभ्यासकाचे लक्ष मूळ विषयावरून दुसरीकडे वळण्याची शक्यता निर्माण होते. भूगोलाचा दृष्टिकोण फक्त प्रादेशिक भूगोलातच अतिशय स्पष्टपणे उमटलेला असतो, याबाबत बहुतेक सर्व भूगोलकारांचे एकमत आहे.

भूगोल हे क्रमबद्ध शास्त्रामधून आडवा छेद घेणारे एकसंधानात्मक शास्त्र आहे. इतिहासाची भूगोलाशी तूलना केली जात असताना, भूगोलाच्या या विशिष्ट लक्षणांवर भर दिला जातो. हेटनरची ही आकृती कांटच्या चर्चेतूनही निर्माण होते. पण, या आकृतीतील आणि भूगोलाचे अन्य क्षेत्रांशी संबंध स्पष्ट करणाऱ्या फेनमानच्या सुप्रसिद्ध आकृतीतील फरक महत्त्वाचा आहे (२०६).




आकृती क्रमांक एक

भूगोलाचा क्रमबद्ध शास्त्रांशी असलेला संबंध चित्रित करणारी आकृती

ही प्रतले प्रत्यक्षार्थानि प्रतलपृष्ठे म्हणून विचारात घ्यावयाची नाहीत, तर वस्तुस्थितीचा अभ्यास करण्याच्या दोन परस्पर विरूद्ध दृष्टिकोनांची ती प्रतीके आहेत, असे मानून त्यांचा विचार करावयाचा आहे. भूपृष्ठाच्या क्षेत्रीय भेदांच्या भाषेत वस्तुस्थितीचे दृश्य ही एक पातळी, आणि प्रकारानुसार वर्गीकृत घटनांच्या परिभाषेत प्रतिपादन केलेले वस्तुस्थितीचे दृश्य ही दुसरी पाळी, ही दोनही प्रतले एकमेकास प्रत्येक बिंदुत छेदत जातात. म्हणजेच भूपृष्ठावर आढळणाऱ्या वेगवेगळ्या घटनांचा अभ्यास करणारी वेगवेगळी क्रमबद्ध शास्त्रे ज्या पातळीत असतात ती पातळी क्रमबद्ध भूगोलाच्या संगत शाखांच्या पातळीने छेदली जाते. भूपृष्ठावरील एका विशिष्ट क्षेत्रावर केंद्रित झालेल्या क्रमबद्ध भूगोलाच्या विविध शाखांचे एकसंधान म्हणजेच प्रादेशिक भूगोल होय (प्रकरण ११ वे).

इ-१५५७-१३ अ.

भूगोल हे क्रमबद्ध शास्त्रांच्या पातळीवरचेच एक शास्त्र आहे व ते त्यांच्या हद्दीवर पसरलेले आहे. त्यामुळे एकाच सर्वसाधारण पातळीत काही सर्वसाधारण बाबींपुरते ते त्यांच्या क्षेत्रात समाक्रमण करते, असे म्हणणे चुकीचे वाटते. उलट, क्रमबद्ध शास्त्रांच्या पातळीवर छेदणाऱ्या आडव्या पातळीत भूगोल आहे. म्हणूनच याच्या चित्रणासाठी घनभूमितीतील आकृतींचाच उपयोग करणे आवश्यक ठरते (आकृती क्र. १).

## ड–क्षेत्र वर्णनात्मकशास्त्र या अर्थाने भूगोलाच्या स्वरूपाविषयी दुमत

भूगोलाची अन्य शास्त्रांशी तुलना करणारी अशी प्रदीर्घ चर्चा केवळ त्यांच्यातील साम्यांचा योग्यायोग्यतेबद्दलचा विचार करण्यासाठीच असते असे नाही, तर त्यांच्या दृष्टिकोणांतील मूलभूत फरकाचाही त्यात विचार करावयाचा असतो. या दृष्टिकोणांतील फरकामूळेच त्या त्या विषयाच्या संकल्पना आणि विशिष्ट कूटप्रश्न सोडविण्याच्या पद्धती यांत महत्त्वाचे भेद निर्माण होतात. या शतकाच्या सुरूवातीपासूनच क्षेत्रविषयक अभ्यास या अर्थाने भूगोलाचे स्वरूप क्षेत्रवर्णनात्मकच असते, याबाबत जर्मनीतील भूगोलकारांचे सर्वसाधारणपणे बरेचसे एकमत झालेले दिसते. या संकल्पनेने आता अन्य पुष्कळच देशांत प्रवेश केलेला आहे, हे आपण यापूर्वीच पाहिलेले आहे. आपल्या देशातही प्रत्यक्ष अनुसंधानकार्य करणाऱ्या पुष्कळ अभ्यासकांनी तिचा स्वीकार केलेला आहे. या सर्वसाधारण एकमतातूनच भूगोलाचा सहकारशील आणि म्हणूनच अधिक परिणामकारक विकास होण्याची शक्यता निर्माण झाली आहे, याबद्दल आता कोणी शंका घेणार नाही. पण सर्वसाधारण बाबींत एकमत असलेल्या या अभ्यासकांमध्येच तीन महत्त्वाच्या मुद्यांवर मूलगामी मतभेद आहेत. हे मतभेद, निदान बहुतांशी, वेगवेगळे अभ्यासक भूगोलाची अन्य शास्त्रांशी ज्या पद्धतीने तुलना करतात व त्यांच्याशी भूगोलाचा संबंध जोडतात त्या पद्धतींतून निर्माण झालेले आहेत. हे मतभेद खालील मुद्यांशी संबंधित आहेत. (१) ऐतिहासिक विकसनाचे भौगोलिक कार्यातील स्थान; (२) भूगोलविषयक घटना निवडण्याची गमके; आणि (३) भूगोलकारांनी अभ्यासावयाचे असते त्या एकक क्षेत्राची मूलभूत संकल्पना. पुढील प्रकरणांतून यांपैकी प्रत्येक प्रश्न तपशीलवारपणे विचारात घेतला जाणार आहे.

● ● ●

## प्रकरण ५ वे

# भूक्षेत्रदृश्य व भूदृश्य

## अ–प्रचलित गोंधळ

भूगोलविषयक प्रचलित विचारप्रवाहांतील प्रमुख समस्यांचा विचार पुढील काही प्रकरणांतून आपल्याला करणे प्राप्त आहे. "Landscape" (भूदृश्य) किंवा "Landschaft" (भूक्षेत्रदृश्य) या एकाच अतिमहत्त्वाच्या शब्दाचा वापर करत असताना निर्माण झालेल्या विविध अर्थभेदांमुळे अभ्यासकांच्या मनाचा पुन्हा पुन्हा गोंधळ उडत आहे. या अर्थभेदांपैकी काही मूलभूत व स्पष्ट स्वरूपाचे आहेत, तर दुसरे काही अधिक सूक्ष्म पण आणखीच गोंधळ उडविणारे आहेत. भौगोलिक विचारांतील मूलभूत महत्त्वाची एक तांत्रिक संज्ञा म्हणून, तसेच प्रदेशांच्या प्रत्यक्ष अभ्यासासाठी वापरावयाची एक महत्त्वाची संज्ञा म्हणून, Landscape या शब्दाचा वापर आपल्या देशात, अथवा इंग्लंडमध्येही, अलिकडेच सुरू झाला आहे. पण Landschaft या त्याच्या जर्मनभाषेतील रूपास मात्र आधुनिक भूगोलाच्या संपूर्ण इतिहासकालातच महत्त्व प्राप्त झालेले होते. सर्वसाधारण जर्मन भाषेत त्याचे अनेकविध अर्थ होण्याची शक्यता असल्यामुळे, निदान एक शतकापूर्वी, त्या शब्दाने तिकडे गोंधळ माजविलेला होता. हे खरे असूनही, अलिकडच्या काळात, भूगोलविषयक परिभाषेतील एकमेव अतिमहत्त्वाचा शब्द म्हणून त्याला प्रतिष्ठा प्राप्त झाली; आणि त्याने निर्माण केलेला गोंधळ भूगोलविषयक विचारांच्या प्रत्येक क्षेत्रातच मुरून राहिला. ज्यांनी Landschaft या संज्ञेची ओळख आपल्या देशात प्रथमच करून दिली, त्यांनी त्याच्या प्रगुणीत अर्थभेदांतील फरक स्पष्ट करण्याची तसदी घेतली नाही; उलट त्याला कोणतीही गुणविशेषणे न जोडता त्याचे भाषांतर Landscape या शब्दाने करून केवळ आंधळेपणाने तो आवश्यक गोंधळ आपल्याही भाषेत आणून सोडला. ही घटना अत्यंत दुर्दैवाची समजली गेली पाहिजे.

ज्या समस्यांचे बाबतीत भूगोलाभ्यासकांचे मतभेद आहेत त्यांची चर्चा करण्याच्या प्रयत्नात असताना, प्रत्येक बाबतीत या दोन शब्दांच्या विविध अर्थभेदांपैकी प्रत्येक अर्थाची फेरतपासणी करणे आवश्यक आहे असे प्रस्तुत लेखकाला दिसू लागले. एवढ्या बाबतीचाच विचार करावयाचा झाला तर, अशी फेरतपासणी अपवादकारक ठरणार नाही. पद्धतीतंत्रविषयक विचारांतील, अथवा सर्वसामान्य तत्त्वज्ञानविषयक विचारांतील अनेक लांबलचक मतभेद संदिग्ध अर्थांच्या शब्दांच्या भिन्न अन्वयार्थामुळे उद्‌भवतात असे दाखविणे शक्य आहे. या मतभेदांशी संबंध असलेल्या प्रत्येक समर्थकाने वेगळा पण सातत्याने एकच अर्थ लावलेला असेल, तर ती समस्या उकलणे शक्य असते, इतकेच काय ती मुळातूनच काढून टाकणे शक्य

असते; कारण, प्रत्येकाला काय म्हणावयाचे त्याचे स्पष्ट विधान केले म्हणजे काम झाले! पण एकाच लेखकाने एकच मूलभूत संज्ञा एकदा एका अर्थाने आणि एकदा दुसऱ्याच अर्थाने वापरली, आणि असे करताना कोणत्या वाटीखाली कोणती गोटी लपविलेली आहे याचा वाचकाला पत्ताच लागू दिला नाही, तर एकमत होण्याचे शक्यतेच्या कोटीतील सर्वच मार्ग खुंटतात. मग मात्र ही हातचलाखी थांबविण्याचा एकच मार्ग शिल्लक रहातो. सर्वच संबंधी वाट्या प्रथम उपड्या करावयाच्या आणि लेखकाला बजावावयाचे की, एकावेळी एका वाटीखाली एकच गोटी राहू द्यावयाची आहे, नाहीतर ती केव्हा बदलणार याची आम्हा वाचकांना आगाऊ दखल द्यावयाची आहे. बस्, असे केले की, हा खेळखंडोबा आपोआपच थांबेल.

हा सगळा गोंधळ आपल्या देशापर्यंत येऊन पोहोचला आहे तो केवळ त्या शब्दाच्या आपाततः झालेल्या भाषांतरामुळे नव्हे! जेव्हा एखाद्या संयोजकाला विषयाची चर्चा करत असता एका पूर्वनियोजित निष्कर्षापर्यंत येऊन पोहोचावयाचे असते, तेव्हा तो द्व्यर्थी शब्दांशी खेळत रहातो; कारण अशा शब्दांचे अर्थ संदिग्ध असतात, व त्यांचा फायदा घेऊन, इष्ट निष्कर्ष तर्क पद्धतीने सिद्ध झालेले आहेत अशी श्रोत्यांची समजूत पटविण्यास त्याचा उपयोग होतो. 'एखाद्या क्षेत्राने आपल्यावर निर्माण केलेली मूर्तिमंत एकात्म प्रतिमा' असा, ' त्या क्षेत्रातील तशी प्रतिमा निर्माण करणाऱ्या वस्तू–म्हणजेच त्यातील मूर्तरूप भौतिक वस्तू' असा, आणि शेवटी 'त्या प्रत्यक्ष क्षेत्राचा एक समानार्थी शब्द' असाही, असे एका विशिष्ट शब्दाचे असे अर्थ होत असतात असे आपण वेगवेगळ्या संदर्भात म्हणू शकलो, तर भौगोलिक प्रदेशात त्यातील भौतिक वस्तूंचा समावेश होतो व तो प्रदेशच त्यांची अभ्यासासाठी एकक वस्तू बनवतो, म्हणून भूगोलाला स्वतःच्या अभ्यासवस्तू असतात इतकेच नव्हे तर त्या मूर्त एकक वस्तूंच्या स्वरूपाच्या असतात, असे फारशा अडचणी न येता, आपल्याला सिद्ध करता येईल. अर्थातच इतर कोणत्याही शास्त्राप्रमाणे भूगोल हेही एक "शास्त्र" आहे ही गोष्ट सिद्ध आहे, असेही म्हणता येईल. क्रौवीने दाखवून दिल्याप्रमाणे, जर्मनीतील भूगोलकारांनी त्यांच्या " Landschaft " भोवती गूढवादाचे असेच एक अभेद्य जाळे विणून ठेवले आहे (२०२, १५). या वस्तुस्थितिमुळेच जवळपास कोणतीही गोष्ट सिद्ध केल्याचा आभास निर्माण करण्याची शक्यता त्यांच्या बाबतीत निर्माण झाली आहे. आपल्या शास्त्रीय परंपरेचा दावा यापेक्षा अधिक भक्कम पायावर उभारावा अशी इच्छा सर्व भूगोलकारांची असणार हे गृहीतच आहे. कोणत्या संज्ञा वापराव्या याबाबत अनावश्यक युक्तिवाद करण्याची हौस आहे म्हणून नव्हे, तर वरील गृहीतप्रमेयामुळेच Landscape अथवा Landschaft (भूदृश्य अथवा भूक्षेत्रदृश्य) या संज्ञांचा नेमका अर्थ काय होतो हे तपासून पहाणे आम्हाला भाग पडत आहे.

जर्मन भाषेतील 'लांडशाफ्ट' हा शब्द आपल्या दृक् प्रत्ययास येणारे भूभागाचे दृश्य किंवा मर्यादित, केवळ क्षेत्र असे अर्थ सूचित करण्यासाठी सामान्य भाषेत तसा वापरला जातो हीच, एक नसली तरी एक प्रमुख, अडचण निर्माण झाली आहे. गतशतकाच्या सुरुवातीच्या

काळातच या दोनही संकल्पना जर्मन भूगोलाला परिचित झाल्या. होमलरने प्रदेश व प्रांत यांच्या दरम्यान भूक्षेत्र सूचित करण्यासाठी या शब्दाचा वापर केला. पण त्याबरोबरच त्या शब्दाने सूचित असलेली दुसरी संकल्पनाही त्याने मान्य केली. (११, ८ : किंवा १ मध्ये). कोणत्याही एका क्षेत्राचे सौंदर्यबोधक स्वरूप या अर्थाने हंबोल्टने त्या संज्ञेचा वापर केला, पण त्यानेही प्रसंगोपात दुसऱ्या अर्थानेही तो शब्द वापरला असण्याची शक्यता आहे. त्याचप्रमाणे, ओपेल् व विमडर यांनीही 'लांडशाफ्ट' या शब्दाचा प्रामुख्याने सौंदर्यबोधक दृष्टिकोनातून विचार केलेला आहे. तरीही विमडरने लांडशाफ्ट ही एक एकसंध व पूर्णवस्तू मानून, त्याचाच एक भाग म्हणून सामाजिक रूपधेयांचाही त्यात समावेश केला आहे (८४, २ f).

पुष्कळ जर्मन अभ्यासकांच्या लक्षात ही संदिग्धता आलेली आहे, हे सांगण्याची गरज नाही. केवळ या गोंधळामुळेच, फ्रयोबॅलचीही ज्यांच्यात गणना करावी लागेल अशा, पुष्कळशा आधीच्या लेखकांनी चुकीचे निष्कर्ष काढले होते (२७, ३९३ f) ; ही गोष्ट ह्योत्सेलने १८९६ इतक्या आधी दाखवून दिलेली आहे. बान्जेने तर असे आग्रहपूर्वक प्रतिपादन केले की, ' एखाद्या क्षेत्राचे दृश्य' या खेरीज कोणत्याही अन्य अर्थाने हा शब्द वापरावयाला कोणताही औपपत्तिक आधार नाही (१३३, २). या युक्तिवादात जो काही भरीवपणा असण्याची शक्यता होती तिच्या सामान्य जर्मन भाषा व जर्मन भूगोल या दोनही क्षेत्रातील त्या शब्दाच्या उपाययोजनाच्या महापुराने पार ठिकऱ्या उडविल्या. आजच्या काळातील बहुतेक सर्वच भूगोलकार हा शब्द यापैकी कोणत्याही एका अर्थाने वापरतात. इतकेच नव्हे तर या शब्दाचा तेथे कोणता अर्थ अभिप्रेत आहे हे स्पष्ट करण्याचीही तसदी ते घेत नाहीत. १९२३ मध्ये, याच पद्धतीमुळे पासार्जच्या लिखाणात निर्माण झालेल्या गोंधळांवर हेटनरने आक्षेप घेतला होता (१५२, ४९). त्यानंतर अशाच प्रकारचे आक्षेप बऱ्याच जर्मन अभ्यासकांनी घेतलेले असून, त्यात ग्राडमान (२३६, १३०). जीगर (१५७ चे परीक्षण पान ३७९) व वेबॅल् (२६६, २०७) यांचा समावेश आहे.

याच शब्दाची समानार्थी फ्रेंच संज्ञा Paysage हीही अशीच द्व्यर्थी* आहे, असे वरवर तरी दिसते. ब्रून्हेस व अन्य लेखकांनी आधी त्याची व्याख्या न करताच त्या शब्दाचा वापर लिखाणात केल्यामुळे उडालेल्या गोंधळाबाबत व्हॉलॉक्सने टीका केलेली आहे [१८६, ९३-१०३].

म्हणूनच Landscape (भूदृश्याचा) या भूक्षेत्राशी काहीतरी संबंध आहे असे मान्य केले तरीही त्या शब्दाचा अर्थ तेवढेच क्षेत्र असा होत नाही, ही गोष्ट सामान्य व्यवहारातील आपल्या भाषेला स्पष्टपणे मान्य होणारी आहे, हे खरोखर आपल्या भाषेचे भाग्य आहे असेच आपण मानले पाहिजे. प्राचीन इंग्रजी भाषेत अशीच संदिग्धता असल्याचे औपपत्तिक

---

* हा परिच्छेद चुकीच्या माहितीवर आधारलेला आहे. म्हणून तो गाळावा.

प्रदर्शन केल्याने शास्त्रीय स्वरूपाच्या आपल्या भाषेतही तीच संदिग्धता घुसडण्याचे समर्थन आपणच करू शकणार नाही; कारण, सामान्य भाषेने त्या शब्दाचे मूळचे दोन अर्थ आता स्पष्टपणे वेगळे केलेले आहेत. उलटपक्षी, प्रचलित असलेल्या आपल्या सामान्य इंग्रजी भाषेतील या शब्दप्रयोगाचा सापेक्ष स्पष्टपणा नष्ट करणे, आणि तोही ज्यांच्या भाषेला आपल्या भाषेचा हा फायदा घेता येत नाही अशा जर्मन भूगोलकारांच्या केवळ अनुकरणासाठी नष्ट करणे, या उचापतीला शास्त्रीय गुन्हेगारी याशिवाय दुसरे नावच देता येणार नाही.

दुर्दैवाची गोष्ट अशी की, Landschaft (भूक्षेत्रदृश्य) या संज्ञेमुळे केवळ येवढ्या दोन प्रमुख संकल्पनाच सूचित होतात असे नाही, तर तिचा उपयोग करणारे जितके भूगोलकार आहेत तितक्या विविध श्रेणींचा या दोन अर्थांच्यामधे समावेश होत असताना दिसतो. कमीजास्त प्रमाणात 'प्रदेशाशी' समानार्थी संज्ञा म्हणून तिचा प्रयोग सहसा केला जातो. पण तिचा असा प्रयोग करणाऱ्या लेखकांनाच त्या संज्ञार्थात कोणत्या गोष्टींचा अंतर्भाव करावा या बाबत एकमत नाही. श्लूटरने ' लांडशाफ्ट ' या संज्ञेचा त्याने केलेला उपयोग व पासार्गने केलेला उपयोग यातील फरकावर पुन्हा पुन्हा भर दिला आहे (२४७; ३८९; १६९, २९९). अर्थात, पेंक, मौल, ग्राडमान यांच्या बदलत्या पाठभेदास या दोहोंपैकी कोणीच मान्यता देणार नाहीत हेही उघड आहे (१६३, ३९ r; १५७; २३६). अमेरिकी भूगोलकारांनी " प्रदेश " या शब्दाची व्याख्या करण्याच्या प्रयत्नात असताना या शब्दाच्या ज्या छटांचा विचार झाला त्यापेक्षा त्यांच्यातील कितीतरी अधिक मूलग्रामी स्वरूपाचे आहेत. हे भेद क्षेत्रमर्यादा निश्चित करण्याबाबतचे नाहीत, तर त्या भूक्षेत्रदृश्यात कोणत्या वस्तूंचा अंतर्भाव होतो याबाबतचे आहेत. ' भूक्षेत्रदृश्य ' या शब्दाचा प्रयोग ' प्रदेश ' या अर्थाने करत असताना, त्या अर्थात ' भूदृश्य ' या शब्दाच्या अर्थाच्या काही छटाही ढकलण्याच्या नादात ते असतात. पण नेमक्या कोणत्या छटांचा तिकडे अंतर्भाव करावयाचा याबाबत मात्र त्यांचे एकमत होत नाही. या वस्तुस्थितीतूनच खरी अडचण निर्माण होते. नेमक्या अशाच परिस्थितीत, अमेरिकी भूगोलातील 'भूदृश्य' या शब्दाच्या संदर्भात काय घडले त्याची जेम्सने नोंद केली आहे; " कदाचित् नकळतही असेल, पण या संज्ञेचा प्रयोग करणाऱ्या भूगोलकाराने त्याची एक खास नवी व्याख्याच केली आहे (२८६, ७९). दुर्दैवाची गोष्ट ही, की अशा नकळत बनविलेल्या व्याख्या शास्त्रीय म्हणून वापरण्या-इतक्या पुरेशा अर्थविशिष्ट असण्याची शक्यता नसते. तसेच, वेगवेगळ्या भूगोलकारांच्या अशा अबोधपणे घडलेल्या विचार प्रक्रियेतून निर्माण होणाऱ्या व्याख्या एकसारख्या असण्याची शक्यताही नसते. सत्यस्थिति अशी आहे की, या संज्ञेचा प्रयोग करणारे जितके भूगोलकार आहेत तितक्याच त्याच्या व्याख्या असल्यासारखे दिसते.

या शब्दप्रयोगाला आणि त्याच्या सामासिक शब्दांना जर्मन भूगोलकारांनी चिकटविलेल्या विविध अर्थांचे वर्गीकरण करून दिल्याबद्दल आपण वायबेलचे ऋण मानले पाहिजे (२६६). आपली यादी परिपूर्ण आहे असा दावा त्याने निश्चितच केला नसता. त्याने १९३३ मध्ये सदरचा लेख लिहिल्यानंतर सुचविण्यात आलेल्या अर्थांचीही भर त्या यादीत घालणे आपणास प्राप्त आहे. आंतरराष्ट्रीय भौगोलिक परिषदेच्या अलिकडच्या अधिवेशनांतून वाचल्या गेलेल्या या विषयावरील प्रबंध मालेकडे खास लक्ष देणे जरूर आहे (२७६ ते २७९ व २९७). लौटेनजाकने केलेल्या जर्मन संज्ञेच्या चर्चेने, आणि तिच्या इंग्रजी समानार्थी संज्ञेच्या ब्रोकने केलेल्या चर्चेने या संज्ञांच्या अर्थस्पष्टीकरणाबाबत जेवढी भर टाकण्यात आली तेवढी भर या पूर्वीच्या प्रतिपादनांतून आलेली नव्हती. तरीही, या पारिभाषिक संज्ञांची अधिक शोधक चर्चा होणे आवश्यक आहे हा क्रेबने काढलेला निष्कर्ष समर्थनीयच आहे (२७९, २०९)[५८].

कोणत्याही एका विशिष्ट जागेवरून, एका विशिष्ट कोनातून नजरेच्या टप्प्यात येणारे भूपृष्ठ व तत्संबंधी आकाशभाग म्हणजेच "Landschaft" (भूक्षेत्रदृश्य), अशी वायबेलने त्याच्या सामान्य अर्थाची व्याख्या केली आहे. आणि ब्रोकही जवळजवळ तशांच अर्थाने विधान "Landscape" (भूदृश्य) च्या सामान्य अर्थाची व्याख्या म्हणून करतो. हे " दृष्टिकक्षेतील भूदृश्य " हा तर ग्रान्योच्या संकल्पनेचा गाभा आहे; मात्र त्यात तो ते क्षेत्र पहात असता होणाऱ्या ध्वनी, गंध व स्पर्श आदि आपल्या संवेदनांचाही अंतर्भाव करतो.

अधिक स्पष्ट करून सांगावयाचे झाले तर "एखादा भूपृष्ठ खंड व तत्संबंधी आकाश भाग यांनी आपल्या मनावर उमटणारा एकूण ठसा" या हेलपाकने केलेल्या Landschaft च्या व्याख्येवर ग्रान्योची संकल्पना आधारलेली आहे (१३९, ३४८). या दोहोंपैकी कोणतीही एक संकल्पना मान्य करणारे बहुतांश अभ्यासक एका विशिष्ट कोणातून ते दृश्य पहात असल्याचा दोष काढून टाकता यावा म्हणून, निरीक्षक ते दृश्य फक्त उभ्या पातळीत पहात आहे अशीच कल्पना करत असतो.

अशाच प्रकारचा बदल मूळ संकल्पनेत करत असताना, ग्रान्योने तर्कशुद्ध विचारसरणी आणखी रूपांतर घुसडून दिले—मात्र, अन्य पुष्कळसे लेखक करत नाहीत ते त्याने केले; म्हणजे, या रूपांतराचे ओळखपत्रही त्याने त्यावर चिकटविले (२५२, २३ff, २७०, २९७). एखाद्या क्षेत्राने उमटविलेल्या मानस-संवेदनांच्याही पुढे जाऊन ते संवेदन निर्माण करणाऱ्या त्या क्षेत्रातील वस्तूपर्यंत तो जातो. Landschaft या संज्ञेचा इंद्रियगोचर भूदृश्य हा अर्थ (ज्यात ध्वनि व गंध यांचाही समावेश होतो असे दृश्य असा पूर्णतया वाङ्मयीन अर्थ)

---

५८. आंतरराष्ट्रीय परिषदेच्या या प्रकाशनाकडे माझे लक्ष वेधले जाण्यापूर्वीच प्रस्तुतचा अभ्यासग्रंथ बहुतांशी लिहून पूर्ण झालेला होता. वर उल्लेखिलेल्या त्या दोन लेख पत्रिकांतून अधिक संक्षिप्तरूपाने मांडलेल्या मतांची आणि प्रस्तुत ग्रंथातील पुढील काही प्रकरणांतून स्पष्ट केलेल्या मतांची तुलना करता दोहोंत साररूपाने एकमत असणारे अनेक मुद्दे आहेत हे पाहून मला अधिकच हुरूप आला.

सुरक्षित राखण्यासाठी अन्य संज्ञाही तो सुचवितो. पण, त्याचे अनुयायी मात्र Landschaft किंवा Landscape या शब्दांचे त्यातील संवेदना निर्माण करणाऱ्या त्या वस्तूंतच सरळ रूपांतर करतात (C/o ब्रोकचे पहिलेच विधान ३३३, ८, १३६).

भूदृश्याच्या संवेदनेतून ते संवेदन निर्माण करणाऱ्या वस्तूंत त्याचे वर्णन करत असताना तरी त्या दृश्यात कशाकशाचा अंतर्भाव व्हावा याबाबत सर्वसाधारण एकमत झालेले असले पाहिजे, असे कोणालाही वाटणे शक्य आहे. मात्र सत्यस्थिती याहून फारच वेगळी होती. उदाहरणार्थ, पेंक सहज स्पर्श करण्या इतक्या निकटच्या क्षेत्रात येणाऱ्या वस्तूच त्यातून वगळतो. त्याच्या मते "आपल्या दृष्टिक्षेत्रातील प्रतिबोधक्षम वस्तूंचाच भूक्षेत्र दृश्यात समावेश होतो." नामनिर्देश करूनच बोलावयाचे झाले तर, " हे भूक्षेत्र स्वतः मानवाला आपल्या कक्षेत स्थान देणार नाही पण मानवी कृतींचे भूपृष्ठावर होणारे परिणाम मात्र कवटाळेल " (१६३, ३९ f, ४५). या उलट श्लूटर माणसे प्रतिबोधक्षम वस्तूपैकीच आहेत असे कारण दाखवून मानवाचा भूक्षेत्रदृश्यात समावेश करतो, इतकेच नव्हे तर, मानवाला भूक्षेत्र दृश्यातील एक प्रमुख घटक ठरविता यावा म्हणून आपल्या खास अभिरुचीच्या विषयावर बृहद्कारी दुर्बिण रोखून मानव केवळ " सूक्ष्मकण " ठरणार नाही अशी काळजी घेतो (१२७, १४५, २६). याच्याविरुद्ध पासार्ग त्यातून मानवाला वगळू इच्छितो. इतकेच नव्हे, तर सर्वसाधारण प्राणी जीवनही त्यातून वगळतो; कारण, असे केले नाही तर, एक प्रदेश (Landschaft) दुसऱ्या प्रदेशापासून वेगळा दाखविणे दुरापास्त होईल, अशी त्याला भीती वाटते. तसेच, पासार्ग आपल्या 'प्रदेश' (Landschaft) नैसर्गिक, अमानव घटकांपुरताच मर्यादित ठेवतो. पण असे करताना सध्या अस्तित्वात असण्याची शक्यता नसलेल्या नैसर्गिक वनस्पतिजीवनासारख्या घटकांचाही त्या 'प्रदेशात' (Landschaft) समावेश करतो. बायबेल व अन्य पुष्कळजणांना पासार्गला Landschaft या संज्ञेचा नेमका कोणता अर्थ अभिप्रेत आहे हे समजणे अशक्य नसले तरी अवघड आहे हे मान्य करतात, पण त्याच्या विधानांचे टीकाकारांनी कोणतेही अर्थ लावले तरी त्याला ते मान्य होणार नाहीत असे गृहीत धरणेच शहाणपणाचे ठरेल.

या मतभेदांचे मूलभूत कारण वाचकांच्या तत्काल लक्षात येण्यासारखे आहे. आधुनिक जर्मन भूगोलज्ञ एका शब्दाची अशी एक व्याख्या बनविण्याच्या नादात आहेत, की त्यामुळे त्या शब्दाला प्रतिबोधक्षम भूदृश्याच्या संकल्पनेशी सामान्य समजुतीप्रमाणे असणारे साहचर्य कायम राखणे शक्य होईल आणि त्या बरोबरच भौगोलिकदृष्ट्या अभ्यासावयाच्या वस्तूंचा अचूक निर्देशही तो शब्द करू शकेल. परिणामतः प्रत्येक भूगोलज्ञाची त्या शब्दाची व्याख्या भूगोलाने कशाकशाचा अभ्यास करावा असे त्याला वाटते त्याप्रमाणे बदलेल. म्हणूनच म्हणतो, की "भौगोलिक क्षेत्र" (Geographic area) या शब्दापेक्षा भूक्षेत्रदृश्य (Landschaft) हा शब्द काही विशेष काटेकोर आहे अशातला भाग नाही; पण तो अधिक काटेकोर असल्याचा देखावा निर्माण करतो. मुख्यत्वेकरून भूरूप-शास्त्रज्ञ असणाऱ्या भूगोलकाराला

त्या क्षेत्रातील दृश्य वस्तूंचा समावेश करणारी संज्ञा पुरेशी वाटेल. पण ज्याचे लक्ष प्रामुख्याने सांस्कृतिक भूगोलाकडे आहे अशा भूगोलकाराला संस्कृतीचा क्रियाशील मध्यस्थ जो मानव त्याला त्याच्या महत्त्वाच्या प्रमाणात उभारी देण्यासाठी आपण काही तरी केले पाहिजे असे वाटेल. पण भौगोलिक रूपधेयांचे स्वरूप काही असले, तरी शेवटी त्यांपैकी बहुतेक सर्वांचा अर्थ नैसर्गिक बनस्पती, हवामान व भूरूपे यांच्या परिभाषेतच सांगावा लागणार आहे, असे ज्या भूगोलकाराला वाटते, त्यांच्या मते Landschaft हा शब्द सारांशाने तेवढ्यापुरताच मर्यादित राहील.

वरील सर्व लेखक निदान, भौतिक, प्रतिबोधक्षम वस्तूंपुरता मर्यादित ठेवूनच Landschaft (भूक्षेत्रदृश्य) हा शब्द वापरतात; कारण अभौतिक घटना अभौगोलिक असतात म्हणून त्या वगळण्यास, ते उत्सूक नसले तरी, तयार असतात. पण, जे अशा प्रकारच्या घटनांचा अंतर्भाव त्या भूक्षेत्रदृश्याचा अभ्यास करणाऱ्या भूगोलाचा एक प्रत्यक्ष अभ्यासविषय म्हणून करू इच्छितात त्याना या संकल्पनेची व्याख्या करणे बरेच अवघड होते. उदाहरणार्थ, " कोणताही एक विशिष्ट अवकाश भरून टाकणाऱ्या सर्व वस्तूंचा व घटनांचा . . . . (अर्थात्) ज्ञानेन्द्रियांच्या सहाय्याने निरीक्षण करता येण्यासारख्या वस्तूंचा व घटनांचा . . . . " समावेश करता येईल अशी भौगोलिक Landschaft या शब्दाची व्याख्या पावलोव्स्की करतो. पण नंतर त्याची अभौतिक घटनांचाही समावेश करण्याविषयीची त्याची चर्चा लक्षात घेता तशाही घटना Landschaft मधे घुसविण्याचा त्याचा प्रयत्न आहे असे दिसून येते. मात्र त्या घटनांचा समावेश कोणत्या पद्धतीने करावयाचा हे त्या चर्चेवरून स्पष्ट होत नाही (२७६, २०२ f, २०५ ते २०८).

लौटेनझाक हा " वांशिक व भाषिक परिस्थिती " अशा प्रकारच्या अभौतिक घटकांचा अंतर्भाव अधिक निश्चितपणे करताना दिसतो. तो Landschaft ची व्याख्या करत नाही तरी त्यात समाविष्ट करावयाच्या वस्तूंच्या वर्णनांवरून, कोणताही भूगोलकार त्या क्षेत्राच्या अभ्यासात अंतर्भाव करावयाची इच्छा करील अशा सर्व गोष्टींचे प्रतिनिधित्व त्यात असल्याचे दिसते. दुसऱ्या शब्दात बोलावयाचे, तर Landschaft चा (भूक्षेत्रदृश्याचा) Landscape (भूदृश्य) हा सूचितार्थ त्यात कोठे शिल्लक राहिलेला दिसत नाही. हीच गोष्ट पुष्कळशा अंशांनी मौल सारख्या अन्य लेखकांच्या बाबतीतही खरी आहे. हे लोक राजनैतिक राज्य हा Landschaft चा एक घटक मानतात. राज्याचा व्यक्त भूदृश्यावर काही खास परिणाम होतो अशा आधारावर नव्हे, तर राज्याचा अन्य घटकांशी काहीना काही निकट संबंध असतातच अशा सरळ आधारावर राज्य हाही (Landschaft) चा एक घटक असे हे लोक मानतात. म्हणजेच, Landschaft (भूक्षेत्रदृश्य) ही संज्ञा अर्थाने कोठेही कमी अगर जास्त नसल्यामुळे Region (प्रदेश) या संज्ञेशी समानार्थी आहे (१५७). ग्रिमचा शब्दकोश (Worterbuch) या जर्मन भाषेवरील एका अभिजात अधिकारी ग्रंथात या शब्दप्रयोगाचेच पुरेसे समर्थन केलेले आढळून येईल हे येथे नमूद करावेसे वाटते. अर्थात Landschaft हे क्षेत्र साधारणपणे 'भूभाग' (A Land) एकापेक्षा लहानसर असते आणि त्या क्षेत्रात

त्यावरील लोकवस्तीचाही समावेश होतो हे लक्षात घेऊन, Landschaft (भूक्षेत्रदृश्य) ही संज्ञाएका संपूर्ण राजनैतिक क्षेत्राचे निर्देशक म्हणून वापरावयास हरकत दिसत नाही. खरे पहाता, सदर ग्रंथात ग्रंथित केलेल्या Landschaft शब्दाचा अन्य अनेक अर्थांपैकी एक अर्थ प्रत्यक्ष भूभागाशी संदर्भ न ठेवताच त्यावर वसाहत करून रहाणाऱ्या समाजगटाशीच संदर्भ दाखवितो.

उलटपक्षी क्रेब्ज असे आग्रहाने म्हणतो, की Land (भूक्षेत्र) व Landschaft (भूक्षेत्रदृश्य) यांच्यामधील फरक फक्त आकारमानापुरताच नाही. Land (भूक्षेत्र-देश) हा प्रत्यय फक्त England किंवा Deutschland अशा विस्तृतक्षेत्रांपुरताच मर्यादित नाही, तर Siegerland, Sauerland, अशा सारख्या अनतिविस्तृत क्षेत्रांच्या बाबतीतही तो वापरला जातो. उलट, Landschaft (भूक्षेत्रदृश्य) या संज्ञेचा संदर्भ तशाप्रकारच्या अनेक क्षेत्रांचे नमुनेदार स्वरूप म्हणून गणल्या गेलेल्या त्यांच्या विशिष्ट रूपधेयांशी जितका असतो तितका त्या विशिष्ट स्वतंत्र क्षेत्राशी नसतो, असे क्रेब्ज निक्षून सांगतो (२७९, २०९). आणि क्रेब्ज असाही दावा करतो, की पर्वतीय क्षेत्र या दृष्टीने आल्प्सच्या स्वाभाविक रूपविशेषाचा उल्लेख आल्प्सचे भूक्षेत्रदृश्य असा करावयास हरकत नाही; कारण आल्प्सच्या या भूक्ष ेत्रदृश्याची पुनरावृत्ती जगाच्या अन्य भागातून आढळून येणार आहे, पण आल्प्सचे हे भूक्ष ेत्र अथवा आल्प्सचा हा ' भूप्रदेश ' अनन्यसामान्य आहे. हे वेगळेपण सूक्ष्म नसून ढोबळ आहे. आल्प्सचे 'भूक्षेत्रदृश्य' काही विशेष लक्षणांपुरतेच मर्यादित असते, कारण त्याचे सापेक्ष स्थान आणि त्याचा वेगळेपणा दाखविणारी सांस्कृतिक लक्षणे त्यातून वगळलेली असतात. पण आल्प्सच्या ' भूक्षेत्रात ' (प्रदेशात) मला मात्र सर्वच महत्त्वाच्या लक्षणांचा अंतर्भाव होत असतो. आल्प्स 'प्रदेश' ही संज्ञा या प्रकारे फक्त क्रेब्जच वापरतो असे नाही. विशिष्ट उदाहरणच द्यायचे तर, पासार्ग या संज्ञेचा ज्या अनेक प्रकारांनी वापर करताना दिसतो, त्यातील निदान एक प्रकार वरील अर्थानेच वापरलेला दिसतो. पण या संज्ञेची अशा विशिष्ट अर्थाची व्याख्या का केली याचे समर्थन क्रेब्ज अथवा पासार्ग या दोहोंपैकी कोणीच केलेले निदान माझ्या आढळात नाही आणि ही वस्तुस्थिती ग्रिमनेही नमूद केलेली नाही.

एका बाजूला, निश्चितपणे मर्यादित असे एक क्षेत्र या अर्थाने, तर दुसऱ्या बाजूला भूपृष्ठाच्या अमर्याद विस्ताराचा कमीजास्त प्रमाणात निश्चितपणे व्याख्याबद्ध केलेले रूपविशेष या अर्थाने, सर्व ठिकाणी एकच शब्द वापरत गेल्याने या गोंधळात आणखी एका घोटाळ्याची भर पडली आहे. पुष्कळशा बाबतीत ग्रंथसंदर्भावरून कोणता अर्थ तेथे अभिप्रेत आहे याचा बोध होतो, पण असे नेहमी घडतेच असेही नाही. अशा अवस्थेत, तो शब्द आपल्या 'क्षेत्र' (Area) या शब्दापेक्षा फारसा स्पष्टार्थक नाही आणि 'प्रदेश' (Region) या शब्दापेक्षाखासच कमी स्पष्टार्थक आहे.

जर्मनीतील वर्तमानकालीन लेखक, आपण ज्या अर्थाने 'प्रदेश' (Region) हा शब्द वापरतो, कमी अधिक प्रमाणात, त्याच अर्थाने 'भूक्षेत्रदृश्य' (Landschaft) हा शब्द वापरतात असे दिसते. Region (प्रदेश) या अर्थाने मात्र प्रत्येक जण त्याची व्याख्या वेगळ्या

प्रकारे करतो असे दिसते. पूर्वी वापरल्या जाणाऱ्या शब्दांच्या ऐवजी एखादा नवा शब्द वापरांत येणे इष्ट आहे असे लेखकांच्या वर्तमान पिढीला का वाटते याची अनेक कारणे वेबलने दिली आहेत. यापूर्वी Landerkund (भूवर्णन) या संज्ञेने सामान्यतः ज्याचा उल्लेख केला जातो असे, त्याचे अभ्यासक अलीकडे साधारणतः ज्याला Land (भूक्षेत्र) म्हणत त्यापेक्षा कमी विस्ताराच्या आतापर्यंत भूभागांच्या अभ्यासात अधिक रस घेत आहेत, आणि सर्वसाधारण जर्मन भाषेतील समानार्थी शब्दप्रयोगांचा विचार करता वरील भूक्षेत्र या अर्थाने 'भूक्षेत्रदृश्य' (Landschaft) या शब्दाचा उपयोग समर्थनीयच ठरतो. येथे एक गोष्ट सांगितली पाहिजे, की जर्मन लोकांना Region हा प्रदेश या अर्थाचा परदेशी शब्द मंजूर नाही. आणि अन्य अनेक कारणासाठी Gegend व Gebeit अशा सारख्या संज्ञा त्यांना या संदर्भात अप्रस्तुत वाटतात. वस्तू जशा एकत्र असतील तशा स्थितितच त्या पहाणे एक निःशेष घटना संच विचारात घेणे (Zusammenshan) हा आजच्या काळाचा रोख (Drive) आहे, हेच या विचारांमागील प्रमुख कारण आहे. आणि तशी नोंद वेबलने केलेली आहे. "एक गोष्ट गृहित आहे की Landscape (भूदृश्य) या शब्दाचा गुणार्थ जे सुचवितो अगदी तेच Landschaft (भूक्षेत्रदृश्य) च्या अभ्यासाने साधायचे असते. वेबल अशीही पुस्ती जोडतो, की Land (भूक्षेत्र) या शब्दापेक्षा Landschaft (भूक्षेत्रदृश्य) हा शब्द अधिक प्रभावी, अधिक भारदस्त, आहे. तसेच आज ज्याला 'प्रादेशिक भूगोल' (Landschafts Kunde) असे संबोधतात तो आणि यापूर्वी ज्याला 'देशांचा भूगोल' (Länderkunde) असे म्हणत त्या भूगोलापेक्षा काही फारसा वेगळा नव्हता."

ज्या थोड्या अमेरिकी लेखकांनी 'लांडशाफ्ट' या संज्ञेच्या अनेकार्थांपैकी कोणतातरी एक आपल्या शब्दकोशात 'लँडस्केप' या रूपांत रूपांतरित केला त्यांनी आपल्याला काय म्हणावयाचे आहे त्याचे नेमके विधानही करण्याचा प्रयत्न केला आहे. त्या दृष्टीने सॉरने "भूदृश्याचे रूपवर्णन-शास्त्र" हा युगप्रवर्तक प्रबंध लिहून त्या संकल्पनेचे तपशीलवार प्रतिपादनच सादर केले, असे समजावयास हरकत नाही. पण, हा प्रबंध जितक्यांदा अभ्यासत जावे तितके भूदृश्य (Landscape) आणि भूक्षेत्र (Area) या दोहोंत नेमका फरक काय आहे हेच कळणे अवघड होत जाते. काही वेळा, हे दोनही शब्द एकमेकांचे पर्यायी शब्द आहेत असे दिसते, तर इतर काही वेळा त्या दोहोंत काही थोडा भेद असल्याचे सूचित केले जाते. 'भूदृश्य' (लँडस्केप) म्हणजे " भिन्नरूपांच्या उघड साहचर्यामुळे निर्माण झालेले एक भूक्षेत्र (Area) " येवढे केवळ विधानही त्याची व्याख्या करण्यास पुरेसे होते (२११, २५ f). या नंतरच्या एका निबंधाने असे सांगितले आहे, की " (१) नैसर्गिक भूक्षेत्राची रूपधेये, आणि (२) माणसाच्या कृतीने त्या भौतिक भूदृश्यावर ठसविलेली रूपे यांचा त्या भूदृश्याच्या आकृतीबंधात समावेश केलेला असतो " (८४, १८६). या आणि अशा दुसऱ्या विधानांवरून आम्ही असा निष्कर्ष काढला आहे, की "नैसर्गिक भूक्षेत्र" (Natural Area) आणि "भौतिक भूदृश्य" (Physical Landscape) हे दोनही शब्द समानार्थी आहेत.

उदाहरणार्थ हवामानविषयक स्थितींचा निःशंकपणे त्यात समावेश करावयाचा आहे. तेथे त्या केवळ नजरेने निरीक्षणक्षम आहेत की नाही हा प्रश्नच निर्माण होत नाही; कारण, श्लूटरच्या युक्तिवादानुसार स्पर्शसंवेदनेतून त्या निरीक्षणक्षम आहेतच. त्याचप्रमाणे, आणखीही एक गोष्ट आमच्या सहज लक्षात आली; या दोन विभागांचा संयोग म्हणजे सर्व बाबींची केवळ गोळाबेरीज नव्हे. मानव नैसर्गिक भूक्षेत्रात रूपधेयांची फक्त बेरीजच करतो असे नाही, तर क्षेत्रगत रूपधेयांची वजाबाकीही करतो, इतकेच काय त्यांच्यात बदलही करू शकतो! तरीही, अत्यावश्यक मुद्दा असा, या दोन प्रकारच्या वस्तुस्थिती केवळ एकत्र केल्याने त्या भूक्षेत्रातील सर्वच बाबींचा त्यात समावेश झाला आहे असे नाही. आणि म्हणूनच अशाप्रकारे व्याख्याबद्ध केलेली 'भूदृश्ये' ही संज्ञा त्या भूक्षेत्राशी समानार्थी पर्यायी संज्ञा असणार नाही. अभौतिक मानवी घटना या सापेक्षस्थान विश्वात अस्तित्वात असणाऱ्या सत्यस्थिति नव्हेत! त्या घटना भूपृष्ठाच्या क्षेत्रांतून विशिष्ट पद्धतीने स्थानबद्ध असतात; म्हणूनच वस्तुस्थितीच्या त्या विभागात त्यांचा समावेश केला जाणे आवश्यक आहे. (अशा घटना भूदृश्यातून वगळलेल्या असतात असे सॉडरच्या अन्य काही विधानांतून सूचित केले गेलेले आहेत). म्हणून, 'अभौतिक घटना ज्यांतून वगळल्या आहेत असे भूक्षेत्र' अशी सॉडरच्या भूदृश्याच्या संकल्पनेची व्याख्या केली पाहिजे. किंवा, कोणाला तशा शब्दातच मान्य होणार असेल तर, 'जेवढ्या प्रमाणात ते क्षेत्र भौतिक स्वरूपाचे आहे तेवढे क्षेत्र' अशी तरी त्याची व्याख्या केली पाहिजे. त्याच्या बहुतेक सर्व अनुयायांनी 'भूदृश्याची' हीच संकल्पना मान्य केली आहे. यापुढे जाऊन, हे त्याचे विद्यार्थी व स्वतः सॉडर 'भूदृश्ये' ही कोणत्यातरी भूक्षेत्राची स्वतंत्र एकके आहेत असे मानतात. सहपाठावरून पहाता, ते भूदृश्य म्हणजेच ते भौगोलिक क्षेत्र ही एक कायिक वस्तू आहे, आणि त्याच्या रूपांच्या लक्षणवर्णनाने त्या वस्तूशी जवळीक करता येते, तिच्या रचनेची ओळख पटते आणि तिची उत्पत्ती, तिची वाढ आणि तिचे कार्य या गोष्टी समजून घेता येतात.

सॉरला "भूदृश्ये" (Landscape) आणि "भूक्षेत्र" (Area) या दोहोंतील नेमका कोणता फरक अभिप्रेत आहे हे कळणे कठीण आहे असे म्हणणारा प्रस्तुत लेखक हा एकटाच महाभाग नव्हे, तर ही गोष्ट त्याचे अनुकरण करणाऱ्या लेखकांच्या लिखाणांतूनही दृष्टोत्पत्तीस आलेली आहे. थोडक्यात सांगावयाचे तर, या अत्यंत प्रेरक व ठाशीव निबंधाच्या माध्यमातून अमेरिकी भूगोलाला Landscape (भूदृश्य) या शब्दप्रयोगाची प्रथमच ओळख करून देण्यात आली. पण, त्या शब्दाच्या अर्थाचे कोणतेच काटेकोर विधान त्या निबंधात केलेले नसूनही ती संज्ञा आपल्या भूगोलविषयक विचारांतील एक आधारभूत संज्ञा म्हणून मान्य केली. ही उणीव लक्षात घेऊनच "या शब्दप्रयोगाचा वापर करणाऱ्या भूगोलकाराच्या मनात काय असते याचे सुस्पष्ट विधान" करण्याचा प्रयास जेम्सने १९३४ मध्ये केला. "आवश्यक त्या सर्व दृष्टिकोनांतून परीक्षण करूनही ज्यात सारतः एकच रूप प्रदर्शित झालेले आढळते असा कोणत्याही प्रांताचा एक भाग", असाच अर्थ भूदृश्य (Landscape) या संज्ञेने सूचित केला

जातो. (२८६, ७९). "आवश्यक त्या सर्व दृष्टिकोनांतून परीक्षण करून" या वाक्यांशाने निरीक्षणपद्धती अक्षरशः प्रत्यक्षदृश्या (view) पुरत्याच मर्यादित आहेत असे सूचित केले आहे की काय निश्चितपणे कळत नाही. अन्य विशेषणात्मक वाक्यांचे त्याने दिलेले स्पष्टीकरण येथे आपल्यादृष्टीने महत्त्वाचे नाही. या विधानाचा गाभाच भूदृश्याच्या व्याख्येने बनलेला आहे. भूदृश्य हे सरळपणे आणि एकाच अर्थाने "एखाद्या प्रांताचा भूमिखंड" असतो, म्हणजे एक भूक्षेत्र असते. आणि ते एकूण विधानही तितक्याच सामान्यपणे प्रदेश या संज्ञेची व्याख्या म्हणून वापरण्यास हरकत दिसत नाही. प्रचलित परिपाठाबद्दलचे एक निवेदन या स्वरूपात जेम्सचे हे विधान निःसंशयपणे सारतः बरोबरच आहे. अमेरिकी भूगोलज्ञांमध्ये तर "भूदृश्य" हा शब्द "प्रदेश" या शब्दाचा समानार्थी पर्याय आहे असे मानण्याची प्रथाच पडून गेली आहे. ज्यांना भौगोलिक प्रदेशात अभौतिकरूपधेयांचाच समावेश करावयाचा असतो ते त्या भूदृश्याचा एक घटक म्हणून संबंधी राज्याचाच त्यात समावेश करतात. मौलही राज्याचा अंतर्भाव त्या भूक्षेत्रदृश्याचा एक घटक म्हणूनच करत असे. प्रस्तुत ग्रंथाचा लेखकही याच वाढीव अर्थाने ही संज्ञा वापरत असलेल्या अनेकांपैकी फक्त एक आहे. (२१६, ९४६, ff) ही संज्ञा तिकडे सातत्याने वर सूचित केलेल्या अर्थाने वापरली जात असल्यामुळे, तिच्याशी निगडीत असलेला युक्तिवाद, केवळ ती परिभाषा अर्थशून्य वाटते म्हणून, निरर्थक ठरत नाही.

म्हणूनच ब्रोक असा निष्कर्ष काढतो, की 'भूदृश्य' (Landscape) या एकाच शब्दाचे आता आपल्या भाषेत दोन अर्थ रूढ आहेत. त्यातील एक त्याच्या नित्याच्या सूचितार्थावरून साधलेला आहे. "भूपृष्ठाच्या स्वैर भागाच्या निरीक्षणक्षम रूपधेयांचा 'भूदृश्यात' अंतर्भाव होत असतो. मात्र ही संज्ञा नित्याच्या वापराने सूचित होते त्यापेक्षा अधिक विस्तृत अर्थाने येथे ती वापरावयाची आहे." "ज्याच्या रूपवर्णनात एक प्रकारची एकात्मता असते, असा प्रदेश", असा त्याचा दुसरा अर्थ होतो. सुस्पष्टतेच्या दृष्टीने त्यातील एक अर्थ निषिद्ध मानणेच इष्ट आहे, असे ब्रोक आग्रहाने सांगतो आणि त्या दोहोंतील दुसरा अर्थ बाद ठरविण्यास अनुकूल मत देतो.

पण पहिला अर्थ ज्या "अधिक विस्तृत अर्थाने" या शब्द योजनेने ताणला आहे, त्यात आणखी कशाकशाचा अंतर्भाव व्हावयाचा आहे याची काळजीपूर्वक नोंद घेणे आपल्या दृष्टीने आवश्यक आहे. स्वतःच्याच पंडितपदवी परीक्षा प्रबंधात त्याने केले होते त्याप्रमाणे श्लूटर, ग्रान्यो, सॉडर यांच्या मतास चिकटून रहाण्यास तो आता तयार नाही. त्याला आता असे वाटू लागले आहे की भूगोलकाराने "प्रत्यक्ष निरीक्षण-क्षम रूपधेयांची" मर्यादा स्वतः बंधनकारक मानली नाही तरी चालण्यासारखे आहे; उलटपक्षी, दगडी कोळशाच्या खाणीतील उभ्या बोगद्यातून खाली जाऊन त्याने पहाणी केली पाहिजे. त्याने विविध घटनांची दैनंदिन आणि हंगामी चक्रे पाहिली पाहिजेत, आणि विशेष महत्त्वाचे हे की प्रत्यक्ष पहाता येण्यासारख्या घटनांच्या मागे अदृश्य स्थितीत असलेल्या गोष्टींचा त्याने शोध घेतला पाहिजे. उदाहरणार्थ

ग्रामीण भूदृश्याचा अभ्यास करत असताना, "शेतजमिनींचे प्रत्येकी आकारमान, पीक-फेरी-पद्धती, उत्पादनांत उत्पादनामागील हेतू, इत्यादी गोष्टी त्याने प्रयत्नपूर्वक पाहिल्या पाहिजेत. भूगोलकाराच्या दृष्टीने भूदृश्य हे अमूर्त असून ते निरीक्षकाच्या स्थलकालबंधनांपासून मुक्त असते. म्हणून दृश्य असूनही अर्थपूर्ण असणाऱ्या गृहीत सामग्रीची पुरवणी जोडावीच लागते (२९७, १०४).

वरील वर्णनात सामावलेल्या सर्व गोष्टींचा अभ्यास करावा असे मान्य केले– आणि प्रस्तुत ग्रंथलेखक ते मान्य करण्यास निश्चितच तयार आहे– तरीही, "अमूर्त भूदृश्य" हे प्रत्यक्षात नेमके काय आहे हे अद्यापी स्पष्ट होतच नाही. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे झाले तर, 'भूदृश्य' या शब्दाच्या सर्वसाधारण सूचितार्थात 'भूगोलकारांना अभ्यासाच्या अशा सर्व गोष्टी' अशी भर टाकून आणि 'भूक्षेत्र' या संकल्पनेपासून अभिन्न असलेली एक संकल्पना शेवटी सांगून ब्रोकने लाऊटेनझाक आणि अन्य अनेक जर्मन अभ्यासकांच्या मार्गाने जाण्यापेक्षा अधिक काहीच साधले नाही! मात्र लाउटेनझाक प्रमाणे त्याने ही संकल्पना विधानरुपाने मांडण्याचा अट्टाहास केला नाही, ही गोष्ट महत्त्वाची आहे. असा प्रयत्न त्याने केलाच असता तर, त्याचे विधान पुढीलप्रमाणे झाले असते. "भूदृश्यातील भूपृष्ठाच्या कोणत्याही स्वैर भागाशी सर्व निरीक्षणक्षम रूपधेये व त्याबरोबरच प्रत्यक्ष निरीक्षण करता येणार नाहीत पण अर्थपूर्ण आहेत अशी रूपधेये या सर्वांचा समावेश होता." (ब्रोकने आपल्या या संकल्पनेचा त्या संपूर्ण प्रबंधात सातत्याने पाठपुरावा केला असल्यामुळे, येथे निर्माण झालेल्या शंकेचा त्याच्या नंतरच्या निष्कर्षावर काही परिणाम होणार नाही. लाउटनेजाकच्या प्रबंधाबाबतही हेच विधान खरे आहे).

इंग्रजी भूगोलकारांनी 'Landscape' (भूदृश्य) या शब्दाच्या केलेल्या वापराचे परीक्षण केले असता, अगदी जवळ जवळ आपल्या देशासारखीच परिस्थिती तेथेही आढळते. खरे म्हणजे, पुष्कळशा इंग्रज अभ्यासकांनी ही संकल्पना उघडउघड आपल्या देशाकडून उचलली आहे. डिकिन्सनने अलिकडेच केलेल्या चर्चेतही काटेकोर विधान करावयाचे टाळण्याची अगदी हीच पद्धती अवलंबिलेली दिसते (२०२). खुद्द डिकिन्सननेच हे "भूदृश्य म्हणजे आहे तरी काय ?" असा प्रश्न उपस्थित केला असल्यामुळे ती पद्धती अधिकच नजरेत भरते. त्याची पद्धत अशीच होती. प्रथम एक काटेकोर व्याख्या विधानरुपाने मांडावयाची, पाठोपाठ वेगवेगळया प्रवक्त्यांची मते– म्हणजेच केवल भूदृश्यवादी प्रवक्त्यांची मते– सादर करत जायचे व त्या प्रवचनापासून स्वतःचेच इतके अगदी मूलगामी मतभेद दाखवावयाचे की शेवटी त्यांची ओळख त्यालाच पटेनाशी होते, असे वाचकाला वाटते. एकूण, ही वेगवेगळी विखुरलेली विधाने एकत्रित केली तर आपल्याला त्यावरुन पुढील निष्कर्ष काढावयास हरकत दिसत नाही. भूदृश्यात भूरुपांचा व वनस्पत्यावरणाचा समावेश होतो. तसेच, मानवी वसाहतीचा परिणाम म्हणून मूळ भूरुपांत व वनस्पत्यावरणात झालेली रुपांतरे असतात. अशा पण संघटितक्षेत्रीय साहचर्यात असलेल्या स्थावर भौतिक रुपांचाही त्यात

समावेश होतो. येथे हवामानविषयक परिस्थिती, प्राणीजीवन व मानवीजीवन या गोष्टी उघड उघड वगळल्या आहेत. उलटपक्षी, काही अभौतिक कारकांचीही त्यात भर घातली आहे. कारण, हेटनर व श्लूटर यांच्यात काही मतभेदच नाहीत असा आव आणून त्यांच्या एतद्विषयक संकल्पना एकत्रित करण्याचा डिकिन्सनचा हा प्रयत्न आहे. पण कोणत्या का अर्थाने असेना, त्याच्या 'भूदृश्य' संकल्पनेत त्यांच्या संकल्पना समाविष्ट आहेत की नाहीत हे त्यातून स्पष्ट होत नाही. क्रौवेने आपल्या भाष्यात ठासून सांगितले आहे त्याप्रमाणे स्वतःच उपस्थित केलेल्या प्रश्नाचे उत्तर डिकिन्सनने दिलेलेच नाही.

कोणत्याही शास्त्रातील तर्कशुद्ध युक्तिवादाला एका गोष्टीची मुळापासूनच गरज असते. पद्धतीतंत्रविषयक चर्चेत वापरावयाच्या पायाभूत संज्ञांच्या व्याख्या काटेकोरपणे केल्या पाहिजेत व संपूर्ण चर्चेत त्या व्याख्यांना चिकटून राहिले पाहिजे, निदान 'भूदृश्य' या संज्ञेच्या बाबतीत तरी त्या शब्दाचा अर्थ काय आहे हे वाचकाला समजून येईलच असे गृहीत धरणे म्हणजे 'अशक्य ते शक्य' होईल असे गृहीत धरण्यासारखेच आहे. एखादा लेखक एखाद्या संज्ञेचा नेमका कोणता अर्थ त्याला अभिप्रेत आहे, हे सांगू शकला नाही, आणि तरीही तो शब्द वापरत राहिला, तर तो कशाविषयी काय म्हणतो आहे हे त्याचे त्यालाच माहित नसल्याची, पण ती वस्तुस्थिती लपविण्यासाठी कमीजास्त प्रमाणात रुढ शब्दाचा वापर तो करत असल्याची ती कबुलीच असते. सरळ इंग्रजीत जे शक्य होणार नाही असे शब्दार्थ गारुड रचण्याची तो आपल्या युक्तिवादाने एकप्रकारे परवानगीच घेत असतो, असे म्हणावयास हरकत नाही.

' भूदृश्य ' या मूलभूत संकल्पनेसाठी प्रत्येक भूगोलकार जरी वेगवेगळा अर्थ मान्य करणार असला, तरीही केवळ तर्कवाद करणे तत्त्वतः शक्य होईल. मात्र, प्रत्येकाने आपल्याला नेमके काय म्हणावयाचे आहे याचे विधान आधी केलेले असले पाहिजे. अर्थात, तशाही स्थितीत अनंत मतमतांचा गोंधळ टाळणे जवळजवळ अशक्य होईल. म्हणूनच, निदान अमेरिकी भूगोलकारांनी भूगोलक्षेत्रातील ' Landscape ' (भूदृश्य) या शब्दाचा वस्त्वर्थ काय असावा या बाबत काहीतरी एकमत घडवून आणण्याचा प्रयत्न करणे इष्ट आहे, असे वाटते. अर्थात, तो शब्द यापुढेही एक तांत्रिक संज्ञा म्हणूनच वापरणार आहोत, हे गृहीत आहे. या संज्ञेला पूर्णपणे फाटा द्यावा या मताला पुष्टी देणाऱ्या जोरदार युक्तिवादाला प्रचलित गोंधळातूनच पुष्टी मिळण्याची शक्यता आहे. तरीही 'भूदृश्य' या संज्ञेचा विस्तृत प्रमाणात होणारा वापर पहाता, आतापर्यंत वापरण्यात आलेल्या अन्य संज्ञांपेक्षा त्या संज्ञेत काही अधिक फायदे आहेत, असे सूचित होतेसे वाटते. कोणत्याही परिस्थितीत आपल्या भाषेच्या शब्दभांडारात खोलवर रुतलेली एक संज्ञा खांदून काढण्याचा खटाटोप व्यर्थच ठरणार. व्यावहारिक शहाणपण आपल्याला असे सांगतो की, या बाबत निदान काहीसे सुमार एकमत होण्याची शक्यता आहे की नाही हेच प्रथम पडताळून पहाणे आवश्यक आहे.

## ब–भूदृश्य प्रश्नाची उकल

भूगोलविषयक विचार क्षेत्रात एकच एक काटेकोर संकल्पना शोधून काढण्याचा प्रयत्न करण्यापूर्वी या प्रश्नाचे तसे उत्तर मिळण्याची शक्यता नाही ही गोष्ट आपण मनोमन समजून राहिले पाहिजे; कारण, या पारिभाषिक शब्दाचा वापर करण्याबाबत प्रधान आणि गौण अशा सर्वच बाबतीत भूगोलकारांत मतभेद अटळ आहेत. पण तसे सिद्ध झालेच तर, तंत्र विषयक शास्त्रीय संज्ञा या अर्थाने या संज्ञेला काहीच किंमत नव्हती, हेही मान्य करणे आपल्याला भाग पडेल. ज्या ज्या प्रबंधात त्या शब्दाचा वापर केलेला होता अशा प्रत्येक एका प्रबंधात तो नेमका कोणत्या अर्थाने वापरला गेला याचे पुनर्विधान तेथे केलेले असणारच. पण, तसे करताना फारच थोड्या लेखकांना आपली ही संकल्पना एका पानापेक्षा कमी जागेत मांडण्यात यश आले. म्हणून, हा शब्द पूर्णपणे टाकून देणे इष्ट आहे, असे आपल्याला लवकरच आढळून येईल.

उलटपक्षी, ही संज्ञा वाचकांच्या मनात गोंधळ माजविण्यासाठी नसून, ती ज्ञान प्रकाशासाठी बापरावयाची आहे, अशी भूगोलकारांची धारणा असेल तर ही संज्ञा सुमार अंशाने तरी प्रमाणीत करण्याची आवश्यकता आहे. प्रचलित गोंधळाबाबत चाललेल्या चर्चेत एक अदृश्य कारण उघडकीस आले. 'भूदृश्य' याचा अर्थ काय समजावयाचा हे निश्चित करण्यापूर्वीच ' भूगोल ' म्हणजे भूदृश्यांचा अभ्यास' अशी व्याख्या भूगोलकारांनी जाहीर करून टाकली आहे त्यामुळे 'भूदृश्य' या तांत्रिक संज्ञेचा अर्थ त्या त्या व्यक्तीच्या भूगोलाच्या संकल्पनेशी जुळेल असा अन्वयार्थ लावला जातो. यामुळेच आपले गृहीत प्रमेय एक अस्पष्ट संज्ञांची निरर्थक पुनरावृत्ती ठरते, हे कोणाच्याच लक्षात आलेले नाही, हे उघड आहे. म्हणून, 'भूगोल हा एका भूदृश्याचा अगर अनेक भूदृश्यांचा अभ्यास असतो', हे प्रतिज्ञात्मक विधान अमान्य करणे हीच आपल्या चर्चेची पहिली पायरी होईल. अर्थातच, भूगोलात कोणत्या गोष्टींचा अंतर्भाव व्हावा, या विषयी भूगोलकारांचे काटेकोरपणे एकमत होईल अशी अपेक्षा नाही, आणि त्याची आवश्यकताही नाही. पण, चर्चेच्या संदर्भविषयांबाबत त्यांचे एकमत झाल्याशिवाय प्रस्तुत प्रश्नासंबंधीच्या त्यांच्यातील मतभेदांबाबतची चर्चा बुद्धिग्राह्य होणार नाही. भूदृश्य म्हणजे काय हे निश्चित केल्यानंतरच, आपल्याला भूगोलविषयक अभ्यासांच्या हेतूंशी त्याचा संबंध काय ही गोष्ट विचारात घेणे शक्य होणार आहे. याच एका मार्गाने, भूगोल क्षेत्रात कशाकशाचा समावेश करणे आणि कोणत्या गोष्टी त्यातून वगळणे इष्ट होईल अशा किंवा भूगोलशास्त्राला त्याचे स्वतःचे असे मूर्त अभ्यासविषय भूदृश्यांतून गवसतील का, अशा प्रश्नांच्या व्याख्याबद्ध उत्तरांची याचना त्या प्रश्नांकडेच करण्याचा अनवस्था प्रसंग आपल्याला टाळता येईल.

आधीच अत्याधिक गैरवापर झालेल्या या शब्दाची एखादी नवी संकल्पना रचण्याचा आम्ही येथे प्रयत्न करणार नाही, कारण प्रचलित घोटाळ्यात आणखी भर टाकण्याची आमची मुळीच

इच्छा नाही. पण शक्य झाल्यास, हा शब्द वापरताना भूगोलाभ्यासकांच्या मनात त्याविषयीचे सर्वसाधारण विचार काय असतात हे निश्चित करण्याचा मात्र प्रयत्न करणार आहोत. वर्तमान क्षणी, औपपत्तिक समर्थनाकडे दुर्लक्ष करून भूगोलविषयक विचार क्षेत्रात प्रचलित असलेला एखादा अर्थ आपण या शब्दाला देऊ शकू येवढेच सरळसरळ गृहीत धरणार आहोत.

विशेष लक्षणांनी युक्त असलेला एखादा क्षेत्रखंड, प्रत्यक्षात तो तसा नसूनही आपल्या मनःपटलावर साकारलेला असेल, तर हा क्षेत्रखंड इतर क्षेत्रांपासून वेगळा दाखवता येईल. अशा विधानाचा एक सारतः समानार्थी शब्द म्हणून वापरण्याकडे सर्वसाधारण कल असल्याचे आमच्या लक्षात आले आहे. म्हणजे, बऱ्याच अंशाने काटेकोर असलेल्या आणि पुष्कळशा भूगोलकारांना मान्य होणे शक्य असलेल्या एका संकल्पनेची तात्त्विक दृष्ट्या व्याख्या करणे शक्य आहे. हे सर्व Landschaft (भूक्षेत्रदृश्य) या एका जर्मन शब्दाचे उघड भाषांतर आहे. जर्मनीतील अनेक भूगोलकारांकडून त्याचा सरळ गुणार्थाने वापर केला गेला आहे, आणि प्रस्तुत लेखकासह अनेक अमेरिकी भूगोलकारांनीही त्याचा याच प्रकारे वापर केलेला आहे. अन्यथा जे एका जर्मन शब्दाचे केवळ चुकीचे भाषांतर असल्याचे दिसत होते, त्याचेच हे औपत्तिक समर्थन अमेरिकी भूगोलकारांनी ही संकल्पना दत्तक घेतल्यानंतर बऱ्याच कालान्तराने सादर करण्यात आले. ब्रोक सुचवितो त्याप्रमाणे एका जुन्या इंग्रजी शब्दाच्या गुणार्थाचे पुनरुज्जीवन या भाषांतराने सादर केले. पण हा जावई शोधही इतिहासदृष्ट्या चुकीचा आहे. (जेम्स २८६, ७८ f).

'काही अंशांनी एकरुपता असलेले एक क्षेत्र' असा अर्थबोध करणाऱ्या जर्मन सदृश भाषांतील एका शब्दाला एक समानार्थक शब्द पुरविणे हाच भूदृश्य (Landscape) हा शब्द भाषा व्यवहाराला एका अनोळखी असलेल्या पद्धतीने येथे वापरण्यामागचा हेतू आहे; मग तो तुम्ही एक नवा अर्थ माना अगर एक पुनरुज्जीवित अर्थ माना. अशी नोंद ब्रोकने केलेली आहे (२९७, १०४). पण ही संकल्पना आपल्या Region (प्रदेश) या शब्दाने जितकी स्पष्ट होते तितकी ती जर्मन Landschaft (भूक्षेत्रदृश्य) या शब्दाने स्पष्ट होत नाही, या गोष्टीची नोंद आम्ही यापूर्वीच केलेली आहे. इंग्रजी भाषिक भूगोलज्ञांनी या शब्दाचा उपयोग काही विशिष्ट स्वरुपात एकरूपता असलेले क्षेत्र' असा अर्थ सुचविण्यासाठी, बराच काळपर्यंत केलेला आहे. ज्या काही अडचणी आहेत त्या 'प्रदेश' (Region) या शब्दाचा वापर करण्याबाबतच्या घोटाळयातून उद्‌भवलेल्या नसून, ' काही 'विशिष्ट स्वरुपात एकरूपता असलेले क्षेत्र कसे असण्याची शक्यता आहे हे निश्चित करण्यात गुंतलेल्या समस्यांतून उद्‌भवल्या आहेत. 'प्रदेश' या शीर्षकाऐवजी त्याच्यापेक्षा बऱ्याच अंशाने अस्पष्टार्थ असलेली दुसरीच संज्ञा वापरल्याने आपले मन त्यात गुंतून पडलेल्या अंगभूत समस्यांपासून तावत्काल अन्यत्र वळविता येईल, हे खरे असले तरी त्यामुळे त्या समस्यांची उकल करण्यास त्याने मदत होईल असे मुळीच नाही.

थोडक्यात सांगावयाचे तर, भूदृश्य (Landscape) या शब्दाने प्रदेश (Region) या शब्दाला एक समानार्थ शब्द सुचविण्यापलिकडे भूगोलक्षेत्रात कोणतीच भर पडणार नाही, म्हणजे हेतुसिद्धीचे दृष्टीने त्याचा काहीच फायदा होणार नाही, आणि म्हणूनच तो अनावश्यक आहे. खरे पहाता त्यापासून उघड तोटेच होणार आहेत. 'शेजारच्या क्षेत्रखंडांतून कोणत्यातरी कारणाने वेगळे काढता घेण्यासारखे भूक्षेत्र', ही संकल्पना प्रदेश (Region) या शब्दाने भूदृश्य (Landscape) या शब्दापेक्षा अधिक निश्चितार्थाने सुचविली जाते, भूगोलाभ्यासकाला अभ्यासासाठी निवडणे इष्ट वाटत असेल येवढ्या एकक क्षेत्रापेक्षा मोठा क्षेत्रखंड प्रदेश या शब्दाने नजरेसमोर येतो, असा कोणी दावा केला तर, भूदृश्य या शब्दाने त्यापेक्षा फारच लहान क्षेत्रखंड सूचित होतो, असे म्हणावे लागेल. अर्थाच्या दृष्टीने पहाता, आकारमानाबाबत पहिला दुसऱ्यापेक्षा निश्चितपणे आणि कितीतरी अधिकांशाने लवचिक आहे. आता, पोटविभाग दाखविण्याकरता एखाद्या संज्ञेची गरज लागलीच तर ' District ' (प्रांत) हा शब्द भूदृश्य या शब्दापेक्षा कितीतरी अधिक स्पष्टार्थाने समजणे शक्य आहे. शेवटी असेही म्हणावे लागते, की आपण सामान्यतः समजतो त्याप्रमाणे, आपण त्याशब्दाची व्याख्या कशीही केली तरी त्या संज्ञेला चिकटून रहाणारे पुरवणीवजा सूचितार्थ, एकदा त्याचे उघडपणे विधान केल्यावर त्या संज्ञेच्या उपयुक्ततेत भर टाकत नाहीतच, उलट, एक काटेकोर व तांत्रिक संज्ञा म्हणून त्या शब्दाचे असलेले मूल्यही नष्ट करतात.

म्हणून या बाबतचा आमचा निष्कर्ष असा, की इंग्रजी भाषेच्या परिपाठानुसार क्षेत्रीय एकक म्हणून Landscape (भूदृश्य) ही संकल्पना समर्थनीय असली तरी त्या संज्ञेचा Region (प्रदेश) या शब्दाऐवजी वापर करण्याने एका सुप्रतिष्ठित पारिभाषिक संज्ञेचा त्यापेक्षा कितीतरी अस्पष्ट अर्थ असणाऱ्या शब्दाने उच्चाटन केल्यासारखे होत आहे. या पुनरुज्जीवित गुणार्थाला फाटा द्यावा या ब्रोकने थोड्या गुळमुळीत शब्दांत सूचित केलेल्या निष्कर्षाचे ठासून अवमूल्यन करावयास काहीच हरकत नाही, कारण भूदृश्य या संज्ञेला त्याच्या नित्याच्या अर्थापेक्षा एका अगदी वेगळ्या गुणार्थाची पुस्ती जोडून तो त्याच्याबरोबर आणि त्याचवेळी वापरला जात असतो.

वर दिलेल्या अर्थांच्या यादीच्या दुसऱ्या टोकावर नजर टाकतां Landscape (भूदृश्य) या शब्दाच्या 'एखाद्या क्षेत्राचे विशिष्ट कोनातून पाहिले असता दिसणारे दृश्य' या शब्दशः अर्थाला मुळापासूनच वगळण्याबाबत एकमत असल्याचे आढळते. इतर ज्ञानक्षेत्रात ही संकल्पना अर्थपूर्ण असली तरी भूगोलक्षेत्रात तिला काही महत्त्व नाही. म्हणजेच, या संज्ञेसाठी कोणत्याच संज्ञेची आम्हाला गरज वाटत नाही. त्याचप्रमाणे कोणत्याही क्षेत्राच्या निरीक्षकाच्या मानसिक संवेदनांवर आधारलेल्या संकल्पना, बहुतेक सर्वच भूगोलाभ्यासकांच्या दृष्टीने निरुपयोगी ठरतात, ही गोष्टही येथे गृहीत धरली आहे. हेलपाकची संकल्पना भू-मानस- घटनांच्या अभ्यासासाठी आवश्यक असेलही ! एकंदरीने पहाता असले अभ्यास आमची परिभाषा निश्चित इतके ते महत्त्वाचे असतात असे कोणीच मानणार नाही,

असे गृहीत धरण्यास आम्हाला कोणताच धोका दिसत नाही. (c/o लाउटेनझाक २७८, १३, ff. येथे एक गोष्ट लक्षात घ्यावयास हरकत नाही, की हेलपाकचे प्रमुख लिखाण मानसशास्त्रविषयक आहे).

ही दोन टोके निकालात काढली (शब्दशः अर्थानि व त्याच्या वस्तुनिष्ठ अर्थानेही), तरी काहीशा वेगळ्या संकल्पनांची एक मोठी संख्या शिल्लक रहातेच. एक गोष्ट लक्षात घेतल्याने आपला प्रश्न सोपा हाणार आहे. जे लेखक "भूदृश्य" (Landscape) या शब्दाचा वापर एका मर्यादित क्षेत्राची काही रूपे या अर्थानि करत असतात, तेच "एक एकूण भूदृश्य", किंवा "नैसर्गिक भूदृश्य", किंवा "सांस्कृतिक भूदृश्य" अशा संदर्भातही बोलतात, आणि तसे करताना कोणतेच मर्यादित क्षेत्र त्यांच्या नजरेसमोर नसते. दुसऱ्या शब्दात, त्याच्या विस्ताराला मर्यादा न घालता प्रसंगोपात्त तीच संज्ञा 'कोणत्या क्षेत्रासंबंधी काही तरी' अशा अर्थानि वापरतात.

एव्हाना हे आपल्या लक्षात आले आहे, की पुष्कळसे लेखक भूदृश्य हा शब्द वापरुन त्या क्षेत्रातील सर्वच भौतिक वस्तुस्थिती सुचवितात. सहसा, ते निरीक्षणक्षम वस्तुस्थितींबद्दल बोलतात. पण वस्तुस्थिती या पदवीला पोहोचलेल्या वस्तूला कोणत्यातरी प्रकारे ती निरीक्षणक्षम असावीच लागते, म्हणून तो शब्द अनाठाई ठरतो. श्लूटरच्या पावलावर पाऊल टाकून कित्येक जण इंद्रियगोचर रुपधेये (Sinnlich Wahrehmbar) म्हणजेच, तात्त्विकदृष्ट्या रुप, ध्वनि, गंध, स्पर्श या स्वरूपांत प्रत्यक्ष निरीक्षणक्षम असणाऱ्या अशा सर्व वस्तू या संबंधीच बोलत असतात. पुष्कळांच्या मते ही संकल्पना 'भूदृश्य' या शब्दाच्या सर्वसाधारण अर्थानिच सूचित केलेली आहे. भूदृश्याचे संवेदन म्हणजेच त्या एकूण दृश्याचा ठसा असतो या हेलपाकच्या संकल्पनेपासून सुरुवात करून, वरील संकल्पना अवगमन पद्धतीने तर्कदृष्ट्या विकसित करण्याचा प्रयास विशेषेकरुन ग्रान्योने केला. तेच प्रमाण मानून आपल्या संवेदनेस कारणीभूत झालेल्या त्या क्षेत्रातील सर्व रूपधेयांची निवडही त्यानेच केली. तीच संकल्पना शब्दांकित करताना, आपल्या सर्व इंद्रियांवर विकार निर्माण करतील अशा नजीकच्या परिसरातील सर्वच वस्तूंचा समावेश तो त्या दृश्यात करतो. पण, त्यातील अधिक दूरच्या भागातील ज्या वस्तू केवळ दृष्टीनेच प्रतिबोधित होत असतात तेथे मात्र, तो दर्शनक्षम वस्तूंची मर्यादा आपल्यावर घालतो. तरीही, भूक्षेत्रदृश्य (Landschaft) हा शब्द एक संवेदनात्मक संकल्पना या अर्थानि सुरक्षित राखण्यासाठी वरील दोनही बाबतीत तो दुसऱ्याच संज्ञा वापरतो. ही काटेकोरपणे आखलेली तर्कव्यवस्था फारच थोड्यांना समजू शकली, आणि फार थोड्यांनाच ती समजणे शक्य होईल, असे गृहीत धरण्यात कोणताच धोका दिसत नाही.

तरीही, तावत्काल, आपण त्याची सर्वसामान्य विचाराची दिशा मान्य करावयास हरकत दिसत नाही; आणि संवेदना ग्रहण करण्यास आवश्यक त्या विविध अवस्था धारण केल्यावर त्या क्षेत्रातील ज्या गोष्टी "भूदृश्यसंवेदना" निर्माण करतील अशा सर्व बाबींची गोळाबेरीज

म्हणजे ते भूदृश्य या त्याच्या 'भूदृश्यविषयक' संकल्पनेच्या शक्यता विचारात घ्यावयासही हरकत नाही. अर्थातच या गोष्टी भौतिक सत्यवस्तू असतात, म्हणून त्यांचा अभ्यास आधिभौतिक शास्त्रांत व्हावा हे उचितच आहे. तरीपण, येथे क्रान्तिक प्रश्न असा आहे, की त्यांची गोळाबेरीज केल्याने खरोखरीच एक संपूर्ण वस्तू तयार होते का? एक एकरुप संकल्पना निर्माण होते का? भूगोलातील एक तांत्रिक संज्ञा म्हणून भूदृश्य (Landscape) या शब्दाचा अर्थ वेगवेगळ्या प्रकारच्या वस्तूंचा एक फुटकळ संग्रह, किंवा काही बाबतीत केवळ अंशतः सारखेपणा असणाऱ्या वेगवेगळ्या गोष्टींचा संचय यापेक्षा काही वेगळा होणे आवश्यक आहे. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचे तर, 'भूदृश्य या शब्दात काही गोष्टींचा समावेश होतो, पण दुसऱ्या काही वगळल्या जातात' ही त्या संकल्पनेची व्याख्या होणार नाही; फारतर, त्याला एका व्याख्येचे स्पष्टीकरण म्हणता येईल. आपण ज्याची व्याख्या करतो त्यात केवळ कशाचा समावेश होतो हे सांगून चालणार नाही तर, ते प्रत्यक्ष काय आहे हेच सांगावे लागेल. ग्रान्यो असे गृहीत धरतो ते दिसते, की आपल्या भूदृश्यसंवेदनाला कारणीभूत होणाऱ्या भौतिक वस्तूंचा एक एकक म्हणजे एक संपूर्ण वस्तू (Ganzheit) तयार होते, कारण आपले तद्विषयक संवेदन परिपूर्ण असते. एखाद्या वस्तुसंग्रहाचा एकवट ठसा मानवी मन स्वीकारू शकते या वस्तुस्थितीमुळे, त्या वस्तूंचे निकट सानिध्याखेरीज अन्य काही आंतरिक परस्पर संबंध तावत्काल असतात, असेही सिद्ध होत नाही. म्हणून, लाऊटेनजाकने ग्रान्योच्या या 'एकवट' (Unities) किंवा 'घटीत' (Entities) वस्तू मानवकेंद्री (किंवा, निरीक्षककेंद्री, असेही म्हणावयास हरकत नाही) असतात आणि म्हणूनच मूलतः त्या मानससंवेदनाच्या क्षेत्रातीलच असतात (२६३, १९५ f, २७८, १३ ff). त्या क्षेत्रापुरत्या या वस्तू परस्परसंबंधात असतात व अशा प्रकारे त्या क्षेत्राचे एक एकक बनवतात, असे म्हणून काम भागण्यासारखे नाही. कारण, या परस्परसंबंधात निरीक्षकाच्या अंतःकरणात संवेदना निर्माण करु शकणार नाहीत अशा अभौतिक प्रेरणांचा समावेश असतो. आणि ग्रान्योनेही या गोष्टीला मान्यता दिलेली आहे. त्या संवेदनांच्या अभावी ती एकात्मतेची संकल्पनाच कोसळते. केवळ मानवी इंद्रियांनी त्यांचे निरीक्षण करता येते असा दावा करणेही शक्य नाही; कारण, ही उपाधी प्रत्येक वस्तूला असतेच, पण काही गोष्टी केवळ पहावयाच्या असतात, तर काही केवळ ऐकावयाच्या असतात. म्हणून ती गौण मानली जाते. अशा स्थितींत, मानवी श्रुतींना ग्रहण करता येत नाहीत अशा ध्वनी लहरी, आणि मानवी दृष्टीला न दिसणारे प्रकाश किरण यांचा विचारच करावयास नको. त्या वस्तू सर्वच भौतिक स्वरुपाच्या आहेत म्हणून त्या एक समान आहेत, असे म्हणणे सोपे आहे. हेही एक प्रकारचे साम्य असले तरी त्या वस्तू त्या सर्वांचे एक एकक बनवू शकत नाहीत. शेवटी, या अभौतिक घटनांतून अंशतः आंतरसंबंध असलेल्या विधर्मी वस्तूंच्या संचातून, या अभौतिक घटना वगळल्या तरी, त्यातून एक वस्तू निर्माण होत नाहीच, फारतर, एका संपूर्णातून काहीशा एक सारख्या दिसणाऱ्या निवडक वस्तूंचा तो एक संग्रह असेल.

यातील संबंधित संकल्पनेचे अंतःचक्षूंनी ग्रहण करता येईल अशा वस्तुस्थितीत स्थित्यंतर करण्याचा कोणी प्रयत्न केला तरच त्या तात्त्विक युक्तिवादाला मूर्त स्वरूप आलेले दिसण्याची शक्यता आहे. उदाहरणार्थ पृथ्वीपृष्ठाच्या कवचाचा एक छेद या स्वरुपात आपण एखाद्या क्षेत्रासंबंधी बोलत असतो, अशावेळी सत्य जगताचा तो एक खंड आहे अशीच कोणीही कल्पना करणार. अशा विश्वखंडात भौतिक आणि अभौतिक अशा सर्वच घटनांचा संबंधित गुणित संचय असतो. थोडक्यात, त्या क्षेत्रातील प्रत्येक वस्तूचा त्यात समावेश असतो, हेही तो कल्पनेने जाणू शकतो. रहिवाशांचा धर्म ही काही अवकाशात तरंगणारी घटना नव्हे ! त्या प्रदेशातील लोकांइतकी तीही त्या प्रदेशात निर्धाराने प्रतिष्ठित झालेली असते. पण, त्या क्षेत्रातच असे एक 'क्ष' एकक आहे की त्यातील सर्व भौतिक घटनांचेच ते प्रतिनिधित्व करते, असे कोणी म्हणू लागला तर ते कोणाला पटेल का? अर्थात्, त्या एककात सर्व दृष्ट, स्पृष्ट, श्रुत, आस्वादित व आघ्रात गोष्टींचा समावेश होतो हे, स्पष्टच आहे. पण तेवढ्याच वस्तूंचा समावेश होतो हेही खरे आहे, आणि त्यांची बेरीज केलीच तर, त्याला एका संपूर्ण संचयातून निवडलेल्या वस्तूंचा संग्रह म्हणायचे, नाहीतर काय म्हणायचे!

दुसऱ्या शब्दात सांगायचे तर, एखाद्या क्षेत्रातील भौतिक वस्तूंचे प्रतिनिधित्व करणाऱ्या कोणत्यातरी 'क्ष' या शब्दाची व्याख्या करणे म्हणजे काही इष्टक्षेत्राची एकमेव व एकरुप संकल्पना मांडणे नव्हे, तर ती वस्तूंची निवड करण्यासारखे होईल. अशा संकल्पनेचा असा अर्थ होतो की, भूगोलज्ञाचे लक्ष भूक्षेत्रासारख्या एकाच संकल्पनेवर केन्द्रित न होता त्यातील काही सुट्या गोष्टीवर स्थिरावते.

वरील निष्कर्ष काढला तरी, भूदृश्य या शब्दाच्या सर्वसामान्य वापरातूनच, आपल्या संवेदनकक्षेबाहेरील कोणी एक आणि एकच वस्तुनिष्ठ सत्यस्थिती सुचविली जाते, ही भावना आपली पाठ सोडत नाही. कदाचित्, "एखाद्या भूक्षेत्राची दर्शनीय बाजू", येवढीच मर्यादा तावत्काळ मान्य केली तर, आपण या कल्पनेशी सहजगत्या जवळीक साधू शकू. सामान्यतः भूगोलज्ञ धरतात तसे आपणही गृहीत धरू, की आपण हे क्षेत्र वरून पहातो आहोत. म्हणजे, आपल्याला आकाश यातून वगळता येईल, आणि भूपृष्ठाची घन आणि द्रव रुपे ज्यातून आपण पाहू शकतो असे, वातावरण हे एक माध्यम होईल. आणि वातावरणाखाली केवळ बाह्यपृष्ठच आपण पहात असतो. जलाशयाचे पृष्ठभाग आरण्यातील वृक्षराजीच्या शेंड्यावरील पालवी, गवत, शेतातील वर-माती, अथवा इमारतींचे बाह्यभाग, इत्यादी सर्व पृष्ठे मिळून एक अखंड पृष्ठ त्या क्षेत्रभर पसरलेले असते. हे आणि हे एकच पृष्ठ (अर्थात् आकाश वगळून) आपल्या मनात त्या दर्शनीय भूदृश्यांचे संवेदन निर्माण करत असते. पण, असे पृष्ठ अस्तित्वात आहे, याची जाणीव होण्यासाठी ते प्रत्यक्ष पहाण्याची गरज नाही. पण एखादा राक्षस ते हस्तस्पर्शानेही जाणू शकेल. ते त्याला जसे दिसते तसे म्हणण्यापेक्षा ते जसे असते तसे, पृष्ठ नजरेसमोर उभे करण्यासाठी आमच्या मध्यमाकार भूगोलज्ञाला मात्र सर्व दिशांनी घेतलेल्या व सर्व

प्रकारच्या निरीक्षणांनी संपादन केलेल्या असंख्य तपशीलवार मापनांची बेरीज करणे भाग पडते. येथे महत्वाची गोष्ट की तो त्या पृष्ठाचे निरीक्षण करु शकतो आणि ते जसे आहे तसा त्याचा अभ्यासही करू शकतो. याचाच अर्थ असा, की ते भूदृश्य केवळ तात्त्विक स्वरुपात वावरत नसून, ती एक सत्यस्थिती असते.

हीच संकल्पना आणखी थोडी ताणणे शक्य होईल काय? आमच्या ध्वनीसंवेदनाच्या उद्‌गमांचे चित्रण करणारे पृष्ठ साकार करणे तात्त्विक दृष्ट्यातरी शक्य असावे, असे वाटते. आणि ते इतर इन्द्रियसंवेदनांच्या बाबतीतही शक्य आहे. मात्र केवळ मानसातून अशा रचना निर्माण होणे अवघड आहे. विशेषतः हे संवेदनक्षमपृष्ठ आपल्या शरीराला निकटस्पर्श करणाऱ्या काही गोष्टी खेरीज इतर कोणत्याही गोष्टींचा त्यात समावेश होऊ देत नाही.—एक वायुकवच, दोन आपला शरीराकार, तीन आपल्या पायाखालची घनभूमी. अशासारख्या संकल्पनांची भूगोलक्षेत्रातील उपयुक्तता शून्यवत् असल्याने त्यांचा केवळ त्यांच्यासाठी पाठपुरावा करत बसण्याची गरज. आम्ही येथे त्याचा विचार केला तो, वातावरणाखालील भूपृष्ठाचे बाह्यरूप या संकल्पनेत त्याने काही भर पडू शकत नाही हे अथवा त्यामुळे एकरूप संकल्पना रचण्यास मदत होत नाही,— उलट, अगदी भिन्न भिन्न आणि अपरिमेय वस्तूंचा केवळ एक ढीग मात्र हाती लागेल— हे दाखविण्यासाठी.

आणखी असे, की अन्यसंकल्पनानुसार भूदृश्यामध्ये कशा कशाचा अंतर्भाव केला जावा याविषयावर गरमागरम वादंग माजलेले दिसते. उलट वर वर्णिलेली संकल्पना सर्वच शंकाकुशंकांना सापेक्षपणे स्पष्ट उत्तर देऊ शकते. उदाहरणार्थ, आपली ही संकल्पना अधिक गुंतागुंतीची होईल येवढे कारण पुढेकरून, गतिमान वस्तू आपल्यालाही त्यातून वगळता येणार नाही; कारण, येथे आपण एखादी अमूर्त संकल्पना रचण्याच्या नादात नाही, तर एका सत्यस्थितीचे विधान करण्याच्या प्रयत्नात आहोत, आणि त्या सत्यस्थितीत गतिमान् वस्तूंचा समावेश होतोच. डिकिन्सनच्या सूचनेविरुद्ध असली तरी वरील वस्तुस्थितीला सामान्य बोलीची मान्यता आहे (२०२, ५). ज्यात, खटारे, उतारूवाहू, मालवाहू, खाजगी मोटारी, इतकेच काय माणसेही, नाहीत असे ब्रॉडवे उपनगराचे चित्र, हे त्या विशिष्ट भूदृश्याचे अपुरे चित्र होईल. जहाजेच नसलेले न्यूयॉर्क बंदराचे भूदृश्य आजपर्यंत कोणीही पाहिलेले नाही. कोणत्याही भूदृश्यातील गतिमान वस्तूंच्या स्थितीत होणाऱ्या नित्यबदलाचे वर्णन करणे अथवा अभ्यास करणे अशक्य असल्यामुळे, त्याचे सामान्य विधान करण्याशिवाय भूगोलकाराला गत्यंतरच नसते. अर्थात ही अडचण काही जंगम वस्तूंपुरतीच मर्यादित आहे असेही नाही; कारण, वर्षातील वेगवेगळ्या ऋतूंत त्या भूदृश्यातील कित्येक स्थावर वस्तूंही आपले रूप बदलत असतात. —म्हणजेच हिवाळ्यातील भूदृश्य उन्हाळ्यातील भूदृश्याहून खूपच वेगळे असण्याचा संभव आहे. अशा बाबतीत सामान्य विधान करणेही शक्य होत नसल्याने, भूगोलकाराला वेगवेगळ्या ऋतूंतील वेगवेगळ्या भूदृश्यांच्या महत्त्वाला मान्यता द्यावीच लागेल.

नागरी भूदृश्यातील जंगम वस्तू दुर्लक्ष न करता येण्याइतक्या महत्त्वाच्या असतातच, पण ग्रामीण भूदृश्यातील एकूण संबंधित पृष्ठाचा अगदीच लहान अंश व्यापतात. त्यामुळेच, तर्कदृष्ट्या प्रत्यक्ष भूदृश्याचा तोही एक भाग आहे, अशी मान्यता देऊनही व्यवहारात मात्र त्याच्याकडे दुर्लक्ष केले, तर ती चूक नगण्यच ठरणार आहे.

भूक्षेत्राची अन्य रुपधेये निश्चितच त्या क्षेत्राचे भाग असत नाहीत. खनिजांचे साठे आणि भूमिगत खाणी हे खासच त्या भूदृश्याचे भाग म्हणता येणार नाहीत, कारण भूदृश्य संकल्पना भूपृष्ठाच्या हजारो फूट खाली नेण्याची आपल्यास परवानगी नाही. उलटपक्षी उघड्या खाणीतील खाणकाम हे त्या भूदृश्याचे स्पष्टपणे नजरेत भरणारे रुपधेय आहे. तसेच, कोणत्याही स्थळातील वनस्पतींचे एक संपूर्ण पृष्ठ जमिनीवर तयार होत असल्याने, त्यांच्या तळची पिकाऊ माती त्या भूदृश्याचा घटक होऊ शकत नाही. पण त्याच धान्यपिकांची कापणी झाल्यावर व नांगरट करून त्यातील सड काढून टाकल्यावर मात्र तीच शेत-माती, म्हणजेच पृष्ठ, त्या भूदृश्याचा एक घटक होतो. शेवटी, कोणत्याही क्षेत्रातील पर्जन्यमान हा त्या भूदृश्याचा घटक होत नाही तर त्या भूदृश्याशी संबंध असणारी एक घटना आहे. आणि त्या पृष्ठावर परिणाम करणारा तो एक कारक असण्याचीही शक्यता आहे.

आपण ज्याची "भूदृश्य" या नावाने व्याख्या करतो आहो, ती वस्तुस्थिती सारतः एक पृष्ठ आहे. या पृष्ठाचा बाह्याकार त्या पृष्ठाच्या चढ-उतारांनी निश्चित झालेला असतो. पण थोड्या प्रमाणात त्यावरील आरण्यांच्या उंचीचा आणि विशेषेकरून नागरीक्षेत्रांत मानव निर्मित इमारतींचाही त्याच्यावर परिणाम झालेला असतो. या भूदृश्याचे भौतिक रुप त्याचा रंग आणि पोत यांनी स्पष्ट केले जाते आणि त्याचे निरीक्षण दृष्टीने आणि स्पर्शाने करणे शक्य असते. त्या भूदृश्याच्या पृष्ठाकारापेक्षा वेगळ्या अशा त्याच्या भौतिक रुपाचे नामनिर्देशन करण्यासाठी "भूदृश्यावरण" या संज्ञेचा वापर करावयास हरकत नाही. बहुतेक सर्व जगभर या आवरणात बाह्यतम वनस्पतीपृष्ठ–– नैसर्गिक, रानवट, मशागतीचे असे कोणतेही–– व जलसंचयपृष्ठ यांचा समावेश होतो. (महासागरावर 'भूदृश्य' ही संज्ञा वापरावी काय याची चर्चा येथे करण्याची आवश्यकता नाही). ज्या भूमीवर वनस्पतींचा अभाव असतो ––मग तो कायमस्वरुपाचा असो–– अशा ठिकाणी भूदृश्यपृष्ठात उघडी जमीन, बर्फ किंवा हिम, किंवा मानवनिर्मित कार्यांचे पृष्ठ यांचा समावेश होतो.

या संकल्पनेतून भूगोलाला अत्यावश्यक वाटणारे पुष्कळसे घटक वगळले गेले आहेत, असा यावर कोणी आक्षेप घेतील, त्यांनी एक गोष्ट प्रथम लक्षात घेतली पाहिजे, की आम्ही येथे भूगोलाची व्याख्या करण्याच्या प्रयत्नात नाही किंवा भौगोलिक अभ्यासाच्या वस्तू मर्यादित करण्याचाही आमचा प्रयत्न नाही. मात्र, एका मूर्त वस्तुस्थितीची प्रतिमा निर्माण करू शकेल अशी "भूदृश्य" या संज्ञेची संभाव्य संकल्पना निश्चित करण्याच्या प्रयत्नात आहोत. भूगोलाने "भूदृश्य" ही संज्ञा मान्य केली त्याच्या किती तरी आधीपासून भूगोलविद्या अस्तित्वात होती, आणि तिच्या मदतीशिवाय भूगोलाचे काम पुढेही नडणार नाही. भौगोलिक अभ्यासाच्या वस्तू

म्हणून कशाकशांचा समावेश करावा हा, आणि भूदृश्याच्या एकरुप संकल्पनेत कोणत्या गोष्टींचा समावेश करावा हा, हे दोन स्वतंत्र व भिन्न प्रश्न आहेत. या दोनही बाबी स्वतंत्रपणे निश्चित केल्यानंतरच त्यांचा अन्योन्य संबंध विचारात घेणे शक्य होईल.

एका गोष्टीची पुनरावृत्ती करणे आवश्यक आहे, की येथे सादर केलेली ही संकल्पना कोणत्याही प्रकारे नवी मानलेली नाही. उलट ही संज्ञा वापरत असताना जो विचार भूगोलकारांच्या मनात असण्याचा संभव आहे तो विचार शब्दांकित करणे, हाच ती संकल्पना सादर करण्यामागचा हेतू आहे. उदाहरणार्थ, फींच जेव्हा " एखादे क्षेत्र दिसते कसे ? " अशा एखाद्या प्रश्नाच्या संदर्भात बोलत असतो, तेव्हा तो सामान्य संज्ञा वापरून, आम्ही वरती लिहून दाखविले आहे, बरेचसे तसेच काही तो सांगतो आहे, असे आम्ही गृहीत धरतो. (त्याने वापरलेले वाक्य शब्दशः अर्थाने घेतले तर त्यातून " निरिक्षकाला, ते क्षेत्र कसे दिसते?" असाच अर्थ सूचित होतो.)– पण याचा अन्वयार्थ संवेदनेच्या व्यक्तिनिष्ठ अर्थाने लावला जाण्याची शक्यता आहे. पण, संदर्भावरून पहाता, फींचला त्या भू–मानसिक (Geo-psychic) दृष्टिकोणाशी अगदी निश्चितपणे कांही संबंध नको होता. हे स्पष्ट आहे. तसेच, "पृथ्वीचा चेहरा–मोहरा" (The face of the Earth) हा लोकप्रिय शब्दप्रयोगही आपण व्याख्याबद्ध केलेल्या संकल्पनेकडेच थेट अंगुलिनिर्देश करतो.

"भूदृश्य" या संज्ञेसाठी आम्ही जी संकल्पना साकार करण्याचा प्रयत्न केला आहे, ती अशी एक संकल्पना आहे, की ती एखाद्या क्षेत्राचे कोणते तरी आगळे, पण सत्य स्वरूप दाखवून देते. तर मग, भूक्षेत्राच्या अभ्यास करत असताना, भूगोल याच एका रुपाशी जिव्हाळ्याचे संबंध ठेवत असतो काय? कदाचित्, भूगोलाने या एकाच रुपाचा अभ्यास करावयाचा असतो, असे तर नसेल !

यातील दुसऱ्या प्रश्नाचे उत्तर नकारार्थी आहे, याबाबत सर्वच वाचकांचे एकमत होईल, ही गोष्ट निर्विवाद आहे. उघड्या दगडी खाणींच्या उघड्या पडलेल्या खाणकामाबद्दल, त्या भूदृश्यावर राहिलेला एक व्रण या अर्थाने, जितकी आत्मीयता वाटते, तितकीच आत्मीयता त्या खाणींपेक्षा कितीतरी अधिक महत्त्वाच्या दगडी कोळशाच्या खाणीबद्दल भूगोलाला वाटतच असते; कारण त्याचे भूदृश्यातील प्रातिनिधि चिन्ह क्षुल्लक असले तरी, त्याच्या भूमिगत कार्याचे केवढे तरी विस्तृत क्षेत्र आवृतावस्थेत असते. भूगोलाला शेतमातींचा अभ्यास करावयाचा आहे ना, मग त्या मृत्तिका वनस्पतींच्या अभावामुळे त्या सतत उघड्या–बोडक्या पडलेल्या असोत, हंगामी आवरण असणाऱ्या असोत, अथवा आरण्ये आणि गवत यांच्या प्रभावामुळे नित्य आवरणाखाली असोत, अशा सर्व मृदांचा अभ्यास भूगोल करणारच! शिवाय, भूगोलात प्रत्यक्ष पद्धतीने अभ्यासावयाच्या घटकांपैकी एक हवामान विषयक परिस्थिती हा एक घटक आहे, याबाबत जवळ जवळ सर्व भूगोलकारांचे एकमत आहे. शब्दशः अर्थाने पहाता, भूदृश्य हे आपल्या पुरती एक वरपांगी घटना आहे. आणि तेवढ्यावरच लक्ष केन्द्रित करणारे कोणतेही शास्त्र तितकेच वरकरणी असणार. त्या दृश्याने

निर्माण केलेल्या चित्रापुरतेच —पेंकच्या शब्दांत सांगावयाचे तर, "त्या विशाल चादरीवरील सौंदर्याकृतीपुरते " — आपण त्या भूदृश्यावरच लक्ष केन्द्रित करणार असलो तर, तो सरळ सरळ "सौंदर्य बोधक दृष्टिकोण" ठरेल! उलटपक्षी, 'दुसऱ्या कशाचा तरी अविष्कार' म्हणून त्या भूदृश्याकडे आपण लक्ष देणार असलो, तर, त्या क्षेत्रातील संबंधित कारकांच्या गोतावळ्याचा म्हणजेच त्या दुसऱ्या कोणत्यातरी वस्तूचा, अभ्यास करण्याचे केवळ एक साधन म्हणून त्या दृश्याचा उपयोग आपण करत असतो; मग त्या दुसऱ्या वस्तूची व्याख्या एक संपूर्ण गोतावळा अशी असो की, ते प्रत्यक्ष क्षेत्र अशी असो !

'भूगोल म्हणजे भूदृश्यांचा अभ्यास' अशी भूगोलाची व्याख्या करणे अशक्य होऊन बसले याला कारण, भूदृश्य या संकल्पनेची एक विशिष्ट व्याख्या बनविण्याचा आम्ही खटाटोप केला, हेच आहे! खरे म्हणजे, त्या हेतूने आम्ही आमची व्याख्या बनवलेलीच नव्हती. "जे प्रत्यक्ष क्षेत्र नाही, पण त्याच्या संबंधी काहीतरी आहे, ते " अशा अर्थाने हा शब्दप्रयोग वापरत असताना, भूगोलज्ञांच्या मनात असलेली एक संभाव्य सत्यस्थिती, आम्ही सरळ शब्दांनी स्पष्ट केली इतकेच! याच्या विरुद्ध, ज्यांनी ' भूगोल म्हणजे भूदृश्यांचा अभ्यास ' या संकल्पनेचे प्रवचन केले, त्या प्रवक्त्यांनाच आपला मुद्दा पटविण्यासाठी आपल्या हातातल्या पत्त्यांची पुन्हा पुन्हा जुडी करण्याची खोड होती. हे लोक नित्याच्या परिपाठात भूदृश्यांसंबंधी बोलताना, " ते क्षेत्र जसे दिसते तसे ", 'दर्शनीय दृश्य', अशी भाषा वापरत असले तरी, पद्धतीतंत्र विषयक युक्तिवाद करताना मात्र या संकल्पनेला अन्य काही विशेषणांची पुस्ती जोडतात. कारण, त्यामुळे भूगोलाची जी जी रुपधेये भूगोलात समाविष्ट होणे त्यांना इष्ट वाटते त्यांचा त्यांचा त्यात समावेश करणे त्याना शक्य होते. याच्या उलट, 'भूदृश्य' या संज्ञेची जी व्याख्या आम्ही तयार केली आहे, ती भूगोलाच्या कोणत्याही प्रमेयावर अवलंबून ठेवलेली नाही. त्यामुळेच, ' भूगोलाभ्यासाच्या हेतूची घटना कोणत्या स्वरुपाची आहे ? " अथवा,' भूगोलविषयक अभ्यासात कोणत्या प्रकारच्या घटनांचा समावेश केला जातो ? ' अशा प्रकारची याचना त्या व्याख्येला करत बसावी लागत नाही, तर त्या प्रश्नांची उत्तरे त्यांच्या त्यांच्या गुणवत्तेनुसार द्यावयास त्यांना मैदान मोकळे ठेवते.

भूगोल व भूदृश्य यांच्या मूलभूत संकल्पना एकमेकांपासून स्पष्टपणे वेगळ्या करणे आवश्यक आहे, ही गोष्ट डिकिन्सन आणि क्रौव यांच्या चर्चेतून सिद्ध झालेली आहे. भूदृश्याचा अभ्यास हा भूगोलक्षेत्राचा एक 'अंगभूत अवयव' आहे, हा दृष्टिकोण आणि तो क्षेत्राचा मध्यवर्ती हेतू आहे, हा दृष्टिकोण या दोहोतील भेद हाच एकूण प्रश्नाचा आधारबिंदू आहे, असे क्रौव आग्रहाने सांगतो, तर डिकिन्सनला हा भेद गौण वाटतो. खरेतर, तशी प्रत्यक्ष मान्यता न देता, डिकिन्सनने असा निष्कर्ष काढलेला दिसतो, की भूगोल हा केवळ भूदृश्यांचा अभ्यास नव्हे. "भूदृश्य आणि समाज व त्यांचे त्या क्षेत्रापुरते असणारे साहचर्य व त्यांच्यात होणारे फेरबदल यांचा त्यांचे त्यांचे जन्मसिद्ध विकास आणि गतिमान संबंधयोग या दोहोंच्या संदर्भात लावलेले अन्वयार्थ यातूनच कोणत्याही क्षेत्राच्या भौगोलिक अभ्यासाचे हेतू स्पष्ट होत

असतात." (१३) "भूदृश्याचा अभ्यास भूगोलाला सुस्पष्ट हेतू देऊ शकत नाही", या त्याच्या समारोपाच्या विधानाने जी वस्तुस्थिती त्याने अगदी स्पष्टपणे बोलून दाखविली होती, तीच वस्तुस्थिती त्या सामान्य संकल्पनेला अनेक तर्कशुद्ध दुरुस्त्या जोडून त्याने प्रत्यक्षपणे तपशीलवार मांडून दाखविली. भूदृश्य आणि समाज यांचा अभ्यास हा 'एकच हेतू' नव्हे, तर ते निदान दोन हेतू आहेत. नाहीतर, ती व्याख्या भूदृश्य आणि समाज या दोहोंतील संबंधयोगांचा अभ्यास अशी करावी लागेल; आणि नेमका याच संकल्पनेचे खंडन करण्याचा त्याचा प्रयत्न आहे.

भूगोल जगाच्या क्षेत्रांचा अभ्यास करत असतो, या व्याख्येबाबत भूगोलाचा क्षेत्रवर्णवादी दृष्टिकोण असणाऱ्या सर्वजणांचे एकमत होण्यास हरकत नाही. अशा या सरळ विधानाचा व्याख्यारुपाने पुनरुच्चार केला, आणि त्याबरोबरच भूदृश्य हे त्या क्षेत्राचे असे एक रुप आहे, की त्यात भूगोलाला अभ्यासावयाच्या काही गोष्टींचा समावेश होतो. पण त्यातील सर्वच गोष्टींचा त्यात समावेश होत नाही. या वस्तुस्थितीलाही मान्यता दिली तर, भूगोलकाराच्या दृष्टीने भूदृश्य या संकल्पनेची सर्वसाधारण उपयुक्तताच कोठे राहिली ! भूदृश्य हा भूगोलाचा 'अंगभूत भाग' आहे, हे सिद्ध करण्याची आवश्यकताच रहात नाही मात्र तो भाग थोड्याफार महत्त्वाचा आहे येवढे सिद्ध करण्याची गरज रहाते. पण हे सर्वच स्वयंसिद्ध नाही का? विविधप्रकारच्या दृष्टिकोणातून ते क्षेत्र कमीजास्त प्रमाणात कसे दिसते, याचे सर्वसामान्य परीक्षण करणे हा भौगोलिक क्षेत्रीय कार्याचा —अगदी पहिला नसला तरी— अभ्यासाच्या पहिल्या टप्प्यांपैकी एक आहे याबाबत सर्वांचे एकमत होईल, असे येथे गृहीत धरले आहे. लाऊटेनजाक तर म्हणतो, की "भूगोलाभ्यासाची सुरवातच एखाद्या क्षेत्राच्या चित्रणाने (Bild), (आकाररुपाने वा चित्ररुपाने) होत असते" (२७८, २१). कोणत्याही क्षेत्रात प्रवेश केल्या केल्याच भूगोलज्ञांचे लक्ष आरण्ये, शेतमळे आणि नगरे यांच्यातील विरोधांकडे जाते. ते प्रथमपासूनच आंतरमृत्तिका अथवा मासिक तपमान अशा बाबींच्या फंदात पडत नाहीत. या पहिल्या टप्प्यात, कशाचेही घन समीक्षक (Perspective) नजरेतून दिसते तसे 'चित्र' पहाण्याऐवजी सर्वसमीक्षक नजरेतून दिसते तसे 'चित्र' पहाण्याच्या त्या भूगोलज्ञाचा प्रयत्न असतो; कारण, त्याची नजर यावेळी भेदक असत नाही. प्रत्यक्षात्, आपण प्रथम अभ्यास करतो तो बाह्यपृष्ठांचाच असतो. याचाच अर्थ ही लांबरुंद, सुरकुतलेली, पृष्ठाकार चादर आपण तपासून पहात असतो. त्या पृष्ठाचा पोत, त्यावरील सौंदर्याकृती, तसेच टेकडांमुळे व इमारतींमुळेही त्या पृष्ठाला आलेल अनियमित आकार, या सर्व गोष्टी लक्षात घेत असतो. अर्थात् त्या क्षेत्राने आपल्यापुढे सादर केलेले वातावरणाखाली असलेले भूपृष्ठ —म्हणजेच तेथील "भूमीचा चेहरा मोहरा"— अभ्यासत असतो. (c/o पेंक २४९, ८).

कोणत्याही क्षेत्राचे परीक्षण करताना, आपण समोर दिसत असते त्या दृश्यापासूनच सुरुवात करतो. या वस्तुस्थितीमुळेच, पुष्कळांचा असा समज झाला आहे, की डिकिन्सन ज्याला

"मूलभूत संपर्क मार्ग " असे नाव देतो तो मार्ग हाच असला पाहिजे. डिकिन्सनचा हा मार्ग म्हणजे, ज्याला आपण भूम्याकारशास्त्रीय दृष्टीकोन असे म्हणावयास हरकत नाही, त्या मार्गाचाच नैसर्गिक परिपाक आहे. विशेषेकरून सॉरने त्याचे विवरण केले व त्याचा रिक्टोफेन या आधुनिक भूम्याकारशास्त्रांच्या (Geo-Marphology) प्रवर्तकापर्यंत नेऊन पोचविण्यास हरकत नाही असेही प्रतिपादन केले. भूदृश्य म्हणजे दृश्य भूपृष्ठ —हे त्या क्षेत्राच्या एकूण गोतावळ्याच्या दृष्टीने, अदृश्य असणाऱ्या हवामानापेक्षा अधिक मौलिक आहे, किंवा लोकांपेक्षा त्यांनी बांधलेल्या इमारती अधिक मूलगामी स्वरुपाच्या असतात असे प्रमेय, प्रात्यकक्षिकांसह कोणी सिद्ध केलेले नसतानाही ते गृहीत धरले गेले आहे. खरे पहाता, 'शुद्ध भूदृश्य' वाद्यांच्या संकल्पनेला डिकिन्सनने जोडलेल्या पुस्त्या अगदीच किरकोळ दुरुस्त्या नाहीत, तर त्या प्रमुख महत्त्वाच्या आहेत. भूदृश्य हे मूलगामी नाही, तर तो मूलगामी असलेल्या गोष्टींचा— म्हणजेच त्या क्षेत्रातील अन्योन्य संबंध असलेल्या सत्यस्थितींचा— केवळ एक बाह्याविष्कार आहे; या वस्तुस्थितीमुळेच वरील दुरुस्त्या करणे त्याला भाग पडले. भूगोलातील मूलगामी दृष्टिकोण हा त्यातील मूलतत्त्वांशी संपर्क साधणारा असला पाहिजे ही गोष्ट गृहीत आहे—मग तो संपर्क भूदृश्यमार्गे असो किंवा कोणत्या अन्य मार्गाने असो!

उलटपक्षी, आपण आपला अभ्यास क्षेत्राच्या बाह्यरुपापासून, म्हणजेच भूदृश्यापासून, सुरू केला, तर त्यात आढळणाऱ्या गोष्टींचा अन्वयार्थ लावण्याच्या प्रयत्नात, शेवटी, त्या क्षेत्राच्या दृष्टीने महत्त्वाच्या असणाऱ्या बहुतेक सर्वच अर्थपूर्ण गोष्टींचा समावेश आपणास करावा लागेल. भूगोलाभ्यासकांना भूदृश्य उपयुक्त वाटते ते, केवळ सहजपणे हाती लागते म्हणून नव्हे, तर त्याच्या रुपांचा अभ्यास आपल्याला त्या क्षेत्राच्या निदान बहुतेक सर्व महत्त्वाच्या रुपधेयांच्या अभ्यासाचा मार्ग दाखवितो म्हणून भूदृश्याच्या संकल्पनेची—आवश्यक तितक्या मर्यादित सत्यप्राय अर्थाने आम्ही जिचे विधान केले आहे त्या संकल्पनेची— उपयुक्तता त्यामुळे पुष्कळशी सिद्ध झालेलीच आहे. तरीही, प्रादेशिक अभ्यासाच्या समस्येची किल्ली ही कल्पना आणि अशा अभ्यासाचे अत्यावश्यक साध्य या दोन कल्पनांची आपण गफलत करता कामा नये. कोणत्याही क्षेत्राच्या भूगोलाच्या दृष्टीने महत्त्वाच्या बहुतेक सर्व कारकांचा आविष्कार भूदृश्यात झालेलाच असतो. येवढ्या वस्तुस्थितीच्या आधारे, ज्या कारकाला त्या भूदृश्यात फारसा महत्त्वाचा आविष्कार लाभला नाही, तो त्या क्षेत्राच्या भूगोलाच्या दृष्टीने महत्त्वाचा असतच नाही. असे सिद्ध होते, असे आपण गृहित धरता कामा नये. वरील प्रमेय संश्लेषण पद्धतीने सिद्ध होत नाही —म्हणजेच ते सर्व संभाव्य क्षेत्रांसाठी नाही. अर्थातच ते प्रत्येक विशिष्ट क्षेत्रात स्वतंत्ररीतीने विचारात घेणे प्राप्त आहे. तसेच, लक्षणीय प्राप्त झालेले त्या भूदृश्यातील एखादे रुपधेय तितक्याच प्रमाणात त्या क्षेत्राच्या भूगोलातही ते महत्त्वाचे असले पाहिजे, असे सामान्य प्रमेयही गृहीत धरता येण्यासारखे नाही. पण, त्या क्षेत्राच्या भूगोलाच्या दृष्टीने भूदृश्य हा कितीसा विश्वसनीय मार्गदर्शक आहे याचा विचार पुढे केला जाईल. (c/o ब्रोक २९७, १०४).

शेवटी आपण पुढे ढकललेल्या त्या प्रश्नाकडे आपल्याला वळलेच पाहिजे. जरी ही संकल्पना फार उपयुक्त असली, आणि जरी पुष्कळसे भूगोलकार "भूदृश्या" संबंधी बोलत असताना त्यांच्या मनांत असलेल्या अर्थाचे निश्चित स्वरूप काय होते ते या संकल्पनेमुळे मांडता येते हे खरे असले तरी, भाषाशास्त्रदृष्ट्या त्या अर्थाने या शब्दाचा आपण केलेला वापर समर्थनीय आहे का, या प्रश्नाचे उत्तर देणे आवश्यक आहे. हा प्रश्न, म्हणजे परिभाषाविषयक प्रश्न तर्क संगतीने अथवा वस्तुनिष्ठ दृष्टीने निकालात काढता येत नसल्यामुळे, तो आपल्या न्यायनिर्णयबुद्धीचाच विषय ठरतो, सामान्य भाषेत 'भूदृश्य' (Landscape) हा कधीकधी क्षेत्रनिर्मित, इन्द्रियग्राह्य, निःशेष प्रतिबोध या अर्थाने वापरला जात असतो, तसाच तो शब्द त्या भूदृश्याचा दृष्टिनिर्मित ठसा या मर्यादित अर्थानेही वापरला जातो आणि तसाच तो ज्यामुळे हा प्रतिबोध निर्माण होतो ते त्या भूदृश्याचे सत्यरुप या अर्थानेही वापरला जात असतो. प्रत्यक्षात या सामान्य संकल्पनांपैकी कोणत्याही एकाचे सरळ आणि अचूक विधान आपल्या या संकल्पनेने होत नाही सामान्य भाषेतील शब्दाचे शास्त्रीय परिभाषेत अवस्थांतर होताना त्या शब्दाची संकल्पना सामान्यतः ताणण्याची जेवढी परवानगी असते, निदान त्यापेक्षा कितीतरी कमी ताणाताणी आपल्या या संकल्पनेची झाली आहे. म्हणूनच, आपण केलेला हा वापर भूगोलदृष्टी नसलेल्या वाचकांनाही फारसा ताणल्यासारखा वाटणार नाही; उलट, तसा वापर न्याय्य आहे अशी ग्वाही देतील अशीही अपेक्षा करण्यास हरकत दिसत नाही. पण, तेच "भूदृश्य" म्हणजे कोणतेही एखादे क्षेत्र असू शकते असे कोणी सांगितले तर मात्र ते निश्चितपणे आक्षेप घेतात.

इतकेच काय, हातचे काकण पहाण्यासाठी आरसा दाखवण्याचा हा येवढा खटाटोप करण्याची गरजच काय, असेही काही वाचकांना वाटण्याचा संभव आहे. अलिकडच्या भौगोलिक साहित्यात भूदृश्य (Landscape) आणि Landschaft (भूक्षेत्र दृश्य) या शब्दांचा किती विविध व वेगवेगळ्या अर्थाने उपयोग करण्यात आलेला आहे हे समजून घेण्याचा ज्यांनी प्रयत्नच केला नाही त्यांच्या मनात अशी शंका येण्याची शक्यता आहे. या संज्ञेच्या भूगोलातील वापरात स्पष्टपणा आणण्यात कोणाला यश आले असेल आणि त्यासाठी आम्ही केले त्याच्या दसपट अधिक श्रम त्याला करावे लागले असतील तरीही त्याचे यश त्याच्यासाठी द्याव्या लागणाऱ्या मूल्याच्या तुलनेने कितीतरी अधिक मोलाचे ठरू शकेल.

कोणतीही संभाव्य अनिश्चितता टाळण्यासाठी, आपण झालेल्या विषयावर थोडीशी फेरनजर टाकू या. भूदृश्य ही एक संवेदना आहे या तत्त्वावर आधारलेल्या संकल्पनांपैकी कोणत्याही एका संकल्पनेची भूगोलासारख्या आधिभौतिक शास्त्राला मुळीच गरज नाही. त्यांच्या संयुक्तिक क्षेत्रांत तशा तशा अर्थांनी रुढ असलेल्या या संज्ञेच्या वापरास धक्का न लावता, आपल्या हेतुसिद्धीसाठी कोणत्यातरी बाह्य वस्तुस्थितींच्या परिभाषेत त्याची व्याख्या करण्यास काहीच हरकत नाही. 'भूक्षेत्र' (Area) किंवा 'प्रदेश' (Region) यांना समानार्थी म्हणून ही संज्ञा वापरणे अनावश्यक आहे, आणि तशी ती वापरल्याने गोंधळही माजणार आहे,

कारण त्या संज्ञा मुळातच कितीतरी स्पष्ट आहेत. काही भौतिक वस्तूंवर लावण्याचे ओळखपत्र म्हणून ' भूदृश्य ' (Landscape) या संज्ञेचा वापर म्हणजे एका फार मोठ्या संचयातून घेतलेल्या काही निवडक घटनांच्या संग्रहाला त्यांच्या अंगी नसलेला एक गुण चिकटविल्यासारखे होणार आहे, ––हा गुण म्हणजे एकच एक सत्यस्थिती त्यांच्यामुळे संघटीत होते हा होय. सर्व दृश्य वस्तूंबरोबर, त्या वस्तूंच्या अंतर्भागात डोकावल्याने मानवी नजरेला दिसू शकणाऱ्या सर्वांचा समावेश करून निर्माण होणाऱ्या त्या क्षेत्रातील वस्तुजात या अर्थाने तीच संज्ञा स्वैरपणे वापरली तरीही तोच प्रकार होणार आहे. या संज्ञेची व्याख्या करण्याचे कष्ट न घेताच ज्यांनी तिचा वापर केला आहे, त्यांच्याही विचारांच्या अंतःप्रवाहात एकमेव प्रत्यक्ष व मूर्त सत्यस्थिती दडलेली असते–– आणि ते म्हणजे बाह्य दृश्य भूपृष्ठ. या सत्यस्थितीतूनच आपल्या अंतःकरणात भूदृश्यसंवेदन निर्माण होते. सर्व जगाचा विचार करता ती एक अखंड सत्यस्थिती असून त्यामुळे एकमेव संपूर्ण एकक संघटीत होते. पण शब्दशः अर्थाने ते एक पृष्ठ आहे. आणि जेवढे स्पर्शाने समजते तेवढेच त्यात समाविष्ट असते. त्याचा बराचसा मोठा भाग जलाशयांच्या पृष्ठाने आणि वनस्पतींच्या अत्युच्च पृष्ठाने–– मग ते वनस्पती नैसर्गिक असोत किंवा संस्कारित असोत–– अथवा उघड्या भूमीने वा हिम आणि बर्फ यांनी तयार झालेला असोत. जलाशय वगळले, तर ही सर्व पृष्ठे प्रतल-पृष्ठांपासून, म्हणजेच भूतल (Geoid) पृष्ठापासून, वरखाली गेलेली असतात. हा फरक मुख्यतः भूमीच्या उंचसखलपणानुसार झालेला असतो. इमारती पक्के हमरस्ते अशा मानवनिर्मित पृष्ठांनी, जगाच्या या प्रत्यक्ष भूदृश्यांचा एक अगदी किरकोळ भाग व्यापलेला असतो ; उलट, त्याने मशागत केलेल्या शेतांनी बराच मोठा भाग व्यापलेला असतो. भूदृश्याच्या या विविध भागांचे सापेक्ष महत्त्व, त्यांचेच पण जागतिक एकूण क्षेत्रीय भिन्नता प्रमाणात असणाऱ्या सापेक्ष महत्त्वाचे प्रातिनिधिक रुप असेलच असे नाही, अशी पुस्ती जोडण्याची येथे गरज नाही. या दोन संकल्पनांचा अगदी निकटसंबंध असला तरीही त्या एकरुप नाहीत.

भूदृश्याच्या संकल्पनेची स्पष्ट आणि उपयुक्त व्याख्या करण्यात आपल्याला यश आले असण्याची शक्यता असती, तरी तेवढ्याने जर्मन शब्द Landschaft (भूक्षेत्रदृश्य) याचे भाषांतर कसे करावे या प्रश्नाची उकल आपल्याला करता आली, असा दावा करता येण्याची शक्यता नाही. भूगोलविषयक पद्धतितंत्रशास्त्रात असलेले जर्मन भाषिक भूगोलकारांचे (यातच ग्रान्योसारख्या फिन् व अन्य देशीय लेखकांचाही समावेश आहे, कारण त्यांचे साहित्य आम्हाला फक्त त्यांच्या जर्मन प्रकाशनांतूनच वाचावयास मिळते.) प्रभावी महत्त्व पहाता, आणि एक मौलिक संकल्पना म्हणून या संज्ञेचा वापर यापैकी अनेक लेखक सतत करत असतात याचा विचार करता, ही उणीव फार दुर्दैवाचीच समजली पाहिजे. प्रत्येक जर्मन लेखक स्वतःच्या कल्पनेनुरुप ' भूक्षेत्रदृश्य ' (Landschaft) या शब्दाचा उपयोग करत आला असल्याने त्याचे भाषांतर करावयाचे झाले तर पुष्कळच संज्ञा आपल्यास वापराव्या

लागतील. जेथे Landschaft हा शब्द केवळ भूक्षेत्र एवढ्याच अर्थाने लेखकाने वापरला आहे हे स्पष्ट असेल, तेथे पेंकच्या सूचनेनुसार त्याचे भाषांतर Region या शब्दाने करण्यास हरकत दिसत नाही (c/o १५९, ६४०). सापेक्षतः काही थोड्या बाबतीत लेखकाचे विचार ' भूदृश्य संवेदन ' (Landscape sensation) या आणि इतर काही ठिकाणी '.भूदृश्य ' (Landscape) – वर दिलेल्या व्याख्येनुसार या संज्ञांनी भाषांतर करण्यास हरकत नाही. पण, बऱ्याच बाबतीत आवश्यक तेवढी निश्चितता न आढळल्यामुळे त्या शब्दाचे भाषांतर करणे अशक्य असल्याने प्रस्तुत लेखकाला दिसून येते आणि मग तो सरळ मूळचा शब्दच अवतरणात घालतो. अशावेळी त्याचा नेमका अर्थ काय करावयाचा हा निर्णय घेण्यासाठी वाचकाला पाठ संदर्भ तरी घ्यावा लागेल किंवा मूळ लिखाणाचा संदर्भ घ्यावा लागेल. इतके करूनही त्याच्या प्रश्नाचे उत्तर त्याला मिळेलच, असे आश्वासन देता येणार नाही. थोडक्यात, या संज्ञेने (Landschaft) ने एकतर सरळ 'क्षेत्र', 'प्रदेश' अथवा 'प्रांत' असा अर्थ सूचित होतो, किंवा साधारणपणे अनुल्लेखित अशा अन्य काही उपाधी वगळून अगर वाढवून झालेला, पण बऱ्याच अंशाने त्यांच्यासारखा दिसणारा, कोणीतरी एक या संज्ञेने सूचित होत असतो, असे बऱ्याचशा बिनधोकपणे त्या वाचकाने गृहीत धरावयास हरकत नाही. या कारणानेच, तो मूळ शब्द भाषांतरित न करता, कितीही वेळा तो वापरावा लागला तरीही, एक परकीय भाषेतील शब्द म्हणूनच तो आम्ही छापत राहणार आहोत. नाहीतर, जर्मन भाषेत भरपूर गोंधळ घातलेल्या एका शब्दाला आपल्या भाषेत आणून येथेही गोंधळ घालण्यास प्रोत्साहन दिल्याचा दोष आमच्या माथी येईल. [५९]

---

५९. अन्य भाषेत कार्य करणाऱ्यांना त्यांच्या समस्येची उकल सुचविण्याचा आमचा अधिकार नाही. सुदैवाची गोष्ट अशी, की मुळातच Landschaft या शब्दाचा, राज्याचा एक लहान भाग या अर्थाने, वापर जर्मन भूगोलक्षेत्रात इतका पक्का रुजलेला आहे, की तो अर्थ बदलण्याचा प्रयत्न करणाऱ्या कोणाही लेखकाच्या पदरात निराशाच पडते. Landsteil (भूभाग) हा शब्द अधिक स्पष्ट वाटेल; पण त्यात त्या दुसऱ्या शब्दांतील काही लक्षणांचा अभाव राहील. या — आणि तो केवळ गूढवादी शब्दांचाच असेल असेही नाही. Raum (अवकाश) हा शब्द तर आणखी सोपा आहे. ग्योल्सची संज्ञा chore (भूभाग) अनेकांनी स्वीकारली आहे. आता Landschaft च्या या अनेकानेक व्याख्यामुळे त्या शब्दाला शास्त्रीय क्षेत्रात मूठमाती देण्याची वेळ आलीच, तर ग्रीक भाषेतील शब्दापासून तयार झालेला हा शब्दच त्याचा स्वच्छ पर्याय होऊ शकेल. Landscape (भूदृश्य) या शब्दाची व्याख्या आपण केलेली आहे त्याच अर्थाने पुष्कळशा लेखकांनी वापरलेला Landschaftsbild (भूक्षेत्रचित्र) हा शब्दच योग्य आहे. पण निदान चालू पिढीतील जर्मन भूगोलकार या दोनही अर्थांनी Landschaft हा एकच शब्द वापरण्याचा आपला प्रघात चालूच ठेवतील; तसे करताना ते कोणताच अर्थ मनात धरणार नाहीत; किंवा आपली स्वतः एखादी खास व्याख्याच मनात धरतील; ही त्यांची व्याख्या शब्दबद्ध असेल किंवा सूचितही असेल; तो अर्थ आणि ती व्याख्या त्या संपूर्ण प्रबंधात सातत्याने वापरलेली असेल किंवा नसेलही; आणि मग त्यांचे जर्मनदेशीय व परदेशीय वाचक हे वाचून असेच गूढभ्रान्त (Mystefied) होत रहातील; असेच भविष्य वर्तविणे बहुधा सुरक्षित ठरेल !

## क—नैसर्गिक व सांस्कृतिक भूदृश्ये

'भूदृश्य' या संज्ञेच्या अर्थासंबंधीची ही चर्चा आपण "नैसर्गिक भूदृश्य" व "सांस्कृतिक भूदृश्य" या सामासिक शब्दाच्या अर्थाचे विधान करून संपवणेच योग्य होईल. वर ज्याचा उल्लेख आलेला आहे त्या संदर्भात आणि त्या नंतरच्या त्याच्या आकृतीतही, सोरने या दोन संज्ञांच्या संकल्पना ज्या नमुन्यात सांगितल्या आहेत (८४, १८६, १९०) त्यावरून असे सूचित होते की, एकाच संपूर्ण 'भूदृश्याचे' हे स्वतंत्र घटक आहेत. पहिल्यात त्या क्षेत्रातील सर्व नैसर्गिक रुपधेयांचा व दुसऱ्यात सर्व मानवनिर्मित रुपांचा समावेश होतो. एखाद्या क्षेत्रातील केवळ भौतिक रुपधेयांचा संचय या अर्थाने भूदृश्य हा शब्द समजून घेतला, तर वर दिलेली विभागणी तर्कशुद्ध आहे असे मानण्यास हरकत नाही. पण, त्यांतील मानवरचित सांस्कृतिक रुपे ज्या नैसर्गिक आधारावर उभारलेली असतात, त्यांपासून ती विभक्त करून त्यांचा संच एक प्रकारचे 'भूदृश्य' म्हणून विचारात घेता येईल, या वरील विभागणीत अनुस्यूत असलेल्या सुचनेमुळे, त्या बिचाऱ्या शब्दाची ओळखही पटू नये इतकी ओढाताण होणार आहे. ही अडचण लक्षात घेऊनच भूदृश्यातील सांस्कृतिक व नैसर्गिक घटकांचे रुपभेद स्पष्ट करावे अशी सूचना ब्रोकने केली आहे (२९७, १०४).

त्या भूदृश्यातील सांस्कृतिक घटकांचा स्वतंत्र विचार करू लागले, तर त्यांची केवळ गोळाबेरीज केल्याने एक एकरुप एकक तयार होत नाही; पण एका एककाच्या ––म्हणजे त्या संपूर्ण भूदृश्याच्या— अनेक भागांचा तो एक संग्रह तयार होतो. वर्तमान भूदृश्यातील नैसर्गिक घटकांची गोळाबेरीज केल्यानेही तीच गत होणार हे अटळ सत्य आहे. मानवनिर्मित सांस्कृतिक रुपधेये अलग करून उरलेल्यांचा आपण विचार करू लागलो, तर त्यांचेही " नैसर्गिक भूदृश्य " होणार नाही. तोही सत्यसृष्टीतील एका भूदृश्याचा भागांचा संग्रहच होणार. कारण, केवळ बौद्धिक आधारावर ते भाग आपण सांस्कृतिक भागांपासून वेगळे दाखवत असतो. प्रत्यक्षात ते दोनही भाग एकाच प्रकारच्या पार्थिव पदार्थांपासून, अर्थात माती, पाणी, वनस्पती इत्यादींपासून, बनवलेले असतात.

"सांस्कृतिक भूदृश्य" ही संज्ञा वापरत असताना, बहुतेक सर्व अमेरिकी भूगोलकारांच्या मनात कोणत्याही वसाहत असलेल्या प्रदेशाचे वर्तमान भूदृश्य येवढाच अर्थ असतो. अर्थातच, संपूर्ण वर्तमान भूदृश्य याच्या उलट "नैसर्गिक भूदृश्य" असा भर देणे जिथे आवश्यक असते तेथेच तशा अर्थाने त्या शब्दाला मागणी असते––(c/o लाउटेनजाक, २७८).

जर्मन साहित्यात "Naturliche Landschaft" आणि "Nature Landschaft" या दोहोत भेद केला जातो. दुसऱ्या संज्ञेतील Nature याचा अर्थ मानवरहित निसर्ग असा होतो,

तर पहिल्यात तो सर्वसमावेशक आहे. मात्र त्याने "स्वैर" किंवा "कृत्रिम" याच्या विरुद्ध 'प्रत्यक्ष' किंवा 'सत्यस्वरुप' असा अर्थ सूचित होतो. आणि तो विशिष्ट Landschaft, प्रदेश या अर्थाने, एक सत्यस्वरूप एकक म्हणजे "Natureliche Einheit" आहे हे सूचविण्यासाठी तो शब्दप्रयोग केला जातो. (c/o ब्यूर्गर ११, २९). बेबलला असे आढळून आले की, खुद्द जर्मन भाषेतच हा गोंधळ टाळणे अवघड आहे, कारण या दोनही बाबतीत इंग्रजीत करावयाचे भाषांतर तंतोतंत एकच आहे. अशा स्थितीत पहिली संज्ञा मुळातूनच काढून टाकावी ही त्याची सूचना मान्य होईल अशी अपेक्षा करणेच प्राप्त आहे. (२६६).

काही सापेक्ष आधारावर Naturlandschaft व Kulturlandschaft (नैसर्गिक भूक्षेत्रदृश्य व सांस्कृतिक भूक्षेत्रदृश्य) यांच्यातील विरोधाचा काही जर्मन अभ्यासकांनी उपयोग करून घेतला आहे. हा आधार सांस्कृतिक विकासाच्या विस्तारासंबंधीचा आहे (क्रेब्स, २३४, ८४; ब्यूर्गर, ११, ६३). यामुळे वर्गीकरणाबाबत मोठ्याच अडचणी निर्माण होण्याची शक्यता आहे हा आक्षेप गौण आहे. त्यापेक्षा महत्त्वाची वस्तुस्थिती अशी आहे की, Naturlandschaft (नैसर्गीक भूक्षेत्रदृश्य) अथवा Nature Landscape (नैसर्गीक भूदृश्य) यांच्या व्याख्या आम्ही कशाही केल्या तरी दृश्ये खरोखरीच नैसर्गिक म्हणजे, मानवासृष्ट आहेत हा त्याचा गुणार्थ त्याला चिकटून रहाणारच आहे. म्हणूनच, ते दृश्य एका विशिष्ट प्रकारे बऱ्याच मोठ्या प्रमाणात नैसर्गिक असते, असे आपण गृहीत धरले आहे, या वस्तुस्थितीकडे आपले दुर्लक्ष होण्याची शक्यता आहे. सुदानला "नैसर्गिक भूदृश्य" म्हणून संबोधणे म्हणजे " साव्हाना (कुरणप्रदेश) हा केवळ निसर्गनिर्मित आहे काय?" किंवा 'तो निर्माण होण्यास, अंशतः का होईना, मानव कारणीभूत झाला आहे काय?' अशा प्रश्नांपुढे उत्तराची याचना करण्यासारखेच आहे. (c/o बेबल २६६, आणि लाउटेनजाक २७८, २०) ही एक केवळ बौद्धिक संकल्पना आहे असे मान्य केले तरीही मानवी कार्य आणि निसर्गाच्या अन्य शक्तींचे कार्य यांच्या परिणामातील विरोध हा विषय भूगोलाच्या दृष्टीने फारच महत्त्वाचा आहे, म्हणूनच, त्याला असा सुरुंग लावू दिला जाता कामा नये.

पण या आधारानुसार विचार करू गेल्यास, जेथे मनुष्याचा हात कधी पोहोचलाच नाही अशा क्षेत्रातच काटेकोर अर्थाने प्रत्यक्ष "नैसर्गिक दृश्य" आढळू शकेल. त्यापूर्वी मानवाने कधीच पाय ठेवला नाही पण वसाहतीला प्रतिकूलही नाही अशा एखाद्या बेटाला प्रथम भेट* देणाऱ्या निरीक्षकालाच, केवळ जलाशय, जमिनीचा चढउतार आणि नैसर्गिक वनस्पती यांनी बनविलेले ते नैसर्गिक दृश्य दिसले असेल. पण वसाहती असलेल्या जगाच्या भागात ही संकल्पना केवळ औपपत्तिक स्वरुपाची ठरते. निदान सुसंस्कृत जगाच्या आरपार कोणाही हयात व्यक्तीस नैसर्गिक भूदृश्य पहावयास मिळालेले नाही. अगदी आदिमक्षेत्रातही भरीव सांस्कृतिक रुपांचा अभाव असतो येवढ्या आधारावर आपण पहातो आहोत ते प्रत्यक्ष नैसर्गिक भूदृश्यच आहे असे गृहीत धरणे धोक्याचे आहे हे आपण ध्यानात घेतले पाहिजे. ऑस्ट्रेलियाच्या आदिम भूदृश्यांसंबंधीच्या चर्चेत तसे गृहीत धरलेले दिसते (२७७). "आपण समजतो त्यापेक्षा

*हे असे वाचा " पूर्व पदस्पृष्ट नाही पण लोक वसतिक्षम आहे " अशा बेटावर . . . . . .

कितीतरी अधिक पुरातन काळापासून आणि कितीतरी अधिक विश्वव्यापक स्वरूपात मानवाने सजीव जगतावर आपला प्रभाव पाडलेला आहे."  ही गोष्ट व्हिडालने आपल्या लक्षात आणून दिलेलीच आहे. (१८४, ८).  इलिनॉइस प्रांताचे मूळचे वनस्पती कोणते हे कोण सांगू शकणार आहे? आफ्रिकेच्या विषुववृत्तीय पर्जन्यप्रधान क्षेत्रांमधील झाडोराव व साव्हाना गवताच्या वनस्थली मानवनिर्मित आहेत, का त्या निसर्गतःच वनस्थली रुपात होत्या? शास्त्रीय भूगोलकाराच्या दृष्टीने अनुसरण्यासारखा सुरक्षित नियम एकच; "जे तात्त्विकदृष्ट्या सत्य आहे ते सत्य परिपाठातही मान्य करणे."  सदरच्या बाबीत हे तात्त्विक सत्य असे आहे. "ज्या क्षणी मानव त्या स्थळी अवतरला त्या क्षणी तेथील नैसर्गिक भूदृश्याचा अवतार संपला."  (जेम्स २८६, ८०; c/o ब्रोक २९७, १०८; लाऊटनजाक २७८, २०; क्रेब्ज २७९, २०८).

तरीही ज्या क्षेत्रावरुन मानवाचा हात फिरलेला असूनही त्याने तेथील रुपांत घडविलेले विकार, असतीलच तर, बहुधा नकारात्मक असतात अशी आदिम भूदृश्ये, आणि जेथील भूदृश्यावर्णनाचे स्वरूप मोठ्या प्रमाणात मानवानेच ठरवून दिलेले अशी भूदृश्ये या दोहोंतील फरक स्पष्ट करण्यासाठी कोणत्यातरी प्रकारच्या संज्ञा वापरणे भाग पडते हा विरोध निरीक्षकाला पहिल्या नजरेत ओळखून येतो.  तळातल्या भूमीची अवस्था कशीही असो, एकदा का ते क्षेत्र मनुष्याच्या नियंत्रणाखाली आले, की निश्चित स्वरूपाच्या एककांमध्ये ते क्रमवार व संगतवार आखले जाते. यांपैकी प्रत्येक एकक नजरेत भरावे इतके एकजिनसी असते प्रत्येक दुसऱ्यांपासून केवळ रेषेने वेगळे दाखविता येते.  या विरुद्ध, जेथे मानव वसती आहे, पण त्याचा प्रभाव तेथील भूदृश्यावरणावर पडलेला नाही अशीही क्षेत्रे असतात.  या अवस्थेत, मानवाने कितीही बदल करण्याचे प्रयत्न केले तरी त्याची त्या भूदृश्यावरणावर हुकूमत चालत नाही.  मानवाने नैसर्गिक वनस्पती नष्ट केले आणि त्याने ती जागा लागवडीखाली आणली नाही, किंवा त्या जागी रस्ते, इमारती बांधल्या नाहीत तर तेथे "रानटी वनस्पती वाढतच राहतात".  अविकृत नैसर्गिक भूदृश्य आणि मानवविकृत अनियंत्रित भूदृश्य या दोहोंनाही आपण 'रानटी भूदृश्ये' असे म्हणण्यास हरकत नाही.  या विरुद्ध मानवनियंत्रित क्षेत्रांचा उल्लेख 'मवाळ' किंवा लागवडीची 'भूदृश्ये' असा करता येईल.  या संज्ञांविरुद्ध कितीही आक्षेप असले, तरी आमच्या मनातील संकल्पना दोनही बाबतीत त्या संज्ञा स्पष्टपणे सांगतात.  जाणीवपूर्वक व योजनापूर्वक उत्पादनाचा अभाव असलेले प्रत्येक भूदृश्य "नैसर्गिक भूदृश्य" असते, असे मुळातच गृहीत धरण्याची चूक होत नाही.

हिमावृत क्षेत्रांचा अगदीच गौण अपवाद सोडल्यास, वर्तमान " नैसर्गिक भूदृश्याचे " अस्तित्व ही केवळ एक औपपत्तिक संकल्पनाच ठरते.  अशा दृष्टीने पहाता, सर्वसाधारण भूदृश्य ज्याप्रकारे मर्यादित असते, त्याच प्रकारे नैसर्गिकही मर्यादितच असते.  व्यावहारिक हेतूंनी पहाता, त्यात जमीन आणि पाणी, भूम्याकार आणि वनस्पती यांमधील विरोध तेवढेच समाविष्ट आहेत.  कोणत्याही क्षेत्राच्या एकूण नैसर्गिक परिसराचा फक्त एक भाग त्याने

बनवलेला असतो. तेव्हा या दोनही संज्ञा समानार्थीच आहेत, असे समजणारे अभ्यासक या मुद्याद्वारेच त्यावर आक्षेप घेण्याची शक्यता असते. एकाच गोष्टीचा उल्लेख करण्यासाठी दोन संज्ञांची गरज काय? वर्तमान भूगोलकारांना भूतकालीन भूगोलकारांच्या "नैसर्गिक परिसर" या शब्दप्रयोगाचा कंटाळा आला आहे आणि "नैसर्गिक भूदृश्य" या शब्दप्रयोगाला नाविन्याचा फायदा मिळेल असे त्याना वाटते; तर मग हाही शब्दप्रयोग जुनाट झाल्यावर, आणि भूगोलात त्या संज्ञेचा जो अर्थ होतो तो सामान्य भाषेत नाही, असे दिसून आल्यावर भावी भूगोलकारांना मात्र त्या शब्दप्रयोगाचा तितका कंटाळा येणार नाही, असे का मानावे? वर्तमान लेखनात 'परिसरवादी' ही संज्ञा उपहासाने वापरली जाते, येवढ्याच कारणावरुन " नैसर्गिक परिसर " या सारख्या सुप्रतिष्ठित संज्ञा वापरण्याची भीती बाळगण्याची आपल्यास जरूर नाही. आपण ज्यांचा आता विचार करत आहोत त्या दोन संज्ञात एक मुख्य फरक असलेला दिसतो. "नैसर्गिक भूदृश्य" या संज्ञेचा भूगोलकाराला अभिप्रेत असलेला अर्थ कोणता याची काहीच कल्पना असत नाही, आणि त्यात कशाकशाचा अंतर्भाव होत असतो, याबाबत भूगोलकारांचे एकमत होत नाही. उलट, " नैसर्गिक परिसर " याचा अर्थ कोणालाही सहज समजू शकतो, आणि, माझ्या माहितीप्रमाणे, त्यात कशाचा अंतर्भाव होतो या बाबत सामान्यतः सर्व भूगोलकारांचे एकमत असते. ("नैसर्गिक याचा अर्थ अमानव असा समजावा हा युक्तिवाद आता सर्वसामान्य झाला आहे. " नैसर्गिक " हा शब्द अमानव या अर्थाचा एकच सोइस्कर पर्याय म्हणून, एकूण भूगोलात नसला तरी, अशा विशिष्ट शब्दप्रयोगात वापरलेला असतो, असे एक सरळ विधान केल्याने हा वादाचा मुद्दा सहज निकालात काढता यतो. हा प्रश्न आणि त्या बरोबरच 'मूळ' (मूलतत्त्व–Fundament) ही संज्ञा अधिक चांगली आहे की काय हा प्रश्न, यांचा विचार पुढे करण्यात येईलच ").

अशा रीतीने मर्यादा घातलेली आणि केवळ तात्त्विक स्वरुपाची ही नैसर्गिक भूदृश्याची ही संकल्पना, भूगोलदृष्ट्या खरोखरच इतकी महत्त्वाची आहे काय, असाही एक प्रश्न येथे उपस्थित केला जाण्याची शक्यता आहे. त्याच्या जमीन व पाणी या दोन घटकांची बऱ्याच अचूकपणे रचना करणे शक्य आहे; कारण अशा बऱ्याचशा क्षेत्रात माणसाने त्यात फारच थोड्या प्रमाणात विकृती निर्माण केली आहे. असे असले तरी, नैसर्गिक वनस्पतींच्या आवरणाची रचना करण्याचे प्रयत्न करुन हाती येणाऱ्या निष्कर्षांचे प्रामाण्य संशयास्पदच असते. म्हणून हा हेतू सिद्ध होण्यासाठी, औपपत्तिक आधार म्हणून नैसर्गिक भूदृश्याचाच विचार केला पाहिजे; आणि त्या मूळच्या, अज्ञात, पण नैसर्गिक भूदृश्याच्या अंदाजे स्वरुपापर्यंत पोहोचण्यासाठी, परिपाठानुसार, प्रत्यक्ष वर्तमान भूदृश्यापासून सुरुवात करुन भूतकाळाचा मागोवा घेत घेत जाणे भाग पडेल.

इतके करूनही, हे मूळचे नैसर्गिक भूदृश्य आजच्या औपपत्तिक नैसर्गिक भूदृश्याशी एकरूप असत नाहीच. मनुष्य वसतीच्या हजारो वर्षांच्या काळात निसर्ग काही झोपून राहिला नव्हता! अन्य सर्व कारक अविकारी होते असे गृहीत धरले तरी, सर्वोच्च रुपांच्या दिशेने नेणारा

इ-१५५७-१५ व.

वनस्पति समाजांच्या सुधारक्षम विकसनक्रमानुसार मोठ्या विस्तृत क्षेत्रात अशी क्वचितच सिद्ध झालेली दिसतात —आज असे एक वनस्पति जीवन निर्माण झाले असते की, जे त्या मानवापुढे होते त्यापेक्षा वेगळे दिसले असते; तसेच जर मनुष्य त्या भूदृश्यापासून निवृत्त झाला असता तर ज्या प्रकारचे वनस्पति जीवन आज तेथे विकसित झाले असते त्यापेक्षाही वेगळे वनस्पती तेथे उपस्थित असलेले दिसले असते; या गोष्टीची व्हिडालने आपणास आठवण करुन दिलेली आहे (१८४, १५). पण येवढ्याने भागले नाही; बाकीची सर्व कारके काही तटस्थ राहिली नाहीत. मानव सर्वच खंडात अवतरल्यानंतर निश्चितच काही महत्त्वाचे हवामानविषयक बदल झालेले आहेत. परिणामतः वर्तमानकालीन नैसर्गिक भूदृश्य ही एक तात्त्विक संकल्पना आहे, कारण त्याचे अस्तित्व सत्यस्थितीत आज नाही आणि कधी नव्हतेही ! अशा सारखेच काही तरी मूळच्या आदिम भूदृश्यात (Landscape–अस्पष्टभूदृश्य) आणि त्याचे संपूर्णरूप तेथे प्रथम पाय ठेवणाऱ्या माणसालाच दिसले असण्याची शक्यता आहे.

शेवटी वर दिलेल्या निरनिराळ्या संज्ञांच्या व्याख्यांचा उपयोग मध्य इलिनाइज मधील क्षेत्रांचे उदाहरण घेऊन स्पष्ट करण्यास हरकत नाही. ज्यावेळी अमेरिंडियनांनी प्रत्यक्ष त्या भूमीवर प्रथमच पाय ठेवला, त्यावेळी त्यांना दिसलेले मूळचे नैसर्गिक भूदृश्य म्हणजे त्या क्षेत्राचे 'आदिम भूदृश्य' (Primeval Landscape) होय. त्याना दिसलेले ते भूदृश्य पहिल्या युरोपीय भूशोधकांना दिसलेल्या "रानटी भूदृश्या" सारखेच होते, की त्यापेक्षा बरेच वेगळे होते, हे आपणास सांगता येत नाही. म्हणजेच, फक्त आदिम भूदृश्यात "नैसर्गिक भूदृश्य" सत्य स्वरूपात होते. पण, वर्तमान नैसर्गिक भूदृश्य केवळ तात्त्विक स्वरुपात असून ते कधीच अस्तित्वात नव्हते. त्या आदिम भूदृश्यापेक्षा किती प्रमाणात वेगळे आहे याचे ज्ञान आपल्याला अंशतःच मिळते. बहुतेक सर्वच क्षेत्रात दिसणारी, मोठ्याप्रमाणात "मशागतीखाली असलेली", म्हणजेच "मवाळलेली भूदृश्ये", आणि त्यांच्याबरोबरच नदीच्या पूरमैदानाच्या बाजूंनी दिसणारी लहानसहान "रानटी भूदृश्ये" (पण, अमेरिंडियन कालखंडातील रानटी भूदृश्यांशी समरुप नसलेली दृश्ये) या सर्वांचा समावेश असलेली वर्तमान भूदृश्ये, आदिम भूदृश्यावरील मानव वस्तीच्या संपूर्ण कालखंडात निसर्ग आणि मानव यांनी एकाच वेळी कार्यकरत असताना होणाऱ्या फेरफारांतून तयार झालेली आहेत. या विशिष्ट उदाहरणात, भूदृश्यावरणाला संबंधित दृश्यफरक जवळजवळ पूर्णत्त्वाने लागू पडतात. कारण, पृष्ठाच्या बाह्याकारात बहुधा काही फरक झालेला नाही. पण अन्य क्षेत्रात—उदाहरणार्थ जावातील क्षेत्र— आदिम भूदृश्याचे रुपांतर रानटी भूदृश्यात होत असताना, आणि रानटी भूदृश्याचे रुपांतर लागवडीच्या भूदृश्यात होत असताना त्या भूदृश्याच्या त्या त्या रुपांतही मानव व निसर्ग या दोघांनीही काही महत्त्वाचे फरक घडवून आणलेले असण्याची शक्यता आहे.

●●●

## प्रकरण ६ वे

# इतिहासाचा भूगोलाशी संबंध*

## अ–इतिहासातील भूगोल

वर्तमान भूगोलातील प्रमुख तीन कटुप्रश्नांपैकी पहिला इतिहास व भूगोल यांच्या परस्परांत गुंतलेल्या संबंधातून निर्माण झाला आहे. कोणत्या मर्यादेपर्यंत या दोन क्षेत्रांनी एकमेकांचा समावेश करून घ्यावा ? संकलन शास्त्रे या नात्याने इतिहास व भूगोल यांच्यातील साम्याच्या महत्त्वाला मान्यता मिळाली म्हणजे त्यांच्या भिन्न-भिन्न कार्यांबाबत गोंधळ माजवावयाचा मार्ग मोकळा झाला, असे होता कामा नये. या दोहोंपैकी प्रत्येक क्षेत्र क्रमबद्ध शास्त्रांतून आरपार जाणारा आंतर छेद घेतात अशी कल्पना केली तरी, हे आंतरछेद निरनिराळ्या परिमितीतले असतात, हे विसरून चालणार नाही. या दोहोंतील संबंधाचे चित्र काढावयाचे झाले तर, चतुर्मिती अवकाशाची आवश्यकता निर्माण होईल. ही वस्तुस्थिती त्या दोन दृष्टिकोणांचा व त्यांच्या साधनसामुग्रींचा मेळ घालण्याच्या मार्गातील असामान्य अडचणींच्या रुपाने प्रतिबिंबित झालेली दिसते. हंटिंग्टन म्हणतो त्याप्रमाणे ही अशी एक अडचण आहे, की जेथे विचारवंत पाय मागे घेतील. प्राथमिक भूगोल शिक्षक बेधडक उडी घेण्यास प्रवृत्त होतील. शिक्षणक्रमात इतिहास व भूगोल यांची शिक्षणक्रमातील जुळणी त्यांच्या हेतूबाबतच्या गोंधळास कारणीभूत झाली, या विषयीचा समाचार एका शतकापूर्वीच बुझर याने समर्थपणे घेतला आहे. (५१, २३७ ff).

या दोन क्षेत्रांचा संबंध घालणे कितीही अवघड असले तरी, हंटिंग्टनच्या पुढील विधानावर मात्र कोणीच आक्षेप घेऊ शकणार नाही. " इतिहासाची तर्कशुद्ध समज येण्यासाठी, त्या ऐतिहासिक घटना ज्या बदलत्या भौतिक पार्श्वभूमिवर घडल्या, तिचे सखोल ज्ञान आवश्यकच आहे ". पण अशा प्रकारच्या भौगोलिक ज्ञानाने इतिहासकार सुसज्ज नसल्यामुळे त्यांचे संकलनाचे प्रयत्न फारसे यशस्वी होत नाहीत.

या क्षेत्रात कार्य करणाऱ्या बहुतेक सर्वच भूगोलाभ्यासकांनी " त्यांच्या विशिष्ट दृष्टिकोणाचे स्पष्टीकरण देण्यास उपयोगी पडतील अशाच काही ऐतिहासिक घटना निवडलेल्या असतात ", असे आपल्या नजरेस आल्याचे हंटिंग्टन सांगतो; इतकेच नव्हे तर, आपणही या प्रमादाला अंशतः हातभार लावला असल्याची प्रांजलपणे कबुलीही देतो. पण ज्या पुस्तकाचे परीक्षण तो करत होता त्यात हा आक्षेप सापडला नाही, हे उघड आहे. हा ग्रंथ होता ग्रिफिथ टेलर लिखित " परिसर व राष्ट्र " (३८९). तरीही त्याचा निष्कर्ष असा होता; " आपण अद्याप आपल्या महत्कार्याच्या अगदी प्रारंभ रेषेवरच उभे आहोत . . . . या वस्तुस्थितीकडे ते आपले लक्ष वेधून घेते. हे त्याचे खरे मूल्य आहे. पक्का पाया

---

*पुरवणी टीप क्रमांक २७ पहा.

घालण्यासाठी लागणारी सामग्री गोळा करण्याच्या टप्प्यापर्यंत आपण आता कोठे येऊन पोहोचलो आहे. आमचे वारसदार आता त्यावर एक निर्दोष व दर्शनीय इमारत उभी करण्याचे काम करतील. अन्य भूगोलकारांनी केलेल्या क्रान्तिक परीक्षणांतून एक सूचना मिळते. अशा प्रकारच्या अतिशय गुंतागुंतीच्या कूटप्रश्नांची उकल करावयाची झाल्यास, एकूण युरोप खंडाच्या इतिहासांचा साकल्याने अभ्यास करण्याऐवजी, स्थळ व अवकाशदृष्ट्या अधिक मर्यादित क्षेत्रांचे अभ्यास केल्यानेच भक्कम पाया उभारणीसाठी लागणारी ठोस सामग्री संपादन करता येण्याची शक्यता जास्त आहे. ज्या अभ्यासकांच्या जवळ या प्रश्नाला हात घालण्याचा कणखरपणा असेल, त्यांना एक आग्रहाचा सल्ला द्यावासा वाटतो. त्यांना आवश्यक असणारी सामग्री त्यांनी सर्वश्रुत, सर्वसाधारण अभ्यासांतून मिळविण्याऐवजी, मोठ्या संख्येने उपलब्ध असणाऱ्या, कमी महत्त्वाकांशी प्रादेशिक अभ्यासांतूनच शोधण्याचा प्रयत्न करावा. अशा प्रकारचे छोटेखानी अभ्यास फ्रेंच व जर्मन नियतकालिक साहित्यात सापडण्यासारखे आहे. [विशेषेकरून व्होगेल (८९) च्या ग्रंथास जोडलेली संदर्भ ग्रंथसूची पहा.]

विशेषतः, ज्यांना अशा प्रकारच्या प्रश्नांचा विचार करावयाचा आहे अशा भूगोलकारांनी मर्यादित कालखंडांचे अथवा क्षेत्रखंडांचे अथवा दोहोंचेही बंधन स्वतःवरच घालावे. असे म्हणण्याला आणखी एक खास कारण आहे, हे त्यांच्याही लक्षात येईल. या क्षेत्रात भूगोलाभ्यासकांनी जे पुष्कळसे कार्य केले आहे त्याचा विचार करता, इतिहासाची तर्कसिद्ध समज येण्यासाठी काय करणे जरूर आहे, याबाबतच्या हंटिंग्टनने केलेल्या विधानास ऐतिहासिक घटनांचे भरीव ज्ञानही त्यांना असणे आवश्यक आहे, अशी पुस्ती जोडण्याचा मोह कोणासही होण्यासारखा आहे. भूगोलकार म्हणून प्रशिक्षण घेतलेल्या अभ्यासकाला अगदी मर्यादित क्षेत्रापुरते अशा स्वरुपाचे ज्ञान संपादन करणे शक्य होईल, तर त्याला चांगलेच यश प्राप्त होईल.

प्रस्तुत ग्रंथात या चर्चेला स्थान दिले आहे, याचे कारण सामान्यपणे, " ऐतिहासिक भूगोल " या नावाखाली येथे चर्चेला घेतलेल्या विषयाचा अभ्यास मुख्यतः भूगोलकारांनीच केलेला आहे. पण, हंटिंग्टनचे विधान असा स्पष्ट निर्देष करते, की त्यांच्या अवधानाचे केंद्र इतिहासावर आहे, भूगोलावर नव्हे. अभ्यास करावयाचा आहे तो ऐतिहासिक घटनांचा, मात्र, तो त्यांच्या भौगोलिक रुपांच्या परिभाषेत केला जातो. म्हणूनच, हा प्रश्न इतिहासाच्या क्षेत्रातील आहे असे म्हणणे तर्कसंगत दिसते. या समस्येच्या आघाडीच्या अमेरिकी अभ्यासकांपैकी एकाने, म्हणजेच इतिहासकार टर्नर याने, याचा अगदी स्पष्ट निर्देश केला आहे. तो स्वतःचे वर्णन " मी कोणत्याही प्रदेशाचा अभ्यासक नसून, मी एका प्रक्रियेचा अभ्यासक आहे. " (२१४) अशा शब्दात करतो. या क्षेत्रात आतापर्यंत पडलेली भर जरी भूगोलकारांनी घातलेली असली, तरीही कदाचित् बहुतांश भूगोलाभ्यासक आता हे मान्य करतील, इतिहासाचा भूगोलदृष्ट्या अन्वयार्थ लावण्याचा प्रयत्न हा इतिहासाचाच भाग होतो (संदर्भ २१६, २८७-९१).

## ब–भूगोलातील इतिहास

पण, प्रत्यक्ष भूगोलाच्या क्षेत्रात, ऐतिहासिक विकासाच्या क्रमाचा किती प्रमाणात विचार करावा ? भूगोलाचा सारभूत दृष्टिकोण —क्षेत्रीय संबंधाच्या स्वरुपात घटनांचा विचार, हा दृष्टिकोण— ठामपणे मांडत असताना, कलात्मक संबंधांचा कोणताही विचार दुय्यम, आणि केवळ परिशिष्टात्मकच, गणला गेला पाहिजे, असा काही भूगोलकारांचा आग्रह असतो. पण भूगोलकार ज्या घटेचा विचार करत असतो तिचाच विकास, किंवा तिच्यातील बदल, या गोष्टींचा विचार तो प्रामुख्याने करत असेल, तर कालात्मक संबंधांना मोठेच महत्त्व प्राप्त होते, असेही दुसऱ्या काहींचे आग्रही मत आहे.

भूगोलाभ्यासक हा प्रामुख्याने एखाद्या क्षेत्राच्या बदलत्या स्वरुपाचा विचार करत असतो, हे प्रमेय जर्मनीत श्पेटमान याने मोठ्या जोमाने उद्घोषित केले, आणि त्या स्वरुपाचे त्याने Dynamische Erdkunde (२५१, गतीमान् भूगोल) असे नामकरण केले. भूगोल या विषयाच्या या " नव्या दृष्टिकोणाचा " प्रस्ताव मांडताना अन्य जर्मन भूगोलकारांनी केलेल्या कार्याच्या तो विरोधात्मक आहे, असे सांगून त्यांच्या दृष्टिकोणावर 'गतिशून्य' असा लक्षणारोप करतो. प्रत्यक्षात, ग्राडमानने दाखवून दिल्याप्रमाणे श्पेटमानच्या या कल्पनेत कोणतेच नाविन्य नाही. पूर्वाचार्यांच्या भूगोलविषयक संकल्पना कधीच गतिशून्य नव्हती. श्पेटमानने हा शब्द एक Modewort (a word in vogue एक लोकमान्य शब्द) म्हणूनच वापरला आहे.

श्पेटमानच्या या प्रस्तावांमुळे जर्मनीतील भौगोलिक वर्तुळात मोठीच खळबळ माजली. ते मांडण्यात एक प्रकारची तडफ होती हे एक कारण आहेच पण त्यांच्याच बरोबरीने व त्यांच्या मागोमाग करण्यात आलेले दुर्दैवी वैयक्तिक हल्ले हेही त्याचे दुसरे कारण आहे. काहींनी त्यांची स्तुती करत त्यांचा स्वीकार केला, तर काहींनी, विशेषकरून हेटनर (१७१, ५) फिलिप्सन (२६०) आणि ग्राडमान यानी, अगदी क्रान्तिक टीका केली. (तसेच ब्यूर्गरही पहा–११, ९३–१०९). आपल्या टीकाकारांना दिलेल्या उत्तरांनी भरलेला दुसरा एक ग्रंथ श्पेटमानने लिहिला पण ज्यांनी ग्राडमानचे भारदस्त परीक्षण वाचले असेल, त्यांनी श्पेटमानच्या या वैयक्तिक तक्रारींनी (२६१) भरलेल्या या ग्रंथाची पाने चाळण्याची तसदी घेतली असेल असे वाटत नाही. या विरुद्ध, आपल्या कल्पना उदाहरणांनी मूर्तस्वरुपात मांडून दाखविल्याबद्दल श्पेटमानला धन्यवाद दिलेच पाहिजेत. तोच त्याने तीन खंडात प्रसिद्ध केलेला ऱ्हूर प्रदेशाचा अभ्यासग्रंथ, त्याने त्यात इतिहासपूर्वकालापासून तो वर्तमान कालापर्यंत त्या प्रदेशाच्या विकासाच्या टप्प्यांतील होत गेलेल्या क्रमवार बदलांचा मागोवा घेतला आहे. त्यांतील पहिले पुरे दोन खंड हा मागोवा वर्तमान कालापर्यंत आणून पोहोचविण्यात खर्ची पडले आहेत. "उत्पत्तिविषयक स्पष्टीकरणांना ऐतिहासिक कथनांचे स्वरूप " येऊ दिले असता, भूगोलकार नकळत आपल्या क्षेत्राच्या मर्यादा उल्लंघून कसा जात असतो याचा भरपूर

पुरावा वाचकाला येथे सापडणार आहे. (अर्थात, निदान काही, माझ्या या परीक्षणावर विसंबून राहणे पसंत करतील, असे वाटते) (हेटनर १६७, २६९, तसेच लेहमानची टीका पहा. १८१, ५१-५७).

आपल्या देशापुरताच विचार केला तर, भूगोलात ऐतिहासिक पद्धतींचा वापर करण्याचा नामनिर्देशपूर्वक आग्रह सॉरने धरला. मूळच्या " नैसर्गिक भूदृश्याचे " वर्तमानकालीन " सांस्कृतिक भूदृश्यात " कसे रुपांतर होत गेले, हे विकासाच्या परिभाषेत सादर करत असताना, त्या अभ्यासाला विकासाच्या दिशेने जाणे क्रमप्राप्त होते (२११; ८५, ६२३). अशी दिशा दाखवत असताना अगदी प्रारंभिक कालापासूनच सुरुवात करावी लागते, म्हणजेच पृथ्वीच्या उत्पत्तीपासून सुरुवात करावी लागेल. या भीतीनेच, " त्या क्षेत्रीय दृश्याची ओळख मानवाला झाली तेव्हापासूनच भूगोलाची भूशास्त्रापासून फारकत झाली ", असे तो सुचवितो (२११, ३७). त्या घटना-क्षणापासून मूळचे " नैसर्गिकदृश्य " पुनर्रचित करण्याच्या हेतूने प्रारंभ करून मानवाने घडवून आणलेल्या (आणि निसर्गानेही घडवून आणलेल्या त्यातच गृहीत आहेत का ? ) त्या दृश्यातील विविध आणि विविध प्रकारच्या फेरबदलांतून वर्तमान सांस्कृतिक दृश्याशी येऊन पोहोचेपर्यंत भूगोलाभ्यासक आरपार रचनात्मक कार्य करत राहील.

येथे एक गोष्ट कंसात नोंदवून ठेवणे आवश्यक आहे, की येथे सुचविलेली ही लक्ष्मण रेषा भूशास्त्रज्ञांना मान्य होण्याची फारशी शक्यता नाही. भूकवचाचा विकास, प्रस्तरांची घडण, आणि भूशास्त्रज्ञ अभ्यासतो तशा प्रकारच्या मृतावशेषांचे निधान, या सर्व गोष्टी मनुष्याचा अवतार तेथे झाला त्या अज्ञात कालानंतरही त्या क्षेत्रात घडावयाच्या थांबल्या नव्हत्या. या विरुद्ध, मानवी कृतीमुळे प्रस्तरघटनेच्या आकारात अगर स्वरुपात काही फरक घडून आले-उदाहरणार्थ अवजड इमारतीमुळे शेल खडकांच्या स्तरांचे दबणे, मिनिआपोलीस कारंजीविहिरीमुळे फरशी खडकाच्या जडण-घडणीत होत असलेली जलसंचयातील घट इत्यादी- तर भूशास्त्रज्ञाला त्याच्या अभ्यासात लक्ष घालावेच लागेल.

पण याहीपेक्षा सॉरने या प्रमेयाचे व्यावहारिक परिणाम अधिक महत्त्वाचे आहेत. कोणत्याही प्रदेशाचा कसलाही अभ्यासग्रंथ त्याच्या संपूर्ण पुरातन भूगोलाचा कालक्रमानुसार केलेल्या संपादणीच्या अभ्यासानेच सुरू झाला पाहिजे, ही गोष्ट उघड झाली. त्याने स्वतः लिहिलेल्या "सान फर्नांडो ड वेलिकाटा याचे स्थान व संस्कृती " (३८२). या अभ्यासलेखात कालक्रमरचनेवर त्याने दिलेला भर इतका लक्षणीय आहे, की त्याचा हा अभ्यासलेख भूगोलक्षेत्रापेक्षा इतिहासक्षेत्रात का मोजू नये असा सहजच प्रश्न पडतो. नंतरच्या त्याच्या अभ्यासलेखांत तर, सॉरने इतिहासपूर्व कालाच्याही पाठीमागे जाण्याचा प्रयत्न केला आहे, आणि तसा तो तर्कसंगतही वाटतो. पण मग, त्याची मानववंशशास्त्रीय अभ्यासापासून फारकत करणे अवघड होते (३८३, ३८४). तसेच, सॉडरच्या या आदेशांनुसार प्रवाहशून्य टेकड्यांची भूमीच्या (अर्थात, उगमाकडील मिसिसिपि

खोऱ्याचा अंतर्भागाच्या) भूगोलाचे पहिले प्रकरण सुमारे नऊ किंवा थोड्या अधिक फ्रेंच व्यापारी ठाण्यांचे कालक्रमावर प्रतिपादन केले आहे.—यातील प्रत्येक ठाणे सरासरीने तीन किंवा थोडी अधिक वर्षेपर्यंत त्या भागात होती.—एकंदरीने, इतिहासातील अभ्यासांपेक्षा हा अभ्यास वेगळा आहे असे दाखवणेही बरेच अवघड व्हावे असा हा अभ्यासलेख होता (३९३). संबंधित अभ्यासावर काही टीका करावी या हेतूने वरील टिप्पणी केलेली नाही ; किंवा, अशा प्रकारचे आणखी काही अभ्यास करण्याबाबत प्रस्तुत लेखकाला काही आक्षेपही घ्यावयाची इच्छा नाही. " एखाद्या प्रदेशाचा भूगोल सादर करु इच्छिणाऱ्या भूगोलकारांनी अशा प्रकारचे लेखनकार्य ग्रंथाच्या प्रारंभीच सादर केले पाहिजे काय ? " हा प्रश्न महत्त्वाचा आहे. कारण, आपल्यापैकी थोडेच अशाप्रकारच्या अभ्यासांसाठी लागणाऱ्या तांत्रिकज्ञान व कार्य यांनी सुसज्ज असतात. आणि इतके करुनही असे भौगोलिक अभ्यास अन्वये क्षेत्रांतील अशाच अभ्यासांतून वेगळे दाखवताच येत नाही.

सॉरने दहा वर्षांपूर्वी विवरण केलेले हे प्रमेय एखाद्या संपूर्ण उदाहरणाने सादर करण्याचा प्रयत्न एकाही अमेरिकी अभ्यासकाने केल्याचे माझ्या आढळात नाही. तथापि, ब्रोकने यूट्रेक्ट विद्यापिठाच्या 'पंडित' (Doctor) पदवीसाठी " सांताल्कारा खोऱ्यावर " लिहिलेला प्रबंध (२३३) अंशतः सॉडरच्या संकल्पनातून निर्माण झालेला आहे, असे मानले जाण्याची शक्यता आहे. तरी बऱ्याच प्रमाणात त्याने ग्रान्योचेही अनुकरण केल्यासारखे दिसते. ब्रोक आपल्या प्रास्ताविक विधानात असे सूचित करतो की, प्रादेशिक अभ्यासात, पुरातन कालखंडापासून अद्यतनापर्यंतच्या सर्वच कालखंडांतील " भूदृश्यांचा " विचार झाला पाहिजे. अर्थात्, तसे करताना, त्यांना द्यावयाच्या महत्त्वात काही प्रमाणात फरक केला जाणार, हे उघडच आहे. ते काही असले तरी, गोऱ्या लोकांच्या वसाहती होण्यापूर्वी झालेली भूदृश्यांतरे त्यानी मुळातच वगळली, पहिल्या युरोपीय वसाहतकारांना आढळलेल्या आदिम भूदृश्यांपासून त्याने सुरुवात केली. या प्रबंधाच्या अधिकांश भागात सहा * ऐतिहासिक कालखंडातील क्रमान्वित भूदृश्यांत दाखविलेल्या बदलांचा विचार केला गेला आहे. यापैकी प्रत्येक कालखंडात, त्या भूदृश्यातील विविध महत्वाच्या घटकांपैकी प्रत्येकातील बदलांचा मागोवा घेणे लेखकाला प्राप्त झाले. कारण, भूदृश्य ही एक संपूर्ण वस्तू म्हणून वाढत रहाणारी पूर्ण वस्तू नव्हे, तर त्याची वाढ त्याच्या प्रत्येक भागाच्या वाढीतूनच होत असते. म्हणूनच, " कोणत्याही भूदृश्याचा इतिहास हा त्याच्या विविध भागांचे इतिहास असतील ". अशी क्राइत्सबुर्गने नोंद करुन ठेवली आहे, (२४८). परिणाम असा होतो की, यापैकी कोणत्याही एका कालखंडातील भूदृश्याचे परिपूर्ण चित्र आमच्या नजरेपुढे कधीच उभे रहात नाही, तर त्याच्या विविध विभागांच्या उत्पत्तीचा अभ्यास आमच्या हाती येतो. शेवटी, वर्तमान भूदृश्याच्या वाट्याला आलेल्या मर्यादित भागात ते ते विभाग ठाकठिकपणे बसविण्यासाठी स्वतः वाचकालाच सिद्ध रहावे लागते. या प्रबंधाचा सांगोपांग अभ्यास केल्यास वर्तमानकालिन सांताल्कारा खोऱ्याची

---

* सहा नव्हे तीन. त्याचप्रमाणे पुरवणी टीप २९ पहा.

अधिक चांगल्या रीतीने समज येईल यात संशय. आणि इतके यश भूतकाळावर दृष्टिक्षेप न टाकता, केवळ वर्तमान कालीन भूदृश्याचा विचार करणाऱ्या अभ्यासाला लाभले नसते. यातील दुसरा प्रकार हा प्रत्यक्ष पर्याय असे मानले, तरी तेवढा एकच पर्याय आहे असे नाही. तथाकथित " गतिशून्य " पद्धतीने केलेला प्रादेशिक अभ्यास, फक्त वर्तमान परिस्थितिला स्वतःला जखडून घेतो असे नाही. खरे म्हणजे, हा संपूर्ण अभ्यास वर्तमान भूदृश्यावरच पूर्णतया संघटित केला असता, आणि ऐतिहासिक विवेचनांच्या प्रकरणांतील[६०] उपयुक्त सामग्री त्या वर्तमान भूदृश्याच्या प्रत्येक भागाच्या विश्लेषणासाठी उपयोगात आणली गेली असती, तर तेच चित्र आमच्या नजरेपुढे अधिक स्पष्टपणे उभे राहिले नसते का, असा प्रश्न येथे उपस्थित होतो. [६०]

यावरून असा निष्कर्ष निघतो, की कोणत्याही क्षेत्राच्या अभ्यासकाला त्या क्षेत्राच्या ऐतिहासिक कालातील भूगोलाचे–आणि अतिव्यापक अर्थाने त्याच्या इतिहासाचेही– ज्ञान, तो आपल्या वाचकांपुढे सादर करणार असेल त्याच्यापेक्षा कितीतरी अधिक ज्ञान, मिळविले पाहिजे. तसेच, आपल्या परवानगीने अशीही एक सूचना आम्ही करतो की, कोणत्याही क्षेत्राच्या इतिहासकाराला त्या क्षेत्राच्या भूगोलाचा कितीतरी अधिक परिचय करून घेणे भाग आहे. मग, तो त्यातील थोडयाचाच आपल्या ऐतिहासिक लिखाणात प्रत्यक्ष उपयोग करणार असला तरी चालेल ! त्या क्षेत्राच्या वर्तमानस्थितीच्या संदर्भात त्या क्षेत्राच्या ऐतिहासिक भूगोलातील कोणची वस्तुस्थिती अर्थपूर्ण ठरेल हे त्याच्या अभ्यासाच्या ओघात समजून घेणे नेहमीच शक्य असते, असे नाही. उलट, लेखनाच्या ओघात, वर्तमानकालाच्या संदर्भात जेथे त्या अर्थपूर्ण असतात अशा मोक्याच्या ठिकाणी इतिहासातील त्या वस्तुस्थिती सादर केल्या जातील, तर वाचकाला किंवा लेखकालाही आवश्यक त्या वस्तुस्थितींची निवड करणे सहज शक्य होईल.

या ऐतिहासिक दृष्टिकोणाचा तर्कदुष्ट अतिरेक लायलीच्या सूचनेत सापडण्यासारखा आहे. तो सुचवितो, की सांस्कृतिक भूगोलाकाराने सांस्कृतिक इतिहासकाराचा मार्ग अनुसरावा हे बरे. सर्वात महत्वाची गोष्ट ही, की या मुळे कोणीही लेखक संस्कृतीच्या शिथिल स्थान-बंधनांऐवजी तिच्या अत्यावश्यक कालबंधनावर अधिक भर देत राहील. (२२०, १३५). " अशा रीतीने परिसंवादाच्या अगदी विरूद्ध टोकाला आपण पोहोचलो आहोत. " लायलीच्या विधानावरील फायफरच्या या टीकेने (१०९, ११९), लायलीच्या त्या विधानाकडे नेणाऱ्या विचारप्रवाहाचा अचूक अन्वयार्थ लावला आहे, ही गोष्ट निःसंशय. जवळजवळ अशाच प्रकारचे मत (अगदी मोजकीच नावे सांगावयाची तर) हेटनर (१२६,५५६), हार्सिजर (१६५, १३), आणि उन्स्टेड (१९३), यासारखे अभ्यासक आज किती तरी दिवस प्रतिपादन करत आले आहेत.

---

६०. यात गोविलेल्या तत्त्वाचे इंग्लिश भाषेत आढळलेले हे ऐवढे एकच परिपूर्ण उदाहरण आहे, म्हणून या अभ्यासग्रंथाचा आम्ही येथे उपयोग करीत आहोत. तथापि, लेखकाच्या वर्तमान मतांचे ते प्रातिनिधिक आहे, असा गैरसमज करून घेऊ नये. ज्याचा संदर्भ यापूर्वीच आम्ही दिलेला आहे, त्याच्या अलीकडच्या एका आंतरराष्ट्रीय परिषदेत वाचल्या गेलेल्या पत्रिकेवरून हे अनुमान सहज काढता येण्यासारख आहे.

पण त्या व्यावहारिक युक्तिवादाविरूद्ध पण एक तर्कसिद्ध असाही प्रश्न एकतर्कसिद्ध प्रश्न विचारणे आवश्यक होते की, " असे करतेवेळी, भूगोलाच्या भूमिकेचे अगदी विरूद्ध टोक गाठले गेले, असे होत नाही का ? "

भूगोलाला दृश्य किंवा प्रतिबोधक्षम वस्तूंची मर्यादा पडली पाहिजे, असा दावा सांगणांऱ्या अभ्यासकांच्या दृष्टीला तर ही ऐतिहासिक पद्धती विरोधाभासात्मकच दिसेल. कित्येक अभ्यासलेखांतील बऱ्याच मोठ्या भागात ऐतिहासिक नोंदींच्या आधारे लेखकाने खातरजमा करून घेतलेल्या गोष्टींच्या वर्णनांचा भरणा असतो. जी थोडी गुणवत्ता या संकल्पनेत ग्रंथित आहे ती अशा अभ्यास ग्रंथात कोठेतरी हरवून गेलेली असते, कारण त्याच नोंदींच्या जंजाळातून तो आपले अंतिम उत्पादन—म्हणजेच जे त्याला आरंभापासूनच दिसत असते ते भूदृश्य—घेऊन बाहेर येताना दिसतो. हेटनरने हीच गोष्ट निर्देशित केलेली आहे, की भूगोलकार प्रत्यक्ष निरीक्षण करू शकतो त्या वस्तुस्थितीपैकी बहुतांश भाग निसर्गतः 'स्थावर' असतात पण, 'गतिमान' प्रादेशिक अभ्यासात अभ्यासावयाच्या प्रक्रिया एकतर स्थावर वस्तुस्थितींवरून कृतकप्रमेयरुपाने अनुमानित केलेल्या असतात अथवा ऐतिहासिक कागदपत्रांतून त्या उचलेल्या असतात (१७१, ५; १२६, ५५६).

वरील युक्तिवादाचा धागा घेऊनच फींच पुढील प्रशस्ती करतो. भूतकालीन वस्तुस्थितींचे अवशेषस्वरुपात प्रतिनिधित्व करणाऱ्या वर्तमान रुपधेयांचा अन्वयार्थ लावणे आवश्यक असेल तेथेच भूतपूर्वकालखंडांतील परिस्थितींचा आधार घ्यावा. [c/o व्हिटल्से लिखित (२८२) " Sequent Occupance (क्रमित व्यापन) " या अभ्यासलेखावरील आर्. इ. डॉन यांनी लिहिलेला (२९६, २३३ f) चर्चा लेख]. त्यासाठीच प्राचीन कालखंडातील भूगोलाची पुनर्रचना करण्याची गरज वाटण्याची शक्यता आहे.. अशा स्वरूपाची वर्णने अगदी विषयांतर करणारी नसली तरी ती केवळ पुरवणी स्वरुपाचीच असतात. " एक प्रकारे ती लेखन नाट्यातील 'स्वगते' असतात ". अगदी प्राचीनतम कालखंडापासून आरंभ करण्याच्या भानगडीत न पडता, ज्याच्याबद्दल लेखक अस्तिपक्षी मत देऊ शकेल अशा त्या क्षेत्राच्या स्वरूपापासून म्हणजेच वर्तमान भूदृश्यापासून त्याने आरंभ करावा, यावरच फींच समाधान मानतो. (२८८, १९९ f; एम्. एन्. डिकेन् यांची टीकाही लक्षात घ्यावी, १२० f) जवळ जवळ असेच मत (अगदी मोजकीच नावे सांगायची झाली तर) हेटनर (१२६, ५५६), हासिंजर (१६५, १३) आणि उन्स्टेड (१९३) यासारखे अभ्यासक आज कितीतरी दिवस प्रतिपादन करत आले आहेत.

त्या व्यावहारिक युक्तिवादाविरुद्ध एक तर्कसिद्ध युक्तिवाद उभा असतो. संबंधी क्षेत्राचा कालक्रमानुसार उद्गम आणि विकास यांचा भूगोलकाराने अभ्यास करणे आवश्यक आहे, असे ज्यावरून दिसते, अशाच एका भूगोलविषयक विशिष्ट संकल्पनेवर हा दुसरा युक्तिवाद आधारलेला आहे. भूगोलशास्त्राचे खास अभ्यासविषय जगातील मूर्त "भूदृश्ये" हेच असेल तर त्या वस्तूंचा अभ्यास त्यांच्या केवळ वर्तमान रुपांचा किंवा कार्यांच्या परिभाषेतून

करून भागणार नाही तर त्याबरोबरच त्यांच्या उत्पत्तीच्या म्हणजेच त्यांचा उद्गम व उत्क्रांती यांच्याही–परिभाषेत होणे आवश्यक आहे. प्रत्यक्ष या संकल्पनेचा विचार जरी आम्हाला पुढील एका प्रकरणासाठी राखून ठेवणे प्राप्त असले, तरी प्रस्तुत प्रश्नाशी तिचा जेवढा संबंध पोहचतो तेवढ्याचाच विचार येथे व्हावयास हरकत दिसत नाही. या तत्त्वाचे अगदी काटेकोर पालन करावयाचे झाले तर कोणत्याही भूदृश्याच्या उद्गम विषयक अभ्यासात पूर्ण सुसंगती राखावयाची झाल्यास आपल्याला, अगदी पृथ्वीच्या जरी नाही तरी, निदान खंडांच्या उत्पत्तीचा अभ्यास करणे आवश्यक आहे, हे उघडच आहे. वर आम्ही लक्षात आणून दिलेलेच आहे, की सॉरने हे टाळण्यासाठी, काहीशा स्वैरपणेच, मानवपदांकित प्रथम भूदृश्यावर, भूतपूर्व कालक्रमाचा पहिला तुकडा पाडला, आणि त्या आधीच्या " नैसर्गिक भूदृश्याच्या " विकासाचा भूशास्त्रज्ञांवर सोपवून तो मोकळा झाला. (खरे म्हणजे, यासाठी भूशास्त्रज्ञापेक्षा कोणा श्रेष्ठ पंडिताची गरज लागेल. भूशास्त्र, हवामानशास्त्र, वनस्पतीपर्यावरणशास्त्र इत्यादी अनेक शास्त्रांच्या प्रतिनिधींनी केलेल्या अभ्यासाची केवळ गोळाबेरीज करूनही त्या " नैसर्गिक भूदृश्याच्या "—सॉरने ज्या अर्थाने ही संज्ञा वापरली त्या अर्थाने– अभ्यास पूर्ण होणार नाही. म्हणजे, या सर्व अभ्यासकांनी केलेल्या कार्यांच्या निष्कर्षांचे संकलन कोणी तिसऱ्याने करणे आवश्यक आहे). अर्थातच्, त्या " नैसर्गिक भूदृश्याचा " विकास किंवा उत्क्रांती वर्तमान " सांस्कृतिक भूदृश्यात " कशी झाली याचा अभ्यास भूगोलज्ञालाच केला पाहिजे. या वचनाची अटलांटिकच्या दोनही बाजूंकडून इतक्यांदा पुनरावृत्ति होत आली आहे, की त्यात केवढा आशय भरलेला आहे याबाबत विचारही न करता ते वाचून टाकण्यास आपण तयार असतो. कोणत्याही व्याख्येनुसार असो, पण एखाद्या " भूदृश्याची " विकास वा उत्क्रांती होते तरी कशी ? भूदृश्याला किंवा प्रदेशाला सावयव जीवाची उपमा वारंवार दिली गेल्यामुळे—आणि उत्क्रांत या शब्दाचा सूचितार्थही तोच असल्यामुळे—" भूदृश्य " हे अशी एक वस्तू आहे, की ते एक एकक असल्याप्रमाणे त्याच्या अंतर्गत शक्तींच्या जोरावर वाढत असते, असे सूचित होते. गैरसमज निर्माण करणाऱ्या उपमा आणि शंकास्पद संकल्पना मनातून दूर सारून स्वच्छमनाने आणि सरळ भाषेत या प्रश्नाचा विचार कोणी करावयाचा म्हटले, तर प्रथमदर्शनीच एक गोष्ट त्याच्या लक्षात येईल, की भूदृश्य अगर प्रदेश याच्या रुपांतराची आपल्याला दिसण्याची शक्यता असणारी प्रक्रिया सावयवांच्या विकासाच्या वा वाढीच्या प्रक्रियेपेक्षा अगदीच वेगळी असते. हा निष्कर्ष इतका उघड आहे असे वाचकाला वाटण्याची शक्यता आहे, कीं त्याला त्याच्या प्रात्यक्षिकाची गरजही भासणार नाही. तरीही, त्याकडे सतत दुर्लक्ष होत आले असल्यामुळे याचे काहीसे तपशीलात जाऊन प्रात्यक्षिक दाखविणे अगत्याचे वाटू लागले आहे.

त्या क्षेत्रात उपस्थित असलेल्या सर्व गोष्टींचा अंतर्भाव होणार नाही म्हणजेच त्यातील काही गोष्टी वगळता येतील अशा काहीशा अर्थाने विशेषेकरून त्या क्षेत्रातील केवळ भौतिक रुपधेयांचाच त्यात अंतर्भाव होईल अशा अर्थाने भूदृश्य ही संज्ञा वापरली. तेथील अरण्ये झडून जातात, नांगरट केलेल्या शेतांची येथे पैदास होते किंवा येथे घर व कारखाने पिकतात

असे म्हणणे किती मनस्तापकारक व हास्यास्पद ठरेल याची कल्पनाच करवत नाही ! त्या " सांस्कृतिक भूदृश्यांचे " हे घटक त्या " नैसर्गिक भूदृश्यांचे " ठिकाणी अशा शक्तींनी निर्माण केलेले असतात––म्हणजे त्या शक्ती मानवाच्या इच्छेने प्रेरित झालेल्या असतात––की वरील भूदृश्याचे ते भाग होऊच शकत नाहीत. एकूण पृथ्वीपृष्ठाने, नैसर्गिक भूदृश्यापासूनच सांस्कृतिक भूदृश्य उत्क्रांत केले, असे जरी आम्ही म्हणू शकलो, तरी ते प्रत्यक्ष "भूदृश्य" ––मग ते सत्य व दृश्य भूदृश्य असो, की भूपृष्ठावरील भौतिक वस्तूंचा तो संचय असो ––**विकसित झालेले** नसते, तर त्या दृश्यात समाविष्ट नसलेल्या कारकांनी ते **निर्माण केलेले** असते.

अशा कितीतरी क्रान्तिक महत्त्वाच्या बाबी आहेत की ज्यातील क्षेत्रीय बदलाच्या प्रक्रिया, ज्यांचा आपण जैविक विकासाशी संबंध जोडतो अशा प्रक्रियांपेक्षा भिन्न आहेत. डिकिन्सन बरोबर झालेल्या चर्चेत क्रौवी असे मत मांडतो, की " सांस्कृतिक रुपे आणि मानवी समाज यांच्यात होणाऱ्या बदलांत सजीवांच्या उत्क्रांतीचे खास लक्षण म्हणून सांगता येईल अशा आंतरिक गरजेचा मागमूसही नसतो ".

अशा कितीतरी क्रान्तिक महत्त्वाच्या बाबी आहेत ज्यांतील क्षेत्रीय बदलाच्या प्रक्रिया, ज्यांचा आपण सजीवांच्या विकासांशी साहचर्यसंबंध जोडतो, अशा प्रक्रियांपासून भिन्न असतात. डिकिन्सन बरोबर झालेल्या चर्चेत क्रौवी असे नाव देतो, की सांस्कृतिक रुपे आणि मानवी समाज यांच्यात होणाऱ्या बदलात, " सजीवांच्या उत्क्रांतीचे खास लक्षण म्हणून सांगता येईल अशा, आंतरिक गरजेचा मागमूसही नसतो. " नूतनरुप निर्मितीच्या दालनात मानवी निवडबुद्धीला आणि त्याच्या नवारंभशक्तीला मुक्तप्रवेश असतो. खरेतर, तो नवनिर्मिती व संघटनक्षमता यांचा विषय आहे. सजीव वस्तूशी अथवा भूम्याकारशास्त्राशी निकटसाम्य दाखविण्याचा प्रयत्न म्हणजे असत्यार्थाच्या राजमार्गावरील मिरवणूकच म्हटली पाहिजे. [(२०२, १५). या निष्कर्षाला डिकिन्सननेही आपली अनुमती सूचित केली आहे.] कदाचित काटूत्सबर्गने यापेक्षाही अधिक महत्त्वाचा आहे. कोणत्याही भूक्षेत्राच्या (अथवा भूदृश्याच्या) विकासात उत्क्रांतीची एकात्मता असत नाही. असते ती अंशतः सुसंबद्ध आणि अंशतः असंबद्ध अशा, त्या क्षेत्रात होणाऱ्या, बदलांची केवळ गोळाबेरीज ! रहिवासी व्यक्तींची इच्छाशक्ती आणि उत्साह व वेगवेगळ्या घटकांत होणारे बदल, अशा दोन प्रकारचे बदल निर्माण करणाऱ्या शक्तींची बेरीज करून एक एकात्म-शक्ती निर्माण होऊच शकत नाही तर त्या कमीजास्त प्रमाणात अगदी स्वतंत्रपणे कार्य करणाऱ्या, इतकेच काय, एकमेकांशी संघर्ष करणाऱ्या शक्ती असतात. (२४८, ४१३). म्हणून, ब्रोकने ' विकास ' ही संज्ञाच त्याज्य मानली आणि एकाच भूदृश्यक्षेत्रातील केवळ काही बदल म्हणून त्यांचा उल्लेख केला (३३३, १०).

वर घेतलेले आक्षेप पृथ्वीपृष्ठाच्या संपूर्ण क्षेत्राच्या विवेचनालाच लागू आहेत. पण, आपण जेव्हा विशिष्ट क्षेत्रीय एककाच्या किंवा एखाद्या स्वतंत्र भूदृश्याचा विचार करत असतो तेव्हा आणखीन महत्त्वाचा आक्षेप घेण्यात येतो. तुमचे ते क्षेत्र कितीही मर्यादित असो, त्यातील सर्वच्या सर्व बदल त्या क्षेत्राच्या स्वतःच्या शक्तींनीच निर्माण केलेले असण्याची शक्यता नाही ; ते इतर क्षेत्रांतून अतिक्रमण करून आलेल्या शक्तींनीही घडवून आणलेले असण्याची शक्यता असते. मुखभागाकडील मिसिसिपीच्या पूरमैदानाचे भूदृश्य अंशतः उत्तरेकडील ॲपालेशियनच्या परिस्थितीतून निर्माण झालेले आहे, आणि त्यामुळेच त्याच्यात केव्हाही बदल घडून येण्याची शक्यता आहे. हजारो मैल प्रदेशातून आलेल्या व ॲमेझॉन खोऱ्यात घुसलेल्या शक्तींनी व सामग्रींनी ॲमेझॉनच्या सखल भागातील मूळचे सुसंवादी ". भूदृश्य " कसे उध्वस्त करून टाकले आहे, याचे वर्णन ब्लंटम्लीने केलेले आहे. श्लूटरने तर असाही युक्तिवाद मांडला, की कोणत्याही एका क्षेत्रातील बहुतांश बदल परक्या क्षेत्रांतून आलेल्या लोकांच्या हालचालींमुळेच निर्माण झालेले असतात (१३१, ५०७ ff). अशा प्रकारचे हे क्षेत्रीय बदल, आणि सजीवांची वाट व विकास, किंवा अगदी स्फटिक व गाळमाती यांचा निर्जीव विकास या दोहोत काही साम्य आहे असे म्हणणे स्वतःचीच फसवणूक करून घेण्यासारखे आहे. तसेच, त्या क्षेत्रातील किंवा क्षेत्राबाहेरील कोणत्यातरी एका समन्वयकारी शक्ती हे बाहेरुन घुसडलेले बदल नियंत्रित केलेले होते, असे म्हणणे हे तितकेच फसगत करणारे आहे. ज्याप्रमाणे एखादा चित्रकार आपल्याजवळील बाह्य सामग्रीचा उपयोग करून पटावर एक एकरुप चित्र साकार करतो, त्याप्रमाणे " नैसर्गिक भूदृश्याचे " रुपांतर " सांस्कृतिक भूदृश्यात " होत नाही. कारण हे बदल काही एका कलावंताचे काम नव्हे, किंवा एखाद्या सुसंघटित कलावंत पथकाचे ते काम नव्हे ; तर केवळ काहीशा स्वैरवृत्तीच्या नैसर्गिक आणि मानवी शक्तींच्या एका संचाचे ते कार्य आहे.

अंतर्गत असोत की बाह्य असोत, एखाद्या क्षेत्राचे भूदृश्य बदलू शकणाऱ्या विविध शक्ती क्षेत्राच्या सर्वसामान्य मर्यादा मानत नाहीत म्हणूनच एक असे अनुमान निघते की, कोणत्याही प्रकाराने एखादे क्षेत्र हे एक विशिष्ट एकक आहे असे आम्ही मानले तरी, ती एकात्मता एका विशिष्ट कालापुरतीच खरी असल्याचे सिद्ध होऊ शकेल. आजचे एकक क्षेत्र या पूर्वीच्या काळात इतके एकरुप नसेलही कदाचित् ! उद्या ते क्षेत्र इतके उध्वस्त होण्याची शक्यता आहे, आणि त्यामुळे त्याचे काही भाग इतके बदलून जाण्याची शक्यता आहे, की त्यांचा समावेश शेजारच्या क्षेत्रीय एककात करणे भाग पडेल, अनेक कालखंडांच्या संदर्भात ज्याचा विचार केला जात आहे ते क्षेत्र म्हणजे एक स्वैर एकक आहे याचे नित्य स्मरण ठेवले, तर कोणत्याही क्षेत्राच्या सांस्कृतिक भूदृश्याचा कसलाही अभ्यास न्याय्यच ठरतो, असा ब्रोकचा निष्कर्ष आहे. अशा स्वैर एकक क्षेत्रांत होणाऱ्या बदलांच्या प्रक्रियांच्या संयोगाचा अभ्यास करण्यामागे काहीही हेतू असो, पण असे अभ्यास भूगोलाने करणे आवश्यक आहे असे तर्काने सिद्ध होण्याची शक्यता नाही. उलटपक्षी, हे प्रमेय म्हणजे तत्वतः पहाता, परिसरात्मक

नियंत्रणाच्या संकल्पनेने पुन्हा डोके वर काढल्याचा पुरावाच आहे, असे मत ब्रोकने विशेष भर देऊन मांडतो. एखादे नैसर्गिक क्षेत्र (किंवा ' भूदृश्य ') हे मानवाने केलेल्या सर्व बदलानंतरही तसेच एकरुप राहील व त्याचे रुपांतर " सांस्कृतिक एकक भूदृश्यात " होईल–असे प्रत्यक्षात कोणीच म्हणत नाही, आणि काही जण तर सरळ अमान्यच करतात – तरीही वरील गृहीत तत्वच याच्या बुडाशी असते. पण प्रत्यक्षात मात्र, " सांस्कृतिक भूदृश्यात्मक प्रदेश हा अनेक भूदृश्यरुप प्रदेशांची तुकडे जोडच असते. " आणि म्हणूनच " सांस्कृतिक भूदृश्यात्मक प्रदेश विस्तार अथवा संकोच पावणारी क्षेत्रे म्हणून दिसतीलच पण क्वचित् ती स्थलांतर करत असल्याचेही दिसावयास हरकत नाही ! " (२९७, १०३, १०७).

या निष्कर्षावरुन असे अनुमान निघते, की एखाद्या प्रदेशाच्या अभ्यासकास त्या क्षेत्राच्या विकासाच्या विविध टप्यांपैकी प्रत्येक अवस्था तपासून पहाण्याची तर्काधिष्ठित आवश्यकता नाही ; इतकेच नव्हे तर, ऐतिहासिक अंतःछेदांचा अशाप्रकारचा कालपट सादर करण्याने वर्तमान परिस्थिती समजून घेण्याचे एक उत्तम साधन हाती येईलच अशी खात्री देता येणार नाही. ज्या कारकांमुळे वर्तमान रुपधेयांची निर्मिती झाली, त्यांच्या स्पष्टीकरणापुरताच गतकालीन वस्तुस्थितींचा उपयोग करून आणि विद्यमान रुपधेयांपैकी प्रत्येकाचे वेगवेगळे स्पष्टीकरण देणे आवश्यक आहे, हे लक्षात घेऊन, जी थोडी एकात्मता त्या दृश्यात दिसत असते ती फक्त वर्तमान क्षेत्रातच आढळत असल्यामुळे, त्यातच आढळणाऱ्या रुपधेयांचे विश्लेषण करून वर्तमानाच्या अर्थानुसंधानापर्यंत आपण सहजगत्या पोहोचण्याची कदाचित् शक्यता आहे.

प्रादेशिक अभ्यासाच्या " गतिमान " पद्धतीचे बहुतेक सर्व पाठिराखे वर्तमान भूदृश्याच्या योग्य आकलनाचे ते एक साधन आहे असे तिचे समर्थन करतात. पण स्टॅन्ले डॉज याच युक्तिवादाची उलटापालट करून, केवळ वर्तमानाचा अभ्यास केला जावा या गोष्टीला शास्त्रीय आधार नाही असे म्हणतो. " भूगोलाच्या पुष्कळशा लिखाणात प्रदेशांचा विचार एक ' स्थिर वस्तू ' एक ' सृष्ट-पदार्थ ' म्हणून केलेला असतो. पण महत्त्व सृष्टीला नसून सृजनाला असते. कोणत्या प्रक्रियेने हे प्रदेश साकार झाले आहेत, कोणत्या प्रक्रियेमुळे त्यातील निसटती स्थित्यंतरे चालूच रहातात, आणि भविष्यकालात त्यांच्या वर्तनदिशा कोणत्या राहातील ? या प्रश्नांनी फिरता भूगोलकार अस्वस्थ झालेला असतो. (३४२, ३३५). भूगोलकारापुढे खरी समस्या उभी रहाते ती याच प्रश्नांच्या रुपाने, कारण एखादा प्रदेश केवळ कसा आहे, हा प्रश्न काही एका शास्त्रज्ञाच्या तोलामोलाचा नाही, अशी पुस्ती डॉजने आपल्या एका पत्रात वरील विधानाला जोडली आहे.

एखाद्या फिरत्या भूगोलाभ्यासकाला अस्वस्थ करणारे काही विशिष्ट प्रश्न त्याच्या दृष्टीने निश्चितच सर्वप्रथम महत्वाचे वाटले तर तो व्यक्तिगणिक बदलणारा वैयक्तिक प्रतिक्रियेचा विषय झाला. पण, एखाद्याने " महत्त्व कशाला द्यावयाचे आहे ? " या प्रश्नाचे वस्तुनिष्ठ दृष्टिकोणातून परीक्षण करावयाचे ठरविले, तर त्याला स्वतःला एक प्रश्न विचारावाच

लागेल. सृष्टवस्तूलाच महत्त्व द्यायचे नाही असे ठरविले, तर त्याच्या सृजन प्रक्रियेला कितीसे महत्त्व देता येईल ? सर्वच शास्त्र-शाखांतून काय अस्तित्वात आहे (किंवा काय अस्तित्वात होते) याचे स्पष्टीकरण देण्यापुरताच सृजनप्रक्रियेचा अभ्यास सार्थ ठरतो. म्हणून त्याचा अभ्यास दुय्यम दर्जाचा असतो.* विकास प्रक्रियांशी मोठ्या प्रमाणात संबंध असलेल्या इतिहास क्षेत्रातही, कालांतर क्रमदर्शन हे त्याचे प्रयोजन नव्हे. कोणत्याही एका विशिष्ट कालखंडात घडलेल्या घटनांच्या एकात्मतेचे स्पष्टीकरण करणे हे त्याचे खरे प्रयोजन आहे, असे क्रोबरने दाखवून दिले. (११६, ५४५ f).

अगदी निःसंदिग्धपणे असेही म्हणावयास हरकत नाही, की कशाला महत्त्व द्यावयाचेच असेल तर त्या प्रदेशाच्या अस्तित्वाला, त्यात कशा कशाचा समावेश होतो याला महत्त्व दिले पाहिजे. वेगवेगळ्या नमुन्यांच्या संबंधयोगांचे परीक्षण करणाऱ्या क्रमबद्ध शास्त्रांच्या अभ्यासकाला जसे एकमेव समस्येचे उत्तर द्यावयाचे असते, तशा प्रकारची एकच एक आखीव रेखीव समस्या वरील विधानाने भूगोलकारापुढे सादर केली जात नाही. उलटपक्षी, कितीतरी अधिक जटिल आणि सामान्य स्वरुपाची समस्या भूगोलकारापुढे उभी असते. त्याची संगती साहचर्यजन्य घटनांचा अन्वयार्थ लावणाऱ्या इतिहासकारापुढे असणाऱ्या समस्येशीच घालता येईल—उदाहरणार्थ, एलिझबेथच्या कारकीर्दीतील इग्लंडमधील ऐतिहासिक घटनांची समस्या. कोणत्याही प्रदेशाच्या विद्यमान भूगोलाचे संपूर्ण आकलन होणे—म्हणजेच वस्तुस्थिती समजून घेणे व त्यांचा अन्वयार्थ लावणे ही कोणाही भूगोलाभ्यासकापुढे उभी रहाणारी समस्या काही लहानसहान नसते ; किंवा अशाने आपले समस्याक्षेत्र लवकरच संपुष्टात येईल अशी आम्हा भूगोलकारांना चिंता पडण्याचे कारण नाही. पेंकने अशी नोंद करून ठेवली आहे, की " जगात असा एकही प्रदेश नाही, की ज्याची भौगोलिक चिकित्सा करून संपलेली आहे असे मानले जाण्याची शक्यता आहे. " पेंकने हे विधान करून एक पुरी पिढी मागे पडली तरी, नवनवीन समस्या निर्मितीच्या अखंड स्रोतावरील त्याने वारंवार केलेली टिकाटिप्पणी असे सुचविते की, त्याला आजही त्याचा पुनरुद्धार करावासा वाटेल. (१२८, ५९). अर्थात, वेगवेगळे अभ्यासक त्यांच्या त्यांच्या अभिरुचीच्या प्रश्नांचा अभ्यास करत रहाणारच. पण, जोपर्यंत हे बहुरुपी व जटिल विविधतेने नटलेले जग त्याच्यापुढे आहे तोपर्यंत एकूण भूगोलाला नव्या समस्या शोधत रहाण्याची गरजच भासणार नाही.

म्हणून आपण पुढील निष्कर्ष काढावयास हरकत नाही. एखाद्या प्रदेशातील वेगवेगळ्या रुपधेयांचा अन्वयार्थ लावण्यासाठी त्याला भूतकालीन भूगोलाचा अनेकदा आश्रय घेणे भाग पडले तरीही, त्या प्रदेशाच्या भूगोलाचा अभ्यास त्याच्या ऐतिहासिक विकासक्रमाधारेच झाला पाहिजे असा दंडक असण्याची गरज नाही. उलट, एखाद्या अभ्यासकाने एखाद्या प्रदेशाचा इतिहास व भूगोल या दोहोंचेही दर्शन एकाच वेळी घडविण्याचे महत्वाकांक्षी कार्य

---

* येथील कंसात पुढील मजकूरही वाचा. (–किंवा काय अस्तित्वात येणार आहे) ; येथे ' दुय्यम ' याचा अर्थ " क्षुल्लक " असा न करता, " गौण " असा करावा. त्याबरोबरच पुरवणी टीप क्र. ३० पहा.)

अंगीकारले नसेलं, तर या दोन दृष्टिकोणांत असलेला भेद स्पष्ट करणे त्याला आवश्यकच होईल. कालपरिभाषेत घटनासाहचर्यांचा अभ्यास करणे हा एक दृष्टिकोण झाला, स्थलपरिभाषेत घटनासाहचर्यांचा अभ्यास करणे हा वेगळा दृष्टिकोन होईल ; कोणत्याही गोष्टीकडे पहाण्याची पद्धती भूवंटनात्मक असणे हे भूगोलाचे मार्गदर्शक तत्व असेल, तर कोणत्याही अभ्यास विषयाची मांडणी कालक्रमानुसारी असणे हा तो ग्रंथ मूलतः ऐतिहासिक स्वरूपाचा आहे या गोष्टीचा हा पुरावाच ठरतो—मग तो विषय एक " भौगोलिक प्रदेश " असला तरीही चालेल.

भूशास्त्रात्मक दृष्टिकोनानुसार भूगोल फक्त मानवी कालांनी, ऐतिहासिक कालांनी, किंवा भूतकालाच्या तुलनेत वर्तमानकाल विस्ताराने मर्यादित आहे. भूगोलाचा संबंध अशारीतीने काल या कारकाशी घातला गेल्याने, भूशास्त्राशी त्याचा संबंध विरोधात्मकच होतो असे नाही असा हेटनरचा निष्कर्ष आहे. भूगोल हे असे एक क्षेत्र आहे, की " सर्वसामान्यपणे काल हा कारक त्यात गौण मानला जातो. " ऐतिहासिक भूशास्त्रासह सर्वच ऐतिहासिक शास्त्रांच्या विरुद्ध " भूगोलात प्रत्यक्ष कालप्रवाहाचा मागोवा घेतला जात नाही. हा पद्धतीतंत्रविषयक नियम अद्याप दुर्लक्षित असल्याचे वारंवार दिसून येते. भूगोल एका विशिष्ट कालावधीतील अंतःछेद नजरेपुढे ठेवतो व एकाच निवडक कालातील परिस्थितीचे स्पष्टीकरण देता यावे म्हणून कालक्रमानुसार विकासाचा विचार करतो. " हा विशिष्ट कालखंडाइतका मर्यादित असणे आवश्यक असते की, घेतलेला तो अंतःछेदच उध्वस्त होईल असे कोणतेच उत्पात त्यात घडलेले नसावेत. म्हणजे एक गोष्ट निश्चित आहे. विद्यमान प्रादेशिक भूगोलाचा अन्वयार्थ लावण्यासाठीच भूतकालीन परिस्थितीचा विचार अनेकदा करावा लागेल. भूगोलाला अशा औपचारिक संकल्पनेची गरज आहे, याचा अर्थ भूगोलाचा इतिहास बनवावयाचा आहे असा नव्हे !* (१२६, ५५६, किंवा १६१, १३१ f).

## क – ऐतिहासिक भूगोल

भौगोलिक व ऐतिहासिक या दोन दृष्टिकोणांतून घटना एकसंघ करता येण्याची शक्यता असेल तर त्या दोहोंचा सुसंगत संयोग हा केवळ भूगोलही नसेल अथवा केवळ इतिहासही नसेल तर तो एकाचवेळी दोन्हीही असेल. अशाप्रकारचा संयोग करणे मानवी बुद्धीला पेलेल का याची झाली यापेक्षा अधिक चर्चा करण्याची आवश्यकता नाही. निदान, त्याची प्रायोगिक संभाव्यता कोणी प्रात्यक्षिकाने सिद्ध करीतोपर्यंत त्याची गरज नाही. उलटपक्षी, प्रत्यक्ष काल हा काही ना काही भूगोलविषयक कारक नव्हे, म्हणजेच, क्षेत्रीय घटनांच्या एकसंधीकरणाचा अभ्यास करतांना भूगोल स्थिरकालच गृहीत धरतो. ही वस्तुस्थिती असली तरी, त्यामुळे भूगोलाभ्यास फक्त वर्तमान कालापुरताच

---

* (शेवटचे वाक्य अवतरण चिन्हांकित असणे बरे, कारण हेटनरवरून ते उद्धृत केलेले आहे. तसेच पुरवणी टीप क्रमांक ३१ पहा.)

इ-१५५२७-१६ अ.

मर्यादित असला पाहिजे असे नाही. भूगोलाभ्यासक, कोणत्याही कालबिंदूतून, सत्यस्थितीचा अंतःछेद काढू शकतो. पण, कोणतेच विशेषण न जोडता, भूगोल ही संज्ञा वापरली जाते तेव्हा वर्तमानकालातील छेदाशीच त्यांचा संबंध असतो असे गृहीत धरतो. म्हणून, कोणत्याही पूर्वकालीन कालबिंदूतून घेतलेल्या अगदी अशाच स्वरूपाच्या छेदाचा बोध होण्यासाठी ' ऐतिहासिक भूगोल ' ही संज्ञा आपण वापरण्यास हरकत नाही.

म्हणूनच, ऐतिहासिक भूगोल ही आर्थिक भूगोल व राजकीय भूगोल यांच्याशी तुलना करता येईल अशी भूगोलाची शाखा नव्हे. तसाच, तो इतिहासाचा भूगोल नव्हे किंवा भूगोलाचाही इतिहासही नव्हे.[६१] काही अंशी, आपल्या शाखोपशाखांनी परिपूर्ण असा, भूगोलाचा हा एक निराळा प्रकारच आहे. " परिणामतः, कोणत्याही प्रदेशाचा एक ऐतिहासिक भूगोल, तात्विकदृष्ट्या पहाता त्या प्रदेशाच्या प्रत्येक कालखंडासाठी एक भूगोल असणे शक्य आहे, आणि तो प्रत्येक कालखंडासाठी स्वतंत्र लिहिलेला असणे आवश्यक आहे. थोडक्यात ऐतिहासिक भूगोल एक असणार नाही, तर अनेक असतील, " असे हेटनरने म्हटले आहे. (१६१, १५१).

दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर, या संज्ञेतील " ऐतिहासिक " हा शब्द इतिहासाच्या क्षेत्राशी या विषयाचा प्रत्यक्ष संबंध सूचित करत नाही, तर तो " ऐतिहासिक " म्हणजे ' भूतकालाशी ' संबंधित अशा अर्थाने वापरलेला आहे. एक गोष्ट निश्चित आहे की, ऐतिहासिक भूगोलात अभ्यासासाठी घ्यावयाच्या गृहीत बहुतांशाने " ऐतिहासिक " सामग्रीतून संपादन करणेच प्राप्त असते, आणि या अर्थाने त्याचे संबंध इतिहासक्षेत्रात प्रत्यक्षपणे गुंतलेले असतात. शिवाय, एखाद्या भूतकालखंडाच्या अभ्यास करणाऱ्या इतिहासकाराचे लक्ष अशा ऐतिहासिक भूगोलाकडे वेधले जाण्याची शक्यता आहे, कारण त्या कालखंडाचा इतिहास समजून घेण्यासाठी भूगोलज्ञानाची गरज काही प्रमाणात इतिहासकाराला असतेच. वर्तमान इतिहासकाराचे लक्ष वर्तमान भूगोलाकडे वेधले जाण्याची शक्यता असते तसाच हाही प्रकार आहे.

या दोन क्षेत्रांतील या समांतर परिस्थितीचे चित्र पुढे दिलेल्या विधानाने पूर्ण करण्यास हरकत नाही. कालखंडांच्या स्वरूपात घटनांचे एकसंधीकरण साधण्यासाठी इतिहास कटिबद्ध आहे, म्हणून कमीजास्त जगातील प्रत्येक प्रमुख क्षेत्रासाठी वेगवेगळ्या इतिहासांना इतिहास क्षेत्राने मान्यता देणे आवश्यक आहे. त्याचपद्धतीने, विविध क्षेत्रांतील घटनांचे एकसंधीकरण साधणारा भूगोलही प्रत्येक कालखंडासाठी वेगवेगळ्या भूगोलांना मान्यता देतो. वर्तमान भूगोल या अर्थाने भूगोलाची संगती स्वदेशांच्या इतिहासाशीच

---

६१. भूगोलाच्या इतिहासाचा उल्लेख एक शास्त्र या नात्याने करता यावा म्हणून ब्रिटिश भूगोलकारांनी ऐतिहासिक भूगोल ही संज्ञा वापरलेली दिसते. प्रत्येक शास्त्राचा स्वतःचा म्हणून खाजगी स्वरूपाचा, असेही म्हणावयास हरकत नाही असा, एक इतिहास असतो, ही गोष्ट उघड आहे. जरी त्याचे वाचन फक्त त्या क्षेत्रात कार्य करणारे अभ्यासकच करण्याची शक्यता असली तरी, तर्कदृष्ट्या तो एक प्रकारचा इतिहासच असतो. अमेरिकी लेखकांपैकी जॉन के. राइट् याला या विषयाची आत्यंतिक अभिरूची होती.

लागते. आणि ऐतिहासिक (गतकालखंडातील) भूगोलांची संगती परदेशांच्या इतिहासाशी लावता येते. एका विशिष्ट परिस्थितीमुळे या दोहोंत एक व्यावहारिक फरक दिसून येतो. परदेशीय इतिहासांचा अभ्यास करताना स्वदेशाच्या इतिहासांच्या अभ्यासासाठी वापरलेल्या पद्धतींचा उपयोग करणे शक्य होते (अर्थात भाषिक भेदांचा विचार बगळावयाचा आहे). भूतकालीन भूगोलांचा अभ्यास करताना मात्र, त्यासाठी आवश्यक असलेल्या अभ्यास क्षेत्रांचे प्रत्यक्ष निरीक्षण करता येणे शक्य नसते. शिवाय येथे दोहोचे अभिरुची विषयही वेगळे असतात. ते तसे का असतात हे येथे सांगत बसण्याची आवश्यकता नाही. कोणत्याही कालातील आणि कोणत्याही देशातील लोकांना परदेशांच्या इतिहासांसंबधी जितकी बौद्धिक अभिरूची असते, मग ते इतिहास वर्तमानकालीन असोत भूतकालीन, जितकी अभिरूची आपल्या स्वतःच्या देशाच्याही भूतकालिक भूगोलात त्यांना असत नाही.

ऐतिहासिक भूगोल हा केवळ भूतकालखंडांचा भूगोल असतो. या मताबाबत भूगोलकारांच्यात जितकी एकवाक्यता दिसते, तितकी कदाचित कोणत्याही व्याख्येच्या प्रश्नाबाबत असलेली दिसणार नाही. प्राचीन भूगोल आणि वर्तमानकालीन भूगोल यातील भेद स्पष्ट करण्यासाठी कांटने हे विधान केले (४० f, ४) अणि नंतर मार्थेने (७०, ४५३) आणि व्हिमरने (७४, १०) तेच विधान केले. हेटनरने त्याच्या १८९५ च्या विधानात प्रथम संक्षेपाने केले आणि पुढे काही वर्षांनी आपल्या प्रतिपादनात अधिक पूर्णत्वाने केले. (१२७, ७ : १२६, ५६३-६४ व त्याचीच पुनरावृत्ती १६१, १५०-५१). अशीच मते वेगवेगळ्या देशातील निरनिराळ्या मतप्रणालींच्या इतक्या भूगोलकारांनी विधान रूपाने दिली आहे, की भूगोलविषयक विचारधारेत हे मत सुप्रतिष्ठित आहे असे मानणे समर्थनीय ठरण्यास हरकत नाही. आपल्या देशात विशेषकरून, राल्फ. एच्. ब्राऊन यांनी या क्षेत्राचे स्वरूप, आणि ज्या पद्धतींनी त्याचा अभ्यास करणे शक्य आहे त्या पद्धती यांची चर्चा केली आहे. आणि एका तपशीलवार उदाहरणाने त्याचे सचित्र स्पष्टीकरणही केले आहे (३३४) (अशा प्रकारच्या ऐतिहासिक भूगोलासंबंधीच्या मतांसाठी पहा : हॅसिंजर (१६५, १४ f) ब्रूहेन्स (८३, १०० f), उन्स्टेट (१९३), बॅरोज (२०८, ११८) सॉर (८४, २००) आणि हार्टशॉर्नने नोंदविलेले अन्य संदर्भ. (२१६, ७९०). फोगेलने जर्मनीतील या क्षेत्रातील वाङ्मयाची चर्चा केली आहे. आणि एक विस्तृत संदर्भ यादीही त्यास जोडली आहे (८९).*

कोणत्याही देशाच्या ऐतिहासिक भूगोलाची सुरूवात त्या देशाच्या इतिहासातील अतिप्राचीन कालखंडापासूनच झाली पाहिजे असे समजण्याची गरज नाही, असे मत हेटनरने दिले आहे आणि ब्राऊनने त्याचे प्रात्यक्षिकही दिले आहे. भूगोलाप्रमाणेच, येथेही त्याची सुरूवात, प्रगती आणि शेवट कालक्रमानुसार होत नाही, तर लेखकाला इष्ट असलेल्या कोणत्यातरी कालखंडातील भूगोलाचा तो विचार करतो. ज्याप्रकारे आजच्या भूगोलाचा विचार केला जातो अगदी त्याचप्रकारे येथेही विचार केला जातो. (ब्राऊन, ३३४).

---

*याच यादीत इ. जी आर. टेलर (३३९, प्रास्ताविक), मॅकेंडर (४२६) आणि ईस्ट (४२७), या नावांचाही सहज समावेश करता आला असता ; मात्र सॉरचा संदर्भ समाविष्ट करणे इष्ट नव्हते.

तरीही या क्षेत्रातील बहुतांश अभ्यासकांना, ऐतिहासिक दृष्टिकोणाच्या प्रभावामुळेही असेल, प्रथम इतिहासपूर्वकालीन भूदृश्याची पुनर्रचना करून घेणे आवश्यक वाटले, आणि नंतरच त्यांनी पुढील कालखंडातील भूदृश्यांची रचना केली. ज्यांची इतिहासपूर्वकालीन भूदृश्यासंबंधींची अथवा पूर्वेतिहासकालीन भूदृश्यासंबंधींची विश्वसनीय व समर्पक म्हणता येईल अशी गृहीत सामग्री (data) उपलब्ध आहे अशी क्षेत्रे जगाच्या पाठीवर फारच थोडी आहेत, असे ब्राऊनने दाखवून दिलेले आहे. विद्यमान सांस्कृतिक भूदृश्यांच्या विश्लेषणाने तर्काधारे केलेली आणि पूर्वकालीन भूशोधकांनी व वसाहतकारांनी पुष्कळअंशी अविश्वसनीय आणि तुटपुंज्या वर्णनांच्या आधारे केलेली काल्पनिक पुनर्रचना, कदाचित् मनोरंजक वाटण्याची शक्यता असली तरी त्यांचे शास्त्रीय मूल्य संशयास्पदच रहाणार. मानवाने त्या दृश्यात प्रथम प्रवेश केला——मग तो केव्हाही झालेला असो——तत्पूर्वीची, म्हणजेच " नैसर्गिक व मूलस्वरूप वनस्पतिजीवनाची पुनर्रचना " करता आली तरच " प्रमुख गृहीत आरंभरेषा मिळेल व त्या आधारे मानव निर्मित विकृतींचे मापन करणे शक्य होईल, " ही सॉडरची सूचना म्हणजे ' असाध्य ते साध्य ' करण्याची प्रस्तुती आहे. खरे म्हणजे " गृहीत आरंभरेषेवर " (datum line) येऊन पोहोचण्यासाठी ऐतिहासिक नोंदीचाच विचार करणे भाग आहे.

अधिक विश्वसनीय सामग्रीचा उपयोग करता यावा म्हणून, ज्यांच्यासंबंधी फारच थोडी विश्वसनीय सामग्री उपलब्ध होती, अशा सर्व पूर्वकालीन कालखंडांकडे ब्राऊनने हेतुपुरःसर दुर्लक्ष केले आणि ज्यात पुरेशी भौगोलिक गुणवत्ता आणि विश्वसनीयता आहे, आणि ज्याच्या आधारे केलेली तत्कालीन भूगोलाची पुनर्रचना समर्थनीय ठरण्याची शक्यता आहे, अशी विद्यमान सामग्री त्याच्या इष्ट प्रदेशाच्या इतिहासातील ज्या कालखंडाच्या संदर्भात त्याच्या हाती लागली, तोच कालखंड त्याने प्रथम निवडला.

ब्राऊनच्या पद्धतीत त्याला ऐतिहासिक ज्ञानोद्‌गमावर (Sources) म्हणजेच ऐतिहासिक नोंदीवर बऱ्याच प्रमाणात अवलंबून रहावे लागले. आणि काही प्रमाणात तरी इतिहासनिष्ठ पद्धतींचा वापर करावा लागतो, ही सत्यस्थिती आहे. यामुळे हेटनरच्या निष्कर्षाचे समर्थनच झाल्यासारखे दिसते. ऐतिहासिक भूगोलाची मशागत करण्याचे काम पुष्कळ अंशाने इतिहासकारांनीच अंगावर घ्यावे. (१६१, १५१). पण भौगोलिक सामग्रीसंबंधीचा ऐतिहासिक नोंदी तपासून पहाण्यासाठी व त्यांचा अन्वयार्थ लावण्यासाठी, त्याला प्रशिक्षित भूगोलकाराचे ज्ञान आणि पात्रता असावी लागते, याचे ब्राऊन याने प्रात्यक्षिकच दिले आहे. भूतकालीन भूगोलाचा अन्वयार्थ लावण्यासाठी ऐतिहासिक नोंदीचा उपयोग करताना वापरावयाची साधने वर्तमान भूगोलाच्या ज्ञानातूनच प्राप्त होतात, (४०, ३४) याच कांटच्या मताचे त्याने सोदाहरण स्पष्टीकरण केले आहे. असे करताना ऐतिहासिक विकास हे साध्य समजून त्याचा मागोवा तो घेत गेला नाही, तर तो भौगोलिक हेतू साध्य व्हावा म्हणून या विकासाभ्यासाचा त्याने उपयोग केला. (c/o हार्तिजर, १६५,

१४८). परिणामतः कोणाही इतिहासकाराला जो निर्माण करणे, अथवा तशी आकांक्षा बाळगणेही शक्य झाले नसते असा मूलतःच एक वेगळ्या स्वरूपाचा ग्रंथ ब्राऊनने निर्माण केला–आणि तोच त्याच्या पद्धतीचा अंतिम निकष ठरला. (३३४).

इष्ट प्रदेशाचा वर्तमान भूगोल सादर करण्यापूर्वी त्याच्या एका अगर अनेक भूतकालखंडांतील ऐतिहासिक भूगोलाचा तपशीलवार अभ्यास करण्याची प्रेरणा प्रादेशिक भूगोलकारास देणारा आणखी एक विचार असतो. विद्यमान परिस्थितीवरून पहाता, काही क्षेत्रांचा भूगोल इतका वेगळा असतो,–अर्थातच, बऱ्याच अंशी शाश्वत असलेल्या परिस्थितींच्या अखंड विकासक्रमाने त्याने ही अवस्था प्राप्त झालेली नसते –की वर्तमान भूगोलाचे प्रथमदर्शनी आकलन होण्यासाठी त्या विशिष्ट कालखंडाचा ऐतिहासिक भूगोलाचे प्रथमच चित्रण करणे आवश्यक होऊन बसते. व्हेनिसचा नागरी भूगोलाभ्यास हे तत्वाचे एक उत्कृष्ट उदाहरण ठरेल. कारण पंधराव्या शतकातील व्हेनिसच्या भूगोलाचा पूर्णतया अर्थबोध करून घेणे ही गोष्ट विद्यमान नगराच्या भूगोलाच्या आकलनाच्या दृष्टीने प्राथमिक महत्वाची ठरेल. १९३७ साली, मध्य-डान्यूब-भूमीच्या राजकीय भूगोलाच्या अभ्यासाची सुरुवात करताना, प्रस्तुत लेखकाला असे आढळून आले, की तत्कालीन परिस्थितीवर १९ व्या शतकातील राजकीय भूगोलाचे संस्कार झाले आहेत, (आणि आजही ते तितकेच लागू आहेत). म्हणूनच युद्धपूर्व ऑस्ट्रो-हंगेरियन साम्राज्याचा राजकीय भूगोल बराच तपशीलवारपणे प्रथमच सादर करणे त्याला इष्ट वाटले (३५८). पण त्याच पद्धतीने तत्पूर्वकालखंडांची परिस्थिती सादर करत बसण्याची गरज लेखकाला भासली नाही. पण, त्यांच्या तपशीलवार विश्लेषणातील काही विशिष्ट ठिकाणी काही बऱ्याच शतकांपूर्वीच्या विशेष रूपधेयांचे परीक्षण करणे आवश्यक झाले.

शेवटी, ऐतिहासिक भूगोलातील अभ्यासाच्या एका प्रकाराचा विचार करावयाचा आहे, आणि तो इतिहासाशी आणखी कितीतरी अधिक जवळीक करणारा आहे. जर कोणी भूगोलकार एकाच प्रदेशाच्या –किंवा एका प्रदेशाच्या एका भागाच्या वेगवेगळ्या दोन अगर अधिक कालखंडांतील ऐतिहासिक भूगोलाचा अभ्यास करत असेल, तर त्या वेगवेगळ्या चित्रांमधील फरकाचा तो विचार करत असणारच. माझ्या मते एस्. डी. डॉज यांना या प्रकाराबद्दल विशेष आवड आहे. आणि जरी त्यांचा खास कल इतिहासाकडे असल्याची लक्षणे दिसत असली, तरी तौलनिक ऐतिहासिक भूगोलाचा एक प्रकार हे त्यांचे –बदलांच्या अभ्यासाचे –स्थान अबाधित राहील अशी शक्यता दिसते. (तसेच भूगोलातील ऐतिहासिक लय याविषयीची वोल्सची संकल्पना (२४३) आणि ब्यूर्गरची या विषयावरील चर्चा (११, १९३ f) यांची तुलना करा).

कालाच्या अनेक खंडांतून मिळणाऱ्या अंतःछेदात आढळणाऱ्या भूगोलाची तुलना येथे * व्हावयाची असल्याने यांतील प्रत्येक अंतःछेदाच्या प्रमुख विभागानुसार त्या अभ्यासाचे संघटन अशा प्रकारच्या अभ्यास लेखात होणे आवश्यक आहे, हे गृहीत आहे. पण या प्रत्येक प्रमुख

*पुरवणी टीप क्रमांक ३२ पहा.

विभागात करावयाचा भौगोलिक अभ्यास कालखंडाच्या क्रमानुसार केला जाणार नाही, तर तो भूवंटनाच्या क्रमानुसारच केला जाईल. रॉबर्ट बी. हॉल यानी केलेल्या जपानमधील टोकाईडो मार्ग व प्रदेश यांचा केलेला अभ्यास हे याचे विशिष्ट उदाहरण आहे. या अभ्यासात तीन वेगवेगळ्या कालखंडांतील त्या भूविभागाचा भूगोल सादर केलेला आहे (३५०). भूतकालीन भूगोलाचा कालक्रमानुसारी अंतःछेद सादर करता यावा म्हणून केलेला अभ्यास, आणि बदलत्या क्षेत्रांतील ऐतिहासिक प्रसंग आणि आर्थिक विकास यांचा अभ्यास, या दोन अभ्यासांत विरोध असतो. " सन १८०० पूर्वीच्या इंग्लंडचा ऐतिहासिक भूगोल, " या नावाने डार्बी यानी प्रसिद्ध केलेल्या ग्रंथातील वेगवेगळ्या लेखकांनी लिहिलेल्या प्रकरणांतून असाच विरोध दिसून येतो. अशा विरोधावर ह्योल्शने टीका केली आहे. (३३९, परीक्षण).

तत्त्वतः, कोणत्याही प्रदेशाच्या वेगवेगळ्या असंख्य ऐतिहासिक भूगोलांची रचना कोणीही करण्यास हरकत नाही. आणि त्या सर्वांची तुलना त्याला अतिवेगवान् क्रमाने करणे शक्य झाले, तर त्याला अतिप्राचीन कालापासून वर्तमान कालापर्यंतचा त्या क्षेत्राच्या भूगोलाचा चलचित्रपट निर्माण केल्याचे श्रेय मिळेल. प्रत्यक्षात मात्र, ही गोष्ट अगदी अशक्य आहे.–म्हणूनच तर इतिहासाची भूगोलापासून फारकत करण्यात केली आहे. आपल्याला, एकतर, त्या प्रदेशाच्या भूतकालखंडांतील प्रादेशिक भूगोलाच्या अशा फारच थोड्या अंतःछेदांची तुलना करणे शक्य होईल ; किंवा त्या प्रदेशातील एका स्वतंत्र, निवडक रूपधेयाच्या विकास प्रक्रियांचा तपशीलवार मागोवा घेणे शक्य होईल. पण कोणत्याही रूपधेयाच्या विकासाचा अभ्यास हा त्याप्रकारच्या क्रमबद्ध अभ्यासाचा भाग झाला. तो तशा प्रकारच्या घटनांचा विचार करणाऱ्या क्रमबद्धशास्त्राच्या क्षेत्रातील एक अभ्यास मानावयाचा, की क्रमबद्ध इतिहासाच्या क्षेत्रातील एक अभ्यास मानावयाचा, हे त्या प्रक्रियेचा अभ्यास कोणत्या दृष्टिकोणातून झालेला आहे यावर अवलंबून राहील.

इतिहास व भूगोल यांचा सर्वांगीण संयोग झाल्यास, जगाच्या स्थलनिष्ठ व कालनिष्ठ अवस्थांतरांचे संपूर्ण व एकसंध चित्र निर्माण होईल –आणि ती मात्र सत्यस्थिती असेल. पण, प्रत्यक्षात, कोणत्याही एका प्रदेशाच्या बदलत जाणाऱ्या सर्व रूपधेयांचे एकसमयावच्छेदेकरून, निदान बाह्याकृती, दर्शन घडविणारा चलचित्रपटाचा प्रकार तयार करण्याचा कल्पनागम्य (conceivable) मार्गही आमच्या जवळ नाही. म्हणूनच, इतिहासविषयक दृष्टिकोण व भूगोलविषयक दृष्टिकोण हे भिन्न आहेत याची नेहमी जाणीव ठेवणे आपल्याला भाग पडत गेले आहे. आणि त्यापैकी कोणत्याही एकाचे तंत्र आत्मसात करण्यासाठी त्या दोहोतील स्पष्ट जाणीव बाळगणे आवश्यकच आहे.

●●●

प्रकरण ७ वे

# भूगोलमान्य घटना इंद्रियगोचर वस्तूंपुरत्याच मर्यादित असतात *

## अ–प्रचलित विचारप्रवाहांचे महत्त्व

भूगोलकाराच्या जात्यातून उत्तम भरडून मिळण्यासाठी प्रदेशातील कोणत्या घटनांचे दळप करणे चांगले, या प्रश्नाचे उत्तर देणे नेहमीच अवघड असते. भूगोल हे क्रमबंधक क्षेत्र नसून एकसंधक क्षेत्र आहे ही संकल्पना ज्यांना समजली आहे, त्यांना एक गोष्ट कळून चुकलेली आहे की, प्रदेशाचे स्वरूप साकार करण्यासाठी तेथे एकत्रित आलेल्या आणि तेथे बहुसंख्येने उपस्थित असलेल्या बहुरंगी घटनांपासून भूगोलकाराला सुटका नसते. यापैकी कोणतीही एक घटना कोणत्यातरी एका भौतिक वा सामाजिक शास्त्राच्या क्रमबद्ध अभ्यासांचा स्वतंत्रपणे विषय असू शकेल. कालसापेक्ष भेदांचे एकसंधान करण्याच्या दृष्टीने अर्थपूर्ण असणारे बदल जेवढ्या प्रमाणात दाखविले जातात तेवढ्याच प्रमाणात त्यापैकी कोणत्याही एका घटनेचा अभ्यास यथायोग्य रीतीने इतिहासकार करू शकतो. त्याचप्रमाणे, अवकाशात आढळतील तशा घटनांचे एकसंधान करण्याच्या त्याच्या समस्येच्या दृष्टीने अर्थपूर्ण भेद त्या घटनांमधून दिसत असतील, तर त्यांच्या सहज स्वरूपांचा विचारही न करता त्या घटना भूगोलकारांच्या अभ्यासाचे यथोचित विषय होण्यास हरकत नाही– मग ते भेद स्वाधिकाराने आलेले असोत की अन्य घटनांच्या संबंधातून आलेले असोत !

उलटपक्षी, श्लूटर, ब्रन्हेस, पासार्ज आणि सॉर यांच्यापासून प्रेरणा घेणारा भूगोलकारांचा एक लहान गट आहे. हे लोक भूगोलकाराचे प्रदेश-परीक्षण भौतिक रूपांपुरतेच मर्यादित ठेवणे पसंत करतात. अशा रूपांत ते नैसर्गिक व सांस्कृतिक अशा सर्वांचा समावेश करत असले, तरी कोणतेही अभौतिक रूप ते कटाक्षाने बगळतात. अर्थातच, नेहमीप्रमाणे मानव व त्याचे कार्य या विषयांचा समावेश झाला, तरी त्याची भौतिक कार्येच –म्हणजे सामान्यपणे जी दृश्य आहेत अशी– भूगोलात समाविष्ट असतात. वरील मर्यादा जरी स्वैरपणे लादल्या सारख्या दिसल्या तरी त्यांच्या मागचा हेतू उदात्त आहे. या मताच्या पहिल्या उद्गात्यापैकी एकाने, म्हणजे श्लूटरने म्हटल्याप्रमाणे " विषय-सामग्रीची मर्यादा आणि निरीक्षण-दृष्टीची वस्तुनिष्ठता " या गोष्टींची भूगोलात गरज आहे (१२७).

भूगोलात प्रचलित असलेले बहुसंख्य कूटप्रश्न पूर्वीच्या काळीही वारंवार चर्चिले जात होतेच, हे आपण याआधी पाहिले आहे. पण, प्रस्तुत प्रश्न सापेक्षतः नवा असल्यासारखा दिसतो. हंबोल्ट व रिटर या दोघांनी, त्यांच्या पूर्वाचार्यांनी आणि पुढील एक-दोन पिढ्यांतील

---

* पुरवणी टीप क्रमांक ३३ पहा.

त्यांच्या अनुयायांनीही वर दिलेल्या मर्यादांमुळे भूगोलाच्या अभ्यासक्षेत्रांतून वगळल्या जाणाऱ्या अनेक गोष्टींचा बिनदिक्कतपणे भूगोलात विचार केला. तरीही तोच प्रश्न गेल्या तीस वर्षांत जर्मन साहित्यातील अनेक चर्चांचा विषय होऊन राहिला आहे. अलीकडेच त्याला आपल्या देशातही तोंड फुटले आहे. तो प्रश्न आपल्याकडे तोंडी चर्चा व पाठ्य पुस्तके एवढ्यापुरताच मर्यादित असला, तरी त्याचे भौगोलिक अनुसंधानाच्या स्वरूपावर गंभीर परिणाम झालेले आहेत, ही गोष्ट आपण लक्षात घेणार आहोत. परिणामी आपल्याला आता त्या प्रश्नाचे तपशीलवार परीक्षण करणे प्राप्त झाले आहे.

कोणत्याही प्रकारे समर्थन करण्याचा प्रयास न करताच अशा ' लक्ष्मण रेषा ' आखून देणे ही नित्याच्या परिपाठाची गोष्ट झाली आहे. जर्मनीतील एकूण आधुनिक चळवळीच्या दृष्टिकोणाचेच ते प्रातिनिधिक स्वरूप आहे असा कित्येकांचा समज झाला आहे. वास्तविक, जोरदार विरोध केलेला असूनही हेटनर सारख्या प्रतिनिधींचीही त्यातच गणना करण्यात आली आहे. सामाजिक शास्त्रांच्या विश्वकोषात ' एक सामाजिक शास्त्र या अर्थाने भूगोल ' या विषयावर लिहित असताना सॉर भूगोलकारांचे दोन विरोधी गट असल्याचे सांगतो : एक गट संबंध योगांच्या अभ्यासात अधिक आस्था दाखवतो; यालाच तो " मानवी भूगोल " असे नाव देतो : दुसरा गट भौतिक संस्कृतीच्या घटकांवर (यांचाच उल्लेख त्याने पुढे ' दृश्य ' असा केला आहे) आपले लक्ष केंद्रित करतो, कारण त्यांच्यामुळेच त्या क्षेत्राला त्याचे खास स्वरूप प्राप्त झालेले असते, असे ते मानतात.[६२]

---

६२. कोणाही अभ्यासकाचे, विशेषतः भूगोलाशी संबंध नसणाऱ्या अभ्यासकाचे, या विश्वकोषातील भूगोलाच्या विविध बाजूसंबंधी विवेचन करणाऱ्या या संपूर्ण विभागाचा (८५, ८६, ८७) संदर्भ घेत असता येथे सॉरने आपल्या प्रमेयाच्या पुष्ट्यर्थ उद्धृत केलेल्या संदर्भापैकी प्रमुख अवतरण वॉलॉक्सच्या लिखाणातून घेतलेले आहे. विशेष असे की, याच विश्वकोषातील ' मानवी भूगोल ' (Human Geography) हा याच्याच पुढचा विभाग वॉलॉक्सने स्वतः लिहिलेला आहे असे दिसते. ' मानवी भूगोल ' याची व्याख्या करताना त्या प्रकारच्या भूगोलात विरुद्ध दृष्टिकोण मांडलेला असतो असे सॉरने म्हटलेले आहे. शिवाय, वरील संदर्भाचा समावेश आपल्या व्याख्येत सॉरने केलेला असल्यामुळे, भूगोलाला सांस्कृतिक पण भौतिक बाबींची मर्यादा घालणाऱ्या गटात वॉलॉक्सचा समावेश केल्यासारखा दिसतो. पण परिस्थिती मात्र अगदी वेगळी आहे (C/O १८६, ८४ : अशा स्थितीत राजकीय भूगोलाच्या क्षेत्रातील वॉलॉक्सने केलेल्या कार्याचा येथे उल्लेख तरी कसा करावयाचा !) या प्रसंगाने हेही नमूद करावयास हरकत नाही, की भूगोलाच्या ज्या शाखेतून सांस्कृतिक बाबी मोठ्या संख्येने वगळल्या जातात त्याच शाखेसाठी ' सांस्कृतिक भूगोल ' ही संज्ञा वापरली जावी हा प्रकार मोठा विलक्षण आहे.

वास्तविक, अमेरिकी भूगोलकारांचे या विषयासंबंधी जे मत बनविले गेले आहे त्याच्या जवळ जवळ विरूद्ध परिस्थिती जर्मनीतील भूगोलक्षेत्रात असल्याचे दिसते. अर्थातच, हा प्रकार भूगोलाच्या क्षेत्र वर्णनात्मक संकल्पनेबाबत नसून घटनांवर घातलेल्या या विशिष्ट निर्बंधांबाबतच घडलेला आहे. श्लूटरने ही मर्यादा १८९९ इतक्या आधी सूचविलेली होती आणि त्यासंबंधी अधिक तपशीलवार विवेचन त्याने आपल्या १९०६ च्या विख्यात अभ्यासलेखात केलेले होते (१२२, ६५ व १२७). पण तिच्याकडे " फार थोडे लक्ष दिले गेले आहे व तिला मान्यताही दिली गेलेली नाही " ही गोष्ट श्लूटरच्या १९२० मध्ये लक्षात आली (१४८, २१३); आणखी आठ वर्षांनी तर त्याला त्याबाबत कोणी प्रोत्साहनही देईनासे झाले (२४७, ३९१). निदान काहीबाबतीत श्लूटरचा अनुयायी असलेला पासार्ज याने याबाबत टीकाकारांवरील आपला रोष बारंवार बोलून दाखविला आहे. " एका बाजूने श्लूटरच्या सृजनशील कार्याचे कौतुक करत असताना दुसऱ्या बाजूने ते त्याच्या पद्धतितंत्रविषयक मतांचा मात्र स्वीकार करत नाहीत. वाईट गोष्ट अशी की, ते त्याकडे दुर्लक्ष करतात (वायबेल २५०, ४७५). या व्यतिरिक्त फक्त टिसेन व पेंक या दोनच जर्मन लेखकांनी या मर्यादांचा पाठपुरावा केला आहे असे दिसते. यात ग्रान्यो, ब्रून्हेस आणि मिशोट या अन्य युरोपीय देशांतील लेखकांची भर घालावयास हरकत नाही. पण हे वगळले तर, इतर सर्वच लेखकांनी या सूचनेकडे, एकतर अगदी दुर्लक्ष केले किंवा या प्रमेया संबंधीचे आपले आक्षेप उघडपणे बोलून दाखविले, या दुसऱ्या यादीत खालील नावे घालता येतील : हेटनर, फिलिप्सन, सूपान, ओबरहुमार, सापार ग्राडमान, हासार्ट, हायड्रिस, फ्रेड्रिक्सन "व्होल्त्स, लॅटिन्झाक, हासिंगर, बान्झ, मौल, वायबेल आणि बर्गर याच यादीतील ज्यांनी भूगोलक्षेत्राचा मोठा चिकित्सक विचार केला आहे त्या दोघा तत्त्वज्ञानवेत्त्यांची म्हणजे ग्राफ व क्राफ्ट यांची नावे आणि इटलीचा भूगोलकार आमाल्गिआ याचे नावही घालावयास हरकत नाही. शेवटी या मर्यादारेषेच्या अनुमोदकांच्या यादीतून ज्यांनी प्रत्यक्ष परिपाठात त्याकडे दुर्लक्षच केले अशा लेखकांना वगळावयाचे ठरले, तर ग्रानो आणि मिशोट या दोघांखेरीज कोणीच शिल्लक राहाणार नाही, असेच गृहीत धरावे लागेल.

---

६३. हेटनरच्या विरूद्ध श्लूटर आणि मिशोट यांनी घेतलेल्या भूमिकेच्या स्पष्टीकरणार्थ सॉरने फ्रेड्रिकसन याच्या लेखाचा उल्लेख केला आहे. श्लूटरचा दृष्टीकोण " अतिशय संकुचित व प्रायोगिक अवघड आणि अगदीच व्यवहारी " ( zu eng und praktisch, schwer durch fürbar) असल्याचे फ्रेड्रिक्सन्ला आढळून आले, तेव्हा त्याच लेखात आपण हेटनरशी सर्वसाधारणपणे सहमत आहोत असेही मान्य केले आणि श्लूटरवरील आक्षेप अधिक विस्ताराने स्पष्ट करून दाखविले (२३०, १५९). फ्रेड्रिक्सन्च्या ज्या दुसऱ्या लेखाचा संदर्भ सॉरने घेतलेला आहे तो त्याने दिलेल्या संदर्भग्रंथात सापडू शकला नाही.

ही वस्तुस्थिती लक्षात घेता, भूगोलविषयक प्रचलित विचारप्रवाहातील एक किरकोळ महत्त्वाचा मानला गेलेला प्रश्न म्हणूनच आपण त्याचा येथे विचार केल्यास ते समर्थनीय ठरण्यास हरकत नव्हती. पण, अमेरिकेतील काही थोड्या भूगोलकारांनी या मर्यादाविषयक विधानाचा इतका हटवादीपणाने पुनरूच्चार केला, की तोच विचार आधुनिक विचारप्रणालीत खोल रूजलेला असल्याचा भास निर्माण झाला. राजकिय भूगोलाच्या संदर्भात या प्रमेयावर यापूर्वीच घेण्यात आलेले आक्षेप ( c/o २१६, ८०० ते ८०४) किंवा हेटनरने त्याविरूद्ध केलेल्या हल्ल्याचे संदर्भ, याला त्यांच्याकडून प्रतिसाद तर मिळाला नाहीच उलट, श्रेष्ठ अधिकारी व्यक्तींनी दिग्दर्शित केलेले प्रमेय म्हणून मूळ प्रमेयाचा पुनरुच्चार तेवढा केला. परिणामी, एकूण भूगोलाच्या हितासाठी या प्रमेयाची अंतर्बाह्य तपासणी येथे करणे आवश्यक आहे, असे दिसते.

या परीक्षणातून नेमक्या कोणत्या गोष्टी वगळावयाच्या याबाबत या प्रमेयाच्या विविध प्रवचनकारात एकवाक्यतेचा अभाव दिसत असल्याने, त्या प्रत्यक्ष मर्यादांची तपासणी करणे काहीसे अवघड झाले आहे. भूक्षेत्र-दृश्य ( landschaft ) या संज्ञेचा अर्थ भूदृश्य ( landscape ) असा लावला गेला आणि त्यालाच या परीक्षणविषयक मूळ संकल्पनेचा फाटा फुटला. पण, एक गोष्ट आपल्या सहज लक्षात येते की, प्रत्येक भूगोलकाराने या संज्ञेचा काहीसा वेगळा अर्थ लावण्याचा प्रयत्न केला आहे. अशाप्रकारे भूगोलविषयक वस्तूंवर मर्यादा घालणाऱ्या अभ्यासकांसाठी ' शुद्धभूदृश्यवादी ' हा सोइस्कर शब्दप्रयोग डिकिन्सनने सुचविला आहे आणि त्याचाच आम्ही येथे उपयोग करतो आहोत. हे लोक तात्त्विक विधाने करतात तेव्हा भूगोल विषय इंद्रिय-गोचर वस्तूंनी ( Sinnlich wahrnembar ) मर्यादित करतात; मग त्या वस्तू, दृष्टी, ध्वनी, गंध किंवा स्पर्श यापैकी कोणत्याही प्रकाराने गोचर असोत. म्हणूनच हेटनर जेव्हा या क्षेत्राच्या ' स्वरुपाच्या ' ( Wesen) संकल्पनेची तुलना त्या क्षेत्राच्या आकाराशी अथवा चित्राशी ( Bild ) करतो (२५२, १७७) तेव्हा तो मुख्य मुद्दाच डावलतो, असा ग्रान्योने त्याच्यावर आक्षेप घेतला, शुद्धभूदृश्यवादी भूगोलकारांच्या साधारण विधानांना जरी हेटनरचा हा युक्तीवाद लागू पडत नाही असे दिसले, तरी त्यांच्या तपशीलवार चर्चांतून मांडल्या गेलेल्या दृष्टीकोणाला तो निश्चितच लागू पडतो; कारण, या चर्चांतून ते निरपवादपणे वस्तूंच्या दृश्य स्वरुपांचाच विचार करत असतात. अर्थात, दृश्य-भूभाग, म्हणजेच दृश्य-भू-क्षेत्राचे चित्र ( Landschaft bild ) त्यांना अभिप्रेत आहे. या अटींमुळे जरी काही भौतिक बाबी वगळल्या गेल्या तरी अन्य इंद्रियांना त्या गोचर असतातच या आधारावर त्यांचा त्या भूभागात समावेश केला जात असतो, हे निश्चित. तथापि, अशा सर्व गोष्टींची गोळाबेरीज बोलून दाखविणारा एक शब्द यापैकी एकाही लेखकाला सापडला नाही, ही एकच वस्तुस्थिती या सर्व वस्तू एकाच एकक संज्ञेत एकवटण्याची शक्यता नाही ही गोष्ट स्पष्ट करते. मग, त्यांना त्यांनी स्वतःच बनवलेला एक शब्द त्या सर्वांचा बोध म्हणून वापरावा लागतो; नाहीतर ' एकंदर दृश्य ' अशा भोंगळ शब्दांनी ते बोलून दाखवावे लागते किंवा ' प्रदेश ' असा शब्द वापरून त्यात त्या क्षेत्रातील

झाडून साऱ्या वस्तूंचा समावेश होत नाही, अशी पुस्ती जोडावी लागते. ज्या ग्रान्योने ही संकल्पना तर्कशुद्ध पायावर उभी करण्याचे प्रयत्न कोणाही इतर अभ्यासकाच्या तुलनेने अधिक केले, त्याच ग्रान्योला परिपाठात मात्र दृक्-प्रत्ययाची मर्यादा मान्य करावी लागली. अशाप्रकारे कपड्यांच्या आकारापेक्षा त्यांचा रंग अधिक महत्त्वाचा असल्याचे त्याचे मत होते. आणि सामान्यतः माणसांचे जमाव असतील तरच त्यांना भूभागाचे घटक मानावे, कारण त्यावेळी त्यांना दृश्य आकार येत असतो, असेही त्याला दिसून आले (९३). थोडक्यात, आपल्या ज्ञानेंद्रियांवर कोणत्याही वस्तूचा कितीसा ठसा उमटतो येवढ्याच एका आधारावर भूगोलदृष्ट्या अर्थपूर्ण गोष्ट कोणती हे निश्चित करावयाचे असेल, तरच वरील निष्कर्ष तर्कसिद्ध आहेत असे म्हणता येईल; आणि त्यापरिस्थितीत ग्रान्योने काढलेला निष्कर्षही योग्यच म्हणावा लागेल. आपल्या अगदी नजीकच्या गोष्टी वगळल्या, तर इतर सर्व गोष्टींचा विचार त्यांच्या दृश्य स्वरूपाच्या परिभाषेतच करावा लागेल, असे ग्रान्यो मानतो; आणि तोच भू-भाग-चित्र ( Landschaft bild) या शब्दाचा सरळ अर्थ आहे. सारांश, या वस्तू कोणत्यातरी प्रकारे कोणत्यातरी इंद्रियाच्या प्रत्यक्ष संवेदनकक्षेत असणे आवश्यक आहे किंवा अगदी सोप्या भाषेत सांगावयाचे झाले, तर त्या वस्तू भौतिक असणे आवश्यक आहे. आता, या सर्व चर्चेचे सार येवढ्याच एका मुद्यात सांगता येत असेल, तर मग कपड्यांचा प्रकार व पोत हा त्यांच्या रंगापेक्षा कमी महत्त्वाचा कसा मानावयाचा ? आणि जमावात असलेली माणसे जेव्हा पांगलेली असतात तेव्हापेक्षा अधिक भौतिक स्वरूपाची होतात, असे मानावयाचे का ?

ग्रान्यो या प्रश्नाचे उत्तर देताना उघडपणे आणखी एक मर्यादा घालील. ही मर्यादा मुळात श्लूटरनेच शब्दबद्ध केलेली आहे आणि अन्य काही भूगोलकारांबरोबर सॉरनेही ती मान्य केली आहे (८५), तरीही ती सर्व शुद्ध भूदृश्य बाद्यांनी ( Landscape purists) मान्य केलेली आहे. श्लूटर म्हणतो, की भूगोलकाराचे लक्ष " ज्यांना काही क्षेत्रीय विस्तार आहे अशाच, पण बोलक्या, रुपांवर केंद्रित झालेले असावे. सुट्या वस्तू अशा रुपांपासून अगदी भिन्न असतात, हे लक्षात घ्यावे ". (१४८, १४८, १५२). या आधारावर, भूदृश्यात वसाहतींच्या प्रकारांचा समावेश करणे त्याला मान्य होते; पण घरांच्या प्रकारांचा त्यात समावेश करण्यास तो तयार नव्हता (२१६). पण, ब्रूहनेस व पासार्ज यांच्या अनुयायांना नेमक्या त्याच रुपांवर लक्ष केंद्रित करण्याची प्रेरणा मिळाली. या तत्त्वामुळे मानव हा त्या " भूदृश्यातील एक कण बनतो ". साहजिकच या सर्वच अभ्यासकांना मानवाच्या भूगोलातील योग्य स्थानाची व्याख्या करताना मोठी अडचण वाटू लागली. ही अडचण श्लूटरने ओळखलेली असल्यामुळे, त्याने त्याचे आपल्यापुरते उत्तरही दिले होते. माणसाबद्दलची आमची विशेष आस्था अशा निरीक्षणांचेवेळी विशालक भिंगाचे काम करते. म्हणून प्राकृतिक भूगोला इतकेच महत्त्व मानवी भूगोलालाही द्यावे लागते. उलटपक्षी, वरकरणी तरी असे म्हणावे लागेल की, हे विशालन फार तीव्र असता कामा नये, म्हणजे त्यामुळे माणसाच्या कातडीचा वर्ण नजरेत भरता कामा नये किंवा त्यांची भाषा लक्षात येण्याइतका त्याचा कानही तीक्ष्ण असता कामा नये (१२७, १७, २७ ते २९ : आणि विशेषतः ४१).

ग्रान्योचा हा निष्कर्ष जरी अधिक सुसंगत वाटला तरी " तो दिसतो तितका तर्कशुद्ध आहे का . . . . . ? " असाही प्रश्न विचारात घेण्यास हरकत दिसत नाही. माणसांचा जमाव ही भौतिकदृष्ट्या प्रतिबोधक्षम आणि काही थोडा क्षेत्रीय विस्तार असणारी अशी एक घटना आहे, असे वादासाठी मान्य केले, तर हे दोनही गुणविशेष त्याच जमावातील सुट्या घटकांची प्रतिबोधक्षमता आणि क्षेत्रिय विस्तार यांच्या गणिती बेरजे येवढीच असते, हे मान्य केलेच पाहिजे. ते कितीही व कसेही पांगले तरी एकूणात ते बरोबर तेवढीच जागा व्यापतील. त्यातील प्रत्येक एका व्यक्तीजवळ वेगवेगळे जाऊन पाहिले तरी, ते सर्व भौतिक पदार्थ म्हणूनच गणले जावयाचे असल्यामुळे, आपला त्या व्यक्तीसंबंधीचा एकूण प्रतिबोध त्यांच्याच जमावाच्या प्रतिबोधापेक्षा कमीजास्त असण्याची शक्यता नाही. फरक असलाच तर, दृष्टिगोचर भुदृश्याच्या संवेदनेचा जो भाग ते आकारतील त्याच्या, म्हणजेच आपल्या मानसिक प्रतिक्रियेच्या आधारावर तो फरक दिसणे शक्य होईल.

कदाचित्, याच कारणाने भू-क्षेत्र-दृश्याच्या (Landschaft) वर्णनात मानवाचा समावेश करताना पासार्जला अडचण वाटली नाही. " नांगरटीत गुंतलेले –आणि क्वचित् रंगीबेरंगी पोषाखात नटलेले– शेतकरी, गाणी म्हणणारे धनगर, रंगेल द्राक्षमळ्यावरील घाणेकरी व तोडकरी " या सर्वांचा भू-क्षेत्र-दृश्य ( Landschaft ) या रुपात समावेश करण्यास त्याची हरकत नाही (२६८, ७४). पण, हे भू-क्षेत्र-दृश्य साकार करण्याचे कामी मानवाचा कोणत्याच प्रकारे हात असत नाही ( nicht Landschaft bildner) म्हणूनच कोणत्याही भू-क्षेत्र-दृश्याची मर्यादा निश्चित करताना त्याचा उपयोग केला जाऊ नये, या त्याच्या ठाम विधानाने वाचक पुरे गोंधळात पडतात (२६८, १). या आधीच्या त्याच्या लिखाणातील विधाने यापेक्षा वेगळी आहेत आणि इतकी स्पष्टही नाहीत. परिणामी, त्याच्या त्या विधानांचा तो व त्याचे शिष्य यांनी जो अर्थ लावतात त्यापेक्षा वेगळ्याप्रकारचा अन्वयार्थ ग्राडमान व वेबेल यांनी लावला, या गोष्टीचे नवल वाटत नाही (२३६, ३३१-३७; २५०, ४७७; प्रत्युत्तर १६६, ६८).

अशा प्रकारच्या काही अडचणी उद्‌भवतात एवढ्या कारणावरून अन्यप्रकारे मौलिक असणाऱ्या अशा संकल्पना निकालात काढण्याची घाई करणे बरे नव्हे. म्हणूनच, व्याख्या करण्याच्या अत्यंत किचकट कूटप्रश्नात गुंतून पडण्यापूर्वी, मूलगामी स्वरुपाचे तीन कस लावून ही संकल्पना सर्वसाधारणपणे तपासून पहावी असे वाटते. ते तीन कस असे :– क्षेत्रवर्णनशास्त्र या अर्थाने भूगोलशास्त्राच्या अथवा एकदंरीने शास्त्राच्या, तत्त्वांवर ही संकल्पना तर्कशुद्धरीतीने आधारलेली आहे का ? भूगोल क्षेत्रातील इतिहासदृष्ट्या सुसंगत अशा कोणत्यातरी एका विकासावस्थेचे प्रतिनिधित्व या संकल्पनेने केले आहे का ? अभ्यासकांच्या कोणत्याही एका गटाला परिणामकारक रीतीने अभ्यासणे शक्य नाही इतक्या विस्तृत झालेल्या या क्षेत्राला मर्यादा घालता येतील असे, सर्वसाधारणपणे मान्य होणारे काही आधार या संकल्पनेतून मिळतात का ? आता ही सामान्य संकल्पना यापैकी प्रत्येक प्रश्नाच्या संदर्भात तपासून पाहू.

## ब–ही मर्यादा तर्कसिद्ध पायावर उभी आहे का ?

ज्या मर्यादेची भूगोलकार प्रशस्तीकरूनच थांबले नाहीत, तर तिचा आग्रह धरत राहिले त्या मर्यादेचा तर्कसिद्ध पाया तपासून पहाता येईल इतके सांगोपांग विवेचन कोणाही अमेरिकी भूगोलकाराने केलेले नाही. स्वतःच्या ग्रंथातील विषयाचे प्रतिपादन करत असतानाच नव्हे, तर काही प्रसंगी दुसऱ्यांच्या ग्रंथांवर टीका करतानाही त्यांनी निस्संदिग्ध विधाने करण्यातच समाधान मानले; आणि आपल्या विधानांच्या समर्थनासाठी अमेरिकेतील आणि अन्यदेशीय भूगोलकारांच्या अशाप्रकारच्या विधानांव्यतिरिक्त दुसरा कोणताही अधिकृत आधार देण्याचा प्रयत्नही केला नाही. बरे, या अधिकारी लेखकांचे लिखाण तपासून पहावे तर त्यातही या मर्यादेचे तर्कशुद्ध समर्थन केलेले सापडत नाही. परिणामी, या मर्यादेला काहीतरी तार्किक पाया असला पाहिजे असे गृहीत धरून, त्यांच्या या प्रमेयाची आधारभूत तर्कपद्धती तपासून पहाण्यासाठी काही फुटकळ मुद्याव्यतिरिक्त काही साधन रहात नाही; उदाहरणार्थ :– अलिकडच्या काळात या मंडळाने घडवून आणलेल्या अनेक चर्चाव्याख्यानांतून होणाऱ्या चर्चेत पुढे मांडले गेलेले मुद्दे. पुष्कळ बाबतीत ही विधाने विनासंदर्भ केलेली होती. तरीही, निदान, ती त्यांच्या प्रकाशनापूर्वी तपासून पहाण्याइतका अवधी त्यांच्या वक्त्यांना मिळालेला होता. काही असो; त्यांच्या या सहजोद्गाराचा गैर फायदा घेऊन त्यांना कोंडित पकडण्याचा आमचा हेतू नाही, तर त्यांचा इष्ट प्रतिपाद्य विषय काय होता हे समजून घेण्याचा प्रयत्न करणे हा आमचा हेतू आहे.

अशाच एका चर्चा व्याख्यानात ट्रेवार्था व फींच या दोघांनीही, पण वेगवेगळ्या वेळी बोलत असताना, एखाद्या क्षेत्रातील 'निरीक्षणक्षम रूपे' आणि अन्य रूपे म्हणजे जी निरीक्षणक्षम नाहीत असे गृहीत आहे, अशी रूपे या दोहोंतील एकाच भेदावर भर दिला आहे. भूगोलाभ्यासकांचा प्रत्यक्ष संबंध पहिल्या प्रकाराशी आहे, कारण ती "भूगोलदृष्ट्या प्राथमिक स्वरूपाची वस्तुस्थिती" आहे. त्याचा संबंध दुसऱ्या प्रकाराशी म्हणजे "भूगोलदृष्ट्या दुय्यम दर्जाच्या वस्तुस्थितीशी", असलाच तर तो अप्रत्यक्षपणे आहे. या दुसऱ्या प्रकाराचा उल्लेख फिंचने "निरीक्षणक्षम रूपाच्या स्पष्टीकरणार्थ आवश्यक असलेली अनुमानित वस्तुस्थिती" या शब्दांत केला आहे (२८७, १११; २८८, ११७). शास्त्रशुद्ध तर्कवादाच्या पद्धतीने मान्य केलेला एक मूलभूत भेद या विधानाने स्पष्ट केला आहे, असे दिसते. पण, तो त्यांनी अचूक शब्दांत स्पष्ट केला आहे का ?

सत्यस्थिती या अर्थाने वस्तुस्थिती –म्हणजेच "जी सामग्री दुसऱ्या कोणत्या आधारावर केलेल्या अनुमानाच्या रुपाने सिद्ध करावयाची नसते अशी सामग्री किंवा निरीक्षित घटना" आणि तर्काच्या आधारे जी सत्यस्थिती असावी असे गृहीत धरले जाते ती वस्तुस्थिती, या दोहोत निर्विवादपणे व स्पष्टपणे भेद दाखविता आला पाहिजे (बॅरी ११४, ९२). फींचने दिलेल्या उदाहरणाचा उपयोग करून असे म्हणता येईल, की तिकडील खडकांच्या परीक्षकाने

ज्यूरा पर्वतात टणक व मऊ खडकांचे अस्तित्व असल्याचे प्रत्यक्ष निरीक्षण केलेले असेल, तर ती प्राथमिक वस्तुस्थिती मानावी. पण, पर्वतरांगांच्या स्वरुपावरून काढलेले ते एक अनुमान असेल, तर ते, " निरीक्षणक्षम " आहे हे माहीत असूनही तेवढ्यापुरती ती दुय्यम दर्जाची वस्तुस्थिती मानावी लागेल.

येथे असा एक आक्षेप घेतला जाण्याची शक्यता आहे की, फक्त भौतिक परिस्थितीचेच प्रत्यक्ष निरीक्षण करता येते, आणि वस्तुवस्तूंतील प्रकारभेदांवरूनच वस्तुस्थितींतील तर्कसिद्ध प्रकारभेद निर्माण होतात. पण, आमचे भौतिक वस्तुस्थितींचे निरीक्षण प्रत्यक्ष साधनांपुरतेच मर्यादित नसते. उलटपक्षी, अधिक अचूक आणि निश्चित स्वरुपाच्या निर्णय-पद्धती पुष्कळ वेळा अप्रत्यक्ष स्वरुपाच्याच असतात. पदार्थशास्त्र व खगोलशास्त्र यांसारख्या अतिकाटेकोर शास्त्रांतील अप्रत्यक्ष पद्धतींचे महत्त्व लक्षणीय आहे. अप्रत्यक्ष निरीक्षण आणि तर्कपद्धतीने काढलेले अनुमान या दोहोंतील फरक नेहमीच सुस्पष्ट असतो असे नाही, हा मुद्दा आपणास येथे विचारात घेण्याची गरज नाही. तरीही, संयुक्त संस्थानांचे शासन प्रजातंत्र आहे, राजतंत्र नाही, १८६१ पूर्वी आपल्या देशाच्या दक्षिण भागातील पुष्कळसे रहिवासी गुलाम होते किंवा अरबस्तानचे लोक मुख्यत्वेकरून मुस्लिम धर्मानुयायी आहेत अशासारख्या वस्तुस्थिती त्याच्या संबंधीच्या कोणत्याही शास्त्रात प्राथमिक वस्तुस्थिती म्हणून मानल्या जाव्यात इतक्या प्रमाणात त्या अप्रत्यक्ष पद्धतीनेही सिद्ध करता येतात, ही गोष्ट मान्य होणे आवश्यकच आहे.

याचा परिणाम म्हणून असा निष्कर्ष आपण काढू शकतो की, प्राथमिक आणि दुय्यम वस्तुस्थितींतील ठाम तर्काधारे सिद्ध होणारे भेद भूगोलातील भौतिक व अभौतिक वस्तुस्थितींमधील भेदांना लागू पडत नाहीत. जगाच्या कित्येक प्रदेशांतील नैसर्गिक वनस्पतींबद्दलचे आपले ज्ञान दुय्यम दर्जाच्या वर्गातच घालणे प्राप्त आहे –कारण, ते शेतमाती हवामान, जीवावशेष इत्यादिसंबंधींच्या प्राथमिक वस्तुस्थितींवरून काढलेल्या अनुमानांच्या स्वरूपात असते–. उलट, वेगवेगळ्या भाषा बोलणाऱ्या आणि वेगवेगळ्या रूढी पाळणाऱ्या लोकांच्या वितरणासंबंधीच्या आपल्या ज्ञानात प्राथमिक वस्तुस्थितींचा समावेश असतो. म्हणूनच, हेटनर म्हणतो त्याप्रमाणे –म्हणजेच प्राथमिक सामग्रीच्या योग्यरितीने मर्यादित अर्थाने– जर कोणतीही भौतिक अथवा अभौतिक वस्तुस्थिती कोणत्या ना कोणत्याप्रकारे इंद्रियगोचर असेल, तर तिला ' वस्तुस्थिती ' म्हणून मान्यता देण्यास हरकत नाही (१२९, ५५५). अर्थातच, ' निरीक्षणक्षम ' या अथवा त्याचा पर्याय म्हणून ' इंद्रियगोचर ' या संज्ञेतून भूगोलक्षेत्रातील निश्चित स्वरूपाची कसोटी हाती लागत नाही.

' केवळ भौतिक वस्तू म्हणून ज्यांचा अभ्यास करावयाचा असतो त्या ' अशी व्याख्या या मर्यादांच्या प्रवक्त्यांना चर्चेच्या ओघात शेवटी करणे भाग पडत असूनही, ते ' निरीक्षणक्षम ' ही संकल्पना हटवादीपणाने दामटत असतात, ही गोष्ट महत्त्वाची वाटते. उदाहरणार्थः फिंच व ट्रेवार्था हे दोघेही ' निरीक्षणक्षम भौतिक रूपे ' असा शब्दप्रयोग करतात (३२२, ५). ज्या गोष्टी प्रत्यक्षपणे निरीक्षणक्षम आहेत अशांचाच अभ्यास करावयाचाच असतो; कारण अशा

वस्तू भौतिकच असतात, या गोष्टीवर भर देण्यासाठीच पुनरावृत्तीचा प्रयोग केला आहे, हे वरवर पहाणाऱ्याच्याही लक्षात येते. शुद्ध-भूदृश्य-वाद्यांनी केलेल्या विविध तर्कवादांतून, ' भूगोलशास्त्राने आपले विचार अशा गोष्टींपुरतेच मर्यादित ठेवावे ' या भूमिकेचे समर्थनच केलेले आहे. हे समर्थन पुढे दिलेल्यांपैकी एका अगर दोन्हीही गृहीत प्रमेयांवर आधारलेले असते; पैकी एक सर्वसाधारण शास्त्राच्या स्वरूपांशी संबंधित असून, दुसरे ' निरीक्षणनिष्ठ शास्त्र ' या अर्थाने भूगोलाच्या व्याख्येशी संबंधित आहे.

वरील गृहीत प्रमेयांपैकी पहिल्याचे निवेदन ग्रान्योने अगदी स्पष्ट शब्दात केलेले आहे (२५२, ३८ f). भौतिक व अभौतिक घटना मिळूनच कोणत्याही क्षेत्राची एकात्मता (Einheit) साकार होत असली, तरी त्यातील मूर्त घटना मात्र भूगोलकाराने प्रत्यक्ष विचारात घ्याव्या आणि अमूर्तांचा विचार समाजशास्त्रांवर सोपवावा. अशारीतीने आपणच आपल्यावर मर्यादा घेतल्यामुळे " सामान्य (gesund) माणसाला ती घटना ज्याप्रकारे दिसते तेवढ्याबरच नैसर्गिकरीतीने तिचे आकलन करणे व वर्णन करणे आपल्याला शक्य होते ". सर्वसाधारण शास्त्राचे हे आवश्यक लक्षण आहे, असा त्यांचा दावा आहे. दुसऱ्या शब्दात असे म्हणता येईल की, ज्या प्रमेयाने शास्त्र क्षेत्रातून समाजविषयक अभ्यास वगळले जातात, त्या शास्त्रविषयक गृहीत प्रमेयांशी भूगोलाने हातमिळवणी केलीच पाहिजे आणि या मर्यादेचे प्रवचन करणाऱ्या सर्वांच्याच युक्तिवादांत हाच मुद्दा प्रच्छन्न रूपाने वावरत असतो, मग तो प्रत्यक्षपणे शब्दांकित केलेला असो वा नसो ही गोष्ट सामान्यतः आपण लक्षात घ्यावयास हरकत नाही. पण भूगोलाची व्याख्या भूगोलाच्याच भाषेत करणे आवश्यक आहे आणि ' कोणत्यातरी अर्थाने भूगोल हे शास्त्र आहे का ', हा विचार गौण आहे म्हणून तो बाजूला ठेवावा, असा दुहेरी आग्रह धरणारे काही विचारवंत आहेत. ते ' वर दिलेले युक्तिवाद विषयांतर करणारे आहेत ' असा त्यांच्यावर शिक्का मारून त्यांना निकालात काढू शकतात. तथापि, या युक्तिवादांतून परस्पर विरोधी भूमिका कशा निर्माण होतात ते पहाणे महत्त्वाचे आहे.

ज्या चक्रीव्याख्यानांचा यापूर्वीच उल्लेख आला आहे त्याच व्याख्यानात फिंच व कोल्बी यांच्यामध्ये झालेल्या चर्चेत हा परस्पर विरोध विशेष स्पष्टपणे दृष्टीत्पत्तीस आला. फिंचने असा आक्षेप घेतला की, क्षेत्र कसे आहे ? या प्रश्नात व्यक्तिनिष्ठ विचार गुंतून पडतात. ज्या गोष्टी वस्तुनिष्ठ असतात अशाच गोष्टी आपण पहात असतो, (२८८,१२२) प्रत्यक्ष परिस्थिती मात्र याच्या नेमकी उलटी असते.* भूकवचाचा कोणताही गृहीत विभाग, त्यातील भौतिक आणि अभौतिक वस्तुस्थितींसह, वस्तुनिष्ठ वस्तुस्थितीचा एक भाग असतो. त्यातील अमूर्त घटना मूर्त घटनांपेक्षा कमी महत्त्वाच्या नसतात. प्रश्न आहे तो केवळ अशा घटनांचे निरीक्षण करण्यासाठी लागणारी वस्तुनिष्ठ साधने शोधून काढण्याच्या पद्धतींचा. " ग्रेट प्लेन्स " या विभागातील गहूक्षेत्राचे आवर्षणांमुळे

---

*पुरवणी टीपा क्रमांक ३४ पहा.

' फोफाट्यात ' रूपांतर झाले तेव्हा तिकडील शेतकऱ्यांच्या वाट्याला आलेली सार्वत्रिक दिवाळखोरी आणि त्यांना झालेला मनस्ताप या घटना, उन्हाळ्यांत पडलेल्या पर्जन्यातील उणीव दाखविणारे इंचांचे आकडे आणि कित्येक वर्षे कमीकमी होत गेलेला मृत्तिकांतील सेंद्रिय-पदार्थ संचय या गोष्टींपेक्षा कमी महत्त्वाच्या नव्हत्या. या अमूर्त वस्तुस्थितींपैकी कोणत्याही एकाचे निरीक्षण प्रत्यक्ष पद्धतीने अंशमात्रही अचुकपणाने करणे शक्य होत नाही. पण, अप्रत्यक्ष पद्धतींनी त्यांपैकी प्रत्येकीचे बऱ्याच निश्चितपणाने निरीक्षण करणे शक्य होते. उलटपक्षी, अगदी समतोल दृष्टीचा शास्त्रज्ञही प्रसंगी वस्तुनिष्ठ नसलेल्या गोष्टी पहातोच. उदाहरणार्थ : मृगजळ ही घटना घ्या. कारण काही असो. येथे आपण पहातो आहोत त्यांपैकी बहुतेक सर्व गोष्टी वस्तुनिष्ठ आहेतच असे आपण मानत असतो आणि तरीही वस्तुनिष्ठ दृष्टीने आपण त्यांच्याकडे पहात नाही. खरे पहाता, " वस्तू दिसते तशी ती नसते " हाच मुळी कोणत्याही शास्त्राचा अगदी मूलभूत गृहीत सिद्धान्त असतो.

जाता जाता आपण हेही लक्षात घेतले पाहिजे की, सर्वसामान्य शास्त्राबद्दलचे वरील गृहीत प्रमेय निसर्ग शास्त्रांनाही लागू पडत नाही; इतकेच नव्हे तर अगदी अचूक समजल्या जाणाऱ्या पदार्थविषयक शास्त्रांनाही ते लागू पडत. ही दुसरी शास्त्रे केवळ काही वस्तूंचाच अभ्यास करण्यात गुंतलेली असतात असे नाही. इंद्रिय संवेदनांद्वारे ज्यांचे प्रत्यक्ष निरीक्षण करता येत नाही, अगर जी प्रत्यक्ष पहाताही येत नाहीत, अशा बलांचा अभ्यास त्या पदार्थांच्या बरोबरीनेच आणि तोही प्रत्यक्ष पद्धतीने, त्या शास्त्रांना करावयाचा असतो. क्ष-किरण परमाणूप्रभव असतात असे सिद्ध होईतोपर्यंत पदार्थ शास्त्रज्ञांनी क्ष-किरणांचा अभ्यास काही लांबणीवर टाकलेला नव्हता. डोक्यावर पडलेल्या सफरचंदामुळे न्यूटनला गुरुत्वाकर्षणाच्या बलाची संकल्पना मान्य करणे भाग पडले – अशी कथा रूढ असली, तरी त्याच्या स्पर्शेंद्रियाने त्या बलाचे प्रत्यक्ष निरीक्षण केलेले नव्हते, तर केवळ त्या पडणाऱ्या सफरचंदाचे निरीक्षण केलेले होते. पदार्थशास्त्र निरीक्षणाच्या अप्रत्यक्ष पद्धतींनीच गुरुत्वाकर्षणाचा अभ्यास करते. तरीही गुरुत्वाकर्षणाला भौतिक वस्तू म्हणता येणार नाही.

कोणी अशीही शंका प्रदर्शित करील की, अशा सारखी उदाहरणे इतक्याच स्पष्टपणे प्राकृतिक भूगोलात का निदर्शनाला येत नाहीत. पण, पृथ्वीचा आकार आहे त्यापेक्षा पुष्कळच कमी गोलाकार असता, तर एक सहज प्रत्ययाला येणारे स्पष्ट उदाहरण निःसंशयपणे मिळाले असते. भूपृष्ठाच्या निरनिराळ्या भागात गुरुत्वाकर्षणाचा जोर निम्मा इतका, क्वचित तृतीयांशा इतकाही, बदलता राहिला असता, तर सर्व भौगोलिक कारकांपैकी एक अत्यंत महत्त्वाचा कारक म्हणून त्या बदलाला मान्यता देण्याशिवाय गत्यंतरच राहिले नसते. बहुतेक सर्वच भौतिकवस्तूंत निर्माण झालेल्या फरकांच्या रूपाने या घटनेचे प्रतिबिंब उमटलेले दिसले असते. अर्थात त्या वस्तूंचा अभ्यास भूगोलकारालाही करावा लागला असता आणि तरीही त्या गुरुत्वाकर्षण बदलाचे प्रत्यक्ष निरीक्षण करणे त्याला कधीच शक्य झाले नसते; म्हणजेच ती

वस्तुस्थिती भौतिक मानली गेली नसती. ज्यांना या विचारांचा मागोवा घेण्यात गोडी वाटत असेल, त्यांनी वारा हा प्रत्यक्ष निरीक्षणक्षम वस्तू आहे की काय याचा विचार करावा. –हवेच्या कणांच्या गतीमुळे ही निर्माण झालेली घटना नव्हे का ? पण त्याचा प्रत्यक्ष स्पर्श आपण अनुभवत नसतो, तर हवेच्या कणांचा आघात आपण अनुभवत असतो.

हे नंतरचे विचार कितीही ठाम असले तरी ते दुर्बोध आहेत, हे लक्षात यावयास हरकत नाही. म्हणूनच आम्हीही त्यांना फारसे महत्त्व देणार नाही. यातील सारभूत निष्कर्ष येवढाच की, ' वस्तुनिष्ठ साधनांच्या सहाय्याने घेतलेला वस्तुस्थितीच्या ज्ञानाचा शोध ' या शास्त्रविषयक व्यापक दृष्टीकोणातून पाहिले, तर शास्त्रांना सर्वसाधारणपणे कोणत्यातरी एकाच घटना प्रकाराला बांधून घेण्याची गरज रहात नाही. अभ्यासाच्या वस्तुनिष्ठ साधनांच्या सहाय्याने शक्य असेल तेथे तेथे ज्ञानाचा पाठलाग करत रहाणे हाच शास्त्रज्ञाचा व्यवसाय; ही साधने प्रत्यक्ष आहेत का अप्रत्यक्ष आहेत याकडे लक्ष देण्याची त्याला गरजच नाही. काही अमूर्त घटना अप्रत्यक्ष पण वस्तुनिष्ठ मापन पद्धतीने निश्चित करता येत असतील तर त्या घटनांही काही शास्त्रज्ञांच्या अभ्यासाचा विषय होऊ शकतील. आता फक्त दुसरा प्रश्न अनिर्णित राहिला, भूगोलाच्या विशिष्ट स्वरूपामुळे अमूर्त घटना वगळणे त्याला भाग पडते काय ?

हाताशी असलेल्या उत्तम पद्धतींचा वापर करून ज्यात " भूगोलाभ्यासकाने निरीक्षण करावयाचे असते, वर्णन करावयाचे व त्यांचे स्पष्टीकरणही द्यावयाचे असते असे एक निश्चित स्वरूपाचे निरीक्षण-क्षेत्र आम्हाला असल्याचा दावा " भूगोलाने केला पाहिजे असा सॉरचा आग्रह आहे (८४, १८६). भूपृष्ठाचे कोणतेही क्षेत्र हे निश्चित स्वरूपाचे निरीक्षण-क्षेत्र आहेच. अशा एका क्षेत्राच्या अभ्यासात त्यातील सर्वच अर्थपूर्ण घटनांच्या अभ्यासाचा समावेश होतो, ही गोष्ट तर्काला पटणारी आहे. घटना कोणत्याही प्रकारची असली, तरी तिचे निरीक्षण हाताशी असलेल्या उत्तम साधनांच्या सहाय्याने केलेले असणे आवश्यक आहे. पण अतिमर्यादित अर्थाने म्हणजे ते क्षेत्र सत्यस्थितीचा घटक असते या अर्थाने पहाता –म्हणजे बाह्य-भूपृष्ठ येवढ्याच अर्थाने पहाता– दृष्टिगोचर होणारे भू-दृश्य तेवढेच निरीक्षण-क्षेत्र म्हणून विचारात घ्यावे लागते. हे खरे असले, तरी इतकी ही मर्यादा ताणावी अशी सॉरची किंवा कोणत्याच अभ्यासकाची, इच्छा नसावी; असे मानण्यास तशीच बलवत्तर कारणे आहेत आणि त्यांचा विचारही आपल्याला पुढे करावयाचा आहे. पण, भूपृष्ठावरील निवडक भौतिक वस्तूंची बेरीज तेवढीच निरीक्षणक्षेत्र म्हणून मान्य करणे योग्य होणार नाही, हे आपल्याला दिसून आलेले आहे. एकदा का अमूर्त घटनांचे दुवे काढून घेतले की ती वस्तुस्थिती कोसळते आणि जितक्या प्रकारच्या प्रातिनिधिक भौतिकवस्तू तीत असतात तितकी वेगवेगळी निरीक्षण-क्षेत्रे त्यांतून निर्माण होतात. या निवडक पण भिन्नधर्मी वस्तूंना ' भूदृश्य ' हे स्वैरपणे निवडलेले नाव दिल्याने त्याचे एकत्र एक निरीक्षणक्षेत्र बनते असे

नाही. उलट, ते तसे नाही हे सत्य लपवून ठेवण्याचे काम हे नाव करते, या भौतिक वस्तूंच्या एकूण संचाचा सामान्यबोधक असा इकही शब्द –जर्मन भाषेत अथवा इंग्रजी भाषेतही– सापडत नाही; इतकेच नव्हे तर, जी संकल्पना स्पष्ट करून सांगण्याचा प्रयत्न केला जात असतो तीत, निदान ढोबळमानाने, कशाकशाचा समावेश होतो याबाबतही संबंधीत अभ्यासकांचे एकमत होऊ शकत नाही. या गोष्टीमुळे वरील मतावर शिक्कामोर्तबच होते.

याचा परिणाम म्हणून, या मर्यादाबंधाचे समर्थक एका युक्तिवादाचा आधार घेतात. त्यांचे म्हणणे असे. भूगोलशास्त्र हे असे एक शास्त्र आहे की, त्यात घटनांचा अभ्यास विशिष्ट पद्धतीने किंवा तंत्रानेच केला जातो; आणि त्यासाठी ते शास्त्र कोणत्याही क्षेत्रातून आपल्या निरीक्षण तंत्राच्या कक्षेत येतील अशा घटना निवडून घेते. प्रायोगिक कार्य करत असता आपल्या घ्राणेन्द्रियाचा व कर्णेन्द्रियाचा प्रत्यक्ष उपयोग करणारा ग्रान्यो हा एकच एक भूगोलकार होता. हे लक्षात घेऊन (प्रस्तुत वादाशी असंबद्ध असूनही केवळ त्यात सोपेपणा आणण्यासाठी) असे गृहीत धरू की, हे तंत्र दृष्टीनिरीक्षणापुरतेच मर्यादित आहे. येथे हेटनर एक आक्षेप घेतो. वस्तूंच्या प्रतिबोधनरीतींवर अशी मर्यादा भूगोलकारांनीच का घालून घ्यावीत ? अशी बंधने कोणत्या अन्य शास्त्रकारानी स्वतःवर लादून घेतली आहेत ? (१६७, २७९ f). मानवी चक्षू अथवा दुर्बीण यांच्या मदतीशिवाय खगोलीय स्थितीबदलांचे निरीक्षण करण्याचे एखादे नवे तंत्र पदार्थशास्त्रज्ञांनी शोधून काढले, तर खगोलशास्त्रज्ञाने त्याचा उपयोग करावयाचे नाकारले पाहिजे काय ? केवळ आपल्या शास्त्राची व्याख्या करताना ती ' घणाचे शास्त्र ' अशी केली गेली, म्हणून प्रायोगिक कार्याचे प्रशिक्षण घेतलेला भूशास्त्रवेत्ता त्या क्षेत्रातून आणलेल्या खडकांचा अभ्यास करण्यासाठी सूक्ष्मदर्शी रसायनशास्त्राच्या पद्धतींचा वापर करण्यास कचरेल का ? (इति हेटनर). सॉरचा असा दावा आहे की इतिहासकार लेखी पुरावा वापरण्याचे बंधन स्वतःवर लादून घेतात (८४, १८५). असे विधान लोकमताने मान्य केले, तरीही इतिहासकार ते कधीच मान्य करत नाहीत. मिसिसिपीच्या उगमक्षेत्राकडील पूर्वकालीन फ्रेंच वसाहतींचा अभ्यास ट्रेवार्था या भूगोलकाराने केला. हा अभ्यास केवळ लिखित पुराव्याच्या सहाय्याने करून ट्रेवार्थाने भूगोलातील आत्मविरोधाचा एक सुंदर नमुनाच सादर केला. पण, इतिहासकारांनी मात्र त्या पुराव्यांबरोबरच तेथे आढळलेल्या पुरातन चुलवणांच्या अवशेषांचाही अभ्यास केला (३९३, १८४). सर्वसाधारणपणे असे म्हणता येईल की, भूतकाळविषयक पुरावा ज्या ज्या प्रकारांनी हाती येतो त्या त्या प्रकारांचा वापर करण्यास इतिहासकार मागेपुढे पहात नाहीत; त्यात तोंडी ऐकलेल्या परंपरा, नकाशे, चित्रे, तसाच भग्नावशेष, हत्यारे, उपकरणी, खरे सांगावयाचे तर " पृथ्वीवर जागोजाग पसरलेल्या व मानवांच्या स्थलांतरांशी संबंधित असलेल्या सर्व भौतिक अवशेषांचा " त्यात समावेश होतो (११८, ३१० f; तसेच ११७, १ ते २३ आणि ११९ व १२०).

या शुद्ध-भूदृश्यवादी अभ्यासकांसह सर्वच भूगोलकार ज्या प्रकारची तंत्रे वापरतात त्यांचा विचार केला तर हा युक्तिवाद अगदी निष्फळ ठरतो, असे दिसते. एक गोष्ट स्पष्ट होते. भूगोलातील अभ्यासवस्तू प्रत्यक्ष निरीक्षणात आल्या असल्याच पाहिजेत असे नाही; मात्र त्या वर्तमान काळात निरीक्षणक्षम असाव्या किंवा भूतकाळापासून त्या तशा असल्या पाहिजेत. एक विशिष्ट उदाहरणच घ्यावयाचे झाले तर एकूण युक्तिवाद पुढे दिलेल्या प्रकाराचा आहे. एका फ्रेंच अधिकाऱ्याने एक निशिष्ठ किल्ला आपण कोठे उभारला त्याचे वर्णन केले आहे. तेव्हा हे वर्णन प्राथमिक स्वरूपाची भौगोलिक वस्तुस्थिती निर्माण करते. आपले सर्व सैनिक फ्रेंच होते आणि भोवतालच्या प्रदेशातील तद्देशीय तेवढे ' इंडियन् ' होते. हे त्याचे विधान " दुय्यम दर्जाची भौगोलिक वस्तुस्थिती " सादर करणारे आहे. पण सर्वसाधारण शास्त्रांच्या दृष्टीने पहाता, या दोन वस्तुस्थिती संचातील फरक असा असावाः दुसरा पुरावा बराच विश्वसनीय असल्याचे दिसते, पण पहिल्याबद्दल काहीच खात्री देता येत नाही (cf १९३).

तसेच स्वतःच्या निरीक्षणाने असो वा अन्य कोणाच्या निरीक्षणाने असो, भूगोलकारांचे हवामानविषयक ज्ञान इन्द्रिय प्रतिबोधनांवरच आधारलेले असावे असे कोणीही सूचित केलेले नाही. उलटपक्षी, अशी निरीक्षणे अत्यन्त अविश्वसनीय असतात असाच गृहीत सिद्धान्त आहे. कित्येकदा, केवळ अप्रत्यक्ष निरीक्षण पद्धतींवर अवलंबून त्यांवरून आपण जी सामग्री गोळा करतो ती भूगोलातील कोणत्याही वर्गातील भौतिक वस्तुस्थितींच्या प्रत्यक्ष निरीक्षणाने आपण स्वतः काढलेल्या निष्कर्षापेक्षा कितीतरी अधिक विश्वसनीय असते. तथापि, जगाच्या बहुतेक सर्व भागांतील सार्वभौम-सत्तांच्या राजकीय क्षेत्र विस्तारांसंबंधी आपल्याला उपलब्ध असणारी सामग्री त्यापेक्षाही अधिक विश्वसनीय असते.

थोडक्यात, सर्वानुमते ज्या रूपधेयांच्या अभ्यास करणे प्राप्त आहे त्यासाठी कोणत्याच प्रत्यक्ष निरीक्षण प्रकारावर आपल्याला अवलंबून राहून चालत नाही. आणि ही गोष्ट भूगोलकारांनी परीपाठाने पूर्वीपासूनच मान्य केलेली आहे. उलटपक्षी अप्रत्यक्षपणे संपादित निरीक्षणे, आपल्या प्रत्यक्ष निरीक्षणापेक्षा कितीतरी आधिक, विश्वसनीय व अर्थवाही असण्याची शक्यता आहे, असे आर्. ई. डॉन याने या प्रश्नावरील चर्चेत आपले मत दिले (२८७, ११०). भौतिक वस्तूंचे प्रत्यक्ष निरीक्षण करण्याच्या पद्धती अभौतिक वस्तूंच्या अप्रत्यक्ष निरीक्षणाच्या पद्धतींपेक्षा कोणत्या महत्त्वाच्या फरकांमुळे वेगळ्या आहेत, हे आजपर्यंत कोणीही सूचविण्याचा प्रयत्न केलेला नाही. खरे पहाता, फिंचने हेही मान्य केले आहे की, " मानवी गतिशिलतेची कार्ये व बले " यांचा प्रत्यय घडविणारी साधने प्रत्यक्ष निरीक्षणांपेक्षा " तशी फारच थोड्या वेगळ्या स्वरूपाची " आहेत. पुढे तो असेही विधान करतो की, " सर्वच प्रादेशिक भूगोलकारांनी या घटना मान्य केलेल्या

आहेत ". पण त्या प्राथमिक का दुय्यम वस्तुस्थिती म्हणून मान्य करावयाच्या हे तो निश्चितपणे सांगत नाही (२२३, १४ f) [६४].

ज्यांमुळे भूगोलाचे लक्ष भौतिक वस्तूंवर केन्द्रित झाले आहे असे दिसते, त्यांपैकी एकच शेवटचा तर्कसिद्ध युक्तिवाद विचारांत घ्यावयाचा शिल्लक राहिला आहे. भौतिक वस्तूंविरुद्ध अभौतिक वस्तू असा विचार केला तर भौतिक वस्तूंनाच क्षेत्रिय विस्तार असू शकतो. आणि भूगोल हे क्षेत्राचा अभ्यास करणारे शास्त्र आहे, म्हणून भूगोलाच्या दृष्टीने भौतिक वस्तूंच महत्त्वाच्या आहेत, असा युक्तिवाद ग्रान्योने केला आहे (२७०, २९०). तसेच मोशेटही असे सुस्पष्ट विधान करतो, की " भूगोल हे खऱ्या अर्थाने क्षेत्रवर्णनात्मक शास्त्र असेल, तर त्याच्या अभ्यासवस्तू भौतिकच असल्या पाहिजेत ". कारण, " क्षेत्र ही संकल्पना मूलतः वस्तू या कल्पनेशी निगडित असणे आवश्यक आहे " असे त्याने हेटनरच्या मतावर आक्षेप घेताना एका तळटीपेत म्हटले आहे (१८९, ४३).

यापेक्षा अधिक मूलभूत प्रश्नांशी संबंधित असलेल्या एका प्रदीर्घ निबंधाच्या शेवटी, मिशोटाने प्रस्तुत प्रश्नाची चर्चा केली आहे. ग्रंथाच्या शेवटी आला येवढ्याच कारणाने प्रस्तुत प्रश्नाची चर्चा त्याने त्याच्या नित्याच्या पद्धतीने केलेली नसावी. यापूर्वीच्या सर्व प्रश्नांची चर्चा त्याने भौगोलिक कार्यांच्या विशिष्ट उदाहरणांच्या परिभाषेत केलेली आहे आणि अशाच तर्कपद्धतीची त्याने प्रशस्ती केली आहे. कारण, या विरुद्ध प्रकारच्या म्हणजे " केवळ तात्त्विक स्वरूपाच्या चर्चा हे सर्वसामान्य माणसांकडून होणाऱ्या आणि बऱ्याच भूगोलाभ्यासकांकडून होणाऱ्याही या विषयातील घोडचुकांचे उगमस्थान झालेले आहे (२३) ' अवकाश ' विषयक संकल्पना भौतिक पायाशी निगडीत असलीच पाहिजे असे आपण मान्य केले, आणि ते आपल्याला मान्य करावेच लागेल, तर तेवढ्यावरून त्यांच्या घटक वस्तूंतील फरक अथवा विविध क्षेत्रांच्या विशिष्ट स्वरूपांतील फरक, निरपवादपणे भौतिक घटनांनीच मर्यादित असले पाहिजेत या गोष्टीलाही आमची मान्यता आहे असे अनुमान काढता येईल का ? मनुष्य जे जे काही निर्माण करतो व वापरतो, मग ते घर, हत्यार, भाषा, रूढी, राजकीय तह यापैकी काही असो अथवा एखादी विचारधारा असो त्याची निर्मिती अथवा वापर ज्या स्थळी होतो ते ठिकाण निश्चितपणे पृथ्वीच्या पाठीवरच कोठेतरी असते. वरील वस्तूंच्या परिवहन क्षमतेत फरक असतो ही गोष्ट प्रस्तुत प्रश्नाशी संबंधित नाही. खरे पहाता, एखादे हत्यार, म्हणजे हत्याराचा विशेष प्रकार, इतकेच काय घराचा प्रकार सुद्धा, भाषेपेक्षाही द्रुतगतीने

---

६४. आपल्या या अतिउद्‌बोधक पद्धति-तंत्रविषयक विधानात प्रस्तुत प्रश्नाचा फिंचने अगदीच त्रोटक उल्लेख केला आहे. त्यामुळे, पाच वर्षांपूर्वीचे आपले मत त्याने बदलले आहे, की त्यावेळच्या त्याच्या विधानांचा अर्थ आम्हीच चुकीचा लावत होता, हे स्पष्ट होत नाही. –सर्वसाधारणपणे प्रस्तुत मर्यादाबंधात अभिप्रेत असलेला भेद ' तो मानतो का मानत नाही ? ' हा प्रश्न शिल्लकच रहातो.– काही असो, येथे त्याची पहिली मतेच वादासाठी घेतली आहेत. कारण या मर्यादाबंधाचा पाठपुरावा करणाऱ्यांचा दृष्टिकोण अगदी स्पष्ट शब्दात त्यात मांडला गेला आहे.

स्थलांतर करताना दिसतात. शास्त्राला ज्ञात असलेल्या अभौतिक घटना एका विशिष्ट प्रकारच्या भौतिक वस्तूशी, म्हणजेच मानवाशी निगडित असतात. म्हणूनच अवकाशाच्या संदर्भात त्या सांस्कृतिक घटनेचे विशिष्ट स्थान निश्चत करणे शक्य होते. अर्थातच, ज्या माणसांशी त्या घटनांचे साहचर्य असते त्या माणसांनी व्यापलेल्या भूपृष्ठावरील स्थळांवर ते निश्चित करता येते. हे साहचर्य पुष्कळ बाबतीत तात्कालिक स्वरूपाचे असते हे निश्चित. पण भूगोलकार प्रदेशाच्या चिरकालिक लक्षणांतच लक्ष घालत असल्याने, तो अशा घटनांकडे दुर्लक्षच करील. म्हणजे तो एखाद्या असामान्य वर्षाच्या पीक उत्पादनाकडेही दुर्लक्ष करील. पण केवळ भौतिक घटनांपेक्षा वेगळेपणा दाखविण्यासाठी सांस्कृतिक घटनांना तात्कालिक हे विशेषण लावणे चुकीचे आहे. चीनच्या भाषा व रूढी तेथील रहिवाशांच्या घरापेक्षा कितीतरी जुन्या आहेत. एखाद्या जमिनीत दशकानुदशके भाताचे पीक काढले जाते हा काही त्या जमिनीच्या खास लक्षणांचा परिणाम नव्हे, तर परकीय कल्पनांच्या दबावाखाली ' भात हेच जीवनाचा आधारस्तंभ ' असे मानण्याची रूढी टिकून राहिली, याचाच तो परिणाम !

आपल्या भूगोलातील प्रत्यक्ष मानवी भूगोलाचे प्रतिपादन करणाऱ्या भागात मिशोटाने लिहिले आहे ते असेः " भूगोलाचा वास्तव हेतू विविध ' पार्थिव क्षेत्रांच्या मर्यादा बांधून देणे व त्यांचे वर्णन करणे ' या गोष्टीत समाविष्ट असावा. आणि ती ती स्थळे विशिष्ट प्रकारची वसाहत, विशिष्ट प्रकारची घरे इत्यादि लक्षणांनी युक्त असावी . . . . . . . . इ. " (२९). त्या प्रदेशातील एखादे क्षेत्र घराच्या प्रकारामुळे जर विशेष-लक्षणयुक्त होऊ शकते, तर तेथील रहिवाशांच्या भाषेमुळे किंवा इतर क्षेत्रांच्या तुलनेने तेथील विशिष्ट रूढीमुळे ते क्षेत्र विशेष-लक्षण-संपन्न होणार नाही का ? व्हिडालचे म्हणणे असे की, देश या संकल्पनेची त्यातील रहिवाशांपासून फारकत करणेच शक्य नाही (प्रकरण ४-अ) असे असेल तर त्यांच्या वितरणासंबंधीची भौतिक वस्तुस्थिती व भौतिक लक्षणे येवढ्याच गोष्टींचा विचार करून चालणार नाही, तर एक क्षेत्रव्यापी गट या दृष्टीने अन्य क्षेत्रातील गटांपासून त्याची भिन्नता दाखविणारे कोणतेही अन्य लक्षण असल्यास त्याचाही विचार करणे प्राप्त आहे. कोणत्याही क्षेत्राची " विभिन्नता दर्शक लक्षणे " डोळ्यात भरणारीच असली पाहिजेत, अशी मर्यादा, कोणत्याही प्रकारचे स्पष्टीकरण न देता, मिशोटाने मान्य केली. वर आलेल्या सगळ्या युक्तिवादा-विरुद्ध एवढा एकच आक्षेप त्याच्या संपूर्ण निबंधात घेतलेला मला आढळला.

प्रदेशवर्णनात्मक संकल्पनेवर आधारलेली भूगोलाची व्याख्या नजरेपुढे ठेवून ज्याचा ज्याचा अभ्यास केला जाईल त्याला त्याला क्षेत्रीय विस्तार असला पाहिजे अशी अट आवश्यक आहे, यात काही संशय नाही. भौगोलिक घटनांना ज्या पद्धतींनी क्षेत्रीय व्याप्ती मिळालेली असते त्या पद्धतींचे अधिक बारकाईने परीक्षण करणे आवश्यक आहे. हम्बोल्ट म्हणतो, आणि इतर असंख्य भूगोलकारही तसेच म्हणतात, त्याप्रमाणे, भूगोलाचा संबंध एकाच प्रकारच्या वनस्पतीशी अगर प्राण्याशी नसतो, तर तो " एकूण वनस्पती व प्राणी यांच्या क्षेत्रीय व्याप्तीशी " असतो. " व्याप्ती " हा शब्द येथे शब्दार्थाने घ्यावयाचा नाही, हे उघडच

आहे. वृक्षांची राई जर प्रत्यक्ष क्षेत्र आच्छादून टाकत नाही, मग प्राण्यांच्या कळपाचा " व्याप्ती " या दृष्टीने विचार दूरच राहिला ! निर्जल प्रदेशात केवळ वनस्पतींनी व्यापलेले क्षेत्र त्याच्या एकूण क्षेत्राच्या तुलनेने फारच लहान असते; म्हणून काही त्या वनस्पती जीवनाकडे आम्ही दुर्लक्ष करणार नाही. विचारात घ्यावयाच्या क्षेत्राचा अगदी किरकोळ अंश जरी घरानी व्यापलेला असला तरीही ग्रामीण भागांतील घरांच्या प्रकाराचे नमुने नकाशात दाखविताना आम्ही मुळीच मागेपुढे पहात नाही. एखाद्या ग्रामीण भागातील प्रत्येक घर एकाच नमुन्याचे असेल आणि हा नमुना शेजारच्या क्षेत्रातील घरांच्या नमुन्यांपेक्षा वेगळा असेल, तर येथे एक प्रकारची भौगोलिक वस्तुस्थिती भूगोलाभ्यासकाच्या नजरेला येण्याची शक्यता आहे; आणि त्या सर्व वेगळ्या घरांनी मिळून व्यापलेले एकूण क्षेत्र कितीही क्षुल्लक दिसले, तरीही या वस्तुस्थितीचे महत्त्व तो तिच्या व्याप्तक्षेत्रावर अवलंबून ठेवणार नाही.

दुसऱ्या शब्दात असे म्हणता येईल. एखाद्या स्वतंत्र घटनेने भूपृष्ठाचा अमूक येवढा भाग प्रत्यक्ष व्यापलेला असलाच पाहिजे अशी अट अवकाश व्याप्तीच्या संकल्पनेत असण्याची जरूरी नाही. मात्र, ती घटना त्या क्षेत्रीय विस्ताराचे एक सामान्य लक्षण असणे जरूर आहे. माग्यार भाषा ही मध्य डान्यूब खोऱ्यातील एक अमूर्त घटना असेलही, पण ती त्या विशिष्ट क्षेत्राचे एक लक्षण या नात्याने कमी पडणारी नाही, आणि त्या क्षेत्रातील मळ्यात आढळणाऱ्या विशिष्ट नमुन्यांच्या विहिरी आणि तिकडील प्रचंड शेतीप्रधान खेडी यांच्या इतकीच ती भाषाही त्या अवकाशाशी निगडित आहे.

या मर्यादाबंधाचे पुष्कळसे प्रवक्ते याच तर्क पद्धतीचे अनुकरण करताना दिसतात. पण हे अनुकरण अजाणतेपणी केलेले व म्हणूनच अर्धवट असते. उदाहरणार्थ :– ' जेथे मानवाचे सामुदायिकरीत्या निरीक्षण करणे शक्य आहे अशा घटना ' अशी मर्यादाही मानवाच्या अभ्यासाबाबत श्लूटर मानावयास तयार नाही. पण लोकसंख्याची घटना लक्षात घेण्यास तयार आहे. अर्थात्, अमूर्त स्वरूपात ही घटना दृश्य आहेच असे तो मानतो हे उघड आहे (१४५, २६). ही सरळसरळ बनवाबनवी नाही असे मानले, तरी वस्तुनिष्ठ प्रतिबोधनाचे तत्त्व काटेकोरपणे अवलंबून चालत नाही, येवढे तरी यावरून खासच सूचित होते.

इथे ज्या अर्थाने अमूर्त घटनांची व्याख्या केली आहे त्याअर्थाने त्याचा क्षेत्रीय विस्तार असण्याची शक्यता असते हे अनुमानपद्धतीने ग्रान्योने मान्य केले आहे. पण त्याबरोबरच, प्रदेशाच्या मर्यादा निश्चित करणे अशा सारख्या प्रश्नात त्याचा उपयोग करणे अवघड होईल या सबबीवर त्याने अशा घटनांना नियमबाह्य ठरविले आहे. कारण अशा प्रश्नानाच त्याने प्राथमिक महत्त्व दिले आहे (c/o वायबेलचा टीका-लेख. २६६, २०४). त्याने नियमबाह्य ठरविलेल्यापैकी पुष्कळशा घटनांचे क्षेत्रीय विस्तारच अधिक प्रमाणात विश्वसनीय व अचूक ठरतील अशारीतीने अनेकदा निश्चित करता येतात. उलट, ज्यांना तो ' वस्तुनिष्ठ ' म्हणतो अशाच घटनांचा विस्तार निश्चित करणे अवघड होते. एकेका पार्थिव वस्तुस्थितीचे निदर्शन करणाऱ्या सर्व नकाशांमध्ये सुसंघटीत राजनैतिक नकाशे सर्वाधिक विश्वसनीय व अचूक

असतात. तरी, भाषावार विभागणी नकाशात दाखविणे हे अवघड असते हे खरेच; पण भूरूपांची विभागणी दाखविणे त्यापेक्षा कितीतरी अवघड असते–मग नैसर्गिक वनस्पतींची विभागणी दाखविण्याचे तर नावच नको !

भूगोलाने स्वतःला अमानव विषयांनाच बांधून घेतले, तर कदाचित, अमूर्त घटनांच्या अभ्यासाच्या अडचणींतून त्याची सुटका होईल. पण एकदा भूगोलकारांनी मानवी किंवा सांस्कृतिक भूगोलाच्या अभ्यासाला मान्यता दिली–आणि सर्वसाधारणपणे तशी मान्यता ते नेहमी देत आलेले आहेत–म्हणजे प्राकृतिकांप्रमाणेच सांस्कृतिक गोष्टींचाही अभ्यास करण्यास ते बांधले गेले. संस्कृती ही मूलतः अमूर्त असते आणि तिचा अविष्कार भौतिक आणि अभौतिक अशा दोनही प्रकारच्या परिणामांनी दिसून येतो, इतकेच नव्हे, ते दोनही प्रकार शास्त्रीय निरीक्षणाचे विषय आहेत. संस्कृती ही आपल्या भौतिक अविष्कारांमुळेच भौगोलिकदृष्ट्या अर्थवाही ठरते, पण तिच्या अधिक मूलगामी अशा अभौतिक अविष्कारातून मात्र तीच संस्कृती भौगोलिकदृष्ट्या अर्थशून्य असते असे म्हणणे, हा एक जगावेगळा प्रकार होईल. म्हणूनच, हा आक्षेप प्रत्यक्ष प्रमाणांनी सिद्ध करणे शक्य होत नाही, तोपर्यंत भूगोलाने स्वतःसाठी भौतिक वस्तुस्थितींची मर्यादा घालून घेणे, म्हणजेच संस्कृती या विषयाचा भूगोलात भौतिक आविष्कारांपुरताच विचार करणे, ही गोष्ट मूलतःच तर्कविरुद्ध आहे.

## क–ही मर्यादा भूगोलक्षेत्राच्या ऐतिहासिक विकासाशी सुसंगत आहे का ?

सार्वत्रिक मान्यता पावलेले हे भूगोलक्षेत्रातील बंधन त्या क्षेत्राच्या विकासाचा एक सुसंगत टप्पा म्हणून ओळखले जाण्याऐवजी, भौगोलिक कार्याच्या ' मूळ मार्गास दिलेला फाटा ' म्हणून ओळखले जाण्याची शक्यता जास्त आहे (हेटनर १६७, २७८ f ). कारण त्यामुळे खुद्द भूगोलाइतक्याच पुरातन असलेल्या त्या क्षेत्राच्या काही शाखा, विशेषेकरून लोकांचा भूगोल आणि राजकीय भूगोल या शाखा, त्या क्षेत्रातून वगळल्या जातील. या शाखा तर भूगोलकारांनी आस्थापूर्वक जोपासलेल्या आहेत. ईस्टने जेव्हा पुढे दिलेले विधान केले तेव्हा त्याने एक परंपरागत संकल्पनाच बोलून दाखविली. " जगाच्या स्वाभाविक रचनेइतकेच जगातील राज्य रचनेनेही ज्यांचे भौगोलिक पृथक्करण, वर्गीकरण, अन्वयार्थ विवेचन करता येते अशा प्रकारच्या अभ्यासनीय घटना पुरविलेल्या आहेत. प्राकृतिक प्रदेशांप्रमाणे राज्यांनाही उद्‌गम, व्यक्तित्व, इतिहास व संबंधयोग असतात "(१९९, २७०). बोहेमियाचा अभ्यास करणाऱ्याला घरे व मळे यात साम्य दिसत असल्यावर त्या देशाचा कोणता भाग जर्मन प्रभावाखाली आहे आणि कोणता झेक प्रभावाखाली या ज्ञानाशी भूगोलकाराचा काहीच संबंध नाही, असा विचार कोणीतरी मनात आणला आहे का ? पासार्जने लिहिलेल्या दक्षिण टिरोलच्या एका भागाच्या भूक्षेत्रदृश्य वर्णनात (Landschaft Kunde ) काही तरी उणीव आहे हे लक्षात यावयास खास राष्ट्रीय अभिनिवेश असण्याची आवश्यकता आहे, असे वाटत नाही. कारण, तिकडील घरांच्या शिल्पकारीचे बारकाईने परीक्षण करणारा हा लेखक तेथील रहिवासी मूळ जर्मनीतील की इटलीतील, याची कोठेच दखल घेत नाही (२६८, ७ ते ५४).

अर्थशास्त्र, खगोलशास्त्र, भू-भौतिकशास्त्र यानी बरीच संकीर्ण सामग्री न्याय्यपणे आपापल्या क्षेत्रात ओढून घेतली. याचा भूगोलाला निःसंशयपणे फायदाच झाला आहे. येवढ्यावरून, सर्वच चिरमान्य शाखा-विभागांना पूर्ण संक्षेप देण्यापूर्वी त्याच्या दुष्परिणामांचाही आपण विचार केला पाहिजे.

पहिला प्रश्न असा की, आपण त्याचा अस्वीकार केल्यावर त्या आपल्या कक्षेत घेण्यास कोणी अन्य शास्त्रे उत्सुक आहेत का ? त्याची योग्य रीतीने कोणी जोपासना करणार आहेत का ? की संकुचित व्याख्यांनी मर्यादित असलेल्या विविध शास्त्रांच्या दरम्यान राहिलेल्या ज्ञानगर्तेत त्यांना नुसतेच सोडून देणार ? उदाहरणार्थ : राजकीय भूगोल या भूगोलकरांनी आजपर्यंत जोपासलेल्या भूगोलशाखेस, त्यात गोडी असून अथवा त्याचे प्रशिक्षण मिळालेले असूनही, राजनीतिशास्त्रज्ञ आपल्या शास्त्रात समाविष्ट करून घेण्यास उत्सुक आहेत असे मानण्यासारखे कोणतेही कारण घडलेले नाही (२१६). आणि ही गोष्ट मी या पूर्वी दाखवून दिलेली आहे. उलट, ग्रान्यो जेव्हा आर्थिक भूगोल व राजकीय भूगोल यांचा विकास भूगोलक्षेत्राच्या बाहेर राहूनही होऊ शकेल असा जावई शोध लावतो, तेव्हा कोणीही असा प्रश्न विचारेल की या लोकांना या भूगोल शाखांबद्दल बोलण्याचा अधिकारच कोणी दिला ? राजकीय भूगोलकारच जर स्वतंत्र शास्त्राची मागणी करू लागले तर मात्र या प्रश्नाला वेगळे स्वरूप येईल. पण, माझ्या माहितीप्रमाणे, आजपर्यंत एकाही राजकीय भूगोलकाराने आपल्या विषयास स्वतंत्र स्थान मिळाले पाहिजे, अशी कधी सूचना केलेली नाही. तसेच, राजकीय भूगोलकार नव्याने भूगोलक्षेत्रात प्रवेश मिळविण्याच्या खटपटीत आहेत अशी स्थिती असती तरीही परिस्थिती बदलली असती. उलटपक्षी, अगदी पुरातन काळापासून म्हणजे भूगोलाभ्यासाची सुरुवात झाली तेव्हापासून, राजकीय भूगोल हा भूगोलक्षेत्राचा एक भाग आहे असेच मानले जाते. निदान, पेंकने एक गोष्ट मान्य केली आहे, नवी संकल्पना " नवा भूगोल " निर्माण करते आणि तो अभिजात भूगोलापेक्षा वेगळा असतो (१६३, ५३). मग प्रश्न असा निर्माण होतो की त्या शाखांशी पूर्ण परिचित अभ्यासकांचे आक्षेपही लक्षात न घेता, काही शाखा आपल्या क्षेत्रातून वगळण्यासाठी भूगोलाची मूळ संकल्पना खुशाल कोणीही बदलावी का ?

राजकीय भूगोलाची गोडी असणाऱ्यांच्या दृष्टिकोणातून पहाता, आम्ही येथे उपस्थित करतो आहोत तो प्रश्न केवळ तात्त्विक स्वरूपाचा नाही. या शाखेचा प्रमुख अभ्यासकांच्या लक्षात एक गोष्ट येऊन चुकलेली आहे की शासकीय भूगोलाचा सातत्याने व समर्थपणे विकास होणे ही गोष्ट, भूगोलाचा एक घटक भाग म्हणून या क्षेत्राशी आज दोन हजार वर्षांचे त्याचे पुरातन संबंध तसेच पुढेही टिकून रहाण्यावर अवलंबून आहे. या विषयासंबंधीचे पायाभूत मौल्यवान कार्य मूलतः भूगोलकार म्हणून मान्यता पावलेल्या अभ्यासकांनीच केलेले आहे; उदाहरणार्थ : रात्सेल, वॉलॉक, झीगर, इयोल्स, मौल, तसेच पेंक, सुपान, व्हिल-ड-ल-ब्लाक आणि बोमन [विशिष्ट संदर्भासाठी पहा २१६; या यादीतच व्हिडालच्या युरोपातील राज्ये व

राष्ट्रे (७९) या अभ्यास ग्रंथांचा अंतर्भाव करावा]. शिवाय, भूगोलकारांच्या एका पुऱ्या थव्याने आपल्या भूगोलातील सर्वसाधारण कार्याचा भाग म्हणूनच उत्कृष्ट प्रतीचे राजकीय भूगोलविषयक अभ्यास केलेले आहेत. हे अभ्यास अगदी स्वतंत्र रीतीने प्रकाशित होवोत किंवा त्यांच्या प्रादेशिक अभ्यासांचे आवश्यक भाग म्हणून प्रकाशित होवोत, यापुढेही तेच कार्य त्यांनी पुढे चालू ठेवण्यास हरकत दिसत नाही. प्रादेशिक राजकीय अभ्यासकारांची एक संपूर्ण यादी करावयाची झाल्यास, त्यात जर्मनी व फ्रान्स या देशातील बहुतेक सर्वच भूगोलकारांची नावे समाविष्ट करावी लागतील. अमेरिकी भूगोलकारांना अशाप्रकारचे अभ्यास करण्याची आवश्यकता फारशी भासली नाही. कारण, त्यांच्या खास अभ्यासाचे लक्ष्य उत्तर अमेरिका, त्यात असे स्पष्ट राज्यविस्तारासंबंधी प्रश्न फारच थोडे असत. स्पॅनिश अमेरिकेचा ज्यांनी खास अभ्यास ते अशा कलह विषय बनलेल्या प्रदेशांचेही भौगोलिक प्रश्न विचारात घेण्यास डगमगले नाहीत, ही सुदैवाची गोष्ट आहे.[६५] ज्या अभ्यासकांना राजकीय भूगोलक्षेत्रातील तज्ञ म्हणून घेण्याची आकांक्षा आहे, अशांना हेच अभ्यास मौल्यवान सामग्री पुरवतात : कारण, त्यांची इच्छा असूनही त्यांना मिळणे शक्य नाही अशा काही प्रदेशांच्या गुह्यतर ज्ञानावर ते ग्रंथ आधारलेले असतात.

आता लोकांचा भूगोल व राजकीय भूगोल यांचाही ज्यात अंतर्भाव होतो त्या सांस्कृतिक भूगोलाचे काही विशिष्ट भाग वगळण्याच्या शक्यतेचा विचार सर्वसाधारण भूगोलाभ्यासकाच्या दृष्टिकोणातून करू या. अशा कारवाईमुळे फक्त कडेकडेचे काही किरकोळ भागच भूगोलक्षेत्राला गमवावे लागतील आणि त्या विषयाचा गाभा बनविण्याच्या कामी प्रत्यक्ष कार्य करणाऱ्या कदाचित कोणत्याच घटकाला धक्का पोहोचणार नाही, अशी ग्वाही आपण देऊ शकू काय ? हेसिंजर (२६४) आणि व्हिटल्सी (२८९) या दोघांनीही राजकी भूगोलाचा अभ्यास जाणीवपूर्वक केल्यामुळे सामान्य प्रादेशिक अभ्यास कसा संपन्न होऊ शकतो, हे दाखवून दिलेले आहे. पुष्कळशा युरोपीय प्रदेशांच्या बाबतीतही, राजकीय भूगोलाची तत्वे आणि त्या त्या लोकांचा भूगोल यांचा परिचय नसल्यास, सर्वसामान्य प्रादेशिक भूगोलाचा अभ्यास करणाऱ्यांच्या मार्गातील तो मोठाच अडसर होईल.

शेवटी, भूगोलविषयक तत्वज्ञानातील काही विशिष्ट कूटे उलगडण्याचे कामी राजकीय भूगोलाने जी मदत केली आहे त्याकडे अंगुलीनिर्देश करणे हे अगदी न्याय्यच आहे. " भूगोल कुटुंबातील उनाड पोर " म्हणून ज्याचा सर्वसामान्यपणे विचार केला जातो त्या या भूगोलशाखेच्या वतीने असा दावा मांडणे हे थोडे विलक्षण दिसेल.– येथे घेतलेले अवतरण जनमनावर चिरकालिक ठसा उमटवून जाणाऱ्या सॉरच्या एका शब्दप्रयोगाची केवळ आवृत्ती आहे (८४, २०७). या क्षेत्रातील सामग्रीचे स्वरूप,

---

६५. ज्यांनी राजकीय संकल्पना व तंत्रे आत्मसात केलेली आहेत अशा प्रादेशिक भूगोलाच्या अभ्यासकाने सादर केलेले एक उत्कृष्ट उदाहरण म्हणून रॉबर्ट प्लाटच्या " उगमाकडील अमेझॉन खोऱ्यातील कलहविषय झालेले प्रादेशिक दावे " या ग्रंथाचे नाव सांगता येईल.

आणि या क्षेत्रावर येणारे राष्ट्रीय अभिनिवेशाचे दडपण यामुळे यातील कार्यकर्ते बोंगळ आणि एकांतिक तर्कपद्धतीला बळी पडण्याची शक्यता निर्माण होते, ही गोष्ट निःसंशय आहे. पण तसा विचार केला तर भूगोलाच्या अन्य शाखाही तोडीस तोड आहेत. उलटपक्षी, स्वच्छ विचारसरणीच्या मार्गात उघडपणे आड येणाऱ्या अडचणीमुळे, आपली गृहीतप्रमेये आणि युक्तिवाद इतर क्षेत्रांपेक्षा अधिक क्रान्तिक दृष्टीने तपासून पहाण्यास या क्षेत्रातील अभ्यासकाला प्रोत्साहनच मिळण्याची शक्यता आहे. तसेच निरनिराळ्या देशांतील अशा अभ्यासकांचे निष्कर्ष परस्पर विरुद्ध असण्याची शक्यता असते. या सर्व परिस्थितीचा परिणाम आपली तर्कपद्धती अधिक धारदार करण्यात होण्याचीच अधिक शक्यता आहे. राजकीय क्षेत्राचे समर्थन करण्याबाबत अन्य भूगोलकारांनी वारंवार आव्हान दिले असल्यामुळे, या एकूण क्षेत्रातील तात्विक कूटांची अधिक साक्षेपी चिकित्सा करण्याची आवश्यकता इतर शाखांतील अभ्यासकांपेक्षा या शाखेच्या अभ्यासकांना अधिक जाणवली आहे.

कारणे काही असोत, पण भौगोलिक तत्त्वांसंबंधी काही अगदी खोचक आणि बलवत्तर विचारविमर्श राजकीय भूगोलातूनच विकसित झालेले आहेत. या संदर्भात, झीगरचा 'सरहद्दींचे स्वरूप' या विश्लेषणात्मक अभ्यासाचा, आणि इयोल्सच्या प्रदेशांबरोबरच प्रदेशाच्या सारस्वरूपाचेही विवेचन करणाऱ्या अभ्यासाचा, विशेषत्वाने उल्लेख करावयास हरकत नाही (२२७ ; २३७). यांतील दुसरा अभ्यास एक पहिल्या प्रतीचा ग्रंथ असून त्याचा प्रस्तुत ग्रंथात वारंवार संदर्भ घेण्यात आलेला आहे.

भूगोल विषयाचे काही संपूर्ण विभागच समुद्रास्तृप्यन्तु करण्याचा विचार करत असलेल्या भूगोलकारांनी, ज्या कालखंडात संपूर्ण मानवी भूगोलाकडेच दुर्लक्ष केले जात होते त्याचे स्मरण करावे आणि त्यामुळे झालेली भूगोलाची असमतोल अवस्थाही ध्यानी आणावी. फिंच व ट्रेवार्था यांच्या ग्रंथाचा मोठाच भाग ज्या घटकांनी व्यापला अशा प्राकृतिक घटकांबरोबर तुलना व्हावी इतक्या पात्रतेचे सांस्कृतिक घटकही भूगोलात आहेत, त्याची क्रमबद्ध चिकित्सा केलेली कोठे सापडणार ? (३२२, १० ते ६०२). सांस्कृतिक रूपधेयांचे स्वरूप अधिक गुंतागुंतीचे असते, आणि विशेष अभ्यास करणाऱ्या भौतिक शास्त्रांनी केलेल्या वर्गीकरणांशी तुलना करता येतील अशी तयार वर्गीकरणे उपलब्ध करून देण्याचे कामी प्रमुख सामाजिक शास्त्रांना यश आलेले नाही, येवढ्याच कारणांनी हा विरोध निर्माण झाला आहे, असे जे वरील दोन लेखकांनी सुचविले आहे ते बरोबर नाही (६०५-६०६ ही पाने). वस्तुस्थिती अशी आहे की, भूशास्त्रज्ञांनी केलेले भू-रूपांचे वर्गीकरण त्यांनी मान्य केलेले नाही तर, भूगोलकारांनी केलेली वर्गीकरणेच (त्यातच त्यांचा स्वतःचाही समावेश आहे) उपयोगात आणली आहेत. तसेच, भूगोलात उपयोगी पडेल असे शेतमळ्यांचे वर्गीकरण शेती तज्ञ उपलब्ध करून देतील, किंवा औद्योगिक क्षेत्रांचे वर्गीकरण कोणी अर्थशास्त्रज्ञ उपलब्ध करून देतील अशी अपेक्षा करण्यालाही काही आधार नाही. आता, याच भूगोलकारांनी त्यांचा भौगोलिक दृष्टिकोणातून अभ्यास चालू ठेवलाच नसता, आणि राजकीय रूपेही भौगोलिकदृष्ट्या अर्थवाही असतात असे नंतर

कळून आले असते, तर त्यांचे समाधानकारक वर्गीकरण आमच्या भूगोलकारांना कळूच शकले नसते. याचे मूर्तिमंत उदाहरण राजकीय सरहद्दींच्या संदर्भात उपलब्ध आहे. राजनीतिशास्त्रज्ञांनी आणि इतिहासकारांनी या प्रश्नाकडे दुर्लक्ष केलेले नाही, हे खरेच. तरीही, झीगर, पेंक, मौल्ल, इयोल्श यांच्यासह अन्य भूगोलकारांनी हा प्रश्न गंभीरपणे हाताळेपर्यंत समाधानकारक वर्गीकरणाशी जवळीक करतील इतकेही या विषयासंबंधीचे विचार विकसित झालेले नव्हते (तसेच पहा ३५७).

भूगोलाच्या या विशिष्ट शाखांचे उद्घाटन करण्याचे आवाहन करणाऱ्या सर्वच चर्चांतून एक प्रकारचे अवास्तवतेचे वातावरण पसरलेले असते. जुनाट खोडांना फुटलेल्या नव्या स्वतंत्र शाखांचा वारंवार होणारा विकास सर्वच शास्त्रांच्या इतिहासात दाखवून देता येईल. पण हा प्रकार जुन्या शाखांच्या विकासात रस न घेणाऱ्यांनी त्यांची खच्ची केली म्हणून घडून आला, त्या शाखांतील आंतरिक शक्तीमुळे नव्हे. नेमके काय घडले हा वादाचा मुद्दा दिसतो. भूगोल क्षेत्राने या मर्यादा पाळाव्या असे आग्रहपूर्वक प्रतिपादन करणारे शुद्ध-भूदृश्यवादी –निदान युरोपापुरते असे म्हणता येईल –स्वतःच त्या मर्यादा पाळत नाहीत. उदाहरणार्थ, श्लूटरने ज्यावर्षी भूदृश्यांतील भौतिक रूपधेयांनी भूगोल मर्यादित करण्याचा कार्यक्रम सादर केला, त्याचवर्षी तो ' राष्ट्र ' व ' राष्ट्रीयता ' या अतिक्लिष्ट संकल्पनांची चर्चा करण्यासही डगमगला नाही (३८५). काही वर्षानंतर, राज्यांसह " लोकसंख्येचे वितरण व संस्कृतीचा विकास यांच्यावर पडणारा भौगोलिक परिस्थितीचा प्रभाव " (१३४, ३८८ ते ४१७, विशेषतः ४१०) " पूर्वीच वितरण झालेले समाजगट " (१४५, २६), आणि राज्य व भूमी यांचा सुसंवाद (Einklang), अशा सर्व विषयांचे विवेचनही त्याने केले. १९२८ मध्ये पेंकने शुद्ध भूदृश्यवादाच्या प्रमेयाला मान्यता दिली हे, युद्धकालात त्याला वाटत असलेल्या राजकीय भूगोलाचा त्याने संन्यास घेतला त्याचे चिन्ह असावेसे दिसते (रेक्टर पदावर असताना राजकीय सरहद्दी संबंधी प्रमेयावर त्याने दिलेल्या महत्त्वपूर्ण व्याख्यानानंतर (२६६) जर्मनी व पोलंड यांच्या हद्दीत प्रत्यक्ष कार्य करण्याची संधीही त्याला मिळाली), पण त्याच वर्षी त्याने जर्मनीच्या राजकीय भूगोलात भर टाकली (२४०). त्याचप्रमाणे, शांतता तहांचा अभ्यास करत असता, त्यांचे परिणाम राजकीय नकाशांवर कसे होतात हे तपासून पहाण्याचीच नव्हे तर राजकीय भूगोलातील काही सदस्यांच्या व्याख्या करण्याचीही स्फूर्ती टिसेनला मिळाली (३९०). पासार्जने तर लोकांच्या भूगोलातील व राजकीय भूगोलातील तात्विक व प्रायोगिक अशा दोनही प्रकारच्या समस्यांचे विवेचन वारंवार केलेले आहे (३७५ ,१७२; ३७३ ; ३७६ ते ३७९). ब्रून्हेसने राजकीय भूगोलावर दोन ग्रंथ प्रसिद्ध केले (३३५, ३१६). माझ्या माहितीप्रमाणे ,ग्रान्यो व मिशोट येवढे दोनच याला अपवाद दिसतात.

लोकांचा भूगोल अथवा राजकीय भूगोल या दोहोंपैकी कोणाच्याच विकासाला पुरेसे प्रोत्साहन या देशात कधीच मिळाले नाही. तरीही, जे भूगोलक्षेत्राला सामान्य विधानांनीच भौतिक रूपधेयांची मर्यादा घालताना दिसतात, तेच एखाद्या प्रदेशाची अभौतिक बाजूही

चर्चेसाठी घ्यावयास मागेपुढे पहात नाहीत. उदाहरणार्थ, प्रेस्टन जेम्सच्या प्रास्ताविक विधानांवरून (३२१) –अर्थात, त्याने ती मोठ्या आग्रहाने केलेली आहेत अशातला भाग नाही –असे दिसते की, भूगोलकाराला ' सचेतन व अचेतन ' अशा वस्तूंची मर्यादा मानावी लागेल. पण प्रदेशांचा तपशीलवार विचार करत असता, तो नीग्रो रहिवाशांनी व्यापलेला व्हिक्सबर्ग मोहल्लाही नकाशात दाखवितो (पान१८९) व भटक्या जमातींच्या राजकीय चळवळींची चर्चा करतो (पान २२८), " पाश्चात्य संस्कृतींची गंगोत्री " असे मानले गेलेल्या भूमध्यसामुद्रिक प्रदेशांतील लोकांमध्ये दिसणाऱ्या सांस्कृतिक विचारांच्या भेसळींचीही चर्चा करतो (पान ९३) आणि मांचूरियाची चर्चा " कलहांचे माहेरघर " या त्या प्रदेशाच्या लक्षणाधारे करतो (पान २५७ ff). सर्वसाधारणपणे असे म्हणावे लागते की जर एखादी घटना एखाद्या प्रदेशाचे लक्षण समजले जाण्याइतकी भौगोलिकदृष्ट्या ठाम महत्त्वाची असेल तर तिचे ते महत्त्व स्वैरमर्यादारेषांना पुरून उरेल.

तरीही, भूगोलाच्या अभौतिक शाखांचे विशेषाभ्यासक असोत की आपल्या विशिष्ट प्रादेशिक प्रश्नाच्या अशा बाजू तपासून पहाणारा सामान्य अभ्यासक असो, त्यांच्या दृष्टीने ही परिणामी परिस्थिती मोठीच गोंधळ निर्माण करणारी आहे. अशा स्थितीत भूगोलक्षेत्राच्या या धूसर सीमेवर काय करणे श्रेयस्कर, अथवा काय न करणे श्रेयस्कर, अशा दुग्ध्यात पडलेल्या नवागताने या अधिकारी व्यक्तींच्याकडे मार्गदर्शनाच्या अपेक्षेने पहाणे योग्य ठरेल काय ? या अधिकारी मार्गदर्शकांच्यामध्ये इतके मूलगामी मतभेद आहेत की, प्रत्येकाच्या सूचना या नवागताच्या दृष्टीने संक्षेपाने तपासून पहाणे आवश्यक आहे.

वरवर पहातानाही असे दिसते, की श्लूटरने या प्रश्नाबाबतचे आपले मत अनेकदा बदलले. एकाच वेळी, त्याने " अंतस्थ भूगोल " किंवा " वास्तव भूगोल " या संबंधाने अगदी निर्णायक स्वरूपात लिहिले, तसे भूगोलाच्या बाह्य शाखांसंबंधानेही लिहिले (१५७, परीक्षण ; आणि १४५, ३०). अगदी अलीकडे, निदान राजकीय भूगोलाच्या संबंधापुरते तरी भूराजनैतिकशास्त्रच हा कूटप्रश्न सोडवू शकेल, अशा शब्दात त्याने त्या शास्त्राचे स्वागत केलेले दिसते. तरीही " लोकांचा भूगोल " अशासारख्या अन्य शाखांची यामुळे काहीच सोय झाली नाही (हेटनरमधून घेतलेला संदर्भ ; १६७, २७७). ' भूराजनैतिकशास्त्र ' हे राजकीय भूगोलाचे योग्य पर्यायी शास्त्र होऊ शकेल ही गोष्ट जर्मनीच्या बाहेरील राजकीय भूगोलकार किंवा राजनीतिशास्त्रज्ञ हे दोघेही मान्य करणार नाहीत. किंबहुना खुद्द जर्मनीतीलही फार थोडे राजकीय भूगोलकार हे मान्य करतील.[६६]

---

६६. प्रस्तुत लेखक आणि ईस्ट यांनी केलेल्या भूराजनैतिकशास्त्र (Geo-politic) विषयक चर्चांतून (१९९, २६१-६३) फ्रेंच व डच भूगोलकारांनी केलेल्या चर्चांचेही संदर्भ आलेले आहेत. मी या चर्चेसंबंधी लिहीत असता हेटनरचा टीकालेख विचारात घ्यावयाचा राहून गेला होता. पण जवळजवळ असेच निष्कर्ष त्याने पुष्कळच आधी काढलेले होते, हा शोध लागल्यावर तर माझे लक्ष त्याच्याकडे अधिकच वेधले गेले (१६७, ३३२ ते ३६).

भूगोलासंबंधीच्या ' सारस्वरूप वस्तुस्थितीचे ' प्रतिपादन करणारा प्रवक्ता म्हणून ब्रून्हेसचे नाव या देशात सर्वतोमुखी झाले. त्याच्या प्रतिपादनांतून या क्षेत्राला निश्चित मर्यादा घालून देणारी विधाने सहज उध्दृत करता येण्यासारखी आहेत. पण ही " सारभूत वस्तुस्थिती सोडून तो पुढे जातो " –आणि जेव्हा प्रादेशिक भूगोलाबद्दलचे विचार मांडू लागतो –तेव्हा त्याच्या निरीक्षणाच्या कक्षेला कसलीच मर्यादा रहात नाही. मग त्यात साथीचे रोग, स्वाभाविक कल, नैतिक सवयी, सामाजिक नियम, मालमत्तेचे अधिकार, सहकारीकरण, सामाजिक संघटना, ठेव विक्री करणाऱ्या मंडळ्या आणि मोठ्या शहरात दिसणारी बेबंदशाही अशा सर्वच गोष्टींचा तो त्यात समावेश करतो (१८२, ५१७ ते ६८). जोपर्यंत भूगोलकाराला या गोष्टी आणि " पृथ्वीसंबंधी वस्तुस्थिती " यामध्ये संबंधयोग दिसत असतात, तोपर्यंत त्याने या सर्व गोष्टींचा अभ्यास करावा (c/o मिशोटाची क्रांतिक टीका १८९, १४). यातून मिळणारी कथा किती अमर्याद आहे हे ब्रून्हेसच्या राजकीय भूगोलक्षेत्रातील दोनही ग्रंथावरून स्पष्ट दिसून येते (३३५ व ३३६) ब्रून्हेसनेच यांपैकी पहिल्या ग्रंथाचे वर्णन " जोमाने व सातत्याने भौगोलिक असलेला अभ्यास " या शब्दांनी केलेले आहे. ८३, २३. (c/o प्रस्तुत लेखकाची चर्चा २१६, ८०३).

पासार्जच्या संकल्पनाही याच निष्कर्षांच्या मार्गाने जाताना दिसतात. तसा त्याचा भूगोलविषयक दृष्टिकोन कळावयास सोपा आहे अशातला भाग नाही ; कारण तो स्वतःच आपले मत बदलत गेला, आणि प्रत्येक बदललेले मत प्रसिद्धही करत गेला, असे दिसते. " डोक्यापासून छापखान्यापर्यंतचा हा विचारांचा प्रवास-मार्ग जरा अधिक लांबचा असता तर बरे झाले असते " या हेटनरने केलेल्या टीकेशी (१५२, ५२) पासार्जच्या चर्चा लेखाचा मागोवा घेणारा कोणीही वाचक सहमत होईल. सॅपर (२३८, परीक्षण), ग्राडमान (२३६, ३३५), वायबेल (२५०, १६९) आणि हेटनर (२४२, १६२ ; १६७, २७७) यांच्या सारख्या अभ्यासकांना जर पासार्जचे अचूक आकलन होऊ शकले नाही, तर त्याच्या प्रमेयात्मक संकल्पनांचे विश्लेषण करण्याचा एखाद्या परकीयाने केलेला प्रयत्न शुद्ध अविचारच होईल ! पण पासार्जच्या विचारांतून सादर केल्या जात आहेत असे दिसणाऱ्या आकर्षक संभाव्य गोष्टींमुळे असो, किंवा तो त्यांच्या बरोबरीने तपशीलवार अभ्यासांतील परिणामकारक उदाहरणे देत असल्यामुळे असो, त्याच्या विचारांचा या देशात पडलेला प्रभाव फार लक्षणीय आहे ; म्हणून त्याच्या विचारात नेमका कशाचा अंतर्भाव होतो हे तपासून पहाणे आवश्यक होऊन बसले आहे.[६७]

---

६७. काही अभ्यासक पासार्जच्या विचारांचा चुकीचा अर्थ लावतात, आणि काही तर ते आपल्याला कधी कळालेच नाहीत अशी सरळ कबुली देतात, असे ब्युर्गरला आढळून आले (११, ८४). हेटनरने त्याच्या पद्धतितंत्र विषयक अभ्यासात आणि त्याच्या प्रत्यक्ष भौगोलिक कार्यात दिसून येणाऱ्या तफावतीवर पुढे दिल्याप्रमाणे टीका केली आहे. " तो एक विख्यात अनुसंधान-कार्य करणारा अभ्यासक आहे. त्याचे क्षेत्राभ्यास त्यातील तपशीलांच्या अचूकपणामुळे उत्कृष्ट ठरले आहेत. पण, एकदा का तो पद्धति-तंत्रविषयक प्रश्नांत शिरला, की तो अचूकपणा आणि ती सावधानता यांच्याशी तो काडीमोड

आपल्या चर्चेचा हेतू साध्य होण्याच्या दृष्टीने एक गोष्ट चांगली घडली आहे. पासार्जला अनुभवांती असे कळून चुकले आहे की " भूदृश्यभूगोलाच्या विचारधारेचे अनुकरण करणे, हे निदान शिकाऊ अभ्यासकाला, अवघड आहे. " [६८] याचा परिणाम म्हणूनच की काय, आपले म्हणणे पूर्ण स्पष्ट करण्यासाठी आणि विशिष्ट तपशीलवार उदाहरणे देऊन आपल्या स्पष्टीकरणावर प्रकाश टाकण्यासाठी त्याने बरेच कष्ट घेतले आहेत (२६८). प्रस्तुत लेखकाच्या अंदाजी निष्कर्षावर भूगोलाच्या तीन प्रती असाव्यात असे दिसते. शुद्ध-भूदृश्य-अभ्यास ही त्याची पहिली प्रत. ही प्रत फक्त इंद्रियगोचर वस्तूंच्या अभ्यासाने मर्यादित आहे. यात प्राणी आणि मानव यांचा समावेश होतो की नाही हे पूर्णपणे स्पष्ट केलेले नाही. तरी अशा अभ्यासांच्या विविध रूपांत त्याने त्यांचा समावेश निश्चितच केलेला आहे. माद्रिदच्या भौगोलिक वर्णनात तेथील सेनोरिटा वापरत असलेल्या कासवाच्या पाठीच्या फण्या आणि मँटीलांच्या ओढणीतील रंगेल तिरकसपणा याचाही समावेश आहे. (३७४, ६९३).

दुसरी प्रत म्हणजे प्रादेशिक भूगोलाचाच एक प्रकार असावेसे दिसते. हा प्रकार शुद्ध नाही असे आपणच गृहीत धरले पाहिजे तरीही, सांस्कृतिक घटना कोणत्या मयर्दिपर्यंत भूक्षेत्रदृश्याच्या स्वरूपांवर अवलंबून असतात याचा त्यात विचार केला आहे. (या मुद्यासाठी पहा २६७ : तसेच त्याने केलेली ग्राडमान बरोबरची चर्चा २३६, ३३१ ते ३६). टिरोलचे पहाडी लोक कट्टर कॅथोलिक धर्मानुयायी आहेत ही गोष्ट पहाडी जीवनातील धोक्यांचा परिणाम आहे असे सुचविले आहे. त्या आधीच्याच एका अभ्यासलेखात ज्यू लोकांच्या गुणविशेषांचे परीक्षण करताना " ते भूमीचे (Land) स्वरूप, भूक्षेत्रदृश्याचे (Landschaft) स्वरूप व थोड्या व्यापक अर्थानि परिसराचे (umwelt) स्वरूप

---

करतो. आपण ज्याला विरोध करत आहोत ते मत प्रथम काळजीपूर्वक वाचून त्यावर थोडेफार चिंतन करण्याचे कष्ट तो कधीच घेत नाही. तांबडी चिंधी दिसली की डोळे मिटून धडक मारावयाची येवढेच त्याला कळते " (२४२, १६२). पासार्जने या टीकेला दिलेले उत्तर मोठे मासलेवाईक आहे. याचा अर्थ मी हेटनर वाचला नाही ऐवढाच होत असेल तर, " ते मला एकदम मान्य आहे " (Stimmt म्हणजेच agreed). तत्त्वज्ञानविषयक प्रश्नांचा काथ्याकूट केलेला मला सहनच होत नाही. पण, असे म्हणत असतानाच आपल्या स्वतःच्या प्रमेयात्मक चर्चांतून असे अनेकानेक प्रश्न डोकावत असतात हे त्याच्या गावीही नसावे, हे उघडच दिसते (२७२). त्यामुळे ब्रॉनने त्याच्यावर केलेला आरोप खरा ठरतो. " आपणच केलेल्या कार्यावर सम्राटासारखा आरूढ होऊन तो कोणताही विरोध धुडकावून लावतो " (२७२). शिवाय बायबेल व ग्राडमान या दोघांनीही असे दाखवून दिले, की ही टीका त्याच्या पद्धतितंत्रविषयक चर्चांनाच लागू आहे असे नाही तर त्याच्या सर्व भौगोलिक साहित्यालाही ती तितकीच लागू आहे.

६८. या अवतरणाचा उर्वरित भाग गाळणे अनुचित ठरेल. " आणि भू-दृश्य-भूगोलाच्या (Landschafts Kunde) संदर्भात सर्वसाधारणपणे विचार केला असता, माझे विद्यापीठस्थ सहव्यवसायी, त्यांच्यातील काही कुलपतीला शोभेशा वयाचे असूनही, शिकाऊच आहेत असे म्हणावे लागेल " (२६८,६).

यावर अवलंबून असते " असे मान्य केले आहे (३७५). तसेच जगाच्या " प्रमुख भूदृश्य पट्टयांच्या " संक्षिप्त सारांशरूप वर्णनांत तो लिहितो.– " अमेरिकेत जुन्या जगातील शेतकरी वर्गाचा अभाव आहे. या परंपराप्रिय आणि रूढिग्रस्त वर्गाला आपल्या वडिलार्जित घरकुलाला अगदी चिकटून रहाण्याची खोड असते, कारण तेवढाच त्या लोकांचा खात्रीलायक आधार असतो. " न्यूयॉर्कमध्ये " अतिभव्य आणि तितक्याच अतिभयंकर इमारती म्हणजे गगनचुंबी इमारती. ····· त्यात एखाद्या वारूळात मुंग्यांची गर्दी असावी तशी माणसांची एकच दाटी झालेली असते. ना मौज, ना शांतता, ना दम घेण्याला फुरसत ! सगळी कशी धनसंपादनाच्या चक्रात सापडलेली असतात. " (३०५, ४३, १०० f).

शेवटी तो लिहितो प्रादेशिक भूगोलासंबंधी (Länderkunde पर्यायाने Lan-deskunde म्हणजेच देशांचा भूगोल). वास्तविक ही संज्ञा तोपर्यंत जर्मन भाषेच्या साहित्यात प्रादेशिक भूगोलाचा उल्लेख करण्यासाठी वापरली जात होती. तरीही, त्याच्या मते या शब्दाचा अर्थ अगदी वेगळा होतो.[६९] " कृत्रिम रीतीने मर्यादा घालून दिलेले क्ष त्र म्हणजे देश (Land). सहसा त्यात भू-दृश्य-क्षेत्राचा काहीच विचार केलेला नसतो ; " ते केवळ राजनैतिक क्षेत्र, ऐतिहासिक क्षेत्र, धार्मिक क्षेत्र किंवा लोकांचे क्षेत्र असते–सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे ते एका राज्याचे क्षेत्र असते–असे पासार्जचे मत होते. त्याच्या " देशांच्या भूगोलात (Landes Kunde), या कृत्रिम रीतीने मर्यादित केलेल्या भूक्षेत्रावर (सर्वसाधारणपणे राज्यावर) तेथील सांस्कृतिक स्थिती (भौतिक व अध्यात्मिक अशी दोन्ही प्रकारची) आणि लोकांची स्थिती (त्यांच्या वर्तनाची व बुद्धिमत्तेचीही) कशी प्रामुख्याने अवलंबून असते " त्याचे विवेचन असते. (२६८, ७९ ते ८३). प्रादेशिक भूगोलाचा (Lands chafts kunde) देशांचा भूगोल (Landes kunde) हा शिरोभाग असून त्यात वर्तमान क्षेत्राचे प्रतिपादन असते एवढेच नव्हे तर त्याचा विकास त्या लोकांचा इतिहास, त्यांचे राज्य आणि त्यांची सामाजिक, आर्थिक, भौतिक, अध्यात्मिक, सांस्कृतिक मालमत्ता या सर्वांचेच प्रतिपादन असते. अशा रीतीने जगाचा भूगोल (Erdkunde) या वृक्षाचा प्रादेशिक भूगोल (Landschafts Kunde) हा बुंधा असून तो मूलविस्तार आणि शिरोविस्तार–प्राकृतिक जगाचा भूगोल (Erdkunde) आणि देशांचा भूगोल (Länderkunde)– याना एकरूप करतो. (२५७, २f).

---

६९. c/o हेटनर २४२, १६३ : जुनेच शब्द पण अगदी नव्या अर्थाने वापरणे हे पासार्जचे एक वैशिष्ट आहे. उदाहरणार्थ, याच संदर्भात त्याने राज्याची " नैसर्गिक हद्द " या संज्ञेची व्याख्या " दोन नैसर्गिक भू-क्षेत्र-दृश्यांमधील हद्द " अशी न करता, " दोन वेगवेगळ्या उत्पादक भू-दृश्य-क्षेत्रांमधून थेट जाणारी हद्द " अशी केली आहे, आणि " प्रत्येक देशाने स्वायत्ततेसाठी धडपड ही केलीच पाहिजे " असे त्याचे कारणही दिले आहे (२६८, ८५). यापूर्वीच या संज्ञेचा इतक्यावेळा गैरवापर झालेला होता, की शास्त्रीय दृष्टीने तिचे मूल्य अगदीच नाहीसे झाले होते. त्यामानाने प्रस्तुत बाबीत झालेले नुकसान **नगण्य** आहे. (c/o २३७ ; आणि ३५७ कि २१६, ९४५ f).

अन्यत्र याच आधारावर, पासार्जने राजकीय भूगोलाची व्याख्या केली आहे. " एखादे क्षेत्र (म्हणजेच त्यातील सगळ्या भू-क्षेत्र-दृश्यांची गोळाबेरीज) आणि त्यातील राजकीय संघटना यांच्यातील परस्पर संघटनांचा अभ्यास. " (१७२, ४४५). हा आपला दृष्टिकोण त्याने अनेक लेखांतून स्पष्ट केलेला आहे (३७३ ; ३७७ ; ३७८ ; ३७९), आणि ' निकट-पूर्वेचा : राजकीय भूगोल या आपल्या ग्रंथात त्याने तो विशेषत्वाने मांडला आहे. " हा ग्रंथ म्हणजे राजनीतिशास्त्रावरील ग्रंथ नसून (Geopolitik), ' राजकीय भूगोल ' या शब्दप्रयोगाने नेमके काय समजावयाचे याचे उदाहरण पुढे ठेवण्याचा प्रयत्न आहे, " असे तो सांगतो.

म्हणून, एक " शुद्ध-भू-क्षेत्र-दृश्यांचा भूगोल " वगळला तर भूगोलाच्या सर्व शाखांची व्याख्या " संबंध योगांचा अभ्यास " अशी करावी असेच पासार्जचे मत आहे. आणि नेमक्या याच संकल्पनेला " आधुनिक भूगोलज्ञांचा " कडाडून विरोध आहे. (लौटिन झाक २७८, २०). शोधून काढावयाच्या संबंधयोगांच्या भाषेत भूगोलाच्या मध्यवर्ती विषयाची व्याख्या सांगणे शास्त्रदृष्ट्या धोक्याचे असेल, तर हा आक्षेप त्याच क्षेत्रातील सांस्कृतिक बाजूंचा विचार करणाऱ्या शाखांना, अधिक नाहीतरी निदान तितका, जोराने लागू पडणारा आहे. एकंदरीने, पासार्जचा, भूगोलविषयक दृष्टिकोण हा फारच थोड्या लोकांना मान्य होणारा एक असमाधानकारक " संकरित दृष्टिकोण " आहे असे दिसते. त्याच्या संकल्पना नव्या नाहीत. त्याने वापरलेले शब्द नवे आहेत. आणि असे नवे शब्द वापरताना किंवा जुनेच शब्द पण नव्या प्रकारे स्वैर अर्थाने वापरताना, आहेत आणि असे नवे शब्द वापरताना किंवा जुनेच शब्द पण नव्या प्रकारे स्वैर अर्थाने वापरताना गोंधळ निर्माण होणे अटळ आहे.[७०]

ज्यांनी भौतिक बाबींच्या मर्यादा रेषा आखण्याच्या बाजूने कौल दिला आहे अशा अमेरिकी भूगोलज्ञांकडे वळलो असता असे दिसते, की राजकीय भूगोलाची व्यवस्था कशी लावावयाची याबाबत सॉरचे मत तर अगदीच अनिश्चित आहे आणि तशी त्याने कबुलीही दिली आहे. (८४, २०७ ते २१०). या आणि भूगोलक्षेत्राच्या अन्य सांस्कृतिक शाखांची तो काय व्यवस्था लावणार याबाबत आपण अद्याप तरी दुग्ध्यातच आहोत. उदाहरणार्थ मानववंशाचा भूगोल आणि लोकांचा भूगोल यांचा तो उल्लेखच करत नाही. कारण

---

७०. या संदर्भाने ग्राडमानने असे सुचविले आहे, की पासार्ज, व्होल्स, बान्झ यांना दूरच्या अज्ञात विषुववृत्तीय भू-भागात प्रायोगिक कार्य करण्याची सवय असल्याने त्यांना स्वानुभवावरच अवलंबून रहावे लागते. त्यामुळे त्यांनी इतरांच्या भौगोलिक साहित्याकडे फारच थोडे लक्ष दिले आणि स्वतःला आलेला प्रत्येक नवा अनुभव इतरांच्या दृष्टीनेही नवाच असला पाहिजे, असे त्यांनी गृहीत धरले. (२३६, १३९, १४५, ३३७; C/O सॅप्पर २३८ चे परीक्षण; हेटनर १५२, ४६; २४२, १६४; पेंक १५९, ६४०; वायबेल २५०, ४७७; आणि ब्यूर्गर ११, ८३ f).

कोणत्याच संपूर्ण प्रादेशिक अभ्यासांच्या सहाय्याने त्याने आपल्या पद्धतितंत्रविषयक अभ्यासांवर प्रकाश टाकलेला नाही.

याच कूटप्रश्नाच्या चर्चेच्या निमित्ताने भरविलेल्या आमच्या मंडळाच्या १९३७ मधील बैठकीत, सॉरच्या विधानांतून निर्माण होणारी शृंगापत्ती स्पष्टपणे दाखविली गेली. आपल्याला भूगोलक्षेत्रातून राजकीय भूगोल वगळता येत नाही आणि या क्षेत्राच्या आपल्या व्याख्येप्रमाणे त्याला क्षेत्रात योग्य स्थानही देता येत नाही; म्हणूनच त्याची व्यवस्था लावणे मोठे अडचणीचे झाले आहे. ही श्रृंगापत्ती केवळ स्वैर व्याख्या मान्य केल्यामुळे निर्माण झालेली होती; कारण, ती व्याख्या धड विषयाच्या इतिहासाच्या आधारे केलेली नव्हती, की धड त्यातील तर्कावर आधारलेली नव्हती. म्हणजे, वाटेल तेव्हा यातून बाहेर काढण्याचा मार्ग मोकळा आहे, असे कोणीही समजावे. " स्वयं-निर्णयाच्या गुहेत राहूनच या प्रश्नाला मर्यादा घालण्याने, सामग्रीची विभागणी करण्याने आणि भूगोलशास्त्राचे विभाग पाडण्याने जे श्रेष्ठत्व आपल्याला प्राप्त होते त्याचे या लोकांना आकर्षण वाटत असावे; मग, स्वाधिकारानेच निर्माण केलेल्या न्यायासनावर बसून, ज्या कोणी केव्हा तरी भूगोल क्षेत्रात आपली कुदळ चालविली आहे अशा सर्व कामकऱ्यांवर ते एक गहरी नजर टाकतात. या त्यांच्या उत्तराधिकाऱ्यांच्या दृष्टिकोणाशी जमेल असे कार्य केवळ योगायोगाने ज्या भाग्यवानांनी केले असेल त्या सर्वांना ते मानपत्रे बहाल करतात. पण ज्यांच्या संकल्पना त्यांच्या स्वतःच्या संकल्पनांपेक्षा भिन्न असतील त्या सर्वांची प्रशस्तीपत्रे नामंजूर करतात. " असे पार्शनि या लोकांबद्दल लिहिले आहे. (ग्राफने घेतलेले अवतरण १५६, ३१).

## ड–या मर्यादाबंधामुळे एकरूप क्षेत्र मिळेल का ?

इतिहासदृष्ट्या आणि तर्कदृष्ट्या इतके आक्षेप असूनही, भूगोलासंबंधीचा हा मर्यादित दृष्टीकोण मान्य करणारे पुष्कळसे भूगोलकार तो सहज सोडण्यास तयार होणार नाहीत; कारण, भूगोलक्षेत्रातील बहुविधतेवर आवर घालण्यासाठी लागणारा आधार या मर्यादाबंधांनी दिला आहे, एवढ्या एका गोष्टीचा तरी भूगोलाभ्यासकांना विचार करावाच लागेल. अशा बंधनांची गरज असल्याचे पुष्कळच भूगोलकारांनी बोलून दाखविले आहे. शास्त्र या नात्याने भूगोलाच्या भवितव्याचा विचार करत असता डग्लस जॉन्सन म्हणतो, " भूगोल ज्या अतिविस्तृत क्षेत्रावर सध्या दावा सांगतो, त्यावर काही मर्यादा घालण्याची आवश्यकता आहे. (१०३, २२१). अनेक दृष्टिकोणांतून पहाता असा आवर घालणे इष्ट आहे असेच दिसते. हे मान्य केले, तरी असे प्रयत्न व्यर्थ जाणार आहेत या शक्यतेलाही तोंड देणे भाग पडते ! जोपर्यंत विविध क्षेत्रांचा अभ्यास भूगोलकारांनी करावयाचा आहे, तोपर्यंत ते प्रत्येक क्षेत्र अखिल जगता इतके व इतक्या वस्तूंनी भरलेले असते, हे त्याला मान्य करावेच

लागते. मग, त्या क्षेत्राचे निरीक्षण सोप्या शब्दात करण्याची आकांक्षा बाळगणारे अभ्यासक क्षेत्रपतीइतकेच कष्टी होतात. बहुतेक सर्वच इतिहासकारांच्या एक गोष्ट लक्षात आली आहे, की बहुरूपत्व हा आपल्या विषयाचा अटळ गुणविशेष आहे. या गुणांमुळेच, इतिहास हे ज्याप्रकारचे शास्त्र असावे असे काही इतिहासकारांना वाटते तसे ते होण्याची शक्यताच रहात नाही. एकूण विचार करता, " इतिहासकार आपल्या बाजूने हे ओझे निर्विकारपणे सहन करत आले आहेत ", असे क्रौवी म्हणतो ते खरेच (२०१,३). या प्रश्नाच्या जटिलतेचा जाच भूगोलकारांनाही होत असल्यामुळे त्याची सोडवणूक करण्याची आशा दाखविणारी कोणतीही सूचना केवळ तर्कवादाच्या आधारावर निकालात काढता येणार नाही. भूगोलविषयाचे मध्यवर्ती क्षेत्र जरूर तितके कमी करत असताना, त्याचा केंद्रविषय पूर्णत्वाने आणि एकरूपत्वाने टिकून राहील असा आधार क्षेत्राच्या प्रस्तुत मर्यादाबंधांतून मिळण्यासारखा आहे का ?

ब्रून्हेसने घालून दिलेल्या क्रमबंधात प्रादेशिक भूगोलाला अशाप्रकारचा आधार सापडणे कठीण आहे; कारण, त्यानुसार प्रादेशिक भूगोलाचे वर्गीकरण " सारभूत वस्तुस्थितींच्या पलीकडचा " असे केले आहे. सबंध योगांच्या तत्त्वावर आधारलेले राजकीय भूगोल व सामाजिक भूगोल या विषयासंबंधींचे विचारही याच वर्गात घातलेले आहेत. त्याने तयार केलेली सारभूत वस्तुस्थितींची रूपरेखा उपयुक्त ठरणारी असली, तरी तो स्वतःच तिला पूर्णाधार मानत नाही, हे अगदी स्पष्ट आहे.

तसेच, भूगोलासाठी एखादा मर्यादित पण एकरूप क्रमबंध मिळेल म्हणून पासार्जकडे पहाण्यातही काही अर्थ नाही. एक गोष्ट निश्चित आहे, की या गटातील कोणाही अभ्यासकापेक्षा पासार्जने आपल्या संकल्पनांची चर्चा अधिक वेळा केली आहे आणि त्या विचारांवर आधारलेले मौलिक प्रादेशिक अभ्यास त्याने व त्याच्या विद्यार्थ्यांनी मोठ्या संख्येने प्रसिद्ध केलेले आहेत. (यापैकी पुष्कळांची यादी त्याने स्वतःच २६८ मध्ये दिली आहे ; मार्मिक चर्चेसाठी पहा वायबेल २५० ; ट्रोल २६८ वरील परीक्षण ; आणि क्रौवी २०१, १० F) प्रथम त्याचे राजकीय व सामाजिक भूगोलाबाबतचे अभ्यासलेख बाजूला ठेवून, आम्ही त्याच्या शुद्ध प्रादेशिक भूगोलाचा (Pure Landschafts Kunde) विचार केला. मग, प्रादेशिक भूगोलाची तात्त्विकदृष्ट्या एक आटोपशीर व्याख्या त्याने तयार केलेली आहे, व एक आदर्श नमुना-अभ्यासही त्यानेच लिहिलेला आहे, त्यांचा आधार घेतला. तेव्हा त्या मर्यादाबद्ध संकल्पनेत सामावू शकणार नाहीत अशा कितीतरी गोष्टींचा समावेश, त्याने याच उदाहरणग्रंथात केलेला आम्हाला दिसून आला.

प्रामुख्याने दृश्य वस्तूंची मर्यादा घातल्याने, या क्षेत्राला असा एक आकार येईल, की त्यात या क्षेत्रातील शिकाऊ अभ्यासकाला भूरूपशास्त्रविषयक अभ्यासाचे खास अनुभव

व प्रशिक्षण देता येईल आणि अशा अभ्यासांतून त्याला " निरीक्षणाचे आवश्यक तंत्र आणि मूल्यमापनाची आधारभूत तत्त्वे मिळतील ", असा सॉरचा दावा आहे. (८५,६२३) भूगोलाभ्यासकांना प्राकृतिक भूगोलाचे अधिक सांगोपांग प्रशिक्षण देण्याची पुन्हा वेळ आली आहे, असे प्रतिपादन करणाऱ्यांच्या मनातही निःसंशयपणे हाच विचार असावा. अशा प्रकारची पूर्वतयारी इष्ट आहे आणि आवश्यकही आहे. हे मान्य केले तरी, या व्याख्यांमुळे प्राकृतिक भूगोलापेक्षाही अधिक महत्त्वाच्या भूगोलशाखांकडे दुर्लक्ष करणे योग्य होणार नाही, असे मत हेटनरने प्राकृतिक भूगोलाभ्यासासाठी निर्माण झालेल्या " डेव्हिस संप्रदायावर " टीका करताना व्यक्त केले आहे. (१५२, ४१ ते ४६ ; ग्राडमान २५१ ; आणि परीक्षण ५५२). भूरूपशास्त्रामध्ये जे तंत्र विकसित झाले आहे तेच भूगोलाभ्यासाचे विशेष तंत्र आहे, असे कशाच्या आधारे गृहीत धरण्यात आले ? एका प्राचीन शास्त्राला एका नवोदितशास्त्राच्या खांद्यावर बसविण्याचा हा प्रकार होतो आहे, आणि तोही तिसऱ्याच एका म्हणजे भू-शास्त्राच्या संदर्भात ! ज्या आधाराचे स्थानही अद्याप निश्चित नाही अशा स्थितीत, भूरूपांच्या अभ्यासांमुळे भूगोलाच्या प्रगतीला चांगलीच गती मिळाली हे मान्य केले, तर हवामान शास्त्राच्या प्रगतीमुळेही अशीच गती मिळाली हेही मान्य करावे लागेल, आणि हवामानशास्त्रात तर अगदीच निराळ्या तंत्राचा अवलंब केलेला असतो.

येथे कंसात एक टीप द्यावयाला हरकत दिसत नाही. शुद्ध-भू-दृश्य-वाद्यांनी (Landscape purist) प्रचलित केलेली संकल्पना ही एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धातील एका विशिष्ट कालखंडाच्या विलंबित विस्ताराची एक खूण असण्याचा संभव आहे. सदरच्या कालखंडात भूगोलकारांनी—विशेषतः पिशेल व रिक्टोफेन यांच्या अनुयायांनी प्रामुख्याने रूपांबद्दल विशेष आस्था दाखविली. परिणाम असा झाला की, त्यांच्या कार्यापेक्षा त्यांच्या आकारावर अधिक भर दिला गेला ; आणि मग असे गृहित धरण्यात आले, की निरपवादपणे डोळ्यांनी पाहिलेल्या वस्तूंच्या दृश्यस्वरूपाच्या अभ्यासाशीच भूगोलाचा संबंध आहे. पेंक सारखा भूरूपशास्त्रज्ञ पिके आणि घरे यांची भूरूपांत भर घालण्यास मान्यता देतो, कारण त्याच्या मते या गोष्टी भूमिरूपांचे—पूर्ण भौतिक अर्थाने—भाग आहेत. पण पिके पिकविणारी आणि घर बांधणारी माणसे मात्र यातून वगळलीच पाहिजेत. आपल्या देशात सांस्कृतिक घटनांवर मर्यादा घालण्यास आणखी एक आधार मिळाला. कॅलिफोर्निया परंपरेतील भूगोलकारांनी मानववंश शास्त्राभ्यासकांशी जवळीक केली. त्यामुळेच भूगोलात अभ्यासावयाच्या सांस्कृतिक घटनांवर भौतिक-सांस्कृतिक-रूपांची मर्यादा उघडपणेच घातली गेली. इतिहासपूर्वकालीन, निरक्षर लोकांच्या संस्कृतीचा अभ्यास केवळ त्यांनी केलेल्या भौतिक उत्पादनांच्या अवशेषांवरूनच करणे शक्य होते. त्याच मर्यादांचे भूगोलक्षेत्रात स्थलांतर करण्यात आले आणि भूगोलकरांनाही असे सांगण्यात आले, की कोणत्याही मानवी वसाहतीच्या क्षेत्राचा अभ्यास तेथील निर्जीव उत्पादनांच्या संदर्भात करणे योग्य ठरेल. अर्थातच, भूदृश्य या स्वरूपात त्यांना शून्य महत्त्व असले तरी, भांड्यांच्या खापरांचाही या कामी उपयोग

करावयास हरकत नाही. योगायोगाने झालेल्या अगदी परस्पर-भिन्न संकल्पनांच्या या जोड-गोळीने एका विलक्षण वदतो व्याघाताला जन्म दिला. भूरूपशास्त्राचे प्रशिक्षण घेतल्याने, भूगोलाभ्यासकाला राज्याचे केंद्रिय क्षेत्र आणि त्याची विस्तारक्षेत्रे वेगळी काढण्याच्या त्याच्या क्षमतेपेक्षा अधिक मोलाचे कौशल्य, म्हणजे दहाबारा अमेरिंडियन खापरांचे वर्गीकरण क्षमता, आमच्या भूगोलाभ्यासकाला प्राप्त होऊ शकते, असा दावा कोणीतरी करील काय ? (c/o ३८३).

शुद्ध भूदृश्यवाद्यांसह सर्वच वर्तमान भूगोलकार जी तंत्रे वापरतात त्यांचा विचार केला असता, त्यात प्रकारांची बरीच विविधता आहे, असे स्पष्ट दिसते. प्रत्येक प्रादेशिक भूगोलकाराला स्वतः निरीक्षण करून संपादन केल्या नाहीत अशा वस्तुस्थितींवर मोठ्या प्रमाणात अवलंबून रहावेच लागते. आणि ज्यांनी प्रत्यक्ष निरीक्षण केलेले असते त्यांनी वापरलेल्या तंत्राचा भूरूपशास्त्राच्या तंत्राशी फारच थोडा संबंध असण्याची शक्यता असते. शिलावरणाच्या अभ्यासावर दिलेला हा अतिरिक्त भर खोडून काढण्याच्या प्रयत्नात, मॅकिन्डरने भूगोलकाराचा संबंध जलावरणाशी अधिक असतो असा दावा मांडला. (१९६). हा दृष्टीकोण निराळ्या दिशेने केलेल्या अतिशयोक्तीचे द्योतक आहे. कसे झाले तरी, प्रादेशिक भूगोलाच्या अभ्यासकाला हवामान विषयक सामग्रीचा अभ्यास केलाच पाहिजे, आणि त्याचे मूल्यमापन करण्यासाठी भूरूपशास्त्रातील तंत्राचा त्याला काहीच उपयोग होणार नाही. (ब्रून्हेस १८२, प्रकरण १ले).

अगदी लहान प्रान्त वगळले, तर अभ्यासासाठी वापरावयाच्या " निरीक्षणक्षम भौतिक सामग्री " च्या बऱ्याच मोठ्या भागाला हीच टीका लागू पडणार आहे. फिंचने केलेल्या मॉंटफोर्टच्या अभ्यासासारख्या (२८५) प्रत्यक्षपणे तपशीलवार निरीक्षणांच्या आधारे केलेल्या लहान लहान प्रांतांच्या अभ्यासांचे महत्त्व मान्य केलेच पाहिजे. तरीही मोठ्या प्रदेशाचे वर्णन करावयाचे असेल आणि त्याचे अर्थानुसंधान करावयाचे असेल तर त्याच्या पुष्कळ लहान लहान क्षेत्रांतून निरीक्षणाने मिळविलेल्या वस्तुस्थितींची केवळ बेरीज करूनही भागत नाही. पिके, प्राण्यांची निपज, लोकवस्ती अशासारख्या सामग्रीसाठी शिरगणतीतून मिळालेल्या तपशीलावरच आपण अवलंबून राहतो. आणि असेच पुढे अवलंबून रहाणार आहोत. पण वर सांगितल्यापैकी कोणतीच सामग्री आपण प्रत्यक्ष निरीक्षणाने मिळविलेली नसते. तथापि एक गोष्ट निश्चितच असते, की ती माहिती शेवटी कोणाच्यातरी निरीक्षणावरच आधारलेली असते.–उदाहरणार्थ शेतकऱ्याने आपल्या घरी किती गुरे आहेत व आपल्याला किती मुले आहेत याचे निरीक्षण केलेले असते हे गृहीतच आहे. याचाच अर्थ असा, की कोणतीतरी वस्तुस्थिती कोणत्यातरी प्रकारे निरीक्षणात आलेली असेल तरच तिला शास्त्रदृष्ट्या वस्तुस्थिती म्हणून मान्यता मिळते.

फायफरने आर्थिक भूगोलाच्या पद्धतींची चर्चा केली आहे. त्यावरून असे दिसते की घटनांच्या क्रमाचा आणि उत्पादित माल व वहातूक झालेला माल यांच्या प्रमाणांचा आपल्याला अभ्यास करावाच लागतो. म्हणून, या संबंधीची चिकित्सापद्धती भूदृश्य-निरीक्षण, संख्यात्मक सामग्रीचे मूल्यमापन व अर्थ शास्त्राच्या क्षेत्रातील अनुसंधान कार्याचे परिशीलन या सर्व प्रकारांनी पूर्ण असावी. (१६४ ; ३२७, ४२५). म्हणूनच, फायफरने केलेली ही चर्चा म्हणजे भूदृश्य संकल्पनेचे आर्थिक भूगोलाच्या क्षेत्रासाठी योग्य दिशेने केलेले उपयोजनच आहे, या शब्दांत सॉरने त्याची सनिर्देश प्रशस्ती केली आहे (८५).

पण प्रत्यक्षात सॉरने आखलेल्या रूपरेषेचा, अथवा त्याच्या आधारे केलेल्या प्रायोगिक कार्याचा विचार केला असता असे दिसते, की भूगोलकाराने वापरावयाच्या तंत्रांवर मर्यादा घालण्या ऐवजी त्यांच्या कक्षा अधिक विस्तृत करणे आवश्यक होणार आहे. "आणखीही एका पद्धतीचा म्हणजे निर्दिष्ट ऐतिहासिक पद्धतीचा" वापर भूगोलकाराने केलाच पाहिजे, कारण हा अभ्यास नेहमीच विकास-क्रमाच्या दिशेने होणे आवश्यक आहे. पूर्वकालीन वसाहती, व भूमी-उपयोजन आणि दळणवळण मार्ग यांचे चित्रण करण्यास उपयुक्त ठरणारी सर्वप्रकारची उपलब्ध सामग्री भूगोलकार उपयोगात आणील ; मग ती सामग्री लिखित असो, पुराण वस्तुशास्त्राने पुरविलेली असो किंवा भाषाशास्त्रविषयक असो. (८५, ६२३).

भूगोलाच्या पद्धतितंत्रात ज्या कोणाला सुधारणा घडवून आणावयाची असेल त्याने आपला दृष्टीकोण "वास्तव असल्याचे व आजपर्यंतच्या मान्यसंकल्पनेपेक्षा श्रेष्ठ असल्याचे सिद्ध करता येईल असे प्रत्यक्ष कार्य" पुढे ठेवावे, असे आवाहन हेटनरने केले आहे (१७५, ३८३) पण सॉरने केलेल्या या तात्त्विक प्रस्तावाला पुष्टी देणारे कोणतेच लिखाण अभ्यासकांपुढे ठेवले गेलेले नाही. म्हणूनच, संपूर्ण प्रादेशिक अभ्यासाच्या विकासासाठी सॉरने सुचविलेल्या पद्धती कशा वापरल्या जाणार आहेत हे एक कोडेच आहे. यानंतरच्या काळात सॉरने व त्याच्या अनेकविध अनुयायांनी प्रसिद्ध केलेल्या प्रादेशिक अभ्यासांवरून इतिहासशास्त्राच्या अथवा मानववंशशास्त्राच्या पद्धतींसारख्या अभौगोलिक पद्धतींचा खास भौगोलिक पद्धतींवर वरचष्मा स्थापन करण्याकडे कल दिसून येतो, हे आम्ही वर दाखवून दिलेलेच आहे (प्रकरण ६ ' ब '). इतिहासमान्य प्रतिपादन पद्धतींचा भूगोलात वापर केल्याचा परिणाम काय होतो याचे मनात भरणारे उदाहरण, म्हणजे ट्रेवार्थनि केलेला ड्रिफ्टलेस हिललँड या प्रदेशातील पूर्वीच्या फ्रेंच व्यापारी ठाण्यांचा अभ्यास हे होय. वास्तविक याच लेखकाने केलेले जपानातील अभ्यास विशेष नजरेत भरण्यासारखे आहेत. त्याने स्वतः भूगोलाभ्यासकाने "निरीक्षणक्षमरूपांची" मर्यादा कधीही ओलांडू नये असे वारंवार आणि आग्रहपूर्वक सांगितले आहे. पण त्याने केलेल्या या पहिल्याच प्रादेशिक अभ्यासाच्या पहिल्याच प्रकरणाची रूपरेषा केवळ ऐतिहासिक स्वरूपाची आहे इतकेच नव्हे तर, त्याने मान्य केलेला पुरावाही केवळ लिखित कागदपत्रांच्या स्वरूपाचा आहे. कारण प्रस्तुत भूदृश्यात फ्रेंच वसाहतींच्या किरकोळ खुणाही अवशेषरूपाने शिल्लक राहिलेल्या आढळत नाहीत. (३९३).

भौगोलिक कार्याचा विचार एका विशिष्ट तंत्राच्या भाषेत करता येण्यासारखा नाही. त्यासाठी विविधप्रकारच्या पुष्कळ तंत्राचा उपयोग करावा लागतोच व ते अटळ आहे. या मताला श्लूटरने कधीच आक्षेप घेतलेला नव्हता. भौगोलिक कार्यातून मानवाचा अभ्यास वगळावयाचा असे म्हटले तरी, " त्यातून उमटणारे चित्र बहुरंगीच असणार. ते वातावरणशास्त्र, जलावरणशास्त्र, भूविज्ञान, वनस्पतिशास्त्र आणि प्राणिशास्त्र अशा अनेक रंगांचे मिश्रणाने रंगविलेले दिसेल ". यात भर घालण्यासाठी " मानवाचे कार्य . . . . . घटक वस्तूंच्या स्वरूपात त्या भूदृश्यात प्रवेश करते आणि त्या दृश्याच्या प्रकृतीचा एक भागच बनून रहाते ". पण " इतिहास, अर्थशास्त्र किंवा मानवजातिशास्त्र एतद्विषयक अनुसंधान कार्य केल्याशिवाय या घटकाचे आकलन होऊ शकत नाही, . . . . . . . अशा रीतीने भूगोलाचे स्थान भौतिक शास्त्रे व सामाजिकशास्त्रे यांच्या दरम्यानचे आहे. पण महत्त्वाचा मुद्दा तो नसून, विविध शास्त्र प्रकारांमध्ये सर्वस्पर्शी संबंध प्रस्थापित करण्याचा भूगोलाचा प्रयत्न असतो हा खरा मुद्दा आहे. खरोखरच, हवामानातून भूमिरूपांवर व तेथून वनस्पतिजीवनावर उडी घेणे खऱ्या भूगोलकाराला जितके सोपे वाटते, तितकेच प्राकृतिक शास्त्रांतून सांस्कृतिक शास्त्रांत झेप घेणे त्याला सहज साध्य आहे", असे अतिशयोक्तीचा दोष पदरी न घेता कोणीही म्हणू शकेल. (१४८, १४५-४६).

उलटपक्षी, येथे मानवी वसाहतींच्या प्रतिपादनांकडून मानवाच्या भाषा, रूढी, राज्ये या सारख्या अभौतिक निर्मितींच्या विवेचनांकडे नेईल असा कोणताही मधला पूल ओलांडण्याची भूगोलाभ्यासकाला (निदान " शुद्ध " भूगोलकाराला) सक्त मनाई आहे. श्लूटर आपल्या या " निरुंद संकल्पनेचे " समर्थन ती केंद्रीकरणाच्या तत्त्वानुसार निश्चित केली गेली आहे, " अशा शब्दांनी करतो. (पाने २१३ व २१४). असे केल्याशिवाय कोणत्याही प्रदेशाचा संपूर्ण आणि एकरूप अभ्यास करणे अशक्य आहे. त्या भूमीचे स्वरूप ज्यांत प्रतिबिंबित झाले आहे अशा सांस्कृतिक रूपांचा प्रासंगिक विचारही त्यातील एकरूपता नष्ट करतो. मग, त्यांचा पूर्णपणे अभ्यास करावयाचा म्हटले, तर भूगोलकाराचे कार्य अशक्यप्राय होण्याइतके विस्तृत होईल ; इतकेच नव्हे, त्यामुळे " प्रदेशाच्या प्रतिपादनातील सलग एकरूपता अगदी विस्कळीत होऊन जाईल ". इतके म्हटले तरी ही " निरुंद संकल्पना " वाटते तितकी निरुंद नाहीच ; कारण, त्यात लोकसंख्या, लोकसंख्येची घनता, लिंगगट व वयोगटानुसार लोकसंख्येची घटना, वाढ व तिचे स्थलांतर यांचा अंतर्भाव आहे. तसेच त्याच्या एकूण आर्थिक बांधणीचाही विचार करावयाचा असून त्यात उत्पादनांपासून तो दलालांच्या मध्यस्थीने मालाची प्रत्यक्ष वहातूक व व्यापार यांच्या मार्गाने त्यांच्या उपयोजनापर्यंत सर्वांचा या संकल्पनेत अंतर्भाव आहे (पाने २१६,१७).

आता, दृश्यभूभागाचा साकल्याने अन्वयार्थ लावण्यासाठी त्यातील सांस्कृतिक घटकांचा विचार करावा लागेल. पण तोही याच तत्त्वावर आणि केवळ याच आधारावर करावयास हरकत नाही. पण, हेटनर असा प्रश्न निर्माण करतो : " जेव्हा जेव्हा ते अर्थपूर्ण असतील

तेव्हा " असा शिक्का मारून त्यांना मागच्या दाराने प्रवेश द्यावयाचाच असेल, तर पुढच्या दाराने आत येण्यास त्यांना मज्जाव केला, त्याची किंमत काय राहिली ? उलट, या पद्धतिनेच त्या अभ्यासाच्या नैसर्गिक एकरूपतेला तडा जाईल ; आणि मग, अभ्यासक जसा वर्णनाच्या पुढे जाईल तसा त्याला त्या त्या वेळी तडजोड करण्याचा प्रयत्न करावाच लागेल. (१२६, ५५५ ; १६७, २८० : तसेच हेसिंजर २५३ ; अल्यगिआ १८८, १६). पेंकची परिस्थिती हीच आहे. प्रथमदर्शनी जर्मन संस्कृतीच्या लोकांची विभागणी कशी झाली आहे या प्रश्नाचा सरळ अभ्यास करण्यास तो भूगोलकारांना मनाई करतो. पण स्वतःच असे ठासून सांगतो, ज्या लोकांनी त्या सांस्कृतिक प्रदेशाचा विकास घडवून आणला त्यांचा विशिष्ट छाप त्या भूमीवर उमटल्याशिवाय रहात नाही. (१५८, ५२). दुसऱ्या शब्दात सांगावयाचे झाले तर, ब्यूर्गरच्या सूचनेनुसार त्या प्रदेशातील लोकांच्या सांस्कृतिक सामर्थ्याचा प्रादेशिक आविष्कार म्हणून ' सांस्कृतिक भूदृश्याचा ' नकाशा भूगोलकाराने तयार करावयास हरकत नाही. पण, त्या संस्कृतीतील लोकांनी त्या सामर्थ्याचे केलेले प्रत्यक्ष आणि प्रादेशिक आविष्कार नकाशावर दाखविण्याची गरज नाही. (११, ६४ व ७५).

हेटनरने दिलेल्या या ' उघडा ठेवलेला मागील दरवाजा ' या दृष्टान्तावर ग्रान्योने जोराचा आक्षेप घेतला आहे. तो म्हणतो : " ज्या भौतिक घटनांच्या प्रभेदांचे सांस्कृतिक घटनांच्या प्रभेदांशी अन्योन्य संबंध आहेत अशाच सांस्कृतिक घटनांना आत प्रवेश आहे, आणि तोही भौतिक घटनांचे स्पष्टीकरण करण्यापुरताच. (२५२, १७९). पण हेटनर सारखे भूगोलकार ज्यांचा प्रथमच विचार करणार आहोत त्या सर्व सांस्कृतिक घटकांचा याच आधारावर, शेवटी का होईना, ग्रान्योला विचार करावाच लागणार आहे, या युक्तिवादाला मात्र तो काहीच उत्तर देत नाही. फरक इतकाच, की हा नंतरचा विचार असतो, म्हणजेच प्रथम फाटलेल्या अभ्यासवस्त्राला ठिगळ लावून ते एकरूप करण्याचा प्रयत्न असतो. ग्रान्यो स्वतःच अशाच गृहीत प्रमेयांपासून सुरूवात करतो, आपल्या पर्यावरणातील भौतिक आणि अभौतिक अशां सर्वच घटना मिळून एक एकक तयार होते. तो हेही मान्य करतो, की " अध्यात्मिक व सामाजिक परिसराचा भौतिकदृष्ट्या प्रतिबोधनक्षम परिसराशी प्रत्यक्ष, आणि सकारण, संयोग असतो ; तसेच त्यांचे अन्योन्य संबंधही असतात. " तरीही, भौतिक वस्तुस्थितींचाच भूगोलात प्रत्यक्ष अभ्यास व्हावयाचा असतो असा आग्रह तो धरतो, कारण अभौतिक वस्तुस्थिती समाजशास्त्राच्या क्षेत्रात मोडतात. (२४५, ५ ; २५२, ४६ ; २७०, २९७). हा त्याचा निष्कर्ष म्हणजे तर्कवादाचा विपर्यास आहे, इतकेच नव्हे तर, तो मूलतःच असंबद्ध आहे असे दिसून येईल. या गोष्टीची अमेरिकी भूगोलकारांनी वारंवार या ना त्याप्रकारे केलेली पुनरावृत्ती म्हणजे काही युक्तिवाद नव्हे. विवाद्य मुद्दाच आणखी जोराने सांगण्याचा हा फोल प्रयत्न आहे. सांस्कृतिक घटनांचा अभ्यास जर समाजशास्त्रांच्या कक्षेत येत असेल, तर भौतिक

घटनांचा अभ्यास भूशास्त्र आणि प्राणिशास्त्र मृत्तिकाशास्त्र इत्यादि भौतिकशास्त्रांच्या – आणि अंशतः अर्थशास्त्रासारख्या सामाजिक शास्त्रांच्या – कक्षेत येतात. याच दिशेने युक्तिवाद करत पुढे गेलो, तर भूगोलाला कोणताच अभ्यास-विषय शिल्लक राहाणार नाही. नाही म्हणायला, अन्य सर्व शास्त्रांनी दुर्लक्षित केलेले काही विषय राहातील.

कोणत्याही क्षेत्रातील सांस्कृतिक घटना सामाजिक शास्त्रांच्या कक्षेत येतात, आणि म्हणूनच त्या भूगोलाच्या कक्षेत येत नाहीत अशाप्रकारच्या कोणत्याही युक्तिवादाने वर काढलेला निष्कर्ष तर्कसिद्ध दिसत असला, तरी कोणताच भूगोलाभ्यासक क्षेत्रीय घटनांपैकी कोणत्याच घटनांवरील आपला अधिकार सोडावयाला तयार होत नाही, हे सुदैवच म्हटले पाहिजे. या सिद्धान्ताचा एकच परिणाम झालेला दिसतो. त्यांच्या या प्रक्रियेत, सुरुवातीला तरी, काही ठराविक वस्तूंची मर्यादा ते भूगोलकार स्वतःवर निश्चितपणे घालून घेतात. सर्वसाधारण शास्त्रीय क्षेत्रांतील प्राथमिक वस्तुस्थितींच्या स्वरूपाची ही मर्यादा नसते, तर एका विशिष्ट जातीच्या अनेक प्राथमिक व अनुमानित वस्तुस्थितींचा तो एक संग्रह असतो. पण, अभ्यासाच्या उत्तरार्धात दुसऱ्या अनेक जातीच्या वस्तुस्थिती विचारात घेतल्या जातात. त्यात मात्र प्राथमिक आणि अनुमानित असा भेद नसतो. म्हणूनच क्रोबीने " भूदृश्यसंकल्पनेच्या संदिग्धपणावर " पुढे दिल्याप्रमाणे समर्थनीय टीका केली आहे. " कोणतीही एक सुस्पष्ट व्याख्या बनविली, की पुढचा भाग अगदी उघड दिसू लागतो. आधीच मोठ्या दक्षतेने रचून ठेवलेल्या वस्तू पोतडीतून क्रमाने काढून दाखविण्याची प्रक्रिया रचावयाची. हाच या नूतन भूदृश्यतत्त्वज्ञानाचा महत्त्वाचा आशय असतो. " (२०२, १५).

संयुक्त संस्थानातील आग्नेयेकडील एखादा प्रदेश विचारासाठी घेऊन हा विवाद्य मुद्दा अधिक स्पष्ट करता येईल. असे समजू या की एक प्रादेशिक भूगोलाभ्यासक प्रथम भौतिक गोष्टींचे सरळ वर्णन करण्याची मर्यादा पाळतो आहे. तो साहजीकच कपाशीची शेते, मळ्यातील घरे, आणि कुणब्यांच्या झोपड्या यांचेच वर्णन करील ; पण, त्या कुणब्यांचा वर्ण, विशेषतः गुलामगिरीच्या काळापासून चालता आलेला सांस्कृतिक वारसा, अशा गोष्टींचा उल्लेख करण्याचे तो काळजीपूर्वक टाळेल. आता त्या सांस्कृतिक गोष्टींचा विचार करावयाचा झालाच तर पाहिलेल्या गोष्टींच्या स्पष्टीकरणासाठी तो त्यांचा उपयोग करील. लोकसंख्येचा बराच मोठा भाग निग्रो रहिवाशांचा आणि तोही गुलामांच्या वंशजांचा आहे. ही वस्तुस्थिती हाच आमच्या दक्षिणेच्या गुणविशेषांपैकी सर्वात महत्त्वाचा गुणविशेष आहे, आणि तो इतर कोणत्याही प्राकृतिक अथवा सांस्कृतिक लक्षणांपेक्षा कमी महत्त्वाचा नाही. (c/o ३५९). अशा स्थितीत त्या लेखकाने हे महत्त्वाचे लक्षण विचारात घेण्यात चालढकल का करावी, अथवा प्रसंगी ते गाळून का टाकावे, याचे या क्षेत्राशी परिचित असलेल्या कोणाही वाचकाला आश्चर्य वाटल्याशिवाय रहाणार नाही. दुसऱ्या शब्दात असेही म्हणता येईल, की कोणत्याही क्षेत्रातील कोणतेही रूपध्येय फारसे ज्ञात

नसूनही त्या क्षेत्रातील भौतिक रूपधेयांच्या एकूण जटिलाच्या दृष्टीने अर्थपूर्ण असेल, तर तेही त्या क्षेत्राचे एक लक्षणच असते, आणि सरळ वर्णनापुरते ते टाळावयाचे म्हटले तर त्याप्रदेशाचे एकूण चित्र अपुरे राहील. (ग्राडमान २३६, ३३० f).

येथे एक निष्कर्ष निश्चितपणे काढता येण्यासारखा आहे. एखाद्या प्रदेशाच्या अभ्यासात सांस्कृतिक घटना लक्षात घेणे आवश्यकच असेल, तर त्या क्षेत्रातील इतर घटनांबरोबरच त्या जेथे आणि जेव्हा आढळतील तेथे आणि तेव्हाच त्यांचा विचार व्हावा. उलट, प्रथमदर्शनी ती काटेकोरपणे वगळावयाची आणि अभ्यासाच्या ओघात नंतर जेव्हा त्यांची जरुरी भासेल, तेव्हा शास्त्रीय-दृष्ट्या काळजीपूर्वक केलेल्या निरीक्षणांची टिपणे हाताशी नसल्यामुळे, मानवी निरीक्षणाच्या केवळ धूसर स्मरणातून ती गोळा करावयाची, असा क्रम असू नये.

केवळ भौतिक स्वरूपाच्या गोष्टीच एकरूप वस्तू निर्माण करू शकतील असा एकच मार्ग आहे, असे दिसते, आणि तो म्हणजे भौतिक गोष्टींचा अभ्यास करणे हाच भूगोलाचा मध्यवर्ती विषय आहे अशी संकल्पना बांधणे. वर सुचविल्याप्रमाणे प्रत्यक्ष दृष्टीला पडणाऱ्या भूदृश्याच्या अभ्यासाच्या मर्यादेने आपल्याला कोणीही बांधून घेऊ शकतो–येथे भूदृश्य याचा अर्थ पृथ्वीच्या बाह्यपृष्ठाचे स्वरूप एवढाच घ्यावयाचा आहे. आतापर्यंत कोणाही अभ्यासकाने अशा प्रकारचा अभ्यास हाच भूगोलाचा मध्यवर्ती विषय असे सुचविल्याचे मला आढळलेले नाही–पेंकला कदाचित् असे सुचवावयाचे असल्यास मला माहिती नाही (१६३, ४०) –आणि तशा अर्थाचा प्रस्ताव मांडण्याचाही माझा हेतू नाही. तरीही ही संकल्पना मोठी अर्थपूर्ण आहे; ही गोष्ट मान्य केलीच पाहिजे. या संकल्पनेने एक मूर्त पाया तयार केलेला आहे आणि त्याच्या आधारावर भूदृश्यविषयक संकल्पनांच्या सहाय्याने भूगोलाच्या मध्यवर्ती विषयासंबंधीच्या–आणि एकूण भूगोलासंबंधीच्या–संकल्पना रचण्यास अभ्यासकांनाही मोकळीक मिळाली आहे.

आधी व्याख्या केली आहे त्याप्रमाणे, भूदृश्य ही एक वस्तुनिष्ठ सत्यस्थिती आहे. ते एक सलग वस्तूच्या रूपाने असते आणि एकूण जगाच्या दृष्टीने पहाता, ती एकच एक मूर्त वस्तूही आहे. म्हणूनच, आपल्या अभ्यासक्षेत्राला एककाचा आधार देण्याचे काम त्याने केले आहे. ज्याक्षणी हा अभ्यास केवळ वर्णनाची मर्यादा ओलांडतो, त्याचक्षणी अभ्यासकाला भूदृश्य सोडावे लागते व त्या भूदृश्याच्या अंतरंगात प्रवेश करावा लागतो. इतकेच काय त्याचे बाह्यरूप हे कशाचे प्रतीक आहे याचेही विवेचन करावे लागते. उदाहरणार्थः आरण्याच्या वरवर दिसणाऱ्या पालवीचे भाषांतर आरण्य प्रकारात करणे, घरांच्या बाह्यकारांचे भाषांतर घरांच्या प्रकारांत करणे, इत्यादि. असे जो करणार नाही त्याच्या अभ्यासाचा संबंध फक्त पृष्ठावरील रूपांशी–म्हणजे त्या पृष्ठावरील प्रतलीय रूपांशीच–राहील. पण, अशा प्रकारचा अभ्यास, शब्दार्थानेच नव्हे तर, सर्वच अर्थांनी जुजबी होईल. क्राफ्टने भूदृश्यांच्या सर्व अभ्यासांवर हाच शेरा मारला आहे (१६६, १७). घरे, कारखाने, आरण्ये याबद्दल आम्हाला वाटणारी आस्था त्यांच्या पृष्ठाकारांच्या दर्शनाने संतुष्ट होणार नाही. फक्त

सौंदर्यबोधक भूगोलाच्या मर्यादित क्षेत्रातच अशा प्रकारचे बंधन समर्थनीय ठरेल. घर, कोठार, कारखाना, कार्यालयाची इमारत इत्यादि शब्दांचा वापरच या इमारतींच्या अंतरंगातील कार्याशी आमचा प्रामुख्याने संबंध असल्याचे सूचित करतो. त्यांचा बहिरंग हे त्यांचे दुय्यम स्वरूप असून, त्यांच्या अंतरंगात चाललेल्या कार्याचा शोध घेण्याचे केवळ एक सोईचे साधन म्हणून त्या शब्दांचा वापर आपण करत असतो – आणि आपला हेतू सिद्ध करणारे एक विश्वसनीय साधन म्हणूनच त्याचा वापर केला जावा.

भूदृश्यातील आकारांचा आकृतिबंध व चढ-उतार यांच्या अर्थानुसंधानासाठी तर ते पृष्ठ निर्माण करणाऱ्या रूपधेयांच्या पोटातच शिरावे लागेल. वनस्पतींच्या मुळाशी असलेल्या पृष्ठावरील मृत्तिकेचेच निरीक्षण करून भागणार नाही, तर त्याच्या खाली असलेल्या अंतर्मृत्तिकेचे आणि त्याच्याही खाली जाऊन स्थानिक खडकांचेही निरीक्षण करावे लागेल. मगच, तो स्थानिक खडक त्या स्थानिक तद्‌भव मातीचे उगमस्थान आहे की, कोण्या स्थलांतरीत मातीचा केवळ आधार आहे, हे ठरविता येईल. तळशीळांचे स्थान आणि स्वरूप या गोष्टींचे ज्ञान त्याचा चढ-उतार, झरे, कारंजाविहिरी अशा सारख्या त्यांच्या पृष्ठीय आविष्कारांची समजूत पटण्यास आवश्यक असते. पृष्ठावरील खाण इमारतींच्या अर्थानुसंधानासाठी आपल्याला पृष्ठाखाली हजारो फूट खोल जाणे भाग पडेल. पण, त्यापेक्षाही एका महत्त्वाच्या गोष्टीच्या ज्ञानासाठी, म्हणजे हवामानाविषयक परिस्थितीच्या परिणामांच्या अर्थानुसंधानासाठी हे भूदृश्य सोडून विरूद्ध दिशेने तितकेच वर जावे लागेल.

शास्त्राच्या अभ्यासवस्तू सोडून त्या शास्त्रासंबंधीच्या बाह्य वस्तूंकडे होणारी अपवर्तने सर्वच शास्त्रात आवश्यक असतात. कारण एकंदरीने पहाता त्या शास्त्राच्या अभ्यासवस्तूतच समाविष्ट असणाऱ्या अपवर्तनांच्या तुलनेने त्यांची बाह्य अपवर्तने फार कमी महत्त्वाची असतात. पण, आम्ही सुचविलेल्या भूदृश्याच्या बाबतीत परिस्थिती अगदी विरूद्ध असल्याचे स्पष्ट दिसून येते. दृष्यभूभागाच्या अभ्यासात त्या भूदृश्यात अंतर्भूत नसलेल्या गोष्टींचा अभ्यासाचा फार मोठ्या प्रमाणात समावेश करावा लागतो. अर्थात्, ज्याप्रमाणे भूदृश्याच्या पृष्ठात स्वतःच्या पृष्ठाची भर टाकणाऱ्या वस्तूंचा अभ्यास कोणत्यातरी दुसऱ्यां शास्त्रात होत असतो, तसा या बाह्यवस्तूंचाही अभ्यास अन्य शास्त्रातून होत असतो. भूदृश्याच्या बाहेरच्या घटनात आढळणारी प्रादेशिक भिन्नता, त्यांचे अन्योन्य संबंध अथवा त्यांचे त्या भूदृश्याशी असणारे संबंध या संदर्भात आवश्यक ती माहिती भूगोलकारास पुरविण्यास कोणतेच शास्त्र तयार होत नाही. भूगोलकार त्या भूदृश्याचा अन्वयार्थ लावण्यास आवश्यक असलेल्या अन्य रुपधेयांचा अभ्यास करत असताना जसे काही वगळू शकणार नाही, तसेच त्या भूदृश्याचे वर्णन करत असतानाही त्याला त्यातून काही वगळता येणार नाही.

उलट, भूदृश्याबाहेरील विकारक रूपधेयांपेक्षा प्रत्यक्ष भूदृश्यच कितीतरी जास्त महत्त्वाचे आहे असे मानण्यास काय हरकत आहे ? म्हणजे, भूदृश्य हाच आपल्या अभ्यासक्षेत्राचा मध्यवर्ती विषय आहे हे आमचे मत आपोआपच समर्थनीय ठरेल ! वरील प्रश्नात त्याचे

उत्तरही आहे. अंतर्भूत वस्तूंपेक्षा बाह्याकारच अधिक महत्त्वाचा आहे, असे फक्त सौंदर्यशोधनाच्या अथवा दृष्टी संवेदनाच्या दृष्टीकोणातूनच मानता येईल. दगडी कोळशाच्या खाणीत चाललेल्या भूमिगत कार्यापेक्षा पृष्ठावरील इमारतीच अधिक महत्त्वाच्या आहेत, अरण्याचे बाह्यस्वरूप त्याच्या अंतर्भूत वस्तूंपेक्षा अधिक महत्त्वाचे आहे किंवा भूभागाचे उंचसखल दृश्यच त्यावर पडणाऱ्या पर्जन्यापेक्षा जास्त महत्त्वाचे आहे असे भूगोलकार कसे मान्य करेल ?

एक पार्थिव मूर्त वस्तू अशा अर्थाच्या संज्ञेची ' भूदृश्य ' येवढी एकच संकल्पना असलेली आपल्याला आढळते. अर्थात, ' भूदृश्य ' म्हणजे वातावरणाखाली असलेल्या भूपृष्ठाचा बाह्यभाग असा अर्थ करावा. म्हणून, आमचा निष्कर्ष असा की, जोपर्यंत प्रत्यक्ष भूदृश्याचा पूर्णांशाने अन्वयार्थ लावणे या हेतूची मर्यादा एखाद्या अभ्यासाला घातलेली असते, आणि जोपर्यंत अशा प्रकारच्या अभ्यासात शेवटी त्या क्षेत्राच्या बहुतेक सर्व भूगोलविषयक विचारांचा अंतर्भाव होऊ शकतो, तोपर्यंत त्या प्रत्यक्ष भूदृश्याला त्या क्षेत्राचा गाभा मानता येणार नाही, तर त्या क्षेत्रात कार्यान्वित असलेल्या बहुतेक सर्वच कारकांचा तो केवळ बाह्य आविष्कार आहे असेच मानावे. हा बाह्याविष्कार कोणत्याच योग्यार्थानि त्या क्षेत्राचे केंद्र, त्याचा गाभा किंवा त्याचे अंतःकरण होऊ शकणार नाही, इतकेच नव्हे तर त्या क्षेत्राचा तो सर्वात महत्त्वाचा आविष्कार आहे असेही म्हणता येणार नाही. तरीही, तो अशा प्रकारचा एक आविष्कार आहे, की त्याचे अगदी विश्वसनीयपणे नाही तरी, अगदी सुलभपणे केवळ दृष्टिक्षेपाने वर्णन करता येते. म्हणून, अशा आविष्काराचे महत्त्व आपण प्राथमिक पर्यविक्षणापुरते मान्य केलेच पाहिजे, कारण त्यावेळी विस्तृत क्षेत्रांच्या निरीक्षण करण्याच्या पद्धतींचीच गरज असते. पण, काळजीपूर्वक करावयाच्या तपशीलवार निरीक्षणाच्या प्रयत्नाला आपण लागतो तेव्हा –अशावेळी तापमापक,पर्जन्यमापक, लोकसंख्येचे आकडे हे जवळ पाहिजेतच, आणि नको काय ! –दृश्य–आविष्कारांपासून अपवर्तन करण्यास काहीच हरकत नाही.

निरीक्षणाच्या अन्य काही साधनांनी काही कारके त्या क्षेत्रात उपस्थित असल्याची माहिती करून दिलेली असते. पण, त्यांचे अस्तित्व त्या प्रत्यक्ष भूदृश्यात उघडपणे दिसत नाही. ती कारके त्या क्षेत्रापुरती अर्थवाहक नाहीत याचा पुरावा म्हणून हीच वस्तुस्थिती सादर करणे शक्य नाही. अशा स्थितीत प्राथमिक पुराव्यावरून येवढाच निष्कर्ष आपल्याला काढता येईल की, कोणतेही भूदृश्य हा त्या क्षेत्रातील अंतर्भूत वस्तूंचा परिपूर्ण कोश नव्हे. दृश्य प्रतिनिधित्व न लाभलेली ही रूपे महत्त्वपूर्ण आहेत अगर नाहीत हे त्याचे अन्य रूपांशी असलेल्या संबंधांची परीक्षा करूनच ठरविणे शक्य होईल. वर्षाच्या निरनिराळ्या ऋतूत असलेले त्या क्षेत्राचे गोचर तपमान हा त्या क्षेत्राचे एक लक्षण असते आणि त्या प्रदेशातील मानवांच्या दृष्टीने विशेष महत्त्वाचे असते. आता हे लक्षण भौगोलीक आहे काय असा प्रश्न विचारणे म्हणजे आपलेच ज्ञानदारिद्र्य प्रकट करण्यासारखे आहे. पण, हे क्षेत्रीय लक्षण महत्त्वपूर्ण असूनही त्या दृश्य-भू-भागात त्याला कोणतेही स्थान असत नाही. परिपाठानुसार,

असे म्हणणे चुकीचे दिसत नाही की, भूभागांच्या केवळ दृश्यरुपांच्या आणि ते निर्माण करणाऱ्या कारकांच्या निरीक्षणाच्या मर्यादेने बांधलेल्या कोणाही अभ्यासकाला प्रत्यक्ष तापमान आणि गोचर तापमान यांतील फरक तपासून पहाण्याचा कधी प्रसंगच येणार नाही. अभ्यासासाठीच म्हणून ज्याने कधी रिओग्रांडे नदी ओलांडलीच नाही, किंवा दुसऱ्या कोणत्या खंडात जाऊन अभ्यास केला नाही, त्याला दक्षिण अमेरिकेच्या कोणत्याच दृश्य भूभागात तेथील राजकीय भूगोलाचा कोणताच महत्त्वाचा आविष्कार दिसून येणार नाही. संयुक्त संस्थानांच्या क्षेत्रात दिसणारा भेदांचा अभाव ही सर्वत्र आढळणारी परिस्थिती आहे असा ग्रह अभ्यासकाने करून घेऊ नये. नाहीतर, इंग्लिश व फ्रेंच संस्कृतींच्या क्षेत्रांतील दृश्य-भू-भागामधील भेद, तसेच पश्चिम युरोपीय आणि पूर्व युरोपीय संस्कृतींच्या क्षेत्रातील भेद किंवा संयुक्त संस्थानांच्या आणि मेक्सिकोच्या संस्कृतींच्या क्षेत्रांतील भेद हे वरील अभेदांच्या तुलनेने पहाता, एखाद्या अपरिचित बाह्यकारकाने निर्माण केलेल्या विसंगतीचे द्योतक ठरतील. उलटपक्षी संयुक्त संस्थानांच्या भूदृश्यातील सांस्कृतिक रूपांची सापेक्ष एकरूपता ही भूदृश्यात्मक घटनाच अपवादात्मक आहे असे मानणे योग्य ठरणार आहे. त्याचे कारण असे, हे संपूर्ण क्षेत्र सुसंस्कृत मानवाने एकच एक राजकीय एकक म्हणून विकसित केलेले आहे. पण, राजकीय एकक ही अशी एक क्षेत्रीय वस्तुस्थिती आहे की, राजकीय या नावाचा हा उघड अभावात्मक आविष्कार वगळला, तर केवळ भूदृश्य-अभ्यासकाला तत्संबंधी अन्य कोणताच आविष्कार तेथे आढळणार नाही.

म्हणून याबाबत आमचा निष्कर्ष असा की भूगोलाच्या क्षेत्रवर्णनात्मक संकल्पनेतून कोणत्याही एका विशिष्ट प्रकारच्या घटना वगळण्याची जरूरी नाही. उलट, भूपृष्ठावरील क्षेत्राचा पूर्णांशाने अभ्यास करावयाचा असेल तर, भूगोलाभ्यासकाला अनेक प्राकृतिक घटनांबरोबरच अनेक सांस्कृतिक घटनांचाही अभ्यास करावा लागेल. पण, घटनांच्या या दोनही गटांपैकी कोणत्याही एकाला किंवा सर्वसाधारणपणे घटनांच्या कोणत्याही एका विशिष्ट प्रकाराला, अग्रक्रम अथवा उच्च श्रेणी देण्याइतका तर्कसिद्ध आधार क्षेत्राभ्यासकाजवळ असत नाही. अर्थातच, क्षेत्रीय भेदांचा अभ्यास करत असताना क्षेत्रीय भिन्नतेच्या दृष्टीने महत्त्वाची असलेली सर्व रूपधेये एकाच पातळीत असतात. हे महत्त्व निश्चित कसे करावे, हे आपण पुढच्या एका प्रकरणात पाहू.

## इ-या मर्यादाबंधाचे व्यावहारिक परिणाम

आतापर्यंतच्या आमच्या परीक्षणातून दोन गोष्टी सूचित झालेल्या आहेत. ' भौगोलिक अभ्यास, इंद्रियांनी परीक्षण करता येण्यासारख्या वस्तूंपुरताच मर्यादित असावा या तत्त्वाला तर्काचा आधार नाही अथवा या विषयाच्या इतिहासाचाही आधार नाही. शिवाय, आपल्यापरीने एकजिनसी व परिपूर्ण असू शकेल असा भूगोलक्षेत्राचा मध्यवर्ती विषय मर्यादित करण्यास लागणारा आधारही त्यातून मिळत नाही. प्रत्यक्ष दृश्य भू-भागापुरता मर्यादित,

म्हणजेच बाह्य भूपृष्ठापुरता मर्यादित असा एकीकृत अभ्यास विषय ' मानव आपल्या परिसराचा केवळ निरीक्षक आहे ' या भूमिकेतूनच अर्थपूर्ण ठरू शकतो. पण, तो अन्य विशेष प्रकारांनीही निरीक्षण करत असल्यामुळे अशा प्रकारचा अभ्यास हा अशा संवेदनांचे उगमस्थान जो मानव त्याचे व त्या क्षेत्राचे अन्योन्य संबंध काय असतात ते दाखविणाऱ्या त्या क्षेत्राच्या परिपूर्ण अभ्यासाचा फक्त एक भाग, अर्थात या बाबतीपुरता एक प्रमुख भाग, होऊ शकतो. हेटनरने अशा प्रकारच्या भूगोलाचे " सौंदर्यबोधक्षम भूगोल " एक स्वतंत्र दालन म्हणूनच वर्गीकरण केले आहे. या शाखेचा मानसशास्त्राशी निकटचा संबंध आहे हे उघड आहे. तरीही तो अभ्यास, या कि त्या, कोणत्या क्षेत्राच्या कक्षेत बसविणे योग्य आहे हे ठरवत बसण्याची व्यवहारदृष्ट्या काही गरज आहे, असे वाटत नाही.

आधुनिक काळाच्या अगदी सुरुवातीच्या काळापासून काही थोडे भूगोलकार या प्रकारच्या अभ्यासांकडे आवडीने लक्ष देत आले आहेत, ही गोष्ट खरी आहे. हंबोल्टने वस्तुनिष्ठ दृष्टिकोणातून म्हणजे त्यांच्यामुळे निर्माण होणाऱ्या संवेदनांच्या भाषेऐवजी बाह्य घटनांच्या भाषेत त्याचे विवेचन करण्याचा प्रयत्न केला. पण नंतरच्या टीकाकारांनी त्यात त्याला यश आले आहे की काय याबद्दल संशय व्यक्त केला आहे. काही असो; हा सौंदर्य बोधक्षम भूगोल एकूण भूगोलाचाच एक भाग आहे असे हंबोल्ट मानत असे. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरकालातील शास्त्रप्रधान वातावरणामुळे, या क्षेत्रात लक्ष घालणाऱ्यांना फारच थोडे प्रोत्साहन मिळाले. पण, रात्सेल ओपल आणि विशेषकरून विम्मर अशा काही थोड्या भूगोलकारांनी त्याचा विकास करण्याचा प्रयत्न केला. फ्रेड्रिशेनच्या मते तर, या सौंदर्यबोधक अर्थानेच विम्मरने " भूक्षेत्रदृश्यांचा भूगोल " (Landschaftskunde) ही संज्ञा प्रथमच भौगोलिक परिभाषेत समाविष्ट केली. " वर्णनात्मक भूगोल लिहिणारा लेखक हा शब्दांचे माध्यम वापरणारा भूदृश्यांचा चित्रकार अथवा नकाशाकारच असतो ", असे त्यानेच या संदर्भात लिहिले आहे (७४, ९; वॅग्नरचे वार्षिक परीक्षण, ७५ हेही लक्षात घ्यावे).

आधुनिक भूगोलकारांपैकी सर फ्रान्सिस यंगहजबंड हा इंग्रज भूगोलकार भूगोलक्षेत्रातच नैसर्गिक सौंदर्याचा अभ्यास करण्याकडे विशेष लक्ष देत आला आहे. ' निसर्गाचे हृद्गत ' (२३५, Das Herz der Natur) या शीर्षकाखाली त्याचे दोन लेख जर्मन भाषेत प्रसिद्ध झाले आहेत; आणि त्याच्या मूळ व्याख्यानांपेक्षा या लेखांनी इग्लंडपेक्षा जर्मनीतच या विषयाकडे अधिक लक्ष वेधून घेतले आहे. विशेषतः बान्झे आणि व्होल्त्स यांनी अशा प्रकारच्या मार्गाचे अनुकरण केले आहे. भूक्षेत्रदृश्याच्या चित्राचा नमुना म्हणजे एकूण परिसराच्या बाह्याविष्कारांचे प्रतिबिंब असते. ही भूक्षेत्रदृश्यविषयक संकल्पना बान्झेने निश्चयाने व आग्रहाने मांडली आहे (२४६, ४२).

श्लूटर, पासार्ज यांसारखे काही भूगोलकार हे वर्गीकरण मान्य करत नसले, तरी त्यांच्या अनेक टीकाकारांना –फ्रेड्रिक्सेन (२३०), फोगेल (२७१,७) यांचाही समावेश या टीकाकारात होतो– असे आढळून आले आहे की, ज्या दृष्टीकोणाचे ते प्रतिनिधित्व करतात तो सारांशाने

सौंदर्यबोधक दृष्टिकोणच आहे. नकाशांपेक्षा छायाचित्रांचा (तोही हवाई छायाचित्रांचा नव्हे) त्याने केलेला लक्षणीय उपयोग हाच पासार्जच्या बाबतीत तरी या निर्णयाची खात्री पटवण्यास पुरेसा पुरावा दिसतो. त्याने केलेल्या माद्रिदच्या 'नागरी भूदृश्याच्या' अभ्यासात फक्त एक साधा नकाशा –आणि त्यातही क्षेत्रीय विस्तारापलीकडे काहीही दाखविलेले नाही.— वापरला आहे, तर चार चांगली छायाचित्रे वापरली आहेत (३७४) या आपल्या अभ्यासाचा जो आदर्श नमुना त्याने सादर केला आहे, तो एकतीस छायाचित्रे आणि चार विहंगमाकृती यानी सुंदर सजविलेला आहे आणि त्यात फक्त दोन नकाशांचा अंतर्भाव केला आहे त्यापैकी एक साधारण भूरूपदर्शक नकाशाचा भाग होता तर दुसरा इष्ट क्षेत्राच्या एका गौणभागाचा एक लहानसाच रेखांकित नकाशा (२६८).

बान्झे आणि अन्य काही भूगोलकारांनी 'भूगोलात सौंदर्यबोधाचे महत्त्व' या विषयावर केलेली चर्चा हा याच दृष्टिकोणाचा एक फाटा होता. या चर्चेमुळे काहीनी, याच ग्रंथाच्या सुरवातीच्या भागात चर्चेसाठी घेतलेला प्रश्न –'भूगोल हा खऱ्या अर्थाने शास्त्रविषय आहे की कला विषय आहे ?' हा प्रश्न– उपस्थित करण्याची प्रेरणा मिळाली. हेटनरने सौंदर्य बोधक्षम भूगोल एका बाजूला व कलात्मक भूगोल दुसऱ्या बाजूला, हे दोन विषय भिन्न असल्याचे त्याने प्रतिपादन केले (१६१, १५१-५५). यापैकी पहिल्या प्रकारचा भूगोल हा वस्तुनिष्ठच असणे आवश्यक आहे (आणि आम्ही तो कलावंतांच्यावर लादायचा महत्प्रयास केला तरी 'वस्तुनिष्ठ' येवढ्या एकाच कारणाकरता कलावंत ती गोष्ट मान्य करणार नाहीत). दुसऱ्या प्रकारचा भूगोल व्यक्तिनिष्ठच आहे, म्हणजे सारांशाने तो कलात्मक आहे ; आणि म्हणूनच त्या प्रकाराला भूगोलक्षेत्राची एक शाखा करण्याच्या इच्छेने बान्झेचे अनुयायित्व मान्य करण्यास कोणी तयार झाले नाही [७१].

भूगोलावर कोणत्याही एका विशिष्ट नमुन्याच्या निरीक्षणाचे बंधन घातले जाऊ नये. याचा अर्थ, आम्ही ज्या प्रकारे व्याख्या केली तशी भूदृश्याची संकल्पना भूगोलकाराच्या दृष्टीने शून्य किंमतीची आहे, असा होत नाही. एखाद्या क्षेत्रातील दृश्य-भौतिक रूपधेयांवर प्रादेशिक अभ्यासकाचे लक्ष केंद्रित करण्यात मोठेच मूल्य असण्याची शक्यता आहे (C/o फ्रेड्रिक्शेन २३०, १६०). विशेषतः एखाद्या क्षेत्रात प्रवेश करताच त्याच्यासमोर वस्तुस्थितींचा असा काही घोळका उभा रहातो की, नेमकी कोठून सुरुवात करावयाची हे न

---

७१. बान्झेची भूदृश्याचा 'आत्मा' (soul) ही संकल्पना, भूदृश्याच्या सौंदर्यबोधक्षम बाजूशी सर्वसाधारणपणे निगडित असलेल्या कल्पनेपासून फारच दूर गेली होती. या संकल्पनेतून लेखकाला मिळालेल्या मोठ्या स्वातंत्र्यामुळे, लेखकांपेक्षा त्या प्रदेशाशी सुपरिचित असलेल्या लोकांनाच ती अधिक समाधानकारक अथवा मनोरंजक वाटावी, अशा प्रकारची वर्णने करण्याची मोकळीक मिळाली (C/o त्याचे अमेरिकेचे अनुभव ३३०, II, ४७ ff). बान्झेच्या कार्यावरील व मतांवरील अधिक चर्चेसाठी विभाग '४ अ' शेवटी दिलेल्या यादीतील संदर्भ पहा.

समजल्यामुळे तो पार गोंधळून जातो. अशा वेळी जे प्रत्यक्ष समोर दिसते तेथूनच सुरुवात करणे योग्य, हा ठोकळ नियमच उपयोगी पडतो (C/o फिंच २८८). पण अभ्यासकाने आपल्या निरीक्षणांवर तेवढ्यांचीच मर्यादा घातली, तर त्याचा अभ्यास अपुरा राहण्याची शक्यता आहे."[१] उलटपक्षी, अभ्यासाची एवढीच एक कार्यपद्धती आहे असेही ठामपणे म्हणता येणार नाही. उदाहरणार्थ :- ज्या संबंधीची सामग्री प्रत्यक्ष निरीक्षणाने मिळालेली नव्हती अशा लोकवस्तीच्या विभागणीचे तपशीलवार परिक्षण करण्यापासून प्रारंभ करून उत्कृष्ट प्रादेशिक अभ्यास तयार करण्यात आलेले आहेत. तरीही, कोणत्याही भूप्रदेशातील दृश्य वस्तुस्थिति त्या प्रदेशाचे स्वरूप समजण्याच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण असण्याची जास्ती शक्यता असणाऱ्या वस्तुस्थितिसंचात सर्वसाधारणपणे जमा धराव्या, आणि अमूर्त वस्तुस्थितींना भौगोलिक महत्त्व नसण्याची शक्यताच अधिक असते असे मानावे, असा दुसरा ठोकळ नियम गृहीत धरणे उपयुक्त ठरण्यास हरकत नाही. अर्थात, एखाद्या विशिष्ट उदाहरणात याच्याविरुद्ध परिस्थिती सिद्ध होणारच नाही, असे ठामपणे कोणीही म्हणू शकणार नाही.

प्रायोगिक, चिकित्सक अभ्यासाच्या दृष्टीने या ठोकळ नियमांचे महत्त्व काहीही असो, विचारात घ्यावयाच्या घटनांपैकी गाळाव्या कोणत्या व स्वीकाराव्या कोणत्या हे ठरविण्याचा इष्ट मानदंड त्यातून मिळत नाही येवढे खरे. संवेदनक्षम आणि प्रबोधनक्षम घटनाच विचारात घेण्याची मर्यादा घालून –त्यात नेमक्या कोणाचा अंतर्भाव करावयाचा याची व्याख्या करताना तिच्या प्रस्तावकांना आलेल्या अडचणीकडे क्षणभर दुर्लक्ष करून सर्व अभौतिक घटना आपण बगळून टाकल्या, तरीही आपल्याला असंख्य घटना विचारात घ्याव्या लागतील. सर्वसाधारण निकषानुसार त्यांना मूर्त वस्तुस्थितीची मर्यादा घातलेली असली तरी त्यांपैकी निवडक तेवढ्याच उचलण्यास लागणारा वस्तुनिष्ठ आधार त्या व्याख्येतून मिळत नाही. या संकल्पनेचा तर्कनिष्ठ पाठपुरावा करूनच ग्रान्योने विविध रूपधेयांचा आपल्या ज्ञानेंद्रियावर उमटणारा ठसा हाच आधार धरून ही निवड निश्चित केली, हे आपण मागे पाहिलेच आहे. याच आधारावर हवा पाण्याचा मार खाऊन जुनाट झालेले धान्याचे यांत्रिक कोठार काल त्या एकूण भूदृश्यात लक्षात न भरण्याइतके क्षुल्लक वाटले असेल, पण उद्या त्याच दृश्यातली ती सर्व-प्रमुख वस्तू असावी असे वाटण्याची शक्यता आहे. –अर्थात याचे श्रेय त्यावरील धातूच्या नव्या झाकणाला द्यावे लागेल ! – पण, कोणा भूदृश्य चित्रकाराने हे विधान खरे मानले, तरी कोणी भूगोलकार तो भौगोलिक महत्तेचा मानदंड म्हणून मानण्यास तयार होणार नाही, हे गृहीत आहे.

---

७२. हा निष्कर्ष केवळ तात्त्विक विचारांवर आधारलेला नाही. प्रस्तुत लेखकाने "वरच्या सायलेशियाचा औद्योगिक प्रांत" या अगदी मर्यादित क्षेत्राचे प्रयत्नपूर्वक केलेले प्रादेशिक प्रतिपादन हाही त्याला आधार आहे (३३६).

येथे एक गोष्ट सुचवावयास हरकत नाही. भूगोलकार मात्र या सौंदर्यबोधकक्षमते ऐवजी त्या वस्तूंचा क्षेत्रीय विस्तार हेच प्रमाण उपयोगात आणत असतो. ज्या वस्तूंनी ते भूदृश्य सजवलेले असते त्यांचे वर्णन करणे व त्यांचा अन्वयार्थ लावणे हाच भूगोलकाराचा व्यवसाय असतो. म्हणून ज्या वस्तू त्या भूदृश्याचे विस्तारदृष्ट्या सर्वात महत्त्वाचे भाग ठरतात, त्यांचाच त्याने प्रथम विचार करावा, पण असे करणेच तर्कशुद्ध आहे हे दिसत असूनही, परिपाठात मात्र फारच थोडे अभ्यासक या मार्गाचा अवलंब करतात, यालाही काही अर्थ असलाच पाहिजे. आपल्या तात्त्विक चर्चेत श्लूटरने विस्तार हे एक प्रमाण सुचविले असले, तरी सांस्कृतिक भूदृश्याच्या क्रमबद्ध अभ्यासाचा जो नमुना त्याने सादर केला त्यात त्याने एका पुलाची निवड केली. त्याच्याच मतांच्या आधाराने बोलावयाचे झाले तर, हे रूप सांस्कृतिक घटनांतील किमान महत्त्वाच्या रूपधेयांपैकी एक आहे (२४७). शिवाय, आपण पूर्वीच पाहिल्याप्रमाणे क्षेत्रीय विस्ताराने जवळजवळ शून्य असलेल्या सांस्कृतिक रूपधेयांपैकी एक या स्वरूपात मानव अदृश्यच रहाण्याची शक्यता टाळण्याच्या उद्देशाने मानव प्राण्यासाठी त्याने विशेष प्रकारचे विस्तारक भिंग वापरले आहे.

भूदृश्याचा अभ्यास म्हणजे भूगोल या अर्थाने केला जाणारा तर्कवाद आणि प्रादेशिक भेदाभेदांचा अभ्यास म्हणजे भूगोल या अर्थाने केला जाणारा तर्कवाद, या दोहोंमध्ये प्रत्येकाच्या बाजूने श्लूटरने समझोता निर्माण केला आहे, असे दिसते. सुदैवाने, या दोन वादांपैकी दुसऱ्याचा प्रभावच प्रबळ ठरला. शहरांचा विचार करत असतानाही बहुतेक सर्वच भूगोलकार पुष्कळसा असाच निर्णय घेतात. भूपृष्ठाचे अगदीच नगण्य क्षेत्र शहरांनी व्यापलेले असते, तरी ती भूगोलाच्या दृष्टीने महत्त्वाची नाहीत असे कसल्याही तात्त्विक चर्चेत पटविता येण्यासारखे नाही. सापेक्ष क्षेत्रीय विस्ताराच्या मर्यादा बंधांतून ही रूपधेये बचावली आहेत याचे एक कारण सर्व भूगोलकार नगरवासी होते ही वस्तुस्थितीच असण्याची शक्यता आहे. उलटपक्षी, मोठया प्रमाणात विशेषगुण-संपन्न असलेली क्षेत्रे ती केवळ विस्ताराने किरकोळ असतात म्हणूनच अनेकदा दुर्लक्षित रहातात. कारण, विकास कार्यात सघन आणि गुणविशेषाने परिपूर्ण असूनही त्याची भिन्न प्रकृति एकूण भूदृश्यात सहज नजरेत भरण्याची शक्यता नाही.

अशा अभ्यासकांचे खाणीक्षेत्राच्या विशेष स्वरूपाकडे दुर्लक्ष होते आणि तसा कल होणे स्वाभाविकही वाटते. हेच या संदर्भात एक निर्दिष्ट उदाहरण म्हणून लक्षात घेण्यासारखे आहे. जेथे खाणकाम भूमिगत असते तेथे तर त्या भूदृश्यावर झालेले परिणाम अगदीच गौण असतात. प्रत्यक्ष खाण-बोगद्यावरील काही इमारती व जवळचे लोहमार्गांचे फाटे येवढयाच गोष्टी नजरेत भरतात. पण, ज्या क्षेत्रातील बहुतांश लोकसंख्येचे अवधान खाणकामाने वेधलेले असते अशा क्षेत्रांशी परिचित असणाऱ्या अभ्यासकांच्या एक गोष्ट लक्षात येते, की त्या क्षेत्राचे विशेष स्वरूप इतर क्षेत्रांहून –उदाहरणार्थ केवळ शेतीवर अवलंबून असणाऱ्या क्षेत्रांहून– असंख्य प्रकारांनी वेगळे असते. त्या क्षेत्रातून जहाजांतून निर्यात

होणाऱ्या खनिज राशींच्या गणतीने आणि त्याचा परिणाम म्हणून तेथे ये जा करणाऱ्या गाड्यांच्या गणतीने या वेगळेपणाचे मापन करता येते. तरीही त्या क्षेत्राची पुष्कळशी खास लक्षणे अभौतिक असतात, ती सत्य असतात व त्यांना भौगोलिक महत्ता पण असते. तेथील लोकवस्तीचे सामाजिक व नृवंशभेदात्मक स्वरूप, वरकरणी ग्रामीण दिसणाऱ्या या क्षेत्रात कार्यरत असलेल्या श्रमिक-संघटना इतकेच काय, गावातील रस्त्यावरही व्यक्त होणाऱ्या विरुद्ध स्वरूपाच्या सामाजिक वृत्ती या सर्वच गोष्टी तेथील खाणकामाच्या परिणामांच्या रूपाने त्या प्रांताशी निगडित झालेली खास लक्षणे असतात. या क्षेत्रांचे काही खास व विशिष्ट स्वरूप असते, ही वस्तुस्थिती अशा क्षेत्रांच्या त्यांच्या नैसर्गिक महत्त्वाच्या मानाने कितीतरी अधिक, कमी नव्हे, विवेचन करणे आवश्यक आहे. अगदी लोकवस्तीच्या भाषेत बोलावयाचे झाले तरी ही क्षेत्रे जगातील भटक्या जमातींच्या चराऊ कुरण-क्षेत्रांपेक्षा कितीतरी अधिक महत्त्वाची असूनही या कमी महत्त्वाच्या क्षेत्रांच्या तपशीलवार विवेचनात कोठे उणीव पडलेली दिसत नाही."[1]

एखाद्या भूदृश्यातील विविध वस्तूंच्या घोळक्यातून इष्टवस्तूंची निवड करताना अधिक महत्त्वाच्या व कमी महत्त्वाच्या असा भेद दाखविण्यासाठी आधार म्हणून क्षेत्रीय विस्ताराचा निकष लावण्याचा कोणीच प्रयत्न करत असल्याचे दिसत नाही. सर्व भौतिक वस्तू काहीना काही जागा व्यापतातच त्यामुळे त्यांचा अभ्यास सहज होऊ शकतो, ही गोष्ट खरी असली तरी अभ्यास वस्तू स्थिर असाव्यात (immobilia) म्हणजे एकाच ठिकाणी रहाणाऱ्या असाव्यात याही गोष्टीला भूगोलकारांची मान्यता असल्याचे दिसून येते. तात्त्विकदृष्ट्या श्लूटरने घरांच्या प्रकारांचा अभ्यास नियमबाह्य ठरविला असला तरी त्याचे प्रमेय सर्वसाधारणपणे मानणाराही, त्याच्या या तर्कनिष्ठ निष्कर्षाकडे दुर्लक्ष करतात, हाही एक दैवयोगच, ग्रामीण गृहप्रकाराचे मोठे आकर्षक अभ्यास त्यानी सादर केले आहेत. क्षेत्रीय विस्ताराच्या भाषेत बोलावयाचे झाले, तर त्या एकूण ग्रामीण दृश्यात ते अगदीच क्षुल्लक मानावे लागतील. उलटपक्षी, ग्रामीण भूदृश्यांपेक्षा नागरी भूदृश्यांत घरांना कितीतरी अधिक महत्त्व असते, हे उघड आहे. पण, शुद्ध भूदृश्यवाद्यांची हीच उपपत्ती शहरांच्या स्वतंत्र अभ्यासांचे समर्थन करत असल्याचे दिसते. अशा अभ्यासात, कलोनियल, मान्सार्ड, निओस्पॅनिश रीतींच्या गृहरचनांचे शेकडा प्रमाण गटागटाने दाखविणारे नकाशे, इतकेच काय, शहरातील विविध प्रकारच्या पूरण-स्थानकांचा (Filling Stations) भौगोलिक अभ्यास यांचाही अंतर्भाव होतो.

या प्रकारातील सर्वच सूचनांना ' असमंजस ' असे विशेषण लावण्यापेक्षा अधिक महत्त्व कोणी देईलसे वाटत नाही. या सर्व सूचनांचे समर्थन फक्त क्रिफेनच्या एका विधानाने केलेले असावे. त्याने स्वतः केलेल्या गृहप्रकारांच्या अभ्यासाच्या संदर्भातच पुढील विधान केले

---

७३. हा परिच्छेद लेविस् एफ् टॉमस् यांचे " खाण काम क्षेत्राचे भूदृश्य " या लेखाच्या हस्तलिखितावर आधारलेला आहे.

आहे. " ज्या ज्या घटनांचे कर्तृत्व प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे माणसाकडे येते अशा भूप्रदेशांतर्गत सर्व दृश्य घटनांचे स्वरूप, उपपत्ती व वितरण यांचा अभ्यास हाच सांस्कृतिक भूगोलकारांचा प्रमुख विषय आहे." (२९५, १६३). पण त्याने स्वतः प्रत्यक्ष केलेल्या अभ्यासात, आपल्याला गृहप्रकारांचे महत्त्व अधिक वाटते असेच सुचविले आहे. पण, त्यांची उपपत्ती भूदृश्यावर अथवा मूर्त घटनांवर आधारलेली नसून, अमूर्त घटनांच्या म्हणजेच संस्कृतीच्या स्वरूपावर आधारलेली आहेत. तरीही त्याचे वर उद्धृत केलेले वचन आपण मान्य करण्यास हरकत दिसत नाही ; कारण, ते भूगोल हा निरपवादपणे भूदृश्यांचाच अभ्यास आहे या संकल्पनेतून काढलेला तर्कसिद्ध पण आवश्यक निष्कर्ष आहे.

एक निरीक्षणक्षम वस्तुस्थिती या अर्थाने भूदृश्यात वेगवेगळ्या वस्तूंचा (अथवा त्यांच्या पृष्ठांचा) अंतर्भाव होतो. या सर्वांची मिळून होणारी एक पूर्ण वस्तू फक्त सौंदर्यबोधक भाषेतच अर्थपूर्ण असू शकेल. त्या क्षेत्रातील सर्व भौतिक वस्तूंचा त्यात समावेश व्हावा इतकी जरी ही संकल्पना ताणली तरीही वरचे विधान सत्यच आहे, हे यापूर्वीही दिसून आलेले आहे. दृश्य भूप्रदेशाचे भाग म्हणून त्याचा विचार करू लागलो की तत्काल त्या दृश्य भूप्रदेशातून आपण बाहेर जातो आणि मग थोड्या फार विलंबाने अभौतिक कारकांकडे ओढले जातो. शुद्ध भूदृश्यवाद्यांच्या नियमांनी जरी याना परवाना मिळालेला असला तरी त्यांना ते फारसे प्रोत्साहन देत नाहीत, हेही तितकेच स्पष्ट आहे. एखाद्या भूप्रदेशातील ती रूपेही दृश्य आहेत येवढ्याच आधारावर त्या भूप्रदेशातील सर्व दृश्यरूपे समर्थनीय ठरणार असतील, तर भूगोलकाराला तर्कदृष्ट्या त्यातील प्रत्येक वस्तूचा अथवा वस्तू प्रकाराचा, तिचे स्वरूप उत्पत्ती व वितरण या दृष्टिकोणांतून त्या त्या वस्तूच्या अधिकाराने शक्य होईल तेवढाच अभ्यास करणे भाग पडेल. चित्रकार अथवा मानसशास्त्रज्ञ नसल्याने, ते एक चित्र अथवा ती एक पूर्ण संवेदना या दृष्टींनी त्या भूगोलकाराला त्या एकूण भूदृश्याचे काहीच आकर्षण नसते.

वर दिलेले तात्त्विक निष्कर्ष व्यवहारातही तितकेच अर्थपूर्ण आहेत हे स्कॉफील्डच्या टेनेसीतील गृह प्रकारांच्या अभ्यासाने निदर्शित केले आहे. त्याने त्यांचे प्रकारानुसार वर्गीकरण केले आहे. त्यांचा उद्‌गम आणि विकास यांच्या अनुरोधाने त्यांचे परीक्षणही केले आहे. पण, असे करत असतानाही " घरे ही भूदृश्याची रूपधेये आहेत " येवढ्या केवळ वस्तुस्थिती खेरीज त्या रूपधेयाच्या कोणत्याही भौगोलिक महत्तेची सूचना त्या वर्णनातून मिळत नाही (३८७; c/o फायफरची टीका १०९, १२० f).

सर्व आधुनिक भूगोलकारांचे पद्धतितंत्राच्या एका मुद्यावर एक मत असते, कोणत्याही एका प्रकारच्या वस्तूचा स्वरूप, उत्पत्ती व वितरण या दृष्टीने केलेला अभ्यास हा भूगोलक्षेत्राचा भाग मानू नये, तर त्या प्रकारच्या वस्तूंचा अभ्यास करणाऱ्या क्रमबद्ध शास्त्राचा तो भाग आहे असे मानणेच इष्ट आहे. वंटनाच्या अभ्यासाचा भूगोलात अंतर्भाव करण्याचा हव्यास हेटनरने धरला असा काही गैरसमजांवर आधारलेला एक आरोप सॉरने केला (तळटीप क्रमांक ४८ पहा). पण नंतर, स्वतः सॉरनेच ' भूदृश्यांचा अभ्यास

म्हणजे भूगोल ' ही तर्काने त्याच निष्कर्षाकडे नेणारी संकल्पना विकसित केली, हा केवढा दैवदुर्विलास ! गृहप्रकारांचा अभ्यास हाच आपला अभ्यास-विषय असावा असा दावा कोणत्याच शास्त्राने अद्यापपर्यंत केलेला नाही, असे आज आपण अधिकाराने म्हणू शकतो. पण अशा अभ्यासात, भूगोलकारांना थोडे फार जरी यश येत गेले, तरी योग्य दृष्टी असलेल्या अभ्यासकांना त्यातूनच त्या विषयाचा खास अभ्यास करण्याची स्फूर्ती मिळू शकेल. मग, भूगोलाने प्रथम या नव्या क्षेत्राचे दालन खुले केले, पण दुसऱ्याच कोणा शास्त्राने ते आपले म्हणत त्याचा ताबा घेतला, असा आणखी एक प्रकार घडण्याचा संभव आहे. गृह प्रकारांचे भूगोलाभ्यासक मोठ्याप्रमाणात आकाररचना, उत्पत्ती आणि वितरण येवढ्यापुरतेच त्याविषयात लक्ष घालतात. त्यामुळे कला व संस्कृती यांच्या नमुन्यांचा शास्त्रीय दृष्टिकोणातून अभ्यास करणाऱ्या इतिहासकाराच्या अभ्यासात व्यावसायिक भूगोलकार कोणतीच भर टाकू शकत नाही, या लायलीच्या तर्कसिद्ध सिद्धान्ताचे समर्थनच होते (२२०, १३८).[७४]

ज्या अति महत्त्वाच्या वेगळेपणावर आम्ही येथे भर देतो आहोत तोच वेगळेपणा रिटरच्या त्या अभिजात पण थोड्याशा अवघड वाक्यांशातील शब्दांची उलटापालट करून अगदी अचूकपणे मांडून दाखविता येतो. " पार्थिव घटनांनी भरलेल्या भूपृष्ठाच्या क्षेत्राचा अभ्यास म्हणजे भूगोल ". एखादे क्षेत्र स्वकायेने व्यापणाऱ्या भौतिक वस्तूंचा अभ्यास म्हणजे काही त्या क्षेत्राचा अभ्यास नव्हे. म्हणजेच ते वंटनशास्त्र होऊ शकत नाही. कारण, त्या प्रदेशातील सर्वच गोष्टींचा अभ्यास होत नसल्यामुळे ते क्षेत्र विघटित होते व तर्कदृष्ट्या तो त्या क्षेत्रात आढळणाऱ्या भौतिक गोष्टींचा अभ्यास होतो. भूदृश्यातील घटनाशास्त्राचा अभ्यास याचा अर्थ त्या प्रदेशात आढळणाऱ्या वेगवेगळ्या घटनांचा अभ्यास या शिवाय दुसरा काहीच होऊ शकत नाही. यावरून भूदृश्याची रचना, उत्पत्ती, विकास व कार्य यांचा अभ्यास म्हणजेच त्या भूदृश्यातील भौतिक वस्तूंची रचना, विकास व कार्य याचा अभ्यास येवढाच होतो, हे सिद्ध होते.

शुद्ध भूदृश्यवाद्यांच्या पुष्कळशा कार्यात रचना अथवा आकार यावरच केवळ भर देण्याकडे कल असतो, हा त्यांच्या दृष्टिकोणाचा आणखी एक परिणाम आपण लक्षात घ्यावयास हरकत नाही. हा परिणाम अगदी नैसर्गिक आहे; कारण आपले इंद्रिय-प्रतिबोध

---

७४. येथे असाही आक्षेप कोणी घेऊ शकेल, की अशा प्रकारचा निष्कर्ष लायलीने काढलेलाच नाही. पण, कार्लिंगने केलेल्या नार्व्हाच्या अभ्यासावर त्याने केलेल्या चर्चेतून दुसरा कोणता निष्कर्ष काढता येण्यासारखा आहे ? त्याचा त्यानंतरचा प्रश्न आणि त्याला त्याचेच उत्तर यांवरून भूगोलकाराने " कलाविषयाचा इतिहासकार बनावे असा त्याचा निश्चितच हेतू नव्हता " असे सूचित होत असले तरी ते खात्रीलायक विधान नव्हे. कारण, आपल्या अन्य गुणवत्ता कायम राखूनही सांस्कृतिक भूगोलकारांना कलाविषयाच्या इतिहासकाराची भूमिकाही बठविता येते असे सिद्ध झालेले आहे.

केवळ आकारांचेच निरीक्षण करू शकतात. उत्पत्ती, विकास व कार्य ही एकतर वर्तमान आकारावरून अनुमानाने समजून घेतली पाहिजेत –अर्थात ही पद्धत कोणत्याच प्रकाराने विश्वसनीय नसते– किंवा अप्रत्यक्ष पद्धतीने त्यांचे निरीक्षण केले पाहिजे. त्यात अदृश्यच नव्हे तर अमूर्त कारकांचाही अंतर्भाव केला जाण्याची शक्यता ; शिवाय, एखाद्याने थोड्याश्या सातत्याने भूदृश्य या संकल्पनेला चिकटून रहावयाचे ठरविले तर त्या भूदृश्यातील वस्तू या केवळ आकारापुरत्याच त्या एकूण भूदृश्याचे अवयव असतात असे मानावे लागेल. एकूण, यापूर्वीच आपल्याला आढळून आले आहे त्या प्रमाणे, भूदृश्याचा विकास एकाच अभंगरुपाने होत नसतो, तर त्यातल्या वेगवेगळ्या गोष्टी वेगवेगळ्या प्रकारे वाढत असतात.

व्यक्तरुपवर्णनावर लक्ष केंद्रित केले जाते हीही आधुनिक भूगोलाभ्यासकांच्या प्रशिक्षणात भूरुपशास्त्राला दिल्या गेलेल्या महत्त्वाचा, निदान अंशतः परिणाम आहे, असे मानावयास हरकत नाही. भूपृष्ठाचे आकार भूरूपशास्त्रापुढे अनेक प्रकारचे प्रश्न उभे करतात; कारण, प्राकृतिक इतिहासाचे अंतिम स्वरूप या अर्थाने भूरुपाचे स्पष्टीकरण त्याला द्यावयाचे असते. अर्थातच, विविध भूरुपांच्या अन्य पार्थिव रूपधेयांशी असलेल्या कार्यकारी संबंधाकडे फारच कमी लक्ष दिले जाते. हा विरोध विशेषेकरून भौगोलिक निरीक्षणासंबंधी पेंक ने १९०६ मध्ये केलेल्या चर्चेत (१२८), तसेच श्लूटरच्या उत्तरायुष्यातील कार्यात, विशेष लक्षणीय आहे. आताच्या पुष्कळशा भूगोलकारांचे मत मान्य करून भूगोलकाराला भूरुपांच्या उत्पत्तीचे स्पष्टीकरण देण्याच्या जबाबदारीतून मुक्त केले, तर भूरुपांच्या कार्यांकडे सुसंगत लक्ष न देता केलेले भूरुपांचे वर्णन वांझोटे असल्यासारखे दिसेल. श्लूटर, पासार्ज व ग्रान्यो यांच्या कार्यांच्या अनेक टीकाकारांच्या एक गोष्ट लक्षात येऊन चुकली आहे. भूदृश्यातील भूरुपांच्या त्यांनी केलेल्या उत्कृष्ट विश्लेषणाचा तोल भूरुपांच्या कार्याकार्यांच्या आवश्यक तितक्या विवेचनाने –म्हणजेच घटनांच्या अन्योन्य संबंधांच्या विवेचनाने– सांभाळलेला नाही. ( C/o वायबेल २६६ आणि ब्यूर्गर ११,९३). तसेच प्रदेशांच्या भूगोलाचे प्रतिपादन कसे करावे या विषयी फींचने केलेल्या चर्चेत बाह्यरुपांवर अनेक परिच्छेद खर्ची घातले आहे, पण त्यांच्या कार्याबद्दल एकच ओळ लिहिली आहे.

भूगोलाच्या शुद्ध भूदृश्यवादाच्या दृष्टिकोणाचा काटेकोर अर्थ लावायचा झाला, तर कार्याकार्य विचार पूर्णपणे नियमबाह्य ठरण्याची शक्यता आहे. जे कार्य काही विशेष आकाराने स्पष्ट झाले असेल तेवढेच याला अपवाद ठरेल. पण कोणत्याच भूगोलकाराला आपण केलेल्या गोष्टींच्या वर्णनातून त्यांच्या कार्यांचा विचार तेवढा वगळावा अशी कधीच इच्छा होत नाही. त्यामुळेच बाह्यरूप हे त्याच्या कार्याचाही आविष्कार दाखविते असे प्रथमदर्शनीच गृहीत धरणे योग्य असे मानण्याकडे कल असल्याचे सामान्यपणे दिसून येते. उदाहरणार्थ, कारखाना बिऱ्हाडांच्या चाळीपेक्षा वेगळा दिसतो, कोठाराचा आकार

असणारी इमारत रहाते घर असू शकत नाही, इत्यादि. न्यू इंग्लंडच्या शेतमळ्यात उन्हाळ्यात रहाणारे रहिवासी कोठाराचा उपयोग बिऱ्हाडासारखा करताना दिसतील. पण त्यासाठी त्याच्या बाह्यरूपात लक्षणीय असा कोणताच फरक केलेला दिसणार नाही, इतकेच नव्हे तर त्याच्या अंतःस्वरुपातही किरकोळ फरकच केलेले दिसतील. लियान्स या जगप्रसिद्ध रेशीम-केंद्राच्या रस्त्यांतून तासनतास रेशीम गिरण्यांच्या शोधार्थ रपेट करूनही प्रस्तुत लेखकाला त्या सापडल्या नाहीत. आणि शेवटी त्याला असे आढळून आले, रहात्या घरांपासून वेगळ्या ओळखू येणार नाहीत अशा सामान्य इमारतीतच उभारलेल्या यंत्रांवर हा रेशीम माल तयार केला जातो. एकेकाळी याच इमारती रहाती घरे होती आणि आजही आहेत. एवढ्याच एका आधारावर लियान्सच्या भूगोलात रेशीम उद्योग अगदी गौण आहे असे सांगून तो प्रश्न निकालात काढला असता, तर ते समर्थनीय ठरले असते का ? एका प्रश्नावलीला उत्तर देताना कोल्बीने लिहिले आहे की " काही महत्त्वाचे मानवी उद्योग व्हिक्टोरीया कालखंडातील इमारतीत चालले आहेत. या ठिकाणीही आतील संस्थेचे महत्त्व त्या घरांच्या मान्सार्ड प्रकाराच्या छपरावरून ठरवावयाचे की काय ? (तळटीप १०१ पहा).

विशेषेकरून नागरी भूदृश्यात बाह्याकार अंतर्गत कार्याचे योग्यसूचक असतात असे मानणे अनुचित आहे, असे मत वायबेलने व्यक्त केले आहे. चांगला प्रशिक्षित नगर-भूगोलकार व्यापार-प्रधान शहर आणि उद्योग-प्रधान शहर या दोहोंच्या दृश्य स्वरूपातील फरक लक्षात घेण्याइतका तरबेज असलाच पाहिजे, हे निःसंशय. पण, या फरकाचे अंशात्मक मापन करणे अत्यंत अवघड आहे –कारण, सगळीच शहरे अंशतः दोनही प्रकारची असतात. बाह्य स्वरूपात कोणताच फरक न करता एखाद्या माल-गुदामाचे रुपांतर कारखान्यात करणे शक्य आहे ; किंवा याच्या उलट प्रकार होण्याचीही शक्यता आहे. या कार्यात झालेल्या बदलाला त्या शहराच्या जीवनात बरेच महत्त्व आले असण्याचा संभव आहे. थोडक्यात डिकिन्सन म्हणतो त्याप्रमाणे " कार्य व आकार हे सुसंवादी असतातच असे नाही " (२०२, ६).

सुदैवाने कार्याचे महत्त्व इतके स्पष्ट असते की ते व्याख्येच्या मर्यादांवर मात करताना नेहमीच दिसते. भौतिक गोष्टींच्या मर्यादेला अगदी काटेकोरपणे चिकटून रहाणारे भूगोलकारही नगरांच्या विवेचनात क्षेत्रीय रचनांचे विश्लेषण प्रथमतः कार्यांच्या भाषेत करण्यास चुकत नाही. इमारतीच्या प्रकारांच्या भाषेतील त्या रचनांच्या विश्लेषणाकडे ते नंतर वळतात, याचे श्रेय कदाचित नागर, नगर-भूगोलावर दिसणाऱ्या नगर-रचनाकारांच्या प्रभावालाच द्यावे लागेल (३२२; ६३३; ३२१, १८७ ते ८९).

भूगोलाच्या भूदृश्यसंकल्पनेमुळे कार्यापेक्षा आकारावर भर देणाच्या दिशेने प्रयत्न होणे साहजिकच आहे. हा भर वस्तूंच्या विवेचनापुरताच मर्यादित नसतो, तर तो वस्तुसंयोगांच्या विवेचनातही दिसून येतो. ' आकृतिबंधा ' संबंधी प्रचलित उत्साह हे भूगोलक्षेत्रातील एक

अगदी नवे ' वेड ' आहे असा छाप काही टीकाकारांनी, अर्थात तोंडी चर्चेत मारलेला आहे. प्रस्तुत लेखक आकृतिबंधांची महत्ता नाकबूल करणाऱ्यांपैकी नव्हे. असे आढळून आले आहे की कोणत्याही आकृतिबंधाचा अंतर्बाह्य अभ्यास –उदाहरणार्थ शहरांतील रस्त्यांच्या आकृतिबंधांचा अभ्यास– केल्यास त्यांच्या विकासाच्या मूलभूत कारकांसंबंधी काही अर्थपूर्ण निष्कर्ष काढता येतात. आपल्याच देशातील मिनेपोलिस या शहराच्या बाबतीत (३५४) आणि अपर सायलेशियातील युरोपीय शहरांच्या बाबतीत (३५६) या विधानाचा पडताळा लेखकाला आलेला आहे. (दुसऱ्या बाबतीत जे निष्कर्ष काढता आले त्याला प्रेस्टन् जेम्स यानी घेतलेला ' एखाद्या शहराला आकृतिबंधच नसतो ही गोष्ट अशक्य कोटीतील आहे ', हा आक्षेप कारणीभूत झाला, ही गोष्ट कबूल करणे न्यायाला धरूनच होईल.). हिस्पॅनिक अमेरिकेच्या दूरवर पसरलेल्या प्रातांतील वसाहतींच्या आकृतिबंधाचा अभ्यास करून एक लेखमाला प्लाटने लिहिली. विशेषतः कार्यांतील फरक समजण्याचा एक मार्ग या नात्याने आकृतिबंधांच्या अभ्यासाचे महत्त्व वरील लेखमालेने दाखवून दिले आहे. (यातील वेगवेगळ्या अभ्यासांची यादी २२१, १३ तळटीपेत पहा).

उलटपक्षी त्यांची अधिक चिकित्सा न करताच आकृतिबंधांचे प्रतिपादन करणे म्हणजे त्यांच्या अगदी सरळ व अगदी स्थूल स्वरूपाचे वर्णन करण्याचा प्रकार आहे. प्रतिपादित आकृतिबंध सखोल अभ्यासाच्या दावणीला बांधल्याखेरीज त्यात काही महत्त्वाचा अर्थ भरलेला आहे, याविषयी वाचकाची खात्रीच पटणार नाही. काही घटना नकाशाचे विस्तृत क्षेत्र व्यापतात आणि ' शोभाकृतीत ' रस घेणाऱ्यांचे लक्षही वेधून घेतात. दुसरा एक घटनासमुच्चय असा असतो, की त्या घटना कमी महत्त्वाच्या असतात या नावाखाली आपल्याला त्यांच्याकडे दुर्लक्ष करणे भाग पडलेले असते, येवढ्याच वस्तुस्थितीच्या आधारावर दुसऱ्या घटनांच्या तुलनेने पहिल्या प्रकारच्या घटनांचे महत्त्व अधिक असते असे सिद्ध होत नाही. उदाहरणार्थ पश्चिम ओहायहोच्या लोहमार्गांचा आकृतिबंध काही अंशी तिकडील व्यापारी केंद्राचे स्थान सूचित करतो. या आकृतिबंधाचे सर्वात मोठे आणि उघड दिसणारे लक्षण म्हणजे, हे लोहमार्ग सर्वच दिशांनी धावताना दिसतात, हे होय. –अर्थातच हे तेथील भूपृष्ठाच्या स्वरुपाचे चित्रच आहे. पण, याच मार्गांवरून होणाऱ्या मालाच्या वाहतुकीसंबंधी आकडेवारी मिळविता आली आणि त्या प्रमाणात जाडी दाखविलेल्या रेषा काढून याच मार्गांचा नकाशा तयार केला, तर मिळणारा आकृतिबंध त्या क्षेत्रातील ग्रामीण केंद्रे आणि नागरी केंद्रे यांच्या अन्योन्य संबंधाचा अन्वयार्थ लावण्याच्या दृष्टीने खूपच अधिक अर्थपूर्ण ठरेल. विशेषे करून क्लव्हलंड-पिटस्बर्गचे दगडी कोळसा व पोलाद-क्षेत्र व अटलांटिक किनारा एका बाजूला आणि एरी सरोवर व उत्तरेकडील खंडांतर्गत प्रदेश दुसऱ्या बाजूला या दोहोंचा त्या एकूण क्षेत्राशी असलेला संबंध समजण्याच्या दृष्टीने तोच आकृतिबंध अर्थपूर्ण ठरेल.

दुसऱ्या शब्दात, परस्पर संदर्भातील विविध स्थळांच्या सापेक्ष स्थानांतील अर्थपूर्ण संबंध ज्या विस्ताराने त्यात चितारलेले असतात त्यावर त्या आकृतिबंधाचे महत्त्व पूर्णतया अवलंबून असते. म्हणूनच शुद्ध भूदृश्यवाद्यांच्या पुष्कळशा कार्यात या विशिष्ट बाजूकडे

वारंवार दुर्लक्ष केले जाते, असे अनेक टीकाकारांना आढळून आले आहे. हे लेखक क्षेत्रीय संबंधांचा उल्लेख करण्याकडे नेहमीच दुर्लक्ष करतात असे म्हणता येणार नाही, येवढे निश्चित. पण भूगोलकारांनी आपले लक्ष फक्त मूर्त, भौतिक वस्तूंवरच केंद्रित केले पाहिजे या गोष्टींवर सतत भर दिला गेल्यामुळे सापेक्ष स्थान दर्शविणाऱ्या शुद्ध भौमितिक कारकाचे महत्त्व किमान असते असे समजण्याकडे स्वाभाविकच कल होतो. तरीही, इतर कोणत्याही घटकांपेक्षा हा विशिष्ट घटक आपल्या वेगळेपणामुळेच भौगोलिकदृष्ट्या अधिक महत्त्वाचा आहे, या बाबतीत अन्य पुष्कळशा भूगोलकाराचे ब्यूर्गरशी एकमत आहे. (११, ३०).

भूदृश्य संकल्पनेचा अवलंब केलेल्या अनेक लेखकांच्या ग्रंथात उपरिनिर्दिष्ट दोषांची उदाहरणे सापडण्यासारखी आहेत. निदान प्राकृतिक भूगोलात सापेक्षस्थानाच्या संकल्पनेचे महत्त्व अगदी गौण आहे, असे विधान श्लूटर करू शकला तोही याचाच परिणाम (१२७, १३ f). सॉरच्या " विविध कार्यकारी आकृतीत " सापेक्ष स्थानाला मुळीच महत्त्व दिलेले नाही; इतकेच नव्हे तर, तदनुषंगिक अभ्यासलेखांतूनही, म्हणजे त्यांच्या प्रत्यक्ष विवेचनात वा त्याला जोडलेल्या काही थोड्या नकाशांतही या कारकाचे महत्त्व सूचित केलले नाही. (३८२-८४) तसेच डिकिन्सन्ची टीका (२०२, ७). त्याचप्रमाणे " ग्रान्योच्या लिखाणातही सापेक्ष-स्थानसंबंधांना (Lagebeziehungen) पूर्णपणे फाटा दिलेला दिसतो " असे वायबलने दाखवून दिले आहे ते बरोबरच आहे. (२६६, २०४).

पासार्जच्या कृतींबाबतही हीच गोष्ट खरी आहे. " पृथ्वीवरील स्वाभाविक प्रदेशांचे पट्टे " (Die Landschafts gürtel der Erde) या त्याच्या ग्रंथात ' भूदृश्यपट्ट्यांचे ' त्यांतील ' सांस्कृतिक भूदृश्यांसह ' मोठे परिणामकारक वर्णन केलेले आहे; इतकेच नव्हे तर, त्यांचे काही तपशीलासह स्पष्टीकरणही दिले आहे. पण त्यातील सांस्कृतिक भूदृश्यांच्या सापेक्ष-स्थानांचा विचार अन्योन्य संबंधांच्या दृष्टीने अथवा सागर सान्निध्याच्या दृष्टीने जवळजवळ मुळीच केलेला नाही. (३०५). नगरांचा विकास हा देखील प्रामुख्याने सरळसरळ स्थान-विषयक प्रश्न असल्यासारखे दिसते – बंदर, नदी उतार अथवा सोइस्कर रीतीने नदी ओलांडण्याचे ठिकाण, खनिज संचय इ. (९८ ff). त्यानेच पुढे ठेवलेल्या नमुन्यानुसार निर्णय घ्यावयाचा झाला, तर मर्यादित क्षेत्रांच्या अभ्यासाच्या म्हणजेच प्रादेशिक भूगोलाच्या (Landschaft Kundlische) पद्धती बाबतही हीच गोष्ट खरी असली पाहिजे. प्रस्तुत नमुन्यात नकाशांचा फारच तुरळक उपयोग केला असल्याचे आम्ही यापूर्वीच निदर्शनास आणले आहे. इटलीच्या प्रवेश मार्गावर असलेल्या अडिग नदीच्या एका उपनदीचे खोरे म्हणून असो, मोठ्या ब्रेन्नर मार्गाने किंवा रेशेन-शायडेक मार्गाने उत्तर टिरोलमार्गे एकूण युरोपीय क्षेत्राशी प्रस्थापित झालेले अधिक महत्त्वपूर्ण संबंध यादृष्टीने असो, यांपैकी कोणत्याच संदर्भात प्रांताच्या सापेक्ष स्थानाचा यत्किंचितही विचार न करता दक्षिण टिरोलमधील मिरान भोवतालच्या सांस्कृतिक भूदृश्यांचा तपशीलवार अभ्यास करता येतो, असाच सदरच्या ग्रंथाचे काळजीपूर्वक परीक्षण करणाऱ्याचा ग्रह होण्याची शक्यता आहे. (c/o ट्रोल याचे परीक्षण व चर्चा २६८).

दृष्टिकोनातील बदलाच्या परिणामाचे एक नजरेत भरणारे उदाहरण म्हणून, मार्क जेफरसनने तयार केलेल्या, लोहमार्गांशी सान्निध्य दाखविणाऱ्या सर्वश्रुत नकाशांचा जेम्स आणि फींच-ट्रवार्था यानी घेतलेल्या उपयोगाचे देता येईल. मूळ अभ्यास ग्रंथात जेफरसनने आपल्या नकाशांना " लोहमार्गापासून दहा मैलाच्या अंतरात असलेले युरोप " असे साधेच शीर्षक दिलेले आहे. (२६६). (अशी क्षेत्रे पांढऱ्या रंगाने दाखवून दूर असणारी क्षेत्रे पांढऱ्या पार्श्वभूमीवर दाखविलेली होती). त्याच्या ग्रंथावरून असे स्पष्ट होते की काही क्षेत्रांचे सान्निध्य तर काही क्षेत्रांची दूरता यांतील विरोध त्याला विशेष करून लक्षात घ्यावयाचा होता. जेम्सने या नकाशांची ओळख आकृतिबंधांचे नकाशे अशी करून दिली असली, तरी घनतेखेरीज दुसऱ्या कोणत्याच संदर्भात त्या आकृतिबंधांचे महत्त्व त्याने सूचित केले नाही; नाही म्हणावयास थोड्याप्रमाणात सान्निध्याचे महत्त्व त्याने सूचित केले आहे (३२१, १८३ ते ८५). फींच आणि ट्रेवार्था अधिक काटेकोरपणे तर्कनिष्ठ असल्यामुळे त्यांनी या नकाशांना " घनता आणि लोहमार्गांचे आकृतिबंध " असे एक निराळेच शीर्षक दिले आहे, कारण लोहमार्गांच्या या लक्षणांशीच भूगोलकाराचा संबंध असतो. (३२२, ६५६). प्रत्यक्षात, जेफरसनच्या या नकाशांतून घनतेचे अगदीच त्रोटक दिग्दर्शन झालेले आहे, कारण ज्या क्षेत्रांत लोहमार्ग चांगले विकसित झालेले आहेत अशी क्षेत्रे वेगळी दखविण्याची सोय या नकाशात नव्हती. ही गोष्ट जेफरसनलाही कळून चुकलेली होती. अशा विकसित क्षेत्रांत –यात बहुतेक सर्व पश्चिम युरोप व पूर्व यू. एस. ए. यांचा समावेश होतो– कोणत्याही वेगळ्या प्रकारचे आकृतिबंध असल्याचे दिसून येत नाही. लोहमार्गांच्या सर्वसाधारण नकाशांतही यापेक्षा कितीतरी चांगले आकृतिबंध दाखविले असतात. खरे पहाता, जेफरसनचे नकाशे हे लोहमार्गांचे नकाशे नव्हतेच. त्यानेच दिलेल्या शीर्षकाप्रमाणे पहाता ते लोहमार्गांच्या संदर्भात निश्चित स्थान प्राप्त झालेल्या क्षेत्रांचे नकाशे होते. आता हे स्वरूप अदृश्य आहे अभौतिक आहे म्हणून भूगोलकारांनी त्याकडे दुर्लक्ष करावयाचे काय ? अर्थशास्त्रज्ञांनी लोहर्गांच्या घनतेचा खूप पूर्वीपासून विचार केलेला आहे आणि रिप्ले सारख्यांनी तर त्यांच्या आकृतिसंबंधी अंदाजही बांधले आहेत (३८१). पण, सान्निध्यदर्शक नकाशे काढण्याची कल्पना फक्त भूगोलकारच विकसित करू शकला असता. रस्त्यांच्या आणि लोहमार्गांच्या संदर्भात अन्य क्षेत्रांतील अभ्यासकांनीही ते नकाशे विस्तृत प्रमाणात स्वीकारले आहेत, आणि निदान एका युरोपीय नकाशा संग्रहात त्यांना यापूर्वीच स्थान देण्यात आले आहे. या गोष्टी त्यांच्या मागील कल्पनेच्या मूल्यांचे निर्देशक आहेत.[७५]

---

७५. " जेफरसनच्या नकाशांचा हा प्रत्यक्ष परिणाम पहा " असे सांगून, प्रस्तुत लेखकाने प्रकाशित केलेले दोन नकाशे (३५६) गाइजलरने आपल्या " अपर सायलेशियाचा नकाशासंग्रह " (Oberschlesien Atlas ब्लाट, १८ (३४६) या नकाशासंग्रहात पुनर्मुद्रित केलेले आहेत (३५५) तसेच राल्फ ब्राऊन याचा " वहातूक मार्गापासून १० मैलापेक्षा अधिक अंतरावर असलेली क्षेत्रे " या नावाचा नकाशा अटलांटिक किनारपट्टीच्या संदर्भात १८०० च्या सुमारास प्रसिद्ध झाला होता, तोही पहावा (३३४, २२८).

वस्तूंच्या कार्यांचा विचारही न करता, केवळ आकाराच्या परिभाषेत एखाद्या क्षेत्रातील वेगवेगळ्या वस्तूंचा अभ्यास केला, तर एक क्षेत्रीय घटना या स्वरूपात त्यांचे अर्थपूर्ण रीतीने संकलन करण्याचे कामी अडथळे निर्माण होतात. तसेच, भिन्न स्थान प्राप्त झालेल्या रूपधेयांच्या सापेक्षस्थानांचा एकमेकांच्या संदर्भात विचार न करताच, त्या भूदृश्याच्या रचनेचा अथवा व्यक्त रुपवर्णनाचा अभ्यास केला, म्हणजेच कोणत्याही आकृतिबंधांच्या अंगभूत कार्याच्या अप्रकट कारकांचा अभ्यास केला नाही, तर एक बांझोटे भूरुपशास्त्रीय वर्णन निर्माण होईल. वरील दोनही गोष्टी सर्वसाधारणपणे एकसारख्या आहेत, असे आपणास म्हणावयास हरकत नाही. वस्तूंचा फेरविचार करण्याची किंवा त्या क्षेत्रातील सर्व प्रकारच्या, म्हणजे यापूर्वी कधी अभ्यासपात्र असल्याचे कोणाच्याही लक्षात आलेले नव्हते अशा प्रकारच्या ' वस्तूंही ' भूरूपशास्त्रीय विश्लेषणास पात्र होतील अशा रीतीने त्यांचा फेरविचार करण्याची, आधुनिक भूगोलातील प्रवृत्ती याविषयावर क्रौवीने भाष्य केले आहे. (२०१, २).

एक गोष्ट वाचकांच्या खासच लक्षात येईल की ज्यांना फक्त भौतिक वस्तूंचा –म्हणजे प्रत्यक्षपणे इंद्रियगोचर असणाऱ्या वस्तूंचा– विचार करावयाचा असतो अशा अभ्यासकांच्या सर्वच युक्तिवादांत भौतिक शास्त्रांचे वारे गुप्तरुपाने खेळत असते. भौतिक गोष्टी विशेषे करून दृश्य वस्तू या अशा स्वरुपाच्या घटना असतात, की भौतिक शास्त्रांचे प्रशिक्षण घेतलेल्या विद्यार्थ्यांना त्या कशा हाताळाव्यात ते कळत असते. अशी पार्श्वभूमी असणारे भूगोलकार, त्यात आजच्या बहुतेक सर्वच भूगोलकारांचा समावेश होतो, अशा निश्चित इंद्रियगोचर असलेल्या गोष्टींचाच अभ्यास करण्यात आला पाहिजे ही गोष्ट साहजीकच अधिक मान्य करणार. जेथे अभौतिक वस्तूस्थितींचा परिणाम भौतिक वस्तूंवर होत असतो तेथे आवश्यक असेल तर अभौतिक वस्तुस्थितींना मोठ्या नाखुषीने अशा अभ्यासात प्रवेश दिला जातो. त्यांना प्रवेश देण्यामागचा हेतू स्पष्ट असल्यामुळे त्याचा जितका कमी विचार करावा तितका बरा. विशेषतः एखाद्या क्षेत्राचा विचार त्याचा आकार व त्याचे दृश्यस्वरुप येवढ्या पुरताच मर्यादित केला, तर कोणत्या घटना महत्त्वाच्या आहेत याचा निर्णय करणे अधिक सोपे होते. प्रत्यक्षात आपल्याला असे दिसून आले की भूगोल म्हणजे भूदृश्याचा अभ्यास किंवा त्या क्षेत्रातील केवळ भौतिक वस्तूंचा अभ्यास या संकल्पनेतून अभ्यासासाठी निवडावयाच्या घटनांचा उपयुक्त मानदंड हाती लागत नाही. त्यामुळेच ज्या ज्या दृश्य गोष्टी अभ्यासकांचे लक्ष वेधून घेतील त्या सर्वच गोष्टी ते अभ्यासासाठी निवडतात, असे दिसून येते.

शास्त्रीय सामग्रीची कायिक तत्त्वावर काटेकोर विभागणी करण्याची निसर्ग शास्त्रांच्या अभ्यासकाला सवय लागलेली असते. त्यामुळे कोणत्याही क्षेत्राच्या स्वरुपाच्या दृष्टीने अर्थपूर्ण गोष्टी कोणत्या याचा निर्णय घेणे हे अगदीच अनिश्चित असल्यासारखे वाटते,असे ब्यूर्गर म्हणतो. म्हणून कोल्बी म्हणतो की " ते दिसते कसे याला महत्त्व नसून ते आहे कसे याला महत्त्व आहे ". एखादा क्रान्तिक दृष्टीचा अभ्यासक या अनिश्चिततेवर मात करील आणि त्या त्या विशिष्ट परिस्थितीत काय महत्त्वाचे आहे आणि काय नाही याचा निर्णय घेऊ शकेल. पण, जो स्थूल दृष्टीचा आणि बाह्यकार-संतुष्ट असेल, जो आपल्या भूदृश्याच्या

अभ्यासात पूर्ण रंगून जात नसेल, ज्याचा त्याला प्रत्यक्ष अनुभवच आला नसेल, तो अभ्यासक मात्र शक्य असेल ती वस्तू प्रादेशिक महत्त्वाची आहे असे समजून तिचे वर्णन करण्याच्या प्रयत्नाला निश्चितच बळी पडेल. पण, अशांची दखल पद्धतिशास्त्राने घेऊ नये. (११, ८९).

अनेक अभ्यासक एका बाजूने भूदृश्य संकल्पनेवर तात्त्विक निष्ठा असल्याचे जाहीर करतात आणि दुसऱ्या बाजूने त्या एकूण क्षेत्राच्या स्वरूपाच्या संदर्भात ज्यांची गुणवत्ता अमूर्त संस्कृतीच्या भाषेतच मुख्यतः महत्त्वाची असते उदाहरणार्थ- वसाहतींचे प्रकार व घरांचे प्रकार- अशा रुपधेयांचाही अभ्यास करण्याचा प्रयत्न करतात, हा आत्मविरोधाचाच प्रकार नव्हे का ? ती त्या भूप्रदेशाची दृश्यरुपे आहेत म्हणूनच केवळ आपण त्याचा अभ्यास करतो असा त्यानी दावा केला काय किंवा आपण सांस्कृतिक भूगोलाचाच अभ्यास करण्याचा प्रत्यक्ष प्रयत्न करत आहोत अशी मान्यता त्यानी दिली काय, वाचक काही त्यामुळे फसणार नाहीत. ते अभ्यासासाठी आता संस्कृतीच्या मागे धावत आहेत, ही गोष्ट वाचक तेव्हाच ओळखतात.

काही भूगोलकारांच्या मते, त्यांच्या महत्त्वाच्या दृष्टीने हे पोटविषय गौण आहेत, पण इतर काहींच्या मते त्यानाच जवळजवळ प्राथमिक महत्त्व दिले पाहिजे, असे दिसते, अलीकडेच भरलेल्या एका सांस्कृतिक भूगोलविषयक गोलमेज परिषदेत वाचल्या गेलेल्या आपल्या अभ्यासलेखात फ्रेड् बी. क्निफेन यानी विविधप्रकारच्या व वेगवेगळ्या इमारतींच्या अभ्यासाचा, सांस्कृतिक भूगोलकाराची ती एक जबाबदारी आहे या नात्याने, भूगोलाभ्यासात अंतर्भाव केला (२९५, १६३). लायलीने तर अशा प्रकारच्या सांस्कृतिक स्थैर्यसूचक वस्तुसंचांच्या सापेक्ष स्थानांच्या अभ्यासांवर एकूण सांस्कृतिक भूगोलाचे लक्ष केन्द्रित झालेले असावे अशी अपेक्षा उघड व्यक्त केली (२२०, १३२ ff). भूगोलाच्या विकासेतिहासाचा थोडाही विचार न करता सांगितलेल्या औपपत्तिक अधिकारांकडे एखाद्याने काणा डोळा केला तर ते समर्थनीयच ठरेल. कारण, असे कित्येकांचे मत आहे की, असा दावा भूगोलाभ्यासकाला भूगोल क्षेत्राच्या बाहेरच्या ऐतिहासिक शिल्पांचा अभ्यास अशासारख्या भलत्याच एका क्षेत्रात नेऊन सोडेल; आणि ते क्षेत्र आपले मानण्यास भूगोलाभ्यासकांपैकी किती जण तयार होतील ? उलटपक्षी, या पोटविषयाचे मोठ्या सायासाने केलेले उद्बोधक प्रायोगिक अभ्यास गंभीरपणे विचारात घेण्यासारखे आहेत. असे अभ्यास विशेषतः युरोपीय भूगोलकारांनी व आपल्या देशातील हॉल, क्निफेन आणि अन्य काही जणांनी केलेले आहेत. विशेषतः अशा प्रकारचे अभ्यास "दृश्य भौतिक गोष्टी" या तत्त्वावर उघडपणे कायद्याच्या चौकटीत बसविता आले, तरीही त्या पोलादी नियमांच्या दडपणाखाली भूगोलक्षेत्रात त्याना महत्त्व प्राप्त होऊ शकेल का, याचाही विचार आवश्यक आहे.

## फ-वसाहतींच्या नमुन्यांच्या अभ्यासाशी संबंध

घरे आणि वसाहती यांच्या नमुन्यांचे क्रमबद्ध परीक्षण हे या देशात अशा एका प्राथमिक अवस्थेत आहे, की उत्साहभराने प्रकारांचे निरीक्षण व वर्गीकरण करत असता या सांस्कृतिक रुपधेयांना भूगोलदृष्ट्याही महत्त्व असते या प्रश्नाचा फारच थोडा विचार केलेला

असतो. युरोपीय अभ्यासकांचे अशाप्रकारचे पुष्कळसे अभ्यास सुरूवातीपासूनच कमीजास्त बदलाच्या राष्ट्रीय नमुन्यात प्रत्यक्ष संस्कृतीच्याच वितरणाच्या अभ्यासाच्या तीव्र इच्छेने प्रेरित झालेले असतात. युरोपीय अभ्यासकांनी गृह प्रकारांसंबंधी निर्माण केलेल्या अलीकडील कार्याकडे अमेरिकी अभ्यासकांनी अद्यापपर्यंत फारच थोडे लक्ष दिले आहे. (c/o फायफरची तळटीपः १०९, १२०).

इथे आपला संबंध अमेरिकी भूगोलाची ज्या एका भूगोलशाखेशी थोडी नव्यानेच ओळख होत आहे त्या शाखेशी असल्यामुळे ही शाखा एकूण भूगोलाच्या संदर्भात नेमकी किती महत्त्वाची आहे याचा निर्णय करणे काहीसे अवघड आहे. (वास्तविक रिटरने लिहिलेल्या आशियाच्या अभ्यासात या सांस्कृतिक शाखेचे पहिले उदाहरण मिळते आणि माइत्सेनचा अभिजात अभ्यास तर १८९५ इतका आधी प्रसिद्ध झालेला होता). वसाहतींच्या आणि घरांच्या नमुन्यांचा अभ्यासांतून काहींच्या मते, एकूण सांस्कृतिक भूगोलाच्या अभ्यासाची गुरुकिल्ली सापडण्याची शक्यता आहे. म्हणूनच भूगोलाच्या एखाद्या विशिष्ट संकल्पनेमुळे त्यांच्या विकासाला प्रोत्साहन मिळेल का त्यांचा उत्साह भंग होईल याचा विचार करणे हे योग्यच आहे. याच हेतूने आणि थोड्याशा द्विधा मनस्थितीतच पुढील विचार मांडले जात आहेत.

काही अभ्यासकांच्या मते, भूदृश्यातील घरे दृष्टिगोचर असतात येवढ्याच एका आधारावर गृह प्रकारांचा अभ्यास समर्थनीय ठरतो. भूदृश्यात जे जे दिसेल त्या सर्वांचा अभ्यास भूगोलकार करू शकेलच असे नाही, तरी त्यांची निवड करण्यासाठी काही तरी निकष असणे आवश्यक आहे. पुष्कळसे अभ्यासक गृहप्रकार आणि वसाहतींचे नमुने यांचा अभ्यास हे भूगोलातील एक अत्याधुनिक ' वेड ' मानतात, अर्थात – त्याला कारणेही तशीच आहेत– याचे आश्चर्य वाटत नाही. लायलीने असे सूचविले आहे की, कोलंबिया नदीच्या काठी उच्च स्थानी असलेली एखादी न्हीनिश पद्धतीची गढीसुद्धा भौगोलिक अभ्यासाचा विषय होऊ शकेल (२२०, १४०). ज्या प्रदेशात खेडी आढळली ती ती अद्वितीयच असल्याचे कारण देऊन, एकएकट्या खेड्याचे तपशीलवार वर्णन यापूर्वीपासूनच आपल्याकडे होत आले आहे. आणखीही असे सुचविण्यातं आले की, जितकी खेडी असतात तितके खेड्यांचे नमुने त्या प्रदेशात असतात. अर्थात, प्रत्येकाची स्वतंत्रपणे तपासणी व्हावी असा त्यांचा अधिकार असतो. अशा रीतीने जगातील खेड्यांची एकूण संख्येची गणना करून त्यांचे अभ्यासलेख मागविल्यावर निर्माण झालेल्या त्या हिमालया एवढ्या लेखराशींची एखादा अभ्यासक मोजदाद करू लागला तर त्याला भूरचनांच्या वर्णन लेखांनी संपूर्ण मढवून टाकलेल्या भूपृष्ठाचे लायलीला दिसलेले ते अपरात्रीचे भयानक स्वप्न, या राक्षसी राशींच्या तुलनेने पहाटे पडलेल्या स्वप्नासारखे सुखद वाटेल. (२२०, १२६ f).

पण, उत्साहभरात केलेल्या गोष्टीच्या स्वाभाविक परिणामांचे फाजील कौतुक करणे, अथवा केवळ (त्यांच्या) आकारांची व्युत्पत्ती आणि वर्गीकरण एवढ्यापुरताच विचार करणाऱ्या गृह-प्रकारांच्या अभ्यासांवर भर देणे, या दोन्हीही पद्धती न्याय्य होणार नाहीत. या

अभ्यासकांच्या बहुतांश कार्याची भौगोलिक गुणवत्ता प्रशिक्षित वाचकाच्या नजरेला ओळखू येते. म्हणूनच –त्या महत्त्वाची व्याख्या करणे शक्य असले तरी– त्याची व्याख्या करत बसण्याची आवश्यकता नाही. शिवाय, पुष्कळशा वाचकांना असेही वाटण्याची शक्यता आहे की, यापुढे आलेल्या तपशीलवारसामग्री -संपत्तीत नवीन संकल्पना, सूचना, निष्कर्ष यांचाही अंतर्भाव असण्याची शक्यता आहे आणि त्यांच्यामुळे एकूण भूगोलाच्या आकलनात व त्या क्षेत्रात कार्य करण्याच्या आपल्या पात्रतेत भरच पडणार आहे. पण दुर्दैवाने, प्रस्तुत वाचकाला तरी त्यांच्या अभ्यासातून अशा प्रकारच्या कल्पना अथवा निष्कर्ष काढणे अवघडच आहे असे दिसून आले. याचे अंशतः कारण, पुष्कळशा बाबतींत योग्य शब्दात मांडलेल्या निष्कर्षांच्या विधानांची उणीव असते. शिवाय, कदाचित लेखकाने स्वतःच आपल्या अभ्यासातून निष्कर्ष निघण्यासारखे असल्यास ते कोणते म्हणजेच –आपल्या अभ्यासाची इतिकर्तव्यता काय ?– याचा विचारच केलेला नसतो, हेही एक कारण असावे.

या विषयाच्या या देशातील अभ्यासकांपैकी क्निफेनने त्या अभ्यासांच्या हेतूंवर अत्यंत गंभीरपणे विचार केलेला दिसतो. " सांस्कृतिक-भौगोलिक प्रदेशांकडे पहाण्याचा तर्कनिष्ठ दृष्टिकोण " शोधण्याच्या प्रयत्नात असतानाच त्याने लुइझिआनाच्या घरांचे वर्गीकरण केले आहे. आणि सममूल्य रेषा ( Isopleths ) पद्धतीने त्यांचे प्रकार दाखविणारे नकाशेही तयार केले आहेत. त्या अभ्यासांतून केवळ दृश्य मूर्त वस्तूंच्या मूर्त-भौतिक स्वरूपाचे चित्र निर्माण करणे येवढाच हेतू नाही, तर " गृहविषयक कल्पनांचा क्षेत्रीय आविष्कार शोधण्याचाही त्यात प्रयत्न आहे ". –अर्थातच, संस्कृतीच्या भौगोलिक आविष्कारांवर स्पर्श-क्षम (Tangible) पकड घेता यावी म्हणून केलेली ही चाचपणी आहे. (३६८, १७९ व १९२; तसेच c/o लायली २२०, १३६).

जाता जाता हीही गोष्ट लक्षात घेतली पाहिजे, की क्निफेनने प्रतिपादन केलेल्या हेतूंनीच अशा प्रकारच्या अभ्यासांचे भौगोलिकदृष्ट्या महत्त्व सिद्ध करता येते, असे समजण्याचे कारण नाही. इमारती व वसाहती यांचे विविध नमुने हे हवामान, भूरचना, वनस्पती व तळशिळा याच्यातील फरकांशी किंवा विविध भौतिक-सांस्कृतिक रूपधेयांतील भेदांशी अर्थपूर्ण रीतीने सुसंगत असण्याची शक्यता आहे; आणि त्यामुळेच हे नमुने त्या प्रदेशाच्या भिन्नतादर्शक स्वरूपात भर टाकत असण्याची शक्यता आहे. पण एकंदरीने, भौतिक रुपधेयांच्या अनेक गटांपैकी एक गट या नात्याने अशा रूपांच्या अंगी असलेले भौगोलिक महत्त्व, संस्कृतीचे भौगोलिक आविष्कार मूर्त स्वरूपात पकडण्याचे कामी त्या रूपधेयांची किती मदत होते, यावरच अवलंबून राहते.

प्रस्तुत लेखकाशी झालेल्या वैयक्तिक चर्चेत आपली लेखी विधाने अधिक विशद करत असता, क्निफेनने असे स्पष्ट केले की, त्या विधानांनी जो सूचित केला आहे तोच त्यांचा खरा अर्थ आहे. संस्कृती ही काही कल्पनांनी आकारलेली असते. त्यांतील एखादी कल्पनाच आविष्कारातून म्हणजे –क्षेत्रीय भेदांतून साकारलेली असते. पण, प्रथम त्या

कल्पनेची ही मूर्त प्रतिमा शोधून काढणे आवश्यक आहे. अर्थात या प्रतिमेच्या भौगोलिक आविष्कारात त्या कल्पनेच्या भौगोलिक आविष्कारांचे अचूक चित्रण झालेले असले पाहिजे. अशाप्रकारे लुइझिआनातील प्रत्येक वेगळ्या प्रकारच्या क्षेत्रात घरासंबंधीची कोणतीतरी एक विशिष्ट कल्पना प्रभावी आहे, असे आपले सर्वसाधारण मत होण्यात हरकत नाही. म्हणून, ज्यांचे आपण निरीक्षण, वर्गीकरण व प्रमाणबद्ध नकाशीकरण करू शकतो अशी प्रत्यक्ष घरे हीच घरासंबंधीच्या कल्पनांचे सत्याविष्कार असतील, तरच कोणत्याही एका कल्पनेचा भौगोलिक अभ्यास करण्याचे तंत्र आपल्या हाती आले असे होईल.

म्हणजे आमचा अंतिम हेतू संस्कृतिच्या अभौतिक पैलूंचा भौगोलिक अभ्यास हाच असतो, –खरे म्हणजे, प्रत्यक्ष संस्कृतिचा आणि त्या बरोबर – तिच्या अधिक बाह्यरूप व भौतिक आविष्कारांचा अभ्यास असे म्हणणे योग्य होईल.

क्निफेनच्या अभ्यासलेखांतून सूचित होणाऱ्या पायाभूत दृष्टिकोणाचे हे तपशीलवार विश्लेषण समर्थनीयच आहे. त्याकडे भूगोलकारांनी लक्ष दिले आणि तो तसे लक्ष देण्याच्या पात्रतेचा होता, हे या समर्थनाचे एक कारण आहेच. पण, त्याच्या अभ्यासांची चर्चा करणाऱ्यांपैकी पुष्कळांना ज्याच्यावर त्याचा दृष्टिकोण आधारलेला होता त्या अंतिम हेतूचाच सुगावा लागलेला नव्हता, हेही दुसरे कारण आहे. (फायफर १०९, १२०). नंतरच्या एका गोलमेज चर्चेत सांस्कृतिक भूगोलाच्या तात्त्विक स्वरूपाचा विचार चालू असता, आपले प्रायोगिक कार्य ज्याच्यावर आधारलेले होते, म्हणजेच कल्पनाकल्पनांतील प्रादेशिक भेदाभेदांचा विचार हाच, मूलभूत दृष्टिकोण त्याने सोडून दिला; आणि त्या ऐवजी " ज्यांचे कर्तृत्व प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे मानवाकडे जाते अशा त्या प्रदेशातली सर्व निरीक्षणक्षम घटनांचे (अर्थात साधारणपणे दृश्य घटनांचे) स्वरूप, त्यांची उत्पत्ती व त्यांचे वितरण यांचाच येथे प्रामुख्याने विचार व्हावयाचा असतो ", या सर्वपरिचित मंत्रावर त्याने आपले सांस्कृतिक भूगोलाचे तात्त्विक निरुपण आधारले. याचा एक दुष्परिणाम होणार आहे. " एखाद्या धार्मिक पंथाचे विशिष्ट लक्षणयुक्त आविष्कार उदा. –गिरीजाघरे, रस्त्याकडेची देवळे आणि स्मशाने– भूगोलदृष्ट्या प्राथमिक महत्त्वाचे आहेत हे त्याने मान्य केल्यावर, दुसऱ्या तशा घटनांचा त्या एकूण भूदृश्यात आविष्कारच झालेला दिसत नाही या सबबीवर त्याच प्रदेशातील नव्वद टक्के लोक दुसऱ्याच धर्मपंथाचे अनुयायी असूनही त्या घटनेला फारसे भौगोलिक महत्त्व नाही असेच तो समजणार. (२२५, १६२ ते १६७ शेवटचा वाक्यांश क्निफेनने नंतर केव्हातरी जोडलेला असावा.).

दुसऱ्या शब्दांत सांगावयाचे झाले तर, क्षेत्रीय प्रतिमा असलेल्या सर्वच कल्पनांचा भूगोलात अंतर्भाव करावयाचा नसतो, पण ज्या कल्पनांची वास्तव प्रतिमा त्या दृश्यात उमटलेली असते अशांचा अंतर्भाव करावयाचा असतो. वास्तव रूपांचे अस्तित्व असणे हाच भौगोलिक महत्त्वाचा निकष आहे. सर्वच सांस्कृतिक कल्पनांना भौगोलिक महत्व असत नाही याबाबत दुमत होण्याचे कारण नाही, इतकेच काय, ज्यांचे क्षेत्रीय नकाशे तयार करता येतात अशा

सर्वांचाही अंतर्भाव करता येईलच असे नाही. मात्र येवढ्यावरून, भूदृश्यातील वास्तव प्रतिमेचे अस्तित्व येवढा एकच निकष आहे आणि तो पुरेसा आहे, असा निष्कर्ष काढण्याची आवश्यकता नाही. भूदृश्यातील काही सांस्कृतिक रूपधेयांचे स्वरूप सांस्कृतिक संकल्पनांच्या अभावाचेच प्रतिबिंब असू शकते. उलटपक्षी, अशीही शक्यता असते की काही प्राथमिक महत्त्वाच्या घटकांची त्या भूदृश्यात उमटलेली प्रतिमा अगदी अस्फुट असते. उदाहरणार्थ, आपण जर्मनी व स्वित्झरलँड यांच्या सरहद्दीला अगदी लागून असलेले उत्तरेकडचे व दक्षिणेकडचे क्षेत्र घेऊ. यांची भाषा जरी एक असली तरी राजकीय विचारांची संपूर्ण कक्षाच जर्मन क्षेत्रात व स्विस क्षेत्रात अगदी लक्षात भरण्याइतकी वेगळी आहे. हे फरक आज विशेषत्वाने लक्षणीय वाटतात हे खरे असले, तरी गेल्या कित्येक शतकांत ते तितकेच स्पष्टपणे व्याख्यात होते. या फरकाची प्रतिमा या भूदृश्यात कशीही उमटलेली असो, पण या सरहद्दीवरून प्राथमिक पर्यवेक्षणासाठी इकडून तिकडे प्रवास करून आलेल्या एका भूगोलकारांच्या गटाला त्याचा प्रतिबोध होऊ शकला नाही, इतकी ती गूढ होती येवढे निश्चित. उलटपक्षी, तेथील रहिवाशांबरोबर केलेल्या राजकीय प्रश्नांवरील कोणत्याही चर्चेत त्यांच्या विचारांतील रुंद फट तत्काळ उघडी पडली असती; आणि ही फट केवळ राजकीय आवडीनिवडी पुरतीच मर्यादित नसून तेथील लोकांच्या मूलभूत राजकीय मनोवृत्तीतच ती भिनून गेल्याचे दिसून आले असते.

भूदृश्यात उमटणारी प्रतिमा हा निकषही निरनिराळ्या क्षेत्रांत कमी जास्तपणे बदलत जाणाऱ्या सांस्कृतिक स्वरुपांची फक्त एक कसोटी आहे आणि तीही फारशी विश्वसनीय आहे अशातला भाग नाही. शिवाय भूदृश्यातील भौतिक प्रतिमांवर भर दिला जात असताना आकारावर भर देण्याकडे साहजीकच कल असतो, खरे तर, क्निफेनने केलेल्या गृहप्रकारांच्या अभ्यासात प्रामुख्याने कार्याच्या विचारांऐवजी आकारांचाच विचार व्हावयाचा होता, म्हणून त्याने त्यांचे निरुपण निरपवादपणे अकारांच्याच परिभाषेत करावयास हवे होते, असा एका टीकाकाराने युक्तिवाद केला आहे. आस्ट्रियातील आल्प्स पर्वतातून जाताना रस्त्याच्या बाजूने आढळणाऱ्या देवळांचे स्वरूप तेथील लोकांच्या कलाविषयक कल्पनांसंबंधी आणि दगड व लाकूड यांचा उपयोग कशारीतीने करता येणे शक्य आहे याविषयीच्या त्यांच्या कल्पनांसंबंधी बरेच काही सांगून जाते, हे खरे असले तरीही त्या लोकांच्या धार्मिक कल्पनांसंबंधी ती जे काही सांगतात त्याचे निरीक्षण करणे निश्चितच कितीतरी अधिक महत्त्वाचे आहे.

या ठिकाणी एक गोष्ट सूचवावीशी वाटते. आपल्या अभ्यासक्षेत्राच्या स्वरुपासंबंधीची वेगवेगळ्या भूगोलकारांची गृहीत प्रमेये पुढील तीन पद्धतींपैकी एक अगर अधिक प्रकारांनी सिद्ध झालेली असतात, असे मानण्यास हरकत नाही. काहीजण तत्त्वज्ञानविषयक व्यापक दृष्टिकोणातून भूगोलाच्या तर्कसिद्ध स्वरुपाचे विश्लेषण करण्याचा प्रयत्न करतात. पण, नवाभ्यासकांनी या तत्वज्ञांचे तर्कसिद्ध निष्कर्ष त्यांच्या पूर्वाचार्यांच्या निष्कर्षांच्या निकषांवर

पारखून घेतले नाहीत आणि सर्वसाधारणपणे भूगोलकारांनी जे काही साधण्याचा प्रयत्न केला आहे त्याचाही सांगोपांग अभ्यास केला नाही, तर या शिकाऊ अभ्यासकांना भलतीच दिशा दाखविण्याचे सामर्थ्य या पहिल्या पद्धतीत आहे. दुसरे पुष्कळजण अगदी सर्वसाधारण भूगोलविषयक कल्पनांपासून सुरुवात करतात– त्याला, फार तर, भौगोलिक दृष्टी असे म्हणता येईल. त्यांच्या प्रत्यक्ष संशोधनाच्या परिपाकातून त्यांच्या प्रेरक संकल्पना आकार घेत असतात. त्यानी केवळ योगायोगाने हे क्षेत्र अभ्यासासाठी निवडलेले असते, या वस्तुस्थितीमुळे त्यांच्या प्रारंभीच्या गृहीत प्रमेयांची हमी देता येत नाही. तरीही काही प्रारंभिक गृहितके मान्य करून ते अशा एका दृष्टिकोणाशी येऊन पोहोचतात की तो दृष्टीकोण पहिल्या गटातील अगदी यशस्वी ठरलेल्या भूगोलकारांच्या दृष्टिकोणाहून फारसा वेगळा असत नाही. पण ही वस्तुस्थिती सहसा अंधारातच रहाते; कारण भूगोलविषयाच्या स्वरूपासंबंधीच्या कित्येक प्रत्यक्ष चर्चांतून ते उघडपणेतरी त्यांच्या विरुद्ध मतेच बोलून दाखविणयाची शक्यता असते. तथापि त्यांच्या परिपक्व कृतींवरून निर्णय घ्यावयाचा झाला तर हे दृष्टिकोणांतील फरक प्रत्यक्षात किरकोळ स्वरुपाचे असतात. असेच दिसून येईल. तिसऱ्या गटातील अभ्यासक आपल्या भूगोलविषयक संकल्पना कोणत्यातरी दुसऱ्याच अभ्यासकांच्या, बहुधा पहिल्या गटातील सदस्यांपैकी एकाच्या अगर अनेकांच्या शब्दप्रामाण्याने घेतात.

अन्य सर्वच सरळ मानशास्त्रीय वर्गीकरणासारखे हे वर्गीकरणही अवास्तवच आहे. प्रत्येक अभ्यासक या तीनही गटांपैकी प्रत्येकात अंशतः असतो. ज्या अमेरिकी भूगोलकारांनी सांस्कृतिक भूगोलाच्या अभ्यासास महत्त्व देऊन त्याचा आरंभही केला आहे, ते असल्या ' निधर्मी ' घोषणांनी स्वतःला बांधून घेण्यास तयार होणार नाहीत अशी अपेक्षा आहे; कारण त्यांच्या कार्याच्या विकासाला, आणि कार्याचा परिणाम म्हणून होणाऱ्या निकोप विकासाला, अडथळा करणाऱ्या आहेत. हेटनरने वारंवार व आग्रहपूर्वक सांगितले आहे त्याप्रमाणे, पद्धति तंत्रविषयक सर्व घोषणांचा कस भौगोलिक कुटप्रश्नांच्या प्रत्यक्ष सोडवणुकीच्या दृष्टीने लावून पाहाणे आवश्यक असते. मिशोटाने दिलेल्या धोक्याच्या सूचनेचीही येथे पुनरावृत्ती करावी इतक्या महत्त्वाची ती आहेच. " चर्चेसाठी घेतलेल्या प्रत्यक्ष प्रश्नांसंबंधीच्या विशिष्ट उदाहरणांच्या अभ्यासापासून फारकत करून केवळ तत्त्वांची चर्चा हीच या संबंधात होणाऱ्या चुकांची खरी जननी आहे ". (१८९, २३).

येथे चर्चेसाठी घेतलेल्या या विशिष्ट बाबीत दोन वेगळ्या दिशेने थोडीथोडी ओढ घेणाऱ्या दोन घोड्यांवर स्वार होण्याच्या प्रयत्नात आमचा भूगोलकार असावा असे दिसते. भूगोल हा दृश्य भूप्रदेशांचाच अभ्यास असेल, तर ग्रामीण घरांचे नमुने हा त्याच्या अभ्यास-हेतूचा एक घटक झाला. अर्थातच, घरांविषयीच्या लोकांच्या कल्पनांना दुय्यम महत्त्वाचे स्थान आले, कारण काही विशिष्ट नमुनेच का आढळतात याचा अन्वयार्थ लावण्यापुरताच त्यांचा उपयोग होतो. पण, घरासंबंधीच्या कल्पनांचा क्षेत्रीय आविष्कार हस्तगत करण्याच्या

प्रयत्नात रहाणे हे उद्दिष्ट त्या भूगोलकाराने प्रमुख उद्दिष्ट म्हणून नजरेपुढे ठेवणे या संदर्भात योग्य होणार नाही. उलटपक्षी, पद्धतितंत्रशास्त्राच्या तत्त्वांचा विचार जाणीवपूर्वक बाजूला ठेवून, आपल्याला भौगोलिक सांस्कृतिक विभागच प्रस्थापित करावयाचे आहेत असे गृहीत धरुन तो कार्याला लागला, तर हा हेतू साध्य होण्यासाठी संस्कृतीच्या भौगोलिक आविष्कारांवर भूगोलकारला पक्की पण स्पर्शक्षम पकड घ्यावी लागेल. मग, त्यासाठी कोणत्याही घटनेचे संस्कृतीच्या दृष्टिने अथवा तिच्या भौगोलिक आविष्करांच्या दृष्टीने (म्हणजेच क्षेत्रीय भिन्नतेच्या दृष्टीने) त्या भूदृश्यातील दर्शनीयता हे फक्त एक गमक होईल. पण, ते आवश्यक आहे असे नाही किंवा ते पुरेसेही नाही.

आता असा प्रश्न रहातो, की सांस्कृतिक कल्पनांच्या क्षेत्रीय भेदाभेदांचा अभ्यास करत असताना, भूगोलकारांनी भौतिक वस्तूंच्या परीक्षणांवर आधारलेल्या तंत्रांची मर्यादा पाळलीच पाहिजे का ? अशा प्रकारच्या भेदांना तर्कनिष्ठ बैठक नसली, तरी त्यामुळे सदभिरुचीची प्रतिमा स्पष्ट होण्याची शक्यता आहे. वर उल्लेख केलेल्या गोलमेज परिषदेत क्निफेनने केलेल्या प्रबंधाच्या वाचनानंतर झालेल्या चर्चेत स्टॅन्ले डॉजने असे सुचविले की सांस्कृतिक प्रादेशिक भूगोलात आपला संबंध एकरुप विचारांच्या क्षेत्रीय विस्ताराशी असतो; आणि त्याचाच आपल्यास एक गमक म्हणून उपयोग करून घेता येण्यासारखा आहे. (२९५, १७१). पण लोकांचे विचार काय आहेत याचे माप आपल्या जवळ नाही हे उघड आहे. त्याचे मापन अप्रत्यक्ष पद्धतिनेच केले पाहिजे. लोकांच्या भौतिक उत्पादनांच्या परीक्षणांतून अशा मापनाची एक पद्धत मिळते. पण, ही येवढी एकच पद्धती आहे काय ? किंवा, सर्व बाबतीत तीच एक उत्तम पद्धती आहे हे तरी निश्चित आहे काय ? हे खरे क्रान्तिक प्रश्न आहेत. आपल्याला आता उपयोगात असलेल्या पद्धतीपेक्षा अधिक चांगल्या पद्धतींनी आपल्याला इष्ट विषयाचा अभ्यास करणे शक्य होणार असेल, तर अखिल-शास्त्र-क्षेत्रातील कोणतीच अधिकारवाणी, मग ती आमच्या क्षेत्रातील असो वा दुसऱ्या क्षेत्रातील असो, त्या चांगल्या पद्धती उपयोगात आणण्यास आपल्याला मनाई करू शकणार नाहीत.

लोकांच्या घरापुरतेच आपण आपले अभ्यास मर्यादित करण्याची आवश्यकता नाही. कारण, त्यांच्या एकूण कल्पनाजटिलात तीच फार महत्त्वाची असतात असे कोणत्याच अर्थाने मानता येणार नाही. तसेच गृहविषयक कल्पनांतून त्या एकूण जटिलाची गुरुकिल्ली हाती येते अशीही खात्री देता येणार नाही. उदाहरणार्थ : लुइझिआनाच्या प्रेअरी प्रदेशातील घरांच्या निरीक्षणांतून असे सूचित होते की, तिकडील लोकांच्या घरांसंबंधाच्या कल्पना मध्य-पश्चिमेतील कल्पनांप्रमाणेच आहेत. त्या लोकांचे मूलस्थान मका-पट्ट्यात आहे यावरून त्या वस्तुस्थितीचे स्पष्टीकरण सहजच मिळू शकते. आणि तेच क्निफेनलाही आढळून आले (३६८, १००). येवढ्यावरून सर्वच बाबतीत या लोकांनी आता मध्य-पश्चिम कल्पनांचा स्वीकार केलेला आहे असे अनुमान काढता येईल का ? कदाचित, तशी एक शक्यता आहे. पण तशी दुसरी एक शक्यता आहे की त्यानी त्या कल्पनांचा मुळीच स्वीकार केलेला

नाही. उलट, जीवनातील इतर सर्व बाबीत पूर्णपणे दाक्षिणात्य विचारसरणीचा अवलंब केलेला असूनही ते वंश-परंपरागत पद्धतीने बांधलेल्या घरांत (किंवा वडिलार्जित घरांत) राहात आलेले आहते. किंबहुना, एखाद्या भूगोलकाराने सांगेतोपर्यंत, आपण मध्य-पश्चिम पद्धतीच्या घरांत राहत आहोत हेही त्यांच्या लक्षात आलेले नसेल. यापेक्षा त्यांच्या विचारप्रणालीचे विश्वसनीय गमक त्यांच्या निवडणूक निकालांतून मिळाले नसते का ? आणि ते तितकेच विश्वसनीय मानता आले नसते का ? वर्षानुवर्षे या क्षेत्राचे रिपब्लिकन पक्षालाच मत दिलेले आहे, असे आढळून आले, तर त्यांच्या विशिष्ट संस्कृतीची तीच खरी गुरुकिल्ली आहे हे सहज लक्षात येण्यासारखे नाही का ?"[७६] जे भूगोलकार गृहप्रकारांसारख्या गुंतागुंतीच्या घटनांचे निरीक्षण करून त्यांचे वर्गीकरण करण्याइतके प्रशिक्षण घेऊ शकतात, त्यांना निवडणूक निकालांचा अभ्यास करण्याची पात्रता येत नाही, असे सुचविण्याचे धाडस कोणीच करणार नाही, असा मला विश्वास वाटतो. तसेच, एक्ब्लाव सुचवितो त्याप्रमाणे, आपल्या राज्याच्या निरनिराळ्या भागांतील विशिष्ट लोकगीतांच्या संग्रहांचा व विशिष्ट रुढींचा प्रभाव ही पण क्निफेनच्या हाती आलेली सांस्कृतिक विभागांच्या अभ्यासाची एक किल्लीच म्हणावी लागेल (२९५, १७१ f). त्यातूनही, नतंर उल्लेखिलेल्या घटनांचा अभ्यास इतर क्षेत्रांतील अभ्यासकांनी आधीच करून ठेवलेला असेल तर फारच बरे. भूशास्त्रज्ञ, मृदाशास्त्रज्ञ यांचे व स्वतःचे निष्कर्ष यांचा सहसंबंध घालता यावा म्हणून त्यांच्या निष्कर्षांचा आपलेपणाने स्वीकार करताना जो भूगोलकार डगमगत नाही, त्याला सांस्कृतिक-भूगोलासाठी उपयुक्त असलेली तशाप्रकारची सामग्री समाजशास्त्रज्ञांनी पुरवली असेल, तर ती वापरताना मोठा आनंद का होऊ नये ?

थोडक्यात सांगावयाचे झाले, तर माणसांच्या कल्पना, वृत्ती आणि भावना अशा प्रकारच्या आवश्यक सांस्कृतिक लक्षणांचे क्षेत्रीय भेदाभेद या प्रत्यक्ष निरीक्षणाच्या कक्षेत न सापडणाऱ्या गोष्टी आहेत. त्याचेच अप्रत्यक्षपणे निरीक्षण करण्याच्या पद्धती प्रामुख्याने अशा अभ्यासांनी मिळणार आहेत. म्हणूनच घरांच्या व वसाहतींच्या नमुन्यांचा अभ्यास हे केवळ एक वेड नसून, सांस्कृतिक प्रादेशिक भूगोलात भर टाकण्याचे ते एक साधन आहे, असे त्याचे समर्थन करता येणे शक्य आहे. जी निरीक्षणाचे विषय होऊ शकतील, ज्यांचे वर्गीकरण करता येईल आणि जी प्रमाणबद्ध नकाशांनी दाखविता येतील अशा पुष्कळ व विविध मार्गांनी

---

७६. येथे केलेल्या सूचना संदर्भासाठी घेतलेल्या विशिष्ट उदाहरणास तंतोतंत लागू पडणाऱ्या नाहीत. क्निफेनने स्वतःच असे कळविले आहे, की आज उभ्या असलेल्या घरात मकापट्टपातील अगदी पहिल्या स्थलांतरितांनी बांधलेल्या घरांचा बराच मोठा भरणा आहे आणि त्यांच्यातील पुष्कळसे अद्यापी हयातही आहेत. उलटपक्षी, संस्कृतीचा एक अभ्यासक या नात्याने, या संपूर्ण राज्यात रिपब्लिकन पक्षाचा गड्डा म्हणून हे क्षेत्र ओळखले जाते, या वस्तुस्थितीचे महत्त्व तो अधिक मानतो. पण भूगोलाचा अभ्यासक म्हणून मात्र या वस्तुस्थितीचा उल्लेख तो करू शकत नाही. या राजकीय वस्तुस्थितीचा क्षेत्रीय विस्तार आणि त्याने घरांच्या प्रकारांच्या नकाशाने दाखविलेली वस्तुस्थिती यांचा सहसंबंध त्या दोन्ही वस्तुस्थितींचे महत्त्व वाढविणारा आहे हे निश्चित.

ही लक्षणे आपला आविष्कार करत असतात. आम्ही ज्या वस्तू तयार करतो त्यातूनच फक्त आम्ही आमचे विचार प्रकट करतो असे नाही तर ज्या पद्धतीने व आशयाने आम्ही बोलतो, गातो, नाचतो, लिहितो, मत देतो किंवा शिरगणती अधिकाऱ्याला निवेदन देतो त्यातूनही ही लक्षणे प्रकट होत असतात. अमूर्त असल्यातरी, अशा घटनांची निरीक्षणक्षमता मूर्त वस्तूपेक्षा कमी असते असे नाही. उलट, आमच्या कल्पनांच्या प्रतिमा अशा घटनांच्या रूपाने जितक्या प्रत्यक्षपणे प्रकट होतात तितक्या त्या आमच्या प्रचलित इमारतींच्या रूपानेही प्रकट होऊ शकत नाहीत. मग, ज्यांचे मूळही आपण विसरुन गेलो असण्याची शक्यता आहे अशा बसाहतींच्या आणि घरांच्या नमुन्यांचा तर विचारच करावयास नको ! अलीकडेच जर्मन भूगोलकार तयार करतात तसे उत्कृष्ट प्रादेशिक नकाशासंग्रह हे अशाप्रकारच्या अभौतिक सांस्कृतिक घटना आणि गृहप्रकार व बसाहतींचे प्रकार अशासारख्या भौतिक घटना या सर्वांचेच नकाशीकरण करण्याचे महत्त्व किती आहे याचे प्रत्यक्ष प्रमाण आहेत. (३७१, ३४६; तसेच श्लेंगर पहा ३४४). जो सांस्कृतिक भूगोलाचा अभ्यासक अशाप्रकारच्या संस्कृतीच्या निरीक्षणक्षम आविष्कारांचा अभ्यास करण्यास मनाई करणाऱ्या स्वैर नियमाला स्वच्छेने मान्यता देतो, तो आपल्या मूलभूत हेतूची –सांस्कृतिक भौगोलिक प्रदेशांचा अन्वयार्थ लावण्याच्या हेतूची– शक्य तेवढी सर्वांगीण व परिपूर्ण सिद्धता होण्याच्या शक्यतेपासून स्वतःलाच वंचित करत असतो.

## ग–सारांश

या प्रकरणातील चर्चा काहीशा लांबल्याच आहेत. म्हणूनच त्यांच्या चर्चेच्या ओघात काढलेले निष्कर्ष पुन्हा सारांशाने सांगणे उपयुक्त होईल असे वाटते. " सर्वसाधारणपणे दृश्य असतात अशा क्षेत्रीय घटनांनी भौगोलिक अभ्यासाचे क्षेत्र मर्यादित करणे आवश्यक आहे ", हा सिद्धान्त ' भौगोलिक अभ्यासांनी भौतिक रुपधेयांचे बंधन पाळलेच पाहिजे ' या खेरीज कोणतेच अन्य काटेकोर विधान मान्य करत नाही. काही उत्साही कार्यकर्ते उणीपुरी तीस वर्षे हे भूगोलाभ्यासकांच्या गळी उतरविण्याचा प्रयत्न करत आहेत. तरीही सापेक्षतः अगदीच अल्पसंख्य भूगोलकारांनी ते तत्त्वतः मान्य केले आणि त्याहूनही कमी अभ्यासकांनी त्याचा परिपाठात आग्रह धरला. अर्थात याचे आश्चर्य वाटण्याची जरुरी नाही. कारण ते तत्त्व भूगोलाच्या तर्कपद्धतीवर अथवा भूगोलाच्या ऐतिहासिक विकास क्रमावर आधारलेले नाही, किंवा त्यामुळे भूगोलाचे अधिक मर्यादित असले तरी एकसंध क्षेत्र निर्माण करता येईल असा आधारही मिळत नाही. उलटपक्षी, या मर्यादांमुळे इष्ट क्षेत्राच्या काही विशिष्ट बाजू भूगोलकाराच्या अभ्यासकक्षेच्या बाहेर राहिल्यामुळे " शुद्ध भूगोलाच्या " " केन्द्रवर्ती गाभ्याचाच " उच्छेद होण्याची शक्यता आहे. कारण, भूगोलकाराने आधीच अभ्यासलेल्या गोष्टींचा अन्वयार्थ लावण्यासाठी त्याच्या अभ्यासाच्या नंतरच्या टप्प्यात त्याला आवश्यक वाटलेच तर त्या परित्यक्त बाजूंचे परीक्षण त्याने आवश्यकतेनुसार करावयाचे आहे. प्रामुख्याने अभौतिक रुपधेयांशीच संबंधित असलेली ही उपक्षेत्रे या सिद्धान्तामुळे अगदी वगळली गेली

नाहीत तरी, ती भूगोलक्षेत्राच्या अशा दूरच्या टोकांवर ढकलली जातील, की त्या कडेच्या क्षेत्रांच्या व्याख्याही धड झालेल्या नसल्यामुळे ' संबंधयोगांच्या अभ्यासासाठी ' याखेरीज त्यांच्या प्रयोजनाचे दुसरे मार्गदर्शक तत्त्वच रहाणार नाही. सापेक्ष स्थानांच्या घटकालाही अगदी दुय्यम स्थान दिले गेल्यामुळे भूगोलाच्या सारभूत विचाराकडे– म्हणजेच ' अवकाशस्थ साहचर्य लाभलेल्या घटनांचे एकसंधीकरण ' या विचाराकडे– दुर्लक्ष करण्याची वृत्ती निर्माण होते. परिणाम असा होतो, की भूगोलकारांच्या आकृतिबंध निर्माण करण्याच्या वरकरणी (uncritical) उत्साहाला उधाण येते व त्या भरात त्यांच्या महत्वाचा विचारच त्यांना शिवत नाही. तसेच कायपिक्षा आकारावर फाजील भर दिला जातो व ज्यांच्या महत्त्वाची प्रमाणबद्ध प्रतिमा भौतिक वस्तूंतून निर्माण करता येत नाही, अशी क्षेत्रीय लक्षणे तुच्छ लेखण्याकडे कल निर्माण होतो.

वरील सिद्धान्ताच्या दृष्टिकोनामुळे वसाहतींच्या नमुन्यांचा अभ्यास करण्यास प्रोत्साहन मिळण्याची शक्यता असली, तरी अशा अभ्यासांना आवश्यक ते महत्व प्राप्त होण्याच्या कामी अडथळे निर्माण होतील, म्हणजेच सांस्कृतिक भूगोलाच्या अधिक सर्वांगीण अभ्यासाचा एक भाग म्हणून त्यांचा मान राहाणार नाही, येवढाच या तत्त्वाचा नेमका अर्थ लावता येईल. या दृष्टिकोणाचे दोन संभाव्य अतिशयोक्त परिणाम पुढे दिल्याप्रमाणे दोन प्रकारे मांडता येतील. एक तर अन्य क्षेत्रात अभ्यासिल्या न जाणाऱ्या वस्तू आपल्या अभ्यासासाठी शोधून काढण्यासाठी धाव घ्यावी लागेल. त्यामुळे किमान महत्व असलेल्या गोष्टींचा विचार करणारे क्षेत्र येवढेच महत्त्व भूगोलाला दिले जाईल. नाहीतर, भूदृश्यांच्या व्यक्तिनिष्ठ आकलनाच्या कलाक्षेत्रातील अभ्यासकांबरोबर स्पर्धा करत रहाण्याचा प्रयत्न सुरू होईल.



प्रकरण ८ वे

# भूगोलविषयक सामग्रीची निवड करण्याचा तर्कसिद्ध आधार

## अ–भूगोलाच्या संकल्पनेवरून सिद्ध

एखाद्या क्षेत्राच्या भूगोलाचा अभ्यास करताना विचारात घ्यावयाच्या घटनांची निवड कोणत्या तत्त्वावर अगर तत्त्वांवर नजर ठेवून करावी ? कोणत्याही क्षेत्रात नजरेत भरणाऱ्या वास्तव व अवास्तव घटनांच्या विजातीय संभारांतील घटनांपैकी भूगोलाच्या दृष्टीने महत्त्वाच्या कोणत्या ? अभ्यास-हेतू व्यावहारिक असो की कोणत्या अन्य स्वरुपाचा असो, हा अभ्यास जर एका विशिष्ट हेतूने केला जात असेल तर, विविध घटनांच्या महत्त्वाचे माप त्या हेतूंतूनच पुरविले जाईल, ही गोष्ट अगदी उघड आहे. पण येथे आमचे लक्ष फक्त भूगोलविषयक ज्ञानात भर टाकतील अशा अभ्यासांवरच केंद्रित झालेले आहे. अर्थातच, उपयोजनात्मक भूगोलाच्या विरुद्ध स्वरूपावर, म्हणजेच त्या संज्ञेच्या फक्त केवलार्थावर किंवा शुद्ध भूगोलावरच आमचे लक्ष केंद्रित आहे. भूगोलविषयक ज्ञानात प्रगती व्हावी, या दृष्टिकोणातूनच आम्ही या प्रश्नाची तपासणी सुरू केली आहे. आम्ही ही तपासणी केवळ भूगोलाच्या हितासाठीच करत नाही, तर भूगोलविषयक ज्ञानाच्या प्रगतीतून अशी काही मूल्ये निर्माण होतील, की ती प्रात्यक्षिकांनी सिद्ध करण्याची जरुरीच रहाणार नाही, हे गृहीत धरून आम्ही ही तपासणी करत आहोत. अभ्यासकाचा हेतू ती सामग्री कोणत्या विशिष्ट अभ्यास-तंत्राच्या चौकटीत बसवण्याचा असो, किंवा अन्यथा लटपटीत असलेल्या भूगोलाला एका विशिष्ट अर्थाने ' शास्त्र ' या पदवीसाठी दावा करता यावा असे सामर्थ्य भूगोलाला मिळवून देणे हा हेतू असो, सामग्री निवडून घेण्याच्या आमच्या अधिकारावर कोणत्याही बाह्य हेतूचे दडपण आम्ही मान्य करणार नाही, तेही याच आधारावर. ज्या अर्थाने काही अन्य ज्ञानशाखांना ' शास्त्र ' ही पदवी प्राप्त झाली आहे त्याच अर्थाने ' शास्त्र ' ही पदवी प्राप्त होण्याच्या सर्व आशा फोल व्हाव्या असेच आमच्या काही ज्ञानांशांचे स्वरूप असले तरीही भूगोलाने भूगोलविषयक ज्ञान देण्याचेच लक्ष्य पुढे ठेवले पाहिजे. भूगोलाभ्यासकानेही भूगोलविषयक सामग्री तपासून पहाता येईल अशा रीतीने आपल्या पद्धतींना मुरड घालावयाची आहे, न होऊन आपल्या पद्धतींच्या साच्यांत बसेल अशीच सामग्री निवडत बसावयाचे नाही. हाच निष्कर्ष स्पष्ट शब्दांत असे सांगता येईल, की " गृहीत सामग्री निवडण्याची कसोटी भूगोलाच्या मूलभूत संकल्पनेतूनच तर्काने सिद्ध झालेली असली पाहिजे. "

भूगोलाच्या मूलभूत संकल्पनेबाबतच ज्या भूगोलकारांत दुमत आहे त्यांच्यात अभ्यासासाठी कोणत्या घटना मान्य कराव्या अगर कोणत्या अमान्य कराव्या याबाबत एकमत होण्याची अपेक्षा करणेच चुकीचे आहे ! पण, आम्ही आधीच सांगितले आहे त्याप्रमाणे,

सुदैवाने, जिला आम्ही क्षेत्रभेदवर्णनी संकल्पना असे नाव दिले आहे, ती संकल्पना मान्य असल्याबाबत बहुसंख्य भूगोलाभ्यासकांत लक्षणीय एकमत आहे. अशा भूगोलकारांत जर्मनीतील बहुतेक सर्व आणि आपल्या देशातील पुष्कळसे भूगोलकार यांचाही समावेश आहेच. हे भूगोलकार जे एकप्रकारचे विधान वापरतात ते विधान हेटनरने रिक्टोफेनच्या अभ्यासावरून काढलेल्या निष्कर्षाच्या विधानासारखेच आहे. भूगोलात भूपृष्ठावरील क्षेत्रीय भेदाभेदांचा अभ्यास व्हावयाचा असतो–म्हणजेच, तो वेगवेगळ्या खंडांतील *, देशांतील, प्रांतातील वा स्थानांमधील भेदांचा अभ्यास असतो (१६१, १२३ ; c/o सॉर २११, ८४).

आपल्या रहात्या ठिकाणापासून वीस मैल प्रवास करणाऱ्या कोणाही व्यक्तीच्या लक्षात आलेले असते, की स्थानांस्थानांमध्ये भेद असतातच. म्हणून, हे भेद म्हणजे " सहजपणे हाती आलेली " वस्तुस्थिती असते. तसेच कोणाही विचारवंतांच्या लक्षात येऊन चुकते, की ते भेद म्हणजे वस्तुस्थितींच्या स्वतंत्र चक्रांतून निर्माण झालेल्या घटना नसतात, तर त्यांचे अन्योन्यसंबंध असतात आणि तेच संबंधयोग काय असावेत हे समजून घेण्याच्या तीव्र इच्छेने मानवाचे कुतूहल जागृत होते.

ज्याचे जगासंबंधीचे ज्ञान स्वतःच्या रहात्या-ठिकाणापुरतेच मर्यादित असते आणि जगाचे इतर भागही जवळ जवळ आपल्या या क्षेत्रासारखेच असले पाहिजेत असे जो गृहीत धरत असतो, त्याच्या मनावर या अशा लहान-क्षेत्रातही पडणाऱ्या भौतिक व अभौतिक अशा दोनही प्रकारच्या घटकांतील फरकांचा निःसंशयपणे खूपच प्रभाव पडल्याशिवाय रहाणार नाही. जमिनीच्या उतारांत, पाणलोटांत मृत्तिकेची विशेष रूपे आणि शेतमळ्यांची उत्पादनक्षमता आणि मळेकऱ्यांची सापेक्ष सधनता या सर्वच बाबतीत मोठे फरक त्याच्या नजरेस पडण्याची शक्यता आहे. रिओ ग्रँडं नदीच्या मुखाकडील खोऱ्यातील रहिवासी असेल तर नदीच्या दोन्ही तीरांवरील सांस्कृतिक स्वरुपांतील भेद निश्चितच त्याच्या नजरेस पडलेले असतील. पूर्व युरोपातील अथवा चीनच्या बऱ्याच भागातील पुष्कळशा शेतकऱ्यांच्या दृष्टीने जगातील सर्वात मोठे फरक तो रहात असतो त्या ग्रामीण भागात आणि स्थानिक पुरात किंवा नगरात दिसून येतात. इकडील ग्रामीण आणि नागरी पर्यावरणातील हे फरक जगाच्या पाठीवर दिसणाऱ्या सर्वात मोठ्या फरकात गणना करावी असे आहेत, ही गोष्ट अगदी खरी आहे. त्या भेदांत लोकवस्तीची घनता आणि इमारतीची संख्या व त्यांचे स्वरूप येवढ्या बाबतीतील फरकांचा समावेश होतो असे नाही, तर लोकवस्तीच्या स्वरूपातील फरकांचा, म्हणजेच नागरी व ग्रामीण नमुन्यांतील विरोधांचाही–उदा. " शहरी भामटा " व " अडदांड खेडूत " यांचाही–त्यातच समावेश होतो.

उलटपक्षी काहीशा दूरवर प्रवास करणाऱ्या निरीक्षकास, मग हा प्रवास प्रत्यक्ष स्वरुपात असो, की वाचनद्वारा अप्रत्यक्ष स्वरूपात केलेला असो, असे कळून चुकते, की बऱ्याच विस्तृत प्रदेशात प्रायः एकरूप असणारे काही घटकही जगाच्या विविध भागात बऱ्याच मोठ्या प्रमाणात बदलत असतात. अशा घटकांत हवामान, नैसर्गिक वनस्पती, प्रमुख भूरुपे, प्रमुख मृत्तिकाप्रकार, प्रमुख शेतीप्रकार, आणि लोकवस्तीतील पुष्कळसे सांस्कृतिक गुणविशेष यांचा समावेश होत असल्याची शक्यता असते.

* " क्षेत्रीय भेदाभेद " या संज्ञेकरता पुरवणी टीप क्र. ३५ पहा.

या सर्वच विचारणीय बाबी इतक्या सर्वसामान्य झाल्या आहेत, की कोणाही भूगोलाभ्यासकाला यत्किंचितही न कचरता, त्या बाबींपासूनच आपल्या अभ्यासाची सुरुवात करण्यास हरकत नाही. सामान्यतः तो हे ओळखून असतो, की या सर्व भेदांत अंतःसंबंध असतात. आणि म्हणूनच, ज्या प्रदेशातील मूलभूत रूपधेये त्या प्रदेशाच्या विस्तृत क्षेत्रातही प्रायः एकरूप असतात अशा क्षेत्रात, वा प्रदेशात इतर रूपधेयांपैकी पुष्कळशा, पण सर्व नव्हे, रूपधेयांतही बव्हंशी एकरूपता असतेच. म्हणूनच, कदाचित अगदी अबोधपणे, त्याच्या हेही लक्षात येईल, की अशा क्षेत्रांपैकी प्रत्येकाच्या एकूण घटनासंचातून एक आगळे स्वरूप निर्माण होत असते, हे रूप अद्यापी व्याख्याबद्ध केले नसले तरी त्या प्रदेशाच्या विस्तृत क्षेत्रावर पसरलेले असते, आणि ते रूप काही महत्त्वाच्या बाबतीत शेजारच्या कोणत्याही रूपापेक्षा भिन्न असते.

उदाहरणासाठी, ब्रेस्लाच्या परिसरात रहाणारा आणि आग्नेय दिशेने ओडरच्या उगमाकडील मैदानातून उगमाकडील खोऱ्याकडे संथपणे प्रवास करणारा, एक जर्मन तरूण शेतकरी विचारात घेऊ. काही अंतर चालून जाईतोपर्यंत तरी आपल्या गावाकडील प्रदेशात जी विशेष लक्षणे आढळतात तशीच लक्षणे येथेही त्याच्या नजरेस पडत आहेत. राय, गहू, ओट यांची शेते, लोएस मातीच्या सपाट मैदानात दिसणारे बटाटे व साखरी-बीटच्या लागवडी या सगळ्याच गोष्टी त्याला अगदी घरच्या सारख्याच वाटतील. शहरातील काटकोन चौकोनाकृती मंडई असलेला पेठभाग अगदी जुन्या गाव भागाबद्दलचे, जुन्या तटाच्या आतल्या बाजुने, व बाहेरच्या बाजुनेही, जाणारे दुहेरी लंबगोलाकार रस्ते आणि कानावर पडणारी जर्मन संभाषणे, यातील काही तपशील अपरिचित असले तरी, या सर्वच गोष्टी त्याला सांगत होत्या, की ' तू अद्याप आपल्या प्रदेशात, अगदी मायदेशातच (Heimatgebeit) आहेस '. पण तो तसाच त्या मैदानातून आणखी पुढे जाऊ लागल्यावर (अर्थात्, ओडरच्या पूर्व-तटावरून) काही महत्त्वाचे फरक पडत असल्याचे त्याच्या लक्षात येईल. आता शेते तितकीशी सुपिक राहिलेली नाहीत, गहू आणि साखरी-बीटच्या लागवडीचे प्रमाण कमी होत चालले आहे, त्या ऐवजी देवदारी अरण्यांचे बरेच मोठे विस्तृत भाग दिसू लागले आहेत. तो शेतकरी मोठा चाणाक्ष असल्याने, मृत्तिका रवाळ होत चालल्याचे त्याच्या नजरेतून सुटत नाही. आणि या बदलांशी गुंतलेले संबंध-योग समजून घ्यावयाला कोणा भूगोलाकाराची मदत घ्यावयाची गरज भासत नाही. पण त्याबरोबरच, आणि कदाचित् अगदी प्रथमच, हे लोक आपल्या ' गाववाल्या ' लोकांसारखे दिसत असले तरी, आणि पुष्कळसे आपल्या पद्धतीनेच रहात असले आणि काम करत असले, तरीही आपल्या नजरेला ते काही वेगळेच दिसत आहेत, हे त्याच्या लक्षात येते. कारण हे लोक पोलिश भाषा बोलू शकतात, आणि आपण आतापर्यंत टिपलेल्या बदलात हाच सर्वात महत्त्वाचा बदल आहे. चला आपणही आता या प्रवाशाबरोबरच पुढच्या टप्प्यावर जाऊ या. कुंपण

नसलेल्या त्या शेतांतून असाच भटकताना, तो नकळत मर्यादा ओलांडून गेला असण्याची शक्यता आहे. या शेतांतील ती हद्द ओळखणे कठीणच आहे. पण, राजकीय नकाशांत ती अगदी स्पष्टपणे दाखविलेली असते. येथेही ती रेषा खांबांच्या रांगेच्या रूपाने नजरेला पडत असतेच. (तो स्वतःच एक नजरेत भरणारी वस्तू असल्याने, हे त्याचे अतिक्रमण धोक्याचे ठरण्याची शक्यता आहेच. तरी त्याला कोणी पाहिलेले नाही असे आपण समजू या). पण, आपण आता दुसऱ्याच कोणत्या देशात येऊन पोहोचलो आहो, येथे शेतकामकरी पोलिश भाषा बोलत आहेत, इतकेच नव्हेतर सर्व दुकानदार आणि शाळेतील व सरकारी इमारतींतील सर्वच लोक पोलिश भाषाच बोलत आहेत. आमच्या प्रवासी शेतकऱ्याने इथेच वसती करून रहावयाचे ठरविले, तर त्याच्या हेही लक्षात येईल की, आपली पीके आता आपल्याला ब्रेस्लाच्या पेठेला पाठवावयाची नसून ती काटोविसच्या बाजारात विकावयाची आहेत. तसेच तो आणि त्याचे कुटुंबीय यांची केवळ आर्थिकदृष्ट्याच नव्हे तर सामाजिकदृष्ट्याही जर्मनीपासून फारकत झाली आहे, आणि ते आता पोलंडमधल्या वस्तुस्थितींशी निगडित झालेले आहेत. त्यांच्या जीवनांवर यापुढे बर्लिनचा प्रभाव पडणार नाही, तर आता ते वॉरसॉच्या प्रभाव क्षेत्रात गेलेले आहेत. लष्करीसेवेसाठी त्याची मुले ऱ्हाइनलांडमध्ये जाणार नसून, त्यांना आता, कदाचित्, रशियाच्या सरहद्दीवर जावे लागणार आहे. थोडक्यात आपण ज्या देशात आलो आहो तो आणि जो देश आपण सोडला तो, या दोन देशांतील सर्वात महत्त्वाचा भेद हा आहे की हा पोलंड आहे आणि तो जर्मनी होता, हे लक्षात येण्यास त्याला फार काळ घालवावा लागणार नाही. (८/० ३५५ व ३५६).

इतिहास क्षेत्रातील तत्सम, पण काल्पनीक, घटना विचारात घेणेही उद्बोधक ठरेल. निरनिराळ्या लेखकांनी वर्तमान काळातील व्यक्तीला त्याच्या मूळठिकाणी स्थिर ठेवून एखाद्या पूर्वकालीन कालखंडात नेऊन सोडण्याचा ललित साहित्यिक उपाय योजून पाहिलेला आहे. ती 'एवं गुणविष्ट' व्यक्ती इतिहासाभ्यासासाठी उपयोगी असणाऱ्या कोणत्या घटनांची भर टाकू शकेल ? इतिहासकार या व्यक्तीकडे त्या कालखंडाची खास लक्षणे मानता येतील अशा रूपांसंबंधी विचारणा करील. त्या कालखंडाच्या अन्य लक्षणांशी काहीच लागाबांधा नसलेल्या प्रासंगिक बदलांच्या संबंधात तो विचारणा करणार नाही, तर ज्या घटनांचा भूतकालखंडातील वा भावी कालखंडातील घटनांशी 'अर्थवाही' संबंध असण्याची शक्यता आहे अशा घटनांबद्दलच विचारणा करील. एक गोष्ट उघड आहे की, इतिहासदृष्ट्या 'अर्थवाही' अशा कोणत्या गोष्टी आहेत हे सांगणे पुष्कळदा अवघडच असते. पण, ही अडचण दूर करण्यास उपयोगी पडेल असा एकही निर्णायक नियम आपल्याकडे नाही, ही गोष्ट इतिहासकारांना या पूर्वीच कळून चुकली आहे. तेव्हा, हुषारीने या अडचणीशी सामना देण्याशिवाय गत्यंतरच नाही.

## ब–गृहीत सामग्रीच्या निवडीच्या कसोट्या

गृहीत सामग्रीच्या निवडीसाठी भूगोलाकाराने लावावयाच्या कसोटयांचे विधान हेटनरने दोन अटींच्या परिभाषेत केले आहे. या अटींची ऐतिहासिक अभ्यासांवर मर्यादा घालण्याच्या अटींशी तर्कसिद्ध संगती लागते. (१६१, १२९ ।). त्याचे विवेचन भाषांतररूपाने पुढे सादर केले आहे. त्याचे हे मत जर्मन भूगोलकारांनी, बहुसंख्येने नसले तरी, बऱ्याच मोठ्या संख्येने, नंतर ते मान्यही केले. हे मत हेटनरने प्रथम १९०५ मध्ये प्रकाशित केले. (१२६, ५६१). या प्रश्नावरील त्याच्या मतांचे अनुकरण, ग्राडमान, हासिंगर, बान्झ, इयोल्श, मौल व आणखीही अशाच पुष्कळांनी केलेले आहे, हे यापूर्वीच आम्ही सांगितले आहे.

" एक अट अशीः–स्थानपरत्वे होणाऱ्या स्थित्यंतराबरोबरच एकमेकाशेजारी वसलेल्या अनेक गोष्टींचे लाभलेले स्थानीय साहचर्य असणे म्हणजेच भौगोलिक जटिलांची किंवा क्रमबंधांची उपस्थिती असणे ; उदाहरणार्थ, पाणलोटांचा क्रमबंध, वातावरणस्थ अभिसरणाचा क्रमबंध, व्यापारी क्षेत्रे आणि इतर क्रमबंध. भूपृष्ठावरील कोणतीही घटना तिच्या पुरतीच विचारात घ्यावयाची नसते, ती घटना पृथ्वीवरील अन्य स्थळांच्या संदर्भात रचलेल्या संकल्पनेतूनच ती समजून घेणे शक्य होते. दुसरी अट अशी :–निसर्गाची विविध प्रभावक्षेत्रे आणि त्यांच्यातील विविध घटनांचे एकाच स्थळी होणारे एकत्रीकरण, यांच्यात कार्यकारण संबंध असणे, ज्यांचे लागेबांधे त्या स्थळाच्या अन्य घटनांशी असत नाहीत किंवा त्यांचे संबंध असलेच तर ते आम्हाला मान्य होत नाहीत, अशा घटना भौगोलिक अभ्यासक्षेत्राचा भाग असत नाहीत. भूपृष्ठावरील ज्या परिस्थिती स्थानपरत्वे भिन्न असतात, आणि ज्यांचे स्थानीय भेद अन्य घटनांच्या संदर्भात अर्थपूर्ण असतात, अशा वस्तुस्थितीच " अशा प्रकारच्या अभ्यासासाठी योग्य व आवश्यक असतात, " किंवा भौगोलिकदृष्ट्या परिणामकारी असतात. " (रिक्टोफेनने पुढे दिलेल्या कसोटीची ही सुधारून वाढवलेली आवृत्ती आहे, हे स्पष्ट आहे. " ज्या प्रमाणात त्यांचे भूपृष्ठाशी संबंध ओळखू येण्यासारखे असतील, त्याप्रमाणात " (७३, २७ ; c/o पेंक १६३, ३७).

" निसर्गाची वेगवेगळी प्रभावक्षेत्रे (अर्थात् सत्यस्थितीतील) आणि त्यांच्या आविष्काराचे विविध प्रकार, त्यांचे अन्योन्य संबंधांतील अस्तित्व आणि त्यांची परस्परांवरील परिणामक्षमता यांच्या आकलनाद्वारे भूक्षेत्र व स्थान परिसर यांचे स्वरूप ओळखणे, आणि खंडे, भूक्षेत्रे, प्रदेश व स्थानपरिसर यांच्यातून दिसणारी संपूर्ण पृथ्वीच्या पृष्ठांची नैसर्गिक (सत्यस्थितींतील) रचनात्मक संकल्पना यांची ओळख करून घेणे हेच भूगोलाच्या वंटनाधिष्ठित संकल्पनेचे अंतिम ध्येय आहे.

" या दोन दृष्टिकोणांच्या उपयोजनातच भूगोलाचे खरे स्वरूप लपलेले आहे. ज्याच्या रक्तामासांत हे दोनही विचार भिनलेले असत नाहीत त्याला भूगोलाचा आत्माच गवसलेला नसतो. तसेच जो इतिहासकार कालक्रमांची चौकशीच करत नाही, किंवा विविध विकास गटांचे आंतरिक संबंध लक्षातच घेत नाही, त्याला इतिहासाचा आत्मा सापडला असे म्हणता येणार नाही. या संकल्पनेवरून एक गोष्ट निश्चित होते ; सामग्रीची निवड करताना घटनांचा कार्यकारणसंबंध आधीच लक्षात घेतलेला असतो, हे येथे गृहीत धरलेले आहे. ज्ञानाचा जसा विकास होत जाईल तसे वस्तूस्थितीचे संपूर्ण संचच भूगोलाला उपकारक आहेत म्हणून मान्य करता येतील अथवा निरूपयोगी म्हणून त्याज्य समजणे शक्य होईल. अर्थातच, कार्यकारणसंबंधांच्या मल्यूमापनातील व्यक्तिनिष्ठ भेदांच्या प्रमाणात भूगोलाचा परीघ वेगवेगळ्या प्रकारे कल्पिला जाईल. पण, अगदी अशाच प्रकारचे चढउतार इतिहासनिष्ठ व क्रमबद्ध शास्त्रांतूनही होत असलेले दिसून येतातच. म्हणून, सामग्रीच्या निवडीबाबत तत्त्वांवरील कोणतेही आक्षेप त्यांचे त्या चढउतारांचे परिणाम म्हणून घेतले गेलेले आहेत असा गैरसमज करून घेऊ नये. वस्तूस्थितींचे कोणते भौगोलिक संच कोणत्या दुसऱ्या संचांचे परिणाम अगर कारणे आहेत, हे ओळखण्याचे ज्ञान एकदा एखाद्याला झाले म्हणजे सामग्रीची त्याची निवड एका सुटया वस्तुस्थितीवर अवलंबून रहात नाही, तर वस्तुस्थितींच्या संपूर्ण संचावर अवलंबून रहाते. कोणत्याही वस्तूस्थितीची भौगोलिक अटी पूर्ण करण्याची क्षमता (conditionality) आधी लक्षात आल्यानंतर तेवढ्याच विशिष्ट वस्तुस्थिती भूगोल निवडून घेतो असे नाही, तर वर्णनरूपाने प्रथम त्याची भौगोलिक परिस्थिती प्रस्थापित करतो, आणि मगच त्यांच्या कार्यकारणसंबंधांच्या चौकशीच्या कामास सुरूवात करतो. अर्थात, ज्यांचे कार्यकारणसंबंध अद्यापी स्पष्ट झालेलेच नाहीत अशा काही वस्तुस्थिती नाइलाजाने आत घेतल्या गेल्या आहेत असे घडण्याची अगदी शक्यता असतेच ".

" या संकल्पनेनुसार सामग्रीची बहुविधता खरोखरीच मोठी असून ती सतत वाढतच असते. सतत वाढत जाणाऱ्या वस्तुस्थितींच्या संच संख्यातूनच स्थानपरिसराच्या स्वरूपातील भौगोलिक लक्षणे पूर्ण करण्याच्या क्षमतेचा शोध प्रगत ज्ञानाला लागतो. अद्यतन भूगोलात काही घटनांबरोबरच काही भौतिक परिस्थिती, नैसर्गिक वस्तुस्थितींबरोबरच सामाजिक जीवनातील वस्तुस्थिती या सर्वांचाच समावेश होतो. तरीही भूवंटनात्मक दृष्टिकोणातूनच या सर्वांचा समावेश केला जावयाचा असतो ; आणि म्हणूनच त्या परिसराची कित्येक वैशिष्ट्ये व लक्षणे डावलणे शक्य होते. कदाचित् त्याच वस्तू इतिहासात्मक शास्त्रांच्या व भौतिक शास्त्रांच्या दृष्टीने आत्यंतिक महत्त्वाच्या असण्याची शक्यता आहे. तसेच पृथ्वीतलावर सर्वत्रच समस्वरूप दिसणाऱ्या गोष्टी किंवा ज्यांच्यातील स्थानिक भेद कोणत्याच वंटननियमाला धरून असत नाहीत, अशा सर्व वस्तू वगळणे शक्य असतेच. शिवाय, निदान आपल्या समजुतीप्रमाणे, ज्यांच्यातील स्थानिक भेदांचा अन्य घटनासंचांशी कोणताच संबंध असत नाही अशा सर्व गोष्टी त्या अन्य वस्तुस्थितीसंचांबरोबरच आपण वगळू शकतो. "

जाताजाता, व्हीडाल-डी-ल-ब्लाख या फ्रान्समधील आधुनिक भूगोलाच्या संस्थापकाचे असेच काहीसे उद्‌गार आपण लक्षात घेण्यासारखे आहेत. " भूगोल हे स्थळांचे शास्त्र आहे, मानवांचे नव्हे. काही घटनाच अशा असतात, की त्या घटना घडल्या नसत्या तर काही देशांचे काही गुण व काही सुप्तशक्ती उजेडात आल्याच नसत्या अथवा कार्यकारी झाल्या नसत्या, म्हणजेच त्या अनुद्भूत स्थितीतच पडून राहिल्या असत्या ; अशाच ऐतिहासिक घटनांची भूगोलाला गोडी वाटते. (१८३, २९९).

भिन्नता, किंवा अभ्यासविषयावरील ही मर्यादा भौतिक वस्तूंवरील मर्यादेपेक्षा वेगळी आहे ; आणि शास्त्र या नात्याने भूगोलाच्या तर्कसिद्ध अधिष्ठानावर आधारलेली आहे. तसेच, त्याच्या ऐतिहासिक विकासावरही ती आधारलेली आहे. भूपृष्ठाचे एक स्वतंत्र वंटनशास्त्र असावे अशी गरज दोन प्रकारच्या परिस्थितींतून निर्माण झाली आहे. (१) एका व एकाचप्रकारच्या घटना चक्रातील ज्या वस्तुस्थिती स्थानदृष्ट्या एकमेकांच्या निकटसाहचर्यात असतात. त्या एकमेकाशेजारी एकाकी पडून रहात नाहीत ; आणि (२) भिन्न घटना चक्रातील वस्तुस्थिती पृथ्वीवरील कोणत्याही एका ठिकाणी जुळून आल्या असतील तर त्यांच्यात कार्यकारणसंबंध जडलेला असतोच. अर्थात, त्या दोन्ही मिळूनच त्या क्षेत्राचे स्वरूप निश्चित करतात. म्हणून, या दोनही दृष्टिकोणांचे उपयोजन करणे जितके शक्य होईल तितका पृथ्वीपृष्ठावरील सर्व घटनांवर आपल्या अभ्यासाचा विस्तार करणे भूगोलकाराच्या दृष्टीने उचितच असते. (१२६, ६८३).

आपल्याला असेही म्हणण्यास हरकत नाही, की भूगोलाभ्यासक कोणत्याही एका प्रदेशातील घटनांची व्यवस्था आणि त्यांचे संबंधयोग यांचाच विचार करत असतो. भौगोलिकदृष्ट्या विचार करावयाचा याचा अर्थ, कोणत्याही घटनेचा विचार आपल्यापरी स्वतंत्र वस्तू म्हणून न करता त्याप्रदेशाचे भेदाभेदात्मक स्वरूप निश्चित करणारा एक घटक म्हणूनच त्या घटनेचा विचार करावयाचा, असा होतो. एखादी घटना एखाद्या क्षेत्रात अस्तित्वात असते. पण त्या क्षेत्रातील कोणत्याच घटनेशी तिचा संबंध असत नाही. उदाहरणार्थ–पार्थिव चुंबकत्व ही सर्वसाधारण घटना, (अर्थात, स्थानिक खनिजांमुळे अविकृत असलेले चुंबकत्व). अशा घटनेला क्षेत्रीय संबंध-योगच असत नाहीत असे म्हणता येईल, आणि म्हणून भूगोलाशीही तिचा संबंध पोहोचत नाही.*

## क–कसोट्यांचे उपयोजन

वर विधानरूपाने सांगितलेल्या कसोट्यांत अनुस्यूत असलेल्या तीन विशिष्ट संकल्पनांवर आपण प्रथमपासूनच पुरेसा भर दिला, तर त्या कसोट्यांचे उपयोजन करण्यासाठी कित्येक व्यवहारोपयोगी निष्कर्ष काढणे शक्य होईल. या संकल्पना अशा :– (१) पृथ्वीशी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे निगडित असलेल्या बहुविध प्रकारच्या घटनांचे अन्योन्यसंबंध ; (२) पृथ्वीवरील वेगवेगळ्या क्षेत्रांत दिसणारे या घटनांचे बदलते स्वरूप आणि त्यांनी निर्माण

* पुरवणी टीप क्र. ३६ पहा.

केलेली जटिले ; आणि (३) त्या घटनांचे वा जटिलांचे क्षेत्रीय आविष्कार. भूगोल हा जगातील क्षेत्रीय भेदाभेदाचा अभ्यास आहे, या मूलभूत व्याख्येच्या आधारे तर्काने एक गोष्ट सिद्ध होते–आणि सामान्यतः परिपाठातही त्याचाच अवलंब केला जातो–की, या सर्व, म्हणजे या तीनही, संकल्पनांच्या दृष्टीने ज्या घटना अर्थपूर्ण असतात, अशा घटनांचेच वर्णन व अर्थशोधन भौगोलिक अभ्यासांतून व्हावयाचे असते.

ग्राडमानने पुढील मुद्दाही स्पष्ट केला आहे. " घटनांचे अन्योन्यसंबंध किंवा परस्परावलंबन (Zusammenhang) असण्याच्या अटीतून भौगोलिक अभ्यासवस्तू निवडण्याची एक खास पद्धती मिळते ; आणि त्यामुळे, " केवळ कुतूहलजनक गोष्टी एकत्र आणण्याची पूर्वापार व लोकप्रिय, पण कृतिशून्य व स्वैर पद्धतीला रजा देता येते. एखादी स्वतंत्र वस्तुस्थिती निकटवर्ती घटनाचक्रात–कार्यभावाने वा कारणभावाने वा दोनही प्रकारे, पुढून वा मागून वा पुष्कळबाजूनी व आंतरिक संबंधांनीही–जितक्या प्रमाणात गुंतून गेलेली असते तितक्या प्रमाणात तिचे महत्त्व वाढून ती भूगोलाभ्यासात प्रवेश करत असते. " (१४४, ८).

दुसऱ्या शब्दांत सांगावयाचे तर, हे श्लूटरच्या युक्तिवादाला दिलेले उत्तर आहे. श्लूटरचा युक्तिवाद असा :– " एखाद्या सांस्कृतिक भूदृश्यातील भौतिक वस्तुस्थितींचे जसे तपशीलवारसंबंध घालता येतात, तसे अभौतिक सांस्कृतिक घटनांच्या तपशीलांचे संबंध नैसर्गिक घटकांच्या तपशीलांशी घालता येत नाहीत " (१४५, २९ I). श्लूटरच्या या युक्तिवादाला पुढीलप्रमाणे उत्तर देता येईल. " सापेक्ष प्रमाणात सत्य असलेले हे विधान युक्तिवाद म्हणून मान्यच आहे ; आणि तेवढ्याच प्रमाणात त्याचे उपयोजनही करावयाचे आहे. " पण, कारखान्यांच्या इमारती, सामान्येकरून शहरे, किंवा लोकवस्तीचे वितरण या अशा वस्तुस्थिती आहेत, की त्यांच्या तपशीलांची संगती नैसर्गिक घटकांच्या सर्वच तपशीलांशी लावता येत नाही. जेवढ्या प्रमाणात आपली दक्षिणेकडील शहरे उत्तरेकडील शहरांपेक्षा लक्षणांनी अगदी भिन्न आहेत, आणि लक्षणभेद अन्य प्रादेशिक कारकांशी संबंधित आहेत तेवढ्यापुरतीच दक्षिण आणि उत्तर या प्रादेशिक तुलनेत महत्त्वाची आहेत. उत्तर व दक्षिण अशी तुलना करताना, त्यात दक्षिणेकडील वेगळ्या प्रकारच्या शेतीला जे महत्त्व आहे ते महत्त्व त्यांना दिले जाणार नाही ; कारण या शेतीचे तिकडील विशिष्ट हवामान, मृत्तिका, लोकसंख्या-रचना (population structure) यांच्याशी कितीतरी अधिक जिव्हाळ्याचे संबंध आहेत. तरीही अन्य प्रादेशिक लक्षणांशी कमी संबंध दाखविणाऱ्या स्वाभाविक घटना केवळ उपचार म्हणून वगळण्याची गरज नाही. त्यांचे आंतरसंबंध सापेक्षतः अल्प असल्याने त्यांचे भौगोलिक महत्त्व आपोआपच कमी होते ; आणि हाच निष्कर्ष रिक्टोफेननेही स्पष्टपणे सूचित केलेला आहे. (७३, ६३-६५).

या मुद्यावर काही वाचक असा आपेक्ष घेतील, की येथे तो भेसूर परिसरवाद आपले डोके वर काढण्याच्या विचारात आहे. आणि अमेरिकी भूगोलात संबंध योगावर दिला गेलेला अवास्तव भर पाहून, कोणत्याही घटनेचे तिच्या संबंध योगांच्या संदर्भातच परिशीलन केले पाहिजे, या कल्पनेनेच ज्यांच्या मनात त्याविरूद्ध धास्ती निर्माण झाली आहे, ते आमच्याशी काडीमोड करायलाच तयार होतील.–पण, असे करताना श्लूटर व पेंक हेही या संकल्पनेवरच आपल्या विषयाचे विवेचन करत असताना अवलंबून रहातात, याची दखल घेण्याचे भानही त्यांना रहायचे नाही. आमच्या इतिहासाच्या सर्वेक्षणावरून असे दिसून आले, की अगदी सुरूवातीपासूनच, आंतरसंबंध असलेल्या विविध प्रकारच्या घटनांचा अभ्यास करण्यातच भूगोलकार लक्ष घालत आले आहेत ; आणि कोणाही ' केवल भूदृश्यवादी ' अभ्यासकाला त्याच्या भूदृश्यात मिळणाऱ्या वस्तुस्थितींचा, त्यांच्या संबंधयोगांची चर्चा न करताच, अन्वयार्थ लावणे शक्य होत नाही, कोणत्याही घटना भौगोलिकदृष्ट्या अर्थपूर्ण होण्यासाठी त्यांचे आंतरसंबंध अन्यप्रादेशिक घटनांबरोबर कार्यकारण भावाने जोडलेले असणे आवश्यक आहे ; असा आग्रह धरला म्हणून " भूगोल संबंधयोगांचा अभ्यास आहे " अशी भूगोलाची व्याख्या आम्ही केली असे होत नाही. ' चुन्याचा उपयोग केल्याशिवाय विटांचे घर बांधता येत नाही ', असे म्हणणे म्हणजे ' घर चुन्याचेच बनलेले असते ' असे म्हटल्यासारखे होत नाही. " काही थोडेसे फरक करून ब्रून्हेसच्या कल्पनांचेच समर्थन करतो, म्हणजेच " घटनांच्या परस्परावलंबनांचा अभ्यास या व्याख्येचे समर्थन हेटनर करतो, असा मिशोटेने केलेला उल्लेख या गैरसमजातूनच झालेला असावा. (१८९, १२ या पानावरील तळटीप).

वरच्या यादीत असलेली दुसरी अट अशी : पृथ्वीच्या विविध भागांच्या संदर्भात बदलत जाणारे त्या घटनांचे भेदाभेदात्मक स्वरूप. ही अट या ऐतिहासिक विकासक्रमातून सिद्ध झालेल्या केवळ मूलभूत व्याख्येवरच आधारलेली आहे असे नाही. आणि तसाच आग्रह असल्यास, ती तितकीच व्यावहारिक ज्ञानावरही आधारलेली आहे. (c/o तसेच सॉडर २०९, १७). उदाहरणार्थ : रोमन काळातही लोकांना आपल्या जीवनाचा बराचसा काळ झोपून काढण्याची गरज भासली, उन्हाळ्यापेक्षा हिवाळ्यात अधिक कपडे घालण्याची त्यांना जरूरी वाटली ; आणि सामान्यतः आपल्या संततीचे कल्याण व्हावे यासाठी या काळच्या वत्संल-माताही झटत असत, हे रोमन युगाच्या इतिहासकाराने आम्हास सांगण्याची गरजच नसते. तसेच, जगाच्या कोणत्याही विशिष्ट प्रांताचा अभ्यास करणाऱ्या भूगोलकाराने जगातील सर्वच भूक्षेत्रातून आढळणारी सार्वत्रिक साधारण सत्यस्थिती, त्या देशाच्या संदर्भात, आम्हाला सांगत बसण्याची गरज नाही. तो जर शेतीप्रधान क्षेत्राचे वर्णन करत असेल, तर तेथील लोक ज्यात गुरेढोरे बांधली जात नाहीत अशा जमिनीवर बांधलेल्या पक्क्या इमारतीत रहात असतात, असे आम्हाला गृहीत धरून चालण्यास काहीच हरकत नाही. परिस्थिती जेव्हा वेगळी असते तेव्हा त्यातील अपवादात्मक बाबींचेच वर्णन केले जाणे आवश्यक असते.

ही विधाने अगदी हास्यास्पद ठरावीत इतकी स्पष्ट आहेत. तरीही ' भूगोल हा दर्शनीय भूदृश्याचा अभ्यास असतो ', या व्याख्येतून काढलेल्या काही अगदी तर्कसिद्ध निष्कर्षांच्या खंडनांसाठी ती आवश्यकच आहेत. भूदृश्य संकल्पनेचा ज्याने अगदी तर्कशुद्ध मार्गांनी अवलंब केला असा ग्रान्यो हा कदाचित एकटाच अभ्यासक असावा. ग्रान्योच्या काही तपशीलवार लिखाणावरून सिद्ध करून दाखविता येईल, की वरील विधाने करताना आम्ही काही केवळ अर्थवादाचा आश्रय घेतला नाही. वालोसारी या नावाच्या फिनलंडमधील एका छोट्या ग्रामीण विभागाचा ग्रान्योने तपशीलवार अभ्यास केला आहे. फिनलंड हा देश ज्याने कधी पाहिलाच नाही, अशा कोणा भूगोलकाराचे आपल्याकडील, समजा आयोवातील, अशाच एका प्रांताच्या विरूद्ध स्वरूप असलेल्या तिकडील प्रांताचे स्वरूप समजून घेण्यासाठी सहजच लक्ष जाईल. ग्रान्योने तिकडील वेगवेगळ्या इमारती नकाशावर काळजीपूर्वक दाखविलेल्या आहेत. इतकेच नव्हे तर, अनेक स्वतंत्र नकाशात त्याने निर्जलक्षेत्र आणि वारा व थंडी यांपासून सुरक्षित क्षेत्र–म्हणून या इमारतींनी व्यापलेले पृष्ठभाग दाखविलेले आहेत, असे त्याला आढळून येईल. त्याबरोबरच हेही त्याच्या लक्षात आणून दिले जाईल, की फिनलंडच्या या प्रांतातील पिकाऊ शेतात वाऱ्याचा जोर जितका असतो त्यापेक्षा तो तिकडील अरण्यात कमी असतो. तसेच राईतून आणि कुरणातून जसे व जितके पक्षांचे मंजुळ स्वर कानी पडतात तसे ते घरांच्या जवळ ऐकू येणार नाहीत. यातील प्रत्येक स्थळी येणारे सुगंधही वेगळ्या प्रकारचे असतात हेही त्याला सांगितले जाईल (२५२, १२६-३४). वर दिलेले ग्रान्योच्या अभ्यासाचे वर्णन त्याचा अधिक्षेप करावा या बुद्धीने दिलेले नाहीत, तर तर्कशुद्ध पद्धतीचा अवलंब करून लिहिलेले भूदृश्याचे तपशीलवार वर्णन ; आणि बहुतेक सर्व अभ्यासक जो भौगोलिक अभ्यास म्हणून मान्य करू शकतील असा प्रादेशिक अभ्यासाचा दृष्टिकोन या दोन प्रकारांतील फरक दाखवावा या बुद्धीने केलेले आहे.

क्षेत्रीय भेदाभेदांच्या संकल्पनेने प्रभावित असलेला हा दुसरा दृष्टिकोण, पिकाऊ शेते आणि शेतावरील घर यांमधून मिळणारे भौगोलिक विषय दिले या दोहोंमधील विरोधदर्शक उदाहरण घेऊन, अधिक स्पष्ट करण्यास हरकत नाही. जगाच्या विविध भागांच्या क्षेत्रीय भेदाभेदांच्या परिभाषेत विचार करता, घर हे शेतापेक्षा जास्त नाहीतरी शेता इतके महत्त्वाचे आहे असे केवलार्थाने मान्य करण्यास हरकत नसली, तरीही घराचे महत्त्व पुष्कळ कमी असल्याचे दिसून येते. शेते कोठेही असले तरी, त्यावरील घराबद्दल ते पहाण्यापूर्वीच आम्हाला बरीच माहिती असते. आणि ते पाहूनही त्या प्रदेशाच्या लक्षणांविषयीच्या आपल्या ज्ञानात सापेक्षतः फारच थोडी भर पडते. घर हा शब्द उच्चारल्याबरोबरच ती जमिनीवर उभारलेली एक मानवनिर्मित रचना असून, झोपणे, स्वयंपाक करणे, भोजन करणे, आराम करणे यासाठी आणि बाहेरच्या तापदायक हवेपासून आश्रय मिळावा म्हणून त्याचा वापर होत असतो. तसेच त्या कुटुंबातील काही मंडळी आपले

पुष्कळसे धनोत्पादक कार्य त्यातच करत असतात, या सर्व गोष्टी लक्षात येतात. सर्वत्र घरे म्हटली, की त्यांचे स्वरूप मोठ्या प्रमाणात या त्यांच्या कार्याशी जुळते घेणारे असते. म्हणूनच त्यांच्यांतील कधी किरकोळ असतात किंवा अन्य प्रादेशिक कारकांच्या संदर्भात त्यांचे महत्त्व गौण असते. याचाच अर्थ असा, की शेतजमिनींच्या उपयोगात दिसून येणाऱ्या महत्त्वाच्या व लक्षणीय प्रादेशिक फरकांच्या विरोधात घरांघरांतील फरक गौण असतात. शेतांच्या उपयोगात म्हणजे उत्पादित पिकांत, पेरणी-मळणीच्या पद्धतीत, पदरात पडलेल्या उत्पन्नात व त्यांच्या शेवटी व्हावयाच्या उपयोजन प्रकारातही बराच फरक आढळतो.

या दृष्टिकोणापासून केलेले कोणत्याहीं क्षेत्रातील सत्यस्थितीचे प्रतिपादन निश्चितपणे पक्षपातीच असणार, असा यावर आक्षेप घेतला जाण्याची शक्यता आहे. ज्यांचे वर्णन येथे हेतुपुरःसर टाळलेले आहे अशा सार्वकालिक गृहीत संकल्पनांचीच ज्याच्याजवळ कमतरता आहे, असाच कोणी वाचक अशाप्रकारे केलेला अभ्यास वाचत असेल तरच वरील आक्षेप खरा असू शकेल. प्राचीन काळी फक्त युद्धे—आणि राजकीय-आर्थिक घडामोडी घडत असत असे इतिहासकालीन जीवनाविषयीचे मत जसे एखाद्या अज्ञ वाचकाचे बनण्याची शक्यता आहे, तसाच धोका येथेही संभवतो, ही गोष्ट संशयातीत आहे. इजिप्तच्या फेल्ला शेतकऱ्यांनी गेल्या कित्येक सहस्रकाच्या प्रत्येक वर्षांत नाईलच्या पुराने भिजलेल्या जमिनीतच पेरणी केली, मशागत केली, मळणी केली आहे. तरीही इतिहासाच्या प्रत्येक कालखंडातील लोकांचे जीवनचक्र इतिहासकाराने वर्णन करून सांगावे अशी कोणीच अपेक्षा करणार नाही, तसेच कोणत्यातरी एका विशिष्ट पिढीत दहा लाख नवबालकांचा जन्म झाला, ही ऐतिहासिक वस्तुस्थिती त्यापुढे घडणाऱ्या संपूर्ण इतिहासाचे सार असून देखील त्या वस्तुस्थितीची नोंद करण्याची इतिहासकाराला जरूर वाटत नाही. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर, इतिहासात अशी असंख्य सार्वकालिक सत्ये गृहीत धरलेली असतात. त्याचप्रमाणे भूगोलातही प्रत्येक घर, कमीजास्त प्रमाणात, उन, वारा, पाऊस, थंडी या पासून संरक्षण करते ; शेतकरी दिवसा शेतात राबतात व रात्र घराच्या उबेत घालवतात इत्यादि गोष्टी गृहीत धरण्यास काहीच हरकत नाही.

मात्र, भिन्नतादर्शक कारकांवर भर द्यावयाचा याचा अर्थ, जेवढी असामान्य आणि अपरिचित रूपधेये असतील तेवढ्यांची खोटी अतिशयोक्ती करावयाची, असा नव्हे. क्रेब्जने याची दखल घेतली आहे (२५५, ३४२). एखादे अपवादात्मक रूपधेय आपले लक्ष वेधून घेते, ते कदाचित क्वचितच आढळणारे म्हणून असेल, किंवा इतर प्रदेशांच्या दृष्टीने सर्वसाधारण महत्त्वाचे म्हणून असेल. उदाहरणार्थ :—अॅपॅलॅशियन प्रदेशातील स्विस् बांधणीचे घरकुल (Chalet) कसेही असले तरी, अभ्यासित प्रदेशाच्या संदर्भात त्याचे जितक्या प्रमाणात महत्त्व असते तेवढेच महत्त्व भूगोलकाराने त्याला द्यावयाचे आहे. ' पो ' मैदानाचा भूगोल लिहिताना, भाताचे अगदी किरकोळ उत्पन्नाच्या लहानश्या

भागाचे, केवळ यूरोपात ही गोष्ट दुर्मिळ आहे म्हणून, विस्ताराने वर्णन करण्याचा मोह आवरलाच पाहिजे. नाहीतर, त्यामुळे, मका, गहू व दुभते यांच्या शेतीची, द्राक्षे, फळफळावळे व कवचफळे यांच्या बागायतीशी घातलेली कितीतरी अधीक महत्त्वाची आणि अर्थपूर्ण संगती निरर्थक ठरण्याची भीती आहे. त्याचप्रमाणे, बाल्कनराष्ट्रांचा अभ्यास करणाऱ्या भूगोलकाराने तिकडील तुरळक आढळणाऱ्या तंबाखू शेताकडे, अथवा काझानलिक गुलाब बगीच्यांकडे कमी लक्ष पुरवावे आणि सर्वत्र आढळणाऱ्या मका (Corn) शेतीवर अधिक भर द्यावा."[७७]

वर आलेला शेवटचा मुद्दा हा आपल्या कसोटीत समाविष्ट असलेल्या तिसऱ्या संकल्पनेशी निगडित आहे. या केवल विधानावर जरी एकमत असल्याचे दिसले–श्लूटर व सॉडर यांनी तसे बोलून दाखविल्याचा उल्लेख आम्ही यापूर्वीच केलेला आहे–तरी त्याचा अन्वयार्थ लावण्यात लक्षणीय फरक असल्याचे दिसून येते. श्लूटरने या गुणविशेषाचे मापन सरळसरळ वस्तूच्या कायिक विस्ताराच्या परिभाषेत केले. तसेच वंटनाभ्यासांची भूगोलातून हकालपट्टी करताना, पेंकने असे कारण दिले, की भूगोलाचा संबंध बनस्पतींशी नाही तर अरण्यांशी आहे, प्रत्यक्ष मनुष्यांशी नाही तर त्यांनी भूपृष्ठावर घडविलेल्या परिणामांशी आहे. (१६३, ४४). पण रिटरच्या अभिजात भाषेत सांगावयाचे तर, भूगोलकाराच्या दृष्टीने महत्त्व आहे ते क्षेत्रांना आहे, ते क्षेत्र भरून टाकणाऱ्या प्रत्यक्ष वस्तूना नव्हे. आणि रिटरच्या या वचनाची आठवण क्रेब्जने आपणास करून दिली आहे (२३४, ८३). वास्तविक ज्यांच्या संमेलनाने एक अरण्य तयार होते ते वृक्षही किंवा ज्यांनी ग्रामीण दृश्याचा बहुतांश भाग व्यापलेला असतो ती शेते, अशा कोणत्याही एका प्रकारच्या वस्तूने ते क्षेत्र भरून टाकलेले असत नाही. आणि तरीही त्या विशिष्ट घटनांमुळे ती क्षेत्रे लक्षणीय झाली आहेत असे मानतो, इतकेच नव्हे तर अगदी बिनदिक्कत नकाशावर दाखवतो. शिवाय, एकूण पृष्ठाचा अगदीच किरकोळ अंशभाग व्यापणाऱ्या काही वस्तू अन्य रूपधेयांवरील त्यांच्या परिणामांमुळे इतक्या महत्त्वाला आलेल्या असण्याची शक्यता आहे, की त्यामुळे क्षेत्रीय भेदांभेदांतील त्यांचे अवाढव्य महत्त्व त्यांच्या अवकाशस्थ कायिक व्यापाच्या अगदीच प्रमाणाबाहेर गेलेले असते. उदाहरणादाखल एक गोष्ट आपण यापूर्वीच लक्षात घेतलेली आहे. लुइजानामधील ग्रामीण भागातील गृहप्रकार हाच त्या प्रदेशाच्या वेगवेगळ्या विभागांतील एकेका संपूर्ण भागात विकसित झालेल्या संस्कृतींचा विश्वासू वाटाड्या असल्यामुळे, केवळ कमी जागा व्यापणाऱ्या म्हणून ज्या वस्तू श्लूटरने वगळल्या असत्या त्याच वस्तूंकडे क्निफेनने विशेष विस्ताराने लक्ष पुरविले असेल तर ते समर्थनीयच ठरते. त्याचप्रमाणे, दक्षिणेच्या एकूण क्षेत्राच्या तुलनेने ज्या क्षेत्रात नीग्रो लोक वावरतात, बसतात, झोपतात. ते दक्षिणेतील प्रत्यक्ष क्षेत्र जरी नगण्य अंश भागाएवढेच आहे, तरीही या विशिष्ट समाजगटाच्या इतक्या व्यक्तींचे एकत्र रहिवास हेच दक्षिणेच्या कृषिप्रधान व ग्रामीण स्वरूपाचा, जगातील जवळजवळ इतर कोणत्याही प्रदेशाच्या विरोधाने सर्वात महत्वाचा कारक आहे.

७७. १९३७ साली परिषदेपुढे वाचलेल्या पत्रिकेत.

खरे म्हणजे एका चर्चेच्या ओघात श्लयूटरने हा दृष्टिकोण, अंशतः का असेना, पण मान्य केलेलाच आहे. लोकवस्तीच्या घनतेसंबंधीच्या क्वचितच लक्षात भरणाऱ्या वस्तुस्थितींचाही अभ्यास करण्याची भूगोलकाराला मोकळीक असावी. म्हणून तो असेही एक प्रमेय मांडतो, की भौगोलिक गृहीतवस्तू म्हणून मान्यता पावण्यासाठी प्रत्येक घटनेला काही विशिष्ट सापेक्ष स्थान असले पाहिजे व तिचा असा खास क्षेत्रविस्तार असला पाहिजे (१४५, २७). पण हेही खरे आहे की, आमचे लक्ष व्यक्तिव्यक्तींनी व्यापलेल्या क्षेत्रावर नसून, अशा अशाप्रकारचे लोक अशा अशा संख्येने आढळतात, अशाप्रकारचे भूपृष्ठावरील क्षेत्र यावर आमचे लक्ष असते. – खरे तर, त्या लोकांच्या वास्तव्यामुळेच त्या क्षेत्राला ते खास स्वरूप प्राप्त झालेले असते. कारण त्या क्षेत्राचे स्वरूप तेथे वास्तव्य करणाऱ्या मानवप्राण्यांनी त्या क्षेत्राला प्रदान केलेले असते. आम्ही याला जर सत्य स्वरूप मानू शकतो, तर अन्य क्षेत्रातील भारदस्त जीवनमानांच्या तुलनेने या क्षेत्रांतील लोकांचे हलक्या दर्जाचे जीवमान हेही त्या क्षेत्राचे सत्य स्वरूपच आहे, असे तितक्याच अधिकाराने आपण मानू शकतो.

जवळपास अशाच प्रकारच्या आधारावर, केवढ्या आकाराचे क्षेत्र आपण एकाचवेळी विचारात घ्यावे या समस्येशी संपर्क साधणेही आपणास शक्य होईल. पेंकने असा युक्तिवाद केला, की कोणीही एखाद्या शहराच्या भूगोलाची चर्चा करू शकतो, पण एखाद्या बाजारपेठेच्या भूगोलाची चर्चा त्याला करता येणार नाही. मात्र, असा नियम सांगताना असे कोणते भिन्न तत्व यात गोविलेले आहे, ते पेंक स्पष्ट करत नाही (१३७, १६५). अर्थातच, ' सापेक्ष महत्वाचा ' प्रश्न भूगोलाभ्यासक सतत मनात वागवत राहील, तर आकारमान हे विचारात घ्यावयाच्या गुणविशेषणांपैकी फक्त एक विशेषण आहे, हे तो मान्य करण्याची शक्यता आहे. मेक्सिकोच्या ग्रामीण भूगोलाची समज येण्यासाठी मेक्सिकोतील ग्रामीण समाजगटांची विशिष्ट रचना समजून घेणे आवश्यक असते. मेक्सिकोच्या एका विशिष्ट आणि विस्तृत प्रदेशात बसलेल्या तशाच प्रकारच्या पुष्कळशा समाजग्रंथाच्या स्वरूपाचे पुष्कळशा महत्वाच्या बाबींतील गॅलीना हे खेडे एक प्रातिनिधिक रूप आहे असा त्या प्रदेशाची पहाणी करून डिकनने काढलेला निष्कर्ष समर्थनीय असेल तर, अपवादात्मक स्वरूपाच्या त्या टॅम्पीओका नामक तेलबंदराच्या अभ्यासापेक्षा येवढ्याशा एका नगण्य खेड्याचा तपशीलवार अभ्यास (३४०) मेक्सिकोच्या एकूण भूगोलाच्या दृष्टीने अधिक महत्वाचा ठरेल.

## ड—या कसोटींचा खास भूगोलतंत्राशी संबंध

' भूगोलात अभ्यासावयाच्या सामग्रीशी भूगोलाच्या खास तंत्राचा संबंध ' या विषयाच्या सॉडरच्या युक्तिवादाचे उपयोजन येथे चर्चिलेल्या कसोट्यांमुळे भूगोलाभ्यासात समाविष्ट होत असलेल्या सामग्रींसाठी करून पहाणे उद्बोधक ठरेल. पण, भूगोलाभ्यासाचे असे एखादे खास तंत्र असलेच तर ते कोणते ? आणि येथे समाविष्ट असलेल्या व एकच गर्दी उसळून देणाऱ्या विविध प्रकारच्या घटनांचा विचार करण्याइतके सामर्थ्य ते तंत्र भूगोलाला प्रदान करते का ?

अग्रेसर मानल्या जाणाऱ्या भौगोलिक वृत्तपत्रिकांतून समाविष्ट केलेल्या भौगोलिक अभ्यासांचे परीक्षण आपण केले, त्यात विविध आणि भिन्न प्रकारचे अभ्यास होते, तर मग, त्या सर्वांत साधारण असलेले, पण अन्य ज्ञानक्षेत्रांत फारसे उपयोगात नसलेले, असे कोणते विशिष्ठ तंत्र आढळून येते ? अर्थातच, असे तंत्र म्हणजे, नकाशांच्या माध्यमातून विषय मांडणीचे तंत्र ! हे असे एक तंत्र आहे, की ते फक्त भूगोलकारांनीच विकसित केलेले आहे, आणि अनेकविध सामग्रीने समृद्ध केले आहे. प्रचलित भौगोलिक अभ्यासात वापरण्यात आलेले या विषयासंबंधीचे दृष्टिकोण पद्धतितंत्रे, गृहीत वस्तूंचे प्रकार या सर्वांचे बोमनने केलेल्या अप्रतिम विवेचनात जसे उदाहरणांनी स्पष्ट करण्यात आले आहे, तसे अन्यत्र कोठेही आढळणार नाही (१०६, तसेच विविध प्रकारचे मोठ्या संख्येने दिलेले नकाशे व त्याबरोबरच त्या नकाशांवरील चर्चा, याही लक्षात घ्याव्या १०४ ।।).

भूशास्त्रज्ञही नकाशांवर अवलंबून रहातात, पण भूशास्त्राच्या बहुतेक सर्व विभागांत, पृथ्वीचा इतिहास समजून घेण्याच्या अंतिम हेतूच्या सिद्धीसाठी वापरावयाचे ते एक किरकोळ साधन आहे. इतर बहुतेक सर्व देशांच्या पद्धतिविरूद्ध आपल्या देशातच प्रमाणित भूम्याकारदर्शक नकाशे तयार करण्याचे काम भूशास्त्रीय पर्यवेक्षण खात्याकडे सोपविलेले असले, तरी तेथील प्रत्यक्ष कार्य एका ' भूगोलतज्ञाच्या ' मार्गदर्शनाखालीच होत असते.

भूगोलकारांनी हा नकाशाच्या खास तंत्राबाबत केलेला दावा प्रात्यक्षिकाने सिद्ध करत बसण्याची तशी काहीच जरूरी नाही. आणखी पुष्कळ शास्त्रांतूनही नकाशांचा उपयोग केला जातो. तसा त्यांना अधूनमधून इतिहास पद्धतींचाही उपयोग करावा लागतो ; पण हे दुसरे केवळ इतिहासाचे असे स्वतंत्र तंत्र आहे या विषयी कोणीच वाद घालत नाहीत. आणि इतिहास विषयक तंत्र ही इतिहासकारांची मक्तेदारी आहे असा दावा इतिहासकारही कधी सांगतील अशी शक्यता नाही. नकाशापद्धती हा आपल्या क्षेत्राचे एक अविभाज्य अंग आहे असा दावा भूगोलकारही कधी मांडण्याची शक्यता नाही (पहा – प्रकरण ११ ' इ '). तरीही इतर क्षेत्रातील कार्यकर्ते ही गोष्ट सर्वसाधारणपणे निर्विवादपणे मान्य करतात, की नकाशा-रेखन असो अथवा नकाशा उपयोजन असो, नकाशासंबंधीच्या कार्यात भूगोलकार हाच तज्ञ असतो. हे एक असे तंत्र आहे, की त्याबाबत सल्ला घेण्यासाठी ते सर्व भूगोलज्ञाकडेच धाव घेतात. , आणि अशा बाबतीत त्या भूगोलकाराने करून दाखविलेले नकाशाविषयक कार्य त्यांच्या अपेक्षेहून किती तरी अधिक मोलाचे असते. " जगाच्या ज्ञानभंडारात भूगोलाने टाकलेली सर्वात महत्वाची भर, नकाशा तंत्राच्या उपयोजनातून म्हणजे वितरणांचे नकाशीकरण आणि वितरणविषयक आकृतिबंधांचा तौलनिक अभ्यास व त्यावरुन काढलेले सामान्य निष्कर्ष, यांतून पडत गेली आहे. " असे जेम्सचे म्हणणे आहे. (२८६, ८२).

इतर कोणापेक्षाही भूगोलकारालाच नकाशांबद्दल येवढी आत्मीयता असावी हा काही केवळ अपघात नव्हे. अभ्यासासाठी स्थानीय संबंधयोगांच्या वस्तुस्थितींचे संकलन तो दुसऱ्या कोणत्या साधनाने करणार होता ? आणि नकाशा न वापरता त्या वस्तुस्थिती तो

परस्परांच्या स्थानीय संबंधात सादर करणार तरी कसा ? (सापेक्षतः मर्यादित क्षेत्रासाठी छायाचित्रांच्या सहाय्याने हेच काम करता येते. अर्थात तेवढ्या प्रमाणात ती छायाचित्रेही नकाशांची तेवढ्या प्रमाणात पुरवणीच आहे). साहजीकच, एखाद्याने आपल्याजवळील सामग्री जर परिणामकारक रीतीने नकाशांवरुन सादर केली असेल, तर त्यांवरुनच त्याच्या कार्याची भौगोलिक गुणवत्ता पुष्कळदा निश्चित करणे शक्य होते. भौगोलिक प्रकाशनांचे संपादक जेव्हा तपशील दाखविणाऱ्या भौगोलिक नकाशाचा आकार कमी करून तो अर्ध्या पानात अथवा त्याहीपेक्षा लहान आकारात बसविण्याचा प्रयत्न करतात तेव्हा त्यांनी, हेटनरने १९०५ मध्ये लिहिलेले पुढील विधान आपल्या संपादकीय मेजावर आठवणीसाठी लिहून ठेवावे असे म्हटल्याशिवाय रहावत नाही. नकाशाच्या माध्यमातून मांडणीपद्धतीच्या विकासाचा असा परिणाम झाला आहे, की शाब्दिक वर्णनाचे मूळचे महत्वच नाहीसे झाले. आता त्या वर्णनाचे कार्य त्या नकाशाची पूर्तता काही थोड्या मोजक्या शब्दात करणे व त्याचे स्पष्टीकरण देणे येवढेच बाकी राहिले आहे (१२६, ६८५, ६२२-२४ ; तसेच पहा १६१, ३२४-३७६).

भूगोलकारांचे हे नकाशा-तंत्र भौतिक घटनांइतकेच सांस्कृतिक घटनांनांही लागू करता येईल हे सिद्ध करण्यासाठी स्वतंत्र चर्चेची गरज नाही, असे शेवटी म्हणावेसे वाटते. तसे ते आज शेकडो वेळा वापरले गेलेले आहे. खरे पहाता, एखाद्या विशिष्ट राज्यविस्तार समस्येवरील भूगोलकाराने केलेले कार्य आणि राजनितिशास्त्रज्ञाने केलेले कार्य या दोहोतील फरक इतर कोणत्याही गोष्टीपेक्षा नकाशांच्या उपयोजनाचे सापेक्ष प्रमाण आणि त्याची परिणामकारकता या दोन गोष्टी दुसऱ्या कोणत्याही प्रकारे दाखवता येणार नाहीत. केवळ नकाशांवरुन हा भेद लक्षात येत नाही ; तर विषयाभ्यासाठी त्या नकाशांच्या उपयोगावरुन ते स्पष्ट होत असते. खऱ्या भूगोलकाराला त्या समस्येचा अभ्यास नकाशांच्या परिभाषेत करण्याशिवाय गत्यंतरच नसते.

या पद्धतितंत्राच्या मूल्याचे एक उत्तम उदाहरण बोमन यांच्या ' न्यू वर्ल्ड ' **(नव जगत्)** या ग्रंथाकडे बोट दाखविता येईल (३३२). वास्तविक, या ग्रंथात अनेक राजनितिशास्त्रज्ञांनी अभ्यासिलेल्या समस्यांचा विचार झालेला आहे. तरीही त्यात केलेल्या नकाशांच्या उपयोजनाची असाधारण परिणामकारकता या ग्रंथाला जवळपास एका अद्वितीय ग्रंथाचे स्थान देऊन जाते.[७८] यापेक्षाही अधिक स्पष्ट उदाहरणे सापडणे शक्य आहे. वेगवेगळ्या

७८. आपल्याच एका आधीच्या प्रकाशनात प्रस्तुत लेखकाने केलेल्या वर्णनात आता एक दुरुस्ती करण्याची परवानगी लेखक घेत आहे. " शांतता परिषदेसाठी जाणाऱ्या अमेरिकी आयोगाच्या उपयोगासाठी गोळा करण्यात आलेल्या सामग्रीचा बऱ्याच मोठ्या अंशाने या ग्रंथात समावेश करण्यात आला आहे. " (२१६, ७८५). हे विधान करताना एक सर्व सम्मत समज यापेक्षा दुसरा कोणताही अधिकृत आधार घेतलेला नव्हता. पण तो चुकीचा असल्याची माझी खातरजमा स्वतः डॉ. बोमन यांनीच केलेली आहे. हा अभ्यासग्रंथ लिहिण्याची प्रेरणा जरी पॅरिस येथील अमेरिकी आयोगासाठी डॉ. बोमन यांनी केलेल्या कार्याच्या परिणामातून मिळाली असली, तरी या ग्रंथात वापरलेली सर्व प्रत्यक्ष सामग्री त्यांनी स्वदेशी परत आल्यावरच गोळा केलेली होती ; त्यात आयोगाने पॅरिसहून आणलेल्या सामग्रीचा समावेश केलेला नव्हता.

सरहद्दीवरील क्षेत्रांची तपशीलवार अभ्यासलेखांची डझनावारी उदाहरणे जर्मन व फ्रेंच भौगोलिक साहित्यांतून देता येण्यासारखी आहेत. प्रस्तुत लेखकाने केलेली उत्तर सायलेशियाच्या सरहद्द समस्येची चर्चा मुख्यतः सोळा नकाशांच्या उपयोगाच्या आधरावरच केलेली आहे (३५५).

राजकीय भूगोलांतर्गत सरहद्द समस्यांच्या अभ्यासासाठीच या तंत्राचा अवलंब करता येतो, असे समजण्याचे कारण नाही. राजकीय भूगोलाच्या अन्य विभागांसाठी आणि " सामाजिक भूगोल " असे नाव देण्यास हरकत नसते अशा अन्य विविध विषयांसाठीही ते तंत्र फार महत्वपूर्ण कार्य करते, या गोष्टीची साक्ष एल्सवर्थ हंटिंग्टन, ग्रिफिथ टेलर व मार्क जेफरसन यांच्या सर्वश्रुत ग्रंथांतून पुष्कळवेळा मिळालेली आहे (तसेच c/o ब्रून्हेस १८२. आकृती २०६, २११, २२० ते २२२). युद्धपूर्व ऑस्ट्रिया हंगेरीतील विभागवाद (Sectional-ism) विषयक समस्यांचा प्रस्तुत लेखकांने केलेला अभ्यास (१५८, वीसपेक्षा अधिक नकाशांवर आधारित), युगोस्लाव्हियातील अशाच प्रकारच्या समस्यांचा मिलोयेविकने केलेला अभ्यास (३७०), आपल्या देशातील निवडणुकीत दिसून येणारे प्रादेशिक कल यांचा राइटने केलेला अभ्यास (४००), आणि प्रस्तुत लेखकाने केलेला संयुक्त संस्थानांचा मानववंशीय भूगोलाचा अभ्यास (३५९), या सर्वच ग्रंथातून वरील विधानाची उदाहरणे आणखी विशेषत्वाने पुढे ठेवता येण्यासारखी आहेत.

भौगोलिक ग्रंथांत नकाशांचा उपयोग खरोखर इतका महत्वाचा आहे की, कोणताही नवीन विधि-नियम प्रस्तुत करण्याचा आव न आणता, भूगोलकारांसाठी एक सुगम सुत्र सुचविणे उचित आहे असे लेखकाला वाटतेः कारण, त्याच्या सहाय्याने, तो करत असलेल्या कोणत्याही अभ्यासाची भौगोलिक गुणवत्ता त्याला स्वतःलाच तपासून पहाता येईल. त्याची समस्या मूलतः नकाशांच्या सहाय्याने अभ्यासता येत नसेल–सहसा कित्येक नकाशांच्या तुलनेनेही त्याचा अभ्यास करणे शक्य होत नसेल–तर ती समस्या भूगोलक्षेत्रात समाविष्ट करण्यास पात्र आहे की नाही याचीच शंका घ्यावी लागेल.



प्रकरण ९ वे

# एक मूर्त एकक या दृष्टीने प्रदेशाची संकल्पना

## 'अ' या संकल्पनेची विविध विधाने

आधुनिक भूगोलाच्या अगदी सुरुवातीपासून, म्हणजेच १८ व्या शतकाच्या उत्तरार्धापासून, आपल्या अभ्यास वस्तूची–अर्थात् जगाची–विभागणी ज्या क्षेत्रीय एककांत करावयाची त्यांचे स्वरूप कसे असावे, या प्रश्नाने भूगोलकारांना चांगलेच सतावले आहे. राजकीय एककांत करावयाच्या रूढ विभागणीची जागा जेव्हा 'पर्वतराजींचे एक अखंड जाळे आहे' या सिद्धान्तानुसार "स्वाभाविक प्रदेशात" केलेल्या विभागणीने घेतली, तेव्हा अधिक शास्त्रशुद्ध भूगोलाच्या दिशेने टाकलेले ते पहिले पाऊल होते, असे गाटेरेरच्या अनुयायांना वाटले. पुढे, हे प्रमेय असमर्थनीय असल्याचे सिद्ध झाले, तरी त्यांनी स्वाभाविक प्रदेशाची संकल्पना सोडून दिली नाही, तर ती अधिक सोप्या भाषेत व्याख्याबद्ध करण्याचा प्रयत्न चालविला. अशारीतीने आपल्या पूर्वाचार्यांच्या अतिसुलभ पद्धतीला रिटरने आव्हान दिले असले, तरी त्याबरोबरच सर्वसाधारण प्रादेशिक भूगोलाचा मूलाधार असलेली ही संकल्पना प्रस्थापित करण्यासही त्याने हातभार लावला. ब्यूशरच्या तपशीलवार टीकेला कोणीच उत्तर दिले नाही; तर फ्रोबेलने घेतलेले नाट्यपूर्ण आक्षेप, त्याच्या खंडनाच्या उत्तरार्धात त्याने घेतलेल्या चुकीच्या आधारांमुळे, दुर्लक्षित राहिले. प्रादेशिक भूगोलाच्या प्रभावाला उतरती लागल्यावर म्हणजे १९ व्या शतकाच्या उत्तरार्धात, रात्सेलने प्रसंगविशेषी त्याचा उच्चार केलेला असला, तरी अभ्यासकांना या संकल्पनेची अभिरूची फारच थोडी राहिली होती, असे दिसून येते (c/o ब्यूर्गर ११.७६).

चालू शतकाच्या प्रारंभकाली, प्रादेशिक भूगोलाच्या अभिरूचीचे पुनरुज्जीवन झाले. एक निश्चित स्वरूपाचे, नैसर्गिक नसले तरी, मूर्त एकक या नव्या स्वरूपात प्रदेश ही संकल्पना पुन्हा अवतरली.–मला जे आढळले आहे त्यावरून असे दिसते, की श्ल्यूटरच्या पद्धतितंत्रशास्त्रात तिचा प्रथम उल्लेख आला. हेटनरने सुचविल्याप्रमाणे तो रात्सेल मार्फत आलेला रिटरचा वारसा होता की काय, हे पूर्णपणे स्पष्ट झालेले नाही. पण गेल्या दहा वर्षातच ही संकल्पना भौगोलिक साहित्यात पूर्ण बहरलेली दिसते, ही गोष्ट जर्मनी इतकीच आपल्या देशात आणि अन्य पुष्कळ देशांच्या बाबतीतही खरी आहे. प्रदेश अथवा भूक्षेत्रदृश्य हे निश्चित स्वरूपाचे व स्वतंत्र एकक आहे, आणि त्याला आकार व रचना असल्यामुळे ती एक मूर्त वस्तू आहे. तसेच, तत्सम अन्य एककांशी त्याचे असे संबंध जडतात, की "संपूर्ण भूपृष्ठ हा अशा भूदृश्यांच्या अथवा प्रदेशांच्या रचनेचा एक आकारबंध आहे" असे मानावयास हरकत दिसत नाही. इतकेच काय, आपल्यादेशाप्रमाणेच जर्मनीतीलही काही अभ्यासक, प्रदेश ही एक सावयव वस्तू असून तिची तुलना सावयव जीवांशीही करता येण्यासारखी आहे, असे मानतात.

भूदृश्यसंकल्पनेचा " शुद्धवाद्यांनी " लावलेला अर्थ, अगदी तात्त्विक दृष्ट्याही, फारच थोड्या भूगोलकारांनी उचलून धरला होता, हे आपण पाहिले आहेच. याविरुद्ध प्रस्तुत संकल्पनेला मात्र जर्मनीतील बहुसंख्य प्रादेशिक भूगोलकारांनी व आपल्या देशातील पुष्कळशा भूगोलकारांनी, कोणत्या ना कोणत्या स्वरूपात, पाठिंबा दिलेला आहे, असे दिसते. या प्रश्नावर केंद्रित केलेल्या चर्चांची ग्रंथसूची करावयाची झाल्यास शेकडो नावे द्यावी लागतील. (अशा जर्मन चर्चांची ग्रान्योने तयार केलेली यादी बरीच पूर्ण आहे. फक्त १९२९ पर्यंतची : २५२ ; आणि १९३५ अखेरची मुख्यत्वे ब्यूर्गरने तयार केलेली यादी : ११.).

वरील संकल्पना कोणत्याही स्वरूपात मांडली, तरी एखाद्या शास्त्रशुद्ध गृहीततत्त्वाच्या विधानाची जागा ती घेऊ शकणार नाही, हे सांगण्याची गरज नाही ; कारण, शास्त्रशुद्ध गृहीत-तत्त्वाला मान्यता मिळवण्यासाठी कोणत्याही प्रात्यक्षिकाची जरूरी नसते, इतकी ती स्पष्ट असतात. उलट, वनस्पती, प्राणी, ज्योतिर्गोल यांच्या सारख्याच प्रदेश याही स्वतंत्र वस्तू आहेत असे भूगोलकार सांगू लागतात, तेव्हा मात्र ज्याच्यावर सहज विश्वास ठेवता येणार नाही असे काही तरी ते सांगत आहेत याची जाणीव होते. पृथ्वीपृष्ठावरील क्षेत्रीय भेदाभेद ही जरी एक " स्पष्टपणे गृहीत वस्तुस्थिती " असली आणि एक वेगळे प्रत्यक्ष दृश्य या नात्याने भूदृश्याच्या बाबतीतही हेच खरे असल्याचे दिसत असले, तरीही जगाच्या प्रादेशिक विभागणीबाबत मात्र ही गोष्ट खरी नाही. प्रदेश ही एक निश्चित वस्तू या स्वरूपात सामान्य माणसाला कधीच जाणवत नाही ; इतकेच नव्हे तर, कोणत्याही एका प्रदेशात किती भूभाग समाविष्ट करावा या संबंधी, असलेच तर, फार थोड्याबाबतीत भूगोलकारांचे एकमत असलेले दिसते. खरे म्हणजे, ही गृहीत वस्तुस्थिती निश्चित कशी करता येईल, याबाबतच त्यांचे एकमत होत नाही. म्हणजे, रेन्नर जेव्हा " प्रदेश या खऱ्याखुऱ्या अस्तित्व असलेल्या वस्तू आहेत " असे ठामपणाने सांगतो, तेव्हा तो एक लोकमान्य भ्रम शब्दांनी व्यक्त करतो, इतकेच ! खटकणारे काय असेल, तर त्याने ज्या संदर्भात हे विधान केले तो संदर्भ : एका प्रश्नावलीला उत्तरे देताना अनेक " प्रादेशिक तज्ञांनी " व्यक्त केलेल्या मतांचा सारांश म्हणून काढलेला निष्कर्ष, असे त्याचे स्वरूप होते ; पण विशेष असे, की प्रदेश या संज्ञेची व्याख्या, त्याच्या मर्यादा, किंवा त्याचे सारस्वरूप याबाबत त्यांच्यात कोणतीही एकवाक्यता नव्हती (२९१, १४१, १४५-४९). ज्यांच्या विषयींचे आपले ज्ञान इतके अपुरे आहे, त्या वस्तू कितीशा अभिजात असू शकतील ?

आता हे प्रमेय वस्तूंच्या स्वाभाविक स्वरूपांवरून त्यांची ओळख पटण्याइतके प्रत्ययकारी नसेल, तर ते भौगोलिक अनुसंधानाची निष्पत्ती समजावयाची, का अन्यप्रकारे स्पष्ट करून न सांगता आल्यामुळे अनुसंधानांच्या निष्कर्षांचा अन्वयार्थ लावता यावा म्हणून रचलेले प्रमेय समजावयाचे ? मला माहीत असलेल्या एकाही अभ्यासकाने हे विधान हा भौगोलिक अनुसंधान कार्यावरून निघणारा एक निश्चित निष्कर्ष आहे असे दाखविण्याचा कोणताही प्रयत्न केलेला नाही. तो निष्कर्ष नाही असे मानले, तरी ज्या वस्तुस्थिती व जे संबंधयोग अन्यप्रकारे स्पष्ट करून दाखवता येण्यासारखे नाहीत त्यांचे स्पष्टीकरण देणे हेच त्याचे खरे मूल्य आहे, असे प्रात्यक्षिकही कोणी करून दाखविलेले नाही.

याचाच अर्थ असा, की हे साध्यप्रमेय स्वयंसिद्धही नाही, किंवा ते भौगोलिक अनुसंधानकार्यांतूनही निष्पन्न झालेले नाही, तर त्याची रचना भूगोलविषयक तत्त्वचिंतनातून झालेली आहे. यापेक्षा चांगलीशी संज्ञा भाषेत नसल्यामुळे, आपल्याला त्याचे वर्णन या शब्दांत करावयास हरकत दिसत नाही. एकंदरीने, अशा एका साध्य प्रमेयासंबंधी येथे आपण विचार करत आहोत. कोणत्याही अर्थाने त्यावर टीका करावी म्हणून आम्ही असे म्हटले नाही. कोणत्याही ज्ञानक्षेत्रात संकल्पना प्रस्थापित करावयाच्या झाल्या, की, निदान ज्यांना नव्या संकल्पना प्रस्तुत करावयाच्या असतात अशा अभ्यासकांना, तद्विषयक तत्त्वचिंतन करणे आवश्यकच होते. आधुनिक भूगोलातील नव्यानव्या पण सदोष व्याख्यांच्या संकल्पना, आणि क्रमबंध रचण्याची जिम्मेदारी इतर कोणाही आधुनिक भूगोलकारापेक्षा पासार्जवर अधिक आहे. पण, तो जेव्हा स्वतःच्याच विचारांवरील तात्त्विक चर्चांकडे लक्ष देत बसण्याचा त्रास घेणे आपल्याला शक्य होत नाही असे म्हणतो, तेव्हा त्याने स्वतःच पेरून पदरात पडलेल्या धान्यराशीतील दाणे व तण वेगळे करण्यास मदत करण्याचीही त्याची इच्छा नाही, येवढेच तो सुचवत असतो. (अर्थातच, " प्रत्यक्ष वस्तुस्थिती त्याला जे कथन करते तेवढेच तो ओळखतो " या त्याच्या विधानाची गंभीरपणे दखल घेतली जावी अशी अपेक्षा करण्याचा अधिकारही त्याला रहात नाही.) (२७२).

या संकल्पनांसंबंधीची काटेकोर चर्चा म्हटले की, त्यात मोठ्या प्रयासाने करावयाचे विश्लेपण व संज्ञांची तुलना यांचा गुंता होणे अटळच असते. ते सर्व बऱ्याच भूगोलकारांना मोठे कंटाळवाणे वाटण्याचीही शक्यता असते. या महत्त्वाच्या संकल्पनेचे उच्चारण ज्या संज्ञांच्या सहाय्यानें केले जाते त्यांचे तपशीलवार परीक्षण करण्याचे क्लिष्ट काम अद्यावत् भौगोलिक विचारांच्या टीकाकारास टाळून चालण्यासारखे नाही. तत्त्वज्ञान व मानसशास्त्र या क्षेत्रांतील असंख्य संज्ञा उसन्या घेऊन, त्या प्रदेशविषयक व्याख्यात्मक विधानात घुसडून दिल्या जातात. त्यातही बहुधा त्यांना नव्या अर्थाचा साज चढविलेला असतो, पुष्कळदा व्याख्या चुकीच्या केलेल्या असतात, आणि कित्येकदा तर व्याख्या करण्याचेही प्रयास घेतलेले नसतात. या सर्व गोष्टींमुळे आधीच क्लिष्ट असलेले हे कार्य आणखी अवघड होऊन बसते (c/o ब्योर्नर २७४, ३४०). या संज्ञांच्या जंगलात आम्ही शिरतो आहोत ते संज्ञांसंबंधी वादावादी करण्याची खुमखुमी आहे, म्हणून नव्हे, तर गरज आहे म्हणून ! जेजे प्रस्तुत लेखकाबरोबर ही वाटचाल करतील त्यांना ती या घनारण्यातील कोठल्यातरी अज्ञात कोपऱ्यात नेऊन सोडणार नाही याची हमी घेण्यास तो तयार आहे. आम्ही तिकडून जावे म्हणून इतरांनी दाखविलेल्या वाटा कितीही क्लेशदायक असल्या, तरी आपण स्वच्छ प्रकाशापर्यंत पोहोचू असा त्याला विश्वास वाटतो.

पण ज्यांना असल्या तत्त्वज्ञानविषयक साहसांत फारशी गोडी वाटत नाही, त्यांना हे जंजाळ अजिबातच टाळण्याचा मार्गही आम्ही दाखवून देऊ.– मात्र, या दुसऱ्या मार्गाने जाणाऱ्यांना, संबंधित संकल्पनेत किंवा तिच्या विविध साधितरूपात सत्याचा कितीसा अंश आहे हे स्वतः

शोधून काढण्याची संधी हातची सोडावी लागेल. यातील प्रमुख प्रमेय–प्रदेश ही एक वस्तू आहे, हे–किंवा त्याची विविध रूपे व साधितरूपे यांपैकी काहीच पद्धतितंत्र शास्त्रीय विचारात प्रस्थापित झालेले नाही, किंवा अनुसंधानकार्याने त्याची कसोटीही पाहिलेली नाही. कोणाही स्वतंत्र अनुसंधानकार्यकर्त्याने जे उघड दिसते ते गृहीत धरल्यास ते समर्थनीयच आहे. उदाहरणार्थ क्रौवीच्या विवक्षित विधानाचा उपयोग करून असे म्हणता येईल ; "प्रदेश ही सावयव वस्तू नव्हे, असे ठामपणे सांगता येते", (२०१, १०) ; तसेच, एक क्षेत्र या अर्थाने भूक्षेत्रदृश्य ही मूर्त वस्तू नाही किंवा वेगळी अशी एकात्म पूर्ण वस्तूही नाही ; तर,–लायलीच्या विधानात थोडासा फेरफार करून असे म्हणू, की– तो कमीजास्त प्रमाणात स्वेच्छेने निवडलेला एक भूखंड आहे (२२०, १३०). म्हणजे, आज आपल्याला दिसते त्यावरून तरी, दर्शनी भूपृष्ठ हे आकारबंधाच्या अगदी विरुद्ध, म्हणजे त्याचे प्रतिप्रमेय, असते. त्यामानाने "पार्थिव रंगपाट" हे हंटिंग्टनने केलेले बोलके चित्रणच सत्यस्थितीशी जास्त जवळीक करणारे आहे असे गृहीत धरण्यास हरकत नाही (२१३). जरी ही सर्व विधाने, त्यानीच नाकारलेल्या दुसऱ्या काही अस्तिपक्षी विधानांइतकीच, प्रात्यक्षिक विरहित असली, तरी, वरवर का असेना, वस्तुस्थितिनिदर्शक विधान करण्याचे त्यांच्यात सामर्थ्य आहे.

उलटपक्षी, एक वस्तू या नात्याने प्रदेशाच्या संकल्पनेला भूगोलात मूल्य आहेच, असे काहींचे मत आहे,–विशेषतः, पद्धतितंत्रविषयक प्रबंधात, प्रादेशिक अभ्यासलेखात आणि पाठ्यपुस्तकांतून ही संकल्पना ते बोलून दाखवितात.–आणि शक्य झाल्यास, त्याची समर्थनीयता आणि उपयुक्तता या दोन्ही गोष्टी सिद्ध व्हाव्या म्हणून, त्या संकल्पना शोधक परीक्षणासाठी सादर केल्या जाव्यात, अशी त्यांची इच्छा असणार, हे गृहीतच आहे. म्हणूनच, उदात्त मूल्ये अंतर्भूत असण्याची पात्रता असलेल्या आपल्या क्षेत्रातील काही संकल्पना, केवळ त्या उघड गोष्टींना विरोध करतात म्हणून, प्रथमदर्शनीच निकालात काढण्याचे स्वातंत्र्य आपण घेता कामा नये. जर्मन भूगोलकारांनी आपल्या भूक्षेत्रदृश्य या संकल्पनेभोवती गूढवादाचे एक अभेद्य जाळे विणून ठेवले असल्यामुळे, अशा कल्पना शक्यतेच्या कोटीतील आहेत असे क्रौवीने गृहीत धरले, ते बरोबर असण्याची शक्यता आहे, (२०२, १५), अशी शंका येत असेल, तर गूढवादाला फारशी मान्यता न देणारे प्रतिष्ठित भूगोलकारही या संकल्पना प्रादेशिक भूगोलाची पायाभूत प्रमेये असल्याचे मान्य करतात, हे विसरून चालणार नाही.*

आतापर्यंत जे काही सांगण्यात आले त्यानुसार एक निष्कर्षही येथे काढला गेल्यासारखा दिसतो, असे वाटण्याची शक्यता आहे. त्या निष्कर्षाविरुद्ध एक सूचना नोंदविणे आम्हाला आवश्यक वाटते. आणि या प्रकरणाच्या उर्वरित भागातील पारिभाषिक संज्ञांसंबंधीची चर्चा ज्यांना टाळावयाची आहे, अशांची संगत सोडण्यापूर्वी ती नोंदविणे जरूर आहे. पुष्कळशा भूगोलकारांनी येथे चर्चेसाठी घेतलेली संकल्पना हेच प्रादेशिक भूगोलाचे पायाभूत गृहीत प्रमेय आहे, असे विधान केले आहे. पण, त्या गृहीत प्रमेयाच्या

*पुरवणी टीप क्र. ३७ पहा.

खंडन-मंडनावर स्वतः प्रादेशिक भूगोलाचेही खंडन-मंडन निश्चयाने अवलंबून आहे, असा त्या वस्तुस्थितीचा अर्थ होत नाही. तसेच, भूगोल हा भूवर्णनात्मक विषय आहे ही संकल्पनाही या गृहीत प्रमेयावर अवलंबून नाही. लायलीच्या चर्चेत अशाप्रकारचा निष्कर्ष सूचित केल्यासारखे वाटते (२२०, २२२). तसेच, क्रौवी व डिकिन्सन यांच्यातील वादातही तशाच सूचनेचा वास येतो (२०२). ही संकल्पना पायाभूत गृहीत प्रमेय म्हणून मांडण्यात आली, त्याच्या कितीतरी पूर्वीपासून प्रादेशिक भूगोल परिणामी फलदायी असल्याचे सिद्ध झाले आहे. तसेच, हेटनरने सादर केलेला भूवर्णनात्मक दृष्टिकोण एकात्म अथवा मूर्त वस्तू या अर्थाने प्रदेश या " स्वयंभू " वस्तू आहेत या गृहीत प्रमेयावर कोणत्याही प्रकारे अवलंबून नाही.

## ' ब ' या संकल्पनेचा हेतू

आता आपण ज्याचा विचार करतो आहो ते साध्यप्रमेय अगदी उघड दिसणाऱ्या वस्तुस्थितीच्या विधानाची किंवा अनुसंधान कार्याच्या निष्कर्षाची जागा घेऊ शकणार नाही, मात्र, एका बौद्धिक रचनेची जागा ते घेऊ शकते. आता, आपण या संकल्पनेला मान्यता दिली, तर तिच्यामुळे प्रदेशविषयक प्रबोध करण्याची आपली क्षमता वाढते का ? स्वतःचे आधारपद म्हणून मान्य केलेल्या, व समोर उपस्थित असलेल्या प्रत्यक्ष प्रदेशांकडे ही संकल्पना अंगुलि-निर्देष करते का ? पण, या संकल्पनेचा पाठपुरावा करणाऱ्यांपैकी, असल्यास, फारच थोड्या जणांनी तसा दावा केला आहे. भूगोलाच्या अभ्यासवस्तूंची रचना " बौद्धिक प्रयोगांनी " च करणे भाग पडते, हे श्ल्यूटरला कळून चुकले होते, (१४८). तसेच, ग्रान्योनेही प्रदेश हे काही " स्वयंभू एकके " नव्हेत, " तर, भौगोलिक एककांचे निश्चयन व विभाजन हीच एक अनुसंधानपात्र समस्या आहे. " असे त्याने वारंवार सांगितले आहे. शिवाय, ही भौगोलिक ' मंडळी ' वस्तुस्थितीचे यथातथ्य दर्शन घडवीत नाहीत, तर " सत्यस्थितीत प्रत्यक्ष दिसणाऱ्या बहुविधतेला हेतुपुरःसर सुलभरूप देऊन, म्हणजेच सत्यस्थितीतील काही आवश्यक तेवढेच प्रातिनिधिक भाग घेऊन भौगोलिक प्रदेश अस्तित्वात आणले जातात. " अशाप्रकारे, " भौगोलिक अनुसंधान कार्यानेच आवश्यक त्या सर्वच पूर्ण एककांची रचना केली पाहिजे " (२४५, १३ ; २७०, २९६-३००).

दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर, प्रदेशविषयक संकल्पना बाजुला ठेवल्या तरीही, वेलिंग्टन जोन्सने मांडलेली समस्या आपल्या पुढे उभी रहातेच. " सजातीय क्षेत्रांचे निश्चयन कोणत्याही अनुसंधान कार्यात बरेच उशीरा होणे अटळ आहे. गृहीतवस्तूंचा विपुल व समर्थ संच झाल्यानंतर, आणि गृहीतवस्तूंच्या विविध प्रकारांची खातरजमा झाल्यानंतरच, महत्त्वाच्या व आवश्यक क्षेत्रांक्षेत्रांतील सजातीयता निश्चित करणे शक्य होणार आहे. आणि अशा प्रकारच्या सजातीयता प्रस्थापित झाल्यानंतरच, सजातीय क्षेत्रांच्या मर्यादा, काटेकोरपणाशी निदान काही थोडी जवळीक करून, आखता येतील " (२८७, १०५ f). विचाराधीन असलेल्या या संकल्पनेचे पुष्कळसे प्रस्तावक या विधानाला

निःसंशयपणे मान्यता देणारे असले,–खरे तर, त्यांच्यापैकी कित्येकांनी तशी विधानेही केलेली आहेत. (उदाहरणार्थ, मौल्ल १७९, १७५).– तरी त्या विधानातच त्या संकल्पनेला मिळणारे आव्हानही ग्रथित आहे, ही गोष्ट समजून घेण्यास तयार नाहीत.

पण, या संकल्पनेच्या प्रस्तावकांचे या आव्हानाला एक निश्चित उत्तर तयार असते. इतर शास्त्रांना काही विशिष्ट प्रकारच्या वस्तूंचा अभ्यास करावयाचा असतो. त्या वस्तूंची रचना, स्वरूप व कार्य यांची तुलना, व त्यांचे विश्लेषण, ते करत असतात, त्यांच्या सहाय्याने त्यांना त्या वस्तूंचे जाति गटात वर्गीकरण करणे शक्य होते ; आणि त्याचाच आधार घेऊन त्या वस्तूंसंबंधी वर्तनविषयक अथवा संबंधयोगविषयक शास्त्रीय नियम विकसित केलेले असतात. भूगोलालाही प्रदेशांचे अशा प्रकारच्या जाति गटात वर्गीकरण करण्यासाठी एखादा क्रमबंध विकसित करता आला, तर त्याच पद्धतीने काही सामान्य तत्त्वांचे विधान करण्याच्या कामीही भूगोलाला प्रगती करता येणार आहे. ही महत्त्वाकांक्षा उदात्त आहे, यात शंकाच नाही ; आणि शास्त्रीय सत्त्वानेच ती एक प्रकारे आपल्यावर लादलेली आहे, असेही म्हणण्यास हरकत नाही. ज्या ज्या संकल्पनांत अथवा साध्यप्रमेयांत अशाप्रकारच्या शक्यता दिसतात, त्यांच्याकडे अत्यंत काळजीपूर्वक लक्ष द्यावे अशा पात्रतेच्या त्या असतात, हे खरेच. पण, त्याबरोबर, अशा संकल्पनांची अतिक्रान्तिक तपासणी करण्याची आवश्यकताही त्याच शास्त्रीय सत्त्वाने आपल्यावर लादलेली असते. खगोलशास्त्रज्ञ अथवा प्राणिशास्त्रज्ञ यांच्या हाताशी असतात तशाप्रकारच्या, स्पष्टपणे वेगळ्या व मूर्त अशा, वस्तू भूगोलकारांपुढे सादर न करण्याचा कठोरपणा निसर्गाने दाखविलेला असल्यामुळेच आपल्याला बौद्धिक प्रयोगांनीच अशा वस्तू रचणे आवश्यक झाले आहे. अर्थात, तयार केलेल्या या पायाभूत ' वस्तूंना ' जशी सत्यप्रतिष्ठा नाही, तशी त्यातून प्रयत्नपूर्वक विकसित केलेल्या सामान्य तत्त्वांनाही ती प्रतिष्ठा नाही, हे उघड आहे. तरीही केवळ, आमच्याही काही अभ्यास वस्तू आहेत असे ठाम विधान करण्याने, आणि, खरोखरीच अशा वस्तू आपल्या हाती आहेत का याची, शहानिशा केल्याशिवाय पुढे जाण्याने, आपण प्रगतीचे पाऊल टाकले असे होत नाही.

शेवटी, या संकल्पनेच्या प्रस्तावकांच्या पुष्कळशा चर्चा वाचत असताना, एक गोष्ट लक्षात आल्याशिवाय रहाणार नाही. शास्त्रीय मूल्ये असणारी बौद्धिक साधने निर्माण करण्याच्या आपल्या आकांक्षेबरोबर, शास्त्रांच्या उच्चश्रेणीत भूगोलाला नेऊन बसविण्याच्या त्यांच्या अधिक निदिष्ट महत्त्वाकांक्षेचीही भेसळ करून टाकतात. किंबहुना, भूगोलाला जे स्थान प्राप्त करून घेणे उघडपणे साधले नाही, ते स्थान, म्हणजे निर्भेळशास्त्राचे स्थान, मिळविण्याची ते महत्त्वाकांक्षा बाळगून असतात. मग, ज्याअर्थी प्रत्येक (क्रमबद्ध) शास्त्राने आपआपले वस्तूवर्ग अभ्यासासाठी वेगळे काढलेले असतात, त्याअर्थी, भूगोलालाही, शास्त्राचे स्थान मिळवावयाचे झाल्यास, आपल्या स्वतःच्या विशिष्ट अभ्यासवस्तू असणे आवश्यक आहे. केवळ, क्षेत्रीय-भेदाभेदांचा आम्ही अभ्यास करतो असे म्हणण्याने काम होणार नाही, कारण कोणत्याही एका भूक्षेत्रात आढळणाऱ्या बहुतेक सर्व वस्तू अन्य शास्त्रांनी आधीच

हस्तगत केलेल्या आहेत. अर्थात्, अद्याप ज्यांच्यावर कोणत्याच शास्त्राने अधिकार सांगण्याचा प्रयास केलेला नाही, अशा उरल्यासुरल्या वस्तूंवरच समाधान मानावयाचे नसेल, तर प्रत्यक्ष भूक्षेत्र हेच वस्तू मान्य करणे प्राप्त आहे ; आणि मग, येनकेन प्रकारेण ही क्षेत्रे याच सत्यवस्तू आहेत हे सिद्ध करण्याशिवाय आपल्याला गत्यंतरच नाही. मला वाटते, लायलीने असेच काहीसे सुचविले आहे.

श्ल्यूटरने प्रथमच केलेल्या विधानात हा हेतू नामनिर्देशाने व्यक्त केला आहे. तरीही, एक मूर्त वस्तू या नात्याने त्याची क्षेत्रविषयक संकल्पना, त्याच्या नंतरच्या अनुयायांनी व्यक्त केलेल्या संकल्पने इतकी साधी व सरळ नव्हती. एके ठिकाणी, तो ही वेगळाली क्षेत्रे वस्तू म्हणून मानतो, असे दिसते ; पण, पुढे लगेच, ही क्षेत्रे एका समग्र एककाचे भाग आहेत असेही तो मान्य करतो (१२७, १६ ff). पुढे पुढे तर, एकूण पृथ्वीपृष्ठ हीच आपली एकक वस्तू आहे आणि तीच भूगोलाची मूर्त अभ्यास वस्तू आहे, असाही बदल तो आपल्या संकल्पनेत करतो [७९]. याच भूमिकेतून श्ल्यूटरने, इतिहासाप्रमाणे भूगोलही मूलतः क्रमबद्ध शास्त्र नाही या हेटनरच्या वादबीजाचे खंडन करण्याचा प्रयत्न केला (१२७, १४-१८, ५२-५९) (तसेच पेंक १५८). जीवशास्त्राला ज्याप्रमाणे आपल्या अभ्यसनीय वनस्पतीची वा प्राण्याची केस, कातडी, अन्य अवयव अशी विभागणी करता येते ; अर्थात, क्रमबद्धशास्त्र या नात्याने, भूगोलालाही आपल्या अभ्यास वस्तूचे कितीही विभागात विभागणी करण्याचा अधिकार आहे, असा दावा त्याने भूगोलाच्या बतीने केला. प्रदेशाची तुलना प्राण्याच्या अवयवांशी करणे कितीसे समर्थनीय आहे हा वाद बाजूला ठेवला, तरी ज्या प्राण्याचा वा वनस्पतीचा एकच नमुना आहे, आणि तोही ज्याचे कोणतेही दोन अवयव सारतः सरूप नाहीत असा नमुना, तोच आपला अभ्यास विषय म्हणून मान्य करणाऱ्या शास्त्रास कोणत्या प्रकारचे क्रमबद्ध शास्त्र म्हणावयाचे ! अशा प्रकारच्या शास्त्राने कोणत्याही नावावर दावा सांगितला, तरी ते शास्त्र आपल्या एकाच वस्तूच्या आधारे सामान्य तत्त्वे विकसित करू शकणार नाही, हे निश्चित.

हे अधिक स्पष्ट होण्यासाठी एक पुस्ती येथे जोडावीशी वाटते. श्ल्यूटरने जो निष्कर्ष उघडपणे काढला, तो त्याने हेटनरची क्रमबद्ध शास्त्राची संकल्पना आणि " वर्णनपर " शास्त्र यांचा गोंधळ केला म्हणून, कारण त्याने त्यांचा अर्थच नष्ट झाला (१२७, ५६). प्राणिशास्त्रासारखी क्रमबद्ध शास्त्रे अशा अर्थाने " वर्णनपर " असतात, की ती कोणत्याही एका वस्तूची लक्षणे वर्णन करून सांगत नाहीत, तर सारतः सरूप असलेल्या एकाच

---

७९. माझ्याशिवाय आणखी पुष्कळ लेखकांना श्ल्यूटरचा हा युक्तिवाद समजून घेणे अवघड वाटले (c/o हेटनर : १३२, ६२७-३२), ( व ग्राफ : १५६, १४२ ). हेटनरवर केलेली श्ल्यूटरची टीका जर सावधानतेने लक्ष देण्यासारखी असेल, आणि सॉरने तशी तिची प्रशस्तीही केली आहे (८४, १८७ तळटीप ), तर हेटनरने तिला दिलेले समर्थक व परिणामकारक प्रत्युत्तरही तितकेच लक्ष देण्यासारखे आहे, या गोष्टीकडे मात्र सॉरने दुर्लक्ष केले आहे.

प्रकारच्या सर्व नमुन्यांच्या लक्षणांचे ती वर्णन करतात, (c/o ग्राफ १५६, ५२-५७). श्ल्यूटरने अशी पुस्ती जोडली, की पृथ्वी-पृष्ठाच्या बाबतीत हा अभ्यास फक्त " क्षेत्रीय संबंधानुसार " करणे शक्य आहे. आणि पुढे त्याने काढलेला निष्कर्ष, हेटनरने काढलेल्या आधारभूत निष्कर्षासारखाच होता, हे त्याच्या लक्षातही आले नसावे (१३२, ६३१).

पण, श्ल्यूटरचे अनुयायी आपली विधाने यापेक्षा अधिक जोरदार भाषेत मांडतात. उदाहरणार्थ, ग्रान्यो लिहितो : " जीवशास्त्रे आपल्या अभ्यासवस्तू जशा असल्याचे मानतात, जवळ जवळ त्याचप्रकारे, आम्हीही आमची भूक्षेत्रे असल्याची कल्पना करतो " (२५२, ३८, ४७ : तसेच मौल्ल पहा २४१, १२).

त्याचप्रमाणे, सॉरने पद्धतितंत्रविषयक चर्चांतून हीच संकल्पना अमेरिकी भूगोलकारांपुढे सादर केली, तेव्हा त्यानेही एक निष्कर्ष वारंवार काढलेला आढळतो. आमच्या भूगोल क्षेत्रातही इतर शास्त्राच्या अभ्यास वस्तूंशी तुलना करता येतील अशा अभ्यासवस्तू असतात. " आम्ही असे ठामपणे समजतो, की ······· प्रदेशाला आकार असतो, बांधा असतो व कार्येही असतात. " " प्रदेशाची शरीर-रचना असे आम्ही म्हणतो ········ ती उपमा काही अगदीच पोकळपणे दिलेली नसते, ··········· तर आम्ही भौगोलिक प्रदेश ही एक सशरीर वस्तू आहे असेच मानतो. " (२११, २५ f ; ८४, १८९ f).

अलीकडेच प्रसिद्ध झालेल्या आपल्या पाठ्यपुस्तकाच्या प्रास्ताविक विधानात, या दृष्टिकोणाचे पुष्कळच अधिक स्पष्ट निवेदन फिंच व ट्रेवार्था यांनी केलेले आहे. पण, प्रत्यक्ष पाठ्यपुस्तकातील सामग्रीवरून पहाता, या संकल्पनेचा उपयोग त्यात विशेष कोठे केलेला नाही असेच म्हणावे लागेल, (३२२, १ ते ९, ६६२-६६).

भूक्षेत्रदृश्ये या वस्तू आहेत अशी संकल्पना रचण्याच्या प्रयत्नांच्या बुडाशी असलेला हेतू, ब्यूर्गरने या संकल्पनेच्या जर्मन प्रस्तावकांच्या कार्याचा जो सारांश सादर केला आहे त्यातच तो सर्वात स्पष्टपणे व्यक्त केलेला आढळावा, ही घटना अर्थपूर्ण आहे, असे वाटते. " सद्यस्थितीत या संकल्पनेला एक गंभीरतर अर्थ आला आहे. क्षेत्र (भूक्षेत्र) या भौगोलिक संकल्पने संबंधीचा संघर्ष हा सर्वसामान्य भूगोलशास्त्राच्या समर्थनीयतेसाठी दिलेला संग्राम होता. स्वतःची अशी भूक्षेत्रविषयक संकल्पना असेल तरच भूगोल हा मूलतः स्वावलंबी ठरतो. ही भूक्षेत्रविषयक संकल्पना जितकी अर्थपूर्ण असल्याचे दिसून येईल, तितका भूगोल शास्त्राला अधिक मान मिळेल ··········· वाद विषय असलेली ही क्ष ेत्रीय एकके कृत्रिम असणे इष्ट नाही, तर निसर्गाने ती, जणूकाही, आखून दिलेली असली पाहिजेत (कदाचित सत्यस्थिती हाच अर्थ अभिप्रेत असावा) ········ " (११, २७ f).

ज्यांच्या आधारावर आपल्यालाही शास्त्रीय प्रतिष्ठा असल्याचा दावा करता येईल अशा संकल्पना ज्या ज्ञानक्षेत्राला शोधत बसावे लागते, त्या क्षेत्राला ती पदवी प्रदान केली जाण्याची कितीशी शक्यता आहे, अशी शंका कोणाच्याही मनात येण्यासारखी आहे ! गोंधळ

माजविणाऱ्या शब्दप्रयोगांच्या आधारे गैरव्याख्या तयार करून आपण आत्मवंचना करत आलो, असा आपला भ्रमनिरास शेवटी होणार असेल, तर आपल्या या धडपडीचा भूगोल क्षेत्राला काहीही फायदा होणार नाही, ही गोष्ट निश्चितच आहे !

जे अगदी उघड्यावर आहे, आणि तरीही ज्याच्यासाठी कोणतीच शास्त्रीय सिद्धता अद्याप सादर करण्यात आलेली नाही, अशा एखाद्या साध्यप्रमेयाचा आधार घेऊन, शास्त्र या दृष्टीने भूगोलाच्या व्याख्येचे मूलभूत विधान करावयाचे, ही गोष्ट विशेष धोक्याची असावी असे दिसते. भूगोल हा ' संबंध-योगांचा ' अभ्यास आहे, ही व्याख्या मूळप्रश्नार्थाची जशी याचना करते त्याहीपेक्षा अधिक पूर्णार्थाने वरील व्याख्याही तशीच याचना करते आहे असे वाटते. (एक गेर्लांडचा अपवाद मानला नाही, तर) संबंधयोग अस्तित्वात असतात या गोष्टीला अद्यापितरी कोणी आक्षेप घेतलेला नाही ; उलटपक्षी, एक स्वतंत्र मूर्त एकक म्हणून दाखविता येण्यासारखा एकतरी प्रदेश अस्तित्वात आहे, हीच गोष्ट अद्यापि सिद्ध करून दाखविली गेलेली नाही.

या साध्यप्रमेयाने आपण प्रत्यक्षीकरणक्षम असल्याची आशा दाखविली, तर सर्वच भूगोलाभ्यासकांनी आपले सर्व प्रयत्न ते प्रस्थापित करण्यावरच केंद्रित करावे असे त्यांना आग्रह पूर्वक प्रोत्साहन दिले जाईल. एक-दोन विस्तृत क्षेत्रे आपण निवडून घेऊ, आणि अभ्यासकांचा एक ताफाच या कामी लावून, व त्यासाठी अनुसंधाननिधी कामी लावून, प्रत्येकास स्वतंत्रपणे संशोधन करण्याचे प्रोत्साहन देऊ. मात्र त्या क्षेत्रात एकरूप व स्वयंपूर्ण भूक्षेत्रदृश्ये वा प्रदेश यांचा समावेश निश्चितपणे झालेला आहे, अगर नाही, याविषयी खातरजमा करण्याची जबाबदारी त्यांची राहील. पण असा विचार येतो की, आपली साधने अशारीतीने गुंतवून ठेवण्यापूर्वी, त्या साध्यप्रमेयाचा युक्तिवादच तपासून पहाणे इष्ट होणार नाही का ? तोच जर सदोष असेल, तर कितीही प्रत्यक्ष क्षेत्राभ्यास केले तरी ते प्रमेय समर्थ असल्याचे सिद्ध होण्याची शक्यताच राहणार नाही.

## ' क ' भौगोलिक प्रदेश हा सावयव जीव आहे काय ?

सोईसाठी, संकल्पनांसंबंधी किंवा प्रदेशांसंबंधीची जी मते अत्यंत एकांतिक आहेत असे मानले जाण्याची शक्यता आहे, अशा मतांपासूनच आपण आपल्या परीक्षणास सुरुवात करूया. म्हणजेच, प्रदेश ही एक सावयव वस्तू आहे (अर्थात, जीवशास्त्रीय सावयव वस्तू आहे या अर्थाने. हीच संज्ञा कोणत्यातरी दुसऱ्या अर्थानेही वापरता येण्यासारखी आहे, हे पुढे विचारात घेतले जाईल.) या मतापासून आपणास सुरुवात करावयाची आहे. कारण, या मताने विरोधकांचे सर्वात मोठे मोहोळ उठविले. किंबहुना, ' प्रदेश ' या निश्चित स्वरूपाच्या मूर्त वस्तू आहेत, असे मानणाऱ्यांच्यापैकी पुष्कळांनी आपल्याच या सहकाऱ्यांविरुद्ध दंड थोपटले.

रिटर व त्याच्या पूर्वीचे आचार्यही, संपूर्ण पृथ्वी ही एक सावयव वस्तू आहे असे मानत. त्याच ओघात, खंडे ही पृथ्वीचे स्वतंत्रभाग किंवा " अवयव " आहेत असे त्याने

जे वर्णन केले त्यातूनच, लहानसर प्रदेश हेही सावयव जीव आहेत, या संकल्पनेचा सहजगत्या जन्म झाला असावा. या सर्व गोष्टींचा उल्लेख आम्ही आमच्या ऐतिहासिक सर्वेक्षणात केलेलाच आहे. तसेच, व्हिडाल-ड-ला-ब्लाख् यालाही, रात्सेलचा आधार घेऊन, पृथ्वी अथवा भूपृष्ठ हा एक " पार्थिव सावयव जीव " आहे या संकल्पनेचे विशेष आकर्षण वाटत असे [८०]. या संकल्पनेचा इतिहास सिद्ध उगम कशातही असो, सजीव व निर्जीव, प्राकृतिक व सांस्कृतिक अशा सर्वच पार्थिव घटनांच्या गुंतागुंतीच्या जटिलांचे वर्णन करण्यासाठी, रिटरने जी संज्ञा आपल्या नित्याच्या खास बोंगळ पद्धतीने वापरली, तीच प्रदेशाच्या स्वरूपाचे अचूक विधान करणारी संज्ञा म्हणून पुष्कळशा वर्तमान भूगोलकारांनी मान्य केली. याच संकल्पनेच्या प्रख्यात प्रतिपादनांपैकी एक ब्लंटश्लीच्या " Die Amazonas niederung als harmonischer Organismus " (एक सुसंवादी सावयव जीव या स्वरूपात अमेझोनचे वर्णन) या त्याने १९२१ साली प्रसिद्ध केलेल्या अभ्यास लेखात आढळते (२३१). त्यानंतर दोन वर्षांनी क्रेब्जने भूक्षेत्रदृश्यांचे सावयव वस्तू म्हणून वर्णन करणारा प्रबंध लिहिला, आणि त्यात त्याने त्यांची जीवशास्त्रीय सशरीर वस्तूंबरोबर तुलना करता येते असेही प्रतिपादन केले (२३४, ८१, ९३). अशाच प्रकारची मते इतरांनीही बोलून दाखविली आहेत. उदाहरणार्थ ओब्स्ट व गाईजलर या दोघांनी " स्थलावकाश " रूपी (Raumorganismus) सावयवासंबंधी चर्चा केली आहे, (१७८, ९ ; ३४५). इग्लंडमध्ये उन्स्टेडनेही अशाच प्रकारच्या संज्ञा वापरल्या (३०९, १७६, १८४ f). आणि आपल्या देशातील पाठ्यपुस्तकात त्यांचाच शिरकाव झाला आहे.

आधुनिक अमेरिकी भूगोलात ज्यापद्धतीने या संकल्पनेचे प्रथमच प्रतिपादन करण्यात आले, तो एक विरोधाभासाचाच प्रकार आहे. ' पार्थिव सावयवाच्या ' व्हिडालप्रणीत संकल्पनेसंबंधीच्या एका चर्चेत, सॉरने व्हॉलॉकचा निष्कर्ष उद्धृत केला : " ही संकल्पना परिणामांच्या दृष्टीने जरी सफल झालेली असली, तरी त्या विषयीच्या आज आमच्या मनावर ठसलेल्या सर्वात महत्त्वाच्या गोष्टी म्हणजे, त्या संकल्पनेचे काव्यमय आणि रूपकात्मक स्वरूप, त्यातील दृष्टिकोणाच्या मर्यादा, आणि त्यातून निश्चितपणे निर्माण होण्याची शक्यता असणाऱ्या चुका ", (८४, १८१). आता व्हॉलॉकच्या मूळ लेखातील वरील वाक्याच्या पाठोपाठ आलेले वाक्यही पुस्तीदाखल उद्धृत करणे इष्ट आहे. " कोणाची तशी इच्छाच असेल, तर तिचा (या पार्थिव सावयव जीवाच्या संकल्पनेचा) अंत्यविधी उरकून तिला इतमामाने शास्त्रीय स्मशान भूमीत मूठमाती द्यावी ; मात्र, त्याबरोबरच हे भूत थडग्यातून पुन्हा बाहेर येऊ नये म्हणून, त्यावरील शिळा मोहोरबंद करण्यास विसरू नये " (१८६, ४९). विनोद असा, की, काही पाने उलटताच, खुद्द सॉरनेच आपल्या चर्चेच्या ओघात तिचे पुनरुज्जीवन

---

८०. प्रसंगी, व्हिडालने त्यात थोडा फेरफार केला असला, तरी व्हिडालचा विचारच वरील शब्दप्रयोगात अचूकपणे मांडला आहे, असे व्हॉलॉकचे मत आहे (१८६, ४१, ४९) ; व्हिडालच्या " तत्त्वांच्या " डी मार्टोनीने संपादित केलेल्या प्रतीतील दोन वेगवेगळ्या शब्दरूपांचा उपयोग लक्षणीय आहे (१८४, ५).

केलेले दिसेल ; मात्र ती आता बदलेल्या आणि एवंगुणविशिष्ट रूपात पुढे येईल : " आम्ही भौगोलिक क्षेत्र ही एक सशरीर वस्तू आहे असे मानतो ", आणि आपले पूर्वाचार्य, वैद्यराज पासार्ज यांच्या पावलावर पाऊल ठेवून, " आपल्याला त्या क्षेत्राच्या शरीररचनेचा अभ्यास करावयाचा असतो. " आधीच्याच एका लेखात सॉरने, " एका अर्थी भूदृश्यात सजीवाचे गुणधर्म आहेत असे गृहीत धरले जाते " असे विधान केलेले होते.

एक गोष्ट निश्चित आहे, की " सावयव वस्तू या अर्थाने प्रदेशाच्या काल्पनिक स्वरूपावर " सॉरने विशेष भर दिलेला दिसतो, (८४, १८९ f ; २११, २६ ). पण, या कल्पनारम्य उपमांना, सत्य-विधानांचे मुखवटे कसे मिळवावयाचे, ते मार्ग माहीत असतात. एकदा फींचने असे सुचविले : " एखाद्या भौगोलिक प्रदेशात, किंवा भूपृष्ठाच्या स्वेच्छेने निवडलेल्या एखाद्या विभागात सुद्धा, मानवी प्राण्याचे काही गुणधर्म असतात, असे समजावयास हरकत दिसत नाही. प्रदेश ही अशी एक वस्तू आहे, की त्यातील प्राकृतिक व सांस्कृतिक घटक एकमेकांशी गुंफले गेल्यामुळे, त्या सावयवाला व्यक्तिमत्वही प्राप्त झालेले असते ". (२८८, १४). पण, ट्रेवार्थाबरोबर सहलेखक म्हणून लिहिलेल्या त्याच्याच ग्रंथात हीच संकल्पना तिला कोणतेही गुणविशेष न चिकटविता मांडलेली आहे. प्रदेश हे " कार्यकारी सावयव " आहेत व त्यांची तुलना वनस्पतींशी करणे शक्य आहे. (३२२, ४-५, ६६२). (अर्थात्, हे विधान ट्रेवार्थाचे आहे, असेही अनुमान कोणी काढू शकेल). विद्वानांच्या चक्री चर्चेचा विषय सोडून, जेव्हा जेम्स पाठ्यपुस्तक लिहू लागतो, तेव्हा तो " सजीवसदृश्य " या शब्दप्रयोगाऐवजी " सजीव " असा बदल करतो. (२८६, ७९ ; ३२१, १२४, १५५ f, ३५३). थोडक्यात, आपण येथे कोणत्यातरी एकांतिक वा लहरी लेखकांनी प्रस्तावरूपाने मांडलेल्या संकल्पनेचे परीक्षण करावयास निघालो नाही.

वरील सूचना टीकेच्या माऱ्यातून सुटलेल्या नव्हत्या, हे सांगण्याची गरजच नाही. प्रदेश अथवा भूक्षेत्रदृश्य हा एक सजीवच आहे असे म्हणणे, म्हणजे काही विशिष्ट, पण शब्दांनी व्यक्त करता येत नाही अशा प्रकारे, सजीव सदृश्य आहे येवढेच नव्हे तर त्यापेक्षा तो काहीतरी अधिक आहे असे सुचविण्यासारखे आहे. त्यामुळे, त्या विधानाने सजीवात अंगभूत असलेले गुणधर्म प्रदेशातही आहेत असे ठामपणे सांगितले आहे. म्हणूनच, प्रदेशात सजीव व निर्जीव यांचा अगदी निकट अन्योन्यसंबंध असतो, येवढेच सिद्ध करून काम भागण्यासारखे नाही.—कारण, खोरेभर मृत्तिकेच्या बाबतीतही आम्ही असे म्हणू शकतो. फिंचने म्हटल्याप्रमाणे, एखादा भौगोलिक प्रदेश आणि कोणत्याही अन्यप्रकाराने निवडलेला भूपृष्ठाचा अन्य विभाग या दोहोत, याबाबतीत तरी, काही भेद असत नाहीत. म्हणूनच, एखादा बंदिस्त, स्वतंत्र सावयव जीव आपल्या हाती लागण्याची येथे शक्यता नाही, तर, जास्तीत जास्त, केवळ सजीवासंबंधी काही तरी, म्हणजेच सजीवाचा एखादा अवयव आपल्या हाती लागण्याची शक्यता आहे.

पण, निर्जीव, सजीव यांच्या जीवविषयक संयोगात, त्यातील घटकांच्या केवळ अन्योन्य संबंधापेक्षा काहीतरी अधिक गुंतलेले असते. ब्योर्नरच्या मते, त्यातच अधिरचनेच्या रूपात एकूण वस्तूशी असलेल्या त्यांच्या संबंधाचाही समावेश असतो. या अधिरचनेचे वस्तूतील प्राकृतिक घटक हे ताबेदार असतात. उदाहरणार्थ हीच व्यवस्था मानवी जीवांतही असलेली आढळते. पण, भूपृष्ठाच्या कोणत्याही विभागात, किंवा संपूर्ण भूपृष्ठातही, या अंतिम अधिरचनेचे कोणतेच रूप असल्याचे अनुभवाला येण्याची शक्यता नसते. (२७४, ३४६). जुळते घेण्याची, समाकर्षणाची, प्रतिक्रियेची आणि पुनर्जननाची शक्ती अशा जीवजातीच्या गुणधर्मांची यादी करून, वरील विधानात अंतर्भूत असलेला भेद, व्हॉलॉकला, त्याप्रमाणे, आम्हालाही अधिक स्पष्ट करून दाखविणे शक्य आहे. आपल्या या लांबलचक टीकालेखात, काही तपशील देऊन, व्हॉलॉक असे मत मांडतो की, भूपृष्ठ अथवा कोणताही, त्याचा कोणताही क्षेत्रविभाग यांना या शक्ती असण्याची शक्यता नाही. प्रदेशावर क्रिया घडत असते ; ते, आपण होऊन, कोणतीही प्रतिक्रिया कधीच देत नाहीत (१८६, ५० ff).

ज्या मुद्यांवर या दोहोत अगदी सहज गोंधळ होण्याची शक्यता आहे नेमकी त्याच ठिकाणी धारदार सीमारेषा आखून, ब्यूर्गरने प्रदेश व सजीव या दोहोतील वेगळेपणा दाखविला आहे. – तो स्वतः प्रदेश ही एक पूर्ण वस्तू आहे असे मानतो. दोनही बाबतीत, विविध व असंख्य विभागांचा संयोग करून एक पूर्णवस्तू निर्माण झालेली दिसते, याची नोंद त्यानेही घेतली आहे. पण, सजीवाच्या बाबतीत ही एकूण वस्तू जीवधारणक्षम असते. प्रत्येक दोन भागात फरक असल्यामुळे, एकूण सजीवातील त्या त्या भागाच्या स्थानामुळे प्रत्येकाला नेमून दिलेले विशिष्ट कार्य त्याला त्याला पार पाडावयाचे असते. म्हणून, सजीवातील या संयोगात एकप्रकारचा कार्यकारी सुसंवाद आलेला असतो ; व त्यामुळे प्रत्येक स्वतंत्र अवयव एकूण शरीराच्या काही नियमांनी नियंत्रित असतो. म्हणूनच, त्याच्या स्वतंत्र अस्तित्वावरही मर्यादा पडलेल्या असतात. एकूण सजीवापासून विभक्त करून त्या भागाचा विचार केल्यास त्याचा अर्थ समजण्याची शक्यताच नसते. (११, ४५, ४७ f).

सजीवाच्या या वर्णनावरून एक गोष्ट लक्षात येते, त्याचे भाग स्वतंत्र सजीव म्हणून लक्षात घेता येणार नाहीत, तर त्यांचा फक्त इंद्रिये, अवयव किंवा सजीवाचे इंद्रियसदृश भाग म्हणूनच विचार करावा लागेल. पेंकने हेच अधिक संक्षेपाने सांगितले आहे. सजीव हा मूलतः अविभाज्य असतो. याच्याविरूद्ध पृथ्वीपृष्ठाचे कोणतेही प्रादेशिक एकक आणखी लहान एककात सहज विभागणे शक्य असते, इतकेच काय, त्यांचेही आणखी लहान एककात विभाग पाडता येतात. (२४९, ८).

या संकल्पनेमागचा हटवादीपणा लक्षात घेता, भूपृष्ठ अथवा त्याचा कोणताही एक भाग सजीव नाही, याचे व्हॉलॉक करतो त्याप्रमाणे केवळ, प्रत्यक्षीकरण करण्याने काम भागणार नाही, हे अगदी उघड आहे. ज्या थडग्यात त्याने ही संकल्पना गाढली, त्यावर आणखी काही धोंडे रचण्याचे काम आपल्याला करणे प्राप्त आहे. प्रदेश हा एखाद्या सजीवासारखाही

नाही असा निष्कर्ष काढला, तरच हे कार्य आपण योग्यरीतीने पार पाडल्यासारखे होणार आहे.—म्हणजे, त्या दोहोत काहीच साम्यगुण नाहीत या अर्थाने नव्हे, कारण, कोणत्यातरी प्रकारचे साम्यगुण सापडण्याची नेहमीच शक्यता असते, तर साम्यांचा अंश भेदांच्या अंशाच्या तुलनेने अगदीच किरकोळ आहे, या अर्थाने एक रूपक या अर्थाने विचार करावयाचा म्हटले— आणि ही संकल्पना त्या रूपकाच्या मर्यादेत ठेवावयाचे ठरविले, तरीही—ते धोकेबाज गैरसमज निर्माण करणारे आहे; आणि याच गोष्टीवर ब्रोगल, श्मिट, ब्रोक, लाउनटेनझाक आणि क्रोबी या सर्वांनी भर दिलेला दिसतो (२४४, १९७ ; १८०, ५१-५४ ; ३३३, १० ; २७८, १६ ; २०२, १५).

एका लोकप्रिय शब्दप्रयोगाचा वापर करून, " प्राकृतिक भूदृश्यातून विकास पावणारे सांस्कृतिक भूदृश्य " असे, किंवा प्रदेशाची " वाढ " असे ज्याला म्हटले जाते त्या गोष्टीचा आपण विचार करत असतो, तेव्हा, म्हणजे ज्या ठिकाणी या सजीवाच्या रूपकाला महत्व देता येईल असे वाटते, नेमके त्याच ठिकाणी, त्यातून गैरसमज विशेषेकरून निर्माण होतात. सजीवाची वाढ होत असताना एका साधारण उगमस्थानापासून (अंकुरित बीजापासून) सर्व वेगवेगळ्या भागांचे संवर्धन होत असते, सर्वसाधारण अन्नसंचयातून त्यांचे पोषण होत असते, आणि एकाच सर्वसाधारण आदेशक मध्यस्थाकडून त्यांच्या संवर्धनाचे नियमन होत असते. कोणत्याही एका अवयवात एखादा बाह्य घटक घुसडला गेला, तर त्याचे सर्वत्र पसरणाऱ्या जीवनरसात रूपांतर होते, उत्सर्जनातून बाहेर टाकला जातो, अथवा, काही अपवादात्मक बाबतीत, तो एक ' विष पिंड ' आहे हे तात्काळ ओळखून तो कुरूपासारखा अलग केला जातो. याच्याशी तुलना करता येतील अशा कोणत्या गोष्टी प्रदेशात होणाऱ्या बदलात आढळून येण्यासारख्या आहेत? कोणत्याही डोंगरउताराच्या मृत्तिकेची धूप त्याच क्षेत्रातील इतर भागांत आढळणाऱ्या परिस्थितीवर यत्किंचितही अवलंबून असत नाही. एकाच झाडाची वाढ, ही अगदी निकटवर्ती परिस्थितीवरच अवलंबून रहाते ; आणि इतर भागांत काय घडते आहे त्याच्याशी या घटनेचा तिळमात्र संबंध असत नाही. त्या क्षेत्राच्या उरलेल्या भागांतून काय घडते आहे, या गोष्टीला संबंधी घटनेच्या संदर्भात काहीही महत्त्व नसण्याची शक्यता असते. शेवटी, मानवाने त्या क्षेत्रात संवर्धित केलेले सांस्कृतिक भूदृश्य ही घटना त्या क्षेत्रातल्या क्षेत्रात झालेली वाढ म्हणूनही ओळखता येत नाही, किंवा एखाद्या सजीवाप्रमाणे त्या प्रदेशाने बाह्य घटकांवर घडविलेली पचन प्रक्रिया ओळखता येण्यासारखी नाही. संस्कारित वनस्पती नव्याने आणल्या जातात त्या काही त्या एकूण क्षेत्रात लावल्या जात नाहीत, अथवा एखाद्या सर्वसाधारण पचनेंद्रियातही घातल्या जात नाहीत, तर पहिल्याने एका विशिष्ट शेतातच त्या लावल्या जातात. एखाद्या आदिकालीन, पोटभरू अर्थव्यवस्था रूढ असलेल्या प्रदेशात, परप्रदेशी भांडवलदारांनी व यंत्रज्ञांनी घुसून कारखाने चालविणे, म्हणजे एखाद्या शल्यचिकित्सकाने तारा-मत्स्याच्या शरीरात पाठीचा कणा बसवून देण्यासारखे आहे.

एकूण प्रदेशात कोणतेच बदल घडून येत नाहीत, तर त्यातील घटकांत होत जाणाऱ्या बदलांच्या अनुषंगाने विविध प्रादेशिक घटकांच्या जटिलात बदल होत जातो, असा निष्कर्ष क्राइत्सबुर्ग काढतो. सांस्कृतिक भूक्षेत्रदृश्याचा (Kultur-landschaft) विकास हा त्यातील सांस्कृतिक घटक-जटिलाचा विकास असतो, अन्य काहीही असू शकत नाही. (२४८, ४१३). त्याला ब्रोक एक पुस्ती जोडतो ; हे बदल मोठ्या प्रमाणात बाह्यप्रभावातून निर्माण झालेले असण्याची शक्यता आहे ; आणि याचेच प्रत्यक्षीकरण तो सान्ता क्लारा खोऱ्याच्या उदाहरणाने करतो. परिणामतः, तो चर्चा करतो ती विकासाची नसून फेरबदलांची असते. (३३३, १०). येथे पुन्हा एकदा असे सांगावेसे वाटते, की सजीवाची उपमा लागू होण्यासारखी असेलच, तर ती एकूण भूपृष्ठाला लागू होणे शक्य आहे. जगाच्या कोणत्याही एका क्षेत्रात होत असणाऱ्या बदलांचा अन्वयार्थ लावण्यासाठी घ्यावयाच्या संदर्भांचा विस्तार शेजारच्या, आणि काही वेळा अगदी दूरच्याही, प्रदेशापर्यंत करणे आवश्यकच होते. म्हणजे, एका माणसाचे फुप्फुस त्याच्या काही शेजाऱ्यांच्या फुप्फुसांशी जोडलेले असावे, त्याचे हृदय दुसऱ्यांच्या हृदयांशी जोडलेले असावे, आणि त्याच्या शरीरातील दुग्धरस कित्येक मैल अंतरावर रहाणाऱ्या त्याच्या बांधवांकडून पुरविला जात असावा, असाच काहीसा प्रकार वरील उदाहरणात आहेसे वाटते.

शेवटी, जीवप्रजाती व प्रदेशप्रकार यांच्यात साम्य आहे असा विचार मांडण्याच्या प्रयत्नांचा परिणाम म्हणून कोणता गोंधळ उडाला, याची चर्चा करण्याची संधी पुढे आपल्याला मिळणारच आहे. सजीवांच्या जगात एकाच प्रजातीच्या वेगवेगळ्या व्यक्तींचे अन्योन्य संबंध आणि विविध प्रजातींचे परस्परांशी असलेले संबंध, हा भूतकालीन शरीरसंबंधांचा परिणाम असतो.—म्हणजेच त्यांची उत्क्रांती समान उगमस्थानांपासून झालेली असते. हेच तत्त्व जगातील अगदी विभक्त अशा विविध क्षेत्रांना लागू करण्याच्या प्रयत्नांतून मोठाच गोंधळ माजण्याची शक्यता आहे ; या गोष्टीचे प्रत्यक्षीकरण करत बसण्याची आवश्यकता आहे असे वाटत नाही.

## ' ड ' भौगोलिक प्रदेशातील सुसंवाद व लयबद्धता

सजीव स्वरूपात प्रदेशाची संकल्पना हे शास्त्रीय परिभाषेतील वचन आहे, व त्यामुळेच ते क्रान्तिक विश्लेषणाचा विषय होऊन राहिले. पण, पुष्कळशा जर्मन भूगोलकारांनी वापरलेली ' सुसंवादाची ' संकल्पना आणि व्होल्त्सने सुचविलेली भूक्षेत्रदृश्यातील—मग ते भूदृश्य-स्वरूपात असो वा प्रदेशस्वरूपात असो—लयबद्धतेची कल्पना यामुळे शास्त्रविरूद्ध ज्ञानक्षेत्रातील संकल्पना नव्यानेच घेतल्या गेल्या, आणि त्या तर फारच थोड्यांना परिचित असतात.

प्रादेशिक घटनांतील सुसंवादाच्या या संकल्पनेचा मागोवा हंबोल्ट पर्यंत घेता येतो, हे गृहीत आहे. पण, प्रदेश वर्णनाचा एक प्रकार याच्या पलीकडे, त्याने त्या संज्ञेचा कोठे फारसा उपयोग केलेला मला आढळला नाही. ज्यांनी या संकल्पनेची तपशीलवार चर्चा

केलेली आहे असे आधुनिक भूगोलकार ब्लंटश्लीने अमेझोनच्या पूरमैदानाचे वर्णन "ein harmonicher Organismus" (एक सुसंवादी सजीव) अशा शब्दात केले असल्याचा सहसा निर्वाळा देतात, (२३१). सजीवाशी केलेली तुलना अमान्य करणारे पुष्कळजण ही सुसंवादाची संकल्पना मान्य करतात. पण, येथेही वाचकांनी तिचे परिशीलन काळजीपूर्वक केले पाहिजे ; कारण, प्रत्येक अभ्यासक आपापल्या परीने त्याचा अर्थ लावण्याचा प्रयत्न करतो. काहींच्या मते, एखाद्या प्रदेशातील सर्व घटनांच्या संबंधांची एक साखळी असते, येवढेच त्यातून सूचित होते ; आणि हंबोल्टही तसेच मानत असे हे गृहीत आहे. या अर्थाने पहाता, भूपृष्ठाच्या प्रत्येक विभागात असा सुसंवाद असतो. कोणत्याही प्रकारच्या घटनेत होणाऱ्या बदलांमुळे इतर घटनांवर कमीजास्त परिणाम होतोच ; व त्यामुळे निर्माण झालेली एकूण नवी परिस्थिती म्हणजे केवळ अन्यप्रकारचा सुसंवादच असतो. (c/o ग्राडमानने केलेली उद्बोधक व सूचक चर्चा, २३६). 'सौंदर्यबोधक' अर्थापेक्षा वेगळ्या अर्थाने, म्हणजे "गतिमान" अशा अर्थाने, ही संज्ञा वापरतानाही, ज्यांतील सर्व निसर्ग शक्तींनी परस्पराशी हातमिळवणी केलेली आहे असे अनुभवास येते, किंवा जेथे त्या पूर्णांशाने अन्योन्यसंबंधात असतात, अशाच प्रदेशांच्या सदर्भात ही संज्ञा वापरली जावी, असे फोगेलचे मत आहे. पुष्कळशा क्षेत्रांतून अशी परिस्थिती असत नाही, असा त्याचा निष्कर्ष आहे. हवामान भूशास्त्रीय रूपधेये, अशांसारखी कारके एकदेशीय नियमाने चालत असतात. अन्य रुपधेये या बदलांशी आपण होऊन हातमिळवणी करतात. अशारितीने, निसर्गशक्तींच्या या संपातातून एक 'परिणामी परिस्थिती' निर्माण होते आणि तेच त्या प्रदेशाचे लक्षण ठरते, पण, प्रत्यक्षात या शक्ती म्हणजेही, बऱ्याच अंशाने कार्यकारण दृष्ट्या पहाता, स्वतंत्र कारके असतात. (२४४, १९६ f).

ब्लंटश्लीची मूळची संकल्पनाच वेगळ्या पातळीतील होती, हे उघड दिसते. परप्रदेशीय व्यापारी रूपधेयांच्या घूसखोरीने निर्माण झालेली बदलती परिस्थिती एका नव्या ॲमाझोनियाला जन्म देऊन गेली होती ; आणि तो काही सुसंवादी सजीव नव्हता. त्याच्या एकूण चर्चेचा मतितार्थ येवढाच दिसतो, त्याला ही परिस्थिती आवडली नाही ; व येवढ्यावरूनच "सुसंवादी" याचा सौंदर्यबोधक अर्थच त्याला अभिप्रेत होता, असे गृहीत धरणे प्राप्त आहे. पण, भूदृश्यांची व प्रदेशांचीही, सौंदर्यबोधक लक्षणे भूगोलकाराने विचारात घेण्यास मनाई नाही अशी भूमिका आपण घेतल्यावर, येथे या दुसऱ्या अर्थानेही 'सुसंवादी' ही संज्ञा वापरण्यास आक्षेप घेण्याचे कारण उरत नाही, असे दिसेल. एकच गोष्ट येथे सांगणे आवश्यक आहे. हे वर्णन केवळ वस्तुनिष्ठ हेतूनेच केलेले असण्याची आवश्यकता नाही हे वाचकांनी लक्षात घेतले पाहिजे. अन्य जर्मन लेखकांनी, 'सुसंवाद' या संगीत-क्षेत्रातील संज्ञेच्या उपयोजनाचे जाणीवपूर्वक अनुकरण केले आहे. उदाहरणार्थ काइत्सबुर्ग हा भूगोलकार भूक्षेत्रदृश्यांतील प्राथमिक व दुय्यम सुसंवादाविषयी काहीसे सांगतो. (२४८). पार्शकडून घेतलेली पेंकची सूचना तर याहूनही मनावर ठसणारी आहे.

(२४९, ४ ते ८). " प्रत्येक क्षेत्रविभागात एकप्रकारचा सुसंवाद असतोच, " [ येथे इयोल्सने अगदी विशिष्ट स्वरूपात व्याख्याबद्ध केलेला भौगोलिक प्रदेश, येवढाच अर्थ अभिप्रेत आहे (२७१) ], इतकेच नव्हे तर, या सर्व विभागांचे मिळून एक विस्तृत एकक क्षेत्र, म्हणजेच Landesgestalt (एक संपूर्ण भूक्षेत्र), तयार होत असते आणि त्यातही विशिष्ट स्वरमेळाची लक्षणे आढळतात, उदाहरणार्थ : जर्मनीच्या भूमी पुरतेच बोलावयाचे (deutscher Boden), तर आल्प्स, मधले कडेपठार, व मैदान असा Dreiklang म्हणजे तीनस्वरांचा मेळ दिसतो ; तर पोलंडात मैदान व बरेचसे उंच डोंगर यांचा Zweiklang दोन स्वरांचा मेळ झालेला आढळतो. मध्य डान्यूब-खोऱ्यात पर्वत व मैदाने, आरण्ये व कुरणे असा दोने स्वरांचा दुहेरी मेळ आढळतो, मात्र त्यांची रचना समरेषीय नसून समकेंद्री आहे. आणखी पूर्वेकडे गेल्यास, हाच दोन स्वरांचा मेळ Zweiklang खालच्या पट्टीत आलेला दिसतो ; कारण, आरण्ये व कुरणे यांचा हा मेळ शेवटी वृक्षहीन तंद्रा व ओसाड कुरणभाग यांच्या अर्धस्फुट सुरात विलीन होताना दिसतो. ही वर्णने इतकी सूचक आहेत, की सुसंवादी प्रदेशांच्या या स्वरमेळांचे विश्लेषण करण्याचे भूगोलकारांनी निःशंकपणे हाती घ्यावे ! ( " सुसंवादाच्या " या संकल्पनांच्या अन्य अर्थशोधांसाठी, पहा : क्रेन्ज २३४, ८१-९० ; ग्रान्यो २५२, २७ f ; ब्यूर्गर ११, ९९-१०२ ).

सुसंवादाच्या या विषयाचाच आणखी एक प्रकार व्होल्त्सच्या ' लयबद्धतेच्या ' संकल्पनेने सादर केला आहे, त्याचे वर्णन तो ' बदलांची लयबद्धता ' या शब्दात करतो (२४३). या एका संज्ञेच्या पोटी व्होल्त्स एकाच भूक्षेत्र दृश्यातील तीन वेगवेगळ्या वर्गांचे बदल विचारात घेतो. (१) एकाच वेळी त्या भूदृश्यावरून आपण नजर फिरवत गेलो, तर नजरेस पडण्याची शक्यता असणारी बदलत्या दृश्यांतील लयबद्धता ; (२) ऋतूंची लयबद्धता ; आणि (३) प्रदीर्घ काळानंतर त्या एकूण क्षेत्रात घडून येणाऱ्या बदलांतील लयबद्धता. या तीन अगदी वेगवेगळ्या प्रकारच्या गोष्टींचा निर्देश एकाच संज्ञेने एकत्रितकरून माजविलेल्या गोंधळाखेरीज यात नवीन काय साधले, हे समजणे कठीणच आहे ! कारण, सामान्यपणे बोलावयाचे तर, ही संज्ञा त्यांच्यापैकी फक्त एकाच घटनेसाठी–अर्थात, ऋतुबदलांसाठी–निर्वेधपणे वापरता येण्यासारखी आहे. एखाद्या क्षेत्रातील विविध–एखाद्या क्षेत्रातील विविधरूपांची व्यवस्था–उदाहरणार्थ : आरण्यव्याप्त डोंगर व कृषिव्याप्त दऱ्या–यांचा खरोखरीच एक लयबद्ध आकृतिबंध होत असताना दिसला, तर पहाणारा त्याची नोंद घेतल्याशिवाय रहाणार नाही. पण अशा प्रकारचे आकृतिबंध सर्वसामान्यपणे सापडतीलच असे गृहीत धरण्यास कोणताच दृश्य आधार नाही. . तसेच, ऐतिहासिक कालखंडांच्या बहुधा विसंवादी आणि अत्यंत अनियमित प्रवाहातही लयबद्धता आहे, हे शास्त्रीयदृष्टी असणारा कोणता महाभाग मान्य करील ! (c/o ग्राडमान, २३६ आणि ब्यूर्गर ११, १९३ f).

## ' इ ' भौगोलिक क्षेत्र ही एक मूर्त, एकाकारीवस्तू आहे काय ?

भौगोलिक प्रदेशांसाठी वापरलेल्या विविध संकल्पनांच्या वरील चर्चेत अत्यावश्यक असलेल्या एका प्रश्नाचा संदर्भ जवळजवळ आलेलाच नाही ; म्हणून, आता आपल्याला त्याचे परीक्षण करणे प्राप्त आहे. पृथ्वीपृष्ठाचे विभाग–मग ते मानवेतर निसर्ग, किंवा एकूण एक

सत्य घटना, किंवा स्वतः भूगोलकार यांपैकी कोणीही केलेले असोत–हे ज्यांना आकार, बांधा व कार्य आहे, आणि म्हणूनच एखाद्या क्रमबंधात ज्यांना स्थान आहे, अशा वेगवेगळ्या एकाकार, पूर्ण व मूर्त वस्तू आहेत असे मानून त्यांचा विचार करण्यास काय हरकत आहे ? (२११, २५ f). मागेच सांगितल्याप्रमाणे हे प्रस्तुत प्रमेय विशेषेकरून जर्मनीतील, आणि आपल्यादेशातीलही अनेकानेक भूगोलकारांनी अस्तिपक्षी मांडलेले आहे. त्यात, प्रदेश हा सजीव आहे, या संकल्पनेला आक्षेप घेणाऱ्या भूगोलकारांचा समावेश होतो. बरवर तरी, काही अल्पसंख्य अभ्यासकांनी, पण कमीजास्त प्रमाणात निश्चित शब्दात, या संकल्पनेला विरोध केला आहे. दोन्हीही पक्षांतील पुष्कळांना प्रादेशिक भूगोलाच्या एकूण क्षेत्रातील हा प्रश्न मूलभूत महत्त्वाचा वाटत असल्यामुळे, या ग्रंथात चर्चेसाठी घेतलेल्या कोणत्याही एका प्रश्नापेक्षा अधिक चौफेर सावधानतेने त्याचा विचार व्हावा इतका त्याचा अधिकार आहे.

आधीच सांगितल्याप्रमाणे, या संकल्पनेचा उगम अभिजात-पूर्व भूगोलकारांच्या लेखनांतून आढळतो आणि त्याचा मागोवा रिटर व रात्सेल यांच्या लेखनातून घेता येण्यासारखा आहे. त्याचे मोठ्या प्रमाणात संवर्धन करणारी प्रथम प्रेरणा श्लूटर व पासार्ज यांच्या लेखनातून मिळाली ; आणि या दोघांनीही हेटनरच्या पद्धतितंत्राला विरोधादाखल तिचे प्रतिपादन केले. विशेषतः पासार्जन " हेटनरच्या केवळ विश्लेषणात्मक पद्धती " ला विरोध केला, व कोणत्याही भूक्षेत्र दृश्याचे एकूण स्वरूप सादर करणे या हेतूवर भर दिला. (c/o ब्यूर्गर ११, ८५ f).

वादाचा विषय अधिक स्पष्ट करण्याच्या दृष्टीने, एका मुद्याची नोंद येथे करण्यास हरकत दिसत नाही ; कारण, त्यावर सर्वसामान्यपणे एकमत होण्याची शक्यता आहे, भूगोलाला निदान एकतरी, वेगळी, एकाकार व मूर्त वस्तू, म्हणजेच हे सर्व जग, अभ्यासासाठी मिळाली आहे. या जगात–म्हणजे भूपृष्ठात–भूगर्भ, चंद्र व सूर्य या पृष्ठेतर कारकांची भर घालावयाची ; कारण, ही कारके एकूण भूपृष्ठावर एकाच वेळी प्रभाव पाडू शकत नसली, तरी वेगवेगळ्या भागात, कमीजास्त फरकाने प्रभाव पाडतच असतात. अशाप्रकारे तयार झालेली ही एक संपूर्ण वस्तू, ज्याच्या भागांची व्यवस्था अवयव सदृश आहे अशी एक पूर्ण यंत्रणा म्हणून, विचारात घ्यावयास हरकत नाही. अर्थात येथे अवयव याचा अर्थ जीवशास्त्रातील जीवाचे अवयव असा घ्यावयाचा नाही (c/o हेटनर २६९, १४२ ; क्रॉलॉफ १८६, ३८ ff). खरे पहाता, या निष्कर्षाचा, एकूण जगाचे विभाग या स्वतःच वेगळ्या, मूर्तवस्तू आहेत का, या प्रश्नाशी काडिमात्र संबंध नाही.

भूदृश्य अथवा भूक्षेत्रदृश्य यांच्या विषयींच्या विविध संकल्पनांची चर्चा चालू असताना (प्रकरण ५ वे विभाग ' अ '), एकाच संज्ञेचा निरनिराळ्या अर्थाने वापर केला, तर वरकरणी तर्कशुद्ध वाटणारे, पण वेगवेगळे, निष्कर्ष काढता येतात ; या धोक्याची सूचना आम्ही दिलेली आहे. ' भूदृश्य ' हा शब्द कमीजास्त प्रमाणात 'भूक्षेत्र ' या शब्दाशी समानार्थी आहे अशी त्याची व्याख्या केली, आणि त्याचा दुसरा वाच्यार्थ म्हणजे ' दृष्टीगोचर दृश्य 'हा अर्थही कायम

राखला, तर दुसरा कोणताही युक्तिवाद न करता, भूक्षेत्र हे एक वस्तुनिष्ठ एकक आहे असे सिद्ध केल्याचा भास निर्माण करता येतो. उदाहरणार्थ : सॉर प्रथम ' भूदृश्य ' हा शब्द ' भौगोलिक क्षेत्र ' या शब्दाशी समानार्थी असल्याचा आभास निर्माण करतो ; आणि मग, " एक संपूर्ण सत्यस्थिती ", किंवा " आकार, रचना, व कार्य असलेली एक सशरीर वस्तू " अशा अर्थाने, जणूकाही वरील दोनही शब्द समानार्थी आहेत अशा थाटात, त्यांचा उल्लेख करतो. शेवटी, अशाप्रकारे, आपले हे " मूर्त भूदृश्य " " डी गिअरच्या ' अमूर्त ' क्षेत्रीय संबंधांपेक्षा वेगळे आहे " असे प्रतिपादन करतो (२११, २५, ४७ ; ८४, १९०). अशीच दुसरी काही विधाने निश्चितपणे वेगळाच दृष्टिकोण मांडत आहेत असे वाटते. एखाद्या क्षेत्रातील घटनांचे क्षेत्रीय संबंध आणि त्यांची व्यवस्था यांचा शोध घेणे हे भूगोलाचे महत्कार्य आहे : अर्थातच " भूदृश्याचे घटनाशास्त्र " हा भूगोलाचा खरा अभ्यास विषय आहे (२११, २२, २५). पण मग, या मतात आणि डी-गिअरच्या " क्षेत्रांचे अमूर्त संबंध " या शब्दांनी व्यक्त केलेल्या मतात वेगळेपणा कोठे राहिला ?*

कोणत्याही गृहितप्रमेयाची समर्थनीयता एखाद्या विशिष्ट शब्दाच्या उपयोगावर अवलंबून ठेवणे शक्य होणार नाही. याच्या विरूद्ध, जिची व्याख्या काटेकोरपणे कधी करताच आली नाही अशा एखाद्या संज्ञेवर त्या प्रमेयाची समर्थनीयता अवलंबून असल्याचे दिसून आले, तर तेवढ्या एका कारणानेच ते संशायास्पद आहे असे मानण्यास हरकत नाही. भूपृष्ठाचा एक क्षेत्रीय विभाग घेऊन, त्याचा एक घटनात्मक ' प्रदेश ' होईल अशा विशिष्ट प्रकाराने त्याच्या मर्यादा आखून दिल्या, आणि ती एक पिंडिताकार, म्हणजेच मूर्त, एकाकार व पूर्ण, वस्तू आहे, असे त्याचे तर्क पद्धतीने प्रत्यक्षीकरण करू शकलो, तर मग त्या प्रदेशाला कोणतेही नाव दिले, तरी तो तोच असला पाहिजे. आता, आपले तर्कसिद्ध प्रत्यक्षीकरण स्वच्छ असावे असे वाटत असेल, तर ज्यांच्या संदिग्ध अर्थांमुळे संशयास्पद निष्कर्ष निघण्याचा संभव असतो, असे शब्द आपण कटाक्षाने टाळूया. काहींच्या मते, क्षेत्र आणि प्रदेश हे शब्द असमर्पक नाहीत ; कारण भूगोलाला त्या क्षेत्रातील सर्वच गोष्टींचा समावेश अभिप्रेत नसतो, तर त्यातील फक्त भौतिक रूपधेयांचाच समावेश करावयाचा असतो. पण, त्यातील अभौतिक रूपधेये वजा जाता उरलेल्या क्षेत्राचाच अर्थ व्यक्त करणारी एकही संज्ञा भाषेत तर आढळत नाही. अशा स्थितीत, ' भौगोलिक प्रदेश ' अशासारखी, आपल्याला इष्ट अर्थ असणारी, आणि जिची अचूक व्याख्या करता येते अशी, नवीन संज्ञाच शोधून तयार करणे सोईचे होईल. जनमनात त्या संज्ञेचा पूर्व प्रस्थापित अर्थ असण्याची शक्यता नसल्याने, तिचा अर्थ तोच राहील. भूगोलातील अलीकडेच झालेल्या पद्धतितंत्रविषयक अभ्यासांचे परीक्षण करण्याचा अनुभव असलेला कोणीही अभ्यासक, ज्यांचे तर्कसिद्ध प्रवचन ' भूदृश्य ' ' अथवा ' भूक्षेत्र दृश्य ' (Landscape or Landschaft) या संज्ञांच्या वापरावर आधारलेले आहे अशा कोणत्याही गृहीत प्रमेयांकडे, संशयित नजरेनेच पहाणार.

आपल्यापुढे असलेली ही विशिष्ट समस्या, तत्त्वज्ञान व मानसशास्त्र यात वापरल्या जाणाऱ्या संज्ञा वेगवेगळ्या जर्मन भूगोलकारांनी आपल्या क्षेत्रात नव्यानेच आणून सोडल्यामुळे, आणखीच गुंतागुंतीची झालेली आहे. पुष्कळदा त्याना नवीन अर्थ जोडण्यात आले आहेत,

*पुरवणी टीप ३८ पहा.

पण तसे करताना हा नवीन अर्थ नेमका काय आहे त्याचे विधान करण्याची काळजी सहसा घेतलेली नाही. मानसशास्त्रज्ञ व्योर्नर [८१] याने भूगोल क्षेत्रातील या संज्ञांच्या वापराचे प्रभुत्वपूर्ण परीक्षण केले, तेव्हा त्याने आग्रहपूर्वक असे सांगितले, की "या संकल्पनांच्या व्याख्या निःसंदिग्धपणे करण्याची निकडीची गरज आहे." (२७४, ३४०) तेव्हा सुरुवातीलाच जर आपण वापरलेल्या संज्ञांना दिल्या गेलेल्या विविध अर्थांची एक संक्षिप्त जंत्री केली, तर आपले प्रस्तुत विवेचन सुलभ होईल.

काही बाबतीत हा घोटाळा Individual (वेगळी वस्तू, आगळेरूप) या शब्दाचा वापर केल्याचा परिणाम म्हणून निर्माण झालेला आहे (या शब्दाची जर्मन व फ्रेंच भाषांतील रूपे मूलतः आपल्याकडील रुपांसारखीच आहेत). एखाद्या क्षेत्राला, मग ते प्रदेशरूप असो वा नसो, त्यातील अन्योन्य संबंधात असलेल्या रूपधेयांच्या संयोगामुळे, त्याला अन्य क्षेत्रांपेक्षा भिन्नरूप प्राप्त झालेले असते, आणि या अर्थाने कोणत्याही क्षेत्राला ' आगळेपण ' असते, याबाबत सर्वांचे एकमत होईल, हे गृहीत आहे. याच अर्थाने कोणत्याही क्षेत्राच्या, इतकेच नव्हे पृथ्वीवरील कोणत्याही स्थळाच्या ' आगळेपणा ' बद्दल हेटनर सांगत असतो, (१४२, २१ ; १६१, २१७ ; आणि २६०, १४३ f). निश्चितपणे मर्यादित असलेली वस्तू किंवा स्वतंत्र अस्तित्व या जास्तीच्या अर्थाने संबंधी क्षेत्राला तो ' वेगळी वस्तू ' असल्याचे मानत असे काहीजण समजत असत, हा त्याच्या विधानाचा केवळ गैर अर्थ लावल्याचा परिणाम आहे. जेव्हा फ्रेंच भूगोलकार क्षेत्रांचा ' वेगळ्या वस्तू ' म्हणून उल्लेख करतात, तेव्हाही ते त्यांच्या आगळ्या रूपाचाच विचार करत असण्याची अगदी शक्यता आहे. पण मुसेटच्या सूचनेनुसार, त्याना प्रत्येक क्षेत्राच्या " व्यक्तिमत्वात " अधिक अभिरूची असल्यामुळे, त्यांनी त्या शब्दांनी अधिक मूर्तस्वरूपाची संकल्पना सूचित केल्यासारखी दिसते (९३, २७५). हाच मुद्दा स्पष्ट होण्यासाठी आपण एखादे सामान्य रंगचित्र व आकारसंयोग यांच्यातील विरोधाचा विचार करू. पहिल्यात, त्याच रंगचित्राच्या कोणताही एक चौरस इंच भाग त्यातील रंग व रेषा यांच्या संगतीमुळे आगळा असू शकेल. त्यामुळेच, कोणत्याही यथायोग्यपणे निवडलेल्या भागाला ' आगळेपण ' असलेले दिसून येईल, आणि तरीही प्रत्यक्षात त्यातील कोणताही एक भाग वेगळे स्वतंत्र, एकक असणार नाही (" पार्थिव रंगपटात " हटिंग्टनने केलेल्या अत्यंत परिणामकारक तुलनेकडे आम्ही वाचकांचे लक्ष पुन्हा वेधू इच्छितो). याविरूद्ध आकारसंयोग हा अनेक आकारांच्या एकक तुकड्यांनी तयार केलेला असतो. यातील कोणताही एक तुकडा सुटा घेतला, तर आगळेरूप या अर्थाने त्याला " वेगळेपण " असेलच असे नाही ; कारण, तो इतर तुकड्यांशी आकार व रंग याबाबतीत समरुप असण्याची शक्यता

---

८१. व्योर्नरने भूगोलाचा अभ्यास केलेला होता आणि तो लाउटेनझाकच्या हाताखाली केलेला होता. या दोन क्षेत्रांतील संबंधांच्या संदर्भात गुरूही शिष्याकडून काही शिकला, असे स्वतः लाउटेनझाकनेच सुचविले आहे. वर्तमान जर्मन साहित्यातील, भौगोलिक प्रदेशाच्या समस्येचे अतिसुस्पष्ट प्रतिपादन लाउटेनझाकच्या अगदी अलीकडच्या अभ्यास लेखातच आलेले दिसते (२७८). अंशतः का असेना, कदाचित याचे कारण हा त्याचा नवीन अभ्यासच असावा.

आहे. म्हणून पहिल्या " वेगळेपणाच्या " अर्थाने ' आगळेरूप ' ही संज्ञा वापरून आणि ' वेगळा ' ही संज्ञा फक्त निश्चित मर्यादा असलेल्या वस्तूंचा बोध करण्यासाठी वापरून हा घोटाळा टाळता येण्यासारखा आहे.

" Unit " या शब्दाच्या आणि विशेषेकरुन जर्मन भाषेतील " Einheit " या शब्दाच्या आणि विशेषेकरुन त्याच्या " einheitlich " या विशेषणाच्या वेगवेगळ्या अर्थांनी माजविलेला गोंधळ अधिक सार्वत्रिक आहे. यांतील दुसऱ्या शब्दाचे भाषांतर ' एकाकार ' किंवा ' एकरूप ' किंवा ' एकजातीय ' असे करण्यास हरकत नाही. वरीलपैकी शेवटच्या अर्थाने Einheit हा शब्द ग्रान्यो वापरतो. याविरूद्ध " भौगोलिक वस्तू " या निश्चितपणे मर्यादित अशी क्षेत्रे असतात ; आणि ही क्षेत्रे एकजातीय असण्यास अथवा नसण्यासही हरकत नसते (२५२, ३३ f). ग्रान्योने आपल्या दोनही संज्ञांच्या व्याख्या स्पष्टपणे मांडल्या आहेत, तरीही अशारीतीने त्यांचा वापर करण्याने गोंधळ संपेल, अशी शक्यता दिसत नाही. जर्मन भाषेतील या गुंत्याची उकल कशीही होवो, आपल्या पुरते आपण " Unitary " हा शब्द एक वेगळी एकाकारी वस्तू या अर्थाने वापरूया ; मग ती एकरूप अथवा एकजातीय असो वा नसो !

आधुनिक भूगोलाच्या ऐतिहासिक विकासक्रमाच्या चर्चेत, एकतेच्या दोन संकल्पनांतील भेद आम्ही दाखवून दिला, आणि त्यांचेच वर्णन आम्ही एकतेची ' उभी ' आणि ' आडवी ' पातळी असे केले. विविध प्रकारांच्या आणि विविध घटनांच्या नैसर्गिक एकूणतेच्या (Naturganzen) आपल्या संकल्पनेवर हंबोल्ट वारंवार भर देत असे. तसेच रिक्टोफेन व हेटनर यासारखे अलीकडच्या काळातील अभ्यासकही भूपृष्ठावरील कोणत्यातरी एका गृहीत विभागातील घटनांच्या एकतेच्या संदर्भात बोलत असतात. या उभ्या पातळीच्या अर्थाने ही संकल्पना कोणत्याही क्षेत्राला लागू पडणारी आहे–उदाहरणार्थ : आपल्या केंद्रवर्ती राज्यातील एक प्रदेश. त्याच्या मर्यादा कोठे आहेत आणि तो एकरूप आहे कि बहुरूप आहे, हे आणि असले प्रश्न या ठिकाणी असंबद्ध आहेत, कारण त्यातील प्रत्येक विभाग कोणत्या-ना-कोणत्या प्रकारे इतरांशी संबंधित असतोच. इतकेच काय, त्याच्या सरूप भागांशी असलेल्या संबंधांपेक्षा विरूप-भागांशी असलेले त्याचे संबंधयोग कमी होते असेही खात्रीपूर्वक सांगता येणार नाही. सॉल्टलेक मरूस्थलीतील एकेका शेतमळ्याचेही वाझाश डोंगररांगांतील पर्जन्यत्रस्त उतार भागाशी जिव्हाळ्याचे संबंधयोग आहेत.

पुष्कळशा जर्मन लेखकांनी या उभ्या पातळीतील एकतेला एकूणता अथवा एकवस्तू असे म्हटले आहे (व्होल्स २६२ ; लाउटेनझाक १७३, ३० ; ग्रान्यो २७०, २९६). पण हेटनर आणि ब्योर्नर या दोघांनीही आपल्याला एका गोष्टीची आठवण दिली आहे : सत्यस्थितीतील अशी वस्तू परस्पर संबंध असलेल्या विभागांची केवळ गोळा बेरीज असते; म्हणूनच मूळ-स्वरूपाची एकवस्तू, अथवा " एक सावयव वस्तू " (ती सजीव असलीच पाहिजे असे नाही) अशी विविध नावे दिल्या गेलेल्या वस्तूशी वरील कल्पनेचा गोंधळ करणे

योग्य होणार नाही. अशा प्रकारच्या एकवस्तूत (Ganzheit) तिचे विभाग एकमेकांवर अवलंबून असतात, इतकेच नव्हे तर, ते त्या एकूणावरही अवलंबून असतात. अर्थातच त्या एकूण वस्तूशी फारकत करून, केवळ अन्योन्यांच्या परिभाषेत तिच्या भागांचा यथातथ्यरीतीने अन्वयार्थ लावताच येणार नाही–दुसऱ्या शब्दात सांगावयाचे, तर ती एकूण वस्तू त्या सर्व विभागांच्या गोळा बेरजेपेक्षा काहीतरी अधिक असते, आणि ती बाह्य घटकांपासून सापेक्षतः स्वतंत्र असते (२६९, २७४ ; तसेच पहा unabridged International Dictionary -Webster). वर सुचविलेल्या उदाहरणात, तेथील पर्जन्यविषयक परिस्थिती समजण्यासाठी सॉल्टलेक मरूस्थलीचा एकूण परिसर समजून घेण्याची गरज नाही ; तिच्या इतर घटकांपैकी काही थोड्यांची माहिती पुरेशी असते. या संज्ञाशी संबंधित असलेले बहुतेक अभ्यासक अशाप्रकारच्या शिथिल एकतेला सर्वसाधारणपणे गोळाबेरीज (Summe किंवा undererbindung) असेच म्हणतात, असे व्योर्नर सांगतो (२७४, ३४१). तो अशीही एक नोंद करतो, की ड्रीशने ' एकता ' (Einheit) या शब्दाचा वापर " दृढ अन्योन्यावलंबन असणारा एक सापेक्षतः परिमित क्रमबंध, " अशा अर्थाने करणे पसंत करतो ; पण उभ्या पातळीतील घटनांच्या कोणत्याही क्षेत्रातील अशा संयोगांतून एक परिमित क्रमबंध संघटित होऊ शकतो, हे सिद्ध व्हावयाचे राहूनच जाते. प्रथम गोळाबेरजेने एकत्र केलेले जटिल म्हणजेच एकपूर्ण वस्तू होय असे प्रतिपादन करावयाचे, मग ज्याअर्थी कोणत्याही पूर्ण वस्तूला काही गुणधर्म असतातच, म्हणून आपण ज्यांपासून सुरुवात केली त्या गृहीत वस्तूलाही हे गुणधर्म असले पाहिजेत असे गृहीत धरावयाचे, असा हा चक्रीतर्क असतो. तेव्हा नावांना काही महत्त्व नाही हे मान्य करूनही, अशा तर्कवादापासून आपण सावध राहिले पाहिजे.

परिभाषेच्या या संपन्नतेत म्हणा, कि संकीर्णतेत म्हणा, पेंकने Gestalt या एका नव्याच संज्ञेची भर घातली आहे. ही संज्ञा त्याने मानसशास्त्रज्ञांकडून (प्रत्यक्षात कोह्लरकडून, २४९, २) उसनी घेतली. वरकरणी तरी, प्रदेशांच्या विशिष्ट मांडणीसह प्रत्येक विस्तृत क्षेत्राचे एकीकृत स्वरूप व्यक्त करण्यासाठी त्याने या शब्दाचा वापर केला आहे ; तर, ब्यूर्गर-सारख्या दुसऱ्यांनी भौगोलिक भूक्षेत्रदृश्य दाखविण्यासाठी त्याचा उपयोग केलेला आहे. ब्यूर्गरच्या मताने Gestalt (आपल्याकडील मानसशास्त्रज्ञांनी या शब्दाचे भाषांतर करण्याचा कधीच प्रयत्न केला नाही, असा माझा विश्वास आहे) ही एक गतिमान् रचना असते ; त्यातील विभाग कार्यकारित्वाने एकमेकांच्या संपर्कात येतात ; आणि त्यामुळे एकूण वस्तूचा आढावा घेतल्याशिवाय ते विभाग समजून घेणे अशक्य होते (११, ४४ ते ४६). व्योर्नर अशी टिपणी जोडतो, की मानसशास्त्रज्ञांच्या दृष्टीने Gestalt या शब्दाचा अर्थ सर्वसाधारणपणे Ganzheit या शब्दासारखाच होतो. पण क्रयूगर हीच संज्ञा, ज्याची अवयव स्पष्टपणे वेगळे दाखविता येतात अशी एक संपूर्ण वस्तू, या अर्थाने वापरतो (२७४, ३४२). म्हणूनच, व्योर्नर व एह्रेन फेल्स यांच्या आधारे, या दोनही संज्ञांची एक सामायिक

व्याख्या करण्यांस हरकत दिसत नाही. (१) कोणतीही एक संपूर्ण वस्तू त्याच्या भागांच्या बेरजेपेक्षा काहीतरी अधिक असते. त्यातील विभागांच्या अन्योन्य संबंधांतून, कोणत्याही एखाद्या जटिलाप्रमाणे, त्या प्रत्येकातील सुप्त लक्षणांचा आविष्कार होत असतो ; इतकेच नव्हे, तर त्या एकूण जटिलालाच एक नवे स्वरूप प्राप्त होते आणि तरीही त्या विभागांतून त्याचे स्पष्टीकरण करता येत नाही.–उदाहरणार्थ :, एखादे रागबद्ध गीत. (२) संपूर्णाचे विभाग हे असे अवयव असतात, की ते ज्या एका वस्तूचे भाग असतात तीपासून ते वेगळे काढले तर त्यांची लक्षणे सांगणेच अशक्य होऊन बसते. याविरुद्ध, एखाद्या गुंतागुंतीच्या बेरजेतील, किंवा एखाद्या गुंतागुंतीच्या बेरजेतील अथवा संघातीलही, घटकांचे स्थलांतर एका बेरजेतून दुसऱ्या बेरजेत केले, तरी त्याचे वस्तुमान प्रत्येकी तेवढेच रहाते, (३) संपूर्ण वस्तू स्वतःचे अस्तित्व न गमावता स्थलांतरित होऊ शकतात. राग कायम ठेवून सगळ्या ताना बदलणे शक्य आहे. अंड्यात वाढ होत असताच आतील पेशींची व्यवस्था बदलणे शक्य असते, (अर्थात् केंद्रोत्सारी गती देऊन) ; आणि तरीही त्यातून निर्माण होणारी व्यक्ती सर्वसामान्यपणेच वाढलेली दिसते. एखाद्या स्वतंत्र राज्याच्या शासनयंत्रणेतील सर्व अधिकारी बदलूनही एकंदरीने तीच शासन यंत्रणा कायम राहू शकते, अशीही पुस्ती येथे जोडण्यास हरकत दिसत नाही.

व्योर्नरने संपूर्ण वस्तूंच्या उदाहरणांची दिलेली यादी, पुढे दिल्याप्रमाणे आहे : सर्व सजीव सेंद्रिय ; कुटुंब (अंशतः) लोक, असे सजीवांच्या वर्गीकरणाचे काही प्रकार ; आणि आपल्या अनुभवाला येणाऱ्या काही घटना. ग्रान्योच्या संकल्पनांच्या संदर्भात व्योर्नरने केलेली शेवटच्या उदाहरणाची चर्चा विशेष महत्त्वाची वाटते ; कारण, भूदृश्यांच्या आपल्या अनुभूतींवर ती आधारलेली आहे असे दिसते. उदाहरणार्थ : वर्तुळाची आपली अनुभूती एका संपूर्ण वस्तूची असते, पण भूमितीच्या दृष्टीने वर्तुळ ही एक केवळ बेरीज आहे. या दोन्ही गोष्टी एकच नव्हेत हे भूमितीतील वस्तुस्थिती व तिच्याच दृष्टिभ्रमाची अनुभूती या दोहोंतील विरोधाने स्पष्ट होते. दृष्टिभ्रम हीही एक वस्तुस्थिती आहे असे आपण मान्य केले, तर भूदृश्यांची एकता ही एक अनुभूतिपूर्ण घटना आहे या संकल्पनेमुळे भूगोलाचे रूपांतर मानस-भौगोलिक विषयात होईल.

पण, ज्यांची कोणत्यातरी प्रकाराने प्रदेश अशी व्याख्या करण्यात आली आहे, त्या भूपृष्ठाच्या विशिष्ट विभागांना या संकल्पना किती प्रमाणात लागू करता येण्यासारख्या आहेत ? कोणतेही क्षेत्र आपण निवडले तरी त्याला बांधणी असणारच, आणि त्यात एकमेकांशी कार्यकारी संपर्क साधणाऱ्या रूपांचा समावेश होणारच. पण, त्यात उपस्थित असलेल्यां सर्वच रूपांचे असे कार्यकारी संबंध असत नाहीत. परित्यक्त रूपांच्या, काहीशा एकांतिक पण अगदीच असामान्य नसणाऱ्या, उदाहरणाने हे अगदी स्पष्ट करून दाखविलेले आहे. अशा रूपांना, लाउटेनझाकच्या म्हणण्याप्रमाणे, तेवढ्या त्या क्षेत्राच्या रचना व्यवस्थेत महत्त्वाचे स्थान असण्याची शक्यता असली, तरी त्याच्या कार्यकारी व्यवस्थेत त्याला फारच

थोडे महत्त्व असण्याची शक्यता आहे (२७८, १८ f). सर्वसाधारणपणे कोणत्याही एका रूपाचे अर्थशोधन करावयाचे झाल्यास, वर्तमान–तसेच गतकालीन–अन्य रूपांचाही विचार करण्याची गरज मान्य करण्यास हरकत नाही ; तथापी, सर्वच उपस्थित रूपांचा विचार करण्याची गरज नसते, आणि सुदैवाने, त्या संपूर्ण वस्तूचे परिशीलन करण्याची खासच आवश्यकता नसते. मी ' सुदैवाने ' असेच म्हणतो ; नाहीतर, भूगोलाने आजपर्यंत एकाही प्रादेशिक घटकाचे, केवळ त्याच्यासाठी म्हणून, कधीच अर्थशोधन केलेले नाही, असा निष्कर्ष काढावा लागेल,–मग तो घटक हवामान हा असो, कि ग्रामीण खडक हा असो–कारण, अद्याप आम्हा भूगोलकारांना कोणत्याही एका संपूर्ण प्रादेशिक वस्तूचे अर्थशोधन करावे लागलेले नाही.

आता, प्रदेश ही एक (मूलतः) संपूर्ण वस्तू नाही असे मान्य करुन एक शिथिल, पण एकरूप, वस्तू म्हणून जरी त्याचा आपण विचार करू शकलो, तरीही त्याच्यापासून आपला काहीतरी फायदाच होणार आहे. म्हणजे, सापेक्षतः बंदिस्त क्रमबंध तयार करणारे, संबंधित घटकांचे जटिल, अशा अर्थानेच त्याचा विचार करावयाचा–मौलच्या भाषेत सांगावयाचे तर " एकाकार व स्वतःच्याच मर्यादा आखून देणारे भूक्षेत्रदृश्य " (१५७, ३६). पण, इतकेच खरे असेल, तर एखाद्या प्रदेशाला–अर्थातच त्याच्यातील वस्तूंपासून भिन्न अशी–बांधणी, रूप व कार्य असू शकतात का आणि म्हणून त्याला एखाद्या क्रमबंधात स्थान असू शकेल का ? या गुणविशेषांना पात्र व्हावयासाठी प्रदेशाला बऱ्याचशा निश्चित स्वरुपाच्या मर्यादा असणे आवश्यक आहे, हे उघडच आहे. प्रदेशाची व्याख्या फक्त क्षेत्राच्या भाषेतच करता येण्यासारखी असल्यामुळे, प्रदेशाला बऱ्याचशा निश्चित स्वरुपाच्या क्षेत्रीय मर्यादाच असणे आवश्यक आहे. अनुसंधान कार्याचा परिपाक म्हणून एखाद्या विशिष्ट बाबतीत अशा प्रकारच्या मर्यादा आखून घेणे शक्य झाले, असे मानले, तरी अशाप्रकारे निश्चित केलेला हा प्रदेश एका सापेक्ष बंदिस्त एककाची जागा घेऊन त्याच्याच बांधणीचा व कार्याचा एक घटक बनला आहे, असे आपण म्हणू शकू का ? हे एकक अशा प्रकारच्या अन्य संलग्न वा दूरस्थ एककांपेक्षा भिन्न आहे, असेही आपण म्हणू शकू का ? काही जणांची या प्रश्नाला एकदम नकार देण्याची तयारी असली, तरी कित्येक भूगोलाभ्यासकांनी अस्तिपक्षी परिस्थितीच गृहीत धरली आहे. अर्थातच, याबाबतच्या शक्याशक्यता अधिक तपशीलवार तपासून पाहाणे प्राप्त आहे.

प्रदेशांच्या मर्यादा आखण्याची ही समस्या आपल्या एकूण आगमप्रमेयाच्या दृष्टीने क्रान्तिक आहे, हे आपल्याला आताच कळून आले आहे. पण मर्यादा-रेषांच्या ऐवजी केवळ मर्यादा-पट्ट्यांची योजना केल्याने ती सोडवता येण्यासारखी नाही. व्होल्स, उन्स्टेट, व पावलोवस्की यांना ती तशी सोडवता येते असा विश्वास वाटत असला, तरी आमचा त्यांच्यावर विश्वास नाही (२६२, १०४ ; ३०९, १८५ ; २७६, २०५). एक रंग दुसऱ्यात नेमका कोठे विलीन होतो ते वेगळे करून दाखविता आले नाही, तरी इंद्रधनुष्यातील रंगांचे पट्टे तयार होत असल्याने त्यांची कोणालाही ओळख पटण्याची शक्यता आहे. आपण केवळ

एकाच कारकाचा उपयोग करावयाचा असे म्हटले, तरी इंद्रधनुष्याशी समान परिस्थिती भूगोलात असेलच असे खात्रीने सांगता येत नाही. म्हणूनच, विल्हेल्मीची ही साम्योपमा आपल्या पुढील समस्येच्या काही विशिष्ट घटकांबरोबर जुळत नाही, ही गोष्ट बुशरने एका शतकापूर्वीच दाखवून दिली आहे. बोहेमियाच्या खोऱ्याचा विचार करत असताना भोवतालच्या पर्वत-भिंतीच्या काही भागांचा त्यात समावेश करावाच लागतो ; कारण, त्या वगळल्या तर, उरलेल्याला खोरे म्हणताच येणार नाही (५१, ८८ f). लेह्मानने येथे एक सर्वसामान्य टीप दिली आहे. " चढउतारांची अशी काही रूपे असतात, की ती एकाच पृष्ठभागात व एकाच वेळी दऱ्याही असतात व उंचवटेही. पाठाडाचा पाया दरीच्या मध्यापर्यंत पोहोचलेला असण्याची शक्यता असते तर ; दरीची सुरूवात जलविभाजकाच्या अत्युच्च भागापासून झालेली असण्याची शक्यता असते " (११३, २२६). या दोनही संकल्पना परस्परावलंबी आहेत आणि त्यांचे परस्पराक्रमण अटळ आहे. त्यांच्यामधील एखादी मर्यादारेषा शोधण्याच्या प्रयासांनाही काही अर्थ रहात नाही. फिलिप्सनने या गोष्टीची दखल पूर्वीच घेतलेली दिसते : " एका डोंगराचा उतार हाच शेजारच्या दरीची बाजू असतो ; म्हणजेच डोंगर व दरी या दोहोत कोणतीच मर्यादा रेषा असत नाही " (१४३, १२८). वरील विधान उद्धृत करूनही ग्राफने त्याच्या तात्पर्याकडे दुर्लक्ष केलेले दिसते (१५६, ८३). इथे आपल्याला या संक्रमण पट्ट्याची अडचण होते ही समस्या नसून, एकच भूखंड दोन भिन्न एककांचे आवश्यक अंग असतो, ही समस्या सोडवावयाची आहे. येथे आपण मर्यादांनी विभक्त करता येण्यासारख्या भूपिंडांचा विचार करत नाही तर, फिलिप्सनच्या निष्कर्षानुसार, " एकमेकांत खोलवर घुसणारे भागविभाग असलेल्या एकाच एका विषमतल भूपृष्ठाचा " विचार करत आहोत.

क्षेत्रांची मर्यादा आखण्याची ही समस्या कोणत्या तरी एका घटकाच्या संदर्भात सोडविणे शक्य आहे असे गृहीत धरले तरी, प्रादेशिक रूपधेयांच्या सर्वांगीण साहचर्याचा जसा आपण विचार करू लागतो तशी, ही समस्या निराळेच रूप धारण करू लागते. मग या रूपधेयांची संख्या नैसर्गिक घटकांनी मर्यादित केली तरीही फरक पडत नाहीच. येथे पुन्हा बुशरनेच काही युक्तिवाद सादर केलेला दिसतो. आणि नंतरच्या संपूर्ण शतकभरातील लेखनात त्याला एकही समाधानकारक उत्तर मिळालेले दिसत नाही. ऱ्हाइन नदीच्या उगमाकडील भाग हा स्वित्सर्लंडमधील डोंगराळ प्रदेशाचा भाग आहे. तिचेच मध्यभाग व मुखाकडील भाग हे अन्यप्रकारच्या भूरचना-क्षेत्रांचे विभाग आहेत. पण, दुसऱ्या एका दृष्टिकोणातून पहाता, संपूर्ण ऱ्हाइन खोरे हे एकच प्रादेशिक एकक आहे असे मानणे तितकेच सयुक्तिक ठरण्याची शक्यता आहे (५१, ८८ f). अशावेळी, त्यातील विविध घटकांपैकी कोणते घटक निर्णायक मानावयाचे, हे आपण कसे ठरवू शकणार ?

पासार्जने रचलेल्या प्रादेशिक भूगोलाच्या (Landschafts Kunde) क्रमबंधांतून या प्रश्नाला उत्तर मिळाले असा दिलासा मिळण्यास हरकत नव्हती. " भूक्षेत्रदृश्यात्मक प्रदेश

ही काही एखाद्या प्राण्याप्रमाणे वा वनस्पतीप्रमाणे बंदिस्त एकक-रूपे नव्हेत," या कल्पनेला, निदान तात्त्विक दृष्ट्या, पासार्जने मान्यता दिली आहे, येवढे निश्चित (२२९, ५६). या त्याच्या भूक्षेत्रदृश्यांच्या नमुन्यांनी, प्रदेश या विशिष्टप्रकारच्या मूर्त वस्तू आहेत, या संकल्पनेची दिशा इतरांना दाखविण्याचे काम केले. मुळात, फक्त दोनच घटक, वनस्पती व भूरूपे, विचारात घेऊन त्याने हा प्रश्न पुष्कळच सोपा करून टाकला. इतर सर्वांना त्याने निर्धाराने गौण स्थान दिले (२६८, ६, ९२ ते ९८). खरे पहाता आपल्या बहुतेक सर्व लिखाणांतून जवळजवळ केवळ वनस्पतींवरच तो विसंबून असतो. काही वेळा तर, तो थेट हवामानाशीच गफलत करताना दिसतो, त्यात एक गोष्ट सूचित आहे, की वनस्पतींची एककक्षेत्रे, ही हवामानाची एकक क्षेत्रे असतातच. अशी परिस्थिती नसेल तेथे, उदाहरणार्थ इलिनॉइस व आयोवा यांतील दमट हवेच्या कुरण-प्रदेशांत, केवळ " आरण्य-कुरण-प्रदेशाचे " क्षेत्र प्रस्थापित- करून, त्याने हा प्रश्न सोडविला आहे. सदरच्या प्रदेशात संपूर्ण मिनेसोटाचा, व विसकॉन्सिनचाही, समावेश केलेला आहे. म्हणजेच, वनस्पतिविषयक भेदांकडे दुर्लक्ष करून, शुद्ध हवामान-प्रधान प्रदेशांना त्याने मान्यता दिली आहे (३०५, ८ I). तथापि, केवळ दोन घटक विचारात घेऊनही सोइस्कर मर्यादारेषांची स्वैरपणे निवड करण्याच्या प्रयोगाचा आश्रय घ्यावाच लागतो, ही गोष्ट पासार्जने मान्य केलेलीच आहे. उदाहरणार्थ : डोंगरभागांतील आरण्यांनी मैदानांतील कुरणांच्या हद्दीवर अतिक्रमण केलेले दिसले तर, ती आरण्यप्रधान मर्यादारेषा कुरणमैदान प्रदेशात समाविष्ट करावी. जर पायथ्याकडील टेकड्यांच्या रूपाने डोंगर मैदानात घुसलेले असतील, आणि तरीही आरण्य-कुरण मर्यादा रेखीव असेल, तर सोइस्करपणे हीच रेषा प्रदेशमर्यादा म्हणून वापरण्यास हरकत नाही. पण, हे संक्रमणक्षेत्र विस्ताराने मोठे असेल तर, त्याला एक स्वतंत्र भूक्षेत्रदृश्य म्हणूनही मान्यता देण्यास हरकत नाही. येथे एक गोष्ट पासार्जच्या लक्षात आलेली दिसत नाही, की हा संक्रमण पट्टा दोनही बाजूंनी मर्यादित करण्याचा एक नवाच प्रश्न उपस्थित होतो. (२२९, १४ ; २६८, ६२).

हा प्रश्न सोडविण्याची एक पद्धत मौलने सुचविली आहे, आणि तिच्यापुरती ती निःसंशयपणे मौल्यवान आहे. प्रत्यक्षात त्यातून प्रश्नाची उकल होते की नाही ही गोष्ट अलाहिदा ! प्रत्येक महत्त्वाच्या घटकासाठी एक अशी मर्यादारेषांची मालिकाच आपल्यास तयार करण्यास हरकत नाही (अर्थात काही बाबतीत एका कारकासाठी ही अशी मर्यादा शोधण्यात अडचणी येतात, ही गोष्ट येथे दृष्टीआड केलेली आहे). अशाप्रकारे तयार झालेल्या या " रेषांच्या जुडीला " त्याने " सीमा पट्टी " असे नाव दिले (१५७, ६०१ ते ८) (मौलच्या संकल्पनेत सांस्कृतिक व नैसर्गिक अशा दोनही प्रकारच्या रूपधेयांचा समावेश होतो). भिन्न, पण अन्योन्य संबंध असणाऱ्या रूपधेयांच्या हद्दी सापेक्षतः एकत्र व निकटवर्ती असणार ; म्हणजेच मर्यादित स्वरूपाचा एक " हद्दपट्टा " तयार व्हावा इतकी कोणत्याही प्रदेशाच्या मर्यादारेषांची पट्टी पुरेशी संकुचित असण्याचीच शक्यता आहे, असे, ज्यानी तसा प्रत्यक्ष प्रयत्न कधीच केला नाही, त्यांना वाटण्याची शक्यता आहे. निदान तशाप्रकारची उदाहरणे आढळतात

निःसंशय. पाणलोट, मृत्तिका, वनस्पती व प्राणीजीवन या सर्वांचा हवामानाशी संबंध असल्यामुळे यातील प्रत्येक घटकांच्या सीमा हवामानाच्या हद्दीशी जवळजवळ संगत असण्यास हरकत नाही. आणि जेथे डोंगरही त्याच दिशेने पसरलेले असतील, तेथे भूमिरूपांच्या हद्दीही संगत असतील. ग्राफसारखे अभ्यासक भूगोलाच्या प्रत्यक्षकायपिक्षा त्याच्या तात्त्विक बाजूशीच अधिक परिचित होते. म्हणूनच, पृथ्वीचा नैसर्गिक पृष्ठभाग प्रदेशरूप एककांत विभागला जाणे, याचा अर्थ, ज्यांच्या पासून पृथ्वी हा सजीव संघटित झाला त्या प्रदेशरूप पेशीतच तो विभागला जाणे, असा होतो अशी कल्पना करणे ग्राफला सहज शक्य झाले (१५६, ९६ ; हेटनरची चर्चाही पहा).

असंख्य बाबतीत अशाप्रकारची निकटसंगती केवळ अभावानेच आढळते, या गोष्टीची आठवण भूगोलकारांना करून देणे अनावश्यक आहे, असे कोणासही वाटण्याची शक्यता आहे. आणि प्रादेशिक भूगोलाच्या परिपाठात जरी ही अडचण सर्वश्रुत असली, तरी तात्त्विक चर्चेत बहुधा तिच्याकडे काणाडोळाच केला जातो. " कोणत्याही प्रदेशाचे घटक अशारीतीने एकमेकांशी अटकलेले असतात, की त्यामुळे ते परास्परावलंबी बनतात. प्रत्येक घटक इतर सर्व घटकांना प्रतिक्रिया देत असतो तर इतर घटक त्याला प्रतिक्रिया देत असतात " (३२२, ६६३). असे म्हणणे म्हणजे, जर कोणत्याही एका घटकात काही मोठ्याप्रमाणात बदल घडला तर अन्य घटकांतही तसेच महत्त्वाचे बदल घडून येतील आणि अर्थात तो एकूण जटिलच लक्षणीय प्रमाणात बदलेला दिसेल हा विचार आपल्याला पटला असल्याचे कबूल करण्यासारखे आहे. सजीवाचे रूपक कितीही काल्पनिक असले तरी, या सूचक विचाराला बळकटी देणारे ठरते. पण, प्रत्यक्षात हे चित्र परिस्थितीपेक्षा फारच वेगळे आहे. यावरून, हे संश्लेषणात्मक आगमतत्त्व अपूर्ण आहे, हे उघड दिसते. हेटनरने आमचाच विचार अधिक स्पष्टपणे विकसित केला आहे : " निसर्गाची विविध प्रभावक्षेत्रे आणि घटनाचक्रे एकमेकात बारीकपणे विणलेली असतात ; व त्याचा परिणाम असा होतो, की कोणत्याही एका प्रभावक्षेत्रात होणारे बदल इतर क्षेत्रांतूनही पसरल्याशिवाय रहात नाहीत. . . . . . . एकाने एका प्रभाव क्षेत्रासंबंधी व एका घटना चक्रासंबंधीचे प्रदेश प्रस्थापित केले, तर ते काही प्रमाणात इतर क्षेत्रांतील प्रदेशांशी सुसंगत असणारच. पण ही संगती क्वचितच परिपूर्ण असते ; कारण, प्रत्येक प्रभाव क्षेत्राची व प्रत्येक घटनाचक्राची स्वतःची म्हणून एक नियमावली असतेच " (१६१, २९१ f : मूळचे अवतरण १२३, २११ ते २१३ वरून). हेच, विविध व वेगवेगळ्याप्रकारे, संगतीचा अभाव निर्माण होण्याचे कारण असते.

प्रथमदर्शनीच एक गोष्ट उघड होते. पृथ्वीच्या हवामाननिष्ठ विभागांचा आणि भूमिरूपांच्या प्रमुख विभागांचा एकमेकाशी काहीच संबंध पोहोचत नाही. हवामान अथवा भूमिरूपे यांच्यापैकी कोणा एकात बरेच मोठे बदल झालेले असण्याची शक्यता असते, आणि तरीही दुसऱ्यात दिसून येणारे बदल अगदीच किरकोळ स्वरूपाचे असतात.

दुसरे असे, की पुष्ठरूपे, आणि विशेषेकरून मृत्तिका, काही प्रमाणात हवामान स्थितीमुळे बदललेली असतात. पण हे बदल भूतकालीन हवामान स्थितीमुळे जितके झालेले असतात, तितके ते वर्तमान स्थितीतून निर्माण झालेले असत नाहीत. वर्तमान स्थितीच्या तुलनेने हा भूतकालीन हवामान स्थितीतील फरक थोडका असला, तरी लक्षणीय असतो. हाच नियम अन्य काही क्षेत्रातील नैसर्गिक वनस्पतींनाही लागू पडतो, असे पुष्कळांचे मत आहे, उदाहरणार्थ : दमट हवामानाची गवताळ-कुरणे.

तिसरा आणि सर्वात महत्वाचा, पण विविध घटकांच्या प्रादेशिक विभागणीच्या शुद्ध-संगतीत अडथळा निर्माण करणारा, कारक आहे स्थलांतर अथवा ' अभिसरणात्मक ' घटना यांचा संपूर्ण संच.– हवेतील, पाण्यातील आणि कोरड्या जमिनीवरील (अर्थात मोठ्याप्रमाणात होणारे मृत्तिकांचे) स्थलांतर (C/o व्हिटेकरचे संक्षिप्त पण उत्कृष्ट विधान, २८४). अशा प्रकारच्या परिस्थितींची एकांतिक उदाहरणे समुद्रांतून अधिक सापडतात. शॉटचे महासागरातील प्रदेश प्रस्थापित करण्याचे प्रयत्न पहाता, त्याकामी येणाऱ्या असाधारण अडचणींची कल्पना येते ; आणि त्यांचीच व्हॉलॉक आणि जेम्स यांनी चर्चा केली आहे (१८६, १६५ ; २७५). भूभागांच्या बाबतीत उडणारा गोंधळही तशाच स्वरूपाचा आहे, इतकेच की, तो महासागराने घातलेल्या गोंधळा इतका तो मोठा असत नाही. उदाहरणार्थ : प्राचीन इजिप्तच्या रहिवाशांना आपल्या जीवनदात्या नाईल नदीच्या कार्याचे मापन करता आले. पण, तिच्या उगमाकडील पाणलोटांचा, त्यांच्या देशाच्या त्यांना माहीत असलेल्या हद्दीत, समावेश होत नसल्याने, किंवा आजच्या भूगोलकारांप्रमाणे ते तिच्या सीमा काही गृहीतप्रमेयानुसार निश्चित करू न शकल्यामुळे, त्यांना तिच्या कार्याचे आकलन होऊ शकले नाही. जमिनीच्या उंचसखल रूपधेयांनी, सागरी वाळूच्या भरांनी व हवामानाने साकार केलेली उत्तर जर्मनीच्या मैदानांची एकरूपता, मध्यदेशीय पठार भागांतून नद्यांनी वाहून आणलेल्या गाळ-मृत्तिकेच्या भरांनी, छिन्नभिन्न केली आहे. पर्वत दऱ्यांतील स्थानिक भूमिरूपांत अगदीच किरकोळ भेद असतात. हवामानात तर, मूलतः कोणतेच भेद नसतात. पण मृत्तिकांत मात्र मूलभूत भेद असतात. म्हणूनच वर सांगितलेल्या प्रकारच्या घटना पर्वत दऱ्यांतूनच सामान्यतः घडत असताना आढळतात.

चौथे कारण असे : वास्तविक, वनस्पतिनिष्ठ व प्राणिनिष्ठ प्रदेश हवामान, भूमिस्वरूपे व मृत्तिका या सारख्या मूलभूत कारकांवर अगदी संपूर्णपणे अवलंबून असल्यासारखे दिसतात. पण केवळ, समुद्र अथवा तशाच प्रकारच्या अन्यजीवन पोषक स्थिती असलेल्या प्रदेशांनी विभक्त झाल्यांमुळेच त्यांच्यात लक्षणीय भेद निर्माण झालेले दिसू लागतात. उदाहरणार्थ : निर्जीव कारकांच्या स्थितीबाबत अमेझॉनखोरे व कांगोखोरे यांच्यात केवढेही साम्य असले तरी, अन्य पुष्कळच महत्त्वाच्या बाबतीत हे दोन प्रदेश फार भिन्न आहेत (C/o मौल १७९, १८४ ते ८६). ब्रिटिश कोलंबियाच्या भूदृश्यप्रकारातच मोडणारा प्रदेश म्हणून त्याच्या बरोबर चिलीच्या मध्यअक्षांशस्थित पर्जन्यव्याप्त आरण्य प्रदेश

एकाच नकाशावर दाखवून, आम्ही जरी एक प्रकारचा अभास निर्माण करू शकलो तरी, तेथे प्रत्यक्ष-कामकरणाऱ्या लाकूड-तोडयांची दिशाभूल करू शकणार नाही. उलटपक्षी, सर्व संभाव्य फरक वनस्पतिजीवन व प्राणिजीवन यांच्यात जास्तीतजास्त प्रमाणात दिसत असूनही, मृत्तिका वगळल्यास, इतर कोणत्याही भौतिक घटकात किमान फरकही पडलेला दिसत नाही.

एकंदरीने पहाता, विविध नैसर्गिक घटकांचे अन्योन्य संबंध एखाद्या सुगम सूत्राइतके, अथवा प्रथम कोटीच्या समीकरणाइतके सोपे नाही. असे असते तर, एकात झालेला बदल अन्य सर्वांत सममूल्य बदल घडवून आणू शकला असता. उलट ते असे आहे की, एकात महत्त्वाचे बदल झाले, तरी त्यांच्या साहचर्याने इतरांत अगदी किरकोळ बदल झालेले दिसतात. याचा परिणाम असा होतो, की सत्यास्थितीत आपल्याला आढळणारे संयोग प्रत्येक ठिकाणी इतक्या विविध व गुंतागुतीच्या प्रकारांनी बदलत जातात की, कोणताही एक विविष्ट संयोग अ-पासून ब-पर्यंत पसरलेला आहे असे, अथवा दुसरा कोठे सुरू होतो ते, सांगणे अशक्य होऊन बसते.–अर्थात्, येथे अ व ब हे अतिसंलग्न बिंदू नाहीत, असे गृहीत आहे.

नैसर्गिक घटनांमधील अन्योन्य संबंध नियमित करणारा कोणतातरी एकच एक क्रम आहे, असे अनवधानाने गृहीत धरून, त्यावर हे " नैसर्गिक प्रदेशाचे " साध्यप्रमेय आधारले गेलेले आहे. पण, प्रदेश हे वास्तविक अमानव घटकांधारे ठरविलेल्या स्वतंत्र व वेगवेगळ्या प्रकारची क्षेत्रे असतात ; कधी ते त्यांच्या मूलकारणोउद्‌भूत रूपात असतात तर, कधी अधिक अद्यतन मांडणीच्या रूपात असतात, इतकेच. पृथ्वी ही एक (तर्कशुद्ध विचारान्ती बनविलेली) सुगम रचना आहे, या संकल्पनेच्या विरोधात हेटनरने काढलेले तिचेच चित्र मांडण्यासारखे आहे. " पृथ्वी ही, कदाचित, आपल्याला माहीत असलेल्या सर्व इमारतीतील अत्यंत जटिल इमारत आहे. "

जणूकाही, वेगवेगळे रचनातज्ञ अगदी भिन्न कल्पना मनात धरून पृथ्वीच्या रचनाकार्यात गढले होते, असे दिसते. परिणामतः, तिची अंतर्गत रचना तिच्या बाह्यरचनेशी सुसंवाद साधू शकली नाही, कारण तिचा उगम अगदी वेगळ्याच विचारधारेतून निर्माण झालेला दिसतो. इतकेच नव्हे तर, दोघाही रचनातज्ञांनी आपली मते, रचनाकार्य चालू असतानाच, अनेक वेळा बदललेली होती असे दिसते. भूपृष्ठाचे स्वरूप एकाच कारणाशी निगडित नाही, तर, ज्यांचा एकमेकाशी काहीच संबंध नसतो, अशा अनेकानेक कारणांशी निगडित आहे. एकाबाजूने भोवतीच्या विश्व-वायुमेघापासून वेगळी झाल्यामुळे, तिचे पार्थिव स्वरूप निश्चित झाले. पण, दुसऱ्याबाजूने, अन्य ज्योतिर्गोलांच्या, विशेषतः सूर्याच्या व सूर्यकिरणांच्या, प्रभावाखाली ती सतत वावरत असते ; आणि हे दोनही गोल आपापल्या गुरूत्वशक्तीच्या धाकात असतात. विशेषेकरून पृथ्वी गर्भातील शक्तींची निर्मिती पार्थिव उगमांपासून झालेली असते, आणि त्यांच्यामुळेच भूकवचाची रचना झालेली आहे. **अर्थातच,** गुरूत्वाकर्षण शक्तीच्या नियमानुसार होणाऱ्या हालचालींना अवसर मिळतो. सूर्यकिरणांमुळे हवामानातील भेद निर्माण होतात, आणि त्यातूनच वातावरणातील हालचाली निर्माण

होतात. हवामानांची विभागणी मुख्यतः अक्षांशांवर अवलंबून असते, याचाच अर्थ त्यांचा अंतस्थ रचनेशी काही संबंध नाही. हवामानाचा अंतर्गत रचनेशी काही संबंध असलाच तर तो द्वितीय अथवा तृतीय श्रेणीतील घटनांशी असावा. भूगर्भस्थ घटना व हवामानविषयक घटना यांतून भिन्न, पण सहवासी, कारणांचे संच निर्माण होतात. अन्य बहुतेक सर्व भौगोलिक वस्तुस्थिती या-ना-त्या मार्गाने या दोहोकडून प्रभावित झालेल्या असतात. त्यातही, प्रभावांची ही विभागणी, एकाचा काही विशिष्ट घटनांवर व दुसऱ्याचा दुसऱ्या काही घटनांवर, अशी सरळ नसते तर, त्यांपैकी बहुतेक सर्व घटनांवर त्या दोघांचाही एकत्रीत प्रभाव पडलेला दिसतो. येथे फक्त सरळ अवलंबनाचा विचार करूनही भागत नाही. हवामानांतील भूरचनांतील फरकांमुळे निर्माण झालेल्या लक्षण विशेषांच्या हालचालींचा व स्थलांतरांचाही विचार करावा लागतो. यांतील पार्थिव व वैश्विक कारके कालप्रवाहाबरोबर बदललेली आहेत. गतकालाचे परिणाम रेंगाळत रहातात ; पण, वर्तमान प्रभावांनी ते अंशतः विकृत होतात, आणि अंशतः ते त्यांच्याशीच संयोग पावतात. परिणाम असा होतो, की भौगोलिक परिस्थिती पुष्कळदा वर्तमान कारणांवर अवलंबून नसते तर, भूतकालीन कारणांचा तो परिणाम असतो " (१६१, ३०८ f : मूळ ३००, ९६ यावरून).

या नैसर्गिक घटनांनी निर्माण केलेल्या जंजाळात, भूपृष्ठाचे अद्यतन दृश्य निर्माण करण्यासाठी मानवाने केलेल्या फेरबदलांची भर घातल्यावर, एकंदर परिस्थिती किती भयंकर गुंतागुंतीची झाली असेल, याची कल्पनाच केलेली बरी ! व्हॉलॉकने दिलेल्या तर्कसिद्ध आव्हानाच्या अवतरणावरून पहाता, " नैसर्गिक प्रदेश आणि मानवी अथवा सांस्कृतिक भूगोलाने कल्पिलेले प्रदेश यांच्यात सुसंगती असणे आवश्यक आहे आणि ते अटळही आहे. " (१८६, १६५ f).. येथे सुचविल्याप्रमाणे खरोखरच सर्व फेरबदल होत गेले असते तर, ही अडचण इतकीशी जाणवली नसती ; कारण परिस्थिती अशीच असते असा दावा करण्यास कोणीच धजणार नाही, असे आम्ही गृहीत धरतो. उलट, कोणी झाले तरी असेच म्हणेल, की बाह्य निसर्गाशी जुळते घेणे हे मानवाच्या स्वभावातच नाही ! जमिनीची ठेवण कशी आहे याचा जराही विचार न करता तो आपली शेते आयताकारच आखत राहील ; आणि समतल भूमी असो की उतार जमीन असो, रेताड-माती असो की गाळ-माती असो, त्यात तो एकाच प्रकारच्या पिकांची लागवड करत राहील, त्याच्या शेतजमिनीत मुळात जरी आरण्यभाग व कुरणभाग एकमेकास जोडलेल्या ठिगळांसारखे पसरलेले असले तरी, या वेगवेगळ्या भागांतील फरक कोणत्याही प्रकारे जाणवणार नाही, इतक्या निःशंकपणे तो आता त्यांचा वापर करत असताना दिसून येईल. विषुववृत्तीय उंच पठारी प्रदेशांतील अमेरिंडांनी संकरित केलेला एक वनस्पती विषुववृत्तीय पर्जन्यमय आरण्यांतील प्रदेश, दक्षिण ॲपॅलेशियनच्या डोंगरदऱ्यांतील शेतजमिनी, कवोष्ण-दमट हवामानातील सखल मैदाने, आणि त्यांच्याही उत्तरेला असलेल्या प्रदेशातील हिमोढ निर्मित मृत्तिका, या सर्वच प्रदेशांचे प्रमुख पीक होऊन बसला आहे ( हे प्रदेश मुळात कुरणप्रदेश होते का आरण्यप्रदेश होते, हे आता कोण सांगू शकेल ! ).

या वस्तुस्थितीतून निर्माण होणाऱ्या अडचणी लक्षात घेऊनच, " जो भौतिकही आहे आणि सांस्कृतिकही आहे " असा एक सजीव, असे या पूर्वाचार्यांनी प्रदेशाचे केलेले लक्षण-निरूपण, फिंच व ट्रेवार्था या जोडीने त्याज्य ठरविले. (२८८, ११४) ; आणि सावयव-एकरूपतेची ही संकल्पना नैसर्गिक घटकांशी निगडित केली. (३२२, ६६३) (आपल्या अलीकडच्या एका अध्यक्षीय भाषणात, फिंचने प्रदेश हा एक सजीव आहे ही संकल्पना मुळातच सोडून दिल्यासारखे दिसते : २२३). या आधारांवर एकक प्रदेशांचे तात्त्विक अस्तित्व प्रस्थापित करणे शक्य आहे, असे मान्य केले, तरी ते फार संशयास्पद असते, हे यापूर्वीच आपण पाहिले आहे. आता, भूगोलातील रूढ " द्वैतवादी " दृष्टिकोणाचा आश्रय घ्यावा म्हटले, तर त्यामुळे प्रदेश जसा आपल्याला दिसतो व कळतो तसा तो विचारात घेण्याचा हा प्रश्न सुटत नाही तर तो टाळला जातो. (लोकवसतीं असलेल्या) प्रदेशात जर एकरूपता असेल (मग ती केवळ उभ्यापातळीत असली तरीही चालेल), तर या एकरूपतेत मानवी कार्याचा समावेश केला तरी पाहिजे एक, नाही तर ते बगळले तरी पाहिजे. अन्यथा आपल्यास एकरूपता दिसणार तरी कशी ? मानव नसलेल्या प्रदेशाचे चित्र–मग त्याला नैसर्गिक पर्यावरण म्हणा, नैसर्गिभूदृश्य म्हणा, मूलदृश्य म्हणा, किंवा आणखी काही म्हणा–हे, जेम्सने म्हटल्याप्रमाणे, प्रत्यक्ष अस्तित्वात नसलेली एक केवळ बौद्धिक, संकल्पना आहे. " खरे पहाता, फक्त एकच भूदृश्य अस्तित्वात असू शकते " (२८६, ८०) आणि ते म्हणजे मनुष्याचा अवतार त्या भूमीवर होण्यापूर्वीचे तिचे दृश्य. या मूलदृश्याची खात्रीलायक पुनर्रचना करणे शक्य आहे, असे गृहीत धरले, तरी ते आजच्या नैसर्गिक पर्यावरणाचे यथार्थ चित्रण असणारच नाही, कारण आदिमानवाच्या कालापासून आतापर्यंत, तेथील नैसर्गिक घटकांतच अंशतः फरक झालेला असतो.

दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर, नैसर्गिक पर्यावरणावर अथवा मूलदृश्यावर आधारलेली एकरूपता ही सत्यस्थिती नसते, कारण तिचा आधार सत्य नसतो. मानवाचा पाय लागण्यापूर्वी जरी त्या मूलदृश्यात नैसर्गिक एकरूपता असली, तरी एकदा का मानवाने तिथे पाय ठेवला, की तो व त्याचे कार्य यामुळे मूळची ती एकरूपता नष्ट होणे अटळ असते ; मग त्या नव्या एकरूपतेत–अर्थात मानवसहित, कारण त्याला वगळून तेथे एकरूपताच रहात नाही–ते एकजीव झालेले असोत वा नसोत ही आदिय एकरूपता फार पूर्वीच आपले अस्तित्व गमावून बसलेली असते ; अर्थातच, तिचा प्रत्यक्ष अभ्यास करणे कधीच शक्य होत नाही.

प्रदेश ही प्रत्यक्ष एकके आहेत, या संकल्पनेचा जे पाठपुरावा करतात ते बहुतेक सर्व लेखक त्यात नैसर्गिक रूपधेयांचा व सांस्कृतिक, पण फक्त भौतिक, रूपधेयांचाच त्यात समावेश करण्याचा प्रयत्न करतात. हा आधार तर्कशुद्ध आहे असे जरी आपल्याला वाटते, तरी सांस्कृतिक रूपधेये व नैसर्गिक रूपधेये यांच्यात संगतीचा अभावच असल्याने, त्यांना बऱ्याच मोठ्या अडचणींना तोंड द्यावे लागते. (C/o जेम्स ३२१, ३५३ f). या अभ्यासकांपैकी

कोणीही त्या दोहोत संपूर्ण संगती असल्याचा कधीच दावा केलेला नाही. तरीही, पर्यावरण-परिणाम-वादावरील व अंतिम हेतुवादी दृष्टिकोणावरील आपला राग उघडपणे व्यक्त केला असला, तरी, " नैसर्गिक विभाग हेच मानवी प्रदेशही असल्याचे दिसून येते, या गोष्टीवर आपला सरळ विश्वास असल्याचे गुपितही त्यानी उघडपणे सांगितले आहे. " (२९०, १३४).

नैसर्गिक व सांस्कृतिक अशा दोनही प्रकारच्या महत्त्वपूर्ण घटकांच्या लक्षणांत निकटसंगती असल्याचे खरोखरीच जेथे दिसून येते, अशा जगातील काही विशिष्ट क्षेत्रांच्या अभ्यासावरून काढता येण्यासारखे निष्कर्ष सर्वत्र समर्थनीय असतातच, असे त्यांनी गृहीत धरलेले असावे, असा ग्रह या अभ्यासकांनी केलेल्या चर्चांवरून होणे शक्य आहे. कदाचित, जेथे दोनच नैसर्गिक घटक–विशेषेकरून हवामान व भूरचना–बव्हंशी सर्वक्षेत्रभर एकरूप असतात, आणि त्यापैकी एकाचे रूप इतके एकांतिक असते, की त्याचा इतर सर्व घटकांवर हुकुमी प्रभाव पडलेला असतो, अशा प्रदेशात अन्योन्यबंधक व अविभाज्य असा संवाद मोठ्या प्रमाणात असलेला आढळतो ; व त्यामुळे तो सर्व एकच एक एकक आहे, खरे तर, सजीव एककच आहे, असे मानण्याचा मोह आवरत नाही. उदाहरणार्थ : ब्लंटश्लीने आपल्या संकल्पना रचल्या त्या केवळ एकाच अमेझोन खोऱ्याच्या सखल प्रदेशाच्या अभ्यासावरून ! त्याच्या ' सुसंवादी भूक्षेत्रचित्र ' (Harmonische Landschaftsbild) हे एक सजीव एकक असते.– या संकल्पनेचे स्पष्टीकरण ग्राडमानने केले, तेही वाळवंटी प्रदेशांची, व विषुववृत्तीय पर्जन्यमय आरण्यांची उदाहरणे देऊनच (२३६, १३० ते १३७). पण, एक ' एकरूपता ' संपते कोठे व दुसरी सुरू कोठे होते हे निश्चित करणाऱ्या मर्यादा रेषा–निदान सीमापट्टी–आखण्यासाठी हे तत्त्व कसाला लावून दोहोंपैकी एकानेही पाहिले नाही. या विशिष्ट बाबतींपुरते काही प्रमाणात एकमत होऊन, हे प्रदेश प्रस्थापित करणे शक्य आहे, असे गृहीत धरले तरी, अधिक सामान्य स्वरूपाच्या क्षेत्रात हे साध्यप्रमेय समर्थनीय आहे की नाही, हे आपल्या लक्षात येण्याची शक्यता रहात नाहीच.

प्रदेश–मर्यादांच्या समस्येचा अभ्यास करणाऱ्या आपल्या सर्वांगीण व सावधान प्रतिपादनात, कोणतीच अपवादात्मक लक्षणे नसलेल्या प्रदेशाचा अभ्यास केला जात असताना उपलब्ध होणाऱ्या निर्णयांचाही इयोल्सने विचार केलेला आहे. " वेगवेगळ्या कारकांच्या या हद्दी बहुधा मोठे रुंद पट्टेच असतात, आणि तसेच, ते एकमेकापासून खूप दूरही असतात. त्यामुळे, संक्रमणक्षेत्रेच कित्येकदा मूळ प्रदेशापेक्षा कितीतरी विस्तृत होऊन जातात. " (२३७, ४३ f). (तसेच झीगरची आपल्या परीक्षण लेखातील मान्यता, व लाउटेनझाकची त्याच निष्कर्षांची आवृत्ती पहा. २७८, २२ f). निश्चित स्वरूपाच्या दोन प्रदेशांमधील या विस्तृत क्षेत्रांना " रूपहीन भूक्षेत्रदृश्ये " या नावाने मान्यता देऊन, फोगेलने ही समस्या सोडविण्याचा प्रयत्न केला आहे, (२७१, ३). अर्थात, ते नित्याच्या अर्थाने संक्रमण पट्टे नसतात, तर ज्यांतील काही घटक बदलतात पण दुसरे काही बदलत नाहीत, अशी क्षेत्रे असतात. जरी हा उपाय बराच काळपर्यंत परिपाठात मान्यता पावलेला होता, तरी ज्या वर्गीकरण-पद्धतीमुळे

जगाचा बराच मोठा भाग ' संकीर्ण ' या सदरात दाखवावा लागतो त्या पद्धतीने भूगोलकारांचे समाधान होणे कसे शक्य आहे ? ⁸²

ग्रान्योच्या मते या मध्यगत क्षेत्रांचा विस्तार कमी करता येण्याची शक्यता आहे. काही बाबतीत ते त्यांच्या एकाबाजूच्या प्रदेशात मोडण्यासारखे असतात, तर दुसऱ्या काही बाबतीत ते त्यांच्या दुसऱ्या बाजूकडील प्रदेशात मोडू शकतात. म्हणून तो त्यांना " त्यांच्या लक्षणांपैकी एकापेक्षा अधिक बाबतीत सजातीय ", असे नाव देऊन, त्यांना भिन्न पण पूर्ण प्रदेश म्हणून मान्यता देतो (२७०, २९९). फिनलंड व एस्टोनिया यांच्या प्रादेशिक विभागणीच्या उदाहरणांनी, त्याने जरी हा आपला क्रमबंध मोठ्या तपशीलांनी स्पष्ट केलेला असला तरी, ते सर्व विभाग कोणत्यातरी एकाच विशिष्ट कारकाच्या नकाशांवर आधारलेले आहेत. पण, ते नकाशे स्वतःच पुष्कळशा सामान्यीकरण पद्धतीने काढलेले होते, आणि त्यांसाठी कोणता वस्तुनिष्ठ आधारही घेतलेला नाही, (२५२, १४३ ते ६२). त्याने केलेल्या एकाच एका प्रांताच्या खूपच तपशीलवार अभ्यासात हे संक्रमण पट्टे मूळ प्रदेशांपेक्षाही मोठे* आहेत (१६९ ते ७१). प्रदेशाच्या अल्पसंख्य रूपधेयांचा आधार घेऊनच हे प्रदेश तयार केलेले असल्यामुळे, वर्णित प्रदेश ते हेच, अशी ओळख पटणे शक्य नाही. (लाउटेनझाकनेही हाच निष्कर्ष काढला आहे : २६३, १९६). तरीही, या क्रमबंधातून निर्माण होणारे निष्कर्ष मूल्यवान असण्याची शक्यता आहे, या कमीजास्त प्रमाणात समाधानकारक, पण मूलतः स्वैर, अशा काही विभागांना मिळून संपूर्ण वस्तू म्हणणे, म्हणजे, ग्रान्योने जी संज्ञा ' संबंधी घटकांची गोळाबेरीज ' या शब्दांनी अगदी सुलभ करून सांगितली, तीच त्यात भर घालून पुन्हा अवघड व अडचणीची करण्यासारखे आहे. खरे पहाता, आपल्या या " पूर्ण वस्तू " केवळ बौद्धिक रचना आहेत हे ग्रान्योनेच मान्य केलेले आहे, कारण त्या घटकांमध्ये सुसंगती असते ती क्षेत्रीय स्वरूपाची असत नाही. परिणाम असा होतो, की तो ज्याला ' भौगोलिक भिन्नभाग ' असे संबोधतो, तेच जगातील सत्यस्थितीत एकमेकांवर अतिक्रमण करत असताना दिसतात. साहजिकच पृथ्वीची ' मुद्रा ' एखाद्या क्लिष्ट आकार-संयोगाप्रमाणे दिसू लागते, (२७०, २९७). म्हणून, ग्रान्योच्या संकल्पना मान्य करावयाच्या असतील, तर त्या त्याने दिलेल्या विशिष्ट व्याख्येनुसारच, त्याच्या संज्ञांचेही भाषांतर करणे प्राप्त आहे. त्या शब्दाच्या सामान्यार्थानुसार पाहिले तर, स्वतंत्र वस्तू एकमेकावर आक्रमण करत नाहीत, आणि जटिलाकार संयोगाला आकार संयोगही म्हणत नाहीत.

---

८२. पुढील एका प्रकरणात (१०-फ) आम्ही दोन लक्षात भरणाऱ्या उदाहरणांची चर्चा करणार आहोत. संयुक्त संस्थानांतील तो तथाकथित " मका-व-हिवाळी गहू-पट्टा ", हा दुसरे काही नसून मका-पट्टयाच्या दक्षिणेकडील प्रांतांना एकत्र गुंडाळण्याचा प्रयत्न आहे ; कारण, तिकडील शेतीपद्धती लक्षात भरण्याइतक्या भिन्न आहेत. आणि ही गोष्ट बेकरने केलेल्या त्या पट्टयांच्या विविध भागांच्या वर्णनांवरून स्पष्ट झालेलीच आहे. (३१२). तसेच, संयुक्त संस्थानांच्या शिरगणति-अभ्यास-मंडळाने आपल्या देशाच्या बऱ्याच विभागांचे वर्गीकरण " सर्वसामान्य शेती " असे केलेले आहे ; कारण ते इतर कोणत्याच विशिष्ट प्रकारात समाविष्ट करण्याइतके त्यांचे वैशिष्ट्य उठून दिसत नाही (३२०).

*ग्रान्योने केलेला १९३१ चा सर्वांगीण अभ्यासही पहा : ४४१.

सर्व संबंधी कारकांच्या मर्यादा दाखविणारे एककप्रदेश वस्तुनिष्ठ आधारावर प्रस्थापित करणे अशक्य कोटीतील आहे, यात संशय नाही. आणि ही गोष्ट या समस्येसंबंधी अभिरूची असणाऱ्या अन्य पुष्कळच अभ्यासकांना कळून चुकलेली आहे. (पहा हार्तिजर २२५, ४७१ : फिलिप्सन १४३, १३ ; पासार्ज २५८ ; लाउटेनझाक २६३, १९५-९७ ; ब्यूर्गर ११, ५३ ff : ओब्स्ट १७८). तरीही, त्यांच्यापैकी काहींची अशी धारणा आहे की, पुष्कळ अभ्यासकांनी सतत अभ्यास चालू ठेवला, तर त्यातील व्यक्तिनिष्ठ घटक किमान होत जातील. ओब्स्ट असे म्हणतो : " एखादा प्रादेशिक सजीव (Raumorganismus) जितक्या जास्त वेळा आणि जितक्या सावधानतेने अभ्यासला जाईल, तितके त्यातील कोणते कारक प्रभावी आहेत याबाबतच्या निर्णयासंबंधी एकमत होईल, ही गोष्ट निःसंशय. " (१७८, १२ : अधोरेखन प्रस्तुत लेखकाच्या पदरचे). एकाच क्षेत्राचा अनेक भूगोलकारांनी अभ्यास केलेला असेल तर, निदान अंदाजे काही प्रमाणात तरी, त्याच्या मर्यादांबाबत त्यांचे एकमत होईल का, याचीच शंका येते. उलट ब्यूर्गरचे विधान मान्य करावयास हरकत दिसत नाही : प्रदेशाच्या मर्यादांसंबंधीचे पुष्कळसे मतभेद हे " ऐतिहासिक कालखंडांच्या मर्यादांबाबत असलेल्या मतभेदांपेक्षा जास्त तीव्र नाहीत खास ". (११, ५५). मात्र, त्याने यांवरून काढलेल्या निष्कर्षापेक्षा वेगळा निष्कर्ष आपण काढणार आहोत.

म्हणूनच, जेव्हा प्रदेश हे एका अर्थाने प्रत्यक्ष दाखवावयाच्या मूर्त वस्तू नसून, त्या बौद्धिक रचना आहेत " अशी फींच मान्यता देतो, तेव्हाच तो प्रत्यक्षपणे मान्यता न देता आवश्यक त्या निष्कर्षाकडे बोट दाखवतो (२२३, १२). " सरळपणे पुढे मांडता येत नाहीत " अशाही काही मूर्त वस्तू सत्यस्थितीत असतात, ही गोष्ट निर्विवाद आहे. त्या अनुसंधानकार्यानेच उजेडात आणाव्या लागतात. पण, जर त्या अशारीतीने शक्य असेल, तर त्या निश्चितपणे प्रस्तापित करणेही शक्य झाले पाहिजे. पण ती निश्चितता आपल्याला अद्याप एका बाबतीतही निर्माण करता आलेली नाही. भौगोलिक प्रदेशाच्या मर्यादा आखण्याची ही समस्या–ती " आता समस्या राहिलेली नाही " असे फींच म्हणतो.–ही अशी एक समस्या आहे,* की तिची उकल करण्याची एखादी वस्तुनिष्ठ पद्धती कधी काळी हाती येईल, अशी आशा करण्यासही जागा नाही. परिणाम असा झाला, की हे प्रदेश शोधून ते मूर्त व सत्य वस्तू म्हणून प्रस्थापित करण्याचे कार्य तर अद्याप आपण करू शकलो नाहीच, पण, या पुढेही ते करू शकू अशी आशा निर्माण होण्यास जागा राहिलेली नाही ! आम्ही जास्तीत जास्त इतकेच म्हणू शकतो की, भूमीचे कोणतेही एक विशिष्ट एकक शेजारच्या सर्व एकक-भूमींशी महत्त्वपूर्ण संबंध बाळगून असते, काही बाबतीत त्यांचे संबंध एककांच्या एका गटाशी जितके निकट असतात तितके निकट इतरांशी नसतात. त्यातही, हे निकटसंबंध सर्व बाबतीत आढळत नाहीत. म्हणूनच, अशा आधारावर आपण ज्या प्रादेशिक वास्तू आखतो त्या, पूर्णार्थाने पहाता, काल्पनिक रचनाच असतात. आमचे सत्यस्थितिविषयक ज्ञान संघटित करण्यासाठी लागणारा एक प्रकारचा बौद्धिक आधार त्या रचनांमुळे मिळत जातो, इतकेच. त्यांचे खरे अस्तित्व असते आमच्या बौद्धिक जगात !

*कंसात घातलेला फींच संबंधीचा संदर्भ त्याच्या लिखाणावरून झालेल्या गैरसमजावर आधारलेला होता, म्हणून तो गाळला जाणेच इष्ट आहे.

प्रदेश या मूर्त व स्वतंत्र वास्तू आहेत या संकल्पने संबंधीच्या या चर्चेचा समारोप व्हॉलॉक व हेटनर यांच्या अवतरणांनी करू या ; कारण, या दोघांनीही या विषयाचे क्रान्तिक विश्लेषण केलेले आहे.

"प्रदेशांची आखणी करण्याची पद्धती भूपृष्ठ विभागणीच्या कामी विनासायास व विना-आक्षेप लागू करणे शक्य झाले पाहिजे ; तसेच, एकमेकावर अतिक्रमण न करणाऱ्या प्रदेशांचे अस्तित्व प्रत्यक्षात दाखवून देता आले पाहिजे ; आणि भूगोलातील, भौतिक व मानवी अशा सर्वच, वस्तुस्थिती प्रादेशिक व्याख्यांतून ग्रथित करणे शक्य झाले पाहिजे ; या सर्व गोष्टी होणे (या साध्यप्रमेयाच्या यशाच्या दृष्टीने) आवश्यक असले, तरी आपल्या उद्दिष्टापासून आपण अद्यापि बरेच दूर आहोत. (१८६, १६४ बॉलाकच्या या मुद्यासंबंधीच्या निष्कर्षांची चर्चा नंतर आम्ही करणारच आहोत).

प्रत्येक घटनाचक्रातील भेदाभेद एकाच प्रकाराने दाखवता येत नाहीत, आणि त्यांची स्तरश्रेणीही बहुविध प्रकारांनी नटलेली आहे. भूपृष्ठाचा कोणताही एक विस्तृत विभाग घेतला, तर तो एकाच संबंधाने सजातीय असतो, पण बाकी संबंधांनी तो विजातीयच असतो. अगदी काटेकोर विधान करावयाचे झाले, तर भूपृष्ठाचे एक विशिष्ट स्थळ घेतले, तरच त्याचे व्यक्तित्त्व किंवा स्वरूप परिपूर्ण असते. (हेटनर २६९ , १४३ f : c/o बान्झ ३३०, I, ४१).

## 'फ'– प्रदेश-एककांची दर्शनी व अंश रूपे

या आधीच्या काही पानांवर मांडलेल्या युक्तिवादाच्या दिशेने ज्यांनी विचार केला आहे, त्यांनी, आम्ही काढलेले निष्कर्ष तर्कशुद्ध आहेत, एवढे मान्य करण्यास हरकत नाही. तरीही त्यांना असे वाटत राहील, की प्रादेशिक एकरूपतेच्या " या संकल्पनेत काही तरी तथ्य आहे. " एका विविष्ट प्रकारच्या क्षेत्रातील विस्तृत प्रांतांत ही एकरूपता असल्याचे नजरेत भरते, असे आम्ही वर सांगितलेच आहे : उदाहरणार्थ वाळवंटी ओसाड प्रदेश, विषुववृत्तीय पर्जन्यप्रधान आरण्ये व यासारखे एकांतिक स्थितीचे अन्य प्रदेश. पण, त्यावर असाही निष्कर्ष आम्ही काढला की, एक-दोन कारकांचा हुकुमी प्रभाव असेल, तर तेथे सापेक्षतः फार मोठ्या-प्रमाणात सजातीयता असलेली दिसते, आणि त्याबरोबरच अन्य घटकांची सरळसाधी संगती असलेली दिसते. अशासारख्याच काही मार्गांनी प्रादेशिक भूगोलातील अभ्यासांत एकक क्षेत्रे निर्माण केली जातात, असे दिसते. त्यातील प्रत्येक एकक त्याप्रदेशापुरते संघटित केलेले असते आणि काटेकार सीमारेषांनी इतरांपासून विभक्त केलेले असते. ही सर्व एकके एका नकाशात दाखविली म्हणजे भूपृष्ठाचा एकप्रकारचा आकार-संयोग तयार होतो. येथे ' आकार-संयोग ' या शब्दाची निवड मोठी चपखल झालेली दिसते. आकार-संयोग हा अत्यंत रूढिबद्ध, पण तितकेच अवास्तव, अशा कलात्मक मांडणीच्या प्रकारांपैकी एक प्रकार आहे. वस्तुस्थितीचा आविष्कार या दृष्टीने, हा प्रकार दूर अंतरावरून पहाणेच इष्ट. जितक्या जवळिकीने

कोणत्याही एका भागाचे परीक्षण कराल तितके त्यात सत्यस्थितीचे विकृतीकरण झालेले दिसेल. सत्यस्थिती इतकी जटिल आहे, की ती तिच्या सर्व तपशीलांसह सादर करणे अशक्यच आहे. असे असल्यामुळेच अशाप्रकारचे आकारसंयोग निर्माण करणे आपल्याला भाग-पडले असण्याचीच शक्यता आहे. पण, अशा स्वैरपणे निश्चित केलेल्या आपल्या प्रदेशांना एककासारख्या संपूर्ण क्षेत्रांचे सत्य-रूप बहाल करण्याचा प्रयत्न केला, तर ती केवळ आत्मवंचना होणार आहे !

तरीही, प्रादेशिक भूगोलात अशा पुष्कळ विशेष बाबी आहेत की, त्यांच्यासाठी तरी एकरूपतेच्या आणि संपूर्णतेच्या संकल्पना मूल्यवान ठरणार आहेत. अशा संकल्पनांशी संबंधित असलेल्या शास्त्राच्या, म्हणजेच मानसशास्त्राच्या, दृष्टिकोणातून आपल्या क्षेत्राचे क्रान्तिक परीक्षण करूनच, ज्यासाठी या संकल्पनांचा औचित्यपूर्ण वापर करता येईल अशा कितीतरी गोष्टी ब्योर्नरने सुचविलेल्या आहेत, (२७४, ३४३-४५).

' पूर्णवादी ' मतप्रणालीच्या एका अगदी विशिष्ट प्रकाराला, तो समर्थनीय असल्याची मान्यता ब्योर्नरने दिली आहे. ज्या क्षेत्राचा अभ्यास अभ्यासकाने केलेला असतो त्या क्षेत्राच्या बाबतीत त्याला काहीतरी ' साक्षात्कार ' होतो, किंवा, इतर काही लेखकांनी म्हटल्याप्रमाणे, ज्या क्षेत्राचा त्याने इतका जीव ओतून अभ्यास केलेला असतो त्या क्षेत्राचा त्याला आत्मप्रत्यय येत असतो (erlebt). अन्योन्यसंबंध असलेल्या घटनांची एकूण बेरीज या स्वरूपात, सत्यस्थितीत कोणकोणत्या गोष्टींचे अस्तित्व असते याचाच, तो आत्मप्रत्यय अथवा साक्षात्कार असतो. असे असले, तरी तो अनुभव हीच एक एकूणता असते—अर्थात एक मानसशास्त्रीय घटना या अर्थाने. ग्राडमानचे म्हणणे मला नीटसे कळाले आहे असे गृहीत धरले, तर हीच संकल्पना त्याने थोडया निराळ्या स्वरूपात बोलून दाखविली आहे, (२३६). कदाचित्, एखाद्या क्षेत्राच्या व्यक्तिमत्वाबद्दल बोलणारे फ्रेंच भूगोलकारही कमी-जास्त प्रमाणात हीच कल्पना मनात घोळवीत असावेत (९३, २७५). काही अभ्यासक अशा प्रकारच्या संकल्पनेवर घाईघाईने ' केवळ गूढवाद ' असा छाप मारतील, यात शंकाच नाही ; कारण, शास्त्राला गूढवादाचे वारेही सहन होत नाही. साक्षात्कार ही विचार करण्याची एखादी शास्त्रीय पद्धती नव्हे, याबाबत कोणाचे दुमत असण्याची शक्यता नाही. तरीही, विचारांची अशा प्रकारची काही अशास्त्रीय रूपे साधने म्हणून वापरण्याची आवश्यकता निर्माण होण्याची शक्यता आहे, आणि म्हणूनच ती समर्थनीयही आहेत, अशी कबुली कोहनसारख्या ज्ञानाच्या तात्त्विक अभ्यासकांनी दिलेली आहे. अन्यथा, अनेक शास्त्रीय विश्लेषणे मार्ग न सापडल्यामुळे दुर्लक्षित राहिली असती. जवळ जवळ याच अर्थाने एखाद्या प्रयोगात गढून गेलेला शास्त्रज्ञ आपल्या " अंदाजा "च्या मागे धावत असतो. त्याचे प्रात्यक्षिक करून दाखविता आले नाही, तोपर्यंत तो अंदाज शास्त्र निषिद्ध असतो. नंतर मात्र, त्याचे अंदाज हे रूप नाहीसे होऊन, त्याचे शास्त्रीय निष्कर्षात रूपांतर होते. कोणत्याही पूर्णक्षेत्राचे विश्लेषणाने विघटन करून, त्यातील घटकांच्या, आधीच प्रत्ययास आलेल्या,

समर्थनीय सहसंबंधांचे प्रात्यक्षिक करून दाखविता आले पाहिजे. नाही तर, कोणत्याच क्षेत्रांचे ' पूर्णवादी ' साक्षात्कार, मग त्यांचे आत्मप्रत्यय कितीही सामर्थ्यवान असले तरी, शास्त्रीय सत्य म्हणून विचारात घेतले जाण्याची सुतराम शक्यता नाही. मात्र, त्याच प्रक्रियेतून, ते क्षेत्र, साक्षात्काराने रंगविलेल्या क्षेत्राप्रमाणे संपूर्ण नाही, या दुसऱ्या गोष्टीचा येणारा अनुभवही टाळता येण्यासारखा नाही. थोडक्यात, त्या पूर्णवस्तूचा तो मानसिक आविष्कार, त्याचे प्रयोजन संपताच, त्याच्या विश्लेषण प्रक्रिये बरोबरच तो अंतर्धान पावतो.

आणखीही पुष्कळ बाबतीत पृथ्वीचे मानवाशी असलेले संबंध, निदान मानसशास्त्रज्ञाच्या दृष्टीला तरी, पूर्णरूपाने दिसतात. निरीक्षकाच्या दृष्टीला होणारे भूदृश्याचे दर्शन, हा त्यातलाच एक अगदी उघड प्रकार आहे. भूदृश्याचे संवेदन ही काही निरीक्षकाच्या व्यक्तीखेरीज असणारी वस्तुनिष्ठ वस्तुस्थिती नव्हे, तर ती त्याच्या जाणीवेत वावरणारी एक वस्तुस्थिती आहे. वेगवेगळ्या निरीक्षकांच्या एकाच क्षेत्राच्या ठशात साम्य आढळले, तरीही व्योर्नरच्या निष्कर्षानुसार, अभ्यासकाच्या व्यक्तिगत प्रकृतीचे व प्रवृत्तीचे प्रभाव त्यातून गाळणे अवघडच असते. यापूर्वीच दाखवून दिल्याप्रमाणे भू-मानसशास्त्र या नावाखाली हेलपाखने या प्रकारच्या भूदृश्य क्षेत्राच्या अभ्यासाची वाढ केली. ग्रान्योचा दृष्टिकोण मला बरोबर समजला आहे, असे मान्य केले, तर त्याने, पलटी घेऊन असेही म्हणावयास हरकत नाही, हीच संकल्पना भाषांतरित करण्याचा प्रयत्न केला. संवेदनात्मक भूदृश्यापासून, म्हणजेच एका मानसशास्त्रीय एकक घटनेपासून, सुरूवात करून वस्तुनिष्ठ भू-घटनेचे विश्लेषण व संश्लेषण करण्याचा तो प्रयत्न करतो ; कारण, तिचाच निरीक्षकाच्या मनावर ठसा उमटलेला असतो. असे करत असताना, हा ठसा म्हणजे : निरीक्षकाच्या मानसिक प्रतिक्रियेतून निर्माण झालेल्या केवळ एका मानसिक पूर्णवस्तूचे (ते) प्रातिनिधिक रूप असते ; वस्तुनिष्ठ वस्तुस्थितीत ते असत नाही,–अर्थातच एकच पूर्णवस्तू निरनिराळ्या निरीक्षकांच्या मनात सारखीच उमटत असेल असेही नाही–या गोष्टीकडे त्याने दुर्लक्ष केले आहे.

कोणत्याही क्षेत्राचे भौतिक रूपधेयांच्या प्रत्यक्ष ज्ञानेंद्रियांवर होणाऱ्या परिणामांतूनच मानव ते क्षेत्र पहातो असे नाही, तर, प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे, ते क्षेत्र आपला परिसर आहे असे मानून तो त्याचा अनुभव घेत असतो. ही भूक्षेत्र दृश्यानुभूती (Landschafts erlebnis) इतर अनुभवाप्रमाणेच एक पूर्णवस्तू असते असे व्योर्नरला आढळून आले. एक गोष्ट उघड आहे, की ही घटना जशी त्या क्षेत्रावर अवलंबून असते, तशीच ती तेथील रहिवाशांच्या स्वभावावर आणि त्यांच्या अनुवंशिक चातुर्यावरही अवलंबून असते,–अर्थातच, येथे रहिवाशांचा विचार व्यक्ती व समष्टी अशा दोनही अर्थांनी करावयाचा आहे. जे भूगोलकार पृथ्वीसंबंधीची अशी अनुभवरूप घटना अभ्यासावयाची जबाबदारी स्वीकारतात ते मानसशास्त्रातही तितकेच प्रवीण असणे इष्ट आहे, ही गोष्ट स्पष्ट आहे. अशा प्रकारचे हे सीमाक्षेत्र भूगोलक्षेत्रापेक्षा मानसशास्त्राच्या कक्षेत अधिक शोभून दिसणार नाही का, या प्रश्नाचा निवाडा करत बसण्याची आम्हाला जरूरी वाटत नाही.

पार्थिव क्षेत्राच्या पूर्णतिचा हा अनुभव भाषांतराने सत्यस्थितीतील मानवाच्या जीवनक्षेत्राच्या (Lebensraum) परिभाषेत सांगणे शक्य आहे. एका सर्वसाधारण, पण अगदी उघड प्रकारात, या जीवन क्षेत्राची जागा संपूर्ण भूपृष्ठाने घेतलेली असते ; शिवाय त्यात सूर्य, चंद्र आणि तारकामय आकाशाचा दृश्य हिस्सा यांचीही भर असतेच, कारण तेही त्याच दर्शनीय दृश्याचे भाग असतात. एकाच व्यक्तीच्या अगर व्यक्तिगटाच्या संदर्भात व्योर्नर (Lebensraum) (जीवनक्षेत्र) याची व्याख्या अशी करतो : ज्याचे त्यांच्याशी कोणत्यातरी प्रकारे मानसिक संबंध जडलेले असतात असा त्यांच्या परिसराचा हिस्सा.–म्हणजेच, परिसर व मानव यांच्यात प्रतिसादात्मक संबंध असतात. संबंधी व्यक्तीच्या नजरेने पहाता, हे जीवनक्षेत्र एक पूर्णवस्तू असल्याने त्याचा विचार पूर्णत्व-रूपानेच करणे प्राप्त आहे. इतर विविध दृष्टिकोणांतून या संकल्पनेचे काही महत्त्व असेल ते असो ; पण त्याच्यामुळे भूगोलाला स्वतंत्र व मूर्त असा अभ्यासविषय मिळत नाही, इतके स्पष्ट आहे. अगदी वेगळ्या ठिकाणी राहाणाऱ्या लोकांची जीवनक्षेत्रे असणारे हे प्रदेश एकमेकास असे गुंडाळतात, की ते वेगवेगळे करून दाखविणेही अशक्य होते. फक्त अगदी असंकरित क्षेत्रातच सापेक्षतः मर्यादित, आणि तरीही परस्पराक्रमक जीवनक्षेत्रे प्रस्थापित करणे शक्य होईल. पण, आधुनिक व्यापारी शहराच्या जीवनक्षेत्रात जवळजवळ संपूर्ण जगाचाच समावेश करावा लागेल.

निदान भूगोलकारांच्या सर्वसामान्य समजुतीप्रमाणे भूगोलाच्या या सगळ्या वादावादीच्या मळणीने पदरात पडले ते हे पसाभर धान्य. या पूर्ण वस्तूसंबंधीच्या संकल्पना विचारात घेतल्या जात नव्हत्या तेव्हा, म्हणजे भूतकालात, भूगोलाचे गाडे छान चालले होते. नाहीतरी, सत्यस्थितीत भूगोलाचा संबंध संपूर्ण वस्तूंशी क्वचितच येतो. वनस्पती व प्राणी यासारखी अगदी उघड एकके एवढेच काय ते अपवाद. त्यांचा स्वतंत्र एकके या नात्याने अभ्यास क्रमबद्ध शास्त्रे करत असतात, आणि तो भूगोलालाही उपकारक असतो. उलट, व्योर्नरच क्षेत्रीय संयोगांचे काही नमुने सुचवितो व ते बहुतांशी क्षेत्रीय विस्ताराने अगदीच लहान असतात. जोपर्यंत आपण त्यांचा त्यांविशिष्ट रूपांपुरताच विचार करत असतो, तोपर्यंत त्यांचा पूर्ण एकके म्हणून विचार केला जाण्यास हरकत नाही, व तसे करणे इष्टही आहे. कारण, कोणतीही पूर्ण वस्तू ही काही विशिष्ट दृष्टिकोणांतून पाहिली की ती केवळ गणिती बेरीज आहे असेच वाटते.–उदाहरणार्थ : भौतिकदृष्ट्या, माणूस हा गुरूत्वाकर्षणाच्या भाषेत एक सरळ बेरीजच आहे. (२७४, ३४६).

या मूर्त क्षेत्रीय पूर्णवस्तूंचे अस्तित्व वास्तव जगातील एकाच कारकावर–म्हणजेच मानवावर–अवलंबून आहे. काही मयदित, स्वतंत्र क्षेत्रीय एकके निर्माण करावयाचे व ती एकके, रचना व कार्य यांच्या परिभाषेत, एक पूर्णवस्तू म्हणून संघटित करण्याचे सामर्थ्य मानवालाच आहे. एका मळेकऱ्याची शेते ही अशीच स्वतंत्र एकके असतात. त्या प्रत्येकात पेरलेली पिके आणि त्यांच्या मशागतीच्या पद्धती यांचा विचार मृत्तिकाभेदांच्या संदर्भात केलेला असत नाही. अर्थातच, त्याचा परिणाम उत्पन्नावर होतो, ही गोष्ट वेगळी ! तरीही, एका

महत्त्वाच्या अर्थाने, ती एकके संपूर्ण असत नाहीत. पण, पुष्कळ बाबतीत ती एक प्राथमिक पूर्णवस्तू आहे असे मानून संघटित केलेल्या त्या मळ्याचे ती शेते ही केवळ विभागच असतात. ते विभाग त्या पूर्णवस्तूवर अवलंबून असतात—त्यात धान्य कोठारे, गुरेढोरे, मळ्यातील घर, आणि त्या माळ्याचे कुटुंब या सर्वांचा समावेश होतो. एकूण मळ्याच्या परिभाषेशिवाय दुसऱ्या कोणत्याच प्रकाराने शेताचे उपयोग समजून येण्यासारखे नाहीत. साधारणपणे, माणसाचे कोणतेही एक कार्य एक पूर्णवस्तू म्हणून विचारात घ्यावयास हरकत नसते, आणि त्या कार्याचे विभाग त्या एकूण कार्याच्या परिभाषेतच समजून घेणे शक्य असते. हे मान्य करताना व्योर्नर अशी पुस्ती जोडतो, की त्यासाठी रचनाकाराच्या विचारधारेचाही संदर्भ घेणे आवश्यक असते—आणि या मुद्यावर आम्हालाही भर द्यावासा वाटतो.

नागरी क्षेत्रांनाही हीच संकल्पना आणखी थोड्या विस्ताराने लागू करता येईल, मात्र राखीव गोष्टींची संख्या वाढत जाईल. शहरातील इमारती या अगदी स्वतंत्र व विभक्त क्षेत्रीय एकके असतात.. निदान काही विशिष्ट बाबतीत या इमारतींच्या संदर्भात त्या शहराचा एक संपूर्ण सजीव म्हणून विचार करण्यास हरकत नाही. नागरिक वसाहत, औद्योगिक वसाहत, मध्यवर्ती व्यापारी वसाहत इत्यादि वेगवेगळे विभाग केवळ त्यांच्या अन्योन्यसंबंधांतून समजून घेणे शक्य होणार नाही, तर त्या एकूण शहराच्या परिभाषेतच समजून घेणे आवश्यक असते. ते केवळ एकमेकांच्या साहचर्यात राहाणारे घटक नसून एका सुसंघटित पूर्णवस्तूचे ते अवयव असतात. शिवाय, त्या नगराचे भोवतालच्या प्रदेशांशी असणारे संबंध—उदाहरणार्थ अन्न पुरवठा, पाणीपुरवठा इत्यादींच्या संदर्भात देवाणघेवाण—नगरातील एका घटकाशी ग्रामीण भागातील एका घटकाशी अशी संगती साधत नाहीत, तर त्या संपूर्ण संघटित नगराचे संपूर्ण ग्रामीण प्रदेशाशी असे संबंध असतात. शेवटी हे नगर क्षेत्र एका सापेक्षतः अरुंद सीमापट्टीवर मर्यादित करणे शक्य असते—इतकेच काय, या पट्टीचे, तशीच जरूरी पडल्यास एका रेखीव रेषेतही रूपांतर होऊ शकते.

सर्वसाधारणपणे आमचे मत असे, की निसर्गातील बहुगुणित व क्रमित फेरबदलांशी सोईस्कर रीतीने जुळते घेऊन जमिनीचा वापर करणे मानवाला शक्य होत नाही. या कारणानेच, नैसर्गिक भूदृश्याचे सांस्कृतिक भूदृश्यात त्याने केलेल्या रूपांतराचे एक प्रमुख अंग असे, की तो प्रथम काटेकोरपणे वेगळी केलेली जमिनीची एकके निर्माण करतो व मग त्या प्रत्येकात सजातीयता निर्माण करण्याचा प्रयत्न करत रहातो. अशा प्रकारे त्याचा कल एक आकारसंयोग निर्माण करण्याकडे असतो. हे एक असे चित्र असते, की त्यातील प्रत्येक भाग आपल्यापुरता सजातीय असला, तरी प्रत्येक दुसऱ्यांपासून अगदी वेगळा असतो. निसर्गात असे आकारसंयोग निर्माण होण्याची शक्यताच नसते ; म्हणून असे भूदृश्य हे मानवी प्रभावाचे अगदी निश्चित लक्षण समजावे. जितक्या मोठ्या प्रमाणात मानवाने आपल्या उपयोगासाठी भूमीचे रूपांतर केलेले असते, तितक्याच मोठ्या प्रमाणात ते नैसर्गिक " रानवट " भूदृश्य

" मवाळ " बनलेले असते ; आणि तितक्या मोठ्या प्रमाणात हा आकारसंयोग जवळजवळ परिपूर्ण बनत चाललेला असतो. पृथ्वीची ही मुद्रा आकाशातून पहात असताना–मग ते वायुयानातून असो, की हवाई-छाया चित्रांच्या रूपाने असो–त्यातील या विरोधाचा ठसा निरीक्षकाच्या मनावर उमटल्याशिवाय राहाणार नाही. अशारीतीने मानवाने मोठ्या प्रमाणात मवाळ बनविलेल्या, आणि पुनर्रचना केलेल्या, भृदृश्यातील एखादा " रानवट " भूखंड एखाद्या आकारसंयोगाचा अपूर्ण राहिलेल्या किंवा जुळविताना, कदाचित, बिघडलेल्या भागासारखा नजरेत भरतो. असे होण्याचे कारण इतर शेतांच्या विरोधात तो भाग गर्दराईचा असतो, हे नव्हे. या आकारसंयोगात फळबागा तर चपखल बसू शकतात. पण, त्या भूखंडात अंतर्गत सजातीयतेचा अभाव असतो व तोच उठून दिसत असतो. सहसा त्याच्या अनियमित व अनियंत्रित कडा नकळत कुरण भागात विलीन होत असतात. अशाप्रकारे, जगाच्या निरनिराळ्या भागातील नमुनेदार शेती भूदृश्यांकडे आकाशातून पहात असता, मानवाने नैसर्गिक भूदृश्याचे सांस्कृतिक भूदृश्यात किती पूर्णांशाने रूपांतर केले आहे याचे सापेक्ष प्रमाण तत्काल लक्षात येते. दक्षिण न्यू इंग्लंड, मकापट्टा, पॅरिसबेसिन, आणि यांगत्से त्रिभुज यांच्या क्षेत्रांची परस्परांशी महत्त्वपूर्ण तुलना करता येण्यासारखी आहे. याचे विरुद्ध टोक, ज्याला वसाहत विरहित क्षेत्र असे म्हणता येणार नाही अशा क्षेत्रात, म्हणजे मध्य आफ्रिकेत, मिळण्यासारखे आहे.

मानवाने अशाप्रकारे जवळजवळ आकारसंयोगाप्रमाणे दिसणारी भूदृश्ये विकसित केलेली आहेत ; मळे, नगरे यासारखी अवकाशस्थ सावयव एकके निर्माण केलेली आहेत ; आणि त्याने तसा चंग बांधला तर प्रदेशप्राय विस्तृत एकके निर्माण करण्याचेही त्याचे सामर्थ्य आहे, यात संशय नाही. यातील शेवटचा प्रकार साध्य करण्याचा प्रयत्न, खऱ्या अर्थाने, त्याने केलेलाच नाही. त्याने नियोजित व संघटित केलेले वहातूक-मार्ग हे त्याच्या प्रयत्नांचे मर्यादित, अंशरूप वगळले, तर, सुबुद्धपणे अथवा अबोधपणे, एककरूपाने प्रदेश संघटित करण्याचा प्रयत्न मानव कधीच करत नाही. प्रादेशिक नियोजनासाठी, किंवा एकरूप शासन सुलभ व्हावे म्हणून कमीजास्त प्रमाणात निश्चित मर्यादांच्या प्रदेशात देशाची विभागणी करण्यासाठी, अलीकडेच ज्या चर्चा झाल्या त्यात अशा प्रकारचे विस्तृत प्रदेश संघटित करण्याच्या मार्गातील अडचणींवर चांगला प्रकाश पडला. जाणीवपूर्वक पूर्वनियोजन न करता, वर्धमान नगररचनेत उत्क्रान्त होऊ शकेल असा एखादा, अगदी प्रथमावस्थेतीलही संघटनात्मक नमुना अस्तित्वात नाही, ही त्यातील मुख्य अडचण आहे, (c/o National Resources Committee राष्ट्रीय संपत्ति साधन समितीचे प्रतिवृत्त, पान २९१). राजनैतिक राज्यांच्या " शास्त्रशुद्ध " सीमा शोधण्याच्या कामात अशा प्रकारच्या एखाद्या संघटनसूत्राचा अभावच, त्यातील अडचणीच्या रूपाने प्रतिबिंबित होत असतो. प्रदेश हे कार्यकारी, एकक सावयव आहेत असे सिद्ध करणे भूगोलकारांना शक्य झाले, तर मिळत्याजुळत्या सीमा शोधण्याची समस्या तो प्रदेश कोणत्या राज्याला बहाल करावयाचा एवढ्यापुरतीच मर्यादित होईल. ज्याना या संज्ञांचा वापर करावयाचा असेल त्यानीही

भूराजनीतीशास्त्राच्या जर्मन अभ्यासकांनी यावरून काढलेल्या तर्कशुद्ध निष्कर्षांचा अभ्यास करावा हे बरे.—मी अन्यत्र चर्चेसाठी घेतलेल्या अशा समस्येचे ते अतिसुलभ रूप आहे. (२१६, ९६०-६५).

उलटपक्षी, मानवाने काही मोठी क्षेत्रे कार्यकारी एकके म्हणून काही थोड्या प्रमाणात संघटित केली आहेत. स्वतंत्र राज्ये ही मानवाची एक स्वैर निर्मिती आहे. ती केवळ राजकीय दृष्ट्याच संपूर्ण वस्तू म्हणून कार्य करतात असे नाही, तर बऱ्याच विस्ताराने ती आर्थिक व सामाजिक दृष्ट्याही संपूर्ण वस्तू म्हणूनच कार्य करतात. सामान्यतः ज्याला प्रदेश म्हणता येईल, त्याच्या तुलनेने ही फारच मोठी असतात ; आणि भूगोलकार ज्यांना मान्यता देतात त्या " नैसर्गिक प्रदेशांच्या " कोणत्याच प्रकाराशी त्यांचे काहीही नाते नसण्याची शक्यता असते. तरीही, ती क्षेत्रीयदृष्ट्या काटेकोरपणे आखलेली असल्याने, आणि पुष्कळच बाबतीत संघटित एकके म्हणूनच त्यांचे कार्य चालत असल्यामुळे, त्यांना क्षेत्रीय सावयव असेही म्हणण्यास हरकत दिसत नाही. मात्र तसे करताना कोणत्या बाबतीत तो सावयव सजीवासारखा नसतो, त्याचा स्पष्टपणे उलगडा केलेला असणे आवश्यक आहे, (मौल वरून १५७, ७८). पण, हीच संज्ञा राज्याच्या एका विभागासाठी वापरणे—गाइज्लरने त्याच्या सायलेशियाच्या अभ्यास लेखात केले आहे त्याप्रमाणे—म्हणजे त्याच्या अर्थातील सत्व काढून घेण्यासारखे आहे. (३४५).

या क्षेत्रीय सावयवासंकल्पनेला पुष्कळच राखीव बाबींची पुस्ती जोडणे आवश्यक असते. ब्रौनच्या राज्य हा एक 'सजीव-प्राय संघात' आहे (Organisches Lebewesen) या राज्यविषयक संकल्पनेवर टीका करताना हेटनरने म्हटले आहे, की राज्य हे मानवीजीवनातील कारकांपैकी एक आहे. (१६७, ३४०). उदाहरणार्थ : जर्मनीतील ऱ्हूर-क्षेत्र आणि फ्रान्समधील लॉरेन हे लोह-खनिजक्षेत्र या दोहोंचे संबंध हे काही जर्मनी व फ्रान्स या दोन परस्परावलंबी सावयवांच्या अन्योन्यसंबंधासारखे नाहीत. ते संबंध या संपूर्ण सावयवांशी असलेल्या त्यांच्या संबंधाहून मूलतः वेगळे आहेत. एकाचा एक विभाग व दुसऱ्याचा एक विभाग अशा प्रकारचे ते संबंध आहेत. संयुक्त संस्थाने व कॅनडा यांच्या संबंधांत अशा प्रकारची पुष्कळ उदाहरणे आढळण्याची शक्यता आहे. दुसऱ्या शब्दात असेही म्हणता येईल. आर्थिक भूगोलातील " क्षेत्रीय सजीव " इतके अविवक्षित व निराकार असतात, की एकेकात दोन अगर अधिक राज्यरूप क्षेत्रीय सजीवांचे अवयव सहज सामावू शकतात.

## 'ग '—निष्कर्ष : व या संकल्पनेचे व्यावहारीक परिणाम

प्रादेशिक भूगोलात ज्यांच्यांशी आपला संबंध सामान्यतः पोहोचतो त्या क्षेत्रीय विभागांच्या दृष्टिकोणातून आपण पुढील निष्कर्ष काढू शकतो. जे सत्यस्थितीत एकक असू शकतील अशा भूपृष्ठाच्या विभागांची प्रदेश अशा अर्थाची व्याख्या करणे शक्य होत नाही ; कारण, स्वतंत्र व मूर्त वस्तू म्हणून त्यांचा विचार करणे वास्तवतेला सोडून आहे. हेटनरच्या एका अवतरणाच्या संदर्भात फायफरने भर देऊन असे सांगितले आहे, की " भूगोलातील विचार

व संकल्पना गुंतागुंतीच्या स्वरूपाच्या असतात, त्या क्रमबंधात्मक वस्तूंच्या स्वरूपांत नसतात." (१६४, ४२५).

ही संकल्पना नव्याने घेतल्यामुळे, प्रादेशिक भूगोलाचा कोणता फायदा झाला ?–अर्थात्, एतद् विषयक झालेल्या असंख्य पद्धतितंत्र विषयक चर्चांत शक्तीचा फार मोठा अपव्यय झाला हा एक परिणाम वगळून–अशी कोणी पृच्छा केलीच, तर त्याचे उत्तर शोधणे कठीण आहे ; कारण, प्रत्यक्षात या संकल्पनेचा अगदी मर्यादित उपयोग केला गेला. पासार्जने रचलेला नमुना-क्षेत्रांचा क्रमबंध–त्याची चर्चा पुढे व्हावयाचीच आहे–याच संकल्पनेला फुटलेला एक कोंभ आहे, असे म्हटले जाण्यास हरकत नसण्याची शक्यता आहे. अर्थात, या आधाराशिवाय, कोणत्याही परिस्थितीत हे क्रमबंध त्याने रचले असते, ही गोष्ट निःसंशय आहे. "निश्चित स्वरूपाच्या स्वतंत्र क्षेत्रात भूपृष्ठविषयक वस्तुस्थिती समर्पकपणे बसविण्याच्या नादात, ज्याला आकार नाही आणि मर्यादाही असत नाही व असू शकत नाही, अशा एका वस्तूसाठी, आपण मर्यादा शोधण्याच्या व आकार निर्माण करण्याच्या दिशेने पावले टाकू लागतो" असे मत व्हॉलॉकने आग्रहपूर्वक मांडले आहे (१८६, ५०). प्रत्यक्षात, तसे करणे हा काही शास्त्रीय गुन्हा होत नाही. मात्र, आपण घालून दिलेल्या मर्यादा आणि त्यातून निष्पन्न होणारे आकार हे, कमीजास्त प्रमाणात, वस्तुस्थितीशी आपणच स्वेच्छेने केलेला समझोता, या स्वरूपाचे आहेत व याशिवाय दुसरे कोणतेही रूप ते घेऊ शकणार नाही ही गोष्ट आपण मनोमन मान्य केलेली असली पाहिजे.

या संकल्पनेच्या प्रस्तावकांच्या पुष्कळशा कार्यांवर आणखी एक अधिक गंभीर स्वरूपाचा परिणाम झालेला नजरेस येतो. ज्या शास्त्रांना अभ्यास क्षेत्र म्हणून वस्तूंचा एक विशिष्ट प्रकार लाभलेला आहे, अशा शास्त्रांच्या बरोबरीचे उच्चस्थान भूगोलाला मिळवून देण्याच्या प्रयत्नात ते असतात. पण, तसे करताना, ज्या घटकामुळे भौगोलिक विचार इतर सर्व शास्त्र विचारापासून वेगळा दाखविता येतो तो आवश्यक घटकच उघडपणे दृष्टीआड करतात. भूपृष्ठांवरील वस्तूंना प्रत्येकी अन्योन्य संदर्भात एक सापेक्ष स्थान असते, ही गोष्ट भूगोलकाराने सतत लक्षात बाळगली पाहिजे ; आणि ही गोष्ट आम्ही यापूर्वी सुचविलेलीही आहे. याच कारकाकडे काणाडोळा करण्याची प्रवृत्ती होते, याचे कारण अभौतिक घटकांचा 'प्राथमिक भौगोलिक वस्तुस्थिती' म्हणून विचार करण्याला नकार दिला जातो. तसेच भूगोलाभ्यासकांच्या प्रशिक्षणात क्रमबद्ध भूरूपशास्त्रांवर भर दिला जातो, याचाही तो, एक परिणाम असावा असे म्हणण्यास हरकत दिसत नाही. शिवाय, प्रदेश हे स्वतःपुरते एक सापेक्षतः बंदिस्त एकक असते, अशा दृष्टीने प्रदेशाचा विचार केला जाण्याचाही तो परिणाम असावा असे दिसते. फक्त त्या प्रदेशातील वस्तूंच्या परिभाषेतच त्या प्रदेशाचे अर्थशोधन करण्याच्या प्रयत्नात हा सापेक्ष स्थानाचा घटक सापेक्षस्थान निश्चित करणाऱ्या अंतर्गत वस्तुस्थितीपुरताच मर्यादित रहातो. तात्विकदृष्ट्या मात्र एक एकक या नात्याने त्या प्रदेशाचे अशाप्रकारच्या अन्य एककांच्या संदर्भात असलेल्या सापेक्ष स्थानाचा विचार करू शकतो. पण, त्याच भाषेत एखाद्या मूर्त परिस्थितीचे विश्लेषण करू लागलो की, हा मूलभूत

गैरतर्क उघडा पडतो. प्रदेशांचे स्वतंत्र एकके या नात्याने अन्योन्य संबंध नसतात–फक्त एका प्रदेशातील काही विशिष्ट घटकांचा अथवा घटकजटिलांचा दुसऱ्यांतील काही घटकांशी अथवा घटकजटिलांशी संबंध असतो.

श्लूटर, पासार्ज, ग्रान्यो आणि सॉर अशासारख्या अभ्यासकांनीही आपल्या ग्रथांतून सापेक्षस्थान या कारकाचा उल्लेख अगदी निसटता केला आहे, अशी तक्रार आम्ही आधी केलेली आहे, तिचीच पुनरावृत्ती करण्याची आम्हास मुळीच धास्ती वाटत नाही. ब्यूर्गरने या कारकाचे केलेले वर्णन बरोबरच आहे : " तो निर्विवादपणे आपल्या शास्त्राच्या मालकीचा आहे, नव्हे, तो केवळ आमचाच आहे, भूदृश्यक्षेत्रातील इतर कोणत्याही घटकापेक्षा त्याच्यावर आमचा जास्त अधिकार चालतो, म्हणून त्यालाच भौगोलिक म्हणणे इष्ट होईल. कारण, त्यांच्या वस्तूच्या दृष्टिकोणातून पहाता ते अन्य शास्त्रांच्या अधिकार क्षेत्रांतील असतात ; आणि भौगोलिक क्षेत्रांच्या विवेचनात अप्रत्यक्षपणे त्यांचाही विचार होत असतो, तेवढाच त्यांचा भूगोलाशी संबंध असतो, " (११, ३०).

ग्रंथकर्त्याला प्रदेश हे सापेक्षतः बंदिस्त वस्तू-प्रमाणे असतात असे सिद्ध करण्याची घाई झालेली असते, त्यामुळे भौगोलिक विवेचनातील या अत्यावश्यक घटकाकडे कोणत्याप्रकारे दुर्लक्ष होते ते जगाच्या प्रादेशिक पर्यविक्षणावरून अगदी स्पष्टपणे नजरेस येते. यापूर्वी, पासार्जच्या जगाचे प्रादेशिक पट्टे (Landschafts gurtel der Erde) या ग्रंथाच्या संदर्भात या गोष्टीची दखल आपण घेतलेलीच आहे. आता येथे, आमच्या स्वतःच्या साहित्यावर त्याचे परिणाम कसे झाले याचे जेम्सच्या " भूगोलाचा आराखडा " (३२१) या ग्रंथावरून परीक्षण करता येण्यासारखे आहे. हा ग्रंथ पासार्जच्या विचारधारांनी लक्षात भरण्याइतका प्रभावित झालेला आहे. तसेच, भूवर्णनात्मक तत्त्वांवर आधारलेले, व एकाचवेळी भौतिक व सांस्कृतिक अशा दोनही बाजू दाखविणारे भूगोलाचे जागतिक दृश्य सादर करण्याचा एका अमेरिकी भूगोलकाराने केलेला महत्त्वाचा एकमेव प्रयत्न, अशी या ग्रंथाची संभावना योग्य कारणास्तवच केली गेली आहे, (३२१). [८३]

---

८३. प्रस्तुत ग्रंथ-लेखकाने जेम्सच्या ग्रंथासारखे अभ्यास ग्रंथ लिहिण्याचा प्रयत्न केलेला नाही. उलट, इतरांच्या ग्रंथावर त्याने मुक्तपणे टीका केली आहे. म्हणूनच, क्षमेसाठी नसेल तरी, स्पष्टीकरणासाठी मला काही लिहिणे प्राप्त आहे. प्रस्तुत ग्रंथात आपला संबंध जेम्सच्या ग्रंथातील विषयसामग्रीची विपुलता, त्याची श्रेष्ठ गुणवत्ता, किंवा पाठ्यपुस्तक या नात्याने त्याचे मूल्य या गोष्टींशी नाही. आपला संबंध त्या ग्रंथात सूचित केलेल्या भूगोलाच्या स्वरूपाच्या अर्थाशी आहे. आगमप्रमेयाच्या विधानाच्या स्वरूपात अथवा सामग्रीच्या क्रमव्यवस्थेवरून काढावयाच्या अनुमानांच्या रूपाने या सूचना मिळतात. तोंडी वक्तव्ये न करता अन्यप्रकारे आपली मते पद्धति तंत्रविषयक लेखांतून सादर न करता पाठ्यपुस्तकांतूनच सादर करण्याचे धोरण लेखकांनी स्वीकारले असल्यामुळे, त्या ग्रंथाची चर्चा करणे, अथवा त्यांच्या मतांकडे पूर्णपणे दुर्लक्ष करणे, याशिवाय तिसरा मार्गच शिल्लक रहात नाही. पण, प्रस्तुत लेखकासह पुष्कळांनीच या ग्रंथाची प्रशंसा केली असल्यामुळे, आपल्या देशातील भौगोलिक विचारसरणीवर त्याचा लक्षणीय प्रभाव पडण्याची शक्यता आहे. त्यामुळे तर, त्यातील अधोगत तत्त्वज्ञानधारेचे क्रान्तिक परीक्षण करणे आणखीच आवश्यक झाले आहे.

संबंधी ग्रंथाच्या प्रस्तावनेत–ही प्रस्तावना प्राथमिक व उच्च अशा दोनही प्रकारच्या अभ्यासकांना अनुलक्षून लिहिलेली आहे. सापेक्ष स्थानाच्या या कारकाचा विचार अजिबातच वगळलेला आहे. महत्त्वाचा मुद्दा असा, की पुष्कळशा तपशीलवार प्रादेशिक विवेचनातून या कारकाच्या महत्त्वासंबंधीचा विचार शोधून काढणेही अवघड आहे. एकमेकापासून अंतर या सर्वप्रथम-महत्त्वाच्या कारकाचा संदर्भ, दिलाच तर अगदी त्रोटकपणे देऊन अथवा मुळीच, न देता कॅलिफोर्नियातील फळबागक्षेत्रांची, कुरणप्रदेशांतील गहू प्रदेशांची आणि उष्ण कटिबंधातील मळ्यांची चर्चा केलेली आहे. गतशतकातील त्यांच्या व्यापाच्या आणि वाढीच्या संदर्भात शहरांची चर्चा केलेली आहे व त्यांचे नकाशे काढलेले आहेत, आणि त्यांच्या बाह्यरूपांचा व अंतर्गत आकृतिबंधांचाही विचार झालेला आहे. पण, शहरांच्या सापेक्षस्थानांच्या साधारण तत्त्वांची चर्चा सामान्य तुलनेने इतकी त्रोटक आहे, की ती आज आढळतात त्याच विशिष्ट ठिकाणी त्यांचा विकास का झालेला आहे, आणि आज ती करत असलेली विशिष्ट व भिन्नभिन्न कार्ये त्यांना कशी प्राप्त झाली, या गोष्टींचे आकलन वाचकाला होण्याची शक्यताच नाही.

येथे खरी अडचण असते ती क्रमवार मांडणीची. जागतिक पर्यवेक्षण प्रदेशवारीने केलेले असेल,–आणि अशांचाच प्रस्तुत लेखकही पाठपुरावा करील–तर ते केवळ गैरसोयीचे असते, इतकेच नव्हे, तर ते फार अवघडही असते ; कारण, याप्रकारात विचाराधीन असलेल्या प्रदेशाचे विवेचन अर्धवट सोडून, वारंवार त्यातील काही रूपधेयांचा त्याच्या शेजारच्या प्रदेशांतील तशा सारख्याच रूपधेयांशी असलेल्या संबंधांचा मागोवा घ्यावा लागतो–आणि असे संबंध जगाच्या दूरदूरच्या भागाकडे अंगुलिनिर्देश करणारे असतील तर हे प्रकरण आणखीच बिघडते, अर्थात ज्यांनी अशा प्रकारचे संघटन करण्याचा प्रयत्नच केलेला नाही त्यांना, त्यात उपस्थित होणाऱ्या एखाद्या समस्येची उकल करण्याचे टाळले तर त्याबद्दल, लेखकावर टीका करण्याचा अधिकार पोहोचत नाही. फक्त, त्याने ती सोडवली नाही याची नोंद करण्यापलीकडे आपण काही करू शकत नाही. उलटपक्षी, ब्राझीलच्या कॉफीक्षेत्रासारख्या एकाच प्रादेशिक अभ्यासात, तिकडील कॉफीच्या सागरपार ग्राहक क्षेत्रांच्या संदर्भात त्या संपूर्ण क्षेत्राच्या स्थानमहात्म्याचा विचार, आणि विशेषेकरून त्या क्षेत्राच्या निरनिराळ्या विभागांचे बंदरांच्या संदर्भात बदलते सापेक्षस्थान या गोष्टींचे प्रतिपादन करणे आवश्यक आहे आणि ते शक्य आहे, असे दिसून येईल, (३६५).

" मोठ्या शहरांची अवयवात्मक एकरूपता जगाच्या अगदी दूरच्या विभागांपर्यंत विस्तारलेली असते ". या गोष्टीला जेम्सने आपल्या जागतिक पर्यवेक्षणाच्या समारोपाच्या सारांशात मान्यता दिलेली दिसते (३२१, ३५३). तरीही, अद्यावत मानवाच्या दृष्टीने पहाता, अखिल भूपृष्ठापेक्षा लहान, आणि संपूर्ण, असे प्रादेशिक एककच असू शकणार नाही,

हा त्यावरून निघणारा तर्कशुद्ध निष्कर्ष काढण्यास मात्र तो तयार नाही. एकदा ही गोष्ट लक्षात आल्यावर, हेटनरचा निष्कर्ष स्पष्टपणे नजरेसमोर येतो : " भूपृष्ठासंबंधीची कोणतीही घटना तिच्यापुरतीच विचारात घेऊन चालणार नाही. पृथ्वीवरील अन्य ठिकाणांच्या संदर्भात तिच्या सापेक्ष स्थानांचे आकलन झाले तरच ती समजून येणार आहे. "

येथे एक गोष्ट समजून घेणे उद्‌बोधक ठरेल. अन्य संबंधयोगांचे तत्त्व कितीही प्रमाणात व कितीही प्रकारे गैरसमज निर्माण करणारे असले तरी, त्या तत्त्वाच्या अनुवादांना, कोणत्याही क्षेत्रातील रूपधेयांची योग्य समजूत करून घ्यावयाची असेल तर त्यांचे सापेक्षस्थान लक्षात घेणे महत्त्वाचे असते, या गोष्टीची खऱ्या अर्थाने जाणीव झालेली होती. अशा वेळी, व्हिटेकरने केलेला न्यू-जर्सीचा सोदाहरण अभ्यास (३९७), आणि विशेषेकरून, सेंम्पलने केलेले व्यापक विश्लेषण (२०४, प्रकरण ५ वे), ही नजरेपुढे येतात.–येथेही हवामानात्मक सापेक्ष स्थान व खऱ्या अर्थाने सापेक्षस्थान या दोहोंचा गोंधळ उडतोच; कारण हवामानात्मक सापेक्ष स्थान म्हणजे केवळ हवामान एवढेच गृहीत धरण्यात आले आहे.

एकसंधता निर्माण करणारे शास्त्र या अर्थाने इतिहासाशी जवळीक करणाऱ्या भूगोलाच्या स्वरूपाचा आपण विचार करू लागलो, तर सापेक्षस्थानाच्या संकल्पनेचे महत्त्व आणखी स्पष्ट करून दाखविता येण्यासारखे आहे. यापूर्वीच संदर्भासाठी आम्ही उद्धृत केलेल्या क्रोबरच्या विधानात तो असे सुचवितो : ऐतिहासिक दृष्टिकोणाचा वेगळेपणा कालखंडांच्या क्रमाचा उहापोह करण्याच्या त्याच्या पद्धतीत नसून, वर्णनरूपाने एकसंघता निर्माण करण्याच्या त्याच्या प्रयत्नात असतो. इतिहास आणि भूगोल या दोहोंचेही प्रयत्न वर्णनरूपाने एकसंघता निर्माण करणे हाच असतो. फरक एवढाच, की इतिहासातील एकसंघतेचा कारक काल हा असतो–म्हणजे सुमारे एकाच स्थळी घडणाऱ्या, पण कालपरत्वे अन्योन्य संबंध असणाऱ्या घटनांचे साहचर्य असते ; तर भूगोलातील एकसंघतेचा कारक स्थान हा असतो–म्हणजे सुमारे एकाच वेळी घडणाऱ्या, पण स्थानविषयक परिभाषेत, अर्थात सापेक्षस्थान दर्शक भाषेत, अन्योन्य संबंध दाखविणाऱ्या घटनांचे साहचर्य असते. इतिहासकार, कमीजास्त प्रमाणात, समकालीन घटनांच्या ऐतिहासिक साहचर्याचाच फक्त विचार करत असतो असे नाही, तर कालदृष्ट्या काहीशा दूरत्वाने विभक्त असलेल्या घटनांचाही तो विचार करतो–उदाहरणार्थ : नेपोलियनच्या युद्धांचा जागतिक युद्धाशी संबंध–त्याच पद्धतीने भूगोलकारही विविध गोष्टींच्या स्थानविषयक संबंधांचा विचार करत असतो. एकाच क्षेत्रात व निकटसाहचर्यात असलेल्या गोष्टींचा तर तो विचार करतोच, पण त्याबरोबरच एकमेकापासून फार दूरवर असणाऱ्या गोष्टींचाही तो विचार करत असतो.–उदाहरणार्थ : न्यूझीलंडमधील दुग्धव्यवसाय क्षेत्र आणि लंडनमधील वाण्याचे दुकान यांचे संबंध.

संबंधयोगांचे शास्त्र या अर्थाची भूगोलाची संकल्पना, एकसंधता संकल्पनेशी जवळीक करत असल्याने, तिचे अनुयायी स्थानविषयक संबंधांना सतत मान्यता देत आले आहेत ; या गोष्टीचे नवल वाटण्याचे कारण नाही. तरीही, त्या दोन संकल्पना एकसारख्या आहेत असे

समजता कामा नये. घटनांची वर्णनात्मक (आणि अर्थ-शोधनात्मक) एकसंधता दाखवणे हाच आपला विषय आहे असे म्हणणे वेगळे, आणि घटनाघटनांमधील एकसंधता दर्शक संबंध शोधून काढणे हा आमचा एक हेतू आहे असे म्हणणे वेगळे !

भूगोलातील नैसर्गिक व सांस्कृतिक घटक या दोहोतील भेद स्पष्ट करण्याची ज्यांना इच्छा असेल, त्यांनी एक गोष्ट समजून घेण्यास हरकत नाही. सापेक्षस्थानाचा कारक, म्हणजेच प्रगतिमार्ग (Locus),–अधिक सुटसुटीत म्हणून हा शब्द सुचवासा वाटतो–हा मूलतः सांस्कृतिक घटक नसून, नैसर्गिक पर्यावरणाचा तो एक निसर्गसिद्ध घटक आहे. मात्र, " वाहातुकीच्या सोयी " किंवा " बाजारपेठांची संपर्कक्षमता " अशा शब्द प्रयोगांनी तो सांस्कृतिक घटक असल्याचे सूचित केले जात असते. उष्ण कटिबंधातील डोंगराळ प्रदेशाच्या संदर्भात, इजिप्तचा प्रगती मार्ग हा नाइल खोऱ्याच्या मृत्तिका आणि नैसर्गिक वनस्पती यांच्या विकासाचा एक प्रमुख कारक होता ; आणि अगदी पहिल्या इतिहास-पूर्व मानवांनी या भूमीवर पाय ठेवण्याच्या कितीतरी पूर्वीपासून तो कार्यशील होता. शक्यता अशी आहे, की तो तसा निसर्गाच्या अधिकारात नव्हता किंवा संस्कृतीच्या अधिकारातही नव्हता ; अशा स्थितीत त्याला ' भूमितिविषयक ' कारक म्हणूनच मान्यता देणे प्राप्त आहे, पण, त्यांच्यापैकी प्रत्येकाचे स्वतंत्ररीतीने आणि त्याबरोबरच त्या प्रदेशाच्या एकूण जटिलाच्या स्वरूपात दिसणाऱ्या त्यांच्या संयोगांचे संयुक्तपणे भौगोलिक अर्थशोधन करण्यासाठी त्या कारकाची सदैव गरज लागतेच.

एकंदरीने खालील गोष्टी आपल्या लक्षात आल्या : प्रदेश हे निसर्गात व सत्यस्थितीत निश्चित करता येत नाहीत. तसेच अनुसंधान कार्यातूनही त्यांचा शोध लागण्याची शक्यता नाही. फक्त त्यांच्या मर्यादा निश्चित करण्यासाठी–म्हणजे सामान्यतः संपूर्ण जगाची प्रादेशिक विभागणी करण्यासाठी–काही आधारभूत गोष्टी शोधण्याचा प्रयत्न करणे एवढेच आपल्यास शक्य आहे. हे शक्य कोटीत कसे आणता येईल याचा विचार पुढील प्रकरणात करण्यात येईल.



## प्रकरण १० वे

# जगाच्या प्रादेशिक विभागणीच्या पद्धती

## अ–प्रादेशिक विभागणीची सैद्धान्तिक तत्त्वे

प्रत्यक्षात अस्तित्व असलेली एकके या अर्थाने प्रदेशविषयक संकल्पनांचे टीकाकार* असा निष्कर्ष काढतात, की शास्त्रीय भूगोलात प्रदेशविषयक संकल्पनेला कोणतेही स्थान देता येणार नाही. एक शतकापूर्वीच, अत्यंत काळजीपूर्वक व चिकित्सकपणे केलेल्या प्रादेशिक संकल्पनेच्या परीक्षणावरून हाच नकारार्थी निष्कर्ष बुशरने काढलेला होता,–तरीही एखाद्या विशिष्ट हेतूने केलेल्या विशिष्ट क्षेत्राच्या विवेचनाला त्याने दरवाजे उघडे ठेवले होते (५१, ९४). काही वर्षांनंतर फ्रयोबेलनेही प्रादेशिक संकल्पनेला शास्त्रायी भूगोलाच्या क्षेत्रापुरते नियमबाह्य ठरविले, पण, भूगोलाच्या शास्त्रविरुद्ध विभागात, बुशरने मान्य केले होते त्यापेक्षा कितीतरी अधिक, महत्त्वाचे स्थान तिच्यासाठी राखून ठेवले, (५६). तसेच, अलीकडेच, प्रादेशिक संकल्पनेच्या आपल्या चिकित्सक टीकेचा शेवट व्हॉलॉकने पुढील विधानाने केला आहे : " जगाच्या पुष्कळशा विभागांच्या बाबतीत प्रादेशिक संश्लेषण हे एखाद्या तर्कसिद्ध कृत्रिम वस्तूपेक्षा, आणि एका नव्या शिक्षणपद्धतीपेक्षा काही वेगळे स्थान आहे, अशी ग्वाही आपण देऊ शकत नाही. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर, एकंदरीने, ती सत्याची धडधडीत विकृती आहे. त्याच्या समर्थनासाठी केवढाही भक्कम युक्तिवाद सादर केला तरी त्यामुळे त्याला कायद्याची प्रतिष्ठा मिळण्याची शक्यता नाही, फारतर, एक पळवाट म्हणून मान्यता मिळेल. " (१८६, १६४).

व्हॉलॉकच्या या विधानाच्या बऱ्याचशा भागाचे समर्थन आपल्या आधीच्या चर्चेने निःसंशयपणे झालेलेच आहे. सर्व अर्थपूर्ण घटक विचारात घेणारी जगाची कोणतीही प्रादेशिक वाटणी, ही सत्यस्थितीचे खरेखुरे चित्र असतच नाही, तर, कमी जास्त प्रमाणात, आपल्या हेतुसिद्धीसाठी सोयीस्कर वाटणारी अभ्यासकाने स्वेच्छेने योजलेली एक युक्ती असते–आणि म्हणूनच, त्याला जे घटक अधिक महत्त्वाचे वाटतात त्यावर ती अवलंबून असल्यामुळे ती अभ्यासकागणिक बदलत जाणारी असते. अगदी उघड वाटणारी जगाची खंडस्वरूप वाटणीही हवामानाच्या प्रादेशिक अखंडपणाला व मानवीभूगोलाच्या अनेक अंगांना बाध आणणारी आहे. इतर काही भूगोलकारांप्रमाणे बान्झेनेही या रूढ विभागणीच्या असत्य–स्वरूपावर भर दिला आहे. पण, कोणत्याही अन्यप्रकारच्या प्रभावक्षेत्रामध्ये जगाची विभागणी केली तरी प्रादेशिक सलगतेला कोणत्या ना कोणत्याप्रकारे बाध येणारच असते,

* पुरवणी टीप ३९ पहा.

ही गोष्ट त्याने लक्षात घेतली नाही, हे उघड आहे. (हेटनर १५२, ५४ : c/o ग्राफ १५६, ११३ ते १८). यापूर्वी आपण केलेल्या चर्चेवरून असे दिसले, की केवळ यापेक्षा लहान एककांत पोट विभाग पाडल्याने हा प्रश्न सुटणार नाही, ही गोष्ट प्रात्यक्षिकाने सिद्ध करण्याची आवश्यकता नाही. कारण, अशी पोट विभागणी असंख्यवेळा केल्यानंतर आपण त्या विशिष्ट स्थळावर येऊन पोहोचू हे खरे ; पण ते स्थळ म्हणजे सुद्धा एक शुद्ध अमूर्त कल्पनाच असते !

" तथापि, प्रादेशिक भूगोलाच्या क्रमबंधाचे चिरकालविसित बालक असे दणकट झाले की, आंघोळीच्या पाण्याबरोबर त्याला सहज फेकून देणे शक्य झाले नाही ; कारण काही उपपत्तीकारांनी काही गूढ गुण त्याला चिकटविले असले तरी ते भाकित आता चुकीचे असल्याचे आढळून आले आहे. " तसेच, प्रादेशिक भूगोलाची शास्त्रीय क्षेत्रातून हकालपट्टी करण्यास हरकत नाही या लायलीच्या धमकीलाही (२२०, २२२), प्लाट (२२१) व फिंच (२२३) यांनी चोख उत्तर दिले आहे. प्रदेश या अभिजात एकक सत्यस्थिती असोत अगर नसोत, विविध क्षेत्रीय विभागानुसार, किंवा प्रदेशानुसार, बदलत जाणारी अन्योन्यसंबंधांतील जटिले भूपृष्ठाच्या रूपांतूनच साकार झालेली आहेत याबद्दल, आणि कोणत्याही एका प्रदेशातील घटना त्याच प्रदेशातील विशिष्ट जटिलाने बऱ्याच अंशी निश्चित केलेल्या असतात याबद्दल, कोणीही शंका घेण्याचे धाडस करणार नाही. एवंगुण विशिष्ट अर्थाने, आपणही फींचच्या सुरात सूर मिसळून असे म्हणू शकतो : " या पहा, आपल्याभोवती सर्वत्र पसरलेल्या सत्यस्थिती ! खुशाल करा त्यांचा अभ्यास. " समोर दिसणाऱ्या जगाचे वस्तुनिष्ठ ज्ञान मिळविण्याची ज्याला अभिरूची असेल त्याने " विद्वान लोक आपल्याला वाळीत टाकतील " या काल्पनिक भीतीने त्यातील घटनांचा साकल्याने अभ्यास करण्याचे भीमकर्म टाळण्याचा प्रयत्न करता कामा नये (२२३, ९, ६.).

बुशर व फ्र्योबेल यांनी एका शतकापूर्वी केलेल्या विधानांतून ज्या आणि जितक्या गोष्टी सूचित केलेल्या आहेत त्या आणि तितक्याच अलिखित गृहित गोष्टी शास्त्राच्या स्वरूपाविषयीच्या या व्हॉलॉकच्या विधानातही अंतर्भूत आहेत. जाताजाता येथे त्यांच्यावरील आक्षेप उपस्थित करण्यास हरकत दिसत नाही. सत्यस्थितींचा अभ्यास करण्याऱ्या कोणत्याही शास्त्रांना,–अर्थात शुद्धगणितशास्त्रापेक्षा वेगळया प्रकारच्या शास्त्रांना–कितीही अल्प प्रमाणात असो, सत्यस्थिती विकृत रूपात पुढे मांडणाऱ्या संकल्पनांचा उपयोग करणेच भाग पडते. सत्यस्थितीतील अनाकलनीय जटिलतेला आकलनीय क्रमबंधांचे स्वरूप देणे आवश्यक असल्यामुळे सत्याला असे विकृत रूप देणे प्राप्तच होऊन बसते ; आणि म्हणूनच त्यांना, केवळ पळवाट म्हणून नव्हे तर, कायद्याने मान्यताही द्यावी लागते. मात्र, आपल्या या संकल्पना सत्यस्थितीच्या अंदाजाने व स्वेच्छेने केलेल्या विकृती आहेत याची कबुली देण्याची नित्य तयारी पाहिजे ; आणि शास्त्राची या अभ्यासकांकडून एवढीच अपेक्षा असते.

शरीररचनाशास्त्र व शरीरकार्यशास्त्र यांच्या भूगोलाशी असलेल्या साम्याचा उपयोग करून, बुशरने आपला निष्कर्ष काढला (५१, ९१). जेव्हा एखादा जीवशास्त्रज्ञ मानवी शरीराचा अभ्यास करतो, तेव्हा त्वचा, रक्तवाहिन्या, नसा, स्नायू इत्यादी गोष्टींच्या संदर्भात त्यांच्या कोणत्या एका भागाचा तो अभ्यास करत नाही, तर संपूर्ण शरीरभर पसरलेल्या या गोष्टींचा क्रमबंधात्मक अभ्यास तो करत असतो, असा बुशरचा दावा आहे. हे निःसंशयपणे खरे असले, तरीही मानवी शरीरशास्त्राच्या त्या अभ्यासकाला नंतरच्या टप्प्यात, मानवी हातात, आणि त्याच्या विरोधाने मांडीत, हेच घटक ज्या विशिष्ट स्वरूपात एकवटलेले असतात ते स्वरूप, रचना व कार्य यांच्या परिभाषेत, जाणून व समजून घेण्याचा प्रयत्न करणे आवश्यक असते, हेही तितकेच खरे आहे. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर, शरीरातील विविध प्रकारच्या गोष्टींच्या क्रमबंधात्मक ज्ञानापेक्षा काही अधिक ज्ञान, म्हणजेच वेगवेगळ्या अवयवांतील या सर्व गोष्टींच्या एकाकार रचनेचे अचूक ज्ञान, त्याला असणे आवश्यक आहे. ते कसेही असो, हे साम्य फार ताणावयाचे नसते. जेवढ्या बाबतीत या दोन गोष्टी–पृथ्वी व मानवी शरीर–प्रत्यक्ष साम्य दाखवितात, तेवढ्या पुरताच या रूपकाचा उपयोग केला जावा. बुशरने या गोष्टीची दखल शास्त्रीय दृष्टीच्या वैशिष्ट्यपूर्ण सावधानतेने घेतली आहे. येथे त्यांच्यातील दोन प्रमुख भेद आपण लक्षात घेण्यास हरकत नाही. त्यांपैकी एक असा : भूगोलात आपल्याला एकाच वस्तूचा अभ्यास करावयाचा असतो, तर शरीर शास्त्रज्ञाला लक्षावधी वस्तूंचा अभ्यास करता येतो. यापेक्षा दुसरा भेद अधिक महत्त्वाचा आहे. पृथ्वी ही सावयव वस्तू नाही. भूपृष्ठावरील भेदाभेद जरी लक्षात भरण्याइतके स्पष्ट असले, तरी फार मोठ्या प्रमाणात भेद व्यक्त करणाऱ्या क्षेत्रीय विभागांची तुलना मानवी शरीराशी करता येण्यासारखी एकसंघ यंत्रणा तेथे निर्माण झालेली असत नाही. एका प्रदेशातील घटकांचे दुसऱ्या प्रदेशातील घटकांशी असलेले संबंध ही अशी एक महत्त्वाची घटना आहे, की कोणत्याही एका क्षेत्राचा एक स्वतंत्र अथवा बंदिस्त एकक म्हणून विचार करत असताना त्याची आडकाठी होते. या पूर्वीच्या चर्चेतही आम्ही या गोष्टीचे आग्रहपूर्वक प्रतिपादन केलेले असले तरीही हे संबंध मानवी शरीरातील तत्समान संबंधांपेक्षा कितीतरी कमी प्रमाणात असतात, ही गोष्ट उघड आहे.–उदाहरणार्थ मज्जासंस्था, रक्ताभिसरण संस्था, पचनसंस्था इत्यादि क्रमबंध. भूपृष्ठाचा कोणताही एक भाग तेवढ्यापुरताच अभ्यासून तो पूर्णपणे समजून घेता येणार नाही, तरीही फार मोठ्या प्रमाणात तो अंतर्गत परिस्थितीतूनच निर्माण झालेला असतो ; आणि म्हणूनच मानवी हातापेक्षा कितीतरी अधिक प्रमाणात त्याच्याच अभ्यासावर लक्ष केंद्रित करण्याची आमची कल्पना समर्थनीय ठरते.

" प्रादेशिक भूगोलाचे शास्त्र " ही गोष्ट अशक्य कोटीतील आहे असा दावा करणारा कोणताही युक्तिवाद, कोणत्याही परिस्थितीत, आमचा बुद्धिभेद करू शकणार नाही. अशा प्रकारचा निष्कर्ष ' शास्त्र ' या शब्दाच्या विशिष्ट अर्थावर आधारलेला असतो, हे निश्चित. तरीही तो अर्थ प्रादेशिक भूगोलाची गरज नष्ट करू शकणार नाही, मग त्याला

तुम्ही कोणतेही नाव द्या. भूगोलाला शास्त्र म्हणा अगर न म्हणा, त्याचे अस्तित्व अबाधितच आहे ; आणि हेच प्रादेशिक भूगोलाच्या बाबतीतही खरे आहे, असे म्हणता येईल. ' शास्त्रा ' च्या काही अटी पूर्ण करण्यासाठी भूगोलाचे प्रत्यक्ष स्वरूप बदलण्याची वेळ आली, तर अशा मोठ्या पदव्यांसाठी केलेला दावा आम्ही ताबडतोब सोडून देऊ ; पण आमच्या विषयाचे मूलभूत स्वरूप बदलण्यास कधीच तयार होणार नाही. सुरूवातीलाच आपण पाहिले त्याप्रमाणे, एक अभ्यासक्षेत्र या नात्याने भूगोलाचे अस्तित्वच निरनिराळ्या स्वरूपांतील जगाच्या निरनिराळ्या विभागांविषयी असणाऱ्या मानवाच्या सर्वसामान्य अभिरूचीवर आधारलेले आहे. माणसाची ही अभिरूची एका विशिष्ट घटकाच्या क्रमबद्ध वर्गीकरणाबद्दल असेल, अथवा जगाच्या निरनिराळ्या विभागांनुसार बदलत जाणाऱ्या या घटकांच्या कोणत्या एका विशिष्ट गटाबद्दल असू शकेल. जगाच्या विविध भागांतील नैसर्गिक, अमानव, घटकां-घटकांच्या गटांच्या नैसर्गिक रचनेचा अभ्यास करणे कोणाला इष्ट वाटेल, तर काहींना जगाच्या वेगवेगळ्या भागांच्या साहचर्यात असलेल्या मानवी, सांस्कृतिक, घटकांच्या एकूण गटाचा अभ्यास करावासा वाटेल. व्हॉलॉकच्या मते, अभ्यासांची ही दुहेरी व्यवस्था या दोन गटांतील सुसंवादाच्या अभावामुळे आवश्यकच होऊन बसली आहे–कारण, आपल्या हेकेखोरपणामुळे, मानव आपल्या पर्यावरणाशी जुळते घेण्यास नकार देत आला आहे– डब्ल्यू. एम्. डेव्हिस यांनी पूर्वी वापरलेल्या रूपकाचा उपयोग करून (२०३), असे म्हणता येईल, की हे दुटप्पी क्रमबंध दूरध्वनीने एकत्र जोडले, तरी, ज्यावर भूगोलक्षेत्र आधारलेले आहे त्या अभिरूचीचे समाधान त्याने होणारच नाही. त्यामुळेच तर, दुसऱ्या कोणत्याही भागांच्या तुलनेने एखाद्या विशिष्ट भागाचा वेगळेपणा व्यक्त करणाऱ्या सर्वरूपधेयांचे वर्णन व स्पष्टीकरण करण्याची आम्हाला अंतःस्फूर्ती होऊ लागली ; तशी ती जगभर पसरलेल्या या दोन स्वतंत्र घटकसंचांसंबंधी झाली नाही. क्षेत्रांच्या संदर्भात या घटनांमध्ये होत जाणारे बदल सुसंवादी नसूनही, क्षेत्रांक्षेत्रांतून आढळणाऱ्या विविध प्रकारच्या घटनांचे एकसंधीकरण करण्याचे हे अवघड भीमकार्य–अवघड कसले, अशक्य कार्य–सुरूवातीपासूनच भूगोलाने स्वेच्छेने. अंगिकारलेले आहे. भूगोलाचीही जबाबदारी एकदा आपण मान्य केल्यावर, त्यात कितीही अडचणी आल्या व कोणतेही आक्षेप घेतले गेले, तरी बुद्धिभेद झाल्यामुळे आपण आपल्या महत्कार्यापासून विचलित होण्याची शक्यता नाही. (c/o लाउटेनझाक २७८, १२).

तसेच, शास्त्राची शाखा असो वा नसो, पण एक ज्ञानशाखा म्हणून प्रादेशिक भूगोलाचा विकास करण्याचे भीमकार्य ज्यांनी ज्यांनी एकदा अंगिकारले त्यांनी त्यांनी ते धीरोदात्तपणे स्वीकारले पाहिजे. अर्थातच, ते तसे गंभीरपणे अंगावर घेणे शक्यच होणार नाही असे सुचविणाऱ्या सल्लागारांकडे त्यांनी कमीत कमी लक्ष दिले पाहिजे, किंवा मुळीच लक्ष देता कामा नये. कोणत्याही दिशेने त्या होवोत, नकारात्मक टीकांचा विचार हा झालाच पाहिजे. पण, प्रदेश कसे निश्चित केले या गोष्टीला महत्त्व देण्याचे कारण नाही, राजकीय विभाग " सर्वसामान्यपणे समाधानकारक " असतात हे सिद्धच आहे ; या व अशाप्रकारचे प्रस्ताव, ते मांडणाऱ्या सल्लागारांना आपल्या विषयाबद्दल मुळीच आस्था नसते, इतकेच नव्हे, काही केले तरी त्यामुळे कोणाचेच समाधान होणार नाही अशी त्यांची खात्री असते, एवढेच सूचित करतात.

निरनिराळ्या स्थानांच्या एकूण घटनाजटिलांतून परिणत होणारे जगाच्या विभागाविभागांतील फरक समजून घेण्याचा प्रयत्न करणे हाच प्रादेशिक भूगोलाचा धंदा आहे, असे आपण गृहीत धरू या. अर्थातच, विशिष्ट क्षेत्रातील या संपूर्ण जटिलांचा अभ्यास करणे आपणास प्राप्त आहे. एकूण भूपृष्ठाची क्रमबद्ध व संघटित मांडणी प्रादेशिक अभ्यासात करावयाची झाली, तर जगाची विभागणी विविध प्रदेशांत करण्यासाठी काही आधार असणे आवश्यकच आहे. शक्यतेच्या कोटीतील कोणतेही आधार घेऊन पाडलेले विभाग आपल्यास अभ्यासासाठी घेता येतात–उदाहरणार्थ राजकीय विभाग–आणि सत्यस्थितीतील अभ्यासासाठी निवडता येतील अशी प्रत्यक्ष एकके नाहीत, ही गोष्टही यापूर्वीच आपण पाहिलेली आहे. पण, या दोन टोकांशिवाय सुवर्णमध्य साधणारा तिसरा पर्यायच नाही, असे अनुमान यावरून निघत नाही. अनुभवाने असे दाखवून दिले आहे की, विभागणीच्या काही आधारभूत कल्पना निश्चित केल्याच, तर त्यामुळे प्रादेशिक अभ्यासाची ही समस्या अधिकच अडचणी निर्माण करणारी, अप्रशस्त पुनरावृत्ती करणारी, आणि नव्या संकल्पनांची खच्ची करणारी अशी बनते. गौण राजकीय एककांचा उपयोग करण्याच्या प्रयत्नांची ही अवस्था होते ही गोष्ट गाटेरर–रिटर यांच्याही आधीच्या ग्रंथकारांच्या रूढीनिष्ठ प्रबंधांवरून प्रकर्षाने सिद्ध झालेली आहे [आणि त्याचे आणखी एक, पण नंतरचे उदाहरण पेरू-आदि प्रदेशांसंबंधीच्या प्र्योबेलकृत " उपद्व्यापा " वरूनही मिळते (९३)], इतकेच नव्हे तर, राज्यांच्या " डब्यू. पी. ए. योजने " खाली प्रसिद्ध झालेल्या राज्य मार्गदर्शक पुस्तिकांवरून, दुर्दैवाने आजही पुन्हा, त्याचेच प्रात्यक्षिक होते आहे.

" प्रादेशिक भूगोलाच्या अनुसंधान कार्यात जगाची अथवा त्याच्या कोणत्याही भागाची निरनिराळ्या प्रतीच्या आकारांच्या प्रदेशात विभागणी करण्याच्या प्रयत्नांना अग्रस्थान प्राप्त होते, " (Länder, Landschaften, Örtlichkeiten etc.) देश, प्रदेश, स्थळे इ. (१७९, १७३). या त्याच्या विधानाबाबत मौलशी आपले एकमत होऊ शकते. प्रत्यक्ष अस्तित्वात असणारे प्रदेश शोधून काढण्याचा खटाटोप आम्ही करत नाही, तर जगाची प्रादेशिक विभागणी करण्याची एखादी बुद्धिजन्य उपयुक्त पद्धती शोधून काढण्याचा प्रयत्न आम्ही निश्चितच करत आहोत. म्हणूनच, हेटनरने ज्यांचा विचार १९०८ इतक्या पूर्वी केला आहे त्याचीच, म्हणजे " भूपृष्ठाच्या विभागणीची तत्त्वे " या विषयाची आपण गंभीरपणाने दखल घेतली पाहिजे (३०० ; c/o ग्रान्यो २५२, ४८, १३९ ; अल्मागा १८८, १९ ते २१).

मग, ही समस्या सुटण्याची काही आशा आहे का ? आदर्शदृष्ट्या पाहिले तर, पृथ्वीवरील प्रत्येक विशेष स्थळांच्या सर्वमान्य व्यक्तित्वाशी भूगोलाभ्यासकाचा संबंध असतोच, असे आपण म्हणू शकतो. म्हणूनच, कितीही बारीकसारीक स्थळांचा त्याने अभ्यास केला तरी तो समर्थनीयच ठरेल. शक्यतेच्या कोटीतील ही स्थलसंख्या अनंत असल्याने, स्थलमहात्म्याची काही कसोटी वापरणे आवश्यक होते. काही स्थळे जगाच्या बऱ्याच मोठ्या भागांशी असलेल्या त्यांच्या संबंधामुळे इतकी अर्थपूर्ण झालेली असतात की त्यांच्याकडे

वैयक्तिक लक्ष पुरविणे आवश्यकच होते–उदाहरणार्थ : जिब्राल्टरचा खडक, शिकागो नदीचे मुख, किंवा लंडन पूल. दुसरी काही, त्यांच्यापुरती कमी महत्त्वाची असली तरी, त्यांच्या सान्निध्यातील पुष्कळशा विस्तृत क्षेत्रातील नमुनेदार स्थळे, अर्थात मर्यादित अर्थाने, या नात्याने त्यांचाही अभ्यास करणे समर्थनीय ठरते–उदाहरणार्थ : फ्रेंच आल्प्स मधील इजरनदीची दरी (३३१), पनामाच्या आन्तोन प्रान्तातील एकमेव हासिंडा (hacienda) (२२१), किंवा मका क्षेत्रातील प्रिन्सटन वसाहत (३४१). ही विशिष्ट स्थळे त्या त्या प्रदेशातील नमुनेदार ठिकाणे आहेत का, या प्रश्नावर फारसा खल करत बसण्याची आपणास येथे गरज नाही. फ्रान्समधील आल्पस् पर्वतातील दऱ्यांच्या स्वरूपात उघडपणे दिसणारे साम्यगुण आहेत, याच्या विरूद्ध उदाहरण शेवाने किंवा टिरोल दऱ्यांचे देता येईल–या कारणानेच त्यांचे एक अगर अनेक प्रकारांत वर्गीकरण करता येईल, असे गृहीत धरले तर ते समर्थनीयच ठरेल ; आणि गटांचे व नमुन्यांचे स्वरूप निश्चित करणे ही एतद्विषयक अनुसंधान कार्याची एक समस्या ठरेल (प्रकरण ११-' ह ' पहा).

भूपृष्ठाच्या एखाद्या विशिष्ट बृहत्तर क्षेत्रात एक अगर अनेक नमुन्यांच्या लहान क्षेत्रांचा बऱ्याच प्रमाणात समावेश होऊ शकतो, पण संलग्न क्षेत्रे मात्र त्याबाबतीत वेगळ्या स्वरूपाची असतात असे आपल्यास जेथे आढळून येते, तेथे त्या बृहत्तर क्षेत्राच्या, म्हणजेच प्रदेशाच्या स्वरूपाचे आकलन त्या क्षेत्राचा साकल्याने अभ्यास केल्यानेही होऊ शकते (एकमेव दरीसारख्या लहान एककाचा विचार करत असतानाही संश्लेषण पद्धतीचा अंशतः उपयोग प्रत्यक्षात या पूर्वीही केला गेला आहे). प्रत्यक्ष परिस्थितीत वनस्पतींच्या विविध जाती एकमेकापासून जितक्या प्रमाणात भिन्नरूप असतात, तितकी, ही नमुनाक्षेत्रे स्पष्टपणे भिन्न असत नाहीत ; उलट, एकाच प्रजातीतील वनस्पती जितके सरूप असतात तितके हे भाग सरूपही असत नाहीत. त्यामुळेच, अशा आधारावर विभक्त केलेले हे प्रदेश आपल्यापुरते सरूप असणार नाहीत की एकमेकापासून भिन्न असणार नाहीत. अनेक वेगवेगळ्या घटकांच्या बाबतीत ते एकमेकांशी मिसळून जाण्याची शक्यता आहे, तर दुसऱ्या काही घटकांच्या बाबतीत ते एकमेकांवर संक्रमण करण्याचीही शक्यता आहे. आपल्या कल्पनाशक्तीला आकलन न होण्यासारखी ही प्रत्यक्ष परिस्थिती गुंतागुतीची असल्यामुळे–ती इतरांना समजून सांगण्याचा विचारही आमच्या मनात येण्याची शक्यता नाही–अभ्यासासाठी घेतलेल्या या प्रदेशांना काहीशा निश्चित स्वरूपाच्या सीमा काहीशा स्वेच्छेनेच आखून देऊन ही प्रत्यक्ष स्थिती नाईलाजाने सुलभ करावीच लागते. पण, तसे करताना, या मर्यादारेषाच काय पण प्रत्यक्ष ते प्रदेश देखील, प्रत्यक्षातील गुंतागुंतीचे आकलन करून घेण्याच्या कार्यासाठी मान्य केलेली एक मूलतः सुलभ-पद्धती आहे (वस्तूस्थिती नव्हे) या गोष्टीचा विसर पडू देता कामा नये.

सत्यास्थितीचे अशा प्रकारचे सुलभीकरण, आणि अर्थातच विकृतीकरण, ही फक्त भूगोलात घडणारी घटना आहे, असे नाही. अन्य शास्त्रीय क्षेत्रांतूनही अशी स्वैर विभागणीपद्धती सामान्यतः वापरलेली असतेच. वनस्पतीशास्त्रातील जातींची विभागणी, काही भागात तरी, स्वैरपणेच केलेली असते ; आणि प्राचीन प्राणिशास्त्रात (Paleontology) ती तशी असतेच असते ![८४] त्याच्यापेक्षाही, भूशास्त्रज्ञाने केलेली खडकांच्या थरांची व खडकांच्या प्रकारांची विभागणी आणखीच स्वैर असते. अर्थातच, सर्वात स्पष्ट दिसणारे साम्य इतिहासाशी आहे. एका विशिष्ट पण अनिश्चितपणे मर्यादित केलेल्या, कालविस्ताराला इतिहास-अभ्यासकाने मान्यता दिलीच पाहिजे–उदाहरणार्थ : युरोपच्या इतिहासातील ' सुधारणांचा कालखंड ', आणि जोपर्यंत एक स्वतंत्र व विभक्त एकक या नात्याने–म्हणजेच, त्याच्या आधीच्या व नंतरच्या कालखंडांशी संबंध ठेवणारे स्वयंपूर्ण एकक या नात्याने–त्याचा स्वतंत्र विचार केला जात नाही, तोपर्यंत या युक्तीचा वापर करण्याविरूद्ध कोणीही आक्षेप घेत नाही.

जगाचे हे विभाग वस्तूंच्या सहजस्वरूपांतून स्पष्टपणे सूचित झालेले असत नाहीत. म्हणूनच, त्यांना गृहीत–वस्तूस्थिती मानून त्यांच्यापासून अभ्यासाची सुरूवात करणेही शक्य होत नाही ; किंवा केवळ सखोल व व्यापक निरीक्षणाने शोधून काढण्याची आशा करण्यासारख्या वस्तुस्थितीही त्या असत नाहीत. भौगोलिक प्रदेशांच्या आपण केलेल्या अभ्यासाने आधीच सूचित केलेल्या या सर्व गोष्टींवर इतिहासाशी केलेल्या वरील तुलनेने आणखीच भर दिल्यासारखा दिसतो. विपरीत सूक्ष्मदर्शकातून जगाचे परीक्षण करून शेवटी आपणास एक स्वतंत्र बंदिस्त स्थळ हाती लागेल आणि मग ती सर्व एकके एकत्र मांडून एक संपूर्ण वस्तू होईल असे म्हणावे, तर अशा प्रकारच्या शक्यतेची आशा करण्यासही अवसर नाही. एक गोष्ट अगदी स्पष्ट होत जाते की, आम्ही सगळे मिळून एकाच बंदिस्त स्थळाचे परीक्षण करणार आहोत ; आणि एखाद्या जीवपेशीत खासकरून आढळते तितकेही सापेक्ष प्रमाणात असणारे विभागांचे विभाजन या स्थळाच्या विभागात असत नाही.

मग, या अंतस्थ गुंतागुंतीच्या व अविभाज्य जगाचे भाग आपण कोणत्या आधारावर पाडू शकणार आहोत ? एक गोष्ट उघड दिसते. या समस्येच्या एखाद्या सोप्या दिसणाऱ्या उकलपद्धतीवर, सुरूवातीपासूनच ; अविश्वास दाखविण्यास हरकत नाही. विभागणीची एखादी सत्य-पद्धती शोधण्याचा आपण प्रयत्न करणार नाही, कारण, तशी ती असणेच शक्य नाही. पण, एखादी, कमीजास्तप्रमाणात, समुचित पद्धती शोधण्याच्या प्रयत्नात आपण आहोत. शक्यतेच्या कोटीतील कोणत्याही पद्धतीने ही विभागणी केलेली असली, तरी ते भाग एका अर्थी " स्वैरपणे निवडलेले भूमिखंड " च असणार. मात्र, दुसऱ्या एका अर्थाने,

---

८४. पण ग्राफ व अन्य काही लेखकांनी वापरली तशी, ही तुलना येथे वापरणे, आणि त्याच्या आधारे प्राणिशास्त्रातील विभागांइतक्याच सुव्याख्यात अभ्यास वस्तू, अर्थात प्रदेश, भूगोलक्षेत्रातही आहेत असा दावा करणे, हे तर्कशास्त्राच्या विरूद्ध आहे (१५६, ८३). प्राणिशास्त्रांतील मूर्त अभ्यासवस्तू त्यांच्या जाति या नसून वेगवेगळ्या वनस्पती व प्राणी या आहेत.

आमची ही विभागणी स्वैर नसते ; कारण, सातत्यांने कृतीत उतरविल्या जाणाऱ्या समर्पक तत्त्वांवर आमची विभागणी आधारलेली असेल, तर ती शास्त्राच्या सर्वसामान्य अटी पूर्ण करू शकेल. नेमकी कोणती तत्त्वे समर्पक आहेत, हे ती विभागणी कोणत्या हेतुसिद्धीसाठी केलेली आहे यावर, म्हणजेच जगाच्या वेगवेगळ्या क्षेत्रांचे स्वरूप समजून घेणे या हेतूवर, अवलंबून रहाते. पण हे विभाग निसर्गतःच इतक्या गुंतागुंतीचे आहेत की, जगाचे कोणतेही एक पर्यवेक्षण केले, तर त्यात त्याच्या सर्व अंगांना, केवळ रूपरेषेपुरतेही, योग्य ते स्थान देता येणार नाही. यावरून असे अनुमान निघते की, प्रादेशिक विभागणीची आधार तत्त्वे विविध असू शकतील, आणि त्यापैकी प्रत्येक, कमीजास्त प्रमाणात, विविध भौगोलिक हेतूंच्या सिद्धीसाठी उपयुक्त असू शकेल. बोमन म्हणतो त्याप्रमाणे : " काल, अवकाश व कार्य, या सारख्या चलांवर अवलंबून असणाऱ्या कोणत्याच वर्गीकरणाने एक वाक्यता व एकरूपता ही ध्येये साध्य होणार नाहीत, इतकेच नव्हे, ती इष्टही नाहीत " (१०६, १४४ ; c/o फिंच २२३).

त्याचप्रमाणे, प्रदेश निश्चित करण्याकरता कोणत्या कसोट्यांची निवड करावयाची, या प्रश्नाचे उत्तरही निसर्गाकडून मिळत नसते, असे हेटनर सांगतो. " भूगोलकारानेच ही निवड त्यांच्या महत्त्वासंबंधीच्या त्याच्या वैयक्तिक निर्णयानुसार करावयाची असते. परिणाम असा होईल की, या प्रादेशिक विभागणीबाबत खरी अथवा खोटी विभागणी अशी टीका कोणीच करू शकणार नाही ; फार तर, सहेतुक अथवा अहेतुक विभागणी असा शेरा त्यावर ते मारू शकतील. सर्व घटनांना सारखाच न्याय देणारी, सर्वतोपरी समर्थनीय अशी विभागणीच असत नाही. शक्यतोवर जास्तीतजास्त उपकारक आणि कमीतकमी अपकारक अशी विभागणी स्वीकारण्याचा प्रयत्न करणे येवढेच आपल्या हाती आहे " (१६१, ३१६). [८५]

एका मुद्यावर मात्र संपूर्ण एक वाक्यता असल्याचे दिसते. भूगोलकाराची अभ्यासावयाची इच्छा आहे असा एखादा विशिष्ट प्रदेश मर्यादाबद्ध करण्याची पद्धत शोधणे एवढा एकच आमचा हेतू नाही. असंख्यबाबतीत संपूर्ण जग हेच एक एकक असल्याने, तिच्या सहाय्याने जगाची विभागणी प्रदेशात करता येईल अशी एक पद्धती शोधण्याच्या विचारात आम्ही आहोत किंवा दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर, आम्हाला असे सर्व प्रदेश एका जागतिक क्रमबंधात जोडून द्यावयाचे आहेत. मग पहिला प्रश्न असा उभा रहातो की, या दोन कार्यपद्धतीपैकी कोणाच्यामागे आम्ही प्रथम लागावे ?

---

८५. हा दृष्टिकोण हेटनरने प्रथम १९०८ मध्ये विधानरूपाने मांडला (३००, १०७), आणि उन्स्टेडसह अनेकांच्या लिखाणांतून त्याचे प्रतिसाद उमटले (३०९, १७६). ग्राफने प्रतिपादन केलेले याच्या विरोधी मत " अंतिम (absolute) सत्याची शक्यता गृहीत धरणाऱ्या आदर्शवादी " तत्त्वज्ञानविषयक संकल्पनेवर आधारलेले आहे ; म्हणजे त्यांनुसार, भूपृष्ठाच्या विभागणीत " एकच भौगोलिक सत्य " असले पाहिजे (१५६, ११४).

एकूण जगाच्या विवेचनाने सुरूवात करून, मग जगाचे प्रभावक्षेत्र, प्रदेश, प्रांत आणि परिसरासहित स्थळ असे भाग पाडावे का ? कारण क्रमबद्ध (सामान्य) भूगोलाच्या सर्व शाखांच्या अभ्यासाने आम्हाला जगाचा चांगलाच परिचय झाला आहे. ही पद्धती जीवविषयक शास्त्रांनी अवलंबिलेली आहे असे दिसून येईल–उदाहरणार्थ : जीवनवृक्षाच्या प्रति, जाति, प्रजाति इत्यादि शाखा. पण हेटनर असे दाखवून देतो, त्या क्षेत्रातून वापरलेली पद्धती प्रत्यक्षात उलटीच असते. म्हणजेच, एकेका स्वतंत्र नमुन्याच्या लक्षणांचा अभ्यास करून, त्यांतील सजातीयांची एक प्रजाति, अशा अनेक प्रजातींची एक जाति इत्यादि रचना करावयाची ; आणि मग या निष्कर्षाची त्या वर्गीकरणाच्या संपूर्ण क्रमबंधावरून चाचणी घ्यावयाची. पण, भूगोलातील विविध प्रकारच्या क्षेत्रांचे परस्परांशी व एकूण जगाशी जे संबंध असतात त्यांचा असा एखादा सोपासा–म्हणजे प्रजातिपासून जीवनवृक्षापर्यंत होतो तसा–आकृतिबंध तयार होत नाही. म्हणूनच, भूगोलाभ्यासकांना त्या विशिष्ट क्षेत्राच्या लक्षणांच्या अंतर्बाह्य संशोधनाने सुरूवात करून, त्यावेळी लक्षात भरणाऱ्या त्यांतील केवळ साम्य व विरोधांच्या आधारावरच त्यांच्या प्रादेशिक विभागणीचा पाया रचावा लागतो. हंबोल्टला त्या संबंधाने जर भौगोलिक संकल्पना दक्षिण अमेरिका खंडाचे पोटविभाग पाडत असताना सुचलेली नाही, तर त्या प्रदेशातील सजातीयतेने आकलन झाल्यामुळेच ती सुचली (१६१, ३०७).

ज्यांची कोणत्याही प्रकारे तुलना करणे शक्य होईल अशा विविध प्रदेशांत जगाची वाटणी करण्यास फक्त विश्लेषण पद्धतीची मदत पुरेशी पडत नाही. ज्याच्याशी स्वतंत्र प्रदेशांच्या अभ्यासांचा कोणत्यातरी प्रकारे संबंध जोडता येईल असा एक सर्वसामान्य विभागणीचा क्रमबंध हाती असणे आवश्यक आहे (c/o हॉल २९०, १२७). आगमप्रमेयात्मक विवेचनाने, आढळत आलेल्या प्रदेशांचे तौलनिक परीक्षण करणे शक्य झाले पाहिजे ; तसे त्यांच्या विकासाचे साधन असलेल्या आधार-तत्त्वांचे प्रतिबोधनही झाले पाहिजे. फक्त अशाच आधारावर आगमप्रमेयांना प्रत्यक्ष समस्येच्या दिशेने वाटचाल करणे शक्य होईल, आणि एकूण पृथ्वीच्या स्वरूपाचा आधार घेऊन भूपृष्ठाच्या विभागणीचे कार्य हाती घेता येईल. अर्थातच, या दोन पद्धतींनी एकमेकांचा सतत पाठपुरावा करत राहिले पाहिजे (१६१, ३०७ f).

त्याचप्रमाणे कोणत्याही पातळीवर प्रादेशिक विभाग निश्चित करत असताना, मोठ्या एककांची लहानात विभागणी करत जाणे बरे, का लहानांचे गट करून त्यातून मोठी एकके करणे बरे ? पहिल्या पद्धतीचे उदाहरण मौलच्या वर उल्लेखिलेल्या सीमापट्टीपद्धतीचे देता येईल. पूर्वीच, म्हणजे १९१५ मध्ये, बाल्कन देशांच्या एका भागाची प्रदेशात विभागणी करण्यासाठी, त्याने या पद्धतीचा उपयोग केला, आणि अन्य उदाहरणांनी त्याने तिची

उपयुक्तता पटवूनही दिली (१५७ ; १७९). ही पद्धती पूर्णपणे वस्तुनिष्ठ नाही ही येथे सांगण्याची गरजच नाही. त्यात विविध हद्दींमुळे तयार होणाऱ्या एका रूंदशा–आणि अनेकदा फारच विस्तृत–पट्ट्याचे रूपांतर एका सीमारेषेत करताना व्यक्तिगत निर्णय तर घ्यावा लागतोच शिवाय प्रमुख कारके व गौण कारके असा भेद मान्य करावयास, बळेबळेच, तो आपल्याला भाग पाडतो. लाउटेनझाकने टीका केल्याप्रमाणे, त्या सर्व हद्दींची भौमितिक सरासरी काढणे कोणालाच शक्य होणार नाही (२६३). आपले कार्य स्वतंत्रपणे करणाऱ्या ग्रान्योने अगदी असाच क्रमबंध वापरला आहे. त्यात तो आपल्या कार्यपद्धतीचे, स्वयंनिर्मितच पण निश्चित अर्थाचे, नियम घालून देण्याचाही प्रयत्न करतो (२५२). थोड्याशा निराळ्या प्रकारे, यापूर्वीच पासार्जने या दिशेने कार्य केले होते. निरनिराळ्या रूपधेयांचे पारदर्शक नकाशे एकमेकावर ठेवून, त्या आधारावर त्या प्रदेशाचे विभाग पाडण्याच्या त्याने प्रयत्न केला.

पण, अलीकडे ही सुलभ पद्धती पासार्जने सोडून दिली आहे, व भूदृश्य क्षेत्राच्या एका विभागाची (Landschaftsteil, प्रदेशाचा क्षेत्रीय विभाग) " तपासणी " करण्याच्या पद्धतीचा तो वापर करू लागला आहे. हा जटिल भूक्षेत्रीय विभाग म्हणजे त्या भूक्षेत्रदृश्यरूपी (प्रादेशिक) इमारतीचा एक खराखुरा दगड आहे असे मानून, किंवा त्या प्रादेशिक सजीवाची ती एक जीवपेशी आहे असे मानून, त्या सर्वांच्या मिळवणीने तो एक प्रदेश तयार करतो. (२५८ ; c/o ब्यूर्गर ११, ८१). भूगोलक्षेत्रात ही एक महत्त्वाची भर आहे, असे पासार्ज उघडपणे मानत असे, व त्याच्या जोरावर प्रादेशिक भूगोल (Landschaftskunde) हा भूगोलातील एक नवाप्रकार आहे या त्याच्या दाव्याचे तो समर्थन करत असे. प्रदेशाचा वेगळा भाग कसा निश्चित केला जातो असे विचारले, तर त्याचे उत्तर ठरलेले होते. ज्या पद्धतीने या आधीचा प्रदेश निश्चित केला गेला, अगदी त्याच पद्धतीने हाही निश्चित केला जातो. फरक इतकाच, की लहान एककांच्या दृष्टीने सोईची असलेली नकाशांच्या तुलनेची अधिक वस्तुनिष्ठ पद्धती येथे तो वापरत नाही ; त्याऐवजी पुष्कळशी व्यक्तिनिष्ठ असल्यासारखी दिसणाऱ्या " सखोल निरीक्षण " पद्धतीच्या मार्गाने त्याने ही प्रगती केलेली आहे.

म्हणून, वर विचारलेल्या प्रश्नाचे आपल्याला असे उत्तर मिळते. प्रादेशिक विभागणीच्या पातळीचा विचार न करता, आपण दोनही दिशांना प्रयत्न करत रहावयाचे ; एका बाजूने मोठ्या एककांची विभागणी लहानात करावयाची, तर दुसऱ्या बाजूने लहान एककांतून मोठ्या विभागांची रचना करावयाची. प्रत्येक पद्धतीचे दुसरीवर जरी अंशतः दडपण येत असले, तरी अंशतः का होईना, या दोनही पद्धतींचा सुवर्णमध्य साधण्याचा प्रयत्न आपल्याला करावाच लागतो.

## ब–आतापर्यंत रचण्यात आलेले क्रमबंधांचे प्रकार

जगाच्या प्रादेशिक विभागणीचा क्रमबंध शोधण्याचे प्रयत्न हे भूगोलाइतकेच प्राचीन आहेत, यात कोणताही संदेह नाही, भूगोलविषयाचे स्वरूपच असे आहे, की भूपृष्ठाच्या विभागणीसाठी त्याला कोणत्यातरी मूलाधारांची गरज लागतेच. पुष्कळसे पूर्वीचे लेखक राजकीय नकाशांवरून मिळणारे विभाग मान्य करावयास तयार होते, तरी हवामान पट्ट्यांच्या रूपाने जगाचे विभाग पाडावयाचे प्राचीन ग्रीकांचे प्रयत्न हीच गोष्ट निराळ्या हेतूने करण्याच्या प्रयत्नांचे प्रातिनिधक आहेत. आधुनिक काळातील, विभागणीचा पहिला प्रयत्न रिटरने केला ; पण, तो आधुनिक शास्त्रांनी अमान्य केलेल्या अंतिमहेतुवादाच्या तत्त्वज्ञानांवर आधारलेला आहे. " सर्व रूपधेयांचा सर्वस्पर्शी विचार हाच आधार मानून केलेल्या भूक्षेत्रांच्या विभागणीची गरज त्याला पटलेली होती ; इतकेच नव्हे तर, ती कार्यवाहीतही आणण्याचा त्याने प्रयत्न केला, याचे सर्वश्रेय स्वतः रिटरकडेच जाते " (हेटनर १६१, ३०६). रिटरच्या कालखंडावर असलेल्या अंतिमहेतुवादी संकल्पनांच्या प्रभावापासून मुक्त असल्यामुळे, आणि भौगोलिक ज्ञानात प्रगती झाल्यामुळे, हेटनरने, कोणत्याही एका घटकाचा विचार न करता विविध घटकांच्या संयोगाचा उपयोग करावयाचा या मयदिपर्यंत, रिटरचे अनुकरण केले ; आणि नंतर, स्वतंत्र लहान क्षेत्रांच्या स्वरूपाचा अभ्यासकरून त्या आधारे अंशतः विश्लेषण पद्धतीने हेटनरने स्वतःच्या क्रमबंधाचा विकास घडवून आणला.[८६]

१९०५ मध्ये हर्बर्टसनने केलेल्या युगप्रवर्तक प्रयत्नांमुळे या प्रश्नाने एक निराळेच वळण दिले (३०७). रिटरने व त्याच्याबरोबर हेटनरने व फिलिप्सनसारख्या अन्य जर्मनग्रंथकारांनीही वेगवेगळ्या प्रदेशांचे प्रत्यक्ष अवस्थेतील साहचर्य मान्य केले व त्यांच्या साहचर्याने अधिक मोठी प्रभावक्षेत्रे व खंडे तयार केली. याविरूद्ध, हर्बर्टसन आपल्या प्रदेशांना एका मोठ्या प्रकाराचे लहान नमुने मानत असे, आणि दूरांतराने विभक्त असलेली क्षेत्रेही अशारीतीने एकाच प्रकारात परस्पर साहचर्याने आणत असे. हर्बर्टसनचा वर्गीकरणाचा क्रमबंध हा स्थानिक साहचर्य अथवा सापेक्षस्थान या गोष्टी विचारात न घेता रचलेला होता. म्हणजे याच्या विरूद्ध, प्रथम जगाचे प्रमुख विभाग पाडावयाचे व नंतर या विभागांचे पोटविभाग अशा रीतीने पाडावयाचे, की ते सलग असावेत, आणि ते सर्व एकत्र मिळविले असता एक प्रत्यक्ष साहचर्यदर्शक पूर्णक्षेत्र तयार व्हावे, अशारीतीने केलेली विभागणी असते. एका क्रमबंधात आंतरिक स्वरूपानुसार केलेले वर्गीकरण आहे, तर दुसऱ्यात प्रत्यक्ष क्षेत्रीय संबंधांतून मिळणारा

---

८६. हेटनरचा हा क्रमबंध त्याने स्पामरच्या नकाशासंग्रहासाठी लिहिलेल्या लेखात प्रथमच, म्हणजे १८९७ मध्ये प्रसिद्ध झाला. १९०५ मध्ये तो क्रमबंध पूर्ततेच्या मार्गावर होता. (१२६, ६७४). १९०८ मध्ये, त्याचा संपूर्ण आराखडा प्रसिद्ध झाला. Grundzuge der Landerkunde (प्रादेशिक भूगोलाची मूलतत्त्वे) या ग्रंथाच्यारूपाने त्याने केलेले संपूर्ण प्रादेशिक विषयविवेचन दोन खंडामध्ये प्रसिद्ध झाले आहे (३०१).

आराखडा आहे. ब्रिटिश भौगोलिक परिषदेच्या समितीने केलेल्या सूचनेनुसार (३१०, २५४), असे म्हणता येईल, की पहिल्या क्रमबंधातील प्रदेश प्रजातिनिष्ठ आहेत, तर दुसऱ्यातील प्रदेश विशिष्टवर्गनिष्ठ आहेत. विशिष्ट खंडांच्या प्रादेशिक भूगोलाचे विवेचन करणारे बहुतेक सर्व ग्रंथ—या पद्धतीने संपूर्ण जगाचा विचार करणाऱ्या ग्रंथांचा समावेश त्यांतच होतो—विशिष्ट वर्गवारीने केलेल्या विभागणीचा उपयोग करतात. पण अलीकडे, प्रादेशिक नकाशांचा वापर करणारे बहुतेक सर्व ग्रंथ प्रजातिनिष्ठ अथवा तौलनिक क्रमबंधाचा उपयोग करतात.

शक्यता अशी आहे, की भूगोलाला या दोनही पद्धतींचा फायदा घेतायेण्यासारख्या आहे. प्रजातिनिष्ठपद्धतीत ते दूरांतराने विभक्त असले, तरी प्रदेशा-प्रदेशांतील आंतरिक साम्य प्रकट होत असते. पण ही समरूपता मूलतःच अपूर्ण असते ; कारण, कोणत्याही प्रदेशाचे सापेक्ष स्थान हे त्याच्या आंतरिक लक्षणांपैकी एक महत्त्वाचे लक्षण असते, आणि त्याचा अन्य आंतरिक लक्षणांवर खुणा दिसण्याइतका परिणाम झालेला असण्याची शक्यता असते (C/o पेंक १५९, ६४०). दक्षिण कालिफोर्निया आणि मध्यचिली अशाप्रकारच्या प्रदेशांतील भूरूपांच्या संयोगासह " भूमध्यसामुद्रिक " हवामान, वनस्पतिजीवन, व पिके प्रत्यक्ष भूमध्यसामुद्रिक प्रदेशांशी समरूप असली, तरी ही क्षेत्रे कोणत्याही पूर्णार्थाने ' भूमध्यसामुद्रिक ' नाहीत, आणि ती तशी होण्याची शक्यताही नाही (२३४, ९४). उलटपक्षी, यांपैकी प्रत्येक क्षेत्राची सांगड त्याच्या शेजारच्या क्षेत्रांशी एका विशिष्ट प्रादेशिक क्रमबंधाने घालून दिली, तर तौलनिक (प्रजातिनिष्ठ) पद्धतीतील फायद्याला आम्ही मुकत असतो.[८७]

या संज्ञांच्या काहीशा बोंगळ वापरामुळे, या दोन पद्धतींतील एक महत्त्वाचा भेद अनेकदा झाकला जातो. आमच्या मते ज्याला प्रदेशांचा प्रत्यक्ष क्रमबंध असे नाव देणे योग्य आहे, त्या विशिष्ट प्रदेशांच्या क्रमबंधात सर्व पोटप्रदेश एकत्र केले त्यांचा एकमेव आणि खरोखरीचा एक प्रदेश तयार होतो ; पण, तौलनिक पद्धतीत सामान्यतः तसे होत नाही. पूर्व-इंग्लंड, उत्तर व नैऋत्य फ्रान्स, उत्तरसमुद्र आणि पश्चिम बाल्टिकसमुद्र यांच्या किनाऱ्यालगतचे सखल प्रदेश या सर्वांचा एकच एक प्रदेश तयार होतो असे म्हणणे, हा त्या शब्दाचा केवळ गैरवापर आहे ; आणि त्याला " दि अँग्लो-फ्लेमिश बेसिन " असे नाव देणे हा तर भूगोलक्षेत्रातील

---

८७. ज्याला येथे आपण प्रादेशिक भूगोलातील तौलनिक क्रमबंध या नावाने संबोधतो आहोत त्यासाठी " क्रमबद्ध प्रादेशिक भूगोल " ही संज्ञा सुचविण्यात आलेली आहे. ही संज्ञा जरी अधिक सुटसुटीत असली, आणि अशा अभ्यासांचे काही बाबतीतील स्वरूप स्पष्ट करून सांगणारी असली, तरी ती गैरसमज निर्माण करणारी आहे अशी जवळजवळ खात्री वाटते. क्रमबद्ध भूगोल आणि प्रादेशिक भूगोल यांतील विरोध अमेरिकी विचारप्रवाहात चांगलाच सुप्रतिष्ठित झाला आहे. नेमके तेच दोन शब्द एकत्र गुंफणाऱ्या संज्ञेमुळे सहजच गोंधळ माजण्याची शक्यता आहे. शिवाय ' क्रमबद्ध भूगोल ' आणि ' क्रमबद्ध प्रादेशिक भूगोल ' या दोहोंतील भेद नित्य वापरात टिकवून धरणे फारच अवघड होईल.

धसमुसळेपणा आहे (उन्स्टेड ३०९, १९७). पूर्व-इंग्लंड व त्याच्या बरोबरच त्याच्या समोरचा सखल भूभाग यांचा समावेश करणारा एक प्रदेश आहे असे आपण एका अर्थाने म्हणूही शकू ; पण, तो केवळ " मध्य-कवोष्ण-सखल भूभाग " सामावणारा प्रदेश नाही, तर तो सखल-प्रदेश व अरुंद-समुद्र यांनी तयार झालेला एक प्रदेश असून, त्यात समुद्राचाच वाटा जास्त महत्त्वाचा आहे.

जगाची नैसर्गिक प्रदेशात विभागणी करण्याच्या या हर्बर्टसनच्या प्रयत्नाकडे विद्वानांची कृपादृष्टी पुष्कळ वर्षेपर्यंत वळलेली नव्हती, तरी शेवटी, त्याची ही कल्पना इंग्लंडमधील त्याच्याच शिष्यांनी व आपल्या देशातील त्याच्या अनेक अनुयायांनी आणि जर्मनीतील ग्राडमान व पासार्ग यांनी उचलून धरली.* मात्र पासार्गने स्वतःची म्हणून एक पद्धती तयार केली, तेव्हा त्याला त्याआधीच्या पद्धतींचे ज्ञान नव्हते असे दिसते (२३६, ३३६ f). या विषयाची अभिरूची असलेल्या अभ्यासकांना अन्यपद्धतींच्या चर्चा हेटनरच्या ग्रंथात सापडतील (१६१, २९४-३०६), आणि अगदी अलीकडच्या पद्धतींची चर्चा हॉलच्या ग्रंथात (२९०), बोमनच्या ग्रंथात (१०६, १५४-१६३), आणि भौगोलिक परिषदेच्या समितीच्या प्रतिवृत्तात पहावयास मिळेल. या प्रतिवृत्तात हर्बर्टसन, स्टँप, पासार्ग, उन्स्टेड आणि फॉन फाल्केन बर्ग यांच्या जगाच्या नकाशांचाही यातच समावेश केलेला आहे (३१०).

हेटनरने या आधीच्या बहुतेक सर्व पद्धतींना " कृत्रिम " असे म्हटले आहे, कारण त्या केवळ वर्णनांनी निर्माण केलेल्या आहेत, आणि त्यांनी एकच एक, आणि तेही पहाताक्षणीच ओळख पटणारे, लक्षण आधारादाखल घेतलेले आहे. विभागणीचे असे क्रमबंध प्राथमिक अवस्थेत सर्व शास्त्रांनी सामान्यतः मान्य केलेलेच असतात, आणि त्या त्या शास्त्राच्या विकासाला ते उपयुक्तही झालेले असतात. पण, घटनांचे कार्यकारणभाव त्यांनी विचारातच घेतलेले नसल्यामुळे ते क्रमबंध संबंधी गोष्टींच्या सत्य स्वरूपाला स्पर्शच करत नाहीत, असे हेटनरचे मत आहे. " वस्तूंच्या मर्यादा ठरवून देण्यासंबंधी जेवढी ते खटपट करतात, तेवढी खटपट ते वस्तूंच्या स्वरूपाचे संपूर्ण आकलन करून घेण्यासाठी करत नाहीत, हे या कृत्रिम वर्गीकरणांचे एक वैशिष्टय आहे " (१६१, २९४).

राजकीय विभागणीमुळे होणारी सीमांची निश्चिती अगदी स्पष्टपणे ओळखू येणारी असते. भूगोलात अशाप्रकारचा क्रमबंध विभागणीसाठी वापरल्याने होणारे तोटे इतके सर्वश्रुत आहेत, की त्यावर वेगळी चर्चा करण्याची गरजच नाही. उलटपक्षी, प्रादेशिक अभ्यासांत पूर्णपणे दुर्लक्ष केले तरी चालण्यासारखे असते. पण, प्रादेशिक अभ्यासात राजकीय विभागणीकडे पूर्ण दुर्लक्ष केले, तरी चालण्यासारखे आहे असा आव भूगोलकारांनी आणणे हे या मताचे दुसरे टोक गाठण्यासारखे आहे. ज्या क्षेत्रातील राजकीय हद्दी वर्तमान सांस्कृतिक भूदृश्यांच्या विकासाच्या पूर्वीच प्रस्थापित झालेल्या असतील, तेथे त्या भूदृश्यांची

*पुरवणी टीप क्रमांक ४० पहा.

विभागणी त्यांच्या साहचर्यानुसार करावयास काहीच हरकत नाही ; आणि तसे करताना, बाह्य व आंतरिक अशा दोनही प्रकारच्या साहचर्यांचा उपयोग करावयास हरकत नाही. कारण, या राजकीय सरहद्दीच्या दोन्ही बाजूस त्यांचा एकमेकाशी पुष्कळच बाबतीत विरोध असतो. अशाच एका परिस्थितीचे वर्णन प्रस्तुत लेखकाने आपल्या " उत्तर सायलेशियाच्या भौगोलिक व राजकीय हद्दी " या आपल्या प्रबंधात केलेले आहे (३५५). उलटपक्षी दृश्यस्वरूपात कोणतेच महत्त्वाचे भेद नसूनही नंतर झालेल्या केवळ राजकीय हद्दींनी केलेल्या लक्षणीय विभाजनाचे उदाहरण म्हणून उत्तरअमेरिकेच्या वासंतिक-गहू-प्रदेशाकडे बोट दाखविता येईल.

शिवाय, आपल्या एकूण क्षेत्राचे वेगवेगळे भाग आर्थिक, सामाजिक व राजकीय एककांच्या स्वरूपात संघटीत करण्याकडे राज्यांचा कल असतो. ही वस्तुस्थिती लक्षात घेऊन, अभ्यासकांनी राज्यांच्या क्षेत्रांचा विचार केला, तर ते समर्थनीयच ठरणार आहे. तरीही, भूगोलातील महत्त्वाच्या जागतिक विभागणीसाठी राजकीय विभाग हेच योग्य आधार आहेत, या मताला पाठिंबा मिळण्याची शक्यता आता राहिलेली नाही (अर्थात, प्रत्यक्ष राजकीय भूगोलापुरता हा अपवाद केलाच पाहिजे). विशेषेकरून, सामान्य-भूगोलाचा कोणताच लेखक राज्यांच्या राजकीय पोटविभागांकडे लक्ष देणार नाही ; आणि आपल्या देशात तर असे पोटविभाग प्रत्यक्ष तथाकथित राज्यांनीच तयार केलेले आहेत.

त्याचप्रमाणे मानववंश अथवा लोक हा आधार घेऊन पाडलेल्या जगाच्या विभागासंबंधी फारसे काही सांगण्याची गरजच नाही. ते भौगोलिक कारक (म्हणजेच, क्षेत्रीय भेदाभेद निर्माण करणारे कारक) म्हणून महत्त्वाचे आहेत, येवढी गोष्ट निःसंशय आहे. म्हणूनच, त्या आधारावर तयार केलेले जगाचे नकाशे भूगोलकारांना मोलाचे वाटतात. पण, अशाप्रकारच्या कारकांना जगाच्या प्रादेशिक विभागणीची मूलभूत कसोटी म्हणून वापरण्याइतके महत्त्व द्यावे असे फारच थोडे लोक मानतील (हेटनर १६१, २९६ f ).

दक्षिण व वायव्य युरोपच्या बऱ्याच मोठ्या भागात, समुद्राने तिकडील भूमीचे विविध विभागात केलेले विभाजन मोठ्या प्रमाणात असल्यामुळे, विभागणीसाठी एक उघड दिसणारा आधार समुद्र हाच आहे, ही गोष्ट दैनंदिन व्यवहारात जशी मान्य झालेली आहे तशीच ती आपल्या शास्त्रानेही मान्य केलेली आहे. एक राज्य म्हणून मान्यता मिळविण्यापूर्वी कित्येक शतके, इटलीला एक " भौगोलिक अभिव्यक्ती " म्हणून मान्यता मिळालेलीच होती ; आणि खरे पहाता या भौगोलिक व्यक्तीने स्वतःचे समर्थन फारच मोठ्या प्रमाणात केले आहे. अशा रीतीने सर्व जगाची विभागणी द्वीपे व द्वीपकल्पे यांमध्ये इतक्या स्पष्टपणे झालेली असती, तर निश्चितच या क्रमबंधामुळे अनेक हेतू साध्य झाले असते. पण, या विभागणीत समुद्रांना नेमून दिलेले कार्य–अर्थात्, भूपृष्ठाच्या मर्यादित प्रदेशांच्या हद्दी ठरवून देणे–अगदीच अपुरेपणे करत असल्यामुळे, विभागणीचा एक कारक पाणी हा असू शकतो या कल्पनेच्या पोटी नद्यांचाही

त्या कारकात समावेश करण्यात येऊ लागला. दिसावयाला ही गोष्ट निरर्थक वाटली, तरी राजकीय क्षेत्रात या कल्पनेचे दूरगामी परिणाम झालेले होते. " ऱ्हाइन नदी ही फ्रान्सची नैसर्गिक हद्द आहे, " या प्रमेयाचे समर्थन निदान १९१९ च्या शांतता परिषदेइतक्या अलीकडच्या काळापर्यंत केले जात होते.

उलटपक्षी, काही अन्य अभ्यासकांनी एकरूपता निर्माण करणाऱ्या नदीच्या परिणामांवर भर दिला, आणि नद्यांच्या पाणलोट-खोऱ्यांच्या आधारे त्यांनी देशांची विभागणी केली. पण, अपहृत प्रवाहांच्या बाबतीत, त्या नद्यांचे जिव्हाळ्याचे संबंध त्यांच्या स्वतःच्या खोऱ्याशी नसून दुसऱ्याच नदी-खोऱ्याशी असल्याचे दिसून येऊ लागले. मग, या प्रयत्नात पाणलोट विभाजकांची जागा पर्वतराजींना द्यावी लागली. सर्वच भूमीवर रेखीव विभाजकांचा व अखंड क्रमबंध पर्वतराजींनी तयार केलेला आहे, असे येथे गृहीत धरण्यात आले होते. " आता, अशाप्रकारचे पर्वत आमच्या नकाशांतूनच नाहीसे झाले आहेत. " सर्वच कृत्रिम विभागणीत सर्वात महत्त्वाची अट सहज व सर्वस्पर्शी उपयोजकता ही असते. पर्वतराजींचे उत्तुंग भाग वरील अट कधीकाळी पूर्ण करतील अशी शक्यता राहिली नाही (१६१, २९७ I).

## क–" नैसर्गिक प्रदेशांचे " क्रमबंध

हे क्रमबंध कृत्रिम आहेत असे आम्हाला जर वाटते, इतकेच नव्हे, ते अगदीच सामान्य आहेत असेही जर वाटते, तर भाग या रीतिबाह्य क्रमबंधांचा येथे येवढा आवर्जून विचार का चालविला आहे, अशी शंका वाचकांच्या मनात येण्याची शक्यता आहे. भावी भूगोलाभ्यासक आपण आज वापरत असलेल्या क्रमबंधांकडे कोणत्या दृष्टीने पहातील, हे आपल्या लक्षात यावे येवढ्याच हेतूने गतकालीन क्रमबंधांचे हे संक्षिप्त सर्वेक्षण आम्ही येथे केलेले आहे. कारण, अशी एक शक्यता आहे, की अशाच काहीशा प्रकारांनी आम्हीही स्वतःची फसवणूक करून घेत आहोत.

काटेकोर अर्थ असल्याचा भास निर्माण करणाऱ्या संज्ञांचा शिथिलपणे केलेला उपयोग, हे अशा आत्मवंचनेचे एक सामान्य स्वरूप असते. लेखक प्रथम प्रथम ही संज्ञा शिथिलपणे वापरली जात असल्याची जाणीव ठेवून असतो. पण, कालांतराने, ती तांत्रिक संज्ञाच वाचकांच्या, व प्रत्यक्ष लेखकाच्याही, मनात असा विश्वास निर्माण करते, की त्याने जो अर्थाभास निर्माण केला आहे तेच त्याचे खरे म्हणणे आहे. उदाहरणार्थ : पाणलोट-खोऱ्यांना नैसर्गिक भूविभाग मानून पूर्वीचे ग्रंथकार स्वतःची फसवणूक करून घेत असत, अशी आमची खात्री झाली असली, तरी " नैसर्गिक प्रदेश " अशासारख्या संज्ञांचा वापर प्रचलित रूपात करत असताना आम्ही स्वतः भक्कम पायावर उभे आहोत, अशी खात्री आपल्याला तरी देता येईल का ?

दुर्दैवाची गोष्ट अशी, की " नैसर्गिक प्रदेश " या संज्ञेचा अनेक व वेगवेगळ्या अर्थांनी वापर करण्यास, दैनंदिन व्यवहारात तरी, पूर्ण मुभा भाषेने दिलेली आहे (ही अडचण जवळजवळ याच स्वरूपात फ्रेंच व जर्मन भाषांतूनही आहे–आणि ती सर्वच हिंदीयुरोपीय भाषांतून असण्याची शक्यता आहे). अगदी व्यापक अर्थाने पहाता, " निसर्गात " मनुष्याचा, आणि त्याच्या सर्व कार्यांचाही, अगदी उघड समावेश होत असतो, किंवा विश्वविषयक कल्पनांपेक्षा विश्व या सत्यस्थितीचाच तो समानार्थक असतो, असे म्हणणे बरे. कांट, हंबोल्ट व अन्य लेखकांनी, अशाप्रकारे, " निसर्ग " या शब्दाचा वापर निरीक्षकाच्या मानसिक संवेदनांबाहेरचे वस्तुनिष्ठ जग या अर्थाने केला आहे.

याच आधारावर काही अभ्यासक " नैसर्गिक प्रदेश " या संज्ञेतील निसर्ग हा शब्द " स्वेच्छेने लादलेले नव्हे, तर सहज सिद्ध आहे, असे काही तरी " असा अर्थ दाखविण्यासाठी वापरतात (३१०, २५३). ही संज्ञा वापरताना, हर्बर्टसनचा मुळात हाच हेतू असावा असे वाटते (३०७). पण, त्याच्या नंतरच्या प्रकाशित ग्रंथांतून त्याने नैसर्गिक हा शब्द वगळावा, आणि केवळ जगाचे ' प्रमुख प्रदेश ' असा शब्दप्रयोग त्याने करावा, ही घटना कदाचित अर्थपूर्ण असण्याची शक्यता आहे (३०८). निदान भूगोलकारांनी केलेल्या उपयोगावरून पहाता, ' प्रदेश ' या शब्दाचा ' सहज स्वरूप ' हा गुणार्थ त्या शब्दाच्या बरोबरच येतो–याच्याच विरूद्धार्थाने ते क्षेत्र शब्द वापरतात. स्वैरपणे लादलेली क्षेत्राची विभागणी, या विरूद्ध ' सहजसिद्ध प्रादेशिक स्वरूप ' या संकल्पनेवर भर देण्यासाठी नैसर्गिक या शब्दाची पुस्ती जोडणे, ही निरर्थक पुनरावृत्ती आहे (" सत्य नैसर्गिक प्रदेशांच्या " क्रमबंधाचाही अवतार होईल अशी अपेक्षा करण्यास काहीच हरकत नाही) ; शिवाय, तो काहीसा पांडित्य प्रदर्शनाचाही भाग असावा. या शब्दाने असे सुचविले जाते, की भूपृष्ठाची विभागणी निःसंदेहपणे करण्यात आलेलीच आहे ; प्रश्न केवळ ती अचूकपणे ओळखण्याचा आहे. पण, आपल्याला तर असे दिसून आले आहे, की अशाप्रकारची कोणतीही विभागणी सत्यस्थितीत अस्तित्वात नाही. जगाची कोणत्याही प्रकारे विभागणी करावयाची झाली, की वैयक्तिक निर्णयाचा प्रश्न हा उद्भवतोच. वेगवेगळ्या कारकांच्या मर्यादा निश्चित करण्याच्या बाबतीतच नव्हे.* तर या अनेक कारकांपैकी कोणता सर्वात महत्त्वाचा मानावयाचा याबाबतही हा प्रश्न उद्भवतोच. क्षेत्राचे हे सहजसिद्ध स्वरूप असंख्य अपरिमेय घटकांनी बनलेले असते, आणि हे घटक अन्योन्य संबंधांत असले, तरीही पूर्णार्थाने ते तसे असत नाहीत. तपमान, पर्जन्य, उंचसखलपणा, जमिनीचा उतार, मृत्तिकेचा नैसर्गिक पोत, भूमिगंत खनिजे, आणि सापेक्ष स्थल हे सर्वच घटक मोठ्या प्रमाणात एकमेकापासून स्वतंत्र असतात–मग, मानव घटकांतून प्रदर्शित होणाऱ्या स्वातंत्र्यप्रमाणाचा विचारच करावयाला नको. ज्याच्यातील हे सर्वच घटक स्थलपरत्वे बदलत असतात, आणि हे बदलही मोठ्याप्रमाणात स्वतंत्र असतात, अशा या जगाची विभागणी करताना सर्व घटकांचा एकाच वेळी आधार घेणे ही अशक्यकोटीतील गोष्ट

* ' नव्हे ' या शब्दामागे ' केवळ ' हा शब्द घालावा.

आहे ; आणि हे सत्य अनेक ग्रंथकारांनी बोलूनही दाखविलेले आहे. म्हणूनच कोणते बदल आधिक महत्त्वाचे आहेत याचा प्रथम निर्णय झाला पाहिजे. पण, या निर्णयासाठी मानदंड कोणता ? कोण श्रेष्ठ, पर्वत की आवर्षण ? अर्थातच हा निर्णय फक्त वैयक्तिक असू शकतो ; आणि या अर्थाने पहाता, अशाप्रकारे तयार झालेले हे प्रदेश सत्यस्थितीवर स्वेच्छेने लादलेलेच असतात.

काही बाबतीत, " नैसर्गिक प्रदेश " ही संज्ञा वापरणाऱ्या लेखकांचा हे शीर्षक शब्दशः अर्थाने घेण्याचा हेतू नसतो. अनेक वेळा, कोणताही एक घटक आधारासाठी घेऊन प्रादेशिक विभागणी केलेली असते : उदा. ' हवामाननिष्ठ प्रदेश ', शेतीनिष्ठ प्रदेश इ. पण, काहीवेळा याविरूद्ध, प्रादेशिक विभागणीचा आधार मानवासह संपूर्ण निसर्गातच गवसणारा असतो हे सूचित करण्यासाठी त्या संज्ञेचा वापर केलेला असतो (पुष्कळशा बाबतीत, असा वापर करण्यातही मानभावीपणा असतोच, असे खात्रीपूर्वक दिसून येते ; कारण, प्रत्यक्षात ही विभागणीही हवामान या एकाच घटकावर आधारलेली असते) प्रथमदर्शनी, ' निसर्गाधारे केलेले प्रदेश ' या शब्दप्रयोगाचे विधिविहित संक्षिप्त रूप ' नैसर्गिक प्रदेश ' हेच आहे, असा भास होण्याची शक्यता आहे. पण " नैसर्गिक " या शब्दाच्या पूर्णगुणार्थाचा पुन्हा विचार करू लागतो, तेव्हा एक गोष्ट स्पष्ट होते, की हा संक्षिप्त वाक्यांश त्याच्या संपूर्ण वाक्यांशापेक्षा कितीतरी अधिक अर्थावर अधिकार सांगू लागतो. म्हणजे, ' सत्यपरिस्थितीच्या आधारे तयार केलेले प्रदेश या वाक्यांशाचे संक्षिप्तरूप म्हणून ' सत्य प्रदेश ' या वाक्यांशाचा उपयोग करण्यातलाच हा प्रकार आहे. परिस्थिती सत्यस्थितीत असते हे खरे असले, तरी ' प्रदेश ' ही बौद्धिक संकल्पनाच असते.

हर्बर्टसनने आपल्या नंतरच्या प्रकाशित ग्रंथांतून वापरली आहे त्याप्रमाणे ' प्रदेश ' ही संज्ञा कोणत्याही गुणविशेषणाशिवायच वापरण्याने ही अडचण सहज दूर होण्यासारखी आहे ; किंवा तशीच कोणाची इच्छा असेल तर, ' भौगोलिक प्रदेश ' या संज्ञेचा उपयोग करूनही ते साधता येईल. ' भौगोलिक ' ही संज्ञा काही वेळा मानवेतर नैसर्गिक अशा अर्थाने वापरली जाते, ही गोष्ट खरी आहे. पण, भूगोलशास्त्रात मानवी रूपांचाही अंतर्भाव होत असल्याने, अशा प्रकारचा गैरसमज येथे होण्याची शक्यता नाही (ब्रिटिश भूगोलकारांनी असा वापर केल्यावरून डिकिन्सनने आक्षेप घेतलेला आहे १०१, २५८ व २६८). " भूगोल " या शब्दापासून होणारे विशेषण " भूगोलात " अंतर्भाव होणाऱ्या सर्व गोष्टींचा समावेश निश्चितच करू शकते (जेम्स २८६, ८०).

" नैसर्गिक आधारावर केलेले प्रदेश " आणि " नैसर्गिक प्रदेश " यातील भेद हेटनरच्या Natürliche Einteilung der Erdoberfläche (३००) या ग्रंथात काटेकोरपणे व सातत्याने राखला गेला आहे. विभागणीसाठी घेतलेला आधार कोणताही असो, त्याचे उपयोजन करत असताना वैयक्तिक निर्णयबुद्धीचा इतक्यावेळा उपयोग करणे भाग पडते, की परिणामी ' प्रदेश ' हे " नैसर्गिक " या शब्दाचा कोणत्याच अर्थाने नैसर्गिक आहेत, असे

म्हणता येणार नाही (१०७). उलटपक्षी, त्याने केलेल्या शब्दप्रयोगाचे भाषांतर–मग ते जर्मन भाषेत पूर्णपणे स्पष्ट असो वा नसो–" पृथ्वीच्या पृष्ठभागाचे नैसर्गिक विभाग " असे केले, तर त्याची काटेकोरपणापासून फारकत झालेली दिसते. त्याने केलेल्या या चर्चेत, तो ज्याला ' कृत्रिम ' (Künstlich) अशी संज्ञा देतो, अशा क्रमबंधांतील व स्वतःच्या विभागणीच्या क्रमबंधातील विरोध दाखवून देतो. त्याचा क्रमबंध ' सत्यस्थितिनिदर्शक ' या अर्थाने नैसर्गिक (Natürlich) आहे. आणखी स्पष्ट करावयाचे तर, केवळ सत्यस्थितीवर आणि संपूर्ण सत्यस्थितीवर (Natur) उभारलेला तर्कनिष्ठ आधार तो शोधत असतो.

" नैसर्गिक " या शब्दाच्या अगदी व्यापक अर्थाने, म्हणजेच निरीक्षकाच्या मानसाच्या बाहेरच्या, पण त्याच्या नजरेस पडणाऱ्या, सर्व घटनांचा त्यात समावेश होईल अशा अर्थाने, कोणी त्याचा अर्थ वस्तुनिष्ठ परिस्थिती असाही लावू शकेल–केलेल्या उपयोगावरच वरील परिच्छेदातील त्या शब्दाचा प्रत्येक अन्वयार्थ अवलंबून आहे. अशा शब्दप्रयोगास भौगोलिक साहित्यात आणि विचारक्षेत्रात भक्कम आधार आहेत, यात शंकाच नाही. हंबोल्टच्या, आणि त्याच्या पूर्वीच्या आचार्यांच्याही, दृष्टीनेही तीच त्या शब्दाची सर्वसामान्य समजूत होती. [८८] पण एकंदरीने, १९ व्या शतकातील सर्वच शास्त्रज्ञ अमानव घटनांचे अभ्यास " नैसर्गिक शास्त्र " या नावाने तीव्रतेने वेगळे दाखवू लागले ; आणि भूगोलात, व अन्य विचारक्षेत्रातही मानवावर कोणत्याही प्रकारे अवलंबून नसलेला सत्यस्थितीचा भाग व जो " मानवी " म्हणता येईल असा भाग या दोहोतील विरोध स्पष्ट करण्यासाठी ' निसर्ग ' या शब्दाचा प्रयोग होऊ लागला. एका अर्थाने, ' मानव व निसर्ग ' यांचा विरोध दाखविणे हा ' कमालीचा उद्धटपणा ' आहे, या जेम्सच्या मताशी (२८६, ७९) कोणाचेही एकमत होण्यास हरकत नाही. हे खरे असले, तरी निसर्गात मानव एकटाच काय तो या अशा विरोधाची कल्पना करण्यास समर्थ असतो, ही एकच वस्तुस्थिती असा विरोध स्पष्ट करणाऱ्या संज्ञांचे समर्थन करण्यास पुरेशी आहे. " प्रत्यक्ष मानव जातीच्या अभ्यासाशी " संबंधित असलेल्या शास्त्र व तत्त्वज्ञान यांच्या सर्वच क्षेत्रांना, विश्वाचा मानवी म्हणता येईल असा अंशभाग आणि तो वगळून उरलेला निसर्गाचा भाग, या दोहोतील भेद स्पष्ट करणे आवश्यक वाटते. कदाचित्, या दोन विभागांत असलेले जिव्हाळ्याचे संबंध बुद्धिगम्य पद्धतीने सांगण्यासाठीच त्यांना

---

८८. ग्रान्योने ' निसर्ग ' या शब्दाच्या अर्थाच्या एका वेगळ्या पाठभेदाचा उपयोग केला आहे. हा पाठभेद त्याने रिकार्ट या तत्त्वज्ञाकडून उचललेला होता. " कायिक अस्तित्व असलेल्या वस्तू म्हणजेच निसर्ग " ; किंवा दुसऱ्या शब्दांत, अमूर्त नसलेल्या, अर्थात मूर्त असलेल्या गोष्टी म्हणजे निसर्ग–मग त्या गोष्टी मानवी असोत की अमानवी असोत (२५२ ; २७०, २९७). रिकार्ट " भौतिक शास्त्राची " व्याख्या स्पष्टपणे अशीच करतो. वास्तविक, मूर्त, कायिक, भौतिक गोष्टी आणि त्यांच्या विरोधी गोष्टी या दोहोंतील भेद स्पष्ट करणाऱ्या संज्ञांचा भेद स्पष्ट करणाऱ्या संज्ञांचा तोटा नाही. या नव्यासंज्ञेने " नैसर्गिक शास्त्र " कसे असावे या संबंधीचे एखादे नवे प्रमेय सिद्ध करावयाचे नसेल, तर गोंधळ उडविणारे हे आणखी एक पिलू सोडण्याची गरज दिसत नाही.

तशी गरज जाणवली असेल, मानव व पृथ्वी यांच्या अन्योन्य संबंधांबाबत विवेचन करताना " पाया " हा शब्दच वापरावा अशी प्रशस्ती जेम्स करतो, ती अशाप्रकारची गरज तो खरोखरीने मान्य करतो म्हणूनच ना ! (८०)—जणूकाही, मानव हा पृथ्वीवरचा किंवा पार्थिव नव्हेच ! " पाया " या संज्ञेचेकाही फायदे आहेत हे खरे असले, तरी त्याच्या मर्यादाही स्पष्ट आहेत–विशेषेकरून, विशेषणरूपात तो एक अगदी वेगळाच शब्द तयार होत असतो. मानवी घटकांपासून अमानवी घटक वेगळे दाखवू इच्छिणाऱ्या शास्त्रज्ञांनी " नैसर्गिक " या शब्दाचा प्रयोग करण्याची सवय लावून घेतली आहे, आणि ती तशीच पुढेही चालू राहील असे गृहीत धरण्यास हरकत दिसत नाही. ही गोष्ट काहीशी तर्कविरूद्ध आणि गोंधळ माजविणारी असली, तरी खरी आहे. म्हणूनच, या अर्थाने ही संज्ञा आम्ही येथे वापरतो आहोत ही गोष्ट आपण आधी स्पष्ट करणे आवश्यक आहे.

प्रस्तुत वादाचा मुद्दा बहुतेक शास्त्रांच्या दृष्टीने अगदी किरकोळ महत्त्वाचा असला, तरी भूगोलात मात्र तो सर्वात अधिक महत्त्वाचा आहे. भूगोल हे ' भौतिक शास्त्रे ' आणि मानवसंबंधी अथवा ' सामाजिक शास्त्रे ' या दोहोंचाही छेद घेणारे शास्त्र आहे. " भौतिक शास्त्रे व सामाजिक शास्त्रे यांमधील दुवा " म्हणजे भूगोल, हे भूगोलाचे वर्णन पुष्कळशा आधुनिक भूगोलकारांना मान्य नाही, ही गोष्ट निश्चित आहे. शास्त्रांची विभागणी या दोन प्रमुख गटात करणाऱ्या या रूढ पद्धतीचा श्लुटरप्रमाणे इतर अभ्यासकही आता विचार करत नाहीत, तर, भूगोल या सर्वच वेगवेगळ्या शास्त्रांचा छेद घेतो व त्यासर्वांमधील दुवे तो सांधतो, या वस्तुस्थितीवर ते भर देत असतात. याच आधारावर, काही ग्रंथकार " भौतिक भूगोलाच्या " विरूद्ध असलेल्या " जीवविषयक भूगोलाचा " " मानवी भूगोल " हा एक भाग आहे, असे मानतात (येथे भौतिक याचा अर्थ निर्जीव भौगोलिक रूपधेये असा घेतला जातो), आणि क्रमबद्ध (अर्थात सामान्य) भूगोलाचे वरीलप्रमाणे दोनच भाग ते मानतात. हे तर्कशुद्ध आहे असे वाटले, तरी ते निश्चितच असत्यप्राय आहे. मानवाचा संबंध जेव्हा अमानवी कारकांशी येतो, तेव्हा तो इतर कोणत्याही सजीव प्राण्यांपेक्षा अगदी निराळ्याप्रकारच्या प्रतिक्रिया देतो. त्याच्या प्रतिक्रिया सांस्कृतिक प्रतिक्रिया असतात व त्यात वस्त्रप्रावरण–घर–गोठा, हत्यारे–अवजारे इत्यादी गोष्टींचा समावेश असतो–मानवावस्थेच्या अगदी प्राथमिक कालात त्याने तेच केले (७३, ५६). भूगोलशास्त्र मानवाने मानवासाठी विकसित केलेले शास्त्र असल्याने–इतर जीवसृष्टीपेक्षा आपण वेगळे आहो याची जाणीव ठेवून–मानवीसृष्टी आणि अमानवीसृष्टी यांच्यामधील संबंध हा विषय भूगोलाला सर्वात अधिक जिव्हाळ्याचा असतो. या अर्थाने पहाता लांडग्यांचा भूगोल हा भूमिरूपांच्या भूगोलाहून जितका वेगळा असतो, तितकाच तो मानवी भूगोलापेक्षाही वेगळा असतो. म्हणूनच, ज्यांना सांस्कृतिक, म्हणजेच मानवाच्या, गोष्टी असे म्हणता येईल त्या गोष्टी इतर सर्व गोष्टींपेक्षा मुलतःच वेगळ्या असतात–आणि या अर्थाची दुसरी चांगलीशी संज्ञा नसल्याने आपण त्यांना " नैसर्गिक " असे म्हणतो (C/o फोगेल २४४, १९२).*

*पुरवणी टीप क्र. ४१ पहा.

नैसर्गिक या शब्दाच्या मर्यादित तांत्रिक अर्थाने पहाता, नैसर्गिक प्रदेश ही संज्ञा, त्या प्रदेशांचा विचार त्यातील अमानव घटकांच्या संदर्भात केलेला आहे, असा अर्थ सुचविते, हे गृहीतच आहे. ज्यातून मानवीघटक पूर्णपणे वगळलेले आहेत अशा भूपृष्ठाची संकल्पना ही केवळ एक बौद्धिक, म्हणजे सत्यस्थितीत प्रतिबिंबीत न झालेली, स्थल संकल्पना आहे (प्रकरण ५, विभाग ' क '), या गोष्टीची दखल आपण यापूर्वीच घेतलेली आहे. अर्थातच अशाप्रकारच्या ' नैसर्गिक प्रदेशांचा ' कोणताही क्रमबंध केवळ औपपत्तिक स्वरूपाचाच असणार ! शिवाय, आपल्याला असेही दिसून आलेले आहे, की अशा नैसर्गिक प्रदेशांचा एखादा सोपासा क्रमबंध, अगदी तात्त्विक स्वरूपात देखील, जगात अस्तित्वात असल्याचे दिसत नाही. अशी गुंतागुंत निर्माण करणारा मानव हा कारक वगळावयाचे ठरविले, तरी ज्यातील पुष्कळसे घटक मूलतःच परस्परापासून स्वतंत्र आहेत अशा नैसर्गिक घटकांचा जटिलसंयोगदेखील कोणत्याही एका प्रादेशिक विभागणीला थारा देत नाही ; म्हणजेच, अशी विभागणी फक्त स्वैर निर्णयानेच होणे शक्य आहे.

जगाची विभागणी नैसर्गिक म्हणजेच अमानवी घटकांच्या आधारे केली आहे, हे सूचित करण्यासाठीही " नैसर्गिक प्रदेश " हीच संज्ञा या मर्यादित अर्थाने वापरता येईल, अशी शक्यता आहे. " नैसर्गिक प्रदेश " या संज्ञेच्या व्यापक अर्थाने केलेल्या वापराचे बाबतही अशीच परिस्थिती होती. आपण मात्र या मर्यादित अर्थालाच यापुढे चिकटून रहाणार आहोत. सर्वच रूपधेयांच्या दृष्टीने, निदान अत्यंत महत्त्वाच्या दोन अगर तीन नैसर्गिक रूपधेयांच्या दृष्टीने, अर्थपूर्ण अथवा पर्याप्त असेल असा एखादा विभागणीचा आधार, मानवापासून वेगळा केल्यावर, निसर्गही दाखवून देऊ शकत नाही. तसेच, कोणता घटक इतरांच्या तुलनेने अधिक महत्त्वाचा आहे याची काहीच सूचना निसर्गाकडून मिळण्याची शक्यता नाही. सेकिवा (Sequioas) नावाच्या राक्षसी वृक्षांच्या दृष्टीने अर्थपूर्ण असणारे नैसर्गिक घटक, अलास्का किंवा न्यूजर्सीमधील मच्छरांच्या दृष्टीने महत्त्वाच्या असणाऱ्या नैसर्गिक घटकांपेक्षा निसर्गाला अधिक महत्त्वाचे वाटतात, असे गृहीत धरण्यास कोणताही आधार नाही, असे उदाहरणादाखल आपल्याला म्हणता येईल. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर, सेकिवांच्या संदर्भात तयार केलेला ' नैसर्गिक प्रदेशांचा ' , म्हणजेच ' केवळ नैसर्गिक घटकांवर आधारलेल्या प्रदेशांचा ', नकाशा सेकिवांच्या संदर्भात तयार केलेल्या नकाशापेक्षा अगदी वेगळा होईल. पण, अशी विभागणी अशाच एखाद्या बाह्य हेतूने केलेली असणे आवश्यक आहे. तथापि, भूगोलकारांनी अशाप्रकारे केलेल्या सर्वच विभागण्या मानवी दृष्टिकोणातून–म्हणजेच, मानवाला ज्यांच्याबद्दल जिव्हाळा वाटतो अशा निसर्गांशाबद्दलच्या त्याच्या दृष्टिकोणातून–केलेल्या आहेत. काटेकोरपणे विचार करावयाचा तर, " माणसाला महत्त्वपूर्ण वाटणाऱ्या नैसर्गिक परिस्थितींवर आधारलेले प्रदेश " असेच त्यांचे वर्णन करावे लागेल. निदान हर्बर्टसनला तरी ही परिस्थिती कळून चुकलेली होती असे दिसते (३१० आणि ३७८).

अगदी सुरुवातीपासून जे उघड दिसत होते त्याच निष्कर्षापर्यंत येऊन पोहोचण्यास येवढ्या शब्दावडंबराची काय जरूर होती, असे वाचकांना वाटणे साहजिक आहे. पण, अनेक अभ्यासांच्या परिशीलनाने एक गोष्ट स्पष्ट झाली होती की, वरील निष्कर्ष इतरांना इतका स्पष्ट आहे असे वाटत नाही. नैसर्गिक घटकांच्या स्वाधिकाराने, किंवा काही सूचनांनुसार " त्यांच्या अंगभूत लक्षणांवरून " त्यांचा विचार न करता, त्या घटकांचे मानवाच्या दृष्टीने असणारे महत्त्व प्रत्येक बाबीत लक्षात घेतलेच पाहिजे, असा दंडक घालणाऱ्या प्रादेशिक विभागणीच्या क्रमबंधातील गैरकायद्यांचा आपण विचार करू लागलो, म्हणजे या निष्कर्षाचे महत्त्व कळू लागते. मग, अशा क्रमबंधात असा एक कारक लुडबुड करू लागतो की, तो प्रत्येक एका घटकावर परिणाम करत रहातो, इतकेच नव्हे तर, हा परिणाम स्थलपरत्वे व कालपरत्वेही लक्षणीयरीतीने बदलत रहातो. केवळ नैसर्गिक घटकांना धरून केलेली उत्तर अमेरिकेची प्रादेशिक विभागणी कोलंबसपूर्व काळात वेगळी असेल, तर वसाहतींच्या कालखंडासाठी एक वेगळीच असेल. त्यानंतरच्या काळांत बदलांचा हा वेग कमी झाला असला, तरी आजतागायत ही विभागणी बदलतेच आहे (C/o ब्रोक २९७, १०७). त्याचप्रमाणे, कोणत्याही एका कालखंडात, संयुक्त संस्थानांच्या नैसर्गिक घटकांना दिले गेलेले सापेक्ष महत्त्व चीनच्या प्रादेशिक विभागणीतही ते तितकेच दिले गेले असेल, असे गृहीत धरता येणार नाही–अमेरिकन लोकांना चीनमध्ये वसाहती करण्याची संधी मिळाली, तर त्यांच्या जीवनावर तेथील नैसर्गिक परिसराचा कसा परिणाम होऊ शकेल, अशा दृष्टिकोणातूनच चीनची प्रादेशिक विभागणी कोणाला करावयाची असेल तर गोष्ट वेगळी !

मग, जो संबंधित नैसर्गिक घटकांच्या संपूर्ण जटिलांना योग्य न्याय देईल, आणि तरीही मानवी दृष्टिकोणापासून जो अलिप्त असेल, असा जगाचे प्रादेशिक विभाग करण्याचा एकही मार्ग संभवतच नाही का ? केवळ तात्त्विकदृष्ट्या का होईना पण अशी एक जगाची प्रादेशिक नैसर्गिक विभागणी करणे शक्य झालेच, तर अशा विभागणीतून मानवापासून अलिप्त असलेली एक संदर्भचौकट आपल्याला उपलब्ध होईल ; आणि त्याच्याच पार्श्वभूमीवर आपल्याला सांस्कृतिक भूदृश्यांच्या विकासाचा अभ्यास करणे शक्य होईल. अशा चौकटीसाठी माजलेल्या तार्किक वादंगांवरून ती तयार करणे अशक्य कोटीतील गोष्ट आहे असा भास होत असला, तरी, अशाप्रकारच्या चौकटीला प्रादेशिक भूगोलाच्या दृष्टीने इतके मोठे महत्त्व आहे की, अशी एखादी चौकट उपलब्ध करून देण्याची आशा दाखविण्याऱ्या कोणत्याही अर्थगंभीर सूचनांचा विचार करणे आपल्यास प्राप्त आहे.

पुष्कळशा अभ्यासकांनी ज्या मोठ्या उत्साहाने " नैसर्गिक भूदृश्यांच्या " संकल्पनेची कास धरली, त्यांच्या त्या उत्साहाचा उगम, पासार्ज व अन्य तज्ञांनी प्रतिपादन केलेल्या पद्धतीनेच आपल्या प्रश्नाचे उत्तर या संकल्पनेतून मिळणार आहे, या त्यांच्या भावनेत असला पाहिजे. नैसर्गिक भूदृश्याच्या निरीक्षणाने, भूपृष्ठाच्या प्रादेशिक विभागणीसाठी लागणारा

आधार निसर्गातूनच मिळू शकेल. अगदी अलीकडच्या एका विधानात, पासार्ज असे ठामपणे सांगतो : " भूपृष्ठरूपांची–खडक, वनस्पती–आवरण, पाणी अशा संदर्भात–वेगवेगळी स्थळे (Raume) (त्यातील प्रत्येक एखाद्या विशिष्ट वर्गापुरते सजातीय दिसणारे असावे) काही नियमान्वये एकत्र आणून त्यांची खास भूदृश्य लक्षणाने मुक्त अशी क्षेत्रे तयार करता येतात." अशा क्षेत्रानाच " भूदृश्य स्थळे " असे म्हणतो (२६८, ६).

ज्या भूदृश्याचे आपण सत्यस्थितीत निरीक्षण करू शकतो, त्याच्या भूमिभागात उंचसखल भूपृष्ठ आणि वनस्पत्यावरण यांचाच समावेश असतो. पण एकमेकापासून पुष्कळ-अंशी स्वतंत्र असणाऱ्या या दोघांची संगतीतरी आपण कशी घालणार ? एकात झालेल्या फरकाच्या किती आकाराला दुसऱ्यातील फरकाच्या किती आकारापेक्षा अधिक महत्त्वाचे मानावयाचे ? या प्रश्नाचे वस्तुनिष्ठ उत्तर प्रत्यक्ष भूदृश्यातून मिळत नाही. म्हणजेच, हा निर्णय आम्ही केवळ स्वसंवेदनांच्या व्यक्तिनिष्ठ आधारावरच घेऊ शकतो–किंवा त्या भूदृश्याचा दुसऱ्या कोणाशीतरी, उदाहरणार्थ मानवी जीवनाशी, असलेल्या संबंधांच्या संदर्भात घेऊ शकतो.

निर्णयासाठी घेतलेल्या आधाराचा उल्लेखही न करता, पासार्जने या प्रश्नाचे उत्तर वनस्पतिजीवनाच्या बाजूने दिले, आणि त्यानुसार पासार्जने जगाचे प्रमुख विभाग निश्चित केले, व भूरूपांचा विचार फक्त पोटविभाग पाडण्यासाठी केला (२८६, ९२). हे महत्तेचे माप केवळ स्वेच्छेने निवडलेले आहे, हे उघडच आहे. भूदृश्यान्तर्गत पर्वताचे खडकाळ उतार आणि लगतच्या मैदानांचा विशाल विस्तार या दोहोतील फरकाचे महत्त्व अरण्ये व मैदानी करणे या दोहोंमधील फरकापेक्षा अधिक अर्थपूर्ण आहे असे का मानावयाचे ? प्रत्यक्ष परिपाठात तर, त्यानेच काढलेल्या जगाच्या भूदृश्य-पट्ट्यांच्या नकाशात त्याला या पोटविभागात जागा देता आली नाही. शिलामय पर्वतांचा अंतर्भाव सरळ ' कोरड्या भूदृश्यात ' करून टाकलेला आहे.

या क्रमबंधावरचा दुसरा आणि मोठा आक्षेप त्यातील मूलभूत असत्य स्थितीबाबतचा आहे. खरोखरी पहाता, आपल्याला जसे दिसते तशा खऱ्याखुऱ्या भूदृश्यांवर तो आधारलेला नाही ; तर, तो कोणत्यातरी गृहीत प्रमेयावर आधारलेल्या व कोणाही जिवंत माणसाने कधी न पाहिलेल्या एका भूदृश्यांवर आधारलेला आहे. पासार्जने आपल्या प्रतिपादनात ही गोष्ट कोठेच स्पष्ट केलेली नाही. जेथे ' सांस्कृतिक भूदृश्याचा ' विकास झालेला नाही, तेथे निरीक्षक ज्या वर्तमान भूदृश्यांवर नजर टाकत असतो, त्यांना ' नैसर्गिक भूदृश्ये ' असे एक मोघम नाव दिलेले असते ; आणि अन्य ठिकाणी, ती आदिम भूदृश्ये, म्हणजे माणसाचा स्पर्शच झाला नाही अशी भूदृश्ये, आहेत असे गृहीत धरलेले असते.

या भोवऱ्यात पुरे सापडण्यापूर्वीच, जगाच्या भूदृश्यांच्या कोणत्या अवस्थांचे आपल्याला निरीक्षण करावयाचे आहे व त्यांची स्थलपरत्वे विभागणी करावयाची आहे, हे आपण स्पष्टपणे समजून घेतले पाहिजे. तात्त्विकदृष्ट्या, त्यांच्या तीन अवस्था संभवतात. पण, प्रस्तुत क्रमबंधातील असेल-नसेल तेवढे सामर्थ्य खर्ची घालूनही या तीनही अवस्थांचा संयोग करणे अशक्य आहे. जेम्सने मान्य केल्याप्रमाणे, वर्तमान म्हणजे सांस्कृतिक भूदृश्य तेवढेच प्रत्यक्षात अस्तित्वात असते. वर्तमान नैसर्गिक भूदृश्य ही एक केवळ औपपत्तिक संकल्पना असून, ते वर्तमान कालात तर अस्तित्वात नाहीच, पण भूतकालातही त्याला कधी अस्तित्व नव्हते. मानव त्या भूदृश्यावर अवतरण्यापूर्वीपासून अस्तित्वात असणारे जे दृश्य ते आदिम भूदृश्य, किंवा कधीकाळी अस्तित्वात असणारे नैसर्गिक भूदृश्य. मनुष्य तेथे कधीच पोहोचला नसता तरीही आज ते तसेच राहिले असते ! विपुल मशागत केलेले युरोप, आशिया, व अमेरिका या खंडातील नैसर्गिक भूदृश्यांचा अभ्यास कोणत्याही प्रकारे करावयाचा झाला, तरी यांपैकी पहिली अवस्था बाद करणे भाग पडते ; तर दुसरी केवळ औपपत्तिक स्वरूपाची असल्याने निरीक्षणासाठी योग्य आधार मिळवून देण्याची क्षमता त्यात नसते. म्हणून, बहुतांश अभ्यासक मूळच्या भूदृश्याची, म्हणजेच आदिम भूदृश्याची पुनर्रचना करण्यावरच भर देतात. पण औपपत्तिक रूपातील वर्तमान नैसर्गिक भूदृश्य व ते आदिम भूदृश्य एकच नव्हेत हे सामान्यतः लक्षातच घेतले जात नाही.

तथापि, या सर्व लागवडी खाली असलेल्या भूक्षेत्रामधेच कधीच वापरात न आणलेले जमिनीचे काही तुकडे असतात. ते मात्र मुळच्या बनस्पतींचे नमुने आपल्यापुढे ठेवतात, असे दिसते. त्यांच्या आधाराने त्या एकूण क्षेत्राच्या मूळच्या वनस्पतिर्जीवनासंबंधीचे अनुमान आपण करू शकतो. पण, ग्राडमान व अन्य अभ्यासकांच्या उत्तर युरोपातील कार्यावरून पहाता ते तितकेसे विश्वसनीय असत नाही, हेही आपल्या लक्षात आलेले आहे. इतिहासपूर्व कालात, संपूर्ण उत्तर युरोप अरण्य-व्याप्त नव्हता खास. तसेच, वसाहती असलेल्या क्षेत्रांतून दिसणाऱ्या रानवट वनस्पतींच्या राई, त्या आदिम वनस्पतींच्या यथातथ्य स्वरूपांची प्रातिनिधिक रूपे आहेतच असे आपण गृहीत धरू शकत नाही. संयुक्त संस्थानांच्या ईशान्य भागातील पडीक शेतजमिनीवर " जेथे पूर्वी शेतजमीन होती तेथे आता नव्याने आदिम भूदृश्य वाढत असलेले दिसते " (११, ४७, अवतरणावरून), या पेंकच्या तत्संबंधीच्या प्रतिवृत्तात त्याने ' वापरलेली ' urlandschaft ही संज्ञा तिच्या नित्याच्या अर्थापेक्षा काही वेगळ्या अर्थाने उपयोजिलेली असली पाहिजे. प्रवाहांच्या घळीतील, किनारपट्ट्यांवरील आणि प्रत्यक्ष अरण्यांतील मृत्तिकांतील सेंद्रिय घटकसंचयातील फरक हे कोणत्याच प्रकारे नगण्य समजण्यासारखे नाहीत.

जगाच्या ज्या भागांत आपण रहातो त्या भागांतील या वस्तुस्थिती याच सत्य परिस्थिती आहेत, हे सर्वश्रुत आहे. मग, ज्या क्षेत्रांबद्दल आपल्याला थोडीच माहीती आहे अशा दूरच्या क्षेत्रांत ती परिस्थिती नव्हती, असे समजण्याची गरज काय ? मूळच्या वनस्पतिजातीत आणि त्यांना धारण करणाऱ्या मृत्तिकांत होणारे फरक हे प्रगतावस्थेतील शेती-पुरतेच मर्यादित आहेत, असे थोडेच आहे. सुमात्रातील मलायी लोकांनी एखादी वनस्थली सोडून केवळ एकच पिढीचा काळ लोटल्यावर, तेच स्थळ " तेथील परिणामी अरण्यातून प्रवास करणाऱ्या, पण वरील वस्तुस्थितीबाबत अज्ञानात असणाऱ्या प्रवाशास ओळखू येणे अवघड असते ", असे व्होल्स सांगत असतो ; पण, त्याबरोबरच तो एक मूक कबुली देऊन जातो : अगणित पिढ्यांच्या चक्रमालिकेतील केवळ एका पिढिच्या चक्रानेही आपला परिणाम म्हणून काही बदल मागे ठेवलेला आहे, मग तो कितीही ओझरता असो ! (२६२, १०१). मध्य आफ्रिकेच्या सखल प्रदेशांत शतकानुशतके फिरणाऱ्या तद्देशीयांच्या खनित्र-संस्कृतीने ज्यातील वनस्पतिजातीचे आणि मृत्तिकेचे स्वरूप पालटलेले नाही असे एखाद्या चौरस मैलाचे क्षेत्र तरी शिल्लक असेलच असे आपण खात्रीपूर्वक सांगू शकणार नाही. लाउटेनझाकच्या मते तर, सर्वसाधारणपणे उष्ण कटिबंधातील साव्हाना कुरणे ही " नैसर्गिक " आहेत असेही खात्रीपूर्वक सांगता येत नाही (२७८, २०).

औपपत्तिक स्वरूपातील वर्तमान नैसर्गिक भूदृश्य असो, की मानवपूर्वकालीन आदिम भूदृश्य असो, आजच्या भूगोलाभ्यासकाला असे ' नैसर्गिक भूदृश्य ' पहाण्याची अपेक्षा करता येत नाही , असाच निष्कर्ष यावरून काढावा लागतो ; आणि तसे ते पहावयास मिळालेच तर, तो जगाचा भाग अगदी अपवादात्मक समजावा लागेल. प्रत्यक्ष पहात असतानाच त्या भूदृश्यासंबंधी निर्णय घेण्याचा जो फायदा आहे, तो कधीच न पाहिलेल्या भूदृश्यावर आधारलेल्या क्रमबंधामुळे नष्ट होईल. कदाचित्, मूळच्या आणि नैसर्गिक भूदृश्यांची पुनर्घटना केल्याने, जवळपास तोच फायदा आपल्याला मिळण्याची शक्यता आहे काय ? आपल्याला तेथील मूळच्या नैसर्गिक वनस्पतिजीवनाची विश्वसनीय माहिती मिळाली, तर आपल्याला आजच्या वनस्पत्यावरणाच्या जागी त्याची कल्पना करता येणार नाही का ? फक्त, असे विश्वसनीय ज्ञान आपल्याला मिळाले तरच हे शक्य आहे.

आपल्या साहित्यात जगाच्या नैसर्गिक वनस्पतिजातीचे नकाशे घातलेले असतात हे निश्चितच ; आणि तेही थोडे थोडके नसतात. आपल्या मूलभूत हेतूच्या सिद्धीसाठी कोणते नकाशे विश्वसनीय म्हणून मान्य करावयाचे ? पासार्जच्या संप्रदायातील लेखकांनी, आणि विशेषेकरून स्वतः पासार्जनेच या अत्यंत कठीण प्रश्नाकडे फारच थोडे लक्ष पुरविले आहे. पासार्जचा क्रमबंध थोडयाफार फरकाने मान्य करूनही जेम्सने त्याचे नकाशे मात्र धूर्तपणे बाजूला ठेवले (३०५) ; हे त्याने त्याच्या वर्गीकरणाच्या औचित्याला आव्हान द्यावयाचे येवढ्याच एका कारणाने केलेले नसावे, तर नैसर्गिक वनस्पतिजातीबद्दल ज्ञात वस्तुस्थितीकडे अत्यंत मोठ्या प्रमाणात दुर्लक्ष करताना दिसतात या कारणासाठीही असावे, असे गृहीत

धरण्यास हरकत नाही.[८९] पण, जेम्स आपल्या स्वतःच्या नकाशांवरही फार विश्वास ठेवण्याचा सल्ला देणार नाही. स्वतःच्या देशातील प्रेअरीप्रदेशाच्या व दक्षिण अमेरिकेतील पंपाप्रदेशाच्या वनस्पतिजीवनाबद्दल खात्रीचे ज्ञान आपल्याला झालेले नाही हे तो ओळखून होता (३२१, २११), आणि म्हणून प्राथमिक अभ्यासकाची युक्ती त्याने आपल्या नकाशांतही योजली—म्हणजे प्रश्नचिन्हांकित कोरीजागा ठेवली—आणि तीही जगाच्या अत्यंत महत्त्वाच्या प्रदेशांपैकी एकासाठी, म्हणजेच चीनच्या जवळजवळ संपूर्ण क्षेत्रासाठी योजली. हाच जगाचा वनस्पतिजीवनदर्शक नकाशा मोठे प्रमाण घेऊन काढला असता, तर उत्तर यूरोपाच्या नकाशावर अशीच प्रश्नचिन्हे काढावी लागली असती ; कारण मनुष्याचा अवतार होण्यापूर्वीच्या तिकडील नैसर्गिक कुरणस्थलींच्या विस्ताराबाबत युरोपीय भूगोलकार आणि सहकारी अभ्यासक यांना निश्चितस्वरूपाचे ज्ञान झालेले नाही.

यात अंतर्भूत असलेली अडचण पासार्जच्या लक्षात आलेली होती, तरीही तिचे आपल्याच क्रमबंधावर होणारे मूलोच्छेदक परिणाम त्याच्या लक्षात आलेले दिसत नव्हते. " मनुष्याच्या कार्यपरिपाठामुळे संबंधित भूदृश्यावर त्याचा निर्णायक प्रभाव पडलेला असतो. त्याने त्या भूदृश्याचा तोंडवळा पूर्णपणे बदलून टाकलेला असतो. आणि अर्थातच, तेथील मूळच्या भूदृश्याची पुनर्रचना करण्याचा प्रश्न प्रत्यक्षात जितका अवघड तितकाच महत्त्वाचा होऊन बसतो " (२६८, ७१). असे असूनही, अशी पुनर्रचना करण्याची शक्यता याच विधानात सूचित केलेली आहे. तसेच, आदिम भूदृश्याची पुनर्घटना करणे जवळजवळ अशक्य होते, हे कबूल करूनही, हा प्रश्न जितका अवघड तितकाच तो आकर्षक व आवश्यक आहे ; कारण, हे मूळचे भूदृश्य हीच सांस्कृतिक भूदृश्याच्या (Kulturlandschaft) विवेचनाची आरंभरेषा आहे, असे श्ल्यूटरही मानतो (१४५, १९ f ; C/o सॉर ८४, २०२). मूळच्या भूदृश्याची पुनर्रचना हेच एका अनुसंधान कार्याचे आकर्षक अंतिमसाध्य होण्यासारखे आहे, हे मान्य केले तरी, त्यामुळे प्रादेशिक भूगोलासाठी लागणारी उपयुक्त व पायाभूत चौकट हाती येण्यासारखी आहे ? उलट, " मूळच्या भूदृश्याची " म्हणजेच इतिहासपूर्व मानवाच्या आगमनापूर्वीची ऐतिहासिक नोंद आपल्याजवळ नसल्यामुळे, त्यानंतरच्या काळात मानव व निसर्ग या दोघांनीही त्यात घडवून आणलेल्या बदलांचा शोध घेण्याची व त्यांचा अन्वयार्थ अचूकपणे लावण्याची प्रायः अनुल्लंघनीय अशी एक नवी समस्या मात्र आपल्या पुढे दत्त म्हणून उभी रहाते.

---

८९. आपण अनेक उदाहरणांपैकी फक्त एक घेऊ या. मिसिसिपीच्या दोहीबाजूला असलेली राज्यांची दुहेरी रेषा (त्यात विस्कॉन्सिन, आयोवा व मिसिसिपी यांचाही समावेश होतो). " आर्द्र स्टेप प्रदेशांत " समाविष्ट केलेली आहे. याच्या विरुद्ध, पूर्वेला अरण्य क्षेत्रे दाखविलेली आहेत. पण, उरूग्वे व अर्जेंटिना या दोन्ही देशांतील पंपा कुरणे मात्र " कोरड्या स्टेप प्रदेशात " दाखविली आहेत. त्याचप्रमाणे, वायबेललाही वस्तुस्थितींचे ढोबळपणे सामान्यीकरण केलेले आहे आणि पुष्कळ बाबतीत तर त्या चुकीच्याच दाखविलेल्या आहेत, असे आढळून आले. पण, आव्हेन्स मात्र Landschaftsgürtel (भूक्षेत्रदृश्यांचे म्हणजे प्रदेशांचे पट्टे) आश्चर्य वाटावे इतक्या काटेकोरपणाने प्रस्थापित करण्यात आले आहेत, असे त्यांचे समर्थन करतो.

मानवाने एखाद्या स्थळी प्रवेशच केला नसता, तर त्या भूदृश्याचे नैसर्गिक वनस्पतिजीवन जसे राहिले असते, तशा वनस्पतिजीवनाची पुनर्घटना करता येण्याची शक्यता नाही. तसेच, मानवपूर्वकालीन नैसर्गिक वनस्पतिजीवनाची पुनर्घटना करण्याच्या कामीही अत्यंत अडचणी येतात. म्हणूनच, वनस्पतिजीवनावर आधारलेल्या प्रादेशिक क्रमबंधाचा मोठ्या उत्साहाने पाठपुरावा करत आलेल्या अभ्यासकांनाही, अशा क्रमबंधाच्या निदान मुख्य आराखड्याशी तरी प्रामाणिक राहिल अशा रीतीने, आपला क्रमबंध विकसित करता आला नाही, या गोष्टीचे आश्चर्य वाटत नाही. प्रत्यक्षात मात्र, त्यांचे हे क्रमबंध एकेकाळी दृश्यमान असलेले वनस्पतिजीवन आणि अदृश्य असलेले हवामान यांच्या संयोगावर आधारलेले असतात. निर्जल क्षेत्रे वगळून, इतर भूमीचे वनस्पतिप्रमुख विभाग पासार्जच्या मतानुसार केलेले असतातच, पण त्याशिवाय, आपल्यास परिचित असलेल्या " उष्ण कटिबंध ", " मध्य कटिबंध " आणि " ध्रुवीय कटिबंध " असेही विभाग केलेले असतात.[९०]

त्याचप्रमाणे, जेम्सने केलेल्या प्रादेशिक वर्गवारीच्या परिभाषेमुळे त्याच्या विचारप्रवाहावर हवामान स्थितीचा पगडा असल्याचे स्पष्ट होते. त्यांच्या बाह्यदर्शनामुळे असो कि, समाविष्ट वृक्ष प्रकारांमुळे असो, ' मध्यम अक्षांशांतील मिश्र आरण्ये ' एका बाजूला ' उत्तरीय आरण्यांपेक्षा ' व दुसऱ्या बाजुला ' वृत्तान्तर्गत आरण्यापेक्षा ' वेगळी दिसतात ; हे खरे असले तरीही, हे भेद " भूपृष्ठाच्या प्रमुख रूपधेयांच्या " तोडीचे आहेत असे कोणीही मान्य करणार नाही. मध्यम अक्षांशांतील मिश्र आरण्ये आणि उत्तरीय आरण्यप्रदेश यांच्यामधील क्षेत्र गवताळ कुरणांना देऊन लावलेली विभागीय व्यवस्थाच, येथे हवामानातील फरकांचा आधार अध्याहृत आहे, या गौप्याचा स्फोट करते.

म्हणूनच, आपण हवामानांतील फरक आणि वनस्पतिजीवनांतील फरक–उदाहरणार्थ, उष्ण-निर्जल-प्रदेश विरुद्ध शीत-निर्जलप्रदेश, मध्य अक्षांशगत-प्रेअरी-कुरणे विरुद्ध मध्यअक्षांशगत-आरण्ये इत्यादि–यांच्या सापेक्ष महत्त्वाचे मूल्यमापन करणे या समस्येनेच म्हणजे, आपण चर्चेचा आरंभ जेथून केला तेथेच, तिचा समारोप करत आहोत. आपण आपल्या क्रमबंधाला काय नाव देतो, " नैसर्गिक प्रदेश " म्हणतो की " नैसर्गिक भूदृश्यांचे प्रदेश " म्हणतो, या गोष्टीला महत्त्व नाही ! आपण मुळात, विविध नैसर्गिक कसोट्यांचे मूल्यमापन ' मानवाच्या दृष्टीने त्यांचे महत्त्व ' या परिभाषेत करत आहोत. विविध नैसर्गिक घटकांचे मानवाच्या दृष्टीने असणारे सापेक्ष महत्त्व, मानव वगळून उरलेल्या, निसर्गाने निश्चित ठरवून दिलेले नाही. अर्थात, आपले सर्वच क्रमबंध मानवीजीवनावर आधारलेले असणे अटळ आहे, ही गोष्ट अनुमानाने सिद्ध होणारी आहे. म्हणूनच, या अर्थाने त्या सर्वच क्रमबंधांना कृत्रिम असे नाव देण्यास हरकत दिसत नाही.

---

९०. याबरोबर त्याचा औपपत्तिक स्वरूपातील आराखडाही पहावा (२६८, ९४ ff). आपल्या अनेकविध गुंतागुंतीचा क्रमबंध आणि त्याबरोबरच त्याची पुष्कळशी समान, पण गुंतागुंतीची परिभाषा, यांच्या जंजाळात, ग्राडमानप्रमाणेच, हा लेखकही भांबावून गेला, हे त्याला कबूलच करावे लागेल. अगदी मुरब्बी अभ्यासकांनाही हे सर्व निश्चितच जड जाते, तेव्हा नवोदितांनी याचा विचार न करावा हे बरे, असे खुद्द पासार्जनेच सुचविलेले आहे.

## ड–' निर्दिष्ट ' प्रदेशांचे क्रमबंध ; हेटनरचा जनन क्रमबंध

यापूर्वीच्या अनेक संदर्भातून, आम्ही एका गोष्टीवर वारंवार भर दिलेला आहे. भूगोलात सापेक्ष स्थान या कारकाला मूलगामी महत्त्व असते. अर्थात, ही गोष्ट लक्षात न घेणारा कोणताही प्रादेशिक विभागणीचा क्रमबंध लक्षात भरण्याइतका अपूर्ण रहाणार ही गोष्ट निःसंशय आहे (c/o हासिंजर २७५, ४७४ ff ; क्रेब्ज २३४, ९४ ; लाउटेनझाक २६३, १९५ ff ; वाइबेल २६६, २०४). या कारकाचा विचार करावयाचे ठरविले, की परस्परांच्या संदर्भात प्रदेशाप्रदेशांच्या सापेक्ष स्थानाला महत्त्व प्राप्त होते, आणि आंतरिक लक्षणांवर आधारित प्रकारांऐवजी, नकाशावर जसे असतात त्या पद्धतीने प्रदेशांची विभागणी करणारा क्रमबंध आपल्याला मिळतो. या क्रमबंधासाठी तौलनिक क्रमबंधाच्या विरुद्ध स्वरूपाची म्हणजेच ' सत्यस्थितीवर आधारित ' विभागणी वापरलेली असते, असे म्हणता येईल. ब्रिटिश भूगोलकारांच्या सूचनेनुसार, अशी क्षेत्रे ' निर्दिष्ट ' प्रदेश असतात, प्रजाती प्रकारांचे प्रदेश असत नाहीत (३१०, २५४).

प्रत्येक व्यावसायिक भूगोलकाराने एखाद्या खंडप्राय विस्तृत क्षेत्राचे विशिष्ट प्रदेशांत विभाग पाडण्याचा प्रयत्न केलेला असतो, यात शंका नाही. मग, असे एखादे क्षेत्र, किंवा एखादे खंड, किंवा कोणतेही विस्तृत क्षेत्र, किंबहुना, सर्व जग विभागण्याचे कामी समर्थपणे मार्गदर्शन करू शकेल असे कोणते तत्त्व, अथवा कोणती तत्त्वे, आपण विचारात घेणे आवश्यक असते ?

कोणत्याही क्षेत्राची प्रदेशांत विभागणी करत असताना, केवळ त्यांच्या काही भागांचे स्पष्ट दिसणारे भिन्नस्वरूप लक्षात घेऊन, आणि अर्थातच अधिक अस्पष्ट असणाऱ्या स्वरूपांकडे दुर्लक्ष करून, काम भागत नाही. बरेचसे अपूर्ण अभ्यास ' केंद्र ' प्रदेशापुरते, अथवा ' मध्यगत ' प्रदेशापुरतेच, मर्यादित असू शकतात. कारण, असे प्रदेश हे भिन्न पण अस्पष्ट असणाऱ्या अन्य प्रदेशांपेक्षा अधिक भौगोलिक महत्त्वाचे असतात, हे एक विवाद्य प्रमेय या ठिकाणी गृहीत धरलेले असते. पण, जो अभ्यास त्या क्षेत्राच्या प्रत्येक भागाभागाकडे लक्ष पुरवितो तोच अभ्यास परिपूर्ण आहे असे म्हणता येईल. म्हणजेच, स्वैर असल्या तरी निश्चित स्वरूपाच्या मर्यादा दर दोन प्रदेशांमध्ये आखून देण्याच्या प्रश्नाला, सुरुवातीला असो की शेवटी असो, केव्हातरी त्या अभ्यासकाला तोंड द्यावेच लागते, (२८७, १०६). " संक्रमण पट्ट्यांचा " उपाय योजूनही ही अडचण दूर करता येत नाही, कारण असे पट्टे हेही स्वतंत्र क्षेत्रे असतात, आणि त्यामुळेच, त्यांच्याही मर्यादा घालून देणे भाग पडते (संयुक्तसंस्थानांच्या मध्य-वायव्य-भागातील शेतीप्रधान प्रदेशांचा जोन्सकृत नकाशा निर्दिष्ट मर्यादा असलेल्या संक्रमणपट्ट्यांच्या अचूक उपयोगाचे उदाहरण म्हणून पहावा) (२८३).*

* पुरवणी टीप क्रमांक ४२ पहा.

जगाची विशिष्ट प्रदेशांत विभागणी करण्याच्या प्रश्नाचा अगदी सर्वांगीण अभ्यास हेटनरने केलेला आहे, आणि आम्ही त्यातून वारंवार संदर्भही घेत आलो आहोत (३००). जगाचे विदग्ध स्वरूप लक्षात घेऊन, सर्वच सत्यस्थितींवर आधारलेली विभागणी कोणत्याही एका तत्त्वानुसार करता येणे शक्य नाही, तर अनेक आधारभूततत्त्वांच्या संयोगावरच ती उभारता येईल, हे त्याला कळून चुकले होते. अर्थात्, विविध आधारांचा तौलनिक अभ्यास करून त्यांच्या सापेक्ष महत्त्वाचे मापन करणे हीच खरी समस्या असते (१०६). म्हणून, असे अनुमान निघते, की त्यांच्या महत्त्वांशाचे मापन त्यांचा सजीव सृष्टीवर, आणि विशेषेकरून मानवावर, होणाऱ्या परिणामांच्या भाषेतच करणे प्राप्त असते.

यात गुंतून पडणाऱ्या असंख्य कारकांच्या महत्तेचा क्रम कसा लावावयाचा ? कदाचित्, एका मुद्यावर संपूर्णपणे एकमत व्हावयास काहीच हरकत नाही. केवळ मानवाच्याच नव्हे तर बहुतेक सर्वच सजीव सृष्टीच्या दृष्टीने समुद्राशेजारी जमिनीचे अस्तित्व असणे, ही गोष्ट प्राथमिक महत्त्वाची आहे. विभागणीचे बहुतेक सर्व क्रमबंधांचे लक्ष भूभागांच्या विभागणीवरच केंद्रित झालेले असते ; हे खरे असले तरीही, कोणत्याही निर्दिष्ट प्रदेशांच्या सत्यस्थितीनिष्ठ क्रमबंधातील पहिल्या क्रमांकाचे प्रदेश केवळ याच एका वैशिष्ट्यावर, म्हणजेच ते फक्त खण्डांच्या भूभागांनीच दाखविले गेले पाहिजेत या तत्त्वावर, आधारलेले असणे आवश्यकच आहे का, हा प्रश्न वादाचा आहे. लहानसहान सागरांनी विभक्त केलेल्या काही विशिष्ट क्षेत्रांतील साम्य लक्षात घेऊन, उदाहरणार्थ– भूमध्यसमुद्राभोवतालचा प्रदेश, कॅरिबियन समुद्राभोवतालचा प्रदेश,–आणि हे सागर किती मोठ्या प्रमाणात विभाजनाबरोबरच संयोजनाचेही कार्य करतात हे लक्षात घेऊन, बान्झेसारख्या काही अभ्यासकांनी रूढ खंडनिष्ठ विभागणीला फाटा दिला, आणि अनेक कारकांच्या संयोगांशी संबंधित असलेली एक निराळीच विभागणी पद्धती मान्य केली. अर्थात, कोणतीही पद्धती स्वीकारली, तरी तिचे परिणाम पूर्णपणे समाधानकारक असतीलच असे नाही.

तूर्त, आपण आपले लक्ष भूभागांवरच केंद्रित केले, तरी जगाच्या सर्व भागांना सारखाच लागू पडेल असा त्यातील विविध घटकांच्या महत्त्वांचा कोणताच क्रम निश्चित असल्याचे दिसत नाही. एका विभागात हवामानांतील फरक अधिक महत्त्वाचे असतात, तर दुसऱ्यात जमिनीच्या उंचसखलपणाचे फरक अधिक महत्त्वाचे असतात, आणि तिसऱ्यात मृत्तिका, खनिजसाठे, तर आणखी कोठे केवळ सापेक्ष स्थानाला महत्त्व असते, (c/o माइस्लर २७७, ६१ ; लाउटेनझाक २७८, १९). परिणाम असा होतो, की जगाच्या निरनिराळ्या विभागात विभागणीची निरनिराळी कारणे दाखवावी लागतात. पण कोणत्याही एका भागापुरताच विचार केला जात असतो, तेव्हा एकाच प्रकारच्या कारणांचे समर्थन करणे तर्कदृष्ट्या आवश्यक असते, असा युक्तिवाद हेटनरने केला आहे. याविरुद्ध काही बाबतीत, एकाच प्रदेशाला

मान्यता देताना अनेक प्रकारच्या कारणांचा संयोगही करावा लागेल. उदाहरणार्थ स्पेनचे द्वीपकल्प हा एक मोठ्या आकाराचा पोटविभाग वेगळा केला जातो, याचे कारण तीन बाजूला असलेला समुद्र व चवथ्या बाजूला असलेला पर्वत याचा मिळून झालेले विभाजक परिणाम. सागर व एक भूम्याकारप्रकार हे वास्तविक परस्परविरोधी घटक असूनही, ते येथे एकत्र मान्य करावेच लागतात.

शिवाय एकच कारक दुहेरी कार्य करत असण्याचीही शक्यता असते. पिरिनीज पर्वतामुळे दोन प्रमुख विभाग विभक्त केले गेले आहेत, पण त्यांचा स्वतःचाच एक पोटविभाग तयार झालेला आहे. ही अडचण दूर करण्यासाठी व याचे उत्तर शोधण्यासाठी अनेकांनी डोके खाजविलेले आहे; पण, आपण एक वर्तुळाकार चौकोन तयार करण्याचा व्यर्थ खटाटोप करतो आहोत हे काही त्यांच्या लक्षात येत नाही (१०६). यावर, प्रमुख पोटविभागांची विभागणी करणारी रेषा पर्वतप्रदेशामधून काढावयाची, पण लहान पोटविभागांचे प्रतिपादन करत असता, एकूण पर्वतक्षेत्राचा विचार मात्र एकत्रच करावयाचा, येवढा एकच मार्ग या अडचणीतून सुटका करणारा आहे. ही पद्धत तर्कनिष्ठ क्रमबंधाच्या चाकोरीत बसत नाही, असा आक्षेप कोणी वाचक यावर घेतील, तर त्याला उत्तर येवढेच, की हा दोष कोणाचा असेलच तर तो पृथ्वीचा आहे. अनेक महत्त्वाच्या बाबतीत पिरीनीज हा सगळा मिळून एक सजातीय प्रदेश आहे, या गोष्टीला मान्यता देणे प्राप्त असले, तरी त्याचे दक्षिण उतार हे स्पेन द्वीपकल्प या प्रमुख विभागाचा एक पोटविभाग आहेत, या गोष्टीलाही सर्वच सत्यस्थितिनिष्ठ अभ्यासांत मान्यता द्यावी लागेल.

ज्यांचे सापेक्ष महत्त्व स्थलपरत्वे खूपच बदलत जाते अशा पुष्कळशा घटकांवर आधारलेल्या विभागणीचा क्रमबंध एखाद्याला हतबुद्ध करून टाकण्याइतका गुंतागुंतीचा असेल, असे वाटण्याची शक्यता आहे. पण, हे सर्वच घटक काही पूर्णतया स्वतंत्र असत नाहीत. अशास्थितीत, त्यांच्या अन्योन्य संबंधांच्या अभ्यासातून एखादा सोपासा आधार आपल्या हाती लागण्यासारखा नाही का ? याबाबतीत, हेटनरचा युक्तिवाद असा आहे : " विभागणीचा प्रत्येक सत्यस्थितिनिष्ठ क्रमबंध उत्पत्तिसंबंधित असलाच पाहिजे, म्हणजेच सत्यस्थितीत असलेले सर्व कार्यकारण संबंध त्याने दाखवून दिलेले असले पाहिजेत ; पृथ्वीच्या सृजनशील शक्तींचा शोध त्याने घेतला पाहिजे. या सर्व शक्तींचा संयुक्त प्रभाव पृथ्वीपृष्ठावर कोणत्याप्रकारे पडत गेल्यामुळे, अंती ही भूपृष्ठरूपी घटना घडली, हे त्याने समजून देण्याचा प्रयत्न केला पाहिजे. त्याचप्रमाणे, त्या क्रमबंधाने एखाद्या मानसचित्राच्या सहाय्याने या पार्थिव चक्रव्यूहाचा पुनःप्रत्यय घेण्यास मदत केली पाहिजे, व त्यातूनच त्याच्या वेगवेगळ्या भागांच्या व स्थळांच्या स्वरूपांची व महत्त्वांची चांगली समज करून घेण्यासही मदत झाली पाहिजे. " (१६१, ३०८). उत्पत्तिसंबंधी क्रमबंधातूनच प्रादेशिक क्रमबंधाला आवश्यक असलेला क्रम आपल्या हाती लागण्याची शक्यता आहे, असाच निष्कर्ष फिलिप्सनही काढतो (१४३, १३).

विविध भौगोलिक रूपधेये ही मूलभूत हेत्वर्थक कारकांची कार्ये आहेत, या गोष्टीचा विचार कोणत्या मर्यादेपर्यंत करणे आपल्यास शक्य होणार आहे ? अशा प्रकारच्या हेत्वर्थक कारकांपैकी कितींना स्वतंत्र कारके म्हणून मान्यता देणे आवश्यक आहे ? सर्व मानवी घटकांतील बदल नैसर्गिक घटकांच्या परिभाषेत आपल्यास स्पष्ट करून दाखविणे आवश्यक आहे, असे क्षणभर गृहीत धरले तर, तात्त्विकदृष्ट्या आपल्यास असेही मानावे लागेल, भूपृष्ठावरील एकूण भेदाभेद–म्हणजेच जगाचा एकूण भूगोल–दोन चलांवर अवलंबून आहेत. जगाच्या विविधभागांत बदलत जाणारा सूर्याच्या किरणांचा कोन हा एक चल, आणि अति-भिन्नरूपांनी युक्त असे भूकवच निर्माण करणाऱ्या भूगर्भस्थशक्ती हा दुसरा. भूपृष्ठ निर्मिती करणाऱ्या या मौलीक शक्तींचा अभ्यास करणे हे भूगोलाचे कार्य आहे-असेही आपण गृहीत धरले, तरी विविध भूक्षेत्रांतून आढळणाऱ्या रूपधेयांच्या विशिष्ट संयोगांची निर्मिती करण्याची पद्धती इतकी न उकलण्यासारख्या गुंतागुंतीचीआहे, की अशा विवेचनांतून आपल्या मनःपटलावर पृथ्वीवरच्या क्षेत्रांची संगती लावण्याचा एखादा कार्यशील आधार उमटण्याची आशा करता येणार नाही, ही गोष्टही उघड आहे. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर, भूक्षेत्रे व सागरीक्षेत्रे, भूम्याकार, पायाभूत खडक, खनिजसाठे, मृत्तिका व वनस्पती इत्यादी सर्वच त्या वर सांगितलेल्या दोन मूलभूत शक्तींचे बदलत्या स्वरूपांतील आविष्कार आहेत, ही गोष्ट आपण मान्यच करतो. पण, भूगोलकार मात्र त्यांना उत्पादित वस्तू मानत नाहीत, तर ती मौलिक कारकेच आहेत असे मानून, त्यांच्यापासून अभ्यासाची सुरुवात करतात. यात अपुरेपण आहे असे म्हणणे म्हणजे कोणतेच शास्त्र आपल्यापरीने कधीच पूर्ण असू शकत नाही, तर एकच एक जे विश्वशास्त्र त्याची केवळ एक शाखा असते, या सत्याची आठवण आपण आपल्यालाच करून देण्यासारखे आहे. या प्रत्येक शाखेत, आपल्या प्रश्नाचे विश्लेषण मूलभूत घनाणु व ऋणाणु यांच्यापर्यंत नेऊन पोहोचविणे आपल्यास शक्य होत नाही. " कोणत्या घटकाला मौल मानावे हा सापेक्ष विचार आहे. अभ्यासाची प्रत्येक शास्त्रीय शाखा आपापल्या व्यावहारिक व शास्त्रीय गरजा लक्षात घेऊन त्यासंबंधीचे निर्णय प्रत्येक बाबतीत घेतच असते, " असा हेलपाकने निष्कर्ष काढलेला आहे (१३९, ३५१).

बहुतेक सर्व भौगोलिक भेदांचे स्पष्टीकरण तीन मूलभूत प्रभावक्षेत्रांच्या परिभाषेत उत्पत्तिसंबंध पद्धतीने देण्याची हेटनरची कल्पना होती : (१) जमिनीचा सागराशी असलेला संबंध, (२) जमिनीची आंतर रचना आणि बाह्याकार, आणि (३) हवामानातील भेदाभेद. मात्र यांपैकी कोणत्याही एकाचे दुसऱ्या दोघांच्या परिभाषेत मोठ्या प्रमाणात स्पष्टीकरण देण्याचा प्रयत्न करावयाचा नाही.

याचा परिणाम म्हणून निर्माण होणाऱ्या अडचणी एकाच उदाहरणाने स्पष्ट करून दाखविण्यास हरकत नाही. यूरोपची प्रमुख प्रदेशांत विभागणी करत असताना, हवामानातील भेदापेक्षा भूम्याकारांतील भेद हे अधिक महत्त्वाचे आहेत असा हेटनरने निर्णय घेतला ; तर आस्ट्रेलिया व आफ्रिका यांच्या बाबतीत मात्र हवामानातील भेदच अधिक

महत्त्वाचे आहेत असे त्याला आढळून आले. या त्याच्या निर्णयांना सर्वसाधारणपणे मान्यता मिळेल, असे गृहीत धरण्यास हरकत नाही. पण, अमेरिकेतही भूम्याकारांनाच हवामानापेक्षा अधिक महत्त्व आहे या त्याच्या निष्कर्षावर अमेरिकी भूगोलकार जोरकस आक्षेप घेऊ इच्छितात, कारण त्यामुळे आटलांटिक किनाऱ्याकडील प्रदेश याच्या विरुद्ध मिसिसिपी खोरे हा प्रमुख प्रदेश म्हणून मानावा लागतो. (३०० ; तसेच त्याचे Länderkunde पान ३०१).[९१] * उलटपक्षी, कोणत्याही युक्तिवादाच्या आधारे हा निष्कर्ष चुकीचा आहे असे म्हणता येणार नाही, किंवा याच्या विरुद्ध विधानच बरोबर आहे असेही आपण म्हणू शकणार नाही. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे झाले तर, वैयक्तिक निर्णयापासून मुक्त आहे अशा एखाद्या क्रमबंधाचा मार्ग या उत्पत्तिसंबंधी तत्त्वाच्या मदतीने मिळण्यासारखा नाही ; आणि हेटनरने तशा अर्थाचे स्पष्ट विधानही केलेले आहे.

खरे पहाता, हेटनर मान्य करतो त्यापेक्षाही, प्रस्तुत लेखकाला ही परिस्थिती अधिकच गुंतागुंतीची असावी असे वाटते. हेटनरच्या एकूण चर्चेचे बारकाईने विश्लेषण केले, तर मूलतः स्वतंत्रकारक म्हणून लक्षात घेणे आवश्यक होऊन बसतात अशा, रूपधेयांची एकूण संख्या तीनपेक्षा कितीतरी अधिक आहे. " जमिनीची अंतस्थरचना व तिचे बाह्याकार " हे एकाच कारकाचे आविष्कार आहेत ही गोष्ट पटणारी नाही. पायाभूत खडकांचे स्वरूप–मृत्तिकांचे ज्ञान होण्याचा दृष्टीने आवश्यक असलेला कारक–आणि भूम्याकारांचे स्वरूप यांचा एकच कारक म्हणून एकत्र विचार करता येणार नाही. तसेच, आमच्या हेतूंच्या दृष्टीने विचार करता, भूकवचांतर्गत खनिजसंचय हे या दोनही कारकांपासून स्वतंत्रच आहेत. अनेक मौलिक कारकांचा एकत्र उल्लेख करण्यासाठी आपण सोईस्करपणे हवामान हा शब्द वापरतो. विशेषेकरून, तपमान व वर्षावमान यांचा वेगवेगळा विचार करणेच आवश्यक आहे.–निदान, हवामानाचे वर्गीकरण करण्याचे एकच एक समाधानकारक उत्पत्तिसंबंधी आधारतत्त्व आपल्याला सापडत नाही, तोपर्यंत तरी आवश्यक आहे. शिवाय, भौगोलिक सापेक्षस्थानांतील फरकांमुळे (यांचे महत्त्व हेटनरनेही मान्य केलेले आहे) परिस्थितींच्या अन्यथा एकरूप संयोगांना परिणामी रूपधेयांत अगदी वेगळे आविष्कार घ्यावे लागतात–उदाहरणार्थ अरबस्तानच्या वाळवंटात निवडुंग येत नाही. शेवटी,

९१. वायबेलने केलेले अधिक सामान्य विधानही लक्षात घेण्यासारखे आहे : " भूपृष्ठासंबंधीची सर्वात महत्त्वाची घटना जमिनीचा उंचसखलपणा हीच आहे आणि सर्व जीवनाचाच तो पाया आहे. " (२६६, २००). अशा प्रकारचे विधान मध्ययुरोपच्या पार्श्वभूमीवर सहज समजण्यासारखे आहे. विविध देशांत भूगोलशास्त्राच्या झालेल्या विकासावर नैसर्गिक पर्यावरणाचा पडणारा प्रभाव, या विषयावर व्हिटल्सेने एकदा चर्चा केली होती (३९९). जर्मनीतील भूगोलकारांनी भूम्याकारशास्त्राकडे दिलेले अधिकतर लक्ष हे त्याच विषयाचे दुसरे उदाहरण आहे. *

*पुरवणी टीप क्रमांक ४३ पहा.

आपल्याला अभ्यासाच्या प्राथमिक अवस्थेतच मानवी घटकांचे निश्चयन नैसर्गिक परिसराच्या आधारे करण्याचा ' अव्यापारेषु व्यापार ' करावयाचा नसेल, तर आपल्याला काही मानवी घटकांना–उदाहरणार्थ : रूढिभेद, विकासावस्था, इ.–क्षेत्रीय भेद निर्माण करणाऱ्या प्राथमिक कारकांमध्ये स्थान देणे प्राप्त आहे.*

म्हणूनच, कोणताही प्रादेशिक विभागणीचा क्रमबंध संपूर्णपणे उत्पत्तिसंबंधित असू शकणार नाही. प्रादेशिक भूगोलासाठी एक पायाभूत संदर्भ चौकट तयार करण्याचा प्रयत्न करत राहिलो, तर सर्वच घटकांचा मागोवा त्यांच्या उगमापर्यंत घेणे आपल्यास शक्य होत नाही ; आणि तसा प्रयत्न केलाच तर, त्यांची उगमस्थाने अनेक व स्वतंत्र असल्याचे आढळून येईल. हा निष्कर्ष थोडा तापदायक वाटला तरी मान्यकरणेच प्राप्त आहे. कोणत्याही एका विशिष्ट क्षेत्रातील सर्व घटकांचा मागोवा एका सर्वसाधारण उगमापर्यंत घेणे शक्य झाले असते, आणि तसेच दुसऱ्या क्षेत्रातील घटकांचा दुसऱ्या एका उगमापर्यंत मागोवा घेणे शक्य झाले असते–ज्या अर्थाने जीवशास्त्रविषयक सावयवाचा घेता येतो तसा–तर शेवटी, उत्पत्तितत्त्वच अशा एखाद्या क्रमबंधाचा मार्ग दाखवू शकले असते, की त्याची तुलना जीवशास्त्रांनी मान्यता दिलेल्या वर्गीकरण पद्धतीशी करता आली असती. पण सुरुवातीपासूनच आपल्या लक्षात येऊन चुकले आहे, की या बाबतीत ते खासच शक्य नाही. एखादे क्षेत्र आणि एक सजीव यांच्यामधील भेद दाखविणारी ही सर्वात महत्त्वाची बाब आहे, हेही आपल्या नजरेस आले आहे. उत्पत्तिविषयक पद्धतीचा वापर केल्याने जरी विचारात घ्याव्या लागणाऱ्या स्वतंत्र घटकांची संख्या कमी होणारी असली, तरी त्यानंतरही आपल्याला वेगवेगळ्या घटकांचा विचार करत बसावा लागणारच आहे. अशा स्थितीत, उत्पत्तितत्त्वच अत्यावश्यक का मानले जावे हे, निदान प्रस्तुत लेखकाला तरी, उमगलेले नाही.

उलटपक्षी, उत्पत्तितत्त्वाचा आग्रह धरण्यामुळे आपल्यापुढे गंभीर समस्या उभ्या रहातात असे मानण्यास पुरेशी कारणे आहेत. प्रादेशिक विभागणीच्या क्रमबंधात मानवी अथवा सांस्कृतिक घटनांच्या संबंधांचा आपण विचार करू लागतो, तेव्हा या अडचणी अगदी स्पष्ट दिसू लागतात. उत्पत्तिविषयक स्पष्टीकरणांत मानवी कार्ये–उदाहरणार्थ विशिष्ट रूढी–ही, मोठ्या प्रमाणात कशाचे तरी परिणाम आहेत, असे दाखविता आले असे गृहीत धरले ; तसेच पुष्कळसे मानवीकारक पुष्कळशा रूपधेयांच्या विकासकार्यातील कारणीभूत कारके असतात, तेव्हा ही कारणे स्वतःच अमानवी कारणांचे परिणाम असतात, असे त्याचे स्पष्टीकरण देता येईल अशी कल्पना केली ; तरी ते प्रत्यक्ष परिस्थितीने दाखवून देणे आपल्याला क्वचितच शक्य आहे ! मानवी घटक ही नैसर्गिक घटकांची निर्मितीच आहे, असे स्पष्टीकरणे देणे शक्य आहे, ही औपपत्तिक शक्यता तत्त्वज्ञानदृष्ट्या गृहीतधरून त्या आधारावर तर हेटनरने आपला क्रमबंध रचला नाहीना, असा प्रश्न उपस्थित करणे औचित्यपूर्ण ठरण्याची येथे शक्यता आहे. " शास्त्र हे शास्त्र या नात्याने निर्णयात्मकच असले पाहिजे " असा आग्रह

*पुरवणी टीप क्र. ४४ पहा.

हेटनर धरत असे (१३०, ४११ f ; १७६). म्हणूनच मौलने त्यावर योग्य प्रश्न विचारला " असेच का ? " (१७९, १८२ f). सत्यस्थिती त्याला जशी आढळेल तसा तिचा अभ्यास करणे हा शास्त्राचा व्यवसाय आहे. निश्चयवादात्मक साध्य प्रमेयाला सत्याचा आधार आहे ही गोष्ट अगदीच नाकबूल करता येण्यासारखी नसली, तरी ते मूलभूत गृहीत प्रमेय म्हणून मान्य करण्याइतके विश्वसनीय आहे काय, याबाबत अलिकडच्या अनेक अभ्यासकांनी शंका व्यक्त केली आहे.[९२]

कोणत्याही परिस्थितीत या तत्त्वज्ञानविषयक प्रश्नाचे महत्त्व, भूगोलाच्या दृष्टीने तरी, केवळ शैक्षणिक स्वरूपाचेच असल्याचे दिसून येईल. मानवी घटना आणि अमानवी घटना यांच्या अन्योन्य-संबंधांचे मूलभूत स्वरूप काहीही असो, भूगोलात ज्याप्रकारे ते सादर केले जात असतात ते सहसा अगदी गुंतागुंतीच्या स्वरूपात असतात येवढे खरे. शतकांच्याच काय पण वर्ष सहस्त्रकांच्या ऐतिहासिक, पण कोणतीच नोंद न केलेल्या, उत्क्रांतीतून ते निर्माण झालेले असतात. साहजीकच, त्यांचे स्पष्टीकरण देण्याची आशा करणेही अशक्य होते. म्हणून भूगोलाच्या सर्व व्यावहारिक हेतूंसाठी निदान काही महत्त्वाच्या मानवी घटनांना स्वतंत्र घटक म्हणूनच मान्यता द्यावी लागते. उलटपक्षी, अन्य काही मानवी घटना अशा असतात,–उदाहरणार्थ, जमिनीचा वापर–, की त्यांचा अभ्यास नैसर्गिक घटनांच्या संदर्भात करणे शक्य असते ; आणि त्याबरोबरच, अशा घटकस्वरूप, पण अप्रतिपाद्य, मानवी घटनांच्या संदर्भातही त्यांचा अभ्यास करता येतो. " सुरुवातीपासूनच मानवी घटनांना विभागणीचे आधारतत्त्व म्हणून मान्यता न देता, व कोणताही पूर्वग्रह न बाळगता, " नैसर्गिक विभागणीच्या " या चौकटीत त्यांचा विचार केला, तर भौगोलिक महत्त्वाच्या निसर्गप्रभावित मानवी घटना आपल्याला स्पष्टपणे उमगण्याची शक्यता आहे. (नैसर्गिक विभागणी शेवटी अमानवी कारकांवर आधारलेली तर्कनिष्ठ उत्पत्तिसंबंधित विभागणी आहे) (३००, १०६, १६१, ३१४ मध्ये याचीच आवृत्ती).

निसर्गप्रभावित भौगोलिक मानवी घटनांच्या अभ्यासांवर आधारलेली प्रादेशिक भूगोलासाठी केलेली चौकट आरंभापासून भांडे लपवून ताक मागण्याच्या उद्योगाला लागेल, यात शंका नाही. कारण, ती चौकट संदर्भाचे काम करू शकणार नाही, तर ती एका अंतिम निष्कर्षाची जागा घेईल. अशा स्थितीत, एखाद्या घटनेचा " नैसर्गिक विभागणीच्या चौकटीत पूर्वग्रहमुक्त राहून " विचार करणे शक्य होईल का ? (" unbefangen in Rahmen einer naturlichen Einteilung "). नैसर्गिक प्रभावांनी निश्चित केलेल्या विशिष्ट

---

९२. " Der zerfall der kausalitat und die Geographie " (१८१). (" निश्चयवादाचा आपत्काल व भूगोल ") या नावाच्या लेहमानने लिहिलेल्या अभ्यासग्रंथाचा या संदर्भात विशेष उल्लेख करण्यासारखा आहे. त्यात या आणि भूगोलातील अन्य प्रचलित प्रश्नांवर परखड विचार व्यक्त केले आहेत, पण त्याकडे माझे लक्ष फारच उशीरा वेधले गेल्यामुळे, मला त्या ग्रंथाचा चांगला उपयोग करून घेता आला नाही.

चौकटीत मानवी घटना बसविण्याचा केवळ प्रयत्नच त्यांच्या संबंधीचा " नैसर्गिक प्रभावाचा " विचार पूर्वग्रहदूषित करण्यास पुरेसा नाही का ? या उलट, आपली चौकट जर केवळ भौगोलिक मानवी घटनांवर आधारलेली असेल–म्हणजे, त्यांच्यावरील निसर्गप्रभाव लक्षातच घ्यावयाचा नसेल–तर मात्र त्या घटनांचा नैसर्गिक परिस्थितींच्या संदर्भात पूर्वग्रहमुक्त राहून विचार करणे शक्य होईल.

ज्यांनी विस्तृत क्षेत्रांची विभागणी निर्दिष्ट प्रदेशांत करण्याचा प्रयत्न केला आहे अशा हेटनरच्या पुष्कळशा अनुयायांनी या विशिष्ट मुद्यावर त्याला विरोध केला आहे. तत्त्वतः ते कोणताही कारक वगळत नाहीत, तर सर्वच महत्त्वाच्या कारकांवर आपली विभागणी आधारण्याचा प्रयत्न करतात. असे करताना, हे घटक नैसर्गिक आहेत, की मानवी आहेत, याचा ते विचार करत नाहीत, इतकेच काय, भाषेसारख्या अमूर्त कारकांचाही ते पुष्कळ बाबतीत अंतर्भाव करतात. पण, अशा प्रकारच्या क्रमबंधात उत्पत्तिविषयक तत्त्वाचा पाठपुरावा करणे शक्य होत नाही. त्यामुळे, प्रत्येक विशिष्ट कारकाला द्यावयाचे सापेक्ष महत्त्व किती असावे हे व्यक्तिनिष्ठ दृष्टीतून ठरविण्याचा प्रश्न अधिकच व्यापक होतो. शिवाय, त्यांच्या हेही लक्षात येते, अशा अधारांवर व्याख्याबद्ध केलेले प्रदेश टिकाऊ नसतात, तर कालाच्या ओघात ते बदलत असतात. (ज्यांनी शास्त्रशुद्ध उदाहरणे देऊन या प्रश्नाचा उहापोह केला आहे अशा पुष्कळ लेखकांतून पुढील यादी देता येईल : हासिंजर (२४५ ;१४१), ग्राडमान (३०३ ; १४४ ;२३६), मौल (२२८), झ्योल्त्स (२३७, २५ ff), लाउटेनझाक (२६३ ; २७८), आणि ब्यूर्गर (११, ५१ ते ५३). शिवाय ब्यूर्गरने पुढील यादी दिली आहे : फ्रीडरिक्सन, हासर्ट, माशात्शेक, ए. झ्यूल्त्स आणि ट्रोल).

हेटनरच्या या क्रमबंधातून भूपृष्ठाची एक सापेक्षतः नित्यस्वरूपाची विभागणी करण्याचा मार्ग शेवटी सापडण्याची शक्यता आहे. तरी तो प्रस्थापित करण्यासाठी त्यात उपयोगात आणावयाच्या घटकांविषयींचे व त्यांच्या संबंधयोगांविषयींचे आजपावेतो आपल्याला झाले आहे त्याहून कितीतरी अधिक व अचूक ज्ञान असणे आवश्यक आहे. म्हणजे, असा क्रमबंध हे भौगोलिक कार्याचे ध्येय ठरेल, तो त्याचा आधार होणार नाही ; आणि तेच ठरविण्याचा हेटनरचाही हेतू होता, याबद्दल संशय नसावा. आमच्या स्वतःच्याच खंडाची त्याने केलेली विभागणी आम्ही अमान्य करण्याची शक्यता आहे ; पण या गोष्टीला फार महत्त्व देण्याचे कारण नाही. उलट, त्यानेच घालून दिलेल्या तत्त्वांच्या पायावर त्याच्याच इमारतीची पूनर्रचना, अधिक हेतुपूर्ण परिणाम संपन्न करण्यासाठी, करणे समर्थनीय ठरेल. कोणत्याही परिस्थितीत, उपपत्ती व कार्यपूर्ती या दोन्हीप्रकारे, केवळ एकदोन प्रमुख घटकांनाच नव्हे तर मानवाच्या दृष्टीने महत्त्वाच्या असणाऱ्या सर्व घटकांना न्याय देण्याचा प्रयत्न करणारा असा फक्त एकच, म्हणजे त्याचाच, क्रमबंध आहे. आतापर्यंत सुचविलेल्या अगर रचलेल्या अन्य क्रमबंधांचे आपले परीक्षण पूर्ण झाले म्हणजे कोणत्याही क्षेत्रातील महत्त्वाच्या सर्व रूपधेयांचा विचार करण्यासाठी संदर्भचौकट म्हणून उपयोगी पडेल असा एकच एक क्रमबंध फक्त हेटनरने सादर केलेला आहे, असा निष्कर्ष आपल्यास काढणे सोयीचे होते.*

* हे शेवटचे वाक्य धड स्पष्ट नाही किंवा आवश्यक नाही. ते गाळणेच इष्ट.

## इ—नैसर्गिक पर्यावरणाच्या घटकांवर आधारलेल्या प्रदेशांचे तौलनिक क्रमबंध

ज्या प्रकारच्या क्रमबंधांची आपण चर्चा करत होतो त्याप्रकारच्या क्रमबंधांत, म्हणजेच ' सत्यस्थितिनिष्ठ क्रमबंधांत ', प्रत्येक प्रदेश आपल्यापरीने अपूर्व मानला जात असतो, आणि त्यांच्या प्रत्यक्ष संबंधयोगांनुरूप त्यांचे साहचर्य निर्माण केलेले असते. अशा प्रकारच्या क्रमबंधांत, एकमेकांपासून पुष्कळ दूर असलेल्या, पण काही घटकापुरत्या लक्षणीय सादृश्य दाखविणाऱ्या, प्रदेशांच्या सादृश्यांबरोबरच त्यांच्यांतील भेदाचाही अभ्यास करणे अगदी शक्य असते. या अर्थाने तौलनिक प्रादेशिक अभ्यास ही काही नवी गोष्ट नव्हे, हे हेटनर व अन्य लेखकांनी दाखवून दिलेले आहे (१६७, २८४ ते २८६). विरुद्धपक्षी, एखाद्या क्रमबंधात, प्रदेशांचे सापेक्ष स्थान लक्षात न घेता, त्याच्यांत दिसणाऱ्या काही विशिष्ट प्रमुख सादृश्यांवर प्रादेशिक विभागणी आधारलेली असू शकते. अशा क्रमबंधात प्रदेशांची विभागणी त्यांच्यातील अपूर्व सत्यस्थितीवर आधारलेली नसून, ज्यांची सहज वर्गवारी करता येईल अशा प्रकारांच्या परिभाषेत ही विभागणी केलेली असते. साहजीकच, त्यांचा तौलनिक अभ्यास करणे त्यामुळे सुलभच होते. म्हणूनच, मी या क्रमबंधाला जातिनिष्ठ प्रदेशांत जगाची विभागणी करणारा " तौलनिक क्रमबंध " असे नाव दिलेले आहे.

ज्या तौलनिक क्रमबंधांचा आपण विचार करणार आहोत त्यात, जगाची एक प्रमुख विभागणी सर्वमान्य आहे : जमीन व सागर यांची विभागणी ; पण प्रकार-विभागणीसाठी फक्त जमीनच विचारात घ्यावयाची असते.

अशा पुष्कळशा क्रमबंधांतून या पोटविभागांना " नैसर्गिक प्रदेश " असे नाव देण्यात आले आहे. या संज्ञेतील " नैसर्गिक " हा शब्द जिथे जिथे वापरला गेला तिथे तिथे त्याच्या विविध अर्थांनी, व गुणार्थांनीही, किती गोंधळ निर्माण केला याची दखल आपण यापूर्वीच घेतलेली आहे. वर घेतलेले आक्षेप बाजूला ठेवले, तरी वेगवेगळ्या क्रमबंधांतून त्याचा वापर होत गेल्यामुळे, परिणामी पोट-विभागांनी प्रत्यक्षात सादर केलेल्या गोष्टींपेक्षा कितीतरी अधिकांवर तो शब्द दावा सांगू लागतो, असे दिसते. बरे, अधिक स्पष्ट वाटणाऱ्या " भौगोलिक प्रदेश " या संज्ञेकडे आशेने पहावे, तर त्याच्याबाबतीतही तीच स्थिती दिसते !

या प्रकारांच्या पोटविभागांना " प्रदेश " असे म्हणतात ; पण, भूगोलकार ज्या अर्थाने या शब्दाचा वापर करतात त्या अर्थाचे हे प्रदेश नव्हेत, तर ती विशिष्ट प्रकारची क्षेत्रे आहेत. तरीही, हा आक्षेप गौण मानावा लागेल. कदाचित् याच कारणामुळे, फिंच व ट्रेवार्था यांनी याच अर्थाने " प्रभाव क्षेत्र " (Realm) हा शब्द वापरला आहे, तर जेम्सने आपल्या पोटविभागांना केवळ विशेष प्रकारची " भूमी " येवढेच नाव दिले आहे. मग येवढ्या मर्यादित अर्थाने वापरावयाचाच असेल तर जर्मन भाषेतील Landschaft (भूक्षेत्र दृश्य) हा शब्द वापरावा असा आग्रह क्रेब्जने धरला आहे. (२७९, २१०). त्याच्या

अनुयायांनी त्याच्या या सूचनेचे अनुकरण केलेले आहे असे गृहीत धरले –खरे म्हणजे तेही जरा अवघडच दिसते–तरीही या अर्थाने त्या शब्दाचे एकच एक इंग्रजी शब्दात भाषांतर करणे शक्य होत नाही. भाषांतर करावयाचेच झाले, तर " भूमीचा प्रकार ", किंवा शक्य झाल्यास " भूमी-प्रकार " असे करावे लागेल. अर्थात इंग्रजीत कोणताच जमणारा शब्द न सापडल्यामुळे, प्रस्तुत लेखकाने " प्रदेश " हा शब्द " विशिष्ट प्रकारची क्षेत्रे " या सैलसर अर्थाने इंग्रजी भाषिक भूगोलकारांच्या प्रचलित रूढीला अनुसरून मान्य केलेला आहे.

" नैसर्गिक " या व्यापक संज्ञेची अथवा " भौगोलिक " या अधिकच व्यापक संज्ञेची परीक्षा केली असता बहुतेक सर्व बाबतीत केवळ एकाच नैसर्गिक कारकापर्यंत तिचे अवमूल्यन झालेले आढळते ; आणि ही वस्तुस्थिती हाच प्रस्तुत संदर्भात " नैसर्गिक " अथवा " भौगोलिक " प्रदेश या संज्ञांच्या वापरांवरचा महत्त्वाचा आक्षेप आहे. त्यापैकी पुष्कळसे जगाच्या हवामाननिष्ठ प्रमुख क्षेत्रांच्या नकाशांच्या रूपाने सादर केलेले असतात–उदाहरणार्थ हर्बर्टसनचे नकाशे. सुरुवातीपासूनच, आपल्या या प्रमुख विभागांचे स्वरूप भलतेच सोपे झाले हे हर्बर्टसनच्या लक्षात आले होते, असे दिसते. विशेषेकरून त्याच्या या क्रमबंधाबाबत झालेल्या अगदी शेवटच्या चर्चेत, म्हणजे १९१३ सालच्या चर्चेत, त्याने त्यात अन्य नैसर्गिक घटकांचाच नव्हे तर मानवाचाही अंतर्भाव करण्याची इच्छा बोलून दाखविली, आणि तरीही त्यांच्यातील भेद दाखविण्यासाठी त्याने वापरलेली कसोटी जवळजवळ केवळ हवामाननिष्ठच होती (३०८ ; c/o ३१०, २६२, ते ६६). स्टॅम्पने हर्बर्टसनच्या क्रमबंधाची सुधारित आवृत्ती काढली व त्याला " जगाचे प्रमुख हवामाननिष्ठ, अथवा प्रमुख भौगोलिक प्रदेश ", (३१०, २६६) असे नाव दिले, यावरून या सर्व प्रश्नावर छान प्रकाश पडतो. जो जवळजवळ केवळ हवामानाच्या आधारावर काढलेला आहे, आणि शीर्षक मात्र " मुख्यतः हवामान व मानवी वापर यावर आधारलेले नैसर्गिक प्रदेश " असे दिलेले आहे, अशा नकाशाचे आणखी एक उदाहरण म्हणजे फॉन फाल्केनबर्गचा नकाशा हे होय (३१४).

प्रत्यक्ष " भौगोलिक प्रदेश " या संज्ञेत नैसर्गिक व मानवी अशा दोनही प्रकारच्या महत्त्वाच्या सर्व रूपधेयांचा अंतर्भाव झाला पाहिजे हे उन्स्टेटने स्पष्टपणे ओळखले होते, पण जगाचे प्रमुख प्रदेश निश्चित करताना, हवामान हीच कसोटी वापरावी लागते, असेही त्याला आढळून आले. साहजीकच, त्याचा नकाशा हवामाननिष्ठ आहे, आणि ते त्याला कबूलही करावे लागले. पण, त्यात फक्त समुद्रसपाटीपासून उंचावर असलेली क्षेत्रे चार हवामाननिष्ठ विभागात निराळ्या वर्गीकरणाने दाखवलेली आहेत (' उंच ' पर्वत व ' उंच ' पठारे). या अपवादाचे वैशिष्ट्य असे, की भूरूपे या कारकाचा फक्त पोटविभागापुरताच विचार केलेला आहे. वास्तविक, येथे–म्हणजे इतक्या खालच्या प्रतीच्या पोटविभागात, सांस्कृतिक कारकांनाही मान्यता मिळण्यास हरकत नव्हती (३०९).

पासार्जने एक निराळीच दिशा घेतली आणि जेम्सने त्याचे अनुकरण केले, (३२१, प्रकरण ९वे), हे आपण पाहिलेच आहे. या दोनही ग्रंथकारांच्या क्रमबंधांचा अंतस्थ प्रवाह हवामाननिष्ठ असूनही, वेगवेगळे प्रदेश खासकरून नैसर्गिक वनस्पतींच्या परिभाषेत व्याख्याबद्ध केलेले आहेत. पण, या दोन प्रकारांतील वनस्पतिनिष्ठ प्रदेशांचे प्रत्यक्ष वर्गीकरण फारच वेगळे आहे, आणि जेम्सने उत्तुंग-पर्वत-प्रदेशांचा एक निराळा वर्गच तयार केला आहे.

या अभ्यासकानी, एकमेव घटकावर आपले क्रमबंध आधारले व त्याच्याशी सर्व नैसर्गिक घटक, अथवा सर्वच भौगोलिक घटक, एकरूप असल्याचे मानले ; ही गोष्ट सहजी घडली असे म्हणण्याचा आमचा हेतू नाही–निदान पहिल्या प्रमुख विभागणीपुरता तरी नाही. त्यांची कार्यपद्धती पुढे दिलेल्यांपैकी एका, अगर दोनही, युक्तिवादांच्या आधारे समर्थनीय ठरण्यास हरकत नाही : (१) कसोटी म्हणून उपयोगात आणलेला घटक सर्वमान्यतेनेच इतका महत्त्वाचा होता (अर्थात मानवाच्या दृष्टीने), की इतर सर्वांकडे दुर्लक्ष करणे शक्य झाले ; अथवा, (२) त्या घटकाचे अन्य घटकांशी असलेले संबंध इतके निकटचे होते, की त्या एकावरच आधारलेले वर्गीकरण उरलेल्या सर्वांपैकी बहुतांश घटकांवर आधारलेल्या वर्गीकरणांचेही प्रतिनिधित्व करू शकले. आता मूळ प्रतिपादनांतच जर नैसर्गिक कारकांबरोबर सांस्कृतिक कारकांचाही अंतर्भाव केलेला असेल, तर त्या प्रदेशाला दिलेली " भौगोलिक " ही संज्ञा अनुरूप ठरते, आणि जर ते प्रतिपादन नैसर्गिक कारकांपुरते मर्यादित असेल, तर मात्र या प्रकाराला नैसर्गिक पर्यावरणावर आधारलेला क्रमबंध म्हणणेच योग्य ठरते.

प्रामुख्याने हवामानावर आधारित अथवा प्रामुख्याने नैसर्गिक वनस्पतींवर आधारित अशा या क्रमबंधांच्या दोन गटांपैकी प्रत्येक एकाच्या संदर्भात वर दिलेल्या दोन युक्तिवादांपैकी एकाचे, अगर दोहोंचेही किती प्रमाणात समर्थन करणे शक्य आहे, याचा विचार होणे आवश्यक आहे. पण, त्यांच्याशी संबंधित असलेल्या चार संभवनीय प्रमेयांपैकी एकही तर्कदृष्ट्या प्रथमदर्शनीच मान्य व्हावे इतके स्पष्ट नाही ; तसेच त्यांपैकी एकही भौगोलिक अनुसंधान कार्याने यापूर्वी प्रस्थापित केलेले नाही. म्हणून, क्रमबंधांच्या या गटांपैकी प्रत्येकाच्या संदर्भात असा एक प्रश्न उपस्थित होतो, की त्यांनी केलेल्या दाव्यांपैकी एक, अगर दोनही, सिद्ध होण्याइतका पुरावा त्याच्या प्रवर्तकाने सादर केलेला आहे, का त्यांचे हे क्रमबंध केवळ सामान्य गृहीत प्रमेयांवर आधारलेले आहेत ?

या क्रमबंधांपैकी बहुतांश हवामाननिष्ठ वर्गीकरणांवर आधारलेले आहेत, हे आपण या आधीच पाहिले आहे. मानवीजीवनाच्या दृष्टीने विचार करता, प्रदेशांच्या स्वरूपांतील भेद निश्चित करण्यासाठी, हवामानातील फरक फार महत्त्वाचे असतात, यावर कोणीच आक्षेप घेणार नाही. पण, सर्वच ठिकाणी हवामानातील फरक प्राथमिक महत्त्वाचे नसतात, याबाबतही सर्वसाधारणपणे एकमत असते. बहुतेक सर्व ग्रंथकार निदान उत्तुंग पर्वतप्रदेश तरी या नियमाला अपवाद असतात असेच मान्य करतात.

ज्यांत हवामानविषयक घटकांना प्रथम क्रमांकाचे महत्त्व स्पष्टपणे देताच येत नाही अशी अन्य काही अपवादात्मक क्षेत्रे असतात, पण ती ओळखली जात नाहीत. लाँग-आयलंड-पासून फ्लॉरिडापर्यंतच्या भूपट्ट्यात—यात फ्लॉरिडाच्याही बऱ्याच भागाचा अंतर्भाव होतो—तो निदान दोन प्रमुख हवामान पट्ट्यात पसरलेला आहे या वस्तुस्थितीपेक्षा, तेथील मृत्तिकांचे व पाणलोटांचे स्वरूप याना कितीतरी अधिक महत्त्व आले आहे. कोणत्याही हवामाननिष्ठ नकाशात नोव्हास्कोशिया ते डाकोटा येवढ्या क्षेत्रात किरकोळ स्वरूपाचे फरक दाखविलेले असतात. तरीही, उत्तर मेनमधील पाइनव्याप्त सपाट, ओसाड भाग, सेंट लॉरिन्सचे सुपीक मैदान, लॉरेन्शियन पठाराच्या दक्षिण सीमेवरील खडकाळ, ओसाड भाग, मध्य मिनेसोटातील पिंगटरंगाच्या जंगली मृत्तिकात आढळणारा भरड हिमोढ, आणि चर्नोझोमप्रतीच्या (काळ्या) मृत्तिका असलेले डाकोटाचे मैदान, अशा विविध भूदृश्यांच्या स्वरूपात किती असामान्य विरोधांचा आविष्कार झालेला दिसतो !

ही उदाहरणे अगदी अपवादात्मक आहेत असे समजण्याची जरूरी नाही. जर एखाद्याने प्रमुख हवामाननिष्ठ प्रदेशावरून आडव्या-उभ्या रेषा मनसोक्त मारावयाच्या मनात आणले, तर कदाचित बहुतांश बाबतीत, ती विशिष्ट हवामान लक्षणे जेथे कोणत्यातरी अन्य नैसर्गिक कारकापेक्षा कमी महत्त्वाची असतात अशी, कितीतरी क्षेत्रे त्या रेषांमुळेच उघडकीला येतील. उत्तुंग पर्वतांच्या खास प्रकारात ज्यांचा अंतर्भाव केलेला नाही अशा डोंगराळ भागांत—उदाहरणार्थ : दक्षिण आपालेशियन डोंगर, व्होसजेस डोंगर, किंवा सापेक्षतः कमी उंचीचे पेनाइन डोंगर अशा प्रकारच्या क्षेत्रात—तेथील हवामानाच्या स्वरूपापेक्षा जमिनीचा उतारच अधिक महत्त्वाचा असावा, अशी निदान शंका आल्याशिवाय रहात नाही.

आदिम स्वरूपाच्या वसाहतींच्या क्षेत्रांत दिसून येणारे अन्य कारकांच्या संदर्भात हवामानाचे महत्त्व आपण लक्षात घेतले, तर एक गोष्ट आपल्या लक्षात येईल. स्थलसंदर्भातून असो की कालसंदर्भातून असो, मानवाच्या दृष्टीने हवामानाचे महत्त्व हा कारकच अस्थिर स्वरूपाचा आहे. सर्वसाधारणपणे, हवामानाला आपण जे येवढे महत्त्व देतो ते, लागवड करावयाच्या वनस्पतींच्या दृष्टीने उष्णता व पाणी यांचे महत्त्व या गोष्टीवर आधारलेले असते. अर्थात, येथे आपण हवामानाच्या शारीरिक अथवा मानसिक परिणामांचा विचार बाजूला ठेवतो आहोत, कारण तो बराच वादग्रस्त आहे (आणि तोही संस्कृतीच्या संदर्भात बदलतच असतो). आदिम अवस्थेतील लोकांना रानवटवनस्पतींतील फरकांच्या तुलनेने हवामानातील फरकांचे महत्त्व कमी वाटत असण्याचाच संभव आहे, कारण त्यांची संगती हवामानाशी असतेच असे नाही ; या गोष्टीची नोंदही याआधीच आपण केलेली आहे. उदाहरणार्थ : उत्तर अमेरिकेच्या आदिवासी रहिवाशांच्या दृष्टीने प्रेअरी कुरणे आणि आरण्ये यांमधील फरक हा सर्वात भारी महत्त्वाचा होता, मग तो हवामानातील किरकोळ फरकांमुळे निर्माण झालेला असो वा नसो. पण याच्याशी तुलना करता, पंचमहासरोवरांपासून ते मेक्सिकोच्या आखातापर्यंतच्या क्षेत्राच्या आरण्य प्रदेशांतर्गत भागातील हवामानातील फरक त्यांच्या दृष्टीने किरकोळ महत्त्वाचे होते. वृत्तान्तर्गत पावसाळी आरण्यांची गोष्टही अशीच आहे. हवामानात फरक नसूनही त्यातील बऱ्याच मोठ्या क्षेत्रांवर वृत्तान्तर्गत पावसाळी आरण्ये असतच नाहीत.

हवामानातील फरकांचे महत्त्व सर्वश्रेष्ठ मानले जावे या पहिल्या दाव्यासंबंधीची चर्चा चालू असतानाच, हवामाननिष्ठ वर्गीकरण करत असताना मृत्तिका, वनस्पती आणि सांस्कृतिक प्रगती या कारकांची वर्गवारीही त्यांच्या बरोबरच होत जाते, या दुसऱ्या दाव्याच्या मर्यादाही आम्ही दाखवून दिल्या आहेत. हवामानातील फरक आणि या अन्य रूपधेयांतील फरक यांच्यात महत्त्वाचा संबंधयोग असतो, यावर कोणीच आक्षेप घेण्याची शक्यता नाही. पण, येवढा एकच संबंधयोग निर्णायक असतो या गोष्टीला मान्यता देण्याच्या सामान्य टप्प्याच्या पलीकडे आपली चर्चा गेलेली आहे असे गृहीत धरावयास हरकत दिसत नाही. यावरून, " बऱ्याच मोठ्या प्रमाणात सरूपता विकसित करण्याकडे पुष्कळशा नैसर्गिक रूपधेयांचाच कल असतो, व त्यासाठी प्रत्येकाने दुसऱ्यांशी सांधेमोड केलेली असते आणि दुसऱ्या सर्वांच्याच बरोबर समतोल राखण्याचाही प्रयत्न केलेला असतो ", येवढेच आपल्या लक्षात येते, असे विधान फिंच व ट्रेवार्था यांनी केलेले आहे. याला फक्त पूर्ण विकसित भूदृश्याच्या दिशेने होणारी वाटचाल, येवढेच नाव देता येईल. पण खऱ्या अर्थाने पूर्णपणे विकसित भूदृश्य ही अभावाने आढळणारी गोष्ट आहे. (३२२, ६६५).

आपण आताच ज्यांचा अनुवाद केला त्या लेखकांनी हवामाननिष्ठ प्रादेशिक वर्गीकरण सांस्कृतिक भूदृश्यांच्या वर्गीकरणाशी सुसंगत असणार नाही ही गोष्ट स्पष्टपणे मान्य केलेली आहे, आणि सुस्पष्ट शब्दात सांगितलेलीही आहे. मर्यादित प्रमाणात सुसंगतीची अपेक्षा करणे हे तर्काला पटणारे आहे ; आणि बहुतेक बाबतीत तसेच होते, " पण, सरूप पर्यावरणामुळे निर्माण होणारे भूमिवापराचे नमुनेही सरूपच असावे, अशी अपेक्षा करणे हे मात्र तर्कविरुद्ध आहे. म्हणूनच त्यांचे वर्गीकरणही नैसर्गिक घटकांपुरतेच मर्यादित असते. तरीही, " भौगोलिक प्रभावक्षेत्रे " हे त्यांचे शीर्षक अधिकच व्यापक असल्यासारखे दिसते.

थोडक्यात सांगावयाचे तर, (मानवाच्या दृष्टीने अर्थपूर्ण अशा) नैसर्गिक प्रदेशांचे वर्गीकरण अज्ञात स्वरूपातही, फार मोठ्या प्रमाणात आकारमान बदलत असेल तर तशा पुष्कळशा प्रदेशांच्या बाबतीत, हे वर्गीकरण चुकीचेच असते. शेवटी असे म्हणावे लागते, की ज्यात हवामानातील बदल हेच प्राथमिक महत्त्वाचे असतात आणि ज्यांच्या हवामानाचे संबंध त्यांतील वनस्पती व मृत्तिका यांच्याशी बऱ्याच पूर्णांशाने घालता येतात, अशा क्षेत्रातील या सर्व बाबी एकत्रित केल्या तरीही त्यांना भूक्षेत्रांचे प्रादेशिक स्वरूप निश्चित करणाऱ्या एकमेव कसोटीचे महत्त्व देता येत नाही. शास्त्रीय संज्ञा वापरून सांगावयाचे तर, हवामाननिष्ठ प्रदेशांचा नकाशा हा फक्त हवामाननिष्ठ प्रदेशांचाच नकाशा असतो ; त्यात अधिक कशाचा समावेश करता येत नाही. सांस्कृतिक घटकांसहीत दुसऱ्या अनेक घटकांचीही, कमीजास्त प्रमाणात विश्वसनीय अशी, ती सूची असते, ही गोष्ट नाकबूल करता येणार नाही. तरीही, त्याला " नैसर्गिक " अथवा ' भौगोलिक ' प्रदेशांचा नकाशा असे नाव देणे म्हणजे गैरसमजांना आमंत्रण देण्यासारखे आहे.

नैसर्गिक वनस्पतींच्या आधारे केलेले वर्गीकरण हे प्रत्यक्ष दिसणाऱ्या नैसर्गिक भूदृश्यांचे वर्गीकरण असल्याने ते मानवीसंबंधांपासून मुक्त असते (प्रकरण १० ' क ' पहा), असा करण्यात आलेला दावा आम्ही यापूर्वीच फेटाळून लावलेला आहे. मानवाने लक्षणीय बदल केलेले नाहीत अशा क्षेत्रांतील नैसर्गिक भूदृश्यांच्या दृश्य भागातील एका प्रमुख घटकाचे वर्गीकरण करण्यास अशा प्रकारच्या क्रमबंधाचा काही अंशांनी उपयोग होण्यास हरकत नाही, एवढीच त्याची तरफदारी आपण, फारतर, करू शकलो असतो. खरे पहाता, या आधारावर विकसित केलेल्या क्रमबंधांचा उपयोग करणारे भूगोलकार त्यांतील वनस्पतींचे बाह्यदृश्य अगदी सरूप असूनही त्या क्षेत्रांचे वर्गीकरण मोठ्या प्रमाणात भिन्न असलेली क्षेत्रे असे करतात. याच्या विरुद्ध,–निदान पासार्जच्या क्रमबंधात–आरण्यभूमी आणि कुरणभूमी इतके वेगळे बाह्यदृश्य असणाऱ्या वनस्पतिक्षेत्रांचे वर्गीकरण एकाच प्रकारात दाखवितात. नैसर्गिक वनस्पतींवर आधारलेल्या क्रमबंधांचे मूळ त्याच्या बाह्यदृश्यावर अवलंबून ठेवणे शक्य होणार नाही. त्याला इतर ज्या क्रमबंधांना तोंड द्यावे लागते त्या कसोटीनांही उतरता आलेच पाहिजे. म्हणजेच, मानवी जीवनाच्या संदर्भात त्या प्रदेशांचे स्वरूप सूचित करणाऱ्या गमकांचे महत्त्व या कसोटीलाही त्यांना उतरले पाहिजे.

मानवाच्या दृष्टिकोणातून गमकाचे महत्त्व हेच प्रादेशिक विभागणीच्या कोणत्याही क्रमबंधाचे आधारतत्त्व आहे असे मान्य झाले असल्यास, वनस्पतींवर आधारलेल्या क्रमबंधांबाबत इतकी गंभीर चर्चा होत रहावी हे आश्चर्यच म्हटले पाहिजे. बहुतेक सर्वच मानवांना वनस्पती (याचा अर्थ नेहमीच नैसर्गिक वनस्पती असा करावा) हेच प्राथमिक महत्त्वाचे आहेत असे वाटण्याची वेळ जाऊन फार काळ लोटलेला आहे. खरे म्हणजे, आपल्यापैकी फारच थोड्यांना नैसर्गिक वनस्पती पहाण्याचे भाग्य लाभलेले आहे. सुरिनामच्या मूळ रहिवाशांनी जगाचा भूगोल लिहिला, तर त्याना मात्र हेच आधारतत्त्व तर्कशुद्ध आहे असे वाटण्याचा संभव आहे. पासार्जनेही आपला भूक्षेत्रदृश्यांचा भूगोल (Landschafts kunde) वृत्तान्तर्गत आरण्य प्रदेशातच लिहून पूर्ण केला या गोष्टीलाही काही अर्थ निर्माण होतो. अशा क्षेत्रातून तेथील बाह्य भूदृश्यावर प्रत्यक्षातील वनस्पतींचा खरोखरच भारी प्रभाव असतो, आणि ते व त्यांच्या साहचर्याने पोसलेले प्राणिजीवन यांचे तेथील आदिम मानवाला निश्चितच फार महत्त्व वाटत असते.* शिवाय, तेथील बाह्य भूदृश्यांवर प्रत्यक्षातील वनस्पतींचा खरोखरच भारी प्रभाव असतो, आणि तेथील आदिम मानवाला निश्चितच त्यांचे फार महत्त्व वाटत असते. त्याहीपेक्षा महत्त्वाची गोष्ट म्हणजे, ते राक्षसी आरण्य, म्हणजे तेथील वनस्पतीबरोबरच तेथील रानटी जनावरेही, मशागतीसाठी तयार केलेल्या मोकळ्या जागा कोणत्याही क्षणी गिळंकृत करण्यासाठी दबा धरून बसलेले असते. अर्थातच अशा नैसर्गिक पर्यावरणाच्या बहुतांश भागाचे ते आरण्य हेच सजीव, साकार स्वरूप आहे असे वाटल्यास नवल नाही–कारण या एका शब्दाने तेथील वनस्पती, हवामान, मृत्तिका आणि प्राणिजीवन या सर्वांचा एकाच वेळी बोध होतो.

---

*पहिल्या ओळीतील ' प्रत्यक्षातील वनस्पतींचा ' इथपासून पुढील दोन ओळी, म्हणजे हे संपूर्ण वाक्यच, गाळावे.

वनस्पतींशी अन्य नैसर्गिक घटकांचे असलेले हे साहचर्य वृत्तान्तर्गत नसलेल्या प्रदेशांच्या बाबतीतही खरे आहे, यात शंकाच नाही. थोडक्यात, यावरून एक गोष्ट सूचित होते. एकूण नैसर्गिक परिसराची गुरूकिल्ली म्हणून हवामान या प्राथमिक घटकापेक्षाही वनस्पती हा घटक अधिक चांगला मार्गदर्शक आहे. अन्य घटक कशा स्वरूपाचे असतील हे हवामानावरून कळत असेलही ; पण हवामान, मृत्तिका, प्राणिजीवन, आणि कदाचित अंशतः भूरूपेही, या सर्वांचे संकलन करून जणूकाही त्याची सूची वनस्पतीच्या रूपाने भूगोलकाराच्या हाती दिलेली असते.

त्याचप्रमाणे प्रत्यक्ष प्रमाणाने असो वा अनुमानाने असो, आपल्यास आणखी एक माहिती पुरविली जाते. मानव या भूमीचा उपयोग कोणत्या प्रकारे करण्याची शक्यता याचे मार्गदर्शन, कदाचित हवामानापेक्षा अधिक कुशलतेने, वनस्पती करत असतात. म्हणूनच, वनस्पती ही केवळ पुष्कळशा नैसर्गिक घटकांसंबंधीच्या ज्ञानभांडाराची गुरूकिल्ली आहे, इतकेच नव्हे तर, ती मनुष्याचा हात फिरू लागला की सांस्कृतिक भूदृश्याचा कसा आविष्कार होत जातो यासंबंधीच्या ज्ञानभांडारालाही ही किल्ली चांगलीच लागू पडते.

आणि हे दावे काही अगदीच लहान-सहान नव्हेत. भौगोलिक विचारक्षेत्रात पासार्जच्या या क्रमबंधाने बरीच खळबळ उडविली आहे, याचे आश्चर्य वाटण्याचे कारण नाही. केवळ एकच आधार घेऊन खऱ्याखुऱ्या भौगोलिक प्रदेशांचे वर्गीकरण करणे शक्य करून देणारा परीस जर पासार्जला सापडला असेल, तर प्रादेशिक भूगोलातील एक मूलभूत समस्या त्याने सोडविली आहे असे म्हणावयास काय हरकत आहे ! जरी या सिद्धान्ताचा जर्मन भूगोलकारांमध्ये फारसा प्रसार झाला नाही, तरी त्याने आपल्या देशातील अलीकडील भौगोलिक विचार-धारेवर एक निश्चित-स्वरूपाचा ठसा उमटविलेला आहे. म्हणून या सिद्धान्ताने केलेल्या दाव्यांचा गंभीरपणे विचार करणे आवश्यक होऊन बसले आहे.

वनस्पतिजीवनावर आधारलेल्या कोणत्याही क्रमबंधाने केलेला दावा, ज्या प्रमाणात मूळ-वनस्पती कोणते हे आपल्याला माहीत झालेले असते त्या प्रमाणातच समर्थनीय ठरत असतो ; किंवा मूळ वनस्पती कोणत्या होत्या याचे ज्ञान आपल्याला असणे आवश्यकच आहे, असेही म्हणण्यास हरकत नाही. आणि ही गोष्ट आम्ही यापूर्वीच दाखवून दिली आहे, कारण ते प्रत्यक्षात अस्तित्वात असत नाहीत ; आणि मनुष्याने तेथे प्रवेशच केला नसता तर जे त्यांचे स्वरूप राहिले असते त्या निव्वळ औपपत्तिक नैसर्गिक वनस्पतींच्या आधारावर आपण प्रबंध रचना करू शकत नाही. जगाच्या विस्तृत आणि महत्त्वाच्या क्षेत्रांतील तपशीलांचे आपले ज्ञान अद्यापी अगदी अनिश्चित आहे, असे आपल्याला आढळून आलेले आहे, इतकेच नाही तर, आवश्यक ते सर्व ज्ञान आपल्याला कधीच मिळणार नाही, ही गोष्ट अगदी संभवनीय आहे. हे ज्ञान हस्तगत करावयाचेच झाले, तर अज्ञातकालापासून ज्या रूपधेयांचा आविष्कार होत आला आहे असे आपण मानतो त्यांचा, म्हणजेच मानवी संस्कारांमुळे निर्माण झालेल्या रूपधेयांचा, आपल्याला प्रथम अभ्यास करावा लागेल. चाळीस शतकांच्या सधन

लागवडीनंतर व खतपाण्याच्या वापरानंतर चीनच्या मृत्तिका या, तेथील नैसर्गिक रूपधेये न मानता, तेथील सांस्कृतिक रूपधेये मानणेच, कदाचित, श्रेयस्कर ठरेल ! अशाप्रकारे या मृत्तिकांचे काळजीपूर्वक विश्लेषण केले, तरच चीनच्या निरनिराळ्या विभागात कोणते मूळ वनस्पती होते हे निश्चितार्थाने कळण्याची शक्यता आहे. अशा क्षेत्रांच्या बाबतीत येणाऱ्या अडचणी प्रत्येक अभ्यासकाला कळून चुकल्या आहेत. अशा क्षेत्रांत आणि नवथर क्षेत्रांत अथवा आदिम वसाहतींच्या क्षेत्रांत दिसून येणाऱ्या विरोधांमुळे या दुसऱ्या क्षेत्रात हीच समस्या सोडविणे सोपे आहे असा आभास निर्माण होण्याची शक्यता असते. मध्य आफ्रिकेतील "मूलस्वरूप वनस्पतींचा" नकाशा काढणे आपल्याला कोणत्या प्रकारे शक्य होईल ? पर्जन्यारण्यांतून पसरलेल्या सर्वच स्थली अथवा झाडोऱ्यांची क्षेत्रे ही मानवी व्यवहारांमुळेच निर्माण झालेली आहेत असे गृहीत धरणे योग्य होईल का ? स्थानिक रहिवाश्यांनी असंख्यवेळा भाजून काढलेल्या मृत्तिकांचे वेगळेपण, काही विशिष्ट मृत्तिकावस्थांमुळे, दाखविणे अशक्य होते, येवढ्या कारणावरून मुळात अशी एकही वनस्थली नव्हतीच असे मानणे योग्य आहे का ?

मनुष्याने जेथे प्रथमच प्रवेश केला त्याकाळच्या त्या क्षेत्रातील वनस्पती जीवनाची पुनर्रचना करण्यात आपल्याला काही प्रमाणात यश आले, असे गृहीत धरले, तरी, शेवटी कदाचित, त्याकाळापासून आतापर्यंत घडत गेलेल्या हवामानांतील बदलांमुळे, वर्तमान जगाच्या प्रादेशिक विभागणीच्या चौकटीत त्याना महत्त्व राहिलेले नाही.

मूळच्या नैसर्गिक वनसपती-जीवनाच्या पुनर्रचनेत अडचणी येतात, म्हणून हवामान व मृत्तिका यांच्या आधाराने त्यांच्या स्वरूपांसंबंधीचे अनुमान काढावयाचे, हा नित्याचा परिपाठच होउन बसला आहे. थोडक्यात, नैसर्गिक वनस्पतींनी जे दाखवून द्यावे अशी अपेक्षा असते ते संकलित स्वरूप आपण स्वतःच रचून घ्यावयाचे. म्हणून पासार्जच्या जगाच्या विभागणीतील या वनस्पतीक्षेत्रांना हवामाननिष्ठ प्रदेश असे नाव द्यावयास काही हरकत दिसत नाही. (c/o वेबेल २५०, ४७६).

मूळच्या वनस्पतींचे स्वरूप आपल्याला जितके निश्चितपणे माहीत होईल असे, अथवा शेवटी ते जितके शोधता येईल अशी आशा असल्याचे आपण गृहीत धरतो आणि वर्तमानकालीन नैसर्गिक वनस्पतींच्या औपपत्तिक स्वरूपाचे दर्शन त्यातून जितके घडेल असे मानतो, तितक्या प्रमाणात प्राणिजीवन, मृत्तिका व हवामान अशासारख्या नैसर्गिक घटकांच्या आकलनाची शास्त्रीयदृष्ट्या विश्वसनीय किल्ली आमच्या हाती त्या ज्ञानातून लागते का ? निदान प्राणीजीवनासंबंधाने तर खासच लागत नाही ! कारण केवळ सरूप वनस्पतींच्या क्षेत्रांना जोडणाऱ्या मार्गांचा अभाव असला, तरी प्राणिजीवन अगदी भिन्न असण्याची शक्यता असते. मृत्तिकांच्या बाबतीत येवढेच म्हणता येईल, की या क्षेत्राचे आपले ज्ञान परिपूर्ण होईतोपर्यंत, माहीत असलेल्या घटकांच्या मदतीने मृत्तिकांच्या स्वरूपाविषयी अनुमान

काढण्याचा प्रघातच आपल्याला चालू ठेवावा लागेल ; आणि अशा अन्य घटकांत हवामान व वनस्पती यांचा निश्चितच समावेश करावा लागणार आहे. शिवाय तळातील खडकानुसार मृत्तिकांचे वर्गीकरण करण्याच्या पद्धती विरूद्ध झालेल्या प्रतिक्रियेच्या पहिल्या टप्प्यातून आपण पार पडलो आहोत असा विश्वास आम्हाला वाटतो. एकच प्रकारच्या सामान्य नमुन्याच्या वनस्पती अत्यंत भिन्न मृत्तिकावरण असलेल्या क्षेत्रांनाही व्यापून टाकू शकतात, हे जेम्सने चांगले ओळखले होते (३२१, १४० f).

हवामानप्रकार आणि वनस्पतिप्रकार यांच्यात सामान्य सहसंबंध आहे याबद्दल वादच नाही. " वनस्पतिप्रकार हे हवामानप्रकारांची प्रत्यक्ष प्रतिबिंबे आहेत ; नव्हे, ते त्यांच्या राजमुद्राच आहेत ! " असे जेम्सने म्हटले आहे. (३२१, ६). या वाक्यांची मांडणी चांगलीच आहे. हवामानाची किल्ली या नात्याने वनस्पतींच्या विश्वसनीयतेची पातळी त्यांनी अचूकपणे दाखविली आहे. पण शास्त्रीय लेखकांनी प्रतिबिंबे, राजमुद्रा अशांचा वापर का करत बसावयाचे,–कारण ती धड दिसत नाही, आणि त्यांचे स्वरूपही अचूकपणे ठरविता येत नाही–त्यापेक्षा त्यांनी ज्या अधिक अचूकपणे आपण प्रस्थापित करू शकतो अशा वस्तुस्थितीकडे बोट का दाखवू नये ? हवामानाइतका प्रचंड व सापेक्षतः विश्वसनीय तपशीलांचा संग्रह नैसर्गिक घटकांपैकी फारच थोड्या घटकांच्या बाबतीत उपलब्ध आहे ; पण नैसर्गिक वनस्पतींच्याइतका अन्य कोणत्याच घटकांच्या बाबतीत तो अनिश्चित नाही.

इतके आक्षेप घेतले, तरी नैसर्गिक वनस्पतींवर आधारलेली प्रादेशिक विभागणी समर्थनीय ठरण्यास काहीच हरकत नाही. एवीतेवी या एका घटकात हवामान, मृत्तिका आणि काही प्रमाणात जमिनीचा उंचसखलपणा यांचे परिणाम एकत्रित होतच असतात. आता, मानवी अभिरूचीच्या गोष्टींच्या संबंधात या संपूर्ण घटकाचे महत्त्व त्यात समाविष्ट असलेल्या कोणत्याही एकएकट्या कारकापेक्षा कितीतरी मोठे आहे असे सिद्ध करणे शक्य झाले पाहिजे. तसे सिद्ध झाल्यानंतर, एखाद्या यक्ष-प्रश्नाला, म्हणजे मानवाने केलेला भूमीचा उपयोग अशासारख्या प्रश्नाला, लागू पडणाऱ्या विविध कारकांचे नैसर्गिक संकलन म्हणून त्या घटकाचा विचार केला जावयास हरकत नाही. उलट ; परिस्थितीच तशी आहे, ते एक गृहीत प्रमेयच आहे असे, या आधारांचा उपयोग करणाऱ्या अनेकांनी विधानरूपाने अथवा सूचनांनी, सांगून टाकले आहे !

ज्या चर्चेचा आम्ही वारंवार उल्लेख करत आलो, त्या पासार्ग संप्रदायाच्या कार्यासंबंधीच्या चिकित्सक चर्चेतही, मानव करत असलेल्या भूमीच्या उपयोगाशी नैसर्गिक वनस्पतींचा संबंध असतो अशी संकल्पना, हाच त्या विचारपद्धतीचा गाभा आहे असे वेबेलला आढळून आले आहे. तसेच, थोडीशी अतिशयोक्ती करून, पासार्गच्या नैसर्गिक प्रदेशांच्या भूगोलाला (Angewandte Vegetactions kunde) ' वनस्पति भूगोलाचे उपयोजन ' असे नाव देण्यास हरकत नाही, असेही त्याचे मत झाले. (२५०, ४७६). आधुनिक भूगोलाकारांचे एका बाबतीत तरी वेबेलशी खासच एकमत होईल. नैसर्गिक प्रदेशप्रकारांवरून, प्राणी व

मानव यांच्या संबंधी घटनांविषयी अनुमान तर्कपद्धतीने काढणे धोक्याचे आहे. पासार्गने मात्र येथे तर्कवादाचा उपयोग सूचित केला आहे. (२६६, २०२ f). पासार्ग संप्रयादातील एक उदाहरण तो आन्हेनचे विधान उद्धृत करतो. एकाच प्रकारच्या प्रदेशं पट्ट्यातील (Landschafts gürtel) मानव एकाच प्रकारच्या आर्थिक पोटविभागात (Wirtschaft) घालता येतो. (२५०, १७०).

हे साध्यप्रमेय निदान एका अलीकडेच प्रसिद्ध झालेल्या अमेरिकी पाठ्यपुस्तकात स्पष्टशब्दात विधानरूपाने मांडलेले दिसते : " पृथ्वीपृष्ठावरील वनस्पत्यावरण हे मानवी वसाहतींची गुरूकिल्ली आहे ; कारण त्या त्या प्रदेशात जे वनस्पती निसर्गतःच वाढत असतात तेच शेतीच्यादृष्टीने त्या प्रदेशाचा उपयोग कसा केला जावा याचे अंदाजे दिग्दर्शन करत असतात. " याच्या स्पष्टीकरणासाठी पूर्वेकडील संयुक्त-संस्थानांचे उदाहरण देण्यात आले आहे. तिकडील मूळ वनस्पतींचे वर्णन " वृक्ष आणि तेद्देशीय उंच गवत " असे केलेले असून, तसेच शेतीविकासाचे वर्णन " गहू, ओट, राय, बार्ली आणि मका अशा गवतांची लागवड " आणि त्याबरोबरच " बटाटा व गाजर यासारखी मुळांची पिके " या शब्दात केलेले आहे (३२३, ६, १०७). युरेशियाच्या स्टेप कुरणातील पाळीव जनावरांचा विचार राहोच, पण कापूस व तंबाखू यासारख्या पिकांचा उल्लेखही नाही ! यावरून या प्रमेयाचे हे उपयोजन अगदी शब्दशः अर्थाने घ्यावयाचे नाही, असे अनुमान कोणीही काढू शकेल. शिवाय, ज्या पाठ्यपुस्तकात हे प्रमेय मांडलेले आहे त्यात वनस्पतींवर आधारलेल्या प्रादेशिक क्रमबंधाचा वापरच केलेला नाही.

जेम्सने आपल्या ग्रंथात अशाप्रकारचे कोणतेही निश्चयात्मक साध्य प्रमेय विधानरूपाने मांडलेले नाही.. खरेतर, आपल्या प्रास्ताविकात आणि अन्यत्रही पर्यावरणविषयक निश्चयवादाची सर्वच तत्त्वे तो निर्देशपूर्वक नामंजूर करतो. शिवाय, विविध प्रमुख संस्कृतींच्या वसाहतींच्या स्वरूपातील भेद स्पष्ट करून दाखवतो. पण, त्यांचे तपशीलवार प्रतिपादन वाचत असताना मात्र, एका विशिष्ट नमुन्याच्या वनस्पतिक्षेत्रात कोणत्याही एकाच प्रमुख सांस्कृतिक गटातील लोक एकाच प्रकारची शेती करण्याकडे कल असल्याचे दाखवितात, या गृहीत प्रमेयाचा वास कोणाही चाणाक्ष वाचकाला आल्याशिवाय रहाणार नाही.

येथे भूगोलातील एका प्रथम महत्त्वाच्या साध्य प्रमेयासंबंधी आपण विचार करत आहोत, ही गोष्ट स्पष्ट आहे. नैसर्गिक वनस्पती ही खरोखरच जर मानवी वसाहतीसंबंधीच्या ज्ञानाची किल्ली असेल—आणि त्यातही ती हवामानापेक्षा चांगल्या प्रकारची असेल—तर सर्वच भूगोलकारांनी दक्षतेने त्यांना मान्यता देण्यास व त्यांचा या कामासाठी उपयोग करण्याच्या मार्गाला लागण्यास काहीच हरकत नाही. पण, हे प्रमेय केवळ ठासून विधाने केल्याने प्रस्थापित होणार नाही किंवा केवळ अनुमानात्मक तर्कपद्धतीचा अवलंब केल्याने सिद्ध होणार नाही. उलट, त्याला पोषक अशा पुराव्यासाठी परिश्रमपूर्वक कष्टप्रद शोध घेण्याची जरूर आहे. वेबेलने ठाशीव भाषेत सांगितल्याप्रमाणे, ज्यांनी हे प्रमेय गृहीतक म्हणून आधारासाठी घेतले, ज्यांनी हे प्रमेय गृहीत धरले अथवा गृहीतप्रमेय असल्याचे मान्य केले, त्यांनी उपरिनिर्दिष्ट अनुसंधानकार्य कधीच अंगावर घेतले नाही. (२५०).

अशाप्रकारच्या साध्यप्रमेयाचे प्रात्याक्षिक करावयाचे झाले, तर त्याची पहिली पायरी म्हणून विविध प्रकारांच्या नैसर्गिक वनस्पतींच्या नकाशांची विविध नमुन्यांच्या शेतीविषयक नकाशांशी तुलना करावी लागेल, असे गृहीत धरण्यास हरकत नसावी. केवळ, त्यांच्यात सहसंबंध असल्याचे दिसते येवढ्यावरूनच हे प्रमेय सिद्ध होणारे नसले तरी, त्यांच्यात, अंशतः का होईना, काही सहसंबंध असल्याचे लक्षात येणे ही पुढील अभ्यासासाठी एक आवश्यक अट असते. जेम्सने दिलेले आहेत तशाप्रकारच्या नैसर्गिक वनस्पतींच्या नकाशांची उत्तर अमेरिकेच्या व युरोपच्या शेती-प्रदेशांशी तुलना केली तर, काय दिसून येते ? येथे वापरावयाचे नकाशे तो स्वतः वापरतो तेच असावयास हरकत नाही. म्हणजेच क्रमशः ओ. इ. बेकरचे व जोनासनचे नकाशे ; हार्टशॉर्न आणि डिकन यांचे नकाशे (३२४) ; किंवा व्हिटलसेचे नकाशे (३१९). येथे प्रत्येक बाबतीत त्यांतील संगतीचा अभावच अभ्यासकाच्या मनावर जास्त ठसेल. हीच तुलना पूर्वेकडील देशांशी इतक्या खात्रीपूर्वक करणेही शक्य होत नाही. कारण, बहुतांश चीनच्या नैसर्गिक वनस्पतींची माहितीच मिळत नाही. पण, तिकडेही, भातशेतीच्या क्षेत्रांची संगती थोड्याफार माहिती झालेल्या नैसर्गिक वनस्पति-क्षेत्रांशी दुरान्वयानेही लागत नाही.

नैसर्गिक वनस्पतींची वंटनक्षेत्रे आणि ज्यांचा मानवाने जगभर प्रसार केला अशी संस्कारीत वनस्पतींची क्षेत्रे या दोहोंत काही अर्थपूर्ण संबंधयोग असण्याची शक्यता आहे ही गोष्ट नाकबूल करण्याचा आमचा हेतू नाही. पण, ज्याच्या संबंधी अगदी हाताशी असणारा पुरावा नकारात्मकच असतो, अशा प्रमेयाच्याबाबतीत बरेच अनुसंधानकार्य सावधानतेने करावे लागेल. ' संस्कारित वनस्पतींचे सापेक्ष महत्त्व ' या विषयावर एंगलब्रेक्टने केलेल्या कार्याच्या आधारावर ट्रोलने एका अस्तिपक्षी तपशीलाची भर घातलेलीच आहे (३९४). अगदी सहज लक्षात भरणारे काही सहसंबंध त्याला आढळून आले आहेत. पण, युरोपच्या शेतीविषयक भूगोलाच्या अपुऱ्या तपशीलांशी परिचित असणाऱ्या अभ्यासकाला आपल्या निष्कर्षांची चाचणी घेता येईल इतके पुरेसे तपशील ट्रोलच्या नकाशावरून मिळत नाहीत, या गोष्टीचा त्याला खेद होईल. शेतीच्या साहचर्यातील वनस्पतींचे सहसंबंध नैसर्गिक वनस्पतींशी घालून दिलेले नाहीत, तर, काही सुट्या रानवट वनस्पतींचे सहसंबंध सुट्या पिकांशी घालून दिलेले आहेत. त्याने सहसंबंध घालून दिलेल्यांपैकी काही वनस्पती तर अगदीच किरकोळ महत्त्वाचे आहेत. उदाहरणार्थ : Schmerwurz किंवा Tamus Communis किंवा Black briony, म्हणजेच कृष्णशिववल्ली.

शेवटी ट्रोलने केलेली टिप्पणी येथे उद्धृत करणे उद्बोधक ठरणार आहे. वनस्पती मूळ नैसर्गिक रूपात असोत की विद्यमान रानवट रूपात असोत, आपल्या जगातील वनस्पतिविषयक ज्ञानापेक्षा जगातील बऱ्याच मोठ्या भागातील लागवडीच्या वनस्पतींच्या उत्पादनांसंबंधीचे आपले ज्ञान कितीतरी अधिक अचूक आहे. म्हणूनच, नैसर्गिक वनस्पतींवर आधारलेला कोणताही क्रमबंध आपल्याला अज्ञाताकडून ज्ञाताकडे नेणाऱ्या युक्तिवादाच्या कच्च्या पायावर उभा करतो.

म्हणून निष्कर्ष असा निघतो की, नैसर्गिक वनस्पतींवर आधारलेला कोणताही प्रादेशिक क्रमबंध—ज्या मर्यादित प्रमाणात तो रचणे शक्य आहे तेवढ्यानेही—' नैसर्गिक ' अथवा ' भौगोलिक ' विभाग या शीर्षकांनी व्यक्त होणारा दावा न्याय्य असल्याचे सिद्ध करू शकत नाही. म्हणजे, वनस्पतींवर आधारलेली जगाची विभागणी ही जगाच्या केवळ वनस्पतींचीच विभागणी असते, दुसऱ्या कशाची नसते. (येवढेच अनुमान त्यावरून आपल्याला काढता येते). हवामाननिष्ठ विभागांच्या नकाशांप्रमाणेच या नकाशांवरूनही अन्य काही गोष्टी सूचित केल्या जातात हे खरे असले, तरी ते विश्वसनीय असे काहीच सांगू शकत नाहीत.

मग, एखाद-दुसऱ्या नैसर्गिक घटकावर आधारलेल्या क्रमबंधाऐवजी, मानवाच्या दृष्टीने महत्त्वाच्या असणाऱ्या सर्वच नैसर्गिक घटकांवर आधारलेल्या एखाद्या क्रमबंधाचा शोध घेणे इष्ट नाही का ? प्रथमदर्शनी अशी शंका येण्यासारखी आहे की, ही गोष्ट यापूर्वीच का केली गेली नाही ! प्रमुख नैसर्गिक घटकांच्या—म्हणजेच : हवामान, उंचसखलपणा, मृत्तिका व नैसर्गिक वनस्पती यांच्या—संश्लेषणाचा विचार प्रथम करू या. असे संश्लेषण, उदाहरणार्थ : मंगोलियाच्या एका भागात आढळले, तर तशाच प्रकारचे संश्लेषण पाटागोनियाच्या काही भागात आणि आपल्याच देशातील ग्रेट प्लेन्स (मोठी मैदाने) या भागात तशाच प्रकारचे संश्लेषण आढळणार नाही का ? आपण तद्देशीय प्राणिजीवनांतील भेदांकडे—एकेकाळी त्यांचे महत्त्व मोठे होते हे मान्यकरूनही—कानाडोळा करू शकलो, आणि सापेक्ष स्थानाविशेषांचे फरकही लक्षात घेतले नाहीत, तर एकाच नमुन्याची आवृत्ती विविध क्षेत्रांत होत असलेली आढळते, म्हणजेच नैसर्गिक पर्यावरणाचा एक प्रकार आपल्याला आढळतो, याबाबत एकमत होईल असे गृहीत धरण्यास हरकत नाही. अशा प्रकारांची पुष्कळ अन्य उदाहरणे दाखवून देता येतील. पण, येवढ्या आधारावर कोणी जगाची विभागणी करण्याचा प्रयत्न करू लागला, तर त्याला एक गोष्ट सहज कळून चुकेल की, अशा केवळ उदाहरणांनी नकाशा तयार होत नसतो. हवामान, उंचसखलपणा व पृष्ठशिळा यांच्या परिभाषेत सांगता येईल असे उत्तर जर्मनीच्या मैदानांचे प्रतिरूप आपल्याला कोठे आढळणे शक्य आहे का ? कॅरोलिना पिडमाँट (गिरिपाद) मधील याच कारकांच्या पण, यापेक्षा थोड्या वेगळ्या, संश्लेषणाला " कॅरोलिना गिरिपाद प्रकार " असे नाव दिले तर, जगातील इतर कोणत्या प्रदेशाचा त्यात अंतर्भाव करणे शक्य होणार आहे का ? हीच कल्पना सरळ शब्दात पुढे दिल्याप्रमाणे मांडता येईल. मनुष्याच्या दृष्टीने महत्त्व असलेल्या अनेक कारकांचा एक संयोग असतो, (अर्थात, निरनिराळ्या मनुष्यगटांच्या दृष्टीने एकाच कारकाच्या महत्त्वात फरक पडत जात असला तरी, तिकडे तूर्त दुर्लक्ष करावे). हे विविधप्रकाराचे महत्त्वाचे कारक पुरेसे स्वतंत्रही असतात. म्हणून त्यांच्या एकत्र साहचर्याने विविध प्रकारचे अनेकवेळा संयोग निर्माण होण्याची शक्यता असते. प्रत्यक्ष जगाच्या विभागणीच्या कोणत्याही श्रेणीचा उपयोग केला तरी, जगात आढळणाऱ्या विविध संयोगांची संख्या अंदाजे क्षेत्रीय विभागांच्या संख्येएवढीच मोठी असते. म्हणजे, जवळजवळ प्रत्येक प्रदेश हा आपल्यापरीने एक एक नमुनाच असतो.

या प्रकारांची अधिक सामान्य स्वरूपात रचना केली गेली तर, प्रत्येक वेगळा प्रदेश अधिक सामान्य स्वरूप असलेल्या प्रकाराचा एक पोटप्रकार म्हणून विचारात घेणे शक्य होईल, आणि वरील अडचण अशाप्रकारे टाळता येईल, असेही सुचविले जाण्याची शक्यता आहे. असेही काही प्रदेश असतात की, ज्यातील प्रत्येक कारक स्वतंत्ररीतीने बदलत असतो. पण, ज्यातील प्रत्येक कारक स्वतंत्ररीतीने बदलत असतो अशा कित्येक कारकांच्या संयोगांतून सर्वसाधारण प्रकार हाती लागण्याचा संभव असतो. मात्र, कितीही बदलत असले तरी त्यातले काही कारक गौण महत्त्वाचे आहेत असे गृहीत धरावेच लागेल.

तौलनिक प्रादेशिक विभागणीच्या प्रश्नाच्या दृष्टीने हे प्रमेय इतके महत्त्वाचे आहे की, ते नीट समजून घेणे जरूर आहे ; मग त्यासाठी कोणताही आधार घेतला तरी चालेल. उदाहरणार्थ : उत्पत्तीचा विचार न करता हवामानविषयक प्रत्यक्ष परिस्थितीवर आधारलेले हवामानाचे वर्गीकरण, हे वर्षण, तपमान, वारे, आर्द्रता इत्यादी अंशतः स्वतंत्र अशा पुष्कळशा कारकांच्या संघटनेचे प्रतिबिंब असते. पण, आपल्यापुढे असलेले क्रमबंध-उदाहरणार्थ : कोप्पेन, जोन्स, व्हिटल्से किंवा थॉर्नवेट यांचे क्रमबंध–वर्षण व तपमान या दोनच कारकांवर आधारलेले असतात, आणि इतरांच्याकडे पुष्कळ अंशाने दुर्लक्षच केलेले असते. यांपैकी प्रत्येक कारकाच्या मर्यादित संख्येच्या श्रेणीच घेतल्या आणि वर्षणाच्या 'क्ष' श्रेणी व तपमानाच्या 'य' श्रेणी आहेत असे मानले तर, साहजिकच वर्षणाची संभाव्य संयोगसंख्या क्ष × य इतकी असेल. आता, त्या दोहोंपैकी प्रत्येक कारकाच्या सहाच श्रेणी घेतल्या, तर हवामान-प्रकारांची एकूण औपपत्तिक संख्या छत्तीस भरेल. यातील काही प्रकार आपल्या पृथ्वीग्रहावर अस्तित्वातच नसतात. आणि त्यांपैकी कोणताही एक कारक सजीवांच्या जीवनाला धोका निर्माण करणारा असेल, तर इतर कोणत्याही कारकांतील बदल लक्षात घेण्याची आवश्यकताच रहाणार नाही ; कारण, येवढ्या एका कारणावरून यातील असे काही प्रकार आपण स्वेच्छेने वगळू शकतो. परिणामी, ज्याना मान्यता द्यावयाची ते प्रत्यक्ष संयोग संख्येने फार भरणार नाहीत, आणि प्रत्येकी एका प्रकारात कित्येक क्षेत्रांना प्रतिनिधित्व देणेही सोईचे होईल.

पण, तपमानाच्या सहा, वर्षणाच्या सहा आणि उंचसरूपणाच्या सहा या सर्वांचा संयोग करण्याचा प्रयत्न केल्यास अशा औपपत्तिक प्रकारांची संख्या एकशे चौवेचाळीस होते आणि नैसर्गिक पर्यावरणातील सर्व स्वतंत्र घटकांचे हे सूत्र पूर्ण करण्यासाठी तळ-शिळांच्या कित्येक श्रेणींचीही यात भर घालावी लागेल (कारण बहुतेक सर्व प्रत्यक्ष मृत्तिकांचा निर्णयात्मक कारक तोच असतो) ; येवढेच नव्हे, तर ज्या प्रमाणात, पाणलोट, पृष्ठजलप्रवाह आणि वनस्पती अशा अन्य घटकांच्या श्रेणीही भरीला घ्याव्या लागतील.

ग्रान्योचा प्रादेशिक सूत्रांचा क्रमबंध या संयोगाचे एक विशिष्ट उदाहरण म्हणून विचारात घेता येईल. त्यात त्याने प्रत्येक एका प्रादेशिक प्रकाराचा सात स्वतंत्र चिन्हांनी नामोल्लेख केला आहे. (हवामान वगळून उरलेल्या सहा नैसर्गिक घटकांची सहा चिन्हे, आणि सर्व मानवी घटकांसाठी एक चिन्ह अशी सात). यातील प्रत्येक एका चिन्हापोटी चार श्रेणी मान्य करावयाच्या झाल्या, तर एकूण संभाव्य नमुन्याची संख्या सोळा हजाराहून अधिक भरते. कोणत्याही एका विशिष्ट क्षेत्रात त्यातील पुष्कळसे नैसर्गिक घटक हे किरकोळ महत्त्वाचे कारक आहेत, असे मानता येण्याची शक्यता आहे, हे खरेच. पण, कोणत्यातरी दुसऱ्या विशिष्ट क्षेत्रात, त्यांतीलच कोणतातरी एक सर्वप्रथम महत्त्वाचा असण्याचीही शक्यता आहे. म्हणूनच, कोणताही एक कारक विवेचनातून अजिबातच वगळणे शक्य होणार नाही. परिणामी, प्रकार म्हणून मान्यता द्यावयाच्या प्रत्यक्ष संयोगांची एकूण संख्या मान्यता द्यावी लागेल अशा प्रदेशांच्या एकूण संख्येपेक्षा असलीच तर फार थोडक्याने कमी असेल. तरीही त्यामुळे, तुलना करण्याचा हेतू पुढे ठेवून प्रदेशांचे वर्णन करण्याची लघुलिपी-पद्धती हाती देणाऱ्या या सूत्रांचे मूल्य आडवळणाला नेले असे होणार नाही. प्रस्तुत लेखकानेही दोन क्षेत्रांमधील विभाजन-वर्णनासाठी अशाच प्रकारे एक क्रमबंध वापरलेला आहे. पण, त्याला असे आढळून आले, की त्यातून वर्गीकरणाचा एकच एक क्रमबंध हाती लागत नाही, तर जितके कारक विचारात घेतलेले असतात तितकेच क्रमबंध निर्माण होतात (३५७).

पण, अंकगणिताचा अवलंब केल्यावर परिस्थिती आणखीच बिघडली, असे समजण्यास हरकत दिसत नाही ; कारण, कितीही प्रकारांना मान्यता द्यावयाची असली, तरी आपल्या इच्छेप्रमाणे ही संख्या केव्हाही कमीजास्त करता येते. त्यांचे सामान्यीकरण केले, म्हणजेच कमी भेद असलेल्यांचे संयोग केले, की प्रकारांची संख्या कमी होते. अर्थातच, ज्याच्या सहाय्याने आपल्याला हे सर्व घटक क्रमवार लावता येतील अशी एखादी मोजपट्टी आपल्या हाती मिळाली, तरच हे करणे शक्य आहे. पण, एकाचे माप दुसऱ्याला लागू पडत नाही अशी या घटकांची स्थिती मुळापासूनच आहे. उदाहरणार्थ उताराचे अंशात्मक मूल्य आणि तपमानाचे अंशात्मक मूल्य यांची तुलनाच होऊ शकत नाही.–म्हणून, त्यांचा दुसऱ्या गोष्टींवर होणारा परिणाम या परिभाषेतच त्यांच्या महत्त्वांचा क्रम निश्चित करता येणे शक्य आहे. आता, ज्यांचा असा मापनयंत्र म्हणून उपयोग करता येतो ते एक बाह्यांग रूपधेय असते. जेथे प्रत्येकी तेच घटक आहेत अशा कोणत्याही दोन ठिकाणी त्या रूपधेयातून त्या घटकांच्या महत्त्वांचा आविष्कार एकाच क्रमाने होत असला पाहिजे, ही एक त्यातील अत्यावश्यक अट आहे. आणि जरी हे घटक स्वतः मोठ्या प्रमाणात बदलत गेले, तरीही त्यांचा क्रम बदलता कामा नये, ही अट कोणत्याही विभाग–पोटविभागांच्या क्रमबंधासाठी अत्यावश्यकच असते. पण, निर्जीव पदार्थ, वनस्पती, प्राणी अथवा मानव यांच्या संबंधीचे कोणतेही रूपधेय निवडले, तरी अशाप्रकारचे मापन यंत्र अस्तित्वात नाही किंवा अस्तित्वात येण्याची शक्यात नाही, असेच आढळून येईल, हे येथे सांगण्याची जरूरीच नाही ; कारण, हे घटक त्या रूपधेयावर सामान्यतः किरकोळ परिणाम करणारे असले, तरी, अगदी एकांतिक स्थितीत, तेच घटक मोठ्या प्रमाणावर परिणाम घडवत असण्याची शक्यात असते.

इ-१५५७-२७ ब.

हवामानांचे वर्गीकरण करत असताना निर्माण होणाऱ्या अडचणींचे परीक्षण केल्यास, या विधानांची यथार्थता सहज पटण्यासारखी आहे. सामान्यीकरण पद्धतीने ज्यातील नमुन्यांची संख्या तर्काला पटेल इतकी कमी करण्याची सोय आहे, अशा कोणत्याही प्रकारांच्या क्रमबंधांत प्रथम प्रमुख विभागांच्या भाषेत त्यांचा क्रम लावून नंतरच त्यांचे पोटविभाग प्रकारांच्या स्वरूपात मांडणे आवश्यक असते. अशारीतीने मांडणी करण्याची सोय बहुतेक सर्व हवामानांच्या क्रमबंधात केलेलीच असते. उदाहरणार्थ कोप्पेन व यॉर्नटवेट यांचे हवामानक्रमबंध घ्या. पोटविभागांसाठी वापरलेल्या गमकांपेक्षा प्रमुख विभागांसाठी गमके जास्त महत्त्वाची असतील तरच प्रमुख विभाग व गौण विभाग यांतील भेद बुद्धीला पटतील. प्रश्न असा की अधिक महत्त्वाचे कोण ? वर्षण की तपमान ? या प्रश्नाचे उत्तर या दोनही कारकांनी ज्यांच्यावर परिणाम घडविले आहेत अशा रूपधेयाच्या भाषेतच द्यावे लागेल, दुसऱ्या भाषेत चालणार नाही, ही गोष्ट उघड आहे.

तपमान व वर्षण या दोहोतील भेदांचे संश्लेषक माप नैसर्गिक वनस्पतींच्या रूपाने मिळण्याची शक्यता आहे. याच आधारावर, तपमानापेक्षा वर्षण अधिक महत्त्वाचे असल्याचा निर्णय घेण्यास पुरेशी कारणे आहेत. आणि यॉर्नटवेटनेही तेच केले असले, तरीही ध्रुवप्रदेशांबाबत हे विधान खचितच खरे ठरणारे नाही. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर, वृत्तान्तर्गत प्रदेश व ध्रुवप्रदेश यांच्या दरम्यानच्या कोणत्यातरी एका अंशस्थानावर या दोन कारकांचे सापेक्ष महत्त्व पार बदलते, आणि त्यामुळे हाच क्रमबंध तिकडे तर्कविरूद्ध ठरतो.

उलटपक्षी, कोप्पेनप्रमाणेच, कोणी ' लागवडीखालची पिके ' हीच मोजपट्टी वापरून त्यांच्यावरून भेद मोजेल आणि वर्षणांतील फरकांपेक्षा तपमानांतील फरक अधिक महत्त्वाचे असतात असा निर्णय देईल. मात्र, अवर्षणाच्या प्रदेशात परिस्थिती याच्या उलट असल्याने तेवढे त्या क्रमबंधातून वगळावे लागतील.

आतापर्यंत, फक्त पहिली एकच अडचण आपण लक्षात घेतली आहे. " लागवडीची पिके " ही काही एकच एक मोजपट्टी आहे असे म्हणता येणार नाही, कारण तपमान आणि वर्षण यांचे परिणाम वेगवेगळ्या पिकांवर वेगवेगळे होत असतात. अर्थात, मोजमाप म्हणून वापरावयाची पिके मर्यादित संख्येचीच हवीत. पुष्कळसे क्रमबंध काही लागवडीची पिके व नैसर्गिक वनस्पती या दोहोंवर आधारलेली असतात. परिणाम असा होतो की, क्रमबंधातील कोणत्याही एका मुद्यावर विचार करताना तपमान अथवा वर्षण यांपैकी अधिक महत्त्व कोणाला द्यावयाचे याबाबत घेतलेला निर्णय वनस्पतींच्या एका गटाला लागू पडला, तरी तो दुसऱ्यास लागू पडेलच असे सांगता येणार नाही. याचाच अर्थ, तो निर्णय स्वैरपणे घेतलेला असतो. याचा परिणाम म्हणून तयार होणारा क्रमबंध विभाग व पोटविभाग यांचा अर्थपूर्ण क्रमबंध होत नसून दोन कारकांच्या वेगवेगळ्या प्रकार–संयोगांचा केवळ एक सोइस्कर क्रमबंध होत असतो. उदाहरणार्थ : कोप्पेनच्या क्रमबंधात Cfa आणि Csa यांच्या C चे पोटविभाग म्हणून संबंध दाखविला आहे. मग, Cfa आणि Dfa यांचाही (Fca आणि Fda या स्वरूपात) F(म्हणजेच, वर्षभर विपूल पर्जन्य) या प्रमुख गटाचे पोटविभाग म्हणून संबंध जोडण्यास त्यापेक्षा वेगळी कारणे असावयाची गरज काय ?

Cfa=कफअ
Csa=कसअ
C=क
Dfa=डफअ
Fca=फकअ
Fda=फडअ

हवामानविषयक प्रश्नांच्या कोणाही अभ्यासकाला येथे एक गोष्ट कबूल करावी लागेल, की मी त्यातील गुंतागुंतींचे अतिरंजित वर्णन केलेले नाही, तर उलट, त्याला सोपे स्वरूप दिले आहे. वर्षण अथवा तपमान यांपैकी कोणताही एक कारक एकच प्रकारच्या संख्यानी मोजला जावा इतका सुटसुटीत नाही ; तर, वेगवेगळ्या ऋतूंतील ज्यांचे बदल कोणत्यातरी सुयोग्य वर्गीकरणानेच दाखवावे लागतात, असे गुंतागुंतीचे ते कारक आहेत. यातून आणखी अशाप्रकारचे अनुत्तरित प्रश्न उद्भवतात. ऋतुनुसार वर्षणांतील किती फरक ऋतुनुसार तपमानांतील किती फरकापेक्षा जास्त महत्त्वाचा मानावयाचा ? (आणि, कोणावर होणाऱ्या परिणामांनी त्याचे महत्त्व मोजावयाचे ?).

म्हणूनच हवामानांच्या वर्गीकरणात फारच थोडी एकवाक्यता असते, याचे फारसे आश्चर्य वाटत नाही. खरे म्हणजे, या दोन भिन्न कारकांचा संयोग करण्यामागील युक्तिवादालाच आव्हान दिले जाण्याची शक्यता आहे. कदाचित, आपल्या भाषेत या दोनही कारकांचा समावेश करणारा हवामान हा एकच शब्द वापरला जातो, या वस्तुस्थितीमुळेच आपला गैरसमज होत असण्याची शक्यता आहे. कारण, उत्पत्तिकारणामुळे त्यांच्यात केवढेही साहचर्य असण्याचा संभव असला तरी त्यांच्यातील प्रत्यक्ष फेरबदलांबाबत आणि त्यांच्यांतील बदलांमुळे होणाऱ्या व आपल्याशी प्रामुख्याने संबंधित असलेल्या परिणामांबाबतही ते कारक पुष्कळसे स्वतंत्रच असतात. (वर्षणकार्यक्षमतेच्या सूत्राने तपमान आणि वर्षणाची परिणामकारकता यांच्यांतील संबंध थॉर्न्ट्वेटने दाखवून दिला आहे ; आणि तपमानकार्यक्षमतेपेक्षा तसा तो वेगळाच दिसतो (३९१). वनस्पतींच्या दृष्टीने पहाता, पाणी आणि उष्णता यांचा संयोग करण्याचे जेवढे प्रयोजन आहे, तेवढेच प्रयोजन पाणी आणि मृत्तिका यांचा संयोग करण्यातही आहे—कदाचित, तुलनेने थोडे जास्तच आहे. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर, वर्षणांतील आणि मृत्तिकांतील संयुक्त फरकांचे वर्गीकरण हे, आपण ज्याला हवामाननिष्ठ वर्गीकरण असे म्हणतो, त्याच्याइतकेच तर्कशुद्ध असल्याचे मानले जाण्यास हरकत नाही. वनस्पतींच्या दृष्टीने समुचित वर्गीकरणात या तिघांचाही संगत कारके म्हणून संयोग करण्यास हरकत नाही, हे उघडच आहे. मृत्तिका बव्हंशी वर्षण तपमान व पूर्वीचे वनस्पतिजीवन यांच्या अवस्थांतून निर्माण झालेल्या असतात, असा आक्षेप घेतला गेला, तर आपण आणखीच अडचणीत सापडणार आहोत. मग, वर्षण, तपमान, उतार, जनकशिला, पाणलोट इतक्यांच्या अवस्थांचा संयोग करावा लागेल. याशिवाय, त्यांच्यात होत आलेल्या भूतकालीन बदलांचा विचार करावा लागेल तो वेगळाच ! (येथे मृत्तिकांच्या वर्गीकरणात येणाऱ्या सुप्रसिद्ध अडचणींकडे अंगुलिनिर्देष करण्यास हरकत नाही. सापेक्षतः स्वतंत्र असलेल्या इतक्या कारकांवर त्या अवलंबून असतात, की त्यांपैकी कोण अधिक महत्त्वाचा व कोण कमी हा निर्णय आपल्याला थोड्याफार स्वैरपणेच घेणे भाग पडते.)

थोडक्यात, वनस्पतींच्या वाढीच्या दृष्टीने महत्त्वाच्या असणाऱ्या सर्व घटकांचे एकाच वर्गीकरण क्रमबंधात संश्लेषण करण्याचा प्रयत्न केल्याने कोणताही तर्कशुद्ध अथवा सत्यप्राय क्रमबंध निर्माण होण्याची शक्यता नाही. खरे पहाता, मूळ नैसर्गिक वनस्पतींच्या रूपाने या सर्व घटकांचे संश्लेषण निसर्गानेच केलेले होते. पण, त्या संश्लेषणाचे निरीक्षण करणे आता शक्य होत नाही, आणि म्हणूनच, त्यांचे विश्लेषण करणेही शक्य होत नाही. तथापि, त्यांचा एकत्र विचार केलाच, तर त्यातून जगाच्या अत्यंत महत्त्वाच्या भागांच्या बाबतीतही अगदीच किरकोळ महत्त्वाच्या वस्तुस्थिती त्यातून निष्पन्न होतात.

केवळ वनस्पतींच्या दृष्टीने महत्त्वाच्या अशा सर्व कारकांचा एकाचवेळी विचार करताना अनेक अडचणी उद्भवतात. हे लक्षात घेता, " भूक्षेत्र-दृश्याला त्याचे वर्तमान स्वरूप देणाऱ्या सर्व घटकांवर आधारलेले नमुने तयार करण्याचे पासार्गने अंगिकारलेले कठिण कार्य किती दुस्तर असेल, याची कल्पनाच करवत नाही ! (या घटकांत सर्वसाधारण नैसर्गिक घटक आणि " सांस्कृतिक भूक्षेत्र दृश्याचे ही " पुष्कळसे घटक यांचा समावेश होतो ; तरी, मानवांचा व प्राण्यांचा त्यात समावेश होऊ शकत नाही. पण, ही गोष्ट इतकी स्पष्ट आहे, असे ग्राडमानला, व इतर लेखकांनाही, मुळीच मान्य नव्हती. (२३६, ३३३-३५). म्हणूनच, प्रस्तुत प्रश्नाचे व त्याच्या पद्धतींचे विधान करण्यात भूगोलकारांना जितके यश मिळते, तितके यश त्यांच्या विषय-प्रतिपादनाला लाभत नाही, " असे सॉरचे मत झाले असल्यास नवल नाही. (८४, १९१).

सत्य नमुने शोधण्याऐवजी तात्त्विक नमुने सिद्ध करून, अन्य क्रमबंधांत आपल्याला आढळून आलेल्या पुष्कळशा अडचणी पासार्गने दूर केल्या, हे येथे लक्षात येण्यास हरकत नाही. " त्याचे नमुनेदार ' भूक्षेत्रदृश्य ' हे मुळीच अस्तित्वात नसलेले असे आदर्श ' भूक्षेत्रदृश्य ' आहे. पण, त्या नावाखाली सत्यस्थितीतील पुष्कळशा भूक्षेत्रदृश्यांची तुलना करण्यासाठी उपयोगी पडणारी एक वस्तू सादर केल्याचे श्रेयही त्यालाच आहे " (२३६, ३३३). ग्रान्योही त्याच्या प्रकाराबाबत पुष्कळसे असेच काहीसे म्हणतो (२५२, ३४). अशा प्रकारचा एक अमूर्त-क्रमबंध आपल्या दृष्टीने मूल्यवान असल्याचे सिद्ध होण्याची शक्यता असल्यामुळे, त्याच्याकडे अधिक लक्ष पुरविणे आपल्या हिताचे आहे.

पासार्गने सादर केलेल्या या क्रमबंधाच्यारूपाने प्रमुख व गौण विभाग तयार करणारी व त्यातूनच वर्ग व पोटवर्ग तयार करण्याची दिशा दाखविणारी एक तर्कसिद्ध रचना आपल्याला मिळते. गण, जाती, प्रजाती असे सावयव सजीवांच्या आदर्श प्रकारांचे वर्गीकरण जसे लीनिअन पद्धतीतून मिळते, तशाप्रकारचेच आदर्श प्रकारांचे वर्गीकरण सादर करणे, हाच त्याचाही हेतू आहे (२६८, ९१-९८). ज्यात सर्व कारकांचे प्रतिनिधित्व आढळते असा आपण केलेला अंतिम पोटविभाग हा ' प्रजाति ' रूप असून त्याचा प्रत्येकी एकाहून अधिक नमुना पृथ्वीतलावर असण्याची शक्यता नाही, हे पासार्गच्या लक्षात आलेले दिसत नाही. पण तो मुद्दा अगदी गौण आहे.

भूक्षेत्रांचे विविध घटक पुष्कळशा प्रमाणात स्वतंत्र असतात, पण सजीवांच्या जगात मात्र ते तसे नसतात. या वस्तुस्थितीमुळेच एक गंभीर अडचण निर्माण होते. पृथ्वीच्या पाठीवर सर्वच कल्पनागम्य संयोग सापडतातच असे नाही, हे खरेच. निर्जल प्रदेशांच्या हवामानात अरण्ये आढळत नाहीत, पण चढ-उतारांचे सर्वप्रकार हवामानांच्या सर्व प्रकारांतून आढळतात. एकाच हवामानात मूलतः भिन्नप्रकारच्या मृत्तिका आढळतात, तशा लक्षणीय भिन्न-स्वरूप असणाऱ्या हवामानांत सरूप मृत्तिका आढळतात. पाठीचा कणा असलेल्या प्राणिवर्गाप्रमाणेच पाठीचा कणा नसलेल्या प्राणिवर्गातही सस्तन प्राणी आढळावे, किंवा काही चतुष्पादांना पंख असल्याचे आढळावे, त्यातलाच हा प्रकार आहे !

यात सांस्कृतिक रूपाची भर घातली म्हणजे परिस्थिती आणखी गुंतागुंतीची होते. हवामान, चढ-उतार व मृत्तिका हे सर्व अगदी सरूप असलेल्या क्षेत्रांतही, मानव सर्वस्वी वेगळी रूपे निर्माण करत असण्याची शक्यता असते, इतकेच नव्हे तर, यातील कोणतेही एखादे सांस्कृतिक रूप निरनिराळ्या प्रकारचे हवामान, चढ-उतार आणि मृत्तिका असलेल्या क्षेत्रांमधून निर्माण करू शकतात.

सजीवांच्या एकाच प्रजातीतील सर्व नमुन्यांचा जन्म सर्वसाधारण उद्‌गमात असतो, तसेच एकाच जातीच्या सर्व प्रजातींचा उद्‌गम सर्वसाधारणच असतो ; आणि त्या उत्क्रांतिक्रमसंबंधात तुम्ही कितीही मागे गेलात तरी अशीच श्रेणी असलेली आढळते. या वस्तुस्थितीचा परिणाम म्हणूनच, लिनायसने घालून दिलेल्या क्रमबंधासारखा, सजीव सृष्टीचे वर्गीकरण करणारा एखादा तर्कशुद्ध क्रमबंध रचता येण्याची शक्यता असते, हे आम्ही यापूर्वीच सुचविलेले आहे. (प्रकरण ९, विभाग ' क '). पण, अशाच प्रकारे, वेगवेगळ्या प्रदेशांच्या उत्क्रांतीचा क्रमबंध कल्पनेतही तयार करण्याची शक्यता नाही, हे आम्हालाही माहीत आहे. सर्वच क्षेत्रांच्या विविध रूपधेयांची पार्थिव व सौर उगमस्थाने एकच आहेत ; तरीही, ज्या लक्षणांनी त्या त्या क्षेत्राला विशिष्ट स्वरूप प्राप्त झाले ते मूळघटकांचे संयोग, जातिनिष्ठ प्रकारांतून प्रथम प्रजातिनिष्ठ प्रकार व नंतर वैयक्तिक नमुने या क्रमाने उत्क्रांत झालेले नाहीत. कोणत्याही क्षेत्राचे हवामान उत्पत्तिदृष्ट्या जागतिक हवामानाचाच अंश असतो. म्हणजेच, त्या क्षेत्राच्या जनन विकासात ते हवामान सहभागी असत नाही ; आणि अन्य क्षेत्रांपेक्षा वेगळ्या दिसणाऱ्या त्या प्रकारच्या सर्व क्षेत्रांच्या जनन विकासात तर ते हवामान निश्चितच भाग घेत नाही.

म्हणूनच, अनेक अभ्यासकांनी प्रदेश प्रकार व जीव-प्रजाति यांची फलदायी तुलना होऊ शकत नाही, असे आग्रहपूर्वक सांगितले आहे. (c/o पेंक १६३, ४१). फिलिप्सनने या तर्कभ्रमाची दखल पासार्गने आपला क्रमबंध सादर करण्याच्याही बऱ्याच पूर्वी घेतलेली होती (४१३, १३). प्रत्येक प्रदेशाचे पृथग्त्व प्रजातींतील नमुन्यांच्या पृथग्त्वापेक्षा खूपच विशिष्ट स्वरूपाचे असते, असेही ते अभ्यासक आग्रहाने सांगत (c/o क्राइत्स बुर्ग २४८, ४१३). त्यानंतर, पासार्जने लिनिअन पद्धतीशी प्रदेशांची तुलना करणे तितकेसे योग्य नाही, असाच निष्कर्ष काढला (२७२, ५७). तरीही क्राइत्स बुर्ग, फिलिप्सन आणि पेंक यांच्या प्रमाणे पासार्गलाही, प्रदेशांच्या प्रजाती नसल्यातरी, प्रदेशांचे प्रकार, येनकेनप्रकारेण, सिद्ध करणे शक्य आहे, असाच विश्वास वाटतो.

मात्र, हे प्रकार सत्यस्थितीत उपलब्ध आहेत, ते फक्त आपण त्यांना शोधून काढण्याची वाट पहात आहेत, अशी परिस्थिती नाही, येवढी गोष्ट स्पष्ट आहे. तरीही, प्रकारांच्या वर्गीकरणांचा तर्कसिद्ध क्रमबंध तयार करणे शक्य होणार आहे. पासार्गनेही अभावितपणे हेच करण्याचा प्रयत्न केलेला असावा. पण, त्याची औपपत्तिक रूपरेषा बाजुला ठेवून, त्यानेच स्वतंत्रपणे केलेले प्रत्यक्ष अभ्यास पहिल्या प्रमुख विभागणीच्या पलीकडे फारसे कधी जाऊ शकले नसल्यामुळे, प्रामुख्याने वनस्पतींच्या भाषेत प्रदेशप्रकार निश्चित करणारा एक क्रमबंध यापेक्षा त्याच्या क्रमबंधाचे स्वरूप फारसे वेगळे असल्याचे दिसत नाही ; आणि हेटनरनेही हीच गोष्ट लक्षात आणून दिलेली आहे (२४२, १६३ f). पण, वनस्पती त्यात प्रादेशिक वनस्पती ज्या पद्धतीने निश्चित केले आहेत ते लक्षात घेता, परिणामी तो एक केवळ हवामानावर आधारित असलेला क्रमबंध ठरतो, हे वेबेलच्या लक्षात आले आहे. (२५०, ४७६). या प्रश्नाची पासार्गनेही अनेक ठिकाणी व विविध प्रकारे चर्चा केलेली आहे, आणि त्यापैकी एकात, त्याने वरील विधान जवळजवळ मान्य केलेले आहे, हे खरे आहे. तो असे लिहितो, की त्याचे सरासरी प्रकार हवामानातील भेदांवरच आधारलेले आहेत, आणि अन्य कारकेही ' सरासरीने ' उपस्थित आहेत असेच गृहीत धरलेले आहे. यांतील सामान्य प्रदेश प्रकारावर " बदल घडवून आणणाऱ्या अन्य कारकांचा " (Modifikatoren) प्रभाव पडण्याची शक्यता आहे ; तशी एकांतिक परिस्थितीत कोणत्याही नैसर्गिक वा मानवी कारकाचाही प्रभाव पडण्याची शक्यता आहे. " पण, ' कोरडे ', ' ओले ', ' सुपिक ', ' विनाशक ', व ' सांस्कृतिक ' अशी त्यांच्या गटांना नावे देऊन त्यांची मांडणी केली, तर भूक्षेत्रदृश्यांच्या प्रकारांचा तो एक तर्कसिद्ध क्रमबंध झाला असे म्हणण्यास हरकत नाही, " असे आपले ठाम मत असल्याचे पासार्जने नमूद केले आहे (२५९, ७०४). पण, या विविधकारकांचा त्यांच्या महत्त्वानुसार एक निश्चित क्रम असल्याचे गृहीत धरले, तरच हे करता येणे शक्य आहे. पण अशी गृहीत प्रमेये ही स्वेच्छेने मान्य केलेली असतात, इतकेच नव्हे तर, अनेक बाबतीत ती वस्तुस्थितीच्या अगदी विरूद्ध असतात असे प्रत्यक्ष दाखवून देणे शक्य आहे. उदाहरणार्थ : अनेक क्षेत्रांत किरकोळ महत्त्वाचा वाटणारा एखादा कारक इतर काही क्षेत्रांत सर्वप्रथम महत्त्वाचा असण्याची शक्यता असते.

म्हणूनच, ज्यांच्या महत्त्वात बदल होत असतो व जे कमीजास्त प्रमाणात स्वतंत्र असतात अशा बऱ्याच कारकांचा आधार घेऊन औपपत्तिक प्रकारांचा क्रमबंध देखील रचणे शक्य होत नाही. क्षेत्रांच्या जातिनिष्ठ प्रकारांत जगाची तौलनिक विभागणी तर्कदृष्ट्या समर्थ असलेल्या एकाच क्रमबंधाने सादर करावयाची झाली, तर कोणत्यातरी एका, आणि एकाच, नैसर्गिक घटकावर, अथवा घटकजटिलावर (उदाहरणार्थ वनस्पती) तो उभारता येण्याची शक्यता आहे. अशारीतीने, एकाच रूपधेयावर आधारलेले क्रमबंध भूगोलदृष्ट्या फार मूल्यवान ठरतात, यात शंकाच नाही. पण, सर्वसाधारण प्रादेशिक भूगोलाला योग्यशी पार्श्वभूमी पुरविण्या इतके कोणतेही एक रूपधेय, आणि एकटेच, समर्थ असते का, हा प्रश्न येथे सोडवावा लागतो. एकतर, अगदी निर्दोष क्रमबंधाची अपेक्षा करणे चुकीचे आहे. आम्ही कितीही

आक्षेप घेतले असले, तरी हवामान, अथवा नैसर्गिक वनस्पती, यावर आधारलेला कोणताही एक क्रमबंध बऱ्याच अंशी समाधानकारक पार्श्वभूमी पुरवू शकतो, असे परिपाठाने सिद्ध होण्याची शक्यता आहे. हवामानावर आधारलेला क्रमबंध तर्कशुद्ध पद्धतीने विभाग व पोटविभाग अशा स्वरूपात मांडता येत नाही ; तरीही शक्यतेच्या कोटीतील तेवढाच एक मार्ग आहे, कारण फक्त दोनच प्रमुख कारकांचा संयोग त्यासाठी आवश्यक असतो, आणि त्या दोहोबद्दलचा गृहीत-तपशील आपल्याला उपलब्ध होऊ शकतो. नैसर्गिक वनस्पतिजीवनावर आधारलेल्या कोणत्याही क्रमबंधासाठी लागणारी गृहीतके संपूर्ण असत नाहीत, आणि तशी कधीच असू शकणार नाहीत. पण, बऱ्याच अंशी समर्पक होईल अशा एका क्रमबंधासाठी पुरेशी गृहीतके उपलब्ध आहेतच. यातील कोणताच क्रमबंध हा अन्य नैसर्गिक अथवा सांस्कृतिक रूपधेयांची गुरूकिल्ली नसला, तरी यापैकी कोणत्याही एकाच्या बाबतीत पुरेशा प्रमाणात संगती असण्याची शक्यता असते, आणि तेवढी संगती तो क्रमबंध प्रादेशिक अभ्यासाची रूपरेखा म्हणून उपयुक्त होण्यास पुरेशी असते.

या दोहोंपैकी कोणत्याही क्रमबंधाच्या उपयुक्ततेबाबतचा आपला निर्णय हा त्याच्या परिणामावरच आधारलेला असला पाहिजे. जर्मन व इंग्रज भूगोलकारांच्या विरूद्ध पद्धतीने, म्हणजे जवळजवळ निरपवादपणे पाठ्यपुस्तकांतूनच, अमेरिकी भूगोलकारांनी प्रादेशिक विभागणीचे क्रमबंध सादर केलेले आहेत. (या विधानात काही टीका सूचित आहे असे कोणाला वाटल्यास, त्या टीकेला स्वतः प्रस्तुत लेखकही पात्र आहे. कारण, ती ज्याना लागू पडते त्या मालेत तो गोवलेला आहेच.) शिकवताना सुलभता येण्यासाठी मांडणीच्या मानाने वस्तुस्थितीला गौणत्व देणे प्राप्त होण्याची शक्यता असते. पण, विषयसंघटन हा काही केवळ पाठ्यपुस्तकांपुरताच मर्यादित असलेला प्रश्न नव्हे. खरे पहाता, आपण येथे जिचा विचार करतो आहोत त्या सत्यस्थितीचेच संघटन करण्याबाबतचा हा प्रश्न आहे. कदाचित, अनुसंधानकार्यासाठी केलेल्या तपशीलवार अभ्यासात विषयातील अंगभूत अडचणी लुप्त होत असाव्या. पण, शिकविण्यासाठी विषय-प्रतिपादन करताना मात्र त्याच अडचणी ठळकपणे नजरेत भरत असण्याची शक्यता आहे. ते काही असो. पुढील चर्चेत येणाऱ्या कोणत्याही मुद्याने या ग्रंथाच्या पाठ्यपुस्तक या नात्याने त्याच्या मूल्यावर प्रकाश टाकण्याचा प्रयत्न करण्याचा हेतू नाही. तसेच, या चर्चेत ग्रथित केलेल्या एकूण भूगोलकार्याचे तपशीलवार परीक्षण करणे हाही आमचा हेतू नाही. येथे, एकाच निसर्ग-घटकावर अथवा घटक-जटिलावर आधारलेल्या प्रादेशिक क्रमबंधाचा उपयोग करत असता त्याच्या अनुषंगाने सहजगत्या निर्माण होणाऱ्या परिणामांशीच फक्त आपला संबंध आहे.

कोणत्यातरी एका विशिष्ट रूपधेयावर संघटित केलेला जगाचा अभ्यास वाचत असताना, त्यात अभ्यासलेल्या प्रत्येक क्षेत्रात संबंधित रूपधेय हे सर्वात महत्त्वाचे आहे, असा विचार, लेखकाच्या नाही तरी, वाचकाच्या मनात येणे अटळ आहे. कोणत्याही एका विकासप्रकाराची चर्चा नैसर्गिक वनस्पतींच्या अथवा हवामानांच्या कोणत्यातरी एका प्रकाराच्या नावाने ओळखल्या जाणाऱ्या एका प्रकरणात बऱ्याच मोठ्या प्रमाणात केलेली असेल, तो यथार्थ असो वा नसो, तर त्या दोहोत एक संबंधयोग असल्याचे सुचविले जात असते.

शिवाय, गमक म्हणून उपयोगात आणावयाचे रूपधेय स्वतःच्या गुणांनी महत्त्वाचे नसेल, तर त्या कारकाचे अन्य नैसर्गिक व सांस्कृतिक घटकांच्या दृष्टीने असणारे अप्रत्यक्ष महत्त्व भर देऊन सांगण्याची तीव्र इच्छा ग्रंथकाराला अभावितपणे होतेच–पुष्कळशा बाबतीत संबंधित रूपधेयाच्या प्रत्यक्ष महत्त्वाच्या प्रमाणाबाहेर त्यावर भर दिला जात असतो.

कोणत्याही एकाच रूपधेयावर आधारित क्रमबंधात अंगभूत असलेले हे तोटे नैसर्गिक वनस्पतींवर आधारलेल्या क्रमबंधात अगदी उघड दिसून येतात ; कारण, रूपरेखा तयार करण्यासाठी वापरलेली नैसर्गिक वनस्पतींची क्षेत्रे आणि शेतीनिष्ठ प्रदेश यांच्यात लक्षणीय विसंगती असल्याचे दिसून येते. या विसंगतीची अनेकानेक उदाहरणे निवडता येण्यासारखी असली, तरी आपण आपली चर्चा एका उदाहरणापुरतीच मर्यादित करू या.

मका-पट्टा (Corn Belt) या नावाने ओळखला जाणारा महासरोवरांच्या दक्षिणेचा मध्य-ओहिओपासून पूर्वनेब्रास्कापर्यंत पसरलेल्या संयुक्त संस्थानांच्या भागांतील लक्षणांची नजरेत भरणारी सरूपता सर्वसामान्य भूगोलकार जशी मान्य करतात, तशीच ती तांत्रिक बाजूकडे विशेष लक्ष न देणारे लेखकही मान्य करतात. येवढ्या विस्ताराची फारच थोडी क्षेत्र " भौगोलिक प्रदेश " म्हणून प्रतिष्ठित झालेली आहेत. लागवडीखाली असलेल्या जमिनीचे शेकडा उच्चप्रमाण, विशिष्ट पिके व विशिष्ट प्रकारची गुरेढोरे यांच्यातील साहचर्य, पीकउताऱ्यातील उच्चांक, शेतीच्या अवजारांचे स्वरूप व ग्रामीण लोकवस्तीची सामाजिक लक्षणे या सर्व बाबतीत अगदी स्पष्टपणे आखीव-रेखीव असा हा जगाचा एक प्रमुख प्रदेश आहे. त्यातही जम्सनेच एका प्रमुख प्रदेशांचे उदाहरण म्हणून याच मका-पट्ट्याचा दोनदा उपयोग केला आहे, आणि या त्याच्या एकात्मतेला आपल्या आधी प्रकाशित झालेल्या ग्रंथांतून मान्यताही दिलेली आहे. (२८६, ७९, ८६). पण, येथे त्याच ग्रंथकाराला त्याच्याच या क्रमबंधामुळे त्याच जमिनीची विभागणी जगाच्या एकूण आठ प्रकारांपैकी दोन वेगळ्या प्रकारात करावी लागली आहे–एक मध्यमाक्षांतील मिश्र अरण्ये आणि दुसरा कुरणभूमी, (३२१, २३९-४५). (अर्थात, वरील दोनही भागांत प्रत्यक्ष अरण्यव्याप्त अथवा कुरणव्याप्त अशी भूमी अगदीच थोडी आढळते.–आज ते प्रामुख्याने शेतीप्रदेशच आहेत.) याचे समर्थन करण्यासाठी, पूर्वभागातील शेतांतून दिसणाऱ्या वृक्षराई आणि पश्चिम भागाच्या नदीखोऱ्यांत कमीजास्त नियंत्रित स्वरूपात असलेल्या वृक्षराजी यांच्यामधील विरोध दर्शविणारे दोन नकाशांचे भाग लेखकाने सादर केले आहेत. पूर्वकालीन कुरणप्रदेशातच आजचे अत्याधिक सुपिक भाग असल्यामुळे, या एकूण प्रदेशाची चर्चा गवताळप्रदेश या शीर्षकाखालीच केलेली आहे, हे उघड आहे. पण, यामुळे सामान्यतः असा समज होतो की, या प्रकारची शेती ही प्रेअरी प्रदेशाच्या नैसर्गिक लक्षणांतून विकसित झालेलीच एक घटना आहे ; काही प्रमाणात या घटनेने अरण्यक्षेत्रात अतिक्रमण केलेले आहे इतकेच ! पण, प्रत्यक्षातील ऐतिहासिक विकासक्रम मात्र याच्या बरोबर उलट होता.

हीच परिस्थिती आणखी स्पष्टपणे समजून घेणे शक्य व्हावे म्हणून, अपालेशियन रांगेची वळकटी कल्पनेने उलगडून सपाट करावी लागेल. परिणाम असा होईल की, अंतर्भागातील हे मैदान तसेच पसरत समुद्रतट-प्रदेशापर्यंत गेलेले दिसेल आणि इंडियानात आहेत तशाच मृत्तिका व वनस्पती तिकडेही आढळू लागतील. त्या परिस्थितीत, हाच मका-पट्टा तशाचप्रकारे अतिपूर्वेपर्यंत पसरलेला असून शेवटी तो तटमैदानाच्या वालुकायुक्त मृत्तिकांमध्ये लुप्त झाला आहे, या विधानावर कोण आक्षेप घेऊ शकेल ? खरे पहाता, दक्षिण पेन्सिल्वानियाची शेती ही सामान्यतः मका-पट्ट्याच्या शेतीसारखीच आहे, आणि तिकडे आढळणारी काही असाधारण लक्षणेही मका-पट्ट्याच्या क्षेत्रातील विविध पोटभागातही सापडण्याची शक्यता आहे, (३२४, १०७). हीच गोष्ट दुसऱ्या शब्दात अशीही सांगता येईल ; पूर्व-संयुक्त-संस्थानांच्या उंचसखलपणातील फरक सोडला, तर मका-पट्टा हा मध्यम-अक्षांशांच्या आरण्य प्रदेशांतीलच एक घटना असून तिनेच कुरण प्रदेशात अतिक्रमण केलेले आहे, असेच मान्य करण्याकडे कोणाचाही कल होण्याची शक्यता आहे.

अशाच प्रकारच्या, पण आणखी मोठ्या, अडचणी कापूस पट्ट्यातही येतात, हे कारण याच संदर्भित ग्रंथात एवढा सर्वमान्य प्रदेश अनुल्लेखाने टाळला जावा या वस्तुस्थितीला जबाबदार असण्याची शक्यता आहे.

आधार म्हणून हवामान घेतले काय किंवा वनस्पती घेतले काय, काही केले तरी, एकाच घटकापासून सुरूवात करून एका कारकजटिलाच्या परिणामातून निर्माण झालेल्या सर्वरूपधेयांचे स्पष्टीकरण त्या घटकाच्या अनुषंगाने द्यावयाचे या अडचणीत प्रत्येक जण सापडणारच. (या मुद्यावरची पुढे आलेली चर्चा पहा. प्रकरण १०, विभाग 'ग'). जर्मनीत पासार्गच्या अनुयायांनी या परिस्थितीतच केलेल्या अनेक चुकांवर वेबेलने क्रान्तिक टीका केली आहे. ज्या प्रकाराने त्याने आपल्या टीकेचे विधान केले तो प्रकार आमच्यादृष्टीने विशेष वेधक आहे. भूक्षेत्रदृश्य व सावयव जीवनविषयक घटना यांच्यामधील कार्यकारण-संबंध पुष्कळसे संश्लेषक प्रक्रियांनी सिद्ध केलेले आहेत. ही त्यांची पद्धती पुष्कळशा अमेरिकी भूगोलकारांनी वापरलेल्या, पण अगदी प्राथमिक स्वरूपाच्या, " पर्यावरणाला दिला जाणारा प्रतिसाद " या प्रक्रियेची आठवण करून देणारी आहे. कदाचित, एक फरक मान्य करावा लागेल. एका नंतर एक विचारात घेतलेल्या पर्यावरणातील प्रत्येक कारकाला मिळणारा वेगवेगळा प्रतिसाद विचारात घेण्याऐवजी, पर्यावरणातील एकच एका कारकाशी असलेल्या प्रादेशिक सहसंबंधांचा जटिल विचारात घेतला जातो.

वनस्पतींचा एक प्रकार आणि सांस्कृतिक रूपधेय यांच्या क्षेत्रीय विस्तारांतील प्रत्यक्ष सहसंबंधसूचक निरीक्षणांची मर्यादा पाळणे कोणाही सावधान अभ्यासकाला आवश्यकच होवून बसते ; कारण, कोणत्यातरी एकाच घटकापासून सुरूवात करावयाची आणि अनेक घटकांवर अवलंबून असलेल्या रूपधेयापर्यंत युक्तिवाद ताणावयाचा, हे असंभवनीय नसले तरी, अवघडच असते. गवताळ प्रदेश या शीर्षकाखाली अभ्यासलेला यू. एस. ए. च्या

मका-पट्ट्यातील क्रमबंधच डॅन्यूब खोऱ्यातील गवताळ क्षेत्रात सापडतो, पण तोच शेजारच्या आरण्य क्षेत्रात मात्र आढळत नाही, असे एखाद्याच्या वाचनात आले असेल (येथे, अर्थातच, वस्तुस्थितीचा विचार बाजूला ठेवावयाचा), पण संबंधित कारकांचे विश्लेषण करण्याचा कोणताच प्रयत्न लेखकाने तेथे केलेला नसेल–म्हणजेच, संभाव्य सामान्यकारक म्हणून चढउताराचा उल्लेख केला नसेल–तर त्या बिचाऱ्या वाचकाला त्या दोहोत प्रत्यक्ष सहसंबंध आहेच, असे गृहीत धरण्याशिवाय गत्यंतर नसते. (३२१, २४५ f).

दुसऱ्या एका संदर्भात, घटनांच्या क्षेत्रीय संगतीचा अन्वयार्थ लावत असताना उद्भवणाऱ्या अडचणींची चर्चा जेम्सने चांगलीच केली आहे (२८६, ८२-८४). सहसंबंध असल्याचे आढळून आलेल्या दोन घटना, दोहोंचेही समान कारण असणाऱ्या तिसऱ्याच एका कारकावर अवलंबून असण्याची शक्यता आहे, या गोष्टीकडे त्याने त्या चर्चेत लक्ष वेधले आहे. पण, भूगोलाभ्यासकांनी सतत लक्षात ठेवलेच पाहिजेत अशा दुसऱ्या दोन संभाव्य अन्वयार्थांचा त्याने उल्लेखच केला नाही.

त्यापैकी एक असा आहे. सहसंबंध मोठ्या प्रमाणात दिसत असला, तरी तो केवळ योगायोग असण्याचा संभव असतो–म्हणजेच, त्या दोन कारकांत असा सहसंबंध का असावा याचे कोणतेच कारण देता येत नाही (११५, ९२).[९३] या गोष्टीवर कोहेनने विशेष भर दिला आहे. भूगोलक्षेत्रात सामान्यता हाती येणाऱ्या गृहीतकांची संख्या अगदीच अपुरी असल्यामुळे केवळ योगायोगाने सहसंबंध आढळून येण्याची शक्यता सापेक्षतः अधिक असते. ज्यात फारच थोड्या बाबींचा अंतर्भाव होऊ शकतो, आणि ज्याचे तर्कसाध्य स्पष्टीकरण देता येत नाही अशा सहसंबंधांचा उल्लेख न केलेला बरा.–उदाहरणार्थ : आपल्याच देशातील शिकॅगो, सेंटलुई व मिनिपोलिस-सेंटपॉल या तीनही प्रमुख व्यापारी पेठा आरण्य प्रदेशांच्या कडेने प्रस्थापित झालेल्या आहेत.

उलट, ग्रंथकारानेच आपल्या निष्कर्षांच्या साच्यात बसतील असे क्षेत्रीय नकाशे बळेबळे तयार केले, असा दुसरा एक संभाव्य अन्वयार्थ लावता येण्यासारखा आहे. कोणत्याही घटनेसंबंधीचे नकाशे तयार करत असताना आपण जेव्हा तिच्या मर्यादा रेषा निश्चित करत असतो, तेव्हा त्यासाठी ज्यात काढलेली कोणतीही रेषा समर्थनीयच ठरू शकेल असा एक रूंद प्रदेश पट्टाच आपल्यासमोर दिसत असतो. आता, पायाभूत म्हणून जो नैसर्गिक आधारघटक आपण निवडलेला असतो त्याच्या त्या नकाशावरील मर्यादा रेषेशी आपली रेषा सहजच जमत असेल, तर आपली घटनारेषा मूळ घटकरेषेला धरून सहजच काढली गेल्यास, त्यात आश्चर्य वाटण्याजोगे काहीच नाही. अर्थात, पासार्गच्या नकाशात आढळून येतात तशा प्रकारच्या

९३. दुसऱ्या अभ्यासकांनी प्रत्यक्ष सिद्ध केलेले एक उदाहरण कोहेनने उद्धृत केलेले आहे. यंत्रतंत्रज्ञांच्या आंतरराष्ट्रीय परिषदेची सभासद संख्या व हैदराबाद संस्थातील मृत्युसंख्या या दोहोत ८६% सहसंबंध असल्याचे आढळून आले.

अगदी ढोबळ चुकांनी भरलेल्या चित्रणाचा उल्लेख मला येथे करावयाचा नसून, अगदी तपशीलवार अभ्यासानेच ज्याची शहानिशा करता येईल अशा सूक्ष्मतर फेरबदलांचा उल्लेखच मला अपेक्षित आहे. आपण ज्यांचा आता विचार करतो आहोत त्यापैकी कोणत्याच ग्रंथात अशा प्रकारच्या हेतुपूर्वक चुका केल्याचे मला आढळून आलेले नाही (खरे तर, जेम्सने त्याच्या क्रमबंधाच्या साच्यात न बसणारेच अनेक नकाशे वापरले आहेत). यांपैकी पुष्कळशा बाबतीत तर " अचूकपणाचा " अभाव आहे, अथवा " फेरबदल " केलेला आहे, असे म्हणता येण्याची शक्यताही नव्हती. तरीही, प्राथमिक वस्तुस्थितींचा विचार करता आणखी कितीतरी मर्यादा रेषा काढता आल्या असत्या आणि त्या तितक्याच समर्थनीय ठरल्या असत्या ; पण त्यांच्यामुळे अपेक्षित संगती, मात्र, निर्माण होण्याची शक्यता नव्हती. म्हणून, एकाच विशिष्ट मर्यादा रेषेची निवड अगदी अभावितपणे, पण हेतुपूर्वक केली गेली, असे म्हणण्यास हरकत दिसत नाही. आता आपण ज्यांचा संदर्भ घेतो आहोत त्यापैकी कोणत्याच ग्रंथात सापडणार नाही अशा एका अर्थगर्भ गोष्टीच्या उदाहरणाने हाच मुद्दा अधिक स्पष्ट करून दाखविता येईल.

उत्तर अमेरिकेतील कारखानदारीच्या प्रदेशाची मर्यादा वस्तुनिष्ठ आणि संख्यात्मक आधाराने निश्चित करत असताना, त्याच्या तीन बाजूंच्या मर्यादा आखताना मतभेदाला सापेक्षतः फारच थोडी जागा रहात असली, तरी अपरइलिनाइसमधील रॉकरिव्हर प्रांतापासून ओहायहोमधील सिनसिन्नाटीपर्यंत काढलेल्या पश्चिममर्यादा रेषेबाबत मात्र बरीच अनिश्चितता जाणवते (३२६). या दोन प्रांतांना जोडणारी सरळ रेषा एका बाजुला आणि डेव्हनपोर्ट व सेंटलुई यांना आत घेण्यासाठी पश्चिमेकडे झेप घेणारी वक्ररेषा दुसऱ्याबाजूला येवढ्या पट्ट्यात कोठेही एक मर्यादा रेषा काढून तिचे समर्थन कोणी ही करू शकेल. प्राथमिक वस्तुस्थितींचा आधार दाखवून काढलेली प्रत्यक्ष मर्यादा रेषा मात्र आरण्य प्रदेश व कुरण प्रदेश यांच्या पदरांना धरूनच जाताना दिसते. मात्र, असे काही केले आहे, हे ग्रंथकाराच्या लक्षात त्यावेळी आलेले नसावे. पण, " मध्यमाक्षांशांतील आरण्य प्रदेशांच्या " प्रादेशिक विवेचनाचा भाग म्हणून तोच लेखक त्याच प्रदेशाचा अभ्यास करत असता, तर तीच मर्यादा रेषा त्याने थोडी थेट दक्षिणेला दाखविली असती, आणि तरीही ही नवी हद्द तितकीच नियमांना धरून झाली असती. मात्र, ही हद्द वनस्पति हद्दीशी जास्त जवळीक करणारी झाली असती आणि त्यामुळेच, ईशान्य उत्तर अमेरिकेतील कारखानदारीच्या केंद्रीकरणाचे एक वेगळेच स्पष्टीकरण लेखकाला सुचविणे शक्य झाले असते.—बेनडेव्हिस—सफरचंदांच्या बागायतीची मर्यादा रेषा या क्षेत्राच्या मर्यादा रेषेशी सहसंबंधित आहे, असे डगीरने (Degeer's) दाखविले आहे ; त्याच्याबरोबर वरील निष्कर्षाची तुलना करता येण्यासारखी आहे.

थोडक्यात, दोन भौगोलिक घटनांमध्ये कितीही बाह्यसंगती दिसत असली, तरी त्यांचे प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष परस्परसंबंध असल्याचे गृहीत धरतानाही अभ्यासकाने साशंक रहाणेच इष्ट आहे ; नाहीतर, औपपत्तिक दृष्ट्याही हे गृहीतप्रमेय तर्कयुक्त आहे असे दाखवून

देता आले पाहिजे. वर उद्धृत केलेल्या उदाहरणातही, डेस मोइन्स व इंडियानापोलिस यांच्या औद्योगिक विकासांत दिसून येणारी तफावत ही आयोवाचे कुरण प्रदेश व इंडिआनाचे आरण्यप्रदेश या दोहोंतील तफावतीशी संबंधित आहे, हे स्पष्ट करण्यासाठी काही तर्कशुद्ध कारणे दाखवून तसे अनुमान काढता आले पाहिजे.

नैसर्गिक घटकांवर आधारलेल्या प्रादेशिक क्रमबंधांच्या या आपल्या विवेचनावरून काढावयाचा निष्कर्ष फिंच व ट्रेवार्था यांनी काढलेल्या निष्कर्षाशी मिळताजुळता आहे : " जगातील सांस्कृतिक आकृतिबंध स्वाभाविक प्रदेशांच्या चौकटीत बसवण्याचा खटाटोप अव्यवहार्य आहे, असे समजण्यास हरकत नाही " (३२२, ६३२). याशिवाय, तथाकथित ' स्वाभाविक प्रदेश ' म्हणजेच सर्व नैसर्गिक घटकांची गोळाबेरीज एक अथवा दोनच घटकांवर आधारलेल्या चौकटीत कोंबणे ही गोष्ट जवळजवळ अशक्य कोटीतील आहे, असा आणखीही एक निष्कर्ष यातूनच आपल्यास काढता येतो.

## फ—सांस्कृतिक घटक-जटिलांवर आधारलेले जातिनिष्ठ प्रदेशांचे तौलनिक क्रमबंध

आता, आपण सांस्कृतिक घटकांवर आधारलेल्या प्रादेशिक विभागणीची रचना करण्याच्या संभाव्यतेकडे वळू या. काही युरोपीय भूगोलाभ्यासक " नैसर्गिक विभागणी " बाबत नकारात्मक निष्कर्षापर्यंत येऊन पोहोचले, हे उघड आहे. पण मग, माघार घेत घेत राजकीय सरहद्दी, राज्ये, प्रांत अशा किंवा वांशिक अथवा लोकजमातींची क्षेत्रे अशी अगदी सरळ विभागणी मान्य करण्यापर्यंत त्यांनी मजल मारली आहे. अर्थात, या सूचनेचे अनुकरण, राजकीय भूगोल अथवा लोकांचा भूगोल अशा खास अभ्यासांच्या क्षेत्रांशिवाय अन्यत्र, कोणी करण्याचा विचारच करणार नाही. सर्वसामान्यपणे अशा स्वरूपाचे क्रमबंध वापरणे म्हणजे अन्य कोणत्याच प्रकारच्या अर्थपूर्ण प्रादेशिक विभागणीच्या संशोधनाच्या महत्त्वाकांक्षेला मूठमाती देण्यासारखे आहे. असे काही मान्य करण्यापेक्षा सर्वक्षेत्रांचे समानाकार चौरस विभाग पाडलेले काय वाईट !

सर्वच नैसर्गिक घटकावर आधारलेली प्रादेशिक चौकट तयार करण्याचे प्रयत्न नैसर्गिक पर्यावरणातील गुंतागुंतीमुळे फसले असतील, तर प्रदेशांची सांस्कृतिक रूपे संश्लेषित करता येण्याची शक्यता आणखीच दुरावली, असे कित्येकांना वाटणे साहजिक आहे. शिवाय, अगदी अलीकडच्या काळापर्यंत, भूगोलाभ्यासकांनी सांस्कृतिक घटनांचे विश्लेषण या गोष्टीकडे फारच थोडे सतर्क अवधान दिलेले दिसते. परिणामी, या प्रश्नाला या दिशेने हात घालण्याचे प्रयत्न फारच थोडे झालेले दिसतात, याचे आश्चर्य वाटत नाही. खरे पहाता, ज्यांचा आपण उदाहरणे म्हणून उपयोग करणार आहोत त्यापैकी बहुतेकांवरून, त्यांचा हेतू सर्वसाधारण सांस्कृतिक आधार घेऊन एक जागतिक विभागणीचा क्रमबंध रचण्याचा प्रयत्न करणे हा होता, असे स्पष्टपणे कोठेच सूचित होत नाही. म्हणूनच, या प्रश्नाला हात घालण्याचा एखादा औपपत्तिक मार्ग शोधणे आवश्यक झाले आहे.

प्रादेशिक भूगोलाच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाची अशी सांस्कृतिक रूपे कोणती ? हाच प्रश्न भूगोलाच्या स्वरूपासंबंधीच्या आपल्या मूलभूत संकल्पनेच्या संदर्भात विचारला गेला, तर त्याचे उत्तर असे मिळेल : दिलेल्या मर्यादित क्षेत्रात मानवाची व त्याच्या कार्याची जी रूपे सापेक्षतः सजातीय असतात, आणि जी वेगवेगळ्या क्षेत्रात लक्षात भरण्याइतकी बदलत असतात, पण अशा रीतीने बदलतानाही त्या दुसऱ्या क्षेत्राच्या एकूण स्वरूपाशी असलेले ज्यांचे संबंध महत्त्वपूर्ण ठरतात, अशी सर्वरूपे महत्त्वाची समजावी. मानव व त्यांची कार्ये यांच्या सर्वच रूपांच्या बाबतीत अशा अटी पूर्ण होतील अशी क्षेत्रे शोधून काढणे शक्य झाले, तर ते परिपूर्ण सांस्कृतिक प्रदेश होऊ शकतील. पण विविध सांस्कृतिक रूपांचे क्षेत्रीय भेदाभेद संपाती असण्याची शक्यताच नाही याची आपल्याला जाणीव आहे. म्हणूनच आपल्याला त्यातील प्रमुख रूपांची मर्यादाच मान्य करणे प्राप्त आहे. परस्पर असंमेय अशा घटनांच्या बाबतीत प्रमुख व गौण असा भेद कसा करावयाचा, या प्रश्नाचे वस्तुनिष्ठ उत्तर मिळण्याचे साधनच नाही. तरीही, वैयक्तिक दृष्टिकोणातून का होईना, या प्रश्नावर पुष्कळसे एकमत होण्याची शक्यता आहे, असे समजण्यास हरकत नाही.

लोकसंख्येतील फरक, म्हणजे लोकसंख्येच्या घनतेतील फरक ही एक प्रमुख महत्त्वाची घटना आहे, याबाबत सर्वांचेच एकमत होईल, असे गृहीत धरण्यास हरकत नसावी ; किंबहुना ती इतकी सर्वप्रथम महत्त्वाची आहे, की तिजविषयी अधिक विचक्षणा करण्याची गरजच पडणार नाही, असेही सुचविण्यात येण्याची शक्यता आहे. आता आपला प्रश्न सापेक्षतः सोपा झाला, कारण लोकसंख्येची घनता हा एकटा गणितसाध्य कारक म्हणून तिचे सहज माप घेता येण्यासारखे आहे. आणि जगाच्या पुष्कळशा भागातील तत्संबंधी आवश्यक ती गृहीतके प्रत्यक्षात आपल्याला उपलब्ध आहेत. पण, हा कारक अगदी विनासायास साध्य होणारा आहे, हीच गोष्ट त्याची असमर्पकता सिद्ध करण्यास पुरेशी आहे. लोकसंख्येची घनता आणि तिचे वितरण या दृष्टींनी पुष्कळशी सरूप दिसणारी क्षेत्रे अन्य अनेक भौगोलिक रूपधेयांबाबत खूपच भिन्न असण्याची शक्यता असते.*

वेगवेगळ्या क्षेत्रांतील लोकसंख्येचे स्थानिक वितरण कोणत्याप्रकारे होत गेले आहे याचे तपशीलवार चित्र आपल्या हाती असते,–म्हणजेच सर्व लहानसहान क्षेत्रांतून होत जाणारे स्थानिक बदल दाखविणारे प्रत्यक्ष चित्र आपल्या हाती असते–तर आणखी किती तरी अधिक गोष्टी समजून घेणे शक्य झाले असते, यात शंकाच नाही. हॉलने, आणि अन्य लेखकांनीही, संपूर्ण जगाचाच अशारीतीने अभ्यास होणे आवश्यक आहे, या गोष्टीवर वारंवार भर दिला आहे (२९५, १६७ f), आणि जपानचा असा तपशीलवार नकाशा देऊन, आपल्या सूचनेचे सचित्र उदाहरणही त्याने दिलेले आहे (३५१). जगाच्या प्रादेशिक विभागणीच्या कामी हा आधार कितीसा परिणामकारक आहे याचा निर्णय, जेव्हा लक्षणीयपणे भिन्न संस्कृतींच्या जगातील निदान काही क्षेत्रांचे एका साधारण तत्त्वाधारे काढलेले अशाप्रकारचे तपशीलवार नकाशे आपल्याला उपलब्ध होतील, तेव्हाच अधिक चांगल्यारीतीने घेता येईल. आता,

* पुरवणी टीप क्र. ४५ पहा.

हॉलने तयार केलेले " प्रायोगिक नकाशे " पूर्ण करून प्रकाशित करण्यात येतील, येवढीच अपेक्षा करण्यासारखी आहे. पूर्वज्ञानाच्या आधारावर आपल्याला येवढेच म्हणता येईल की, भिन्न संस्कृतीच्या क्षेत्रांतूनही वितरणाचे स्वरूप एकच असण्याची शक्यता आहे ; आणि तरीही, अन्य पुष्कळ प्रकारांनी त्यांचे प्रादेशिक रूप संपूर्णपणे वेगळे असल्याचे दिसून येण्याची शक्यता आहे. जपानमधील Strassendorf खेडी जर्मनीतील असल्याच खेडयांपेक्षा कार्यदृष्ट्या वास्तविक भिन्न आहेत, पण, त्यांचे रूप एकचप्रकारचे आहे, असे हॉलला आढळून आले.[९४]

अगदी तपशीलवार व गुंतागुंतीसह अभ्यास केला, तरी लोकवस्तीची घनता हा घटक एकट्याने पुरेसा होणारा नाही. मात्र, त्याच्या अभ्यासाने एक प्रमुख किल्ली आपल्या हाती येते ही गोष्ट दृष्टीआडकरून चालण्यासारखी नाही, येवढाच निष्कर्ष या चर्चेवरून आपण काढू शकतो.

संख्या ही एक बाब सोडली, तर जगाच्या निरनिराळ्या भागांतील लोक ज्यांमुळे एकमेकापासून वेगळे असल्यासारखे दिसतात अशा बाबी कोणत्या ? काही फरक, कितीही महत्त्वाचे असले तरी, भौगोलिकदृष्ट्या अर्थपूर्ण नाहीत या सबबीवर आपण ते निकालात काढू शकतो. उदाहरणार्थ, एका स्थानिक लोकगटातील व्यक्तिविषयक फरक कितीही महत्त्वाचे असले, तरी दोन भिन्न प्रदेशांच्या लोकसमाजांमधील फरकांइतके ते अर्थपूर्ण असत नाहीत. शिवाय, एकाच प्रदेशातील काही विशिष्ट फरक महत्त्वाचे वाटले तरी दोन प्रदेशांची तुलना करताना त्यांच्याकडे दुर्लक्ष करणे शक्य असते–' ग्रामीण ' व ' नागरी ' या संज्ञांनी आपल्या मनश्चक्षूपुढे उभा रहाणारा पुरा भेद-जटिलच वगळणे शक्य आहे. मात्र, ' मूळची ग्रामीण ' व ' मूळची नागरी ' क्षेत्रे यांच्यातील वेगळेपणा स्पष्ट करणे आवश्यकच आहे. या आधारावर मानवाच्या सांस्कृतिक घटनांचा एक पुरा संचच आपल्याला निकालात काढता येईल.

अशारीतीने आम्ही कितीही गोष्टी वगळल्या, तरी, ज्या सांस्कृतिक घटनांत प्रदेशानुसार फरक पडत गेलेले दिसतात अशा सांस्कृतिक घटनांचा एक संपूर्ण जत्था निश्चितपणे शिल्लक राहातोच. म्हणूनच, अन्य सर्वच घटनांचे त्यांच्या त्यांच्यापुरते महत्त्व आणि भौगोलिकदृष्ट्या महत्त्वाच्या असलेल्या सांस्कृतिक घटनांच्या संदर्भात त्यांचे महत्त्व, अशी चिकित्सा करण्याआधीच, सर्वसामान्य भूगोलाभ्यासकांनी एक अगर दोनच घटनांच्या सघन अभ्यासात डोक्यापर्यंत बुडून जाणे त्यांच्या हिताचे ठरणार नाही. अशा घटनांची संपूर्ण यादी करण्याचा कोणी प्रयत्न केलाच, तर मानव तयार करू शकतो अशा आणि जगाच्या वेगवेगळ्या भागात वेगवेंगळ्या पद्धतींनी करत असतो अशा, असंख्य मूर्तवस्तूंचा त्यात अंतर्भाव करावा

९४. हॉलशी झालेल्या एका संभाषणावरून माझ्या लक्षात आले की, हॉल स्वतः आता याच निष्कर्षावर आला आहे ; म्हणूनच, अशाप्रकारच्या पौर्वात्य खेडयांना Strassendorf ही संज्ञा लावावयाची नाही, असा त्याने निर्णय घेतला आहे.

लागेल. इतकेच नव्हे तर, अशा मोठ्या शिल्यांपेक्षा लहानसहान शिल्पवस्तूच भौगोलिक-दृष्ट्या अधिक बोलक्या असतात असेही आढळून येण्याचा संभव असतो. तसे पहाता, संस्कृतीचा आविष्कार काही केवळ आपण काय निर्माण करतो त्यातूनच होतो असे नसून, तो आणखी हजारो मार्गांनी होऊ शकतो. त्यात पुढील बाबींचा अंतर्भाव होऊ शकतो : लोकवस्तीची कायिक लक्षणे ; विचार, वक्तव्य, लेखन यांच्या पद्धती व त्यांचे आशय ; लोक खातात, चालतात, नाचतात वा वाहनारोहण करतात त्या पद्धती ; त्यांच्या वस्त्रप्रावरणांचे व निवासांचे स्वरूप—यात मानवासाठी निवारा व जनावरांसाठी निवारा या दोहोंचाही अंतर्भाव होतो—आणि वसाहतीतील निवासांचे गटवर्ग ; ज्या पद्धतीने लोक कार्य व क्रीडा करतात त्या पद्धती ; त्यांसाठी ते वापरत असलेली साधने व उपकरणी ; विविधप्रकारे ज्यांचा वापर करता येतो अशी पाळीव जनावरे ; या व अन्य हेतूने वापरत असलेले विविध पदार्थ ; त्यात प्रामुख्याने अन्न, पेय, वस्त्र, शस्त्र, उपकरणी, निवास, इंधन व शक्ती यांचा अंतर्भाव होतो ; आणि शेवटी, भूपृष्ठावर घडवून आणलेले अनेकविध बदल ; यात प्रामुख्याने वनस्पती, मृत्तिका, भूरूपे, तळशिळा आणि जमिनीखाली केलेल्या रचना यांचा समावेश होतो.

या घटनांपैकी कोणत्याही एकीचा स्वतःचा असा आविष्कार असण्याची शक्यता आहे, व त्यावरून सांस्कृतिक घटनांच्या भूगोलाचे एक गमक आपल्या हाती येण्याचीही शक्यता आहे.—माजोंग संच व रौलेट चक्र यांतील फरक हाही पौर्वात्य व पाश्चिमात्य संस्कृतीतील फरकांचाच आविष्कार आहे आणि तो पेकिंग येथील मिंगथडगी व वेस्टमिनिस्टरआबे या दोहोंतील फरका इतकाच महत्त्वाचा व वैशिष्ट्यपूर्ण आहे असे मानले जाण्याची शक्यता आहे. ही हास्यास्पद तुलना पूर्ण विचाराअंती निवडलेली आहे ; कारण, त्यामुळेच वरील यादीतून इष्ट गमकांची निवड करताना कोणत्या तत्त्वांचा त्यावर प्रभाव असणे इष्ट आहे याची अशा तुलनेतूनच सूचना मिळते. अशा गमकांचे अन्य बहुसंख्य घटनांच्या मोठ्या जटिलांशी अगदी जिव्हाळ्याचे संबंधयोग असतात, आणि हा जटिल, एकंदरीने पहाता, प्रादेशिक लक्षणे निश्चित करताना प्रामुख्याने महत्त्वाचा मानला जात असतो. शेवटी, औपपत्तिक विवेचनांतून अशा प्रकारची गमके उपलब्ध असल्याची सूचना मिळालीच, तर, ज्यांचे निरीक्षण, वर्गीकरण आणि काही अंशी संख्यात्मक मापन करता येण्याची शक्यता आहे अशीच गमके या कामी वापरणे शक्य होईल. अर्थातच ही अट पहिल्या अटीच्या दृष्टीने गौण आहे. पण, महत्त्व असो वा नसो, केवळ निरीक्षणाला सोपी आहे म्हणून एखाद्या गोष्टीची या कामी निवड केली जाता कामा नये.

वर दिलेल्या दोनही अटींच्या आधारे त्या लोकवस्तीची पुष्कळशी कायिक लक्षणे वगळणे शक्य होईल (c/o हेटनर १६१, २४८ f, २८९). मानवांमधील वंशभेद कुत्र्यांच्या वांशिक भेदांइतकेच तीव्रतर असते, तर आपले हेच जग किती वेगळ्याप्रकारचे झाले असते, या गोष्टीचे चिंतन करणे येथे उद्बोधक होणार आहे. कारण, त्या परिस्थितीत, केवळ लोकसंख्येची आकडेवारी दाखविणाऱ्या नकाशांपेक्षा, विविध मानववंश दाखविणारा जगाचा नकाशाच

कितीतरी अधिक महत्त्वाचा मानला गेला असता. उलटपक्षी, आज, सर्वच सांस्कृतिक घटनांच्या संदर्भात वर्ण हेच लक्षण सांस्कृतिक भिन्नत्वाची दृश्य व भौतिक साक्ष आहे असे मानले जाते, अशा क्षेत्रांतही भूगोलाभ्यासाचा संबंध वर्णभेदांसारख्या शारीरिक भिन्नतेशी आलाच तर तो अप्रत्यक्ष स्वरूपाचा असतो. (संबंधित सामाजिक भेद हे खऱ्या जीवशास्त्रीय अर्थाने प्रत्यक्ष वर्णभेदांवर अथवा वंशभेदांवर आधारलेले नसून, वर्णभेदांसंबंधीच्या काही गृहीत-कल्पनांवर आधारलेले असतात, अशी शक्यताच अधिक आहे. c/o संयुक्त संस्थानांचा " वांशिक भूगोल " हा प्रस्तुत लेखकाचा अभ्यासग्रंथ पहा–' वांशिक ' ही संज्ञा सामाजिक अर्थाने वापरली आहे (३५९, २७७).

वरील यादीत आलेल्या, सर्वच नाहीत तरी अन्य बहुतेक, घटना अंशतः मानवाच्या विचारसरणीतूनच निर्माण झालेल्या असतात. म्हणूनच, मानव जेथे एकाच पद्धतीने विचार करतात अशी क्षेत्रे शोधून काढून त्यानुसार सांस्कृतिक प्रदेश निश्चित करणे शक्य आहे, असे स्टॅन्ले डॉजने सुचविले आहे (२९५, १७१) असे विधान करताना मानवी विचारधारा प्रादेशिक पर्यावरणावर तितक्या प्रमाणात अवलंबून नसतात ही गोष्ट लक्षात घेतली गेली नाही.–उदाहरणार्थ, मिनेसोटात दगडी कोळशाच्या खाणी असणे अगदी इष्ट आहे असे आपल्याला वाटत असले, तरी त्या तिकडे नाहीत–वरील वस्तुस्थितीकडे क्षणभर काणाडोळा केला, तरी लोकांच्या विचारधारांचे निरीक्षण करण्याची कोणतीच प्रत्यक्ष पद्धती आपल्या हाती नाही, ही गोष्ट अगदी स्पष्ट आहे. मग येथे कोणते अप्रत्यक्ष गमक आपल्याला वापरता येण्यासारखे आहे ? ज्यांच्याबरोबर आपण बोलतो अथवा ज्यांचे लिखाण आपण वाचतो त्यांच्यासारखेच कमीजास्त प्रमाणात विचार करण्याकडे आपली प्रवृत्ती असते ; म्हणूनच, एक भाषा बोलणाऱ्या लोकांच्या विचारात, अंशतःतरी, एकरूपता असतेच, आणि याविरुद्ध, निराळी भाषा बोलणाऱ्यात ती असत नाही. हे तत्त्व ज्याप्रमाणात, खरे असेल त्याप्रमाणात भाषिक प्रदेशात वरील यादीत दिलेल्या बहुसंख्य घटनांच्या बाबतीत एकरूपता असावी अशी अपेक्षा करण्यास हरकत नाही. पण हे गमकच तितके खात्रीचे नाही. उत्तर सायलेशियावर शतकानुशतके जर्मनीचा ताबा असल्याने जर्मन विचारसरणीची व संस्कृतीची अनेक लक्षणे त्यांच्यावर उमटलेली दिसतात, आणि तरीही ते अद्याप पोलिश भाषाच बोलतात. ऐहिक संस्कृतीपुरते पहाता, तो प्रदेश पोलंड अथवा पूर्व युरोपीय वळणाचा दिसत नाही, तर, बऱ्याच अंशी, जर्मनी व पश्चिम यूरोपच्या वळणावर गेलेला दिसतो (३५५, २०१-०९). युरोपच्या सांस्कृतिक भूगोलात अन्वयार्थ लावताना भाषिक प्रदेशांचे महत्त्व मानावे लागते, हे खरे असले, तरी वरील यादीत आलेल्या कित्येक मानवी घटनांवर भाषिक भेदांचा फारच थोडा परिणाम झालेला दिसतो. लोक सामन्यतः ज्या पद्धतीने विचार करतात त्या पद्धतीचा परिणाम अशा घटनांवर फारसा होत नसण्याची शक्यता जास्त आहे.

विविधप्रकारच्या सांस्कृतिक घटनांचे तौलनिक भौगोलिक महत्त्व निश्चित करण्याच्या प्रश्नाला एकदम तोंड द्यावे लागणार, हे आता आपल्या लक्षात येते. या असंमेय वस्तूंच्या तुलनेसाठी एखादी, औपपत्तिक स्वरूपाची का असे ना, मोजपट्टी आपल्याजवळ आहे का ? आपला संबंध येथे मानव आणि भूप्रदेश यांच्याशी आहे हे लक्षात घेतले, तर अशी मोजपट्टी आपल्याजवळ आहेच, असे माझे मत आहे. कोणत्याही घटनेच्या क्षेत्रीय विस्ताराचा मानवाच्या दृष्टीने असलेल्या तिच्या महत्त्वाशी संयोग केला–संबंधी लोकसंख्येच्या आणि प्रत्येकाच्या दृष्टीने तिचे महत्त्व यांच्या परिभाषेत संयोग केला–तर मापनाचा औपपत्तिक आधार म्हणून प्रमुख कारके आपल्या उपयोगी पडण्यासारखी आहेत. येथे संपूर्ण विश्लेषणाचा खटाटोप करण्याची गरज नाही. प्रत्येक व्यक्तीच्या दृष्टीने घटनेच्या महत्त्वाचे मापन त्याच्या एकूण व्यवहारात त्या घटनेचे असणारे स्थान लक्षात घेऊन करता येण्यासारखे आहे. याच दिशेने आपण विचार करू लागलो, की ग्रामस्थ चिन्यांच्या भोजनप्रबंधांतील खाण्याच्याकाड्या ते वापरतात त्या नांगरांपेक्षा खासच कमी महत्त्वाच्या वाटू लागतील ; आणि या दोनही गोष्टी याच आधारावर, आणि त्यांच्या क्षेत्रीय विस्ताराच्या आधारावरही, त्यांच्या भातशेतीपेक्षा निश्चितच कमी महत्त्वाची असल्याचे दिसेल.

केवलार्थाने पहाता चिनी मळ्यातील घर भोवतालच्या शेतापेक्षा कमी लेखले जाता कामा नये, कारण स्त्रिया आणि मुले आपले व्यवहार, अंशतः तरी, घरातच करत असतात. पण, सांस्कृतिक रूपधेयांच्या क्षेत्रीय भेदाभेदांच्या दृष्टीने त्यांच्या सापेक्ष महत्त्वाची तुलना करावयाची झाल्यास ज्यांचा क्षेत्रीय भेदांच्या रूपाने आविष्कारच झालेला दिसत नाही अशा सर्व बाबी प्राथमिक पहाणीतच रद्द करण्याशिवाय गत्यंतर नाही. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर, ते घर आणि त्यातील व्यवहार ही जगभरच्या घरांसारखीच आहेत असे दिसल्यास आपण ती कारके वगळतो, आणि मग जे शिल्लक राहते–उदाहरणार्थ त्या इमारतीचे वेगळे वैशिष्ट्यपूर्ण शिल्प-लक्षण–ते अगदीच गौण असते.

वरील युक्तिवादातून निघणाऱ्या निष्कर्षाची कल्पना वाचकांना निश्चितच आलेली असणार ; कारण, जगाच्या बहुतेक भागात, माणसाच्या व्यवहाराचा बहुतांश भाग जीवधारणेसाठी आवश्यक असणाऱ्या मार्ग व साधने यांच्याशी संबंधित असतो. अगदी बरोबर बोलावयाचे झाले तर, जीवनवृत्ती शोधण्यासाठी असतो–म्हणजेच, हे सर्व व्यवहार आर्थिक स्वरूपाचे असतात. तसेच मानवाने उपयोगात आणलेल्या भूक्षेत्राचा अधिकांश भाग हा या आर्थिक व्यवहारासाठीच वापरलेला असतो.

विशेषेकरून जास्तीतजास्त जमिनीचा वापर करण्यात गुंतलेल्या आर्थिक व्यवहारांतील क्षेत्रीय भेदाभेद, जगाच्या निरनिराळ्या भागात, सहज नजरेत भरतात. " या वस्तुस्थितींचा आविष्कार त्या-त्या भूदृश्यांत निश्चितच झालेला आढळतो," (२९७, १०७ f), हे येथे नमूद करावयास हरकत नाही–पण, हा दृष्टिकोण वाजवीपेक्षा जास्त निषेधक आहे ; कारण, वसाहतींचे प्रकार आणि जमिनींची तुकडेमोड या गोष्टी आर्थिकदृष्ट्या तर्कशुद्ध नसूनही,

इ-१५५७-२८ ब.

सांस्कृतिक घटकांनीच निश्चित केलेला असण्याचा संभव आहे (२७०, २११). ही क्रेब्जने केलेली टीका मूळ ब्रोकच्या विधानातील चुकीची दुरुस्ती नसून, ती त्या विधानाला जोडलेली पुस्ती आहे. जमिनीची तुकडेमोड करून तिचा वापर केला जातो आणि त्यांवर इमारतीही बांधल्या जातात त्या प्रामुख्याने आर्थिक हेतूनेच ; आणि तरीही, ज्याप्रकारे या गोष्टी केल्या जातात ते आणि त्यांचे परिणामी स्वरूप यांच्यावर आर्थिक नसलेल्या सांस्कृतिक कारकांचाच प्रभाव अधिक पडलेला असण्याची शक्यता असते.

शिवाय, जगाच्या क्षेत्रीय भेदाभेदांच्या दृष्टीने असलेले आर्थिक व्यवहारांचे महत्त्व हे काही केवळ त्यांच्या स्वतःच्याच महत्त्वाने मर्यादित झालेले नाही. आर्थिक व्यवहारांच्या स्वरूपांच्या भेदांचा वरील यादीतील पुष्कळशा अन्य सांस्कृतिक भेदांशी प्रत्यक्ष व अप्रत्यक्षरीतीने निकटसंबध असतो.

आर्थिक व्यवहारांशी साहचर्य असलेल्या सांस्कृतिक घटनांचा जटिल हा सांस्कृतिक भूगोलाच्या दृष्टीने अतिशय महत्त्वाचा एकमेव घटना संच असतो, या तत्त्वावर आपले एकमत झाले तर, पुढचा प्रश्न असा निर्माण होतो की, प्रादेशिक भेदाभेदांचे गमक म्हणून कोणत्या विशिष्ट घटना जास्तीत जास्त उपयुक्त ठरतील ?

आर्थिक रूपधेयांचा एक बराचसा मोठा गट आपण प्रथमतःच वगळून टाकला तर, हाच प्रश्न आपल्याला बराचसा सोपा करता येईल ; कारण, आर्थिक रचनेत त्यांचे स्थान महत्त्वाचे असले, तरी, स्वरूप व कार्य या दोनही दृष्टीने ते सर्वत्र मूलतः सरूप असल्यामुळे, त्यांचे भौगोलिक महत्त्व शून्यच असते. यात बऱ्याच मोठ्या प्रमाणात नागरी रूपधेयांचा अंतर्भाव करता येईल–उदाहरणार्थ : दुकाने, कार्यालये इत्यादी. त्यांच्याकडे लक्ष देण्याची गरज नाही. फक्त, त्यांच्या सापेक्ष संख्यांचा विचार करावा लागेल आणि त्यांचे मापन त्या त्या प्रदेशात झालेल्या नगर विकासाच्या सामान्य विस्ताराने करता येते असे गृहीत धरण्यास हरकत नाही. मात्र, यात कारखानदारीच्या व व्यापाराच्या विशेषरूपधेयांचा समावेश करावयाचा नाही, कारण, त्यांच्यामुळेच एका शहराच्या तुलनेने दुसऱ्या शहराला व एका नागरीकृत प्रदेशाच्या तुलनेने दुसऱ्या नागरीकृत प्रदेशांतील शहरांना भिन्न स्वरूप प्राप्त झालेले असते. याच आधारावर स्त्रियांचे घरगुती व्यवहारही बऱ्याच अंशाने वगळता येण्यासारखे आहेत–उदाहरणार्थ : स्वयंपाक, शिवण इत्यादी.

उरलेल्या आर्थिक व्यवहारांपैकी आपल्या हेतुसिद्धीच्या दृष्टीने सर्वात अधिक महत्त्वाचे कोणते, या बाबत वाद निर्माण होण्याची शक्यता नाही. मानवाने वापरात आणलेल्या भूपृष्ठाच्या क्षेत्राचा बराच मोठा भाग शेती करण्यासाठी, गुरे चारण्यासाठी व वनसंपत्ती हस्तगत करण्यासाठी वापरला जात असतो. यापैकी एकच प्रकार एकाच वेळी व एकाच ठिकाणी सामान्यतः आढळतो ; म्हणूनच, या तिघांचा मिळून एकच संयोग करणे शक्य आहे–वनस्पतिज व प्राणिज उत्पन्ने हस्तगत करण्यासाठी जमिनीचा वापर अशा स्वरूपात. एक

गोष्ट खरी आहे, की उपयोगांच्या घनतेच्या परिभाषेत बोलावयाचे तर–यात मनुष्यसंख्येचाही विचार व्हावा लागतो–व्यवहारांचा हा गट स्थानपरत्वे खाणकाम व्यवहारांपेक्षा किंवा नागरी व्यवहारांपेक्षा कमी महत्त्वाचा असण्याची शक्यता आहे. कारखानदारीच्या बऱ्याचशा " सार्वत्रिक "* प्रकारांसह अनेक नागरी व्यवहार आपण आधीच वगळलेले आहेत. त्यामुळे, उरलेल्यातील बहुतांश लोक जास्तीत ज़ास्त संख्येने वनस्पतिज व प्राणिज उत्पन्नासाठी, आणि त्यातही मुख्यतः शेतीसाठी वापर करण्यात गुंतलेले असतात, यात काहीच संशय नाही. ही गोष्ट एकूण जगाच्या विचाराने जितकी खरी आहे, तितकीच ती त्याच्या कोणत्याही मोठ्या विभागाच्या बाबतीतही खरी आहे. म्हणूनच, काही थोडी लहान क्षेत्रे वगळून, जमीन वापरांच्या या प्रकारांतील भेदाभेदांचा प्रामुख्याने विचार करणे शक्य आहे, आणि काही विशिष्ट क्षेत्रांपुरता एकूण नागरी व्यवहारांच्या विस्तारांचाही विचार करणे शक्य आहे.

म्हणूनच ज्या तीव्रतेने आणि ज्या पद्धतींनी–जमिनीचा वापर केला जात असतो त्याचे वर्गीकरण व नकाशीकरण करण्याची काही निरीक्षणक्षम गमके आपण निवडून घेऊ शकलो, मानवाच्या व भूपृष्ठाच्याही दृष्टीने सारख्याच महत्त्वाच्या असलेल्या जास्तीत जास्त सांस्कृतिक घटनांच्या संदर्भात अर्थपूर्ण ठरू शकेल अशा जगाच्या प्रादेशिक विभागणीचे एक आधारतत्त्व आपल्या हाती आल्यासारखे होईल. वापराच्या तीव्रतेतील फरक लक्षात घेऊन आणि शेतीसाठी केलेल्या भूमिवापराच्या पद्धतींचा विचार करून, त्यांच्याच परिभाषेत जगाची विभागणी तीन प्रमुख वर्गांत करणे शक्य आहे : (१) जिचा कधी वापरच केला जात नाही अशा जमिनी–म्हणजेच, निर्जन प्रदेश. (२) जेथे रानवट प्राणिजीवनाचा व वनस्पतिजीवनाचा, ती ज्या स्थितीत आढळतात त्याच स्थितीत वापर केला जातो, असे प्रदेश आणि (३) जेथे मानवाच्या मशागतीचा प्रभाव पडलेला दिसतो, म्हणजेच, जेथे मानवाने रानवट वनस्पत्यावरण नष्ट करून, त्यांच्या जागी स्वतःच निवडलेल्या वनस्पती लावलेल्या आहेत, अशी क्षेत्रे. जगाच्या भूक्षेत्राचा मोठ्यातील मोठा भाग दुसऱ्या वर्गात मोडत असला, तरी सर्वात महत्त्वाचे प्रदेश, अर्थातच, तिसऱ्या वर्गात मोडतात.

मोकळी करून मशागत केलेल्या जमिनीपुरताच विचार केला तर, जे फरक भौगोलिकदृष्ट्या अत्यधिक महत्त्वाचे असतात ते पाळीव प्राणी व मवाळ वनस्पती यांच्यातून निर्माण झालेले असतात. लागवडीच्या रीतींतील काही महत्त्वाचे भेद हेही आणखी काही कारक असण्याचा संभव आहे–उदाहरणार्थ : मशागत नांगरटीची आहे की टोकणीची आहे. पण, या प्रकारच्या बहुतेक सर्व महत्त्वाच्या विभागांत नांगर हा बराच सर्वमान्य आहे. प्रथम सांगितलेल्या भेदांच्या तुलनेने शेतांच्या आकृतिबंधांसारखे तांत्रिक भेद गौण असतात –मग, हे भेद त्याच्या प्रत्यक्ष महत्त्वाच्या भाषेत सांगितलेले असोत, अथवा प्रादेशिक भेदाभेदांतील महत्त्वाच्या परिभाषेत सांगितलेले असोत !

* गारवरने दिलेल्या व्याख्येनुसार (३४७), येथे ' सार्वत्रिक ' या ऐवजी " सर्वोपलब्ध " असा शब्द वाचणे अधिक बरे.

या लागवड क्षेत्रांतील, शेतीसाठी जमीन वापराच्या सघनतेचे मापन किती प्रमाणात त्या मोकळ्या करून लागवडीखाली आणल्या आहेत यावर प्रथमतः केले जाते ; न होऊन, आरण्याखाली व वन्य-कुरणाखाली किती जमीन गेली आहे याच्या प्रमाणावरून सघनतेचे मापन केले जात नाही. शिवाय पिके आणि प्राणी यांचे विशिष्ट साहचर्य हे सुद्धा सामान्यतः सघनतेचेच ढोबळ माप असते. पण, संयुक्त संस्थाने आणि पश्चिम यूरोप या प्रदेशांतील भूमीच्या वापरांतील फरक वेगळा करून दाखविण्याइतके हे दुसरे माप समर्पक नसते–या संदर्भात चीनचा विचार करणेही शक्य नाही. म्हणूनच, आपल्या या गमकांच्या क्रमबंधात अशाप्रकारच्या फरकांचीही कोणत्यातरी स्वरूपात भर टाकली पाहिजे.

सांस्कृतिक भूगोलाच्या भाषेत जमिनींचा पहिला वर्ग, म्हणजे निर्जन प्रदेश, हा अभिन्न रूपांचा असतो–सरळ शब्दात त्या शून्य-भूमी असतात. औपपत्तिकदृष्ट्या त्यांच्यांतील भेद दाखवावयाचेच झाले, तर, जो कारक त्यांच्या उपयुक्ततेचा प्रतिबंधक असतो त्याच्याच भाषेत भेद दाखविणे शक्य होते. उदाहरणार्थ : नित्य हिम, नित्य शोष, वंध्या मृत्तिका, किंवा असेच दुसरे काही. या प्रदेशांत एक अगर अधिक घटक एकांतिक अवस्थेत असल्यामुळे या प्रतिबंधक कारकांचा प्रभाव भूदृश्यांवर प्रत्यक्षच दिसत असतो.

मधल्या आणि सर्वात मोठ्या वर्गाच्या पोटविभागणीचे आधारतत्त्व इतके स्पष्ट नाही. जगाच्या विरळ वस्तीच्या या भागात, मानव हा तेथील जीवसृष्टीचाच एक भाग असतो ; तरीही त्याचे प्रभुत्व त्या सृष्टीवर पडलेले दिसत नाही. उलट, जमिनीचा वापर करण्याची सघनता आणि त्याच्या पद्धती यांवर तेथील रानवट वनस्पती जीवनाचा व रानटी प्राणिजीवनाचाच प्रभाव पडलेला असतो (मग ते प्राणिजीवन वा वनस्पतिजीवन अंदाजे मूळच्या नैसर्गिक स्वरूपात असो वा नसो, त्याचा आपल्याशी येथे संबंध नाही). परिणामी या प्रदेशांचे प्रत्यक्ष वनस्पति-आवरणाच्या भाषेत आणखी पोटविभाग पाडणे तर्कमान्य होण्यास हरकत दिसत नाही (कारण, त्या वनस्पतिजीवनामुळे, पूर्णपणे नसले तरी मोठ्या प्रमाणात, वन्यप्राणिजीवनही निश्चित होत असते).

थोडक्यात, वरील सर्व कारणांनीच जमिनीच्या या तीन प्रमुख वर्गांपैकी प्रत्येकाची पोटविभागणी करण्यासाठी लागणारे आधारतत्त्व प्रस्थापित करणे शक्य होणार आहे –अर्थात प्रत्यक्ष वनस्पती (आणि प्राणीही) यांच्या भाषेतच. ही रूपधेये औपपत्तिक स्वरूपांची नसून सत्य स्वरूपांतील आहेत ; आणि म्हणूनच, विविध पद्धतींनी त्यांचे निरीक्षण व मापन करता येते आणि त्यांचे वर्गीकरण व नकाशीकरणही शक्य होते. सांस्कृतिक नैसर्गिक प्रदेश प्रस्थापित करण्यासाठी लागणाऱ्या यथार्थ आधारांचा बहुतांश भाग अशा प्रकारच्या एखाद्या क्रमबंधातून आपल्या हाती येईल, हे काही आम्ही केवळ दृष्टभेटीत मान्य केलेले गृहीत प्रमेय नव्हते ; तर भूगोलाच्या दृष्टीने महत्त्वाच्या असलेल्या सर्वच सांस्कृतिक रूपधेयांच्या आम्ही यापूर्वी केलेल्या चिकित्सेतून काढलेले ते अनुमान होते, हे येथे

पुन्हा सांगावयास हरकत नाही. या आधारावर केलेल्या जगाच्या विभागणीचे नैसर्गिक रूपधेयांच्या क्षेत्रीय भेदाभेदांशी अर्थपूर्ण साहचर्य आहे असे दिसून येईल –अर्थातच, त्यातून सरळ, साधी किंवा अचूक संगती मिळण्याची शक्यता नाही. तसेच कोणीही अभ्यासू वाचक कोणच्याही प्रकारच्या प्रात्यक्षिकाचा आग्रह न धरत हे मान्य करील, असेच हे प्रमेय आहे, असे आम्ही गृहीत धरतो (या प्रदेशांतून निर्माण होणाऱ्या विशिष्ट प्रश्नांची चर्चा पुढे केली आहे).

उलटपक्षी, आतापर्यंत ज्या क्रमबंधाची रूपरेषा आपण आखली तो आपल्या या गुंतागुंतीच्या प्रश्नाचे अंतिम उत्तर देऊ शकणार नाही, कारण तो अगदी साधा आहे. भूपृष्ठाच्या उत्पादनाशी कसलेच साहचर्य नसलेल्या मूलभूत सांस्कृतिक रूपधेयांचे –उदाहरणार्थ : खाणकाम व कारखानदारी –सापेक्ष महत्त्व मापन करण्याची कोणतीच पद्धती त्यातून मिळत नाही. तसेच, ग्रामीण क्षेत्रांच्या लक्षणांचाही जे पुरेशा प्रमाणात समावेश करू शकेल असे व्यापक वर्गीकरण त्यातून मिळू शकत नाही. निरनिराळ्या प्रदेशात पिके व प्राणी यांचे जवळजवळ एकाच प्रकारचे साहचर्य असण्याची शक्यता असूनही, त्यांच्या पद्धती, उत्पादनाची अवजारे व उपकरणी, आणि विशेषतः ते करत असलेला उत्पादनांचा उपयोग, यांत क्षेत्रानुसार बरीच तफावत असण्याचा संभव असतो –महत्त्वाच्या सांस्कृतिक लक्षणांचा एक मोठा संचच त्यांच्यावर आधारलेला असण्याची शक्यता असते. म्हणूनच, प्रादेशिक वर्गीकरणात त्यांना मान्यता देणे प्राप्त असते. शेवटी, ज्यांचे वर्णन लोकवस्ती असलेली, पण लागवडीखाली नसलेली, आणि ज्यांच्यात अद्यापि वन्य वनस्पतींचा प्रभाव असतो अशी क्षेत्रे अशा भोंगळ शब्दात केले जाते, अशा प्रदेशांचे बारकाईने निरीक्षण केल्यास, त्यात सामान्यीकरणाची चूक होत असल्याचे उघडकीला येते ; आणि त्यामुळे बऱ्याच अडचणीही उद्‌भवतात. या वर्गाच्या एखाद्या विशिष्ट प्रदेशाचा –मग तो अर्धनिर्जल कुरणप्रदेशातील असो, की वृत्तान्तर्गत पर्जन्यांतील असो–बहुतांश भाग रानवट वनस्पतींनी व्यापलेला असण्याची शक्यता असते, आणि तेथील लोक आपल्या जीवनवृत्तीसाठी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे त्या वनस्पतींवर अवलंबून असण्याचीही शक्यता असते. पण, त्याचवेळी, अगदी थोडी क्षेत्रे वगळली तर, बाकी सर्व क्षेत्रांतून जमिनीच्या लहानसहान तुकड्यांत ते लागवडी करत असतातच. हे जमिनीचे तुकडे जरी लहान असले, आणि सामान्यतः काही थोडी वर्षेपर्यंतच त्यांचा सलग उपयोग केला जात असला, तरी त्या प्रदेशातील एकूण लोकसंख्येच्या संदर्भात असलेले त्यांचे महत्त्व त्यांच्या आकारमानाच्या तुलनेने अगदी प्रमाणाबाहेर मोठे असते. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचे तर, जमिनींचा हा मध्यमवर्ग म्हणजे अशा प्रदेशांचे नित्य लागवडीखाली असणाऱ्या प्रदेशात क्रमशः होत असलेल्या स्थित्यंतराचे प्रातिनिधिक स्वरूप होय. म्हणूनच, काही प्रमाणात तरी, लागवडीच्या प्रदेशांच्यासाठी वापरावयाच्या कसोट्या, म्हणजे मनुष्य प्रभावित वनस्पती व प्राणी या संबंधांतील या वर्गातील जमिनींनाही लावणे भाग असते. मात्र, हे स्थित्यंतर त्यांच्या पिकांतील फरकांच्या रूपाने स्पष्ट होणारे नसते, कारण तेथेही तीच पिके काढली जात असण्याची शक्यता असते. त्याचे

मापन अप्रत्यक्षपणे, म्हणजे सघनतेच्या, म्हणजेच एकरी उत्पन्नाच्या परिभाषेत (अर्थात, तपशील उपलब्ध असेल तर) करता येणे शक्य होते. वास्तविक, लागवडीसाठी वापरलेल्या अवजारांच्या व पद्धतींच्या रूपाने हे स्थित्यंतर अधिक अर्थपूर्णपणे व प्रत्यक्षपणे प्रकट होत असते –लागवडीचे स्थलांतरकारी स्वरूप आणि नांगराच्या ऐवजी कुदळीचा अथवा त्याहीपेक्षा साध्या उपकरणांचा उपयोग अशा रूपाने.

आताच क्रमाने सांगितलेल्या या अडचणी, औपपत्तिक क्रमबंधाचा वापर वास्तव जगात करण्याचा प्रयत्न करत असताना पुढे येतात. आपल्या औपपत्तिक विचारसरणीला अति सरळ रूप देण्यात होणारी चूक त्यामुळे उघड दिसू लागते. पण, तो सुधारण्याचा व त्याला पूर्णरूप देण्याचा प्रयत्न करण्यापूर्वी, या सामान्य उपपत्तीचे सोदाहरण स्पष्टीकरण देऊ शकणाऱ्या –आणि, अंशतः का होईना, त्याचे प्रात्यक्षिक देणाऱ्या –जगाच्या विभागणीचा एखाद्या वास्तव क्रमबंधाची तपासणी करणेच आपल्या हिताचे ठरेल. आमच्या प्रतिपादनाच्या पद्धतीवरून असा गैरसमज होण्याची शक्यता असली तरी, आम्ही आमची औपपत्तिक विचारसरणी परिपाठाचा विचार न करताच विकसित केलेली नाही, तर वास्तव क्रमबंधांच्या अभ्यासांतून ती उत्क्रांत झालेली आहे.

सांस्कृतिक रूपधेयांवर आधारलेले प्रादेशिक क्रमबंध रचण्याचे प्रयत्न, दुर्दैवाने, थोडेच झाले आहेत ; आणि जे आहेत त्यांपैकी बहुतेक सांस्कृतिक भूगोलाच्या काही थोड्या प्रमुख रूपांना चिकटून राहणारे आहेत. विशेष असे की, सांस्कृतिक-भौगोलिक विभागणीच्या सामान्य प्रश्नाशी त्या रूपांचा संबंध कोणता याचा कदाचित काहीच विचार झालेला नसतो. असे असले तरी, संभाव्य विकासाची दिशा व त्यांचा अंतिम हेतू त्यांतून सूचित व्हावा, इतकी त्यांची प्रगति झालेली आहे. तेव्हा, एकूण विकासक्रमाचा संक्षिप्त आढावा घेतला तर वरील दोनही गोष्टी स्पष्ट होण्याची शक्यता आहे.

सांस्कृतिक भूगोलावरील पुष्कळशा अभ्यासग्रंथातून वेगवेगळ्या घटकांपासून प्रारंभ करून –त्यांचे वर्गीकरण करून, त्यांचे वितरण निश्चित केल्यानंतर –मगच प्रदेश निश्चित करण्याचा प्रयत्न केलेला असतो. अगदी ढोबळ स्वरूपात पहाता, हा प्रकार केवळ एकाच घटकाच्या आधारावर एखाद्या क्षेत्राचे शेतीप्रधान विभाग पाडण्याच्या प्रयत्नांत दिसून येतो. नव्या अक्षर चिन्हांची व आणखीही खास चिन्हांची भर टाकून, ही अतिरंजनाची युक्ती वापरणे म्हणजे प्रादेशिक विभागणी पद्धतच समर्पक नाही असे कबूल करण्यासारखे आहे. शिवाय ही पद्धती मुळातच दुबळी आहे, कारण एकूण शेतमळा हे मूलभूत एकक न मानता शेतकऱ्याचे शेत हेच मूलभूत एकक असल्याचे येथे गृहीत धरलेले असते. मका-पट्ट्यातील शेतमळा हे मूलभूत एकक हे मक्याच्या शेतापेक्षा काही अंशी अधिक असते. सामान्यतः ते मका, गहू, ओट, गवत आणि विविध प्रकारची गुरेढोरे यांचे उत्पादन करणारे एक संघटित एकक असते. खरे म्हणजे, आणखीही काही घटकांचा यात उल्लेख व्हावयास पाहिजे.

जर्मनीच्या एंगल ब्रेक्ट व अन्य काही, आणि या देशातील पुष्कळशा, भूगोलाभ्यासकांनी एकमेव पिकाच्या आधारावर शेतीप्रधान प्रदेश निश्चित करण्याचा प्रयत्न केला, आणि, लागवडीच्या पद्धती विचारात घेऊन –विशेषेकरून कुदळ-संस्कृती आणि नांगर-संस्कृती असा भेद दाखवून –हानने एका अधिक मूलगामी घटकाला हात घातला (२९८ ; २९९). त्याचप्रमाणे, शेतीसाठी जमिनीचा वापर करण्याच्या कार्यपद्धतीच्या महत्त्वावर श्लूटरने भर दिला (१४५, २२f). याच दिशेने पुढे वाटचाल करत, जमिनीच्या वापरांच्या प्रकारांचा म्हणजे पड-पद्धती, त्रि-क्षेत्र-पद्धती आणि पीक-फेराच्या विविध पद्धती यांचा वेबलने अभ्यास केला (३९५).

आपल्या देशातही गेल्या दहा-वीस वर्षांत, पिके व गुरेढोरे यांच्या विशेष साहचर्याच्या भाषेत शेतीविषयक भूगोलाचा अभ्यास प्रयत्नपूर्वक करण्याकडे विशेष लक्ष पुरविले गेले आहे. कोणत्याही प्रकारचा औपपत्तिक आधार, निदान छापील स्वरूपात, पुढे न मांडताही वेगवेगळ्या अभ्यासकांच्या नजरेला एकच गोष्ट आली आहे. शेतीपिकांच्या वितरणाच्या अर्थानुसंधानाचे स्पष्टीकरण प्रत्येक वेगळ्या पिकाच्या भाषेत देता येण्यासारखे नाही ; तर, एकच शेत-मळा हे एकक धरून, त्यात प्रत्यक्ष आढळणाऱ्या पिके व गुरे यांच्या साहचर्याचा अभ्यास करणेच आवश्यक आहे. अगदी अलीकडेच, सर्वसामान्य सांस्कृतिक भूगोलाच्या अभ्यासाच्या घटकांचे साहचर्य –त्यालाच घटक जटिल असे नाव देण्यात आले आहे –मान्य करणे हा एक आवश्यक टप्पा आहे असे क्निफेनने विशेष भर देऊन सांगितले आहे (२९५, १६३f).

शेतीविषयक " घटक जटिलांचा " अभ्यास करण्याचा पहिला प्रयत्न संयुक्त-संस्थानांतील शेतीप्रधान प्रदेशांच्या नकाशाच्या रूपाने उपलब्ध आहे. तो ओ. ई. बेकर आणि त्यांचा अभ्यास गट यांनी केलेला असून, तो शेती खात्याने १९१५ मध्ये प्रकाशितही केलेला आहे (३११). पुढे दहा वर्षांनी, संपूर्ण उत्तर अमेरिकेच्या संदर्भात बेकरने या विषयाच्या केलेल्या अगदी तपशीलवार अभ्यासांतून अशाच प्रकारची संपूर्ण जगाची एका व्यापक अभ्यासलेखमाला ' इकॉनॉमिक जॉग्राफी ' या नियतकालिकाच्या अंकातून क्रमशः प्रसिद्ध झाली (त्याचा प्रारंभ १९२६ मध्ये झाला व सुमारे दहा वर्षे ती चालू राहिली. त्यातील जगाच्या प्रमुख प्रदेशांसंबंधींचे विवेचन पुढे दिल्याप्रमाणे करण्यात आले होते : ओलाफ जोनासन (३१३), ओ. ई. बेकर (३१२), साम्युवेल फोन फाल्केनबुर्ग, जॉज बी. क्रेसी, रॉबर्ट बी. हॉल, सी. एफ. जोन्स, ग्रिफिथ टेलर आणि एस्. एल्. शान्त्स.)

हे सर्व अभ्यास मौल्यवान असले तरी, ते एकाच एकरूप क्रमबंधात मांडून दाखविता येत नाहीत. त्याचे एक कारण असे असावे की, प्रत्येक लेखकाने एकएक स्वतंत्र क्रमबंध रचलेला होता. शिवाय, त्यांतील काहीत, सरळ स्वतंत्र घटकांच्या आधारानेच प्रदेश निश्चित करण्यात आले आहेत. कदाचित्, तोपर्यंत घटकजटिलांचे अभ्यास पुरेसे विकसित झालेले नव्हते, हे एक कारण असावे. तसेच, आपल्यापरीने अद्वितीय समजण्यात यावयाचे ' विशिष्ट ' प्रदेश आणि तौलनिक विभागणीतील ' जातिनिष्ठ ' प्रदेश या दोहोंतील भेद स्पष्टपणे राखला गेलेला नाही.

या दोनही प्रकारांच्या क्रमबंधांची भेसळ केल्याची उदाहरणे बेकरने तयार केलेल्या उत्तर अमेरिकेच्या नकाशात सापडतील. " कोलंबिया खोऱ्यातील गहू प्रदेश ", " वासंतिक गहूप्रदेश ", आणि " कणखर हिवाळी गहू प्रदेश " असे तीनही प्रत्येकी " विशिष्ट प्रदेश " म्हणून त्यात दाखविलेले आणि वर्णन केलेले आहेत. पण, " वैरणगवताचा व दुग्धव्यवसायाचा "–मिनेसोटापासून न्यू इंग्लंडपर्यंत पसरलेला प्रदेश–हा " विशिष्ट " प्रदेश म्हणून न दाखवता, विशेष नमुन्याची शेती करणारा प्रदेश असे त्याचे वर्णन केलेले आहे. मका प्रदेशाला ' विशिष्ट ' प्रदेश म्हणून मान्यता देऊन निर्माण केलेली अडचण यापेक्षा अधिक महत्त्वाची आहे. पिके आणि गुरे यांच्या साहचर्याच्या भाषेत बोलावयाचे झाले तर, मका-पट्टा हा दक्षिणेकडे कापूस पट्ट्यापर्यंत पसरलेल्या विस्तृत क्षेत्राचा एक पोटभाग आहे. अर्थात, तो वेगळा दाखवण्यासाठी उत्पादनाची घनता हे एक निराळेच गमक या ठिकाणी वापरणे आवश्यक होते. तसे केल्याने " मका आणि गहूपट्टा " हा एक प्रदेशसंच तयार होतो. हे प्रदेश आपापल्यापुरते लक्षणीयरीतीने भिन्न असले तरीही, सामान्यपणे त्यांच्यातील पिके व प्राणी यांचे साहचर्य जवळजवळ मका-पट्ट्यासारखेच असते ; मात्र, इकडील उत्पादन निश्चितपणे कमी असते (३१२ (१९२७), ३०९ ते ३२७, ४४७ ते ४६६ ; c/o ३२४, १०५ ते १०७). हेच गमक अन्य ठिकाणी लावण्यात आले असते तर, विशेषेकरून कापूस-पट्ट्यात, कितीतरी मोठे फरक त्याला दाखवता आले असते.

शेत-मळ्यांच्या प्रकारांचा अत्यंत तपशीलवार अभ्यास " संयुक्त संस्थानांतील शेतीव्यवसायाचे प्रकार " या नावाने संयुक्त संस्थान शासनाने १९३३ मध्ये प्रकाशित केलेल्या ग्रंथात ग्रथित केलेला असून, त्यातील विवेचन फॉस्टर एफ्. इलियट यांचे आहे (३२०). आठशेहून अधिक शेतीप्रधान प्रदेशांचे वर्गीकरण करणारा हा क्रमबंध प्रामुख्याने अधिक वैशिष्ट्यपूर्ण प्रकारांनाच मान्यता देतो व कमी प्रमाणात वैशिष्ट्य दाखविणारे सर्वच प्रांत सामान्य शेती या नावाच्या एकाच संकीर्ण प्रकारात एकत्र कोंबून ठेवतो. या " सामान्य शेती प्रदेशांत " कापूस, तंबाखू, गंहू, गुरेढोरे, डुकरे, दुधदुभत्याचे पदार्थ, खाद्यपक्षी, किंवा वन्यवस्तु उत्पादन यांपैकी काहीही उत्पादन करणाऱ्या क्षेत्रांचा समावेश होऊ शकतो, अर्थातच, हा कोणताच विशिष्ट प्रकार होऊ शकत नाही. तथापि, शेती प्रदेशांच्या कोणत्याही प्रकारच्या अभ्यासांसाठी या ग्रंथातील सामग्री फार मौल्यवान ठरावी अशीच आहे.

जगभरच्या शेतीसाठी केलेल्या जमीनवापराचे प्रकार ठरवून, त्यांचे वर्गीकरण " घटक-जटिलांच्या " परिभाषेत करण्याचा, आणि त्या आधारावर जगाच्या नकाशाचे भाग पाडण्याचा पहिला प्रयत्न, म्हणजे बऱ्याच काळाच्या श्रमांनी वेलिंग्टन जोन्स व डरवेंट व्हिटल्से यांनी विकसित केलेला क्रमबंध होय, असे त्याला असलेल्या माहितीवरून प्रस्तुत लेखकाचे झालेले मत आहे. तो क्रमबंध कित्येक छायाचित्रांकित प्रती व छिद्रांकित प्रती यांच्या रूपात,

तर जगाचा नकाशा छापिल नमुन्यात, १९३२ मध्ये (३१५) प्रकाशित झाला. आणि शेवटी म्हणजे १९३६ मध्ये, हेच प्रतिपादन सुधारून वाढवलेल्या स्थितीत, एका नव्या नकाशासह, " प्रमुख शेतीप्रधान प्रदेश " या नावाने स्वतः व्हिटल्सेनेच प्रसिद्ध केले (३१९). तसे ३१६, ३१७, ३१८ यांच्याकडेही लक्ष द्यावे.)"

जोन्स व व्हिटल्से हे दोघे या क्रमबंधाच्या संदर्भात अभ्यास करत होते त्याच कालखंडाच्या उत्तरार्धात, सॅम्युएल डिकेनच्या मदतीने प्रस्तुत लेखकही जवळजवळ अशाच प्रकारच्या एका वर्गीकरणाची रचना करत होता. (३२४ : शिळा छाप : नियतकालिकाच्या वार्षिकात १९३५ मध्ये प्रसिद्ध (३२४) आणि अगदी सामान्य स्वरूपात मांडलेला हा संपूर्ण क्रमबंध (३२७).

वर्गीकरणाच्या या दोन क्रमबंधांत मनावर ठसावे इतके साम्य आहे. त्याचे सारेच श्रेय लेखकाच्या पूर्वाश्रमीच्या आचार्यांच्या दृष्टिकोणाच्या प्रभावाला देणे इष्ट नाही. विशिष्ट प्रकार निश्चित करणे, मूलभूत गृहीतकांचे परीक्षण करणे व त्यावरून तपशीलवार नकाशे तयार करणे अशा सर्वच गोष्टी अगदी स्वतंत्रपणे केल्या गेल्या होत्या. फक्त, विविध पिकांच्या, गुराढोरांच्या उत्पादनांच्या सापेक्ष महत्त्वाचे मापन, वेलिंग्टन जोन्स यांनी आपल्या " शेतीसाठी जमीनीच्या वापराच्या प्रादेशिक अन्वीक्षणासाठी उपयुक्त गुणोत्तरे व समसंख्यादर्शक-रेषांकित नकाशे " या अभ्यासग्रंथावरून दोघाही लेखकांनी घेतलेले आहेत. (२८३ ; c/o ३१९, २०९ ; ३२४, १०१).

जमीन-वापराशी ज्या रूपधेयांचे साहचर्य असते, अशा शक्य तितक्या अधिक रूपधेयांच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण ठरेल, अशी जगाची तौलनिक प्रादेशिक विभागणी शोधण्याचा प्रयत्न हे दोनही क्रमबंध करत आहेत. विचारात घेतलेल्या विविध बहुसंख्य लक्षणांचे बरेचसे स्वतंत्रपणे निरीक्षण करत असलेले दोन वेगळे अभ्यास गट जवळजवळ सारख्याच निष्कर्षावर येतात, ही वस्तुस्थिती लक्षात घेतल्यास, एक गोष्ट निश्चितपणे सूचित होते की, हा प्रश्न हाताळण्याची ही पद्धती सप्रमाण आहे.

या दोनही क्रमबंधांनी हा प्रश्न भलताच सुलभ करून टाकला आहे, असा दावा केला जाण्यास हरकत नाही. अगदी निषेधात्मकरीतीने जरी नाही तरी प्रामुख्याने, बहुतेक सर्वच वेगवेगळे प्रकार पिके-गुरे साहचर्याच्या परिभाषेतच निश्चित करण्यात आलेले आहेत ; चर्चा मात्र अनेकानेक लक्षणांची करण्यात आली आहे.

या दोहोंपेक्षा कितीतरी अधिक तपशील असलेला एक अभ्यास जर्मनीतील शेतीप्रधान पट्ट्यांच्या संदर्भात, अंशतः (जर्मन) भौगोलिक साहित्याच्या आधारे बुश नावाच्या एका शेतीशास्त्राच्या अभ्यासकाने केलेला आहे. बुशनेही शेतीचे प्रकार व ते ज्या क्षेत्रांत आढळतात ते प्रदेश निश्चित करण्यासाठी मुख्यतः पिके व गुरेढोरे यांच्या विशिष्ट

---

९५. " प्रादेशिक शाखेच्या टीकेतून निर्माण झालेले सांस्कृतिक भूगोलातील नवीन वळण " अशी त्यावरून टीका करत, या ग्रंथाचे वर्गीकरण फायफरने केले. त्यावरून त्याला काहीतरी चुकीची माहिती पुरविली गेलेली असावी, असे दिसते (१०९, १९०).

संयोगांचाच आधार घेतलेला आहे. आतापर्यंत ज्यांची आपण बारकाईने चौकशी केली त्यांच्यापैकी कोणाही एका अभ्यासकापेक्षा कितीतरी अधिक अंतर्बाह्य अभ्यास बुशने केलेला आहे. त्याने असेही दाखवून दिले आहे की, जागतिक अभ्यासांसाठी वापरलेल्या पद्धती, अधिक नाही तरी निदान तितक्याच, परिणामकारक रीतीने लहान क्षेत्रांनाही लागू करता येण्यासारख्या आहेत. माझ्या माहितीप्रमाणे त्या अभ्यासासाठी केलेला पिके-गुरे जटिलांचा वापर या जर्मन साहित्यातील एकमेव प्रयत्न आहे. मर्यादित क्षेत्रांसाठी करावयाच्या तपशीलवार अभ्यासात या पद्धतीने किती गोष्टी साधता येतील याचे उत्तम उदाहरण म्हणून जरी या ग्रंथाचा येथे उल्लेख आम्ही केलेला असला तरी, त्यामुळे जगाची प्रादेशिक व्यवस्था लावण्याच्या आपल्या समस्येवर कोणताच अधिक प्रकाश पडण्यासारखा नाही.

कोणत्याही एकाच प्रमुख सांस्कृतिक प्रकारापुरताच मर्यादित असलेल्या क्षेत्राला पीक-प्राणी-जटिलांचा हा निकष सहज लावून पहाता येण्यासारखा आहे ; आणि त्यापासून मिळणारे निकालही अधिक सरस असतात. हार्टशॉर्न आणि डिकेन यांना युरोपीय संस्कृतीच्या क्षेत्रांना-म्हणजेच युरोप व उत्तर अमेरिका या दोनही क्षेत्रांना-हे निकष लावून पहात असताना फारच समाधानकारक यश मिळाल्याचे दिसून आले (३२४).[९६] तसेच, जगाच्या सर्वच प्रकारांसाठी अशा प्रकारचे निकष घालून देण्याचा प्रयत्नही त्यांनी केलेला आहे. (३२८ मध्ये नामनिर्दिष्ट विधानेही केलेली आहेत.) पण, काही विशिष्ट बाबतीत निकषांच्या अशा विधानांमुळे गैरसमजच निर्माण होण्याची शक्यता आहे. उदाहरणार्थ, भात शेतीचे प्रदेश भात शेतीखाली असलेल्या जमिनींच्या प्रमाणाच्या आधारावर निश्चित केले जातात. पण, त्या मागची विचारसरणी मात्र पौर्वात्य देशांतील भात शेतांच्या आणि त्यांच्या साहचर्याने असलेल्या खास पद्धतींच्या संदर्भातील असते-संयुक्त संस्थानांतील भात प्रदेशांचा त्यात अंतर्भाव केलेला नाही या वस्तुस्थितीवरून ही गोष्ट स्पष्ट होते. " पौर्वात्य देशातील बारीक धान्याची, म्हणजेच सोयाबीनची, शेती " या प्रकारावरूनही हेच अधिक स्पष्ट होते. प्रत्यक्षात एखाद्या प्रकारात सोयाबीनचे पीक नसेलही. कारण, तो प्रामुख्याने, पीक-साहचर्य अथवा तेथील लहानसरच गुरांचे कळप यांवर आधारलेला नसून, तिकडील सघन लागवड-पद्धतीवर आधारलेला असतो.

---

९६. ज्या अभ्यास ग्रंथाचा मी स्वतःच एक सह-लेखक होतो अशा एका ग्रंथाचा उल्लेख मी या पद्धतीने करतो आहे. तसे करण्यात सोय तर आहेच; पण, ज्याप्रकारे मी व्हिटल्सेच्या अभ्यास ग्रंथाचे परीक्षण केले त्याचप्रकाराने, म्हणजेच जणू त्याच्याशी माझा काही संबंध नाही असे ते भौगोलिक ग्रंथ आहेत असे मानून, मी त्यांचा विचार करण्याचा प्रयत्नही केला आहे. यात मला किती प्रमाणात यश आले आहे, याचा निर्णय वाचकांनीच घ्यावयाचा आहे.

आपल्या प्रास्ताविक चर्चेत व्हिटल्सेने निकषांचे पाच संच सादर केलेले आहेत. पण, दुर्दैवाची गोष्ट अशी की, वेगवेगळे प्रकार निश्चित करण्यासाठी त्यांचा उपयोग कसा करावयाचा याचे निर्देशपूर्वक विधान त्याने केलेले नाही. त्याच्या क्रमबंधाचे काळजीपूर्वक परीक्षण केल्यास, त्याचे बहुतेक प्रकार प्रामुख्याने पीक-प्राणी साहचर्याच्या परिभाषेच्या मर्यादितच मांडलेले आहेत, असे अनुमान काढणे योग्य होईल–त्यात विशेषेकरून चांगल्या लागवडीच्या क्षेत्रात मोडणाऱ्या, म्हणजेच नित्य शेतीखाली असणाऱ्या, जमिनींचा यात समावेश केलेला असतो.

अन्य गमकांमधून आढळून येणाऱ्या फरकांचे संबंध पीक-प्राणी साहचर्यातील फरकांबरोबर ज्या प्रमाणात प्रत्यक्षपणे दाखवून देता येतील त्या प्रमाणात हे सुलभीकरणही समर्थनीय ठरण्याची शक्यता आहे. व्हिटल्सेने दिलेल्या बाकीच्या चारही गमक-संचांच्या बाबतीत हे संबंध बऱ्याच प्रमाणात सत्य असले तरी, कोणत्याच एका बाबतीत ते संपूर्ण सत्य असत नाहीत. उत्पादन पद्धती, उत्पादन घनता, उत्पादनांच्या व्यापार क्षमतेचे प्रमाण आणि शेतमळ्यांतील इमारतींचे स्वरूप, हे जटिलही सामान्यतः बदलत जाणाऱ्या पीक-प्राणी जटिलांच्या अंगानेच बदलत असतात. तथापि, ज्या क्षेत्रांत हा जटिल एक सारखा असतो त्या क्षेत्रांत ते आधीचे जटिलही एक सारखेच असतात असे नाही. विशेषेकरून अर्थव्यवस्थेच्या प्रकारासारख्या (Wirtschafts form) महत्त्वाच्या प्राथमिक फरकांचे विवेचन समर्थक असत नाही, असे हान व वायबेल यांच्या अभ्यास ग्रंथावरून आढळून येते, असा आक्षेप फायफरने आपल्या अगदी त्रोटक टीकेत घेतलेला आहे (१०९, १२० f ; c/o वायबेल ३९५). तसेच, जमीन व तीवरील मजूर यांचे अन्योन्य संबंध कोणत्या प्रकारे संघटीत झाले आहेत, याचा प्रस्तुतच्या दोनही क्रमबंधात फार थोडा विचार होत असतो, याचीही दखल येथे घेण्यासारखी आहे. उदाहरणार्थ : एकाच कुटुंबाने स्वतंत्रपणे कसलेला व जमिनीचे एकच एक एकक असलेला शेत-मळा, अशाच प्रकारे पण जमिनीच्या फार विस्तृत एककात विखुरलेल्या जमिनीच्या लहान लहान तुकड्यांनी निर्माण केलेले शेत-मळे, वर्गीकृत मजूर-संघटनांनी चालविलेले मोठ-मोठे जमीन जुमले, इत्यादि (श्ल्यूटर १४५, २२). पण, अशाच प्रकारच्या घटकांचे बागायत क्षेत्रांच्या संदर्भात किंवा विस्तृत धान्य मळ्यांच्या संदर्भात केलेले विवेचन अपवादात्मक असते. त्यामुळेच, अन्य क्षेत्रांच्या संदर्भात त्यांचे विवेचन का बगळलेले असते, या गोष्टीचे जोरदार समर्थनही होते. उलटपक्षी, या रूपधेयांचा समावेश, विचारासाठी घ्यावयाच्या अन्य गोष्टींच्या संयोगाने, विवेचनात कसा करावयाचा ही समस्या, अशक्य नसली तरी, अत्यंत अवघड आहे.

यांपैकी कोणताही एक क्रमबंध निव्वळ पीक-प्राणी जटिलांवर आणि अन्य गमकांपैकी ज्यांचे वर्गीकरण त्यांच्याबरोबर आपोआपच होत जाते अशा गमकांच्या आधारांवर रचला गेलेला असतो असे समजू नये. यांपैकी प्रत्येक क्रमबंधांतील एक दोन प्रमुख प्रकार पीक-प्राणी जटिलांबरोबरच उत्पादनाच्या घनतेचा आधार घेऊन वेगळे दाखविले आहेत. पण, कोणत्याच एका क्रमबंधाने निकषांच्या या सर्व संचांच्या सहाय्याने उत्तर संयुक्त संस्थाने व वायव्य यूरोप यांच्या शेतजमिनीतील भेदांना मान्यता दिलेली नाही. एक दोन प्रकारांचे वर्गीकरण करताना, निर्वाह उत्पादनांपेक्षा व्यापारी उत्पादन वेगळे दाखवून, व्यापारी उत्पादनांच्या प्रमाणातील फरकाचा उपयोग वर्गीकरणासाठी केला आहे. पण असा एकच विभाग केलेला असल्याने, जवळ जवळ शंभर टक्के निर्वाह उत्पादन करणाऱ्या शेतांपासून ते जवळ जवळ शंभर टक्के व्यापारी उत्पादन करणाऱ्या शेतमळ्यापर्यंतच्या संपूर्ण टप्प्यातील शेतमळ्यांचे फरक दाखविण्याच्या दृष्टीने तो अपुरा आहे. खरे पहाता, ज्यांतील असा प्रमाणांचा फरक निश्चितपणे मोठा आहे अशा पुष्कळशा क्षेत्रांतील अशा प्रकारचा भेद दाखवलाच गेलेला नाही. एक गोष्ट निश्चित आहे की, या निकषासाठी आवश्यक असणारी संख्याशास्त्रीय आधारसामग्री फार थोडी असते, आणि ती पीक-प्राणी-जटिलांत खासच स्पष्टपणे प्रतिबिंबित झालेली नसते.

निकषांच्या एकाच संचाची मर्यादा मान्य केल्यामुळे, त्यातून निर्माण होणारा प्रकारांचा व प्रदेशांचा क्रमबंध अगदी एकसारखा असेल असे मानू नये. पीक-प्राणी जटिलात गुंतलेल्या बहुसंख्य कारकांचा, त्यापैकी कोणते संबंधित सांस्कृतिक लक्षणांची एकूण बेरीज अधिकांशाने दाखवतात याबाबत मतभेद होण्यास असलेल्या अवकाशाचा आणि त्याबरोबरच वेगवेगळ्या गमकांसाठी वापरावयाच्या वेगवेगळ्या संख्याशास्त्रीय मर्यादांचा विचार करता, आज दिसतात त्यापेक्षा कितीतरी अधिक मतभेदांची अपेक्षा करावयास हरकत नाही.

वरील दोनही बाबतींत, वेलिंग्टन जोन्सने संयुक्त संस्थानांच्या मध्यवायव्य प्रांतांच्या विभागणीसाठी वापरून सोदाहरण-स्पष्ट केलेले तंत्र उपयोगात आणले गेले आणि त्या आधारावरच अर्थपूर्ण समजल्या गेलेल्या विशिष्ट गुणोत्तरीय मर्यादा निश्चित केल्या गेल्या. असे ढोबळमानाने, जमीन वापरासंबंधीच्या अनेक अर्थपूर्ण गुणोत्तरांचे घटक महत्त्व दर्शक पुष्कळ नकाशे तयार केल्यावर कोणालाही असे आढळून येण्यासारखे आहे की, काही काही क्षेत्रे अगदी वेगळ्या दिसणाऱ्या केंद्र क्षेत्रांसारखी उठून दिसतात. अशा क्षेत्रांपैकी प्रत्येकाचे स्वरूप पुष्कळसे निश्चित असते आणि बहुतेक सर्व नकाशांवर, कित्येकदा तर सर्वच नकाशांवर, त्याना स्थान मिळालेले असते. शिवाय या वेगवेगळ्या नकाशांच्या तुलनेमुळे कोणती गमके अधिक मूलगामी स्वरूपाची आहे तसे दिसते, तेही समजून येते. याच आधारावर एका विशिष्ट शेती-प्रकाराला आवश्यक असणारा निकष ढोबळमानाने निश्चित करण्यास हरकत नाही, आणि जेथपर्यंत ते निकष लागू पडतात तेथपर्यंत त्या क्षेत्राचा विस्तार करण्यासही हरकत नाही. पण, अशा घटक-महत्त्व-दर्शक रेषा तीव्र

उतार दाखवत नसतील तर, अगदी स्वैरपणे एखादी मर्यादारेषा निवडावी लागेल, अथवा मध्येच एक स्थित्यंतर प्रकार मान्य करून तितक्याच स्वैर आधारांवर दोन मर्यादारेषा निवडाव्या लागतील. दक्षिण संयुक्त संस्थानांच्या (प्रामुख्याने कापूस पट्ट्यातील) शेती व मळा क्षेत्राची उत्तर हद्द, किंवा मध्यप्रदेशाच्या वायव्य भागातील व्यापारी धान्य क्षेत्राची पूर्व मर्यादा, अशा अनेक बाबतीत क्रांतिक कसोटीची मर्यादा म्हणून कोणती संख्यात्मक रकम मान्य केली याला सापेक्षतः फारच थोडे महत्त्व रहाते. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर, निसर्गाने घालून दिलेल्या मर्यादांपेक्षा तीव्रतर मर्यादारेषा शोधण्याच्या नादात मनुष्य असतो. जेथे एखादे महत्त्वाचे पीक यशस्वीरितीने काढता येते तेथे ते सामान्यतः प्रमुख पीक म्हणून काढले जात असते; आणि जेथे ते यशस्वीरितीने काढले जाण्याची शक्यता नसते, तेथे ते मुळीच न काढले जाण्याची शक्यता असते. पण, विशेषेकरून लागवडीखालील जमिनी व चराऊ जमिनी यांच्यामधील हद्दी म्हणजे प्रत्यक्षात मिश्रशेती स्थित्यंतर पट्टे असतात, आणि त्यांतील कोणतीही रेषा बहुतांशी स्वैरपणेच मान्य केलेली असते. (केंद्रक्षेत्राने निश्चित केलेल्या निकषक्षेत्रापासून आरंभ करून, त्याच निकषाचा वापर करत बाह्यक्षेत्राकडे जावयाचे, ही पद्धत विशिष्ट प्रदेश निश्चित करण्यासाठी लाउटेनझाकने वापरलेल्या पद्धतीसारखी भासते ; आणि तो असे म्हणतो की, त्याने ही पद्धत ह्योत्सेल, हेटनर व ग्राडमान यांच्या अभ्यासांवरून अनुमानाने तयार केलेली आहे (२६३ ; २७८, २३).

पुष्कळशा तपशीलांचे बाबतीत या दोनही क्रमबंधांचे निर्णय जरी सरूप असल्यासारखे दिसले, तरी त्यांच्यातील काही भेदांमुळेच जगाचे प्रादेशिक विभाग पाडण्यासाठी गमकांची निवड करत असता उद्भवणारे प्रश्न अधिक स्पष्टपणे प्रकाशित होतात.

व्हिटल्सेने " व्यापारी दुग्धव्यवसायासाठी शेती " या शीर्षकाखाली वर्गीकृत केलेल्या क्षेत्रांपैकी पुष्कळशी क्षेत्रे अन्य लेखकांनी " पेंढा, चराऊ कुरण व गोपालन शेती यासाठी शेती " या वर्गात घातली आहेत. या शीर्षकांनी केवळ परिभाषेतील फरक दाखविलेला नाही, तर त्यासाठी निवडलेल्या निकषांचाही फरक दाखवून दिला आहे. माझ्या माहितीप्रमाणे, पहिल्या वर्गवारीसाठी वापरलेला निकष उत्पादित दुधाचा आकार आणि पिकाखालील जमीन यांचे प्रमाण हा होता ( हा निकष जोन्सने घालून दिला (२८३), तर दुसऱ्यासाठी पेंढा, चराऊ कुरण व नांगरटीची पिके यांची सापेक्ष एकरवारी हा होता. प्रत्येक बाबतीत बहुतांश क्षेत्रे तीच आहेत. पण, " पेंढा, चराऊ कुरण, गुरेढोरे " या वर्गातील काही क्षेत्रांत–विशेषतः ग्रेट ब्रिटनच्या काही भागांत–दुभती जनावरे खाद्य जनावरांपेक्षा कमी महत्त्वाची आहेत. यांची काही क्षेत्रे निर्विवादपणे " व्यापारी दुग्धव्यवसाय क्षेत्रे " असूनही त्यांच्यातील नांगरटीच्या पिकांचे प्रमाण इतके मोठे असते की त्यांना " पेंढा, चराऊ कुरणे, गुरेढोरे यासाठी शेती " या वर्गात घालताच येत नाही.

या शेवटी दिलेल्या फरकाची महत्त्वपूर्ण उदाहरणे आग्नेय पेन्सिल्व्हानियामध्ये आणि आयोवाच्या ईशान्य कोपऱ्याचा समावेश होईल इतका विस्तारलेला शिकागोच्या पश्चिमेकडील जमीनपट्टा या क्षेत्रांतून सापडण्याची शक्यता आहे. व्हिटल्सेच्या निकषानुसार ही क्षेत्रे निश्चितपणे " दुग्धव्यवसायासाठी शेती " या वर्गातील आहेत. (जोन्सने हे दाखविलेले आहेच (२८३) ; आणि त्याचेच अनुकरण करून, पण अधिक तपशील देऊन हार्टशॉर्ननेही दाखविले आहे (३२५). पण, हार्टशॉर्न व डिकेन यांच्या निकषानुसार या क्षेत्रांचा समावेश " मका, गहू, गुरेढोरे " या वर्गात केला पाहिजे. यातील दुसरा क्रमबंध हा उघडउघड भूदृश्यदर्शनावर आधारलेला आहे. त्यात, एका बाजूस गवतकुरण व चराऊकुरण तर दुसऱ्याबाजूस नांगरटीची पिके या दोहोंतील फरकांना दुभत्या जनावरांसाठी असलेल्या व खाद्य गुराढोरांसाठी असलेल्या शेती-इमारतींत दिसून येणाऱ्या फरकांपेक्षा अधिक महत्त्व दिले गेले आहे. वरील प्रत्येक वर्गीकरणात केवळ भूदृश्यांतील विरोधांपेक्षा काही अधिक गोष्टींचा विचार गुंतलेला असतो. उत्पादनाच्या पद्धती व घनता यांचा विचार करता, नांगरटीची पिके विरुद्ध गवत यांच्याशी संबंधित असलेले फरक दुधदुभते-उत्पादन व मांस-उत्पादन यांच्यातून निर्माण होणाऱ्या फरकांपेक्षा अधिक मोठे असण्याची शक्यता आहे.

दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर, ज्यांच्यावर शेतमळ्यांतील जास्तीत जास्त रूपधेयांचा ठसा उमटलेला दिसतो, असे प्रकार निश्चित करण्यासंबंधीच्या प्रश्नाला स्पष्ट व निर्विवाद उत्तर मिळण्याची शक्यता नाही. तरीही, वर दिलेले महत्त्वाचे निकष पुरेशा प्रमाणात परस्परावलंबी असल्यामुळे, निरनिराळ्या निकषांची निवड केलेली असूनही, अंतिम निर्णय पुष्कळसे मिळते जुळते असतात.

जागतिक विभागणीच्या या दोन क्रमबंधांची तुलना केली, तर, विशेषेकरून वृत्तान्तर्गत आरण्ये व वृत्तान्तर्गत कुरण प्रदेश (साव्हाना) यांच्यातील आदिम वसाहतींच्या क्षेत्रांच्या बाबतीत, पुढे येणारे प्रश्न हाताळण्याच्या पद्धतीत अत्यंतिक फरक असल्याचे निदर्शनाला येते. इथे व्हिटल्से मुख्यतः उत्पादनपद्धतींवर अवलंबून रहातो. " फिरती शेती " करणाऱ्या क्षेत्रात आफ्रिकेतील वृत्तान्तर्गत आरण्ये व साव्हाना प्रदेश यांचा बहुतांश भाग मोडतो. पण दक्षिण अमेरिकेतील कुरण प्रदेश मात्र " पशुपालक शेती व्यवसाय " या वर्गात दाखविला जातो. तरीही, नकाशा, अगर तदनुषंगिक विवेचन, या दोन्ही ठिकाणी काम्पो व पंपा यांच्यातील आणि " पशुपालन शेती व्यवसायातील " अथवा पश्चिम संयुक्त संस्थानांतील तत्सम प्रकारांतील कोणताही फरक स्पष्ट केलेला नाही. याच्याविरुद्ध हार्टशॉर्न व डिकेन यांनी, प्रत्यक्ष परिभाषेने तसे न दर्शविता, आज दृष्टीस पडणाऱ्या भूदृश्यांच्या कसोटीवरच हे वर्गीकरण आधारलेले आहे. त्यानी ज्याला " कुदळशेती पद्धती " असे नाव दिले आहे तो प्रदेश वृत्तान्तर्गत आरण्यांशी

समक्षेत्र दाखविला आहे (येथे अभ्यासकांच्या सोयींसाठी प्रत्यक्ष मर्यादारेषांकडे दुर्लक्ष केले आहे) आणि साव्हाना प्रदेशातच "साव्हानातील चराऊ राने" या नावाने चराऊ कुरणांच्या एका पोटविभागास मान्यता दिली आहे. ही व्यवस्था दक्षिण अमेरिकेच्या बाबतीत समाधानकारक वाटली, तरी आफ्रिकेबाबत मात्र त्यामुळे अडचणी निर्माण झाल्या. पण, लेखकांनी अशा ठिकाणी नकाशावर प्रश्नचिन्हांची पुस्ती जोडून या अडचणींना सरळसरळ बगल दिली.

त्याच क्रमबंधांच्या एका नंतरच्या, पण सोप्या केलेल्या, प्रतिपादनात हार्टशॉर्नने विद्यमान भूदृश्य हाच एक निकष म्हणून मान्य करून हे कोडे सोडविले (३२७). (या संकल्पनेत नेमका कशाचा अंतर्भाव होतो हे निश्चित करण्याचा प्रयत्न लेखकाने त्यावेळी केलेला नसला तरी, प्रस्तुत ग्रंथात मागे झालेल्या एका चर्चेत व्याख्याबद्ध केलेल्या अर्थाला धरूनच हा विचार मांडलेला होता असे दिसते). जगाच्या प्रमुख भूदृश्याच्या नकाशात सर्वच क्षेत्रांना शेतीपद्धतींच्या स्वरूपानुसार शीर्षके दिलेली होती, त्यांचीच सरळ भाषेत "वृत्तान्तर्गत आरण्य" व "वृत्तान्तर्गत कुरण प्रदेश (साव्हाना)" अशी वर्गवारी केलेली आहे. (विचारसातत्य रहावे म्हणून "चराऊ कुरणे" हे शीर्षक बदलून "गवताळ कुरणे" अर्थात विद्यमान कुरणे हे शीर्षक वापरावे.)

पण, या भूदृश्यांत जे नजरेला पडते त्याच्या क्षेत्रीय विस्तारावर फारच भर दिला गेला आहे, असे आता लेखकाचे मत झाले आहे. जर तेथील लोक बऱ्याच अंशी एकाच प्रकारच्या फिरत्या कुदळ-शेती-पद्धतीचा प्रयोग आरण्यांतील अगर कुरणांतील लहानसहान अव्याप्त-भूमीवर करत असतील, तर त्यांच्या परिसरातील अनुपयोजित भूदृश्यांच्या वनस्पतिजीवनाचे स्वरूप विचारात घेणे हे सांस्कृतिक भूगोलाच्या दृष्टीने गौण ठरेल ; कारण त्या अव्याप्त भूमी हीच महत्त्वाची भूदृश्ये होत, असे म्हणता येईल. उलटपक्षी, जेथील रानवट वनस्पती गवत नसून वृक्ष आहेत, अशा प्रदेशांत प्रत्येक काही वर्षांनी नवीन अव्याप्तभूमी तयार करणे हे कार्य अगदी निराळ्या प्रकारचे असते, हे गृहीतच आहे. शिवाय, या अव्याप्तभूमीच्या परिसरातील भूभाग वापरात आणला जात असेल, तर, तसा वापर करण्याच्या पद्धती कुरणे व आरण्ये यांच्याबाबतीत वेगवेगळ्या असतात.

कदाचित, कोणत्याच क्रमबंधाला या क्षेत्रांचे वर्गीकरण समर्पकपणे करता आलेले नाही. अर्थात, अशी एक शक्यता आहे की, आवश्यक ती आधारसामुग्री अपुरी होती. आरण्य प्रदेशांतील फिरती शेती आणि कुरण प्रदेशांतील फिरती शेती हे दोन भिन्न प्रकार म्हणून मान्य करावयास हरकत नाही. पण, असे करत असता सांस्कृतिक रूपधेयांतील येथे उत्पादन पद्धतीतील महत्त्वाचे फरक केवळ गृहीत धरलेले असतात, त्याचे कसलेच प्रात्यक्षिक दाखविलेले नसते ; आणि जर तसा काही प्रत्यक्ष पुरावा दिलेला असेल तर त्याचे सरळ विधान करणेच अधिक बरे.

## ग–सांस्कृतिक प्रदेशांच्या तौलनिक क्रमबंधांची व्यावहारिकता व सयुक्तिकता

जगाची विभागणी जमीन वापराच्या प्रकारक्षेत्रांत करण्यासाठी उपयोगात आणावयाच्या या दोन पर्यायी क्रमबंधांच्या तुलनेमुळे, ज्यांची या प्रश्नाच्या अंगभूत अडचणी म्हणून आपण यादी केली, त्यातील पुष्कळशा अडचणींचे प्रात्यक्षिकच मिळाले आहे. दोन्हीपैकी कोणत्याच क्रमबंधाने सर्व शंकांचे समाधान झालेले नाही. अर्थात्, त्यांपैकी कोणत्याही एका क्रमबंधाचा, निर्दोष व परिपूर्ण क्रमबंधाच्या विकासक्रमातील एक टप्पा, यापेक्षा मोठा अधिकार सांगण्याची क्षमता नाही, ही वस्तुस्थिती आहे. तथापि, त्यांपैकी काही प्रश्नांची सोडवणूक करण्याच्या दृष्टीने औपपत्तिक परीक्षण करण्यासाठी, व प्रादेशिक भूगोलाच्या सर्वसाधारण क्रमबंधांच्या सयुक्ततेसंबंधी अंतिम विचार करण्यासाठी, याच क्रमबंधांचा पुढेही उपयोग करण्यास हरकत दिसत नाही.

जगाची प्रादेशिक विभागणी सांस्कृतिक प्रदेशांच्या दृष्टीने करण्याचा प्रश्न कोणत्या एका निकषसंचाच्या आधारे सोडवता येण्यासारखा नाही, असा निष्कर्ष आपण यापूर्वीच काढलेला आहे. व्हिटल्सेने आपला क्रमबंध पाच कसोटीसंचांच्या आधारे रचला, हे निश्चित आहे. इतर ग्रंथकारांनी एकाच सर्वसामान्य संचावर–म्हणजे, विद्यमान वनस्पती–आवरणावर–प्रामुख्याने आधारलेला आहे ; पण ते त्याला सातत्याने चिकटून राहिल्याचे आढळून येत नाही, आणि तसा तो समर्पक असल्याचेही सिद्ध झालेले नाही. तर मग, कोणत्या प्रकारचे निकष तर्कपद्धतीने एकत्रित करता–येतील, आणि कोणत्या आधारावर त्या सर्वांचा एक संयोग करता येईल ?

या प्रश्नाचा विचार एकट्या व्हिटल्सेनेच केलेला दिसतो ; पण त्याने फक्त त्याच्या पहिल्या भागाचेच उत्तर दिले आहे आणि त्यांचा संयोग करण्याचा निर्णय त्याने कोणत्या आधारावर घेतला हेही सांगितलेले नाही. तरी, त्याच्या परिणामावरून पहाता, कोणत्याच क्रमबंधक पद्धतीने हा निर्णय घेतला गेला नसून, प्रत्येक विशिष्ट बाबतीत व्यक्तिगत निर्णयच घेतला गेला होता, असे अनुमान कोणालाही काढता येते.

विभागणीचा कोणताही समर्थ क्रमबंध प्रस्थापित करावयाचा झाला, तर त्या क्रमबंधापर्यंत पोहोचण्याचा अचुक मार्ग कोणता हे समजणे आवश्यक आहे. ज्यांतील प्रत्येक संच स्वतंत्रपणे बदलणारा आहे असे समान महत्त्वाच्या निकषांचे कित्येक संच वापरले, तर कोणतेच व्यवहार्य ठरणार नाहीत. पाच निकष आणि त्यांपैकी प्रत्येकाच्या चार श्रेणी असे संच वापरावयाचे झाले तर प्रकारांची संभाव्य संख्या एक हजाराहून अधिक होईल. अगदी दोनच, पण स्वतंत्र व सारख्या महत्त्वाचे, निकष वापरावयाचे म्हटले तरच, तो क्रमबंध शक्यतेच्या कोटीत येईल पण त्यातही आवश्यक ती मूलगामी एकात्मता रहाणारच नाही. त्यातून एक विविध प्रकारांची सूची तयार होईल ; पण, त्या प्रकारांचे खरेखुरे वर्गीकरण होणार नाही.

तर्काधाराने गटवारीही करता येत नाही, अशा शे-पन्नास प्रकारांची केवळ यादी करण्यापेक्षा, विविध प्रकारांच्या समुचित वर्गीकरणाने काहीतरी अधिक साधलेले असणे आवश्यकच आहे. जसे विभाग असल्याचे आपण मानतो व त्यांचा संख्यानुक्रमही ठरवतो, तसे स्वतंत्र विभाग जगात असतच नाहीत. उलट, ज्याची विभागणी कमीजास्त प्रमाणात सरूप-दिसणाऱ्या विभागात आपल्यालाच करावयाची असते अशी जग ही एक संपूर्ण वस्तू आहे. अर्थात्, या विभागणीच्या वेगवेगळ्या टप्प्यात दिसणाऱ्या सरूपतेतील विविध अंशभेदांना मान्यता देण्याची सोय तर्कसिद्ध क्रमबंधाने करून ठेवणे जरूरीचे आहे.

जगाच्या विभागणी क्रमबंध निर्माण करण्याच्या प्रत्यक्ष खटपटीत आणि नंतर तो भक्कम असल्याचे समर्थन करण्याच्या धावपळीत जेव्हा या प्रश्नाशी वारंवार झटापट करण्याची पाळी येते, तेव्हा ज्याची चर्चा आधी झालेलीच आहे (प्रकरण १०, विभाग 'इ') त्या तर्कसिद्ध अटीला मान्यता देणे भाग पडते ; कोणत्यातरी एकाच प्रमाणाच्या संदर्भात ठरविलेल्या त्यांच्या त्यांच्या महत्त्वाच्या भाषेत ज्यांची परस्परांशी तुलना करणे शक्य असते असेच निकष वापरणे शक्य असते. अर्थातच, मूलाधारांच्या संदर्भातील त्यांचा महत्त्वक्रम जवळ जवळ स्थिर असला पाहिजे.

ज्या दोन क्रमबंधांची चर्चा आपण करत आहोत त्यांतून दोन शक्यता सूचित होतात. त्यापैकी एक जगाच्या विद्यमान भूदृश्यावरणांवर-म्हणजेच, जमिनीच्या चढउताराचा विचार न करता, प्रत्यक्ष दिसणाऱ्या भूदृश्यांच्या पोतावर-प्रामुख्याने आधारलेली आहे, आणि दुसरी जमीनवापराशी संबंधित रूपधेयांच्या संश्लेषणावर आधारलेली आहे. या दोहोंचेही आता आपण आळीपाळीने परीक्षण करू या.

विद्यमान भूदृश्यावरणात त्यातील वनस्पतींचा, किंवा त्यांच्या अभावी जी काही रूपे त्यांच्या जागी उभी असतील त्या सर्वांचा-रस्ते, पडजमिनी, खाणखड्डे, इमारती, इत्यादींचा-समावेश होतो. हे वनस्पती नैसर्गिक आहेत, रानवट आहेत, की संस्कारित आहेत, ही गोष्ट आपल्या दृष्टीने किमान महत्त्वाची आहे. नैसर्गिक भूदृश्य अथवा नैसर्गिक वनस्पती या संकल्पेनेविरुद्ध ही विद्यमान भूदृश्यावरणाची संकल्पना सत्यस्थितीमूलक आहे. म्हणूनच तिचे निरीक्षण करता येते व विश्लेषणही करता येते. (c/o उन्स्टेट, ३०९, १८५). शिवाय त्याचे विविध घटक त्यांच्या महत्त्वांच्या क्रमाने मांडता येतात, आणि त्या क्रमात फरकही पडत नाही. उदाहरणार्थ : लागवडीखालचे शेत व आरण्य या दोहोंतील फरक आरण्य आणि रानवट गवताने व्यापलेला भूविस्तार या दोहोंतील फरकापेक्षा अधिक महत्त्वाचा असतो असा आपण एकदा निर्णय घेतला, तर हे विधान जगाच्या सर्व भागांत तितकेच खरे ठरले ; मग तिकडे हवामान किंवा मृत्तिका यांच्यांत कोणतेही फरक असले तरी हरकत नाही.

इ-१५५७-२९ ब.

शिवाय, जगाचे भूदृश्यावरण हा काही सतत बदलत्या रूपधेयांचा अगदीच नैराशाजनक शोभादर्शक नव्हे. उलट, प्रमुख रूपधेयांच्या बाबतीत एका मर्यादित क्षेत्रापुरती लक्षणीय सरूपता असते, तर अशा दोन क्षेत्रांमध्ये मोठा विरोधही दिसत असतो. हा दोन भिन्न शक्तींच्या प्रभावाचा परिणाम आहे ; आणि या दोनही शक्ती त्या दोन क्षेत्रांमध्ये सत्यसंश्लेषण घडवून आणतात. निसर्ग एकाबाजून वनस्पतिसाहचर्यांचे संश्लेषण करत असतो, आणि यालाच औपपत्तिकदृष्ट्या " नैसर्गिक वनस्पती " म्हणतात. जिथे मानवाने त्यांचा नाश न करता त्यांच्यावर काही संस्कार केले आहेत, तिथे रानवट वनस्पतींचे साहचर्य आढळून येते. पण, जिथे मानवाने, कमीजास्त प्रमाणात, अशाप्रकारचे साहचर्य साफ उखडून टाकले आहे, तिथे त्याने स्वतःच्या निवडीच्या वनस्पतींचे एक वेगळेच साहचर्य निर्माण केले आहे, आणि सामान्यतः बऱ्याच मोठ्या क्षेत्रांतून त्याने ते टिकवूनही धरले आहे. तथापि, ज्या ठिकाणी ही प्रक्रिया अपूर्ण स्वरूपात आहे, अशी काही क्षेत्रे आपल्याला आढळतील, ही गोष्ट निर्विवाद आहे. फुटीर साहचर्याची ही क्षेत्रे रानवट व लागवडीच्या वनस्पतिसाहचर्याची मिश्रणे असतील ; आणि म्हणूनच त्यांचे वर्गीकरण करणेही अवघड होईल.

अर्थातच, क्षेत्रीय प्रकारांचे वर्गीकरण करण्यासाठी आवश्यक असलेले आधारतत्त्व आपल्या हाती आहे, आणि हे वर्गीकरण प्रमुख विभाग व पोटविभाग अशा स्वरूपात पूर्ण करणेही शक्य आहे. (या विषयाचे प्रतिपादन व विकसन ३२७ मध्ये काहीशा विस्ताराने केलेले आहे.) भूभाग आणि सागरभाग, अशी जगाची प्राथमिक विभागणी केल्यानंतर, करावयाची भूभागांची पहिली प्रमुख विभागणी आधीच सुचविण्यात आलेली आहे ; तिचे स्वरूप, थोडक्यात, रानवट जमिनी व संस्कारित जमिनी असे सांगता येईल. लागवडीच्या जमिनींच्या संदर्भात ज्युलियन हक्स्लेने अशी टीका टिप्पणी केलेली आहे की, गेल्या केवळ पाच हजार वर्षात पृथ्वीच्या जीवविषयक रूपात जेवढा बदल मानवाने आपल्या कृतीने घडवून आणला आहे, तेवढा बदल निसर्गाला पन्नास लक्ष वर्षात घडवून आणणे शक्य झाले नाही (अवतरण, ३२१). या " नैसर्गिक भूदृश्याचे " " सांस्कृतिक भूदृश्यात "–मानवप्रभावित भूदृश्यात अशा अर्थाने–होत असलेले स्थित्यंतर ही मानवाची महान, कदाचित महत्तम, कृती आहे ; म्हणजेच, जास्तीत जास्त महत्त्वाची ती भौगोलिक व ऐतिहासिक घटना आहे (१५८, ५२), असे पेंकने म्हटले आहे. या दृष्टिकोणातून पहाता, ज्यात " नैसर्गिक भूदृश्ये " प्रत्यक्षात आढळू शकतील अशी क्षेत्रे– उदाहरणार्थ : पूर्वहिमावृत प्रदेश–आणि, अस्तिपक्षी असोत वा नास्तिपक्षी असोत– जे सर्वच मानवाच्या व्यापामुळे कमीजास्त प्रमाण विकृत झालेले असतात असे मानवी वसाहतीचे भूभाग, या दोहोंतील फरक, हे खऱ्या अर्थाने विद्यमान भूदृश्यांतील महत्त्वदर्शक भेद होत नाहीत. उलट, ज्यांतील भूदृश्यावरण बहुतांशाने मानवी नियंत्रणाखाली असते अशी क्षेत्रे, आणि नैसर्गिक शक्तींच्या तुलनेने पहाता ज्यांवरील

मानवी वसाहतीचा परिणाम अगदीच किरकोळ स्वरूपाचा असतो अशी क्षेत्रे, या दोन प्रकारांच्या क्षेत्रांमधील असंख्य आणि विविध रूपांनी आविष्कृत झालेले विरोध, हक्स्ले व पेंक यांना येथे अभिप्रेत आहेत. जी निरपवादपणे नैसर्गिक आहेत व जी मानवाने नास्तिपक्षी विकृत केली आहेत, अशा दोन प्रकारांच्या रानवट भूदृश्यांतील वेगळेपणा औपपत्तिक स्वरूपातच दाखविता येणे शक्य आहे. कारण, व्यवहारात असा भेद निश्चित करणेच अवघड असते आणि पुष्कळशा क्षेत्रांतून त्याचे महत्त्वही अगदी किरकोळ असते.

अशा वन्य भूदृश्यांच्या क्षेत्रांत दृश्य हाच उघड आधार घेऊन त्यांचे पोटविभाग पाडता येण्यासारखे आहेत. हिमाच्छादित, उजाड (म्हणजे ओसाड प्रदेश), टुंड्रा, कुरण, साव्हाना आणि आरण्य अशी क्षेत्रे भिन्न-भिन्न दाखविता येतील. (यांपैकी कोणत्याही दोहोंतील फरक आणि त्यांच्यापैकी कोणी एक व लागवडीखालचे क्षेत्र या दोहोंतील फरक, हे कोणत्याच प्रकारे एकमेकापेक्षा उणे-अधिक नाहीत असे मानण्यास हरकत नाही. याच आधारावर त्या सर्वांचा समावेश त्यांच्या आधीच्या एकाच प्रमुख विभागात करता येणे शक्य आहे ; आणि या मुद्यावर एकमत होण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही.) आता, यांपैकी कोणत्याही एका प्रमुख विभागात अखंड वन्य भूदृश्यांचे क्षेत्र आणि रानवट भूदृश्य असूनही अव्याप्तभूमीत लागवड केली असलेले क्षेत्र, असा भेद त्यात सहज करता येणे शक्य आहे. पण वन्य प्रदेश आणि लागवडीचा प्रदेश या दोहोंच्या दरम्यान आणखी एक मध्यगत प्रमुख विभाग मान्य करून, त्यात प्रामुख्याने रानवट भूदृश्य असणाऱ्या पण लागवडीखालील अनेक अव्याप्त भूमिखंडामुळे खंडित दृश्यांच्या सर्व क्षेत्रांचा अंतर्भाव करण्यास हरकत नाही. हा काही स्थित्यंतराचा भाग नव्हे ! या क्षेत्राला कालदृष्ट्या अथवा स्थलदृष्ट्या स्थित्यंतराचे क्षेत्र असे म्हणताच येणार नाही ; कारण, अनेक विस्तृत क्षेत्रात या रूपधेयांचा संयोग झालेला दिसणे हे त्यांचे नित्याचे लक्षण झाले आहे. या समस्येतून अशा काही अडचणी पुढे येतात, की तर्कनिष्ठ क्रमबंधात त्यांच्यासाठी तडजोड करणेच भाग पडते. सुदैवाने, अशी क्षेत्रे फक्त वृत्तान्तर्गत आरण्ये व साव्हाना या प्रदेशांपुरतीच मर्यादित आहेत.

ज्यांची दृश्यलक्षणे ऋतुकालानुसार नजरेत भरण्याइतकी बदलत असतात, अशा मोकळ्या करून लागवड केलेल्या जमिनींचाच तेवढा तेथील भूदृश्यावरणात समावेश व्हावयाचा असे नाही, तर कुंपणे, मळ्यावरील इमारती, खेडी, रस्ते, इतकेच नव्हे तर, लोहमार्ग, नगरे व शहरे अशा प्रातिनिधिकरूपांचाही त्याच भूदृश्यावरणात अंतर्भाव व्हावयाचा असतो. ज्या प्रमाणात ही नंतरची रूपधेये शेतमळ्यांतील रूपधेयांच्या कार्यकारी साहचर्यात असतील त्या प्रमाणात तीही त्या जटिलांचेच भाग आहेत असे मानावयास हरकत नाही. लागवडीच्या भूदृश्यांची कोणतीही विभागणी, जर सर्वसामान्य क्रमबंधाशी संवादी असेल तर, ती भूदृश्याच्या प्रमुख रूपधेयांच्या, म्हणजेच लागवडीच्या शेतांच्या, आधारेच केलेली असली पाहिजे. पण, प्रस्तुत क्रमबंधाच्या हिशोबी, पिकांची विभागणी त्यांच्या

वापरांच्या आधारावर करणे, अगर त्यात गुराढोरांचा विचार करणे, या गोष्टी या क्रमबंधाशी सुसंगत नाहीत असेच दिसून येईल. त्याचप्रमाणे, पीकवाढीच्या घनतेच्या महत्त्वातील फरकाला मान्यता देता येईल, पण एकच पीक काढण्याच्या पौर्वात्य व पाश्चिमात्य पद्धतींतील फरकाला मान्यता देता येणार नाही. व्यापारी शेती आणि निर्वाहक शेती या दोहोंतील फरक मुळातच बाह्य आहे. पण, ज्यांतील रस्ते, लोहमार्ग व नगरे विकसित झालेली नाहीत असे शेतमळे व ज्यांतील पिकांची लागवड वरील रूपधेयांच्या लक्षणीय विकासाशी प्रत्यक्ष संबंधित आहेत असे शेतमळे या दोहोंच्या बाह्य भूदृश्यांतील फरकाला मान्यता देण्यास काहीच हरकत नाही.

वर वर्णिलेला क्रमबंध सुसंगतपणे विकसित होत गेलेला नसल्यामुळे, त्याच्या परिणामकारकतेसंबंधी निर्णय देणे अवघड आहे. त्याचे प्रात्यक्षिकही अंशतःच झालेले आहे. तरीही, वरील एका यादीत दिलेली सांस्कृतिक रूपधेये हीच भौगोलिकदृष्ट्या सर्वश्रेष्ठ महत्त्वाची आहेत असे मान्य झाले तर, त्यांपैकी बहुतेक, प्रत्यक्षपणे वा अप्रत्यक्षपणे, या विद्यमान भूदृश्यातही प्रातिनिधिक स्वरूपात दिसत असतात हे उघड आहे. म्हणूनच, त्यांच्याआधारे केलेली कोणतीही प्रादेशिक विभागणी बऱ्याचशा रूपधेयांच्या दृष्टीने महत्त्वाची होईल असे वाटते.

नागरी व ग्रामीण अशा सर्वच भूदृश्यांतील सर्व पृष्ठरूपधेयांचा त्यात समावेश करता येईल अशारीतीने या क्रमबंधाचा विस्तार करणे शक्य होईल काय ? या रूपधेयांचे ठसे एकमेकांवर उमटलेले नाहीत ही वस्तुस्थितीच असे सुचविते की, मोठ्या प्रमाणांच्या नकाशांवरून लहान प्रमाणांच्या नकाशांसाठी सामान्य तत्त्वे प्रस्थापित करण्यासारखीच हीही एक तांत्रिक स्वरूपाची समस्या आहे, असा ग्रह होण्याची शक्यता आहे. (अशा प्रकारचा फारच सामान्यीकरण केलेला नकाशा, हासिंजरच्या ग्रंथात (३६०) पहा).

नागरी विकासाची काही रूपे बऱ्याच अंशी ग्रामीण क्षेत्रांशी संबंधित असलेली रूपे म्हणून समाविष्ट केली जाण्यास हरकत नाही, असे आम्ही यापूर्वीच सुचविलेले आहे. मात्र, केवळ ग्रामीणदृश्यांशी संलग्न आहेत म्हणून त्यांचा समावेश न करता, ती त्यांच्यांशी खरोखरीच समरस झालेली असतील तेवढ्या प्रमाणात त्यांचा समावेश केला जावा. लागवडीखालील सर्वच जमिनींचे, नगरे व शहरे यांचे अस्तित्व त्या परिसरात असणे, हे एक लक्षण आहे. याच्या विरुद्ध लागवड न झालेल्या जमिनींची स्थिती असते. कोणत्याही क्षेत्रातील नागरी विकासाची लक्षणे त्यातील ग्रामीण विकासाच्या स्वरूपानेच निश्चित केली गेली असण्याची शक्यता असते. त्या स्थितीत, नागरी व ग्रामीण रूपधेये खऱ्या अर्थाने समरस झालेली असतात, आणि म्हणूनच आपण त्यांचा एकच एकक म्हणून विचार करू शकतो.

पण, कित्येक क्षेत्रांतून असे दिसून येईल की, तेथील महत्त्वाची रूपधेये त्या क्षेत्रांतील प्रभावी ग्रामीण घटकजटिलांशी संबंधितच नाहीत ; संबंध आहे तो केवळ स्थानसान्निध्याचा आहे. मध्य इलिनाइसची " शेतीप्रधान नगरे " तिकडील प्रभावी ग्रामीण दृश्याचाच एक विशिष्ट स्वरूपाचा लाक्षणिक भाग मानला जाण्याची शक्यता आहे ; पण, कोळशाच्या खाणी आणि खाणउद्योगाची नगरे यांचे घटक-जटिल मूलतःच भिन्न स्वरूपाचे असतात. सभोवतालच्या शेतजमिनींत शेतीप्रधान नगराची भर पडली, तर त्यामुळे एक शेतीप्रधान क्षेत्र तयार होईल ; पण, खाणी क्षेत्राच्या परिसरात शेतजमिनींची भर पडली, तर " शेतमळे-आणि-खाणी " अशा क्षेत्रा खेरीज काहीच तयार होण्याची शक्यता नाही. म्हणूनच, अशा प्रकारच्या क्षेत्राचा संपूर्ण प्रादेशिक अभ्यास करावयाचा झाल्यास, तिकडील जटिलसाहचर्य कितीही शिथिल असले तरी ते लक्षात न घेता, त्या क्षेत्राच्या मर्यादेत असलेल्या सर्व घटक-जटिलांचा सारखाच विचार होणे आवश्यक असते, हे निराळे सांगण्याची आता गरज नाही. पण, आपला प्रस्तुत विषय वेगवेगळ्या प्रादेशिक अभ्यास असा नसून, क्षेत्रप्रकारांचा तौलनिक अभ्यास असा आहे.

खाणकाम रूपधेयांनी निर्माण केलेला कूट प्रश्न किरकोळ आहे असे म्हणून त्याला डावलावयाचे ठरविले, तरी इशान्य संयुक्त संस्थाने व वायव्य-यूरोप यासारख्या क्षेत्रांतील विशिष्ट स्वरूपाच्या कारखानदारी करणाऱ्या शहरांचा प्रश्न इतका सहज निकालात काढणे शक्य होणार नाही. प्रस्तुत लेखकाने हा प्रश्न नकाशे एकमेकावर ठेवून पहाण्याच्या धोपट मार्गानेच सोडविला आहे (३२७, ३३९ ते ७३). त्या क्षेत्राशी असंबद्ध असलेली कारखानदारी फार मोठ्या प्रमाणात वृद्धिंगत झालेली असल्याचे संख्यात्मक पद्धतीने ज्या क्षेत्रांबाबत निश्चित करण्यात आले आहे, अशा क्षेत्रांचे नकाशे, ग्रामीण भूदृश्याच्या परिभाषेत निश्चित केलेले प्रदेश ज्यात दाखविलेले आहेत, अशा जगाच्या नकाशावर ठेवण्यात आले (३२६). परिणाम इतकाच झाला की, एकाच नकाशात एकाच्या ऐवजी दोन क्रमबंध तयार झाले. अर्थात, एकच क्रमबंध रचावयाचा असेल, तर विभाग निश्चित करण्याच्या या पद्धतीत आणखी एका नव्या कसोटीची भर घालणे भाग पडेल. खरे म्हणजे, या पद्धतीचा परिणाम फक्त लागवडीची जमीन ऐवढ्या एका विभागावर होऊन थांबणार नाही, तर तो त्याच्या पुष्कळशा पोटविभागांवरही होणार आहे. त्यामुळे, आपल्याला फक्त " गवताळ चराऊ रानांचे भूदृश्य " असा एक आणि " औद्योगिक नागरी रूपधेये नसलेले गवताळ चराऊ रानांचे भूदृश्य " हा दुसरा असे आणखी दोन पोटप्रकार करावे लागतील. सत्यस्थितीत हेही अपुरेच ठरणार आहेत ; कारण, अवजड वस्तूंची कारखानदारी करणाऱ्या शहरांचे भूदृश्य, हे लहानसहान वस्तूंची कारखानदारी करणाऱ्या नगरांच्या भूदृश्यांपेक्षा नजरेत भरण्याइतके वेगळे असते. तेव्हा, त्यांच्या अधिक तपशीलवार वर्गीकरणाचा विचार न करणेच बरे ! आता, वेगवेगळ्या प्रकारांच्या औद्योगिक शहरांचा संयोग करण्याचा प्रयत्न करावा तर, या क्रमबंधाचा मूळ युक्तिवादच ढासळू लागेल ; कारण, ग्रामीण भूदृश्यांतील फरक अधिक महत्त्वाचे की, नागरी भूदृश्यांचे फरक अधिक महत्त्वाचे हे निश्चित करण्याची पद्धतीच उपलब्ध नाही.

म्हणूनच, आमचा निष्कर्ष असा की, एकूण बाह्य भूदृश्याच्या प्रत्यक्ष प्रमाणाने जगाची विभागणी करणारा तौलनिक क्रमबंध हा तर्कसाध्यही नाही आणि संभाव्यही नाही. ग्रामीण दृश्यांतील सर्वांत प्रभावी घटक-जटिलांवर आधारलेला एक क्रमबंध तयार करणे शक्य होईल, आणि नागरी दृश्यांवर आधारलेल्या एका भिन्न क्रमबंधाची रचनाही संभवनीय आहे.—मात्र, त्यासाठी एकाहून अधिक क्रमबंधांची गरज लागेल असे मानण्यास सबळ कारणे आहेत. आता याची पूर्तताच करावयाची असेल तर खाणकाम रूपधेये, मच्छीमारी रूपधेये इत्यादिंसाठी आणखी भिन्नभिन्न क्रमबंध रचणे जरूर होईल.

विद्यमान भूदृश्यावरणावर आधारित क्रमबंधाला पर्याय म्हणून भूमिपृष्ठाचा उत्पादनासाठी उपयोग करण्याच्या कामी गुंतलेल्या सर्व रूपधेयांच्या संश्लेषणांवर आधारलेला क्रमबंध रचता येईल. भूमिपृष्ठातून काढले जात असलेले उत्पादन वनस्पती उत्पादनाच्या भाषेतच सांगता येते—मग, ते उत्पादन रानवट वनस्पतींचे असो की, लागवडीच्या वनस्पतींचे असो ; ते प्रत्यक्ष उपयोगासाठी असो की, जनावरांच्या माध्यमाने अप्रत्यक्ष उपयोगासाठी असो. याचाच अर्थ, हे दोनही आधार परस्पराशी निगडित आहेत आणि तरीही ते एक नव्हेत. पहिला वापरात आणलेल्या भूमीच्या दर्शनी स्वरूपाने निश्चितपणे मर्यादित होत असतो, तर दुसऱ्यात जमीन वापराच्या एका विशिष्ट प्रकाराशी संबंधित असलेल्या सर्व सांस्कृतिक रूपधेयांचा अंतर्भाव होतो. ही रूपधेये त्या भूदृश्यात उघड दिसत असोत, वा नसोत ; ती वास्तव असोत की अमूर्त असोत ; ज्या कोणत्या प्रकारच्या जमीनवापराची ती लक्षणे असतील, त्यांचा विचार या क्रमबंधासाठी झालाच पाहिजे. अर्थातच, ही संकल्पना पहिल्यापेक्षा पुष्कळच व्यापक आहे. ही संकल्पना तितकीशी ' भौगालिक स्वरूपाची ' नसल्याचा काहींना भास होण्याची शक्यता आहे. कारण, जमीन हा तिचा प्रत्यक्ष आधार नसतो. पण असल्या विचारांनी आपण आपला गैरसमज होऊ देता कामा नये ! त्या सांस्कृतिक घटनांचे जमीन-वापराशी लागेबांधे असले तरीही, दूरान्वयाने असलेल्या एका साहचर्याचे वर्गीकरण या संकल्पनेत अभिप्रेत असल्यामुळे, ही संकल्पना मुळातच ' भौगोलिक स्वरूपाची ' नाही. तथापि, ज्या प्रदेशात असे शेतीचे प्रकार आढळतात त्यांचा विचार करणे हे ' भौगोलिकदृष्ट्या ' महत्त्वाचे आहे.

क्षेत्रांचे अकृत्रिम प्रकार ज्यांच्यावरून सहज ओळखता येतील अशा रीतीने जमीनवापरांशी घनिष्ठ साहचर्य असलेल्या विविध सांस्कृतिक रूपधेयांचे संयोग सत्यस्थितीत झालेले आढळतात काय ? खरे म्हणजे, वेगवेगळी सांस्कृतिक रूपधेये स्वतंत्रपणे बदलत नसतात ; तर मानवाने त्यांना आपल्या जमीन-वापराच्या वेगवेगळ्या संघटित एककांशी संकलित करून टाकलेले असते. अशी पायाभूत एकके शेत, मळा किंवा गुराढोरांसाठी शेतमळा अशा वेगवेगळ्या रूपांत दिसत असतात. एक संघटित एकक या नात्याने, एका शेतमळ्यात जमीन, त्यावरील वनस्पती आणि इमारती यांचाच समावेश होतो असे नाही, तर जनावरे, अवजारे, उत्पादनांच्या पद्धती व घनता आणि त्या उत्पादनांचा उपयोग, या सर्वांचाच त्यात

अंतर्भाव व्हावयाचा असतो. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे म्हणजे, शेत-मळा हा केवळ एक घटक-जटिल नसतो–रानवट वनस्पतिंच्या क्षेत्रात आढळतात तशा प्रकारच्या वनस्पति-जटिल नसतो–तर ती एक प्राथमिकरूपाची संपूर्ण वस्तू असते (२७४, ३४३-४५). वरील यादीत नोंदलेली प्रत्येक, आणि त्या सर्वच, वस्तू बऱ्याचशा एकासारख्या एकच असतात ; मग त्या शेते, इमारती, अवजारे यासारख्या मूर्त असोत की, उत्पादन पद्धतीसारख्या अमूर्त असोत. त्यामुळे, त्या एकूण शेतमळ्याच्या परिभाषेतच त्यांचे स्वरूप व कार्य समजून घेणे शक्य असते.

जमीनवापराच्या एककांच्या विशिष्ट प्रकारांचे आविष्कार क्षेत्रात झालेलेच असतात. एका स्वतंत्र शेताचा प्रत्यक्ष विस्तार, आपण सहसा विचारात न घ्यावा इतका, किरकोळ असतो. पण, बऱ्याच मोठ्या क्षेत्रातील बहुतेक शेते, मग ती एकूणात विचारात घेतलेली असोत की, त्यांच्यातील वेगवेगळ्या सांस्कृतिक रूपधेयांच्या भाषेत मापलेली असोत, पुष्कळशी एकसारखीच असतात, आणि इतर क्षेत्रांतील अशा एककांपेक्षा बरीच वेगळी दिसतात.

शिवाय, आणखी एक गोष्ट आपल्या लक्षात येते की, ही जमीनवापराची एकके एका बाजूने आकारमानांतील विविध क्रम दर्शविणारे तर दुसऱ्या बाजूने सलगपणा दर्शविणारे आधिकाधिक मोठे जटिल निर्माण करत असतात. उदाहरणार्थ : पुष्कळशा युरोपीय क्षेत्रांतून, एका विशिष्ट समाजगटाची सर्वच कुटुंबे एकाच संहतग्रामात असतात. तेव्हा त्यांचा असा एक घटक-जटिल तयार होतो की, त्याचा एक एकक म्हणून विचार करण्यास हरकत रहात नाही, आणि तरीही त्याला एक संपूर्ण वस्तू म्हणता येणार नाही. शेतजमिनींच्या खूपच मोठ्या क्षेत्राचे शेजारच्या शेतीप्रधान नगराशी अथवा शहराशी संबंध येऊन तयार होणारा घटक-जटिल सापेक्षतः शिथिलस्वरूपाचा असतो. यातील राजमार्ग आणि लोहमार्ग हे दुवासांधणारे घटक असतात. हा विस्तृत क्षेत्रावर पसरलेला जटिल कोणत्याही प्रकारे संपूर्ण नसला, तरी त्याचे असे एक वेगळे स्वरूप दिसत असण्याची शक्यता असते की, प्रदेशांचे जातिप्रधान प्रकार म्हणून मान्यता देण्याच्या दृष्टीने त्यांचा विचार करणे शक्य होते.

जमीन-वापराच्या विविध प्रकारांचे क्षेत्रीय वितरण आणि सांस्कृतिक व नैसर्गिक अशा दोनही स्वरूपाची भौगोलिक रूपधेये यांचे परस्परांशी महत्त्वपूर्ण संबंध असतात, या गोष्टीचे प्रात्यक्षिक करण्याची येथे गरज नाही. मानवीभूगोलाच्या संदर्भात जमीनवापराचा जटिल हा सर्वश्रेष्ठ महत्त्वाचा नसला तरी, अतिमहत्त्वाच्या जटिलांपैकी एक जटिल आहे, हे आम्ही आधीच सुचविलेले आहे.

जमीन-वापराच्या जटिलातील घटकांचा कोणत्याप्रकारे संयोग केला असता त्यातून एकच क्रमबंध निर्माण करणे शक्य होईल, हे ठरविणे, हाच खरा अवघड प्रश्न आहे. त्यासाठी, एकूण जटिलाच्या दृष्टीने घटकांचा महत्त्वक्रम ठरवून देणे आवश्यक असते. विभागणीचे

प्रमुख टप्पे अधिक महत्त्वाच्या कारकांमधील फरकांवर आधारलेले असावे लागतात, तर कमी महत्त्वाच्या कारकांतील भेदांवर पोटविभाग आधारलेले असावे लागतात. कोणत्याही एकाच विभागाचे पोटविभाग करावयाच्या प्रक्रियेत अथापासून इतिपर्यंत एकच प्रकारची कसोटी वापरावी लागते ; पण, तशा प्रकारच्या दुसऱ्या विभागांच्या पोटविभागांसाठी वेगळ्या कसोट्या वापरावयास हरकत नसते.

व्हिटल्सेने आपल्या निकषांचे गट त्यांच्या महत्त्वानुसार न करता, त्यांच्या लक्षणानुसार केलेले आहेत. पिके व जनावरे यांच्या साहचर्याच्या जोडीला उत्पादन पद्धती, व्यापारी उत्पादन व निर्वाहक उत्पादन यांचे परस्परांशी प्रमाण (निर्वाही उत्पादनाच्या मानाने व्यापारी उत्पादन किती अधिक आहे त्याचे प्रमाण), आणि शेतावरील इमारती, यांनाही त्याने मान्यता दिलेली आहे. या प्रत्येक गटात प्रमुख आणि गौण महत्त्वाच्या निकषांचाही अंतर्भाव होतो. उदाहरणार्थ : लागवड नांगरटीने केलेली आहे की, त्यासाठी केवळ कुदळीचा वापर केलेला आहे, हा फरक प्रमुख महत्त्वाचा आहे. त्या मानाने, शेतीच्या यंत्रांना घोडे जुंपले आहेत की ट्रॅक्टर लावला आहे या गोष्टीचे महत्त्व गौण आहे.

या क्रमबंधात, मुख्य आणि गौण कसोट्या निश्चित करण्याचा प्रश्न प्रत्यक्ष भूदृश्यांवर आधारलेल्या क्रमबंधातील अशा प्रश्नापेक्षा अधिक अवघड आहे, ही गोष्ट उघड आहे. म्हणूनच विशिष्ट रूपांच्या निकषांची यादी तयार करण्याचा प्रयत्न न करता, प्रत्येक टप्प्यावरील विभागणी करण्यासाठी आधारतत्त्वे सुचविण्याचाच प्रयत्न करण्यास हरकत दिसत नाही.

सर्व प्रकारांची पहिली विभागणी सर्वसामान्यपणे पद्धतीतील प्रमुख फरकांवर आधारणे शक्य होईल. उदाहरणार्थ : पडजमिनी, नित्य लागवड, फिरती शेती, गुरे चारणे (अर्थात, रानवट वनस्पतिंवर), वनसंपत्तीचे उत्पादन, आणि कोणत्याच उत्पादनाचा अभाव.

येथे, आपल्याला यातील प्रत्येकाची आणखी विभागणी करत बसण्याचे कारण नाही (अर्थात उत्पादनशून्य प्रदेशांचे जमीनवापराच्या भाषेत आणखी पोटविभाग पडण्याची शक्यताच नाही). चराऊ रानांच्या प्रदेशांतील मोठ्यातल्या मोठ्या फरकांचा संबंध व्यापारविषयक विकासाच्या प्रमाणाशी असतो. फिरत्या टोळ्यांनी वापरलेल्या चराऊ रानांत कायम स्वरूपाच्या इमारती, रस्ते वा नगरे निर्माण होण्याची शक्यता कमी असते ; तर, पक्की कुरणघरे, काटेरी तारांची कुंपणे, रस्ते, लोहमार्ग, आणि बरीचशी नगरे व शहरे या गोष्टींमुळे व्यापारी पशुपालन-शेती-व्यवसायात हा विरोध अति तीव्रतेने जाणवतो. तसेच अमेरिकेच्या साव्हाना प्रदेशांतील अर्धव्यापारी चराऊ कुरणे, त्यातील प्राथमिक स्वरूपाच्या शेतीमुळे, एक तिसराच प्रकार निर्माण करतील, हे गृहीत आहे.

आपला संबंध मुख्यतः नित्यशेतीच्या जमिनींशी आहे. आपण ज्याची चर्चा करतो आहोत त्या दोनही प्रत्यक्ष क्रमबंधात त्या त्या लेखकांनी उत्पादन पद्धतींतील महत्त्वाच्या फरकांवर आधारलेल्या एका प्राथमिक पोट-विभागणीचा उपयोग, तसा स्पष्ट उल्लेख न करताच, केला आहे. हे फरक स्पष्टपणे पद्धतींच्या आधारांवर निश्चित केलेले असले, तरी त्यांचे प्रतिबिंब उत्पादनाच्या घनतेवर खात्रीनेच उमटत असते. या फरकांचे महत्त्व प्राथमिक विभागणीसाठी वापरलेल्या फरकांच्या तुलनेने कनिष्ठ दर्जाचे असले तरी पूर्व संयुक्त संस्थाने व पश्चिम युरोप इकडे वापरल्या जाणाऱ्या पद्धतींतील फरकांच्या महत्त्वाच्या तुलनेने ते श्रेष्ठ दर्जाचेच आहेत. प्राथमिक स्वरूपाची शेती (हा शब्द प्रयोगही व्हिटल्सेनेच केलेला आहे), नित्यमशागतीची शेती, पाश्चिमात्य शेती व पौर्वात्य शेती, अशा विभागणीने त्यांचा ढोबळमानाने उल्लेखं केलेला असतो.

आता यांपैकी प्रत्येक विभागाचे पुढे पाडावयाचे पोटविभाग इतरांपेक्षा स्वतंत्र असतील. पौर्वात्य शेतीतील एका गोष्टीबाबत सर्वसामान्य एकमत असते, तिकडे, जमीनवापराच्या संदर्भातील सर्वात मोठा फरक, भातशेतीच्या लागवडीस प्राधान्य दिले जाते अशी क्षेत्रे आणि तसे ते दिले जात नाही अशी क्षेत्रे, या दोहोत असलेला आढळतो.

पण पाश्चिमात्य शेतीत ही परिस्थिती अधिक गुंतागुंतीची असते, (किंवा कदाचित त्याच्या निकट सान्निध्यात असल्यामुळे ती तशी असल्याचा आपल्यास भास होतो). प्रत्येक विभागात काहीशा स्वतंत्र असणाऱ्या लक्षणांच्या तीन गटांत महत्त्वपूर्ण फरक असलेले आढळून येण्याची शक्यता असते, आणि त्या प्रत्येकाचे महत्त्वही निर्विवाद असते. पिके व जनावरे यांच्यातील संबंधाच्या जोडीला व्यापारी उत्पादनाच्या प्रमाणातही फरक असतात–ठोकळमानाने सांगावयाचे झाले तर, पश्चिम आणि पूर्व यूरोप यांच्यात आढळतात तसे फरक. तसेच, उत्पादनाच्या पद्धतीत व अवजारे यांच्यातही फरक असतात–उदाहरणार्थ : उत्तर संयुक्त संस्थाने व पश्चिम युरोपात आढळतात तसे फरक. या सर्वांचा संयोग करण्याचा प्रयत्न केला, तर अत्यंत विविध प्रकार निर्माण होतील. म्हणून, विभागणीचे वेगवेगळे टप्पे पाडणे भाग पडते ; म्हणजेच कोणते फरक आधिक महत्त्वाचे आहे व कोणते कमी महत्त्वाचे आहेत हे ठरवावेच लागते.

पण, या प्रश्नाचा निकाल येथेच लावत बसण्याची आवश्यकता नाही. कोणत्याही क्रमबंधाच्या प्रत्यक्ष रचनेच्या वेळी असा निर्णय घ्यावाच लागतो आणि एकदा तो घेतल्यावर त्याचा सातत्याने उपयोगही करत रहावे लागते. पण, सातत्य याचा अर्थ निरनिराळ्या टप्प्यांसाठी अशा सारखीच पण वेगळी कसोटी वापरू नये असा होत नाही. पाश्चिमात्य शेतीची पहिली विभागणी पीक-प्राणी-जटिलांच्या प्रमुख लक्षणांच्या आधारावर घ्यावयास हरकत नाही. उदाहरणार्थ : धान्य व फळे यांची शेती (भूमध्यसामुद्रिक), धान्य व गुरेढोरे यांची शेती, गवताची चराऊ राने व गुराढोरांसाठी शेतमळे, आणि विशिष्ट प्रकारच्या

धान्यासाठी शेतमळे. यापैकी प्रत्येकाचे पोटभाग पाडताना त्यांतील व्यापारीकरणाचे प्रमाण हाच आधार घेता येण्यासारखा आहे. आणि या पोटभागांचे विशिष्ट पिकांच्या आधारावर आणखीही पोटविभाग पाडता येतील. उदाहरणार्थ : धान्य व गुरे-ढोरे यांसाठी शेती या व्यापारी पोटभागाचे व्यापारी मका-गहू-गुरेढोरे यांसाठी शेती व व्यापारी किरकोळ धान्ये व गुरेढोरे यांसाठी शेती, असे आणखी विभाग पाडणे शक्य होईल.

प्रत्येक पोटविभागणीच्या प्रक्रियेत शेवटी अशा एका टप्प्यावर आपण येऊन पोहोचतो की, तो पोटविभाग फक्त एकाच क्षेत्राने दाखविता येतो, हे स्पष्ट आहे. तथापि, या क्रमबंधाने असाच पोटप्रकार गट करून व काही महत्त्वपूर्ण आधार घेऊन त्यांचा एक मोठा प्रकार तयार केला आहे, आणि त्यामुळेच तौलनिक प्रादेशिक भूगोलाला योग्य प्रकारचा पाया मिळाला आहे.

वर आलेल्या प्रतिपादनावरून एक गोष्ट स्पष्ट होते, जमीनवापराच्या रूपधेयांशी ज्यांचे संबंध केवळ स्थान सान्निध्यापुरतेच आहेत, खऱ्या अर्थाच्या साहचर्याचे नाहीत, अशा अन्य सर्वच सांस्कृतिक रूपधेयांचाही त्यात अंतर्भाव करता येईल, अशा रीतीने या क्रमबंधाचा विस्तार करणे शक्य होणार नाही. खाणी प्रदेशाच्या साहचर्याने आढळणारी सांस्कृतिक रूपधेये अथवा विशिष्ट उत्पादनाच्या कारखानदारीच्या शहरांची रूपधेये या सर्वांचा अंतर्भाव करण्यासाठी जागतिक विभागणीच्या स्वतंत्र क्रमबंधांची गरज आहे.

म्हणूनच, येथे सुचविलेल्या दोहोंपैकी कोणत्याच क्रमबंधाच्या रूपरेखेवरून सर्वच सांस्कृतिक रूपधेयांसाठी एखादे समर्पक प्रादेशिक आधारतत्त्व मिळत नाही. पण, त्यातला कोणताही एक मान्य केला तरी, त्यावरून, ज्यामुळे जगाच्या मोठ्यातल्या मोठ्या भागाशी संबंधित असलेल्या आणि जास्तीत जास्त सांस्कृतिक रूपधेयांना न्याय देणाऱ्या प्रादेशिक विभागणीची आधारतत्त्वे मिळू शकतात.

सांस्कृतिक घटकांवर आधारलेल्या जगाच्या या, अगर अशा प्रकारच्या, प्रादेशिक क्रमबंधांच्या रचनेशी संबंधित सर्वच अभ्यासक आपण प्रकाशित केलेले अभ्यासग्रंथ केवळ तात्कालिक मूल्यांचेच आहेत असे मानतात, ही गोष्ट सत्य आहे. पण, जगाच्या पुष्कळशा भागांसंबंधीची आधारसामग्री त्रोटक आहे एवढी एकच वस्तुस्थिती त्याला कारणीभूत झालेली नाही ; त्यापेक्षा कितीतरी अधिक महत्त्वाचे कारण त्याच्या मुळाशी आहे. जगाच्या प्रत्येक भागातील प्रत्येक संबंधी सांस्कृतिक घटकाबाबतची सर्व आवश्यक ती सामग्री अशा प्रकारची प्रादेशिक विभागणी करण्यास बसलेल्या प्रत्येक अभ्यासकाच्या अगदी हाताशी सज्ज आहे असे गृहीत धरले, तरीही तात्पुरत्या स्वरूपाची रूपरेषा आखण्यापलीकडे काहीही करण्याच्या स्थितीत तो असणार नाही. सत्यस्थितीत उपस्थित असलेले घटक जटिल प्रस्थापित करणे हा या क्रमबंधांतील एक आवश्यक टप्पा असतो. त्याच्या संदर्भातील आणखी कितीतरी आवश्यक ते कार्य करावयाचे राहूनच गेलेले आहे. या हेतूच्या पूर्ततेसाठी संख्याशास्त्रविषयक

गुणोत्तरे व समसंख्यारेषांकित नकाशे तयार करण्याच्या पद्धतीही समर्पक नाहीत. त्यांच्यावरून संबंधी सामान्य साहचर्यांचे निर्देशन होते; त्याबरोबर त्यात समाविष्ट असलेले विशिष्ट घटक-जटिलही सुचविले जाण्याची शक्यता असते. पण, तेवढ्यावरून ते प्रस्थापित झाले असे होत नाही; आणि ही गोष्ट फक्त क्षेत्राभ्यासांतूनच होण्याची शक्यता असते तसेच आर. ई. डॉज यांचे " वसाहत पद्धतींच्या अभ्यासांत क्रमबंधात्मक दृष्टिकोण ठेवण्याविषयी आवाहन " हे पुस्तक पहा (२९६).

विशेषेकरून जमीनवापराची एकके या प्राथमिकस्वरूपाच्या पूर्णवस्तू मानल्या आणि त्यांच्या क्षेत्रीय वितरणावर सांस्कृतिक-भौगालिक प्रदेश आधारले, तर खरोखरीच त्या एककांचा प्रत्यक्ष पूर्णवस्तू म्हणूनच अभ्यास करावा लागेल, असा व्योर्नरने निर्देश केलेला आहे. म्हणूनच, हार्टशॉर्न आणि डिकेन यांनी ग्रामीण भागांतील संख्यात्मक तपशीलांवरून तयार केलेली व स्पष्टीकरणासाठी " सरासरी शेतमळा " ही अमूर्त कल्पना भूगोलाभ्यासकांचे खरे समाधान करू शकत नाही (३२४). तथापि, बऱ्याच प्रमाणात सजातीय असलेल्या ग्रामीण क्षेत्रातील सर्वसामान्य शेतमळ्याशी (म्हणजेच, ज्यातील घटक-जटिल संबंधित बहुसंख्य शेतमळ्यांतून आढळतो अशा शेतमळ्याशी) हा सरासरी शेतमळा जवळजवळ सुसंगत असल्याचे दिसेल असे गृहीत धरण्यास हरकत नाही. त्या लेखकांनी मात्र या गृहीत प्रमेयाचे कोणतेच प्रात्यक्षिक दाखविण्याचा प्रयत्न केलेला नाही. शिवाय, काही प्रमाणात तरी वस्तुस्थिती तशी नाही याचीही आपल्याला जाणीव आहे. सर्व सामान्य शेतात विविध, विशिष्ट पिके अल्प प्रमाणातही दिसत नाहीत, असे " सरासरी शेत " प्रकाराच्या आराखड्यांवरून सूचित होते. अपवादात्मक शेतात जी प्रमुख पिके म्हणून आढळतात, त्यांचा सामान्य शेतांतून संपूर्ण अभाव असतो. तसेच, सरासरी शेताचे आकारमान आणि त्याची राई, चराऊ रान व पिकाखालील जमीन ही डिकेनच्या आराखड्याने सुचविलेली विभागणी सामान्य शेताचे यथातथ्य चित्र आपल्यापुढे उभे करतेच, असे म्हणता येणार नाही.

ज्याला आपण पूर्ण वस्तू असे म्हणतो अशा सुसंघटित व बंदिस्त एककांतील घटक-जटिल समजून घ्यावयाचे झाले, तर आपल्याला वेगवेगळ्या बाबींचा अभ्यास करणे भाग पडेल. म्हणजेच ते घटक-जटिल स्वतंत्र जटिल व ती संपूर्ण परिस्थिती एक संपूर्ण वस्तू या दृष्टीने अभ्यासावी लागेल. येथे कोणाचा गैरसमज होऊ नये म्हणून (फ्रयोबेलचा रिटरबद्दल झाला होता तसा), आम्हाला अशी एक पुस्ती जोडून टाकावीशी वाटते की, एक पूर्ण वस्तू या नात्याने एखाद्या एककाचा अभ्यास करावयाचा असल्यास, त्यात त्या अभ्यासविषयाच्या विश्लेषणाबरोबरच संश्लेषणाचाही समावेश असणे आवश्यक आहे (वेगवेगळी पिके, जनावरे, उत्पादन पद्धती व उपभोग पद्धती इ. सारख्या) ज्या घटकांचे विश्लेषण करावयाचे असते त्यांचा अभ्यास जागतिक वा प्रादेशिक, वा ग्रामीण विभागीय पातळीवर करावयाचा नसून तो तेवढ्या त्या एकक मळ्यापुरताच

करावयाचा असतो. एक पूर्ण एकक या नात्याने, त्या शेतातील अशा घटकांचे त्या एकूण शेताशी असलेले संबंध प्रस्थापित करणे आगत्याचे आहे. हे काही गूढ आहे, असे नाही. आपण फक्त शास्त्रीय पद्धतीने त्या त्या शेतकऱ्याच्या विचारधारेचा मागोवा घेत जाऊ या. त्याला प्रतिवर्षी यातील सर्व घटकांचे पूर्ण वस्तूरूपाने संघटन करावेच लागते. एक संपूर्ण वस्तू या नात्याने ते एकक समजून घेण्यासाठीच या दृष्टिकोणाची व या पद्धतीची आवश्यकता असते असे नाही तर, त्या घटक जटिलातील प्रत्येक अंगाचे, म्हणजेच प्रत्येक घटकाच्या महत्त्वाचे, आकलन होण्यासाठीही त्यांची गरज असते. मानसशास्त्राच्या क्षेत्रातून आपल्या शास्त्रावर टीका करणारा एक टीकाकार ब्योर्नर याने " पूर्ण वस्तू " या संकल्पनेचा भूगोलात करण्यात आलेले सदुपयोग व दुरूपयोग या विषयाचे उद्‌बोधक परीक्षण करून एक निष्कर्ष काढला आहे. ' पूर्ण वस्तू ' या संकल्पनेशी भूगोलाचा फारच थोड्याबाबतीत संबंध येत असतो. तरीही, त्याचा आढळ शेतमळ्यासारख्या मानव निर्मित संपूर्ण एकक कार्यात होतो. अशा बाबतीत, त्या एकूण जटिलातील वेगवेगळ्या कारकांचे अचूक मूल्यमापन त्यांचे त्या जटिलातील स्थान लक्षात घेऊनच करणे शक्य होईल (२७४, ३४६ f).

सांस्कृतिक-भौगोलिक घटनांच्या अर्थसंशोधनातला हा आवश्यक टप्पा या जागतिक क्रमबंधांची रचना करणाऱ्या लेखकांनी घेतलाच नाही. यदाकदाचित जागतिक अभ्यासासाठी आवश्यक असलेल्या सर्व प्रकारांचा असा अभ्यास करावयाचे सायास घ्यावयाचे त्यांनी ठरवले असतेच, तर त्यावरून जगाचा नकाशा तयार करण्याच्या कार्याची नुसती सुरुवात करणेही त्यांना या जन्मी अशक्य झाले असते, ही गोष्ट उघड आहे. पण त्यांच्या हाती–असलेल्या निकालावरून पहाता, अशा प्रकारच्या अभ्यासांच्या गरजेचेच केवळ निर्देशन होते असे नाही तर, अशा अभ्यासांतून अपेक्षित निर्णय हाती येण्याच्या दृष्टीने तसे अभ्यास आवश्यकच आहेत, असे माझे मत झाले आहे. तसेच, जमीन वापराची सर्वसामान्य अथवा नमुनेदार एकके कोठे व कशी शोधावयाची, या अवघड प्रश्नाचे उत्तर संख्यात्मक भौगोलिक पद्धतीचा वेलिंग्टन जोन्सने केलेल्या विकासामुळे, निदान अंशतः हाती येते. सापेक्षतः सजातीय लक्षणे असलेली शेते असणारे प्रदेश कोठे सापडतील, तसेच अपवादात्मक अथवा मिश्रस्वरूपाची शेते कोठे सापडतील या गोष्टी, पायाभूत संख्यात्मक तपशीलांतून केलेले व शक्य तितके तपशील दाखविणारे विविध प्रकारचे घटक-समसंख्यादर्शक रेषांचे नकाशे उघड करून दाखवतात. शेवटी, एखाद्या ग्रामीण प्रदेशासाठी देण्यात आलेल्या सरासरी संख्यांवरून सर्वसामान्य शेतमळ्याचे अचूक चित्र उभे करता येत नसले तरी, शेतांची कोणती लक्षणे सर्वसामान्य शेतात असण्याचा संभव आहे याचे ठोकमानाने निदर्शन त्यांवरून होण्यास हरकत नाही, आणि अपवादात्मक असलेली शेते असामान्य म्हणून निश्चितपणे वगळली जावयास हरकत नाही.

ज्या क्षेत्रात बृहद्दर्शी दृष्टिकोण सातत्याने राखला जाणे जरूरीचे आहे, त्याच क्षेत्रासाठी केल्या जात असलेल्या या अतिसूक्ष्मदर्शी अभ्यासांच्या सूचनेविरुद्ध आक्षेपांचा गदारोळ उठविला जाईल यात काय संशय ! पण, अशा अवमानकारक शब्दांच्या माऱ्यांनी आपण घाबरून थोडेच जाणार आहोत ! संपूर्ण हिमनदीच्या गतीचा विचार करणाऱ्या भूशास्त्रज्ञाने एका हिमकणाच्या गतीचा दुसऱ्या हिमकणाच्या गतीशी असलेल्या संबंधाचा अभ्यास करण्याचे सायास घेतले, तर त्याच्यावर कोणी टीका करण्याच्या फंदात पडत नाही. प्रातिनिधिक लोकशासनाचा अभ्यास करण्याची प्रतिज्ञा केलेल्या इतिहासकाराने दहा वर्षांपेक्षाही लहान कालखंडात झालेल्या केवळ हाऊस ऑफ कॉमन्स (ब्रिटिश विधानसभा) मध्ये झालेल्या चर्चांसाठी एक भला मोठा ग्रंथ खर्ची घातला तरी कोणी हरकत घेत नाही. येथे एक गोष्ट सांगणे आवश्यक आहे, नव्हे त्याचा आग्रह धरला पाहिजे की, तो अभ्यासक सूक्ष्मदर्शी अभ्यास करत असो, अथवा अतिसूक्ष्मदर्शी अभ्यास करत असो, त्याच्या बरोबरीने त्याने आपला मूळ बृहद्दर्शी दृष्टिकोण स्थिर ठेवला पाहिजे. म्हणजेच, कोणी भूगोलाभ्यासक याझू मुखप्रदेशातील एकाच कपाशी शेताचा अभ्यास करत असला तरी, याझू मुखप्रदेशाचे अथवा सर्वसामान्यपणे कपाशीपट्ट्याचे आकलन होण्याच्या दृष्टिने त्याचे महत्त्व असेल तेवढ्यापुरतीच भूगोला शास्त्राला त्या शेताबद्दल अभिरूची असते, या तत्त्वाचे त्या अभ्यासकाने विस्मरण होऊ देता कामा नये. या दृष्टिकोणातून पहाता, त्या अभ्यासकाने त्या शेतमळ्याच्या संबंधीच्या अनेक तपशीलांकडे, ते अप्रातिनिधिक आहेत अथवा किमान महत्त्वाचे आहेत अशा सबबींवर, दुर्लक्ष करण्यास मुळीच हरकत नाही. याझू मुखप्रदेशातील जमीनवापराचे आकलन होण्यासाठी मात्र कापूस, मका, गाळमृत्तिका इत्यादी गोष्टीसंबंधीची वस्तुस्थिती माहित होणे आवश्यक असते, आणि ती आता उपलब्धही आहे. पण, त्यापेक्षा अधिक काही माहिती असणे आवश्यक होते. अर्थातच, या सर्व कारकांच्या अन्योन्य संबंधांची आणि त्या कारकांच्या जमीनवापराच्या त्या बंदिस्त एककाशी, म्हणजेच एकेका ' सर्वसामान्य ' शेताशी, असलेल्या संबंधांची माहिती करून घेणे आवश्यक होते.

सांस्कृतिक घटक जटिलांवर आधारित जागतिक विभागणीसाठी रचलेल्या प्रादेशिक क्रमबंधांच्या या संपूर्ण चर्चेत आम्ही एक प्रश्न वारंवार उपस्थित करत आलो आहोत, आणि त्या प्रश्नाचे उत्तर देणे आगत्याचे आहे. क्रमबंध केवळ सांस्कृतिक रूपधेयांवर आधारलेला असो की, कोणत्याही भूदृश्यावरणातील सांस्कृतिक व नैसर्गिक अशा दोनही स्वरूपाच्या प्रत्यक्ष रूपधेयांवर आधारलेला असो ! अशा प्रकारच्या क्रमबंधातून, एकाच क्षेत्रातील नैसर्गिक रूपधेयांबरोबरच सांस्कृतिक रूपधेयांनाही ती लावून पहाता येईल अशी एखादी भक्कम संदर्भ चौकट मिळू शकेल का ? मूलतः सांस्कृतिक घटकांवर आधारलेला अशा प्रकारचा क्रमबंध, जेव्हा नैसर्गिक घटकांच्या जटिलांनाही लागू करण्याचा प्रयत्न केला जाईल, तेव्हा दुर्लभ्य अडचणींचा डोंगर तर आपल्या पुढे उभा रहाणार नाही ना ? काही जणांनी सूचित केल्याप्रमाणे, या दिशेने ही तुलना करण्याच्या नादात एक तर्कसिद्ध कार्यपद्धती उलटी फिरविण्याच्या प्रयत्नात अडकून पडल्यासारखे होणार नाही ना ?

प्रथम एक गोष्ट नमूद करणे जरूर आहे की, या तुलनेला ' सांस्कृतिक प्रदेशांचा नैसर्गिक प्रदेशांशी संबंध ' असे नाव देता येणार नाही. या दोन्हींपैकी कोणत्याही बाबतीत प्रदेश निश्चित करताना मानवी जीवनाच्या दृष्टीने त्याची महत्ता हा मानदंड म्हणून वापरावा लागेल. ' सांस्कृतिक प्रदेश ' मान्य करताना यामुळे कोणतीच अडचण येणार नसली तरी, कोणत्याही शब्दार्थाने नैसर्गिक या संज्ञेचा विचार करत असता, या तुलनेसाठी ' नैसर्गिक प्रदेश ' या संकल्पनेला अजीबातच फाटा द्यावा लागेल. परिणामी, या उलट्या कार्यपद्धतीचा अवलंब करूनही, नकळत पर्यावरणवादी भूमिका मान्य करण्याचा धोका रहात नाही. सॉरने आपल्याला याबाबतीत अशी सूचना देऊन ठेवली आहे की, तसे करताना नैसर्गिक प्रदेशांची सांस्कृतिक प्रदेशांशी एकरूपता सिद्ध करण्याच्या प्रयत्नांच्या मार्गाने जावे लागण्याची शक्यता असते–व शेवटी त्याच मार्गाने जाणे भागही पडते-हे मागेच आपल्या निदर्शनास आलेले आहे (८४, १९१).

आपण जेव्हा सांस्कृतिक-भौगोलिक प्रदेशांची तुलना वेगवेगळ्या नैसर्गिक घटकाधारित प्रदेशांशी करू पहातो, तेव्हा परिस्थिती तरी कोणती उद्‌भवते ? या सांस्कृतिक भौगोलिक प्रदेशांच्या क्रमबंधांपैकी प्रत्येक क्रमबंध बहुसंख्य सांस्कृतिक रूपधेयांवर अवलंबून असतो, पण या रूपधेयांपैकी कोणतेही एक रूपधेय कोणत्याही एका नैसर्गिक घटकांवर अवलंबून नसते ; उलट प्रत्येक रूपधेय अंशतः अनेक नैसर्गिक घटकांवर अवलंबून असते, आणि या सांस्कृतिक रूपधेयांपैकी प्रत्येकाची अवलंबन पद्धती व अवलंबन प्रमाण ही भिन्न असतात. परिणामी, एका सांस्कृतिक प्रदेशात उपस्थित असलेल्या सर्व सांस्कृतिक रूपधेयांची गोळाबेरीज केली तर, त्यात, आणि कोणत्याही एका नैसर्गिक घटकांवर अथवा त्यांच्या कोणत्यातरी संयोगांवर आधारित प्रादेशिक वर्गवारीत, एवढी तफावत दिसू लागते की, या दोहोत कोणत्याच प्रकारचा पूर्ण संबंधयोग असू शकेल असे गृहीत धरण्याचा मोह होणारच नाही. व्हिटल्से अथवा हार्टशॉर्न व डिकेन यांनी तयार केलेले सांस्कृतिक प्रदेशांचे नकाशे समोर ठेवले व हवामान, जमिनीचा चढउतार, मृत्तिका इत्यादींच्या जागतिक नकाशांशी त्यांची तुलना केली तर, कोणत्याही एका सांस्कृतिक क्षेत्रप्रकाराचे स्पष्टीकरण करताना सर्वच नैसर्गिक घटक विचारात घेणे भाग पडेल. आणि इतका विचार करूनही त्यांचे पूर्णपणे स्पष्टीकरण देता येणारच नाही. उत्तर अमेरिकेचे प्रदेश व चीनचे प्रदेश यांच्यातील मौलिक भेदच, एकादमात, सांस्कृतिक कारकांचा विचार होणे आवश्यक असल्याची मागणी करतील.

पण, असाही आक्षेप घेण्यात आलेला आहे की, ही कार्यपद्धती म्हणजे तर्कनिष्ठ क्रमाचा व्युत्क्रम आहे. " ही भूदृश्ये निर्माण कशी झाली याची माहिती करून घेण्यापूर्वीच, मानवनिर्मित भूदृश्याचे वर्णन करणे म्हणजे घोड्याला गाडी जुंपण्याचा प्रकार होईल. म्हणूनच, त्याला आधारभूत असलेल्या प्राकृतिक भूगोलाचा भक्कम पायाच प्रथम प्रस्थापित करावा लागतो. अशावेळी, पृथ्वीच्या पाठीवर मानवी-सृष्टी नव्हतीच असे गृहीत धरून, निसर्गाने निर्माण केलेले असण्याची शक्यता आहे अशा, नैसर्गिक भूदृश्याची

सर्वसामान्यपणे पुनर्रचना करावयाची असते; अर्थात, त्यात जीव-सृष्टीचे कार्य सामावलेले असेलच." (८४, २०२. व्हॉलॉक्सचा विशिष्ट संदर्भ सॉरने दिलेला नाही.) *

सॉर व व्हॉलॉक्स यांनी प्रशस्ती केलेली ही पद्धती पुष्कळ भूगोलकारांनी वापरलेली आहे ; आणि ती निसर्गाच्या (आणि अतिव्यापकार्याने विश्वाच्याही) युक्तिवादाशी सुसंगत आहे. अर्थात, विश्वावर युक्तिवादाचा आरोप आपण करू शकतो, असे येथे गृहीत धरले आहे. पण शास्त्रांचा युक्तिवाद आणि निसर्गाचा युक्तिवाद एकच आहेत असे म्हणता येणार नाही. रेणूंचा शोध काही अणूंच्या अभ्यासावरून लावण्यात आलेला नाही, किंवा अणूच्या पोटात असलेल्या ऋणाणूंच्या व धनाणूंच्या परीक्षणाने अणूंचा शोध लावला गेलेला नाही. तसेच, आकाशस्थ यंत्रशास्त्राचा प्रथम अभ्यास करून, त्यावरून आकाश गोलांच्या गतींचा अभ्यास करण्यात आलेला नाही. परिस्थिती याच्या उलट होती असे म्हणणे योग्य ठरले ! एकदा का शास्त्रीय नियमावली प्रस्थापित झाली की, शास्त्रज्ञ त्याचा व्युत्क्रमाने सहज वापर करू शकतात, आणि अद्याप अज्ञात असलेल्या ग्रहांचा शोध लागू शकतो. भूगोलाला कधीकाळी ही अवस्था येणार असेल ती असो, आज तरी, भूगोलशास्त्र विकासाच्या त्या पदवीला पोहोचलेले आहे, असे सूचित करण्याचे कोणी धाडस करणार नाही.

पहिल्याच्या, म्हणजे " नैसर्गिक भूदृश्याच्या, "स्वरूपावरून दुसऱ्याचे, म्हणजे " सांस्कृतिक भूदृश्याचे " स्वरूप निश्चित केले जात असते, येवढे एकच आधारतत्त्व घेऊन भूगोलाभ्यासक तर्कशास्त्रानुसार आपल्याला पहिल्यावरून दुसऱ्याकडे गेले पाहिजे, असा युक्तिवाद करू शकले असते. हा विचार अधिक निर्दोष शास्त्रांशी भूगोलाचे साम्य असते असे गृहीत धरल्यामुळे सुचलेला असावा. ब्रोक अशी टीका करतो की, ही कार्यपद्धती म्हणजे " परिसराच्या नियंत्रणाच्या संकल्पनेचा तात्त्विक पुनरुच्चारच आहे." ब्रोकने या युक्तिवादातील दोषही दाखवून दिला आहे : नैसर्गिक घटक हे कोणत्याही प्रदेशाचे स्वरूप निश्चित करण्यासाठी आवश्यक असणारे गतिमान घटक नव्हेत आणि म्हणूनच प्रादेशिक वर्गीकरणासाठी वापरावयाचे योग्य ते निकषही नव्हेत (२९७, १०३, १०७).

पण, कालमानानुसार होणाऱ्या प्रत्यक्ष विकासक्रमाशी हेच सुसंगत आहे, या आणखी एका अर्थाने, नैसर्गिक पर्यावरणाकडून सांस्कृतिक रूपधेयांकडे जावयाचे ही कार्यपद्धतीच तर्कशुद्ध आहे, असे वाटण्याची शक्यता आहे. पण, शास्त्रांना ही तर्कपद्धती आवश्यक वाटत नाही. जेव्हा जीवशास्त्रज्ञ मानवाच्या विद्यमान शरीराच्या रचनेचा व कार्याचा अभ्यास करतात, तेव्हा प्रथम मानवाच्या उत्क्रांतीतील सर्व टप्प्यांचा संपूर्ण अभ्यास करण्याची त्यांना काहीच गरज भासत नाही. इतकेच काय, ज्यांना कालक्रमानुसार घटनाक्रमांचा अभ्यास करणे आवश्यक असते अशा इतिहासाभ्यासकांनाही इतिहासाचा अभ्यास कोणत्याही दिशेने

---

* हे विधान व्हॉलॉक्सच्या लिखाणाचा अनुवाद आहे असा भास होत असला तरी, प्रत्यक्षात ते व्हॉलॉक्सचे भाषांतर आहे (१८६, २००).

करता येतो हे कळून चुकले आहे. आधीच्या कालखंडांतील घटनांचे वारंवार परिशीलन केल्याशिवाय वर्तमान इतिहासाचे आकलन होणे अशक्यच आहे, हे खरे असले तरी, प्राचीन इतिहासाच्या आरंभकालाची पूर्णतया पुनर्रचना केल्याशिवाय आपल्याला वर्तमानकालीन इतिहासाचा अभ्यासच करता येणार नाही, असे मात्र कोणताच इतिहासकार मानत नाही.

जे ज्ञात आहे तेथून आरंभ करून, ज्यांचे खात्रीपूर्वक प्रात्यक्षिक करून पहाता येईल अशा मध्यगत घटनांमार्गे अज्ञातासंबंधीच्या निष्कर्षापर्यंत जाऊन पोहोचावयाचे, हेच शास्त्रांच्या युक्तिवादाचे सार आहे.

भूगोल क्षेत्रातील आमच्या ज्ञानाच्या मर्यादा तरी काय आहेत ? ज्यांच्या सहाय्याने आपले कार्य संपन्न व्हावयाचे आहे त्या पायाभूत वस्तुस्थिती आहेत तरी कोणत्या ? आणि त्यांच्या संबंधयोगांचे निश्चित ज्ञान आपल्याला किती आहे ? खात्रीपूर्वक सांगावयाचे तर, कोणत्याही प्रदेशाच्या काही नैसर्गिक घटकांसंबंधीच्या काही थोड्या बाबींची माहिती निश्चित आहे, पण काहींच्या बद्दल फारच त्रोटक माहिती आमच्या भांडारात आहे हे कबूलच केले पाहिजे, आणि त्यांचे समर्पक ज्ञान आपल्याला कधीच मिळण्याची शक्यता नाही. या विविध नैसर्गिक घटकांच्या संबंध योगांबद्दल आपल्याला काही बरीचशी खात्रीलायक माहिती आहे. पण पुष्कळसे अद्याप अज्ञाततच आहे. एका बाजूला नैसर्गिक घटक–मग त्यांचा व्यक्तिरूप असो की समष्टिरूप असो–आणि दुसऱ्या बाजूला वेगवेगळे सांस्कृतिक घटक या दोहोंच्या परस्पर संबंध योगांबद्दलचे आमचे ज्ञान अगदीच अनिश्चित स्वरूपाचे आहे. अशा स्थितीत ज्ञात व अज्ञात यांची सांगड घालण्याचा प्रयत्न करावयाचा–मग ती सांगड " नैसर्गिक पर्यावरण " म्हणून असो की " नैसर्गिक भूदृश्य " म्हणून असो की, आणखी काही नाव त्याला दिलेले असो–नंतर त्यावरून काही निष्कर्ष काढावयाचे, आणि शेवटी ज्यांच्या बद्दलचे आपले ज्ञान अगदी मर्यादित आहे अशा संबंध योगांचा आधार घेऊन, आपल्याला आधीच ज्ञात आहेत अशा गोष्टीपर्यंत, म्हणजेच एखाद्या क्षेत्राच्या सांस्कृतिक रूपधेयांपर्यंत, येऊन पोहोचण्याची खटपट करावयाची ही कार्यपद्धती तर्कशास्त्राला तरी मान्य आहे का ? भूगोलशास्त्रातील प्राथमिक वस्तुस्थिती, म्हणजेच ज्या वस्तुस्थितींचा आपल्याला युक्तिवादासाठी आधार घेणे प्राप्त आहे अशा, कोणत्यातरी दुसऱ्याच क्षेत्रातील विद्यमान रूपधेये असतात. यात काही थोड्या नैसर्गिक घटकांचा–कारण काही आता अस्तित्वात नाहीत आणि असली तरी, बदललेल्या स्वरूपात आहेत–आणि त्याबरोबरच सर्व विद्यमान सांस्कृतिक घटकांचाही समावेश होतो.

वर ज्यांची रूपरेषा आलेली आहे त्या दोनही क्रमबंधांचा आरंभ ज्ञातापासूनच होतो. ज्यांच्या संबंधीच्या वस्तुस्थिती आपल्या हाताशी असतात अशा घटकांचे निरीक्षण व वर्गीकरण, आणि अशाच घटनांच्या घटक-जटिलांचे मापन व त्याची ओळख पटवणारी लक्षणे यानाच प्राधान्य दिले जाते. माझ्या मते, कोणत्याही शास्त्रीय कार्याचा " भक्कम पाया " यातूनच तयार होत असतो. येथे, भूतकालाचा वारसा म्हणून आपल्यापर्यंत

आलेल्या एका कुकल्पनेच्या पकडीतून सोडवून घेणे आवश्यक आहे. खडक, मृत्तिका किंवा हवामान यांच्या वस्तुस्थितींचे ज्ञान शास्त्रीय कार्यासाठी अधिक " भक्कम " असते, पण त्यामानाने, पिकासाठी वापरलेल्या बिय्यांची संख्या किंवा लोकसंख्या किंवा लोकभाषा यांच्यासंबंधींचे वस्तुस्थिती ज्ञान लेचेपेचे असते, असा समज आहे. भूगोलाभ्यासक सांस्कृतिक रूपधेयांच्या तुलनेने नैसर्गिक रूपधेयांचा विचार करताना जो पक्षपात करतात तो ती अधिक स्थिरस्वरूपाची असतात या कल्पनेवरच आधारलेला असतो, हे गृहीत आहे. असे करताना नैसर्गिक घटकांच्या स्थैर्याला फाजील महत्त्व देण्याकडे त्याचा कल असतो. कित्येक क्षेत्रांतून आज जे अस्तित्वातच नाही अशा एका रूपधेयावर, म्हणजेच नैसर्गिक वनस्पतींवर, आधारलेल्या एका ग्रंथात मानवाच्या वसाहतींचे वर्णन, " स्वाभाविक भूपृष्ठाच्या सापेक्षतः चिरजीवी असलेल्या पुरातन पार्श्वभूमीवर कोरलेल्या खुणा " अशा शब्दात केलेले वाचून आश्चर्याचा धक्काच बसतो (३२१, ४). " स्वाभाविक " हा आणखी एक असा शब्द आहे की, तो निरनिराळ्या भूगोलकारांनी निरनिराळ्या अर्थाने वापरलेला आहे. या विशिष्ट ठिकाणी त्याच्यात वनस्पतींचा समावेश केलेला नाही, असे असण्याची शक्यता आहे. आणि त्याअर्थाने ते विधान मान्य करण्यासही हरकत दिसत नाही. एखाद्या केंद्रीय शहराच्या (उदाहरणार्थ व्हिएन्नाचा) रस्त्यांचा आकृतिबंध गेल्या कित्येक शतकात जितका बदललेला नसेल, तितका बदल तेथील भूरूपे, मृत्तिका, आणि शेजारच्या पूरमैदानातील पाणी यात झालेला असण्याचा संभव आहे.

काही असो, आपल्या शास्त्रीय कार्याचा आधार म्हणून उपयोगी पडावे इतके पुरेसे खात्रीलायक ज्ञान कोणत्या वस्तुस्थितींबाबत आपल्याला आहे, या प्रश्नाच्या संदर्भात आपल्या समोर असलेल्या वस्तुस्थितींच्या टिकाऊपणाबद्दल वाद घालत बसणे हे असंबद्ध आहे. कोणत्याही क्षेत्राची विद्यमान रूपधेये तेवढी निरपवादपणे या प्रकारात मोडतात.

म्हणूनच, त्या " भूदृश्यांच्या " विद्यमान रूपधेयांपासून आरंभ करणाऱ्या कार्यपद्धतीची प्रशस्ती फींचने केलेली आहे. जरी ही प्रशस्ती त्याने खासकरून नागरी क्षेत्रांसाठी केलेली असली, तरी त्याचे हे विधान कोणत्याही सांस्कृतिक रूपधेयास लागू करता येण्यासारखे आहे. तो असा निष्कर्ष काढतो की, या कार्यपद्धतीत विषयाच्या ज्या अंगांबद्दल लेखक अधिकार वाणीने बोलू शकेल त्याच अंगाला, म्हणजेच विद्यमान नगराला, तो विषय चर्चेत अग्रहक्क देत असतो. यामुळेच, भूतकालासंबंधींच्या अनुमान संचाला तो त्यांचे न्याय्य स्थान देऊ शकतो ; कारण, कितीही कडक ऐतिहासिक पद्धतींचा वापर करून मांडलेली असली तरी, अनुमाने ती अनुमानेच रहातात. भूदृश्यांची नोंदविलेली निरीक्षणे फार मौलिक ठरण्याची शक्यता असते, पण, अनुमाने मात्र शून्य मोलाची ठरण्याची शक्यताच जास्त असते (२८८, ११८). हम्बोल्टने मेक्सिकोत केलेल्या कार्याचे मूल्यमापन करणाऱ्या सॉरचे विधान थोडेसे बदलून असे वाचता येईल ; " हंबोल्टने आपला तिकडील काळ, कोणत्याही इन्डियन संस्कृतीचा तिकडे विकास होण्यापूर्वीपासून अस्तित्वात असलेल्या, मूळ भूदृश्याची पुनर्रचना करण्यात

घालविला असता तर, त्याच्या तत्संबंधीच्या निर्णयांची किंमत आज शून्यच ठरली असती. पण, त्याला जे प्रत्यक्षात दिसले त्याचे वर्णन त्याने तपशीलवार करून ठेवले. त्याचे महत्त्व मात्र अनन्य साधारण, अविनाशी आहे (८४, १८५). अर्नोल्ड, गुयोत याच्या कार्याकडे याच कारणाने राल्फ ब्राऊन याने आपले लक्ष वेधले आहे. काही निसर्ग वर्णनांसंबंधींच्या उपपत्तींचे प्रात्यक्षिक करण्यासाठी गुयोतने काही अभ्यास केले. त्याने घातलेले मानव व पृथ्वी यांचे अन्योन्य संबंध दाखविणारी काही अंतिम हेतुवादी उपपत्ती जितकी आपल्या दृष्टीने शून्य किंमतीची ठरली तितकीच ही निसर्ग वर्णनविषयक उपपत्तीही शून्य किमतीची ठरली आहे. पण त्याच संदर्भात त्याचवेळी दक्षिण अप्पालेशियन् क्षेत्राच्या सांस्कृतिक रूपधेयांची त्यानेच करून ठेवलेली वर्णने मात्र ऐतिहासिक भूगोलाच्या विद्यार्थ्यांच्या दृष्टिने नित्य-मूल्याची होऊन राहिली आहेत (६५).

निरीक्षणाने सांस्कृतिक रूपधेयांसंबंधी ज्ञान मिळविणे जसे शक्य आहे, तसेच आणि तितकेच ज्ञान एखाद्या क्षेत्रातील नैसर्गिक घटकांसंबंधीही मिळविणे शक्य झाले असते, तरीही नैसर्गिक कारणांकडून सांस्कृतिक परिणामांकडे जाणारी कार्यपद्धती सुरक्षित ठरली नसती. कोणतेही विशिष्ट सांस्कृतिक रूपधेय हे एका कारकसंचाच्या गतकालीन विकासाचे प्रातिनिधिक रूप असते. या संचात बहुसंख्य नैसर्गिक घटकांचा समावेश असतो येवढेच नव्हे तर, ज्यांच्यापैकी काहीबद्दल कोणतीच माहिती मिळण्याची आशा नाही अशा पुष्कळशा मानवी घटकांचाही त्यातच समावेश असतो. या जटिलात भूमीचे स्वरूप हा घटक दुय्यम दर्जाचा असून, मानव हाच खरा निर्णायक व सृजनशील कारक असतो, असे श्ल्यूटर म्हणतो (१४८, २१४ : c/o वेबेल २६६, २०३ f ; ब्रोक २९७, १०७ f). या अत्यंत गुंतागुंतींच्या घटनांचा अन्वयार्थ लावण्यासाठी लागणारा शास्त्रीय तत्त्वांचा समर्पक संच आपल्या हाती अद्याप आलेला नाही. संबंधी नैसर्गिक अथवा मानवी कारकांपासून आरंभ करून, सत्यस्थितीत त्यांचे कार्य ज्या पद्धतीने झाले त्या पद्धतीने त्यांची जुळणी करून, त्यांतून एकच एक सांस्कृतिक रूपधेय निर्माण करण्याचा प्रयत्न करावा अशा अवस्थेला आम्हीच अद्याप पोहोचलेलो नाही. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर, विद्यमान, ज्ञात आणि तयार वस्तुस्थितीपासून सुरुवात करून, आपल्याला शक्य होईल त्याप्रकारे गतकालीन कार्याचा अभ्यास करत त्यांच्या मूळकारणाशी जाऊन पोहोचावयाचे व अशा रीतीने एखाद्या सांस्कृतिक रूपधेयाच्या विकासक्रमाचे विश्लेषण करावयाचे ; एवढे करण्याच्या अवस्थेतच आपण आज आहोत. इतर अनेक शास्त्रांना आता शक्य झाले आहे त्या प्रमाणे, आपणही या पद्धतीच्या उलटक्रमाने कार्यकरण्याच्या अवस्थेला कधीकाळी पोहोचू अगर नाही, या गोष्टीची चर्चा करत बसण्याची या ठिकाणी गरज नाही. कोणत्याही परिस्थितीत, अन्य शास्त्रांनी संपादन केलेल्या यशाशी स्पर्धा करण्याची केवळ इच्छा बाळगल्याने त्यांच्या पद्धतींचा अवलंब करण्यासाठी असलेला ज्ञानसंचय आपल्याजवळ निर्माण होण्याची शक्यता नाही.

मानवी समस्यांचा अभ्यास करणाऱ्या अन्य शास्त्रांनी हा दृष्टिकोण स्वयंसिद्ध असल्याची मान्यता दिलेली आहे, आणि याची दखल हेटनरने १९०७ मध्येच घेतली आहे (१३०, ११४). पण, या घड्याळांच्या यंत्रणेचा अभ्यास न करता, आणि त्याच्या सर्व भागांचे ज्ञान पुरेसे न मिळविताच, आधी घड्याळाचे भाग सुटे करून ठेवले, आणि आता ते जुळवण्याचा प्रयत्न चालू आहे ; असला हा खटाटोप फक्त भूगोलाभ्यासकांनीच चालविला आहे (तसेच हेटनर व बॅरोज यांच्या ग्रंथातील अवतरणासाठी प्रकरण ३. क. पहा).[१७]

कोणत्याही क्षेत्राच्या सांस्कृतिक रूपधेयांच्या अभ्यासाचा आरंभ सांस्कृतिक रूपधेयांपासूनच झाला पाहिजे असा आग्रह धरणे, याचा अर्थ, कोणत्याही प्रदेशाच्या भूगोलाच्या सामान्य अभ्यासाची सुरुवातही सांस्कृतिक रूपधेयांपासूनच झाली पाहिजे असा आग्रह धरणे, असा होत नाही. प्रदेशाच्या मर्यादा निश्चित करण्याचा प्रश्न अनिर्णित आहे हे गृहीत धरले तर, शास्त्राची एकच सक्तीची अट शिल्लक राहते. प्रत्येकाने उपलब्ध वस्तुस्थितीपासून प्रारंभ करणेच आवश्यक आहे. फिंचने मोठ्या जोमाने प्रतिपादन केले आहे त्याप्रमाणे पहाता, उपलब्ध वस्तुस्थिती म्हणजे त्या क्षेत्राची प्रत्यक्ष विद्यमान रूपधेये असली पाहिजेत ; मग, ती नैसर्गिक आहेत का सांस्कृतिक आहेत, याची चिंता करण्याची जरूरी नाही (२८८, ११५ ff). निरनिराळ्या प्रकारांच्या " भूदृश्यांसाठी " तो चार वेगवेगळे साचे सांगत असला तरी, प्रत्येकाची सुरुवात " विद्यमान भूदृश्यापासूनच " झाली पाहिजे या सामान्य नियमाच्या चौकटीत ते सर्वच साचे बसण्यासारखे आहेत (१२१). नैसर्गिक रूपधेयांचा अर्थ लावण्याचे काम केवळ अमानव कारकांवरच आधारलेले असले पाहिजे, असा त्याच्या व्याख्येचा रोख दिसतो. मानवाने ज्याच्यावर जवळजवळ कोणतेच संस्कार केलेले दिसत नाहीत अशा क्षेत्राचा अभ्यास त्यांतील नैसर्गिक रूपधेयांच्या विचारांपासून सुरू व्हावा हे संयुक्तिक आहे ; आणि एवढाच त्या व्याख्येचा परिमाण होणार आहे. पण, अशा क्षेत्रांतही सांस्कृतिक रूपधेयांचा विचार करण्याचा प्रश्न उद्‌भवेल, तेव्हा तो भक्कम पायावर व्हावयास पाहिजे असेल तर, त्या विचाराची सुरुवात सांस्कृतिक रूपधेयांच्या निरीक्षणांपासूनच होणे आवश्यक आहे.

---

१७. अनुसंधान कार्यासाठी सांस्कृतिक रूपधेयांचा अभ्यास कसा करावयाचा असतो या प्रश्नासंबंधीच्या हेटनरच्या मतांत कोणतीही अनिश्चितता नाही. तरीही त्याने उत्पत्तिनिष्ठ पद्धतीबद्दल आग्रह धरल्यामुळे त्याच्या प्रतिपादनाच्या कार्यपद्धतीला, आणि प्रादेशिक क्रमबंधाच्या रचनेलाही उलटी दिशा मिळाली (प्रकरण १०. ड. पहा). या दुसऱ्या बाबतीतील त्याचा युक्तिवाद विशिष्ट प्रदेशांच्या सत्यस्थितीदर्शक क्रमबंधाच्या संदर्भात केलेला होता. म्हणूनच, तो आपल्या क्षेत्रप्रकारांच्या तौलनिक क्रमबंधाच्या या प्रस्तुत विचारांना लागू पडत नाही.

पण, अगदी स्वैरपणे ज्यांच्या मर्यादा ठरवून देता येतील अशा क्षेत्रांच्या स्वतंत्र अभ्यासांशी आपला येथे संबंध नाही तर, ज्याचा उपयोग भौगोलिक कार्याचा प्राथमिक पाया म्हणून व्हावयाचा असतो, अशा संपूर्ण जगाच्या प्रादेशिक विभागणीच्या क्रमबंधाशी आपला संबंध आहे. आपल्याला असेही दिसून आले आहे की, तर्कशुद्ध आणि व्यवहारशुद्ध अशा दोनही बाजूंनी विचार करता, अशा प्रकारचा क्रमबंध कोणत्यातरी एकाच घटक जटिलावर अथवा घटक संश्लेषणावर आधारलेला असणे आवश्यक आहे. मात्र, त्यांच्या बदलत्या रूपांचे आविष्कार त्या क्षेत्रात दिसत असले पाहिजेत. सर्व भौगोलिक रूपधेयांचा ज्यात समावेश होईल अशा प्रकारचे संश्लेषण कार्य निसर्ग अथवा मानव यांपैकी कोणीच करू शकणार नाही. म्हणूनच, सर्व भौगोलिक रूपधेयांचा ज्यात अंतर्भाव करता येईल अशा प्रादेशिक विभागणीचा एकमेव क्रमबंध रचता येणे शक्यच नाही. वेगवेगळ्या घटकांवर अथवा वेगवेगळ्या घटक जटिलांवर आधारित असे शक्य होतील तितके क्रमबंध प्रस्थापित करणे व मग त्यांची परस्पराशी तुलना करणे एवढेच आपल्याला करणे शक्य आहे. आपण हे सर्व एकमेकांवर ठेवू शकलो, तर तो एकूण प्रकार विद्यमान जगाच्या भूगोलाचे एक प्रातिनिधिक रूप होईल. तरीही, त्यामुळे निश्चित स्वरूपाचे प्रदेशही प्रस्थापित होत नाहीत किंवा निश्चित स्वरूपाचे क्षेत्र प्रकारही प्रस्थापित होत नाहीत. मात्र, विशिष्ट क्षेत्रांत प्रत्यक्ष अस्तित्वात असलेले फरक निदर्शनाला येतील.

प्रत्यक्ष भूदृश्यावरणावर आधारलेल्या क्षेत्रप्रकारात केलेली जागतिक विभागणी काही विशिष्ट हेतू सिद्ध होण्याच्या दृष्टीने अत्यंत उपयुक्त ठरण्याची शक्यता आहे. पण जमिनीचा वापर अधिक उत्पादनक्षम होण्यासाठी मानवाने केलेल्या बहुसंख्य सांस्कृतिक रूपधेयांच्या संकलनावर आधारलेल्या जागतिक विभागणीत विविध रूपधेये जास्तीत जास्त संख्येने उपस्थित असतात.

## ह–सारांश

भौगोलिक रूपधेयांच्या परिभाषेत बोलावयाचे झाले तर, भूपृष्ठ–म्हणजेच जग–हे काही स्पष्टपणे वेगवेगळ्या प्रादेशिक भागात विभागलेले नाही. तरीही, भूगोलाच्या मूलभूत कार्याच्या सिद्धीसाठी–म्हणजेच भिन्नभिन्न क्षेत्रांतील भेदांचे आकलन करून घेण्यासाठी, भूगोलाभ्यासकाला जगाची प्रादेशिक भागात विभागणी, नाइलाजाने स्वेच्छेनेच, करणे आवश्यक होते. कोणत्याही शास्त्राचे एक सामान्य तत्त्व असते की, त्याच्यातील सामग्री तुकड्या तुकड्यांनी विखरूप पडलेली असता कामा नये तर, ती ज्ञानाच्या तर्कशुद्ध क्रमबंधाच्या रूपाने संघटित केलेली असली पाहिजे.

भूगोलकार ज्यांचा अभ्यास करत असतात ती जगाची क्षेत्रे एक अथवा दोन प्रकारांनी तर्कशुद्ध क्रमबंधांच्या स्वरूपात संघटित करता येण्यासारखी आहेत. पहिल्या प्रकारात, क्षेत्रे जशी भूपृष्ठावर मांडलेली असतील त्या स्थितीतच त्या विशिष्ट प्रदेशांना मान्यता देऊन

त्यांचा एकच एक क्रमबंध रचलेला असतो. दुसऱ्या प्रकारात, अनेक क्रमबंधांचा एक संच असतो. भूपृष्ठावरील क्षेत्रांची प्रत्यक्ष मांडणी विचारात न घेता, वेगवेगळ्या रूपधेयांवरून किंवा घटक जटिलांवरून निश्चित केलेल्या प्रकारानुसार जगाच्या एकूण क्षेत्राचे वर्गीकरण त्या संचातील प्रत्येक क्रमबंधात केलेले असते.

विशिष्ट प्रदेशांना त्यांच्या प्रत्यक्ष स्थानिक मांडणीनुसार मान्यता देणारा एकच सत्यस्थितीनिष्ठ क्रमबंध आहे आणि फक्त त्यातच सर्व प्रादेशिक ज्ञान एकाच क्रमबंधाच्या रूपाने संघटित करता येते. तसेच, संपूर्ण प्रादेशिक भूगोलाला आवश्यक असणारा क्रमबंध त्यातूनच मिळू शकतो. भूगोलाभ्यासक ज्यांचा अभ्यास करत असतो अशा प्रकारचा विशिष्ट प्रदेशांचा क्रमबंध निसर्गात नसतो.–तो निसर्गाच्या जगात नसतो, तसाच तो निसर्ग व मानव या दोघांनी मिळून साकार केलेल्या या प्रत्यक्ष जगातही तो नसतो. इतकेच काय, वर्तमान परिस्थितीचे आपल्याला जे भौगोलिक ज्ञान आहे ते ज्ञान त्या क्रमबंधाची प्रमुख रेषा कशी आखावी याची खात्री अल्प प्रमाणात देण्यासही असमर्थ आहे. आपापल्या विकासक्रमातून स्वतंत्र क्षेत्रे म्हणून, अथवा क्षेत्रप्रकार म्हणूनही, हे वेगवेगळे प्रदेश एकमेकापासून विभक्त झालेले असत नाहीत. उलट, त्या क्षेत्राच्या प्रत्येक विशिष्ट लक्षणाचा होत असलेला विकास हा त्याच घटकाच्या अन्यत्र होत असलेल्या विकासाचा एक भागच असतो. भूगोलक्षेत्रातील वर्तमान ज्ञानभंडारातून, ज्याची सामान्य रूपरेषा सहज वेगळी दाखवता येईल असा प्रादेशिक वर्गीकरणाचा एखादा सोपासा क्रमबंध निर्माण होऊ शकला नाही, याला कारण निसर्गाची ही कार्य पद्धतीच आहे. उलटपक्षी, विशिष्ट प्रदेशांचा एखादा भक्कम क्रमबंध रचावयाचा झाल्यास, त्यासाठी जास्तीत जास्त अनुसंधानकार्य करावे लागेल. इतकेच नव्हे तर, ज्ञानात अधिकाधिक भर पडत जाईल तसे तसे अशा क्रमबंधात फेरबदल, अगदी गंभीरस्वरूपाचे फेरबदलही, करावे लागतील. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर, या दुसऱ्या प्रकारचा क्रमबंध हा, ज्यातून अधिक ज्ञानाचा शोध घेता येईल अशी, एक मूलभूत संदर्भचौकट नसून आपल्या प्रादेशिक ज्ञानाच्या अंतिम संघटनेचे ते प्रतिबिंबच आहे. तरीही, तो एक तर्कनिष्ठ क्रमबंध असल्यामुळे कोणत्याही काळात त्याच्या सहाय्याने त्या त्या प्रदेशाचे वर्तमान ज्ञान सादर करणे शक्य होणार आहे.

हा विशिष्ट प्रदेशांचा तर्कनिष्ठ क्रमबंध कोणत्याही एका तत्त्वाच्या पायावर उभा करता येत नाही. त्यासाठी सर्व भौगोलिक रूपधेये विचारात घ्यावीच लागतात. पोटविभागणीची कोणतीही पातळी निश्चित करत असताना, त्या क्षेत्राची लक्षणे निश्चित करण्याचे कामी जी सर्वात महत्त्वाची असल्याचे दिसून येते अशा रूपधेयांचीच त्याला निवड करावी लागते–अर्थातच हे महत्त्वमापन मानवाच्या हितसंबंधाच्या भाषेतच करावयाचे असते. ज्या घटकातील फरकांच्या परिणामाने अन्य रूपधेयात फरक होऊ शकतात, अशा घटकाला अर्थातच महत्त्व प्राप्त होते. या महत्त्व-

मापनाचा पाया जसा त्या स्वतः रूपधेयात असतो तसा तो त्या दुसऱ्या रूपधेयांवरही असतो. विचारासाठी घ्यावयाच्या या रूपधेयांची संख्या, अगदी तात्त्विक दृष्टीनेही, तीनपेक्षा कमी करता येत नाही ; कदाचित ती सहापेक्षा कमी करणेही शक्य होणार नाही. प्रत्यक्ष परिपाठात तर आणखी कितीतरी गोष्टींचा स्वतंत्रपणे विचार करणे आवश्यक असल्याचे दिसून येते. कारण त्यांच्या कार्यकारण-संबंधांचा मागोवा घेता-येण्याचीही आशा नसते. या सर्वाचा परिणाम म्हणून उत्पत्तितत्त्व अत्यावश्यकच आहे असे सुस्पष्टपणे म्हणता येत नाही.

विशिष्ट प्रदेशांच्या विभागणीचे क्रमबंध अनेकानेक भूगोलकारांनी रचलेले असले, निदान विशिष्ट खंडांपुरते तरी ते खरेच आहे, तरी त्यापैकी फारच थोड्यांनी एखाद्या समर्थ प्रादेशिक विभागणीस आवश्यक असणाऱ्या तत्त्वांचा अभ्यास करण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. आणि अशा कोणत्याही तत्त्वसंचांच्या आधारे विकसित करण्यात आलेल्या विविध प्रादेशिक क्रमबंधांचे परीक्षण करण्याचा प्रयत्न तर जवळजवळ कोणीच केलेला दिसला नाही. पण, अशाप्रकारच्या क्रमबंधांच्या औपपत्तिक अटींची चिकित्सा हेटनरने केलेली आहे, आणि त्यानेच जगाच्या सर्व प्रदेशांना लागू पडेल अशा एका क्रमबंधाच्या प्रत्यक्ष रचनेचे प्रात्यक्षिक करून दाखविले आहे.

प्रदेशांच्या विशिष्ट रूपांनी निश्चित केलेल्या त्यांच्या लक्षणानुसार क्षेत्रांचे वर्गीकरण करणारे क्रमबंध हे जगासंबंधीचे एकूण प्रादेशिक ज्ञान संघटित करणारी एक मूलतः वेगळी पद्धत सादर करतात. क्षेत्रांच्या एकूण स्वरूपाचा विचार करू लागलो तर त्यांचे वर्गीकरण तर्कशुद्ध पद्धतीने होऊच शकत नाही. या एकूण स्वरूपात स्वतंत्रपणे बदलत जाणाऱ्या पुष्कळ बाबी असल्यामुळे, एकाच्या आधाराने निश्चित केलेले प्रदेश दुसऱ्याच्या आधाराने निश्चित केलेल्या प्रदेशांशी सुसंगत नसतात.

प्रकारांवरून क्षेत्रांचे वर्गीकरण करणारा भक्कम तर्कशुद्ध क्रमबंध कोणत्यातरी एकाच घटकावर किंवा घटकजटिलावर आधारणे भाग पडते. म्हणूनच भूगोलात महत्त्व प्राप्त झालेल्या कोणत्याही एका नैसर्गिक अथवा सांस्कृतिक घटकानुसार जगातील प्रदेशांचे प्रमुख विभाग व गौण विभाग असे वर्गीकरण करण्यास हरकत नाही. तापमान, पर्जन्यमान, भूरूपे, मृत्तिका, गृहरचना प्रकार, धर्म किंवा भाषा यांचे प्रकार दाखविणारे जगाचे नकाशे या पद्धतीत मोडतात. नैसर्गिक वनस्पतींच्या अथवा पीकसाहचर्यांच्या प्रकारांचे जागतिक नकाशे हे घटकजटिलांच्या आधारे केलेले वर्गीकरण दाखवितात. वर्गीकरणांचे हे सर्व क्रमबंध प्रादेशिक अभ्यासास मदत करतात. पण, प्रादेशिक अभ्यासासाठी लागणारी समर्पक पार्श्वभूमी या दृष्टीने किंवा जगाचे सर्व प्रादेशिक ज्ञान संघटित करणारा एखादा तात्पुरता क्रमबंध रचण्याच्या दृष्टीनेही आवश्यक असणारी रूपधेये पुरेशा संख्येने कोणत्याही एका प्रकारात सामावलेली असत नाहीत.

ज्या घटक जटिलांचा त्या त्या क्षेत्रांत स्पष्टपणे आविष्कार झालेला आहे, अशा जटिलांच्या रूपाने झालेले रूपधेयांचे अतिव्यापक संश्लेषण ग्रामीण क्षेत्रांच्या विद्यमान भूदृश्यावरणात झालेले दिसून येते. जगाच्या बऱ्याच मोठ्या भागातून, मानवाने अंशतः विकृत केलेले असले तरी बऱ्याच मोठ्या प्रमाणात नैसर्गिक संश्लेषणाच्या रूपाने आढळणाऱ्या वनस्पती आवरणाचा समावेश अशा भूदृश्यात मोठ्या प्रमाणात झालेला आढळतो. विस्ताराने लहान, पण आमच्या दृष्टीने अधिक महत्त्वाच्या क्षेत्रांतील अशा प्रकारच्या भूदृश्यात विविध रूपधेयांचा समावेश असतो. केवळ तेवढ्याच नसल्या तरी प्रामुख्याने, त्यात लागवडीच्या वनस्पतींचा समावेश असतो, आणि मानवाने आपल्या जमीन-वापराच्या प्रयत्नात त्यांचे क्षेत्रीय संश्लेषण केलेले असते.

अशा प्रकारचे संश्लेषण सत्यस्थितीत अस्तित्वात असते, या वस्तुस्थितीमुळेच क्षेत्रांचे वर्गीकरण करण्याच्या दोन शक्यता संभवतात.* त्यापैकी एक केवळ प्रत्यक्ष त्या भूदृश्यावरणापुरतीच मर्यादित असते, आणि, त्या एकूण दृश्यमान भूदृश्यावर आधारलेली नसली तरी, त्या एकूण विद्यमान भूदृश्यांवर आधारलेली एक पार्श्वभूमी आपल्यास उपलब्ध करून देते. पण, भूदृश्यावरणाचे हे संश्लेषण दोन स्वतंत्र शक्तींनी घडवून आणलेले असल्यामुळे ते काटेकोरपणे तर्कशुद्ध असत नाही. एक निसर्ग (ज्यामुळे नैसर्गिक वनस्पती निर्माण झाल्या त्या सर्व कारकांची गोळा बेरीज.) आणि दुसरा मानव, अशा या दोन शक्ती असतात. ते प्रत्यक्ष भूदृश्यावरण हे वन्य भूदृश्यस्वरूपात प्रभावीपणे नैसर्गिक, मशागतीच्या भूदृश्यस्वरूपात प्रभावीपणे संस्कारित, किंवा महत्त्वपूर्ण क्षेत्रीय आविष्कार असलेले अभिजात, संश्लेषण आहे असे मान्य करणे जितक्या प्रमाणात शक्य होईल, तितक्या प्रमाणात ते व्यवहार शुद्ध असते. मात्र, ते भूदृश्य, वृत्तान्तर्गत आरण्यातील फिरत्या शेतीप्रमाणे, निसर्ग व मानव या दोघांनीही केवळ योगायोगाने निर्माण केलेल्या परिस्थितीचा परिपाक आहे असे मानणे उचित नाही.

जमीन-वापराच्या संबंधात क्षेत्रीय-दृष्ट्या संकलित केलेल्या सर्व सांस्कृतिक रूपधेयांवर (केवळ भूदृश्यावरणावर नव्हे) आधारलेल्या वर्गीकरणांचा क्रमबंध रचणे, ही आणखी एक पर्यायी पद्धती आहे. ज्या क्षेत्रात मानवाचा महत्त्वपूर्ण विकास झालेला आहे अशा क्षेत्रांत त्या पहिल्या पद्धतीपेक्षा ही पद्धतीच अधिक अर्थपूर्ण ठरते ; कारण, मानवानेच ज्यांचे एका संपूर्ण एककात संघटन केलेले असते अशा, घटक जटिलांवर ती आधारलेली असते. शिवाय, ती अधिक काटेकोरपणे तर्कनिष्ठही असते. हा क्रमबंध एका गृहीत गोष्टीवर आधारलेला आहे. कोणत्याही एका क्षेत्रात जमीन-वापराचा एकच प्रकार व जमीन-वापराचे एकच रूप प्रभावी असते, म्हणजेच ते त्या क्षेत्राचे लक्षण असते असे मानावयास हरकत नाही. अर्थातच, हे गृहीत प्रमेय वस्तुस्थितीचे जेवढ्या प्रमाणात निदर्शक असेल तेवढ्या प्रमाणात ते संयुक्तिक असते. पण जेथे हे प्रमेय सत्य नाही अशी काही क्षेत्रे आहेत, हेही

* या दोन शक्यता म्हणजे, वर चर्चिलेले क्रमबंध हे ज्यांची उदाहरणे म्हणून दाखविता येतील अशा दोन पर्यायी पद्धती.

तितकेच खरे आहे. उदाहरणार्थ : ग्रेट प्लेन्सच्या काही भागात पशुपालनासाठी शेतमळा आणि पिकांसाठी शेती ही दोन्ही सारख्याच महत्त्वाची आहेत, आणि ती दोन्हीही स्वतंत्र रूपधेये आहेत. म्हणूनच, अशा प्रकारची क्षेत्रे हद्दीवरील संक्रामक अवस्थेच्या क्षेत्रांपुरतीच मर्यादित असतात, हे गृहीत आहे. तथापि, ती क्षेत्रे फारशी विस्तृत नसतील तेथे, कोणत्यातरी स्वेच्छने घातलेल्या अटींवर शेजारच्या दोन प्रकारात विभागून द्यावयास हरकत नाही.

यातील कोणत्याही एका क्रमबंधात जगातील क्षेत्रांचे वर्गीकरण वेगवेगळ्या कारकांच्या एकाच समावेशक गटाच्या भाषेत केलेले असते. त्यामुळे कोणत्याही एकातून प्रादेशिक भूगोलाच्या अभ्यासास उपयुक्त अशी एक व्यापक पार्श्वभूमी उपलब्ध होते. शिवाय, दोनही क्रमबंध मोठ्या प्रमाणात—आणि दुसरा पूर्णपणे—सांस्कृतिक रूपधेयांवर आधारलेले असल्यामुळे, सर्व ज्ञात पण गुंतागुंतीच्या, रूपधेयांचे संबंध वेगवेगळ्या घटकांशी कसे असतात हे शोधून काढण्यास प्रोत्साहन मिळते. याच्याविरुद्ध, एकाच कारक-रूपधेयावर आधारलेला क्रमबंध फक्त त्या कारकाच्या परिभाषेतच सांस्कृतिक रूपधेयांचे स्पष्टीकरण देण्यास अभ्यासकांना प्रोत्साहन देतो.

पण, यांपैकी कोणत्याच क्रमबंधातून संपूर्ण पार्श्वभूमी उपलब्ध होत नाही. त्यांच्यात समाविष्ट नसलेल्या रूपधेयांचे, विशेषतः खाणकाम व कारखानदारी यांचे वर्गीकरण करणाऱ्या अन्य क्रमबंधांची, आणि त्याबरोबर अर्थातच स्वतंत्र नैसर्गिक घटकांचे वर्गीकरण करणाऱ्या सर्वच क्रमबंधांची, त्याना पुस्ती जोडावी लागते. तरीही, या सर्व क्रमबंधांची गोळाबेरीज जगाच्या क्षेत्रप्रकारांच्या वर्गीकरणाबरोबर होत नाही, म्हणजेच जगाच्या एकूण क्षेत्राबरोबर होत नाही. फक्त, जगातील प्रत्येक स्थळ (उदाहरणार्थ एक चौरस मैल एकक क्षेत्र) वेगवेगळ्या निकषानुसार तयार होणाऱ्या कोणत्या विविध क्षेत्रप्रकारात मोडू शकते, हे दाखविता येते. खरे म्हणजे, क्षेत्रांच्या या सर्वच लक्षणांवर तर्कशुद्धपणे आधारलेले वर्गीकरण निसर्गातच असत नाही. जागतिक विभागणीचे हे सर्व नकाशे एकमेकावर ठेवले, त्यांतील विविध प्रकारांच्या मर्यादावरून एक सर्वसामान्य मर्यादारेषा तयार होऊ शकत नाही. आणि अगदी स्वैरपणे तशा मर्यादा आखल्याच तर तयार होणाऱ्या वर्गीकरणात सत्य चित्र दाखविणाऱ्या स्थळांपेक्षा असत्य चित्र दाखविणाऱ्या स्थळांची संख्याच मोठी असेल.

एका स्थळाच्या संदर्भात दुसऱ्या स्थळाची सापेक्ष स्थिती हा प्रादेशिक भूगोलातील एक फार महत्त्वाचा कारक असूनही, त्याचे वर्गीकरण करणे शक्य होत नाही. एका क्षेत्राचे दुसऱ्या क्षेत्रांच्या संदर्भात, म्हणजे जवळच्या आणि दूरच्या, भूमीवरील आणि सागरावरील अशा दुहेरी संदर्भात असलेली त्या क्षेत्राची सापेक्ष स्थिती, हे त्या त्या क्षेत्राचे एक आवश्यक लक्षणच असते. पण, हे वर्गीकरण क्रमबंधांच्या मर्यादित संख्येत आवरणारे नाही, हेही तितकेच स्पष्ट आहे. त्याच्या सापेक्ष-स्थळाच्या, म्हणजे स्थळ-मार्गाच्या, भाषेत सांगावयाचे तर, प्रत्येक क्षेत्र हे अनन्य सामान्यच असते. त्याच्या संबंधीची वस्तुस्थिती समर्पक रीतीने

शब्दांकित करता येत नाही, तर ती नकाशावरच–खरे तर फक्त पृथ्वी-गोलावरच–दाखवावी लागते. पण, एकदा का ही वस्तुस्थिती मान्य झाली की, विस्तृत क्षेत्रांचे वर्गीकरण करणाऱ्या विविध क्रमबंधांच्या रूळावरून जाणारी ही प्रादेशिक भूगोलाची गाडी सांधा बदलून अगदी विशिष्ट क्षेत्रांना मान्यता देणाऱ्या त्या एकाच क्रमबंधाच्या रूळावरून नेण्याशिवाय गत्यंतरच रहात नाही.

म्हणून, क्षेत्रप्रकारांचे वर्गीकरण करणारे क्रमबंधच विशिष्ट प्रदेशांना मान्यता देण्याविषयीच्या अंतिम प्रश्नाला हात घालण्याची एखादी पद्धत आपल्याला उपलब्ध करून देतील. अर्थात, प्रादेशिक कार्याची पार्श्वभूमी म्हणून त्याचा वापर करावयाचा असेल तर, ते क्रमबंध कितीही उपयुक्त असले, तरी त्यांच्याही मर्यादा आपण समजून घेतल्याच पाहिजेत. त्यांच्यापैकी कोणताही एक क्रमबंध त्या विशिष्ट क्षेत्रासंबंधी फक्त काही गोष्टीच सांगू शकतो–काही क्रमबंध थोडे अधिक सांगतील, तर काही थोडे कमी सांगतील इतकेच. अगदी सर्व क्रमबंध–अर्थात व्यवहार्य असतील तितके सर्व–एकत्र घातले तरी, ते त्या क्षेत्राच्या रूपरेषेचीही पुरेपूर कल्पना देऊ शकत नाहीत, कारण एका मूलभूत लक्षणाचा त्यांना त्यात समावेशच करता येत नाही. म्हणूनच, प्रादेशिक भूगोलाचा मागोवा घेत असता जगाची विशिष्ट प्रदेशात प्रत्यक्ष विभागणी करण्याच्या दिशेनेच वाटचाल करणे प्राप्त होते.



## प्रकरण ११ वे

# भूगोल हे कोणत्या प्रकारचे शास्त्र आहे

### 'अ'– नावाची उठाठेव कशाला ?

जो सामान्यतः पद्धतितंत्रविषयक चर्चेच्या सुरुवातीलाच हाताळला जातो, तो प्रश्न आम्ही हेतुपुरःसरच चर्चेच्या शेवटच्या टप्प्यासाठी राखून ठेवला आहे. काही थोड्या गृहीतप्रमेयांच्या आधारावर केवळ तार्किक अनुमानांनी भूगोलाचे स्वरूप निश्चित करण्याचा खटाटोप आम्हाला टाळावयाचा होता. अशा प्रकारच्या तर्कपद्धतीला मूळच्या गृहीत प्रमेयांपेक्षा अधिक प्रामाण्य प्राप्त होण्याची शक्यताच नसते; आणि या विषयाच्या बाबतीत तर गृहीत प्रमेयांवर विसंबून राहण्याचीही सोय नाही. म्हणूनच, ज्याचे स्वरूप आम्हास निश्चित करावयाचे आहे, त्या विषयाच्या— म्हणजेच भूगोलक्षेत्राच्या— प्रत्यक्ष परीक्षणानेच आम्ही चर्चेची सुरुवात केली. अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात आधुनिक भूगोलशास्त्र या स्वरूपात भूगोलाची सुरुवात झाली. तेव्हापासून, त्याच्या नामवंत अभ्यासकांना ते ज्या स्वरूपात समजले त्या स्वरूपाच्या विकासाचा मागोवा प्रथम घेतला. जगाच्या क्षेत्रीय भेदाभेदांचा अभ्यास, या अर्थाने भूगोलाला या अभ्यासकांनी घालून दिलेल्या तर्कशुद्ध पायाचेही मग परीक्षण केले. नंतर, क्षेत्रीय भेदाभेदांच्या दृष्टीने भूगोलाला महत्त्वपूर्ण वाटणाऱ्या घटना तो कोणत्या पद्धतीने निवडून घेतो आणि आपल्या अभ्यासासाठी क्षेत्रीय विभागणीची संकल्पनाही कशी बांधू शकतो, या दोन्ही गोष्टींचा त्यांचा ऐतिहासिक विकासक्रम व त्या संकल्पना मागील तर्कशास्त्र या दोन्ही विचाराच्या आधारे, अभ्यास केला. हेतू हा, की या सर्वेक्षणानंतर, भूगोल हे कोणत्या प्रकारचे शास्त्र आहे हे उद्गामी पद्धतीने सिद्ध करणे शक्य व्हावे. कोणत्या ना कोणत्या अर्थाने का होईना " विद्वज्जन परिषदेत आणि लोकमान्यतेत इतर मौलीक शास्त्रांच्या बरोबरीने मानाचे स्थान मिळविण्याचा भूगोलाचा अधिकार आहे का ? " या प्रश्नाचे उत्तर देणे आता आपणास शक्य होणार आहे (१०७, २). या प्रश्नाची भूगोलाभ्यासकांनी वारंवार चर्चा केलेलीच आहे. तोच प्रश्न डग्लस जॉन्सन (१०३), व नंतर कोल्बी, यांनी अधिक स्पष्ट शब्दात पुढे मांडला.

तथापि, ' कोणत्यातरी प्रकारचे का असेना, पण भूगोलाला शास्त्र म्हणाल का ? ' अशी याचना करण्याचा आमचा आग्रह अद्यापी सुटलेला नाही, हे या विभागाच्या शीर्षकावरूनच वाचकांच्या नजरेस येण्यासारखे आहे. फिंचने या प्रश्नाची सरळ आणि उघड चर्चा केली आहे. आणि, माझ्या मते, ती फार परिणामकारकही झालेली आहे. अशा प्रकारचा प्रश्न वादाला आला की, त्या वादाचे एखाद्या विशिष्ट शब्दाच्या अर्थासंबंधी चर्चेत रूपांतर होते. विशेष असे, की पुढच्या सर्व चर्चेच्या दृष्टीने हा शब्द आवश्यक असतोच असेही

नाही ! विशेषतः अलीकडच्या पद्धती तंत्रावरील पुष्कळशा चर्चा ज्यांवर आधारलेल्या असतांत त्या 'शास्त्र' (Science) संज्ञेच्या विविध अव्याख्यात संकल्पनांकडे दुर्लक्ष करणेच समर्थनीय ठरेल, असे वाटते. नैसर्गिक शास्त्रांच्या पुष्कळशा अभ्यासकांची, सर्वसाधारण असली तरी, सहज पण चुकीची, कल्पना आहे की 'शास्त्र' (Science) या संकल्पनेचे स्वरूप इतके सुविख्यात आहे की, त्याची स्वतंत्र व्याख्या करण्याचीच गरज नाही. पण, तेच त्याचे विधान करू लागले, की त्यांच्या व्याख्येतून सामाजिक अभ्यास सहसा वगळले जातात; इतकेच नव्हे, तर त्यांचा दुसऱ्या कोणत्या ज्ञानशाखेत समावेश करावयाचा याचे निर्देशन करण्याचीही काळजी घेतली जात नाही. उलटपक्षी, पुष्कळसे भौतिकशास्त्रवेत्ते व रसायनशास्त्रवेत्ते शास्त्र या शब्दाची अशी एक व्याख्या करतात की, त्यात प्राणिशास्त्र व भूशास्त्र यांचा समावेशच होऊ शकत नाही. एका ख्यातनाम भूशास्त्रज्ञाने केलेली अशी एक व्याख्या माझ्या ऐकिवात आहे की, त्या व्याख्येच्या कक्षेत प्रत्यक्ष त्याच्या शास्त्राचा फक्त एक विभाग बसू शकला, आणि ही गोष्ट त्याच्या लक्षातही आलेली दिसली नाही !

अशा प्रकारच्या चर्चा केल्याने काहीही फायदा होत असो, आम्हाला त्याची येथे गरज नाही ! ज्या शब्दाचा गुणार्थ अन्य क्षेत्रांतील आमच्या सहकाऱ्यांच्या भावबंधनापासून मुक्त आहे असा 'शास्त्र' (Science) याखेरीज दुसरा एखादा शब्द भाषेत उपलब्ध असता तर तो शब्द वापरून ही समस्या टाळणे शक्य झाले असते. आमच्या माहितीत असे एक "निसर्गशास्त्रज्ञ" आहेत, की विद्यापिठाचे कुलगुरु या नात्याने सामाजिक क्षेत्रांतील समस्यांचाही अभ्यास करणे भाग पडते. त्यांनी आपल्या एका जाहीर व्याख्यानात, " शास्त्रीय दृष्टिकोण " सामाजिक अभ्यासांना लागू करता येण्यासारखा नाही हे मान्य केले, हे मान्य केले; आणि जर्मन भाषेतील ‘ Wissenschaft ’ (विज्ञान) सारखा अशा अभ्यासांनाही सहज लागू पडेल असा शब्द आपल्या भाषेत नाही याबद्दल खेद व्यक्त केला. पण एक गोष्ट त्यांनी लक्षात घेतलेली दिसत नाही Science (शास्त्र) या शब्दासारखा दुसरा –अर्थात Wissenschaft (विज्ञान) या खेरीज दुसरा–– शब्द जर्मन भाषेत नसूनही जर्मन अभ्यासक मोठ्या संतोषाने त्यावरच काम भागवत असतात. आता निश्चितार्थाने 'शास्त्र' हा शब्द वापरावा म्हटले, तर त्याचा विशिष्ट अर्थ प्रथम आपल्यास निश्चित करण्याचा प्रयत्न करावा लागेल. सामान्य व्यवहारज्ञान, कलाविषयक ज्ञान अथवा अंतर्ज्ञान या तीनही प्रकारांपासून भिन्न अशा व सामान्य स्वरूपाच्या ज्ञानाचा बोधक म्हणून वापरता येईल अशा, एका सोईस्कर आधाराची आपल्याला येथे गरज आहे. अशा प्रकारच्या ज्ञानाला आपल्या भाषेने "शास्त्र" (Science) या खेरीज दुसरा शब्द आपल्याला दिलेला नाही; आणि म्हणूनच, तोच शब्द तशाच अर्थाने आपणही तूर्त वापरू या. कोणत्यातरी दुसऱ्या, पण अव्याख्यात रूपाने "शास्त्र" या शब्दाला बहाल केल्या गेलेल्या अनेक विशिष्टार्थांपैकी एखाद्या अर्थावर अधिकार सांगण्याचा हक्क भूगोलालाही आहे, असा आग्रह आरंभी धराच कशाला ! अशा विशिष्टार्थाचा दावा करणारे जे असतात तेच फक्त त्या अर्थाने भारावून गेलेले असतात, अशी

पुस्ती येथे जोडून ठेवावी असे वाटते. तर्कशुद्ध उपपत्तीने भूगोलालाही एखादे शास्त्रनाम देणे शक्य आहे याची कितीही प्रात्यक्षिके करून दाखविण्यात आली तरीही, त्या शास्त्रपदवीशी निगडित असलेले खरे प्रशस्तीपत्र भूगोलाने केलेल्या अधिक भरीव कार्याच्या मान्यतेच्या रूपानेच मिळण्याची शक्यता आहे.

नामाभिधानासंबंधीचा कोणताही प्रश्न आम्ही कमी महत्त्वाचा मानत असलो तरी, भूगोलकार या दृष्टीने भूगोल हे कोणत्या प्रकारचे अभ्यासक्षेत्र आहे हे जाणून घेणे आम्हाला फार महत्त्वाचे वाटते. प्रत्येक भूगोलकार शास्त्र हा शब्द ज्या अर्थाचा आहे असे मानतो त्याच प्रकारचे शास्त्र भूगोलही आहे असे दाखविण्याची ज्याची त्याची तीव्र इच्छा असल्यामुळे, भूगोलकारांमधेच अनेक मतभेद निर्माण झाले आहेत, या गोष्टीची दखल आपण यापूर्वीच घेतलेली आहे. असले प्रयत्न भूगोलाला त्याचे मूलभूत स्वरूपच बदलण्यास भाग पाडू लागले तर ते वाया जाणार, हे निश्चितच आहे. भूगोलाच्या मूळ स्वरूपात आम्ही कोणताच बदल घडवून आणू शकत नाही. फक्त, त्याचे स्वरूप जसे आज आहे त्याची आणि जसे आजपर्यंत राहात आले आहे त्याची, आपण पूर्तता करू शकतो. म्हणूनच भूगोल कसा असावा या प्रश्नाकडे दुर्लक्ष करून, ते कोणत्या प्रकारचे अभ्यासक्षेत्र आहे याचाच विचार आपण येथे करू या.

## 'ब'– सर्व शास्त्रपरिषदेतील त्याच्या स्थानामुळे, निश्चित झालेले भूगोलाचे स्वरूप

शास्त्रांचे वर्गीकरण आणि सावयव जीवांच्या जातींचे वर्गीकरण या दोहोत साम्य आहे असे सहसा मानले जाते. खरोखरच तसे असते तर, शास्त्रांच्या ज्या गणात व प्रजाति कुलात भूगोलाचा समावेश होतो त्यांच्या प्रजाति स्वरूपांच्या विवेचनातून, पुष्कळ अंशी अनुमान पद्धतीनेच, भूगोलाचे स्वरूप समजून घेता आले असते, अशी अपेक्षा करण्यास हरकत नव्हती. फक्त त्याच्याच प्रजातीतील अन्य शास्त्रात आणि भूगोलात असलेले विशिष्ट भेद दाखवून दिल्याने आपला हेतू सफल झाला असता. पण, शास्त्राची कोणतीच शाखा ही, खऱ्या अर्थाने, स्वतंत्र व भिन्न शास्त्र असू शकत नाही, या गोष्टीचे सतत स्मरण ठेवण्याची सूचना हेटनरने दिलेली आहे (१६१, ११०ff). प्रत्यक्षात फक्त एकच शास्त्र आहे, पण मानवी मर्यादांमुळे, थोड्याफार स्वैरपणे, त्याचे विभाग करणेच प्राप्त असते. म्हणूनच, एकाच एका पूर्णवस्तूचे विभाग करताना, म्हणजेच जगाच्या प्रदेशांची विभागणी करताना, आपल्यापुढे ज्या अडचणी उभ्या राहिल्या, तशाच अडचणी शास्त्राच्या या विभागांच्या वर्गीकरणाच्या वेळीही येत असतात.

निसर्गशास्त्रे व समाजशास्त्रे हे शास्त्रांचे दोन अगदी भिन्न गट आहेत आणि त्यातील प्रत्येकाचे पोटी वेगवेगळ्या शास्त्रांचे विविध वर्ग भिन्नपणे दाखविता येतात, असे मान्य करणाऱ्या वर्गीकरणाच्या कोणत्याही सोप्याशा क्रमबंधात शास्त्राच्या विभागांची रचना

करण्याचा प्रयत्न केला तर, शास्त्राचे एक विकृत चित्र नजरेपुढे उभे राहील. " निर्जीव, सजीव आणि मानवी या सर्व जगांचे सर्व ज्ञान हीच एक एकत्र गुंफलेली पूर्णाकृती आहे." ही गोष्ट हायडेरिशने विशेष भर देऊन सांगितली आहे (१५३, २१२). पण हे शास्त्रस्वरूप कोणत्याही एका व्यक्तीच्या आवाक्यात पूर्णपणे न येण्याइतके अति-व्यापक आहे; या वस्तुस्थितीमुळेच, कमी जास्त प्रमाणात रूढ असलेल्या थोड्याशाच शाखांमध्ये त्याची विभागणी करणे कोणालाही भागच पडते; आणि शैक्षणिक क्रमबंधाच्या अटी पूर्ण करण्यासाठी प्रमुख गुणानुसार गटवारी करणे आवश्यक होऊन बसते. ही रूढ गटवारी कित्येकदा सोयीची होण्याऐवजी गैरसोयीचीच होण्याची शक्यता अधिक असते. विशेषतः भूगोलाला प्रत्यक्ष जटिलात त्या जशा आढळतात त्या अवस्थेतच घटनांचे परीक्षण करावयाचे असते. अर्थात, केवळ व्यवहारासाठी, नैसर्गिक घटना व सांस्कृतिक घटना एकमेकापासून विभक्त करणे त्याला अशक्य होते.

जेव्हा भूगोलाच्या या विशिष्ट अंगाचा आपण विचार करू लागतो आणि कोणत्यातरी एका विशिष्ट शास्त्रशाखेऐवजी शास्त्र नावाच्या एकमात्र एककाशी त्याची तुलना करू लागतो, तेव्हाच ' मानवी व अमानवी अशा दोन प्रकारच्या घटनांचा एकत्र समावेश करणारा भूगोल द्वैतवादी आहे ' या आक्षेपाचा फोलपणा लक्षात येतो. " प्रत्येक दोन शास्त्रांच्या दरम्यान असणारा संपर्कपट्टा ज्याला दिसत नाही, त्या ऐवजी तेथे मर्यादारेषा पहाण्याची ज्याच्या नजरेला सवय जडली आहे, आणि जो सर्वच शास्त्रांच्या अन्योन्य आंतरिक संबंधांवर किंवा एकाच एकक शास्त्राचे हे सर्व अविभाज्य घटक आहेत या वस्तुस्थितीवर भर न देता, सांस्कृतिक व नैसर्गिक शास्त्रांमधील भेदांवरच जो अधिक भर देतो, त्याच व्यक्तीच्या डोळ्यात हा द्वैतवाद खुपत असतो. खरे पहाता त्या एकक शास्त्राचे हे विभाग नकाशावर दाखविलेल्या देशांप्रमाणे, एकमेकाशेजारी पण विभक्त स्थितीत, नुसतेच पसरलेले नसतात तर, त्यांचे विविध स्वरूपांचे अन्योन्य संबंध आधीच प्रस्थापित झालेले असतात." (१६२, ४१).

नैसर्गिक व सामाजिक या रूढ अभ्यास विभागणीशी जुळते घेणे भूगोलाला शक्य नाही, ही गोष्ट सर्व आधुनिक भूगोलकारांनी मान्य केलेली आहे. या दोन्हीपैकी कोणत्याही एका गटात भूगोलाचा संपूर्णपणे समावेश करता येत नाही ; इतकेच नव्हे, तर त्याचे स्वतःचेही नैसर्गिक आणि मानवी अशा दोन स्वतंत्र भाग करणे शक्य होत नाही. येथे हेही लक्षात घेतले पाहिजे की, भूगोलाने घेतलेली ही भूमिका तर्कविरुद्ध नाही. नैसर्गिक गोष्टी सांस्कृतिक बाबींपासून वेगळ्या काढणे, हे फक्त औपपत्तिक दृष्ट्याच शक्य आहे ; कारण, सत्यस्थितीत त्या एकमेकात पूर्णपणे गुंतलेल्या असतात. भूगोल आणि मानसशास्त्र या दोन ज्ञान शाखा, शास्त्राची रूढ विभागणी अगदी स्वैरपणे केलेली आहे, या वस्तुस्थितीचा पुरावाच आहेत.

आपले लक्ष मुख्यतः " भूगोलाच्या भौतिक बाजूकडे " लागलेले असते असे ठामपणे सांगणारे कित्येक भूगोलकार आहेत, हे निश्चित. पण, त्यांच्यापैकी प्रत्येकाने आपल्या विषयाच्या मानवी बाजूचा विचार करणारा एकही अभ्यासलेख केव्हाच प्रकाशित केला नाही, हे सिद्ध करण्यासाठी त्यांच्या एकूण लिखाणाचे बारकाईने व प्रदीर्घ परीक्षण करावे लागेल. जेव्हा हेच अभ्यासक एखाद्या विशिष्ट क्षेत्रासंबंधी विचार करू लागतात, तेव्हा आपण स्वतःच आपल्याला " प्राकृतिक भूगोलकार " अशी उपाधी लावून घेतलेली आहे ही गोष्ट हे महाभाग पार विसरतात, आणि त्या क्षेत्रातील अन्योन्य संबंधांत असलेल्या सर्व रूपधेयांचा एकत्रच विचार करू लागतात, हा दैवयोगच आहे.

" भूगोल हा निसर्गविषयक व समाजविषयक शास्त्रांना सांधणारा सेतू आहे. " या भूगोलाच्या भूमिकेवर काहीसा अवास्तव भर दिला गेल्यामुळेही काही गैरसमज निर्माण होतात, हेही खरे आहे. पेंकन या उपमेचा अनेकवार उच्चार केलेला असला तरी, तो प्रथम हेही आग्रहाने सांगतो की, या दोन शास्त्रगटांत जो दुरावा असलेला दिसतो तो मानव निर्मित आहे. ज्या सत्यस्थितीचा शास्त्राला अभ्यास करावयाचा असतो तेथे त्या दोहोंत अशी दरी असल्याचे नजरेस येत नाही. पण, यावरूनच काढलेले त्याचे पुढचे अनुमान आम्हाला मान्य नाही. या कृत्रिम दरीच्या बाजूला शास्त्रीय विधिनियमांचा विकास झाला आहे, आणि ते दुसऱ्या बाजूला असलेल्या समाजशास्त्रांकडे नेण्यासाठी भूगोल–सेतूची आवश्यकता आहे (१५८, ५४ : १६१). खरे म्हणजे, अशा प्रकारच्या संकल्पनेला सेतूची गरजच नाही. कदाचित, सामाजिक शास्त्रांचा संबंध भूगोलाच्या माध्यमाने भौतिक शास्त्रांबरोबर प्रस्थापित होऊ शकला तरच सामाजिक शास्त्रांचे विधिनियमही तितक्याच भक्कम पायावर उभारले जातील, असा अर्थ पेंकला अभिप्रेत असेल. पण, अशा अर्थानेही भूगोलाचा हा दावा थोडा अवास्तव आहे. अमानवी जगातील वस्तुस्थितींशी आणि त्यांच्यातील अनुबंधाशी सामाजिक शास्त्रांचे संबंध अन्य मार्गांनीही प्रस्थापित झालेले आहेत. या अन्य मार्गांपैकीच शरीरशास्त्र व मानसशास्त्र हे विशेष उल्लेखनीय आहेत (c/o क्राफ्ट १६६, १२).

या प्रश्नाच्या संदर्भात कोणतेही निष्कर्ष काढले गेले, तरी शास्त्रांच्या दोन गटांना सांधणारा केवळ एक दुवा म्हणून भूगोलाकडे पाहून चालणार नाही. उलट, जगाशी संबंधित असणाऱ्या सर्वच क्रमबद्ध शास्त्रांचा आंतर छेद घेणारे भूगोल हे एक अखंड क्षेत्र आहे. म्हणूनच, श्लूटर म्हणतो तसे, भूगोलाला फक्त दोन पैलू नसून अनेक पैलू आहेत. हवामानविषयक अभ्यास आणि भूरूपविषयक अभ्यास अशा दोन प्रकारांच्या अभ्यास पद्धतीतील फरक, नैसर्गिक वनस्पती आणि लागवडीची पिके या दोहोंच्या अभ्यास पद्धतीतील फरकांपेक्षा, कितीतरी बाबतीत मोठा असतो (१४८, १४५ f).

रूढिसिद्ध वर्गीकरणावरून भूगोलाच्या स्वरूपासंबंधी जास्तीत जास्त एवढेच लक्षात येते, की, सामाजिक शास्त्रांचा वारसा असलेल्या त्यांच्या सर्व अडचणी व मर्यादा भूगोलाच्याही वाट्याला आलेल्या आहेत; तसेच दुसऱ्या बाजूने, मानवी घटकांना फाटा दिला तर वस्तुस्थिती व अनुबंध निश्चित करण्याचे कामी येणारी सुगमताही अंशतः भूगोलाच्या वाट्याला आलेली आहे. एकोणिसाव्या शतकातील भौतिकशास्त्रज्ञांच्या मनात असलेली केवळ सत्यावरील श्रद्धा गेल्या पिढीतील विकासामुळे पार ढासळून गेलेली असल्यामुळे, एक गोष्ट आपल्या लक्षात येवून चुकली आहे की, शास्त्रांच्या या दोन गटांमध्ये, किंवा प्रत्येक गटातील दोन वेगवेगळ्या शास्त्रांमध्ये जे फरक आहेत ते प्रमाणांचे आहेत, प्रकारांचे नव्हेत. दुसरे असे की, जो फरक आहे तो सामान्य स्वरूपाचा आहे, कोणत्याही विशिष्ट प्रसंगी तो तसा दिसेलच असे नाही. ही वस्तुस्थिती नीटशी न ओळखता आल्यामुळे काही भूगोलकारांनी असा गैरसमज करून घेतला की, भूगोलाला भौतिकशास्त्रांचा पाया मिळाला तर भूगोलाच्या कार्यात फार मोठ्या प्रमाणात भक्कमपणा येणार आहे, आणि तेथून त्याने सामाजिक शास्त्रांच्या अस्थिर वातावरणातील निष्कर्षासाठी केवढीही हनुमान-उडी घेतली तरी चिंतेचे कारण उरणार नाही. पण, सत्यस्थिती वेगळीच आहे. संयुक्त संस्थानांतील लोकसंख्यावाढीचा वेग किंवा जगातील राजकीय राज्यांच्या वसाहतींनी व्यापलेले क्षेत्र अशासारख्या वस्तुस्थिती जितक्या निश्चितपणे सिद्ध करता येतात, तितक्या निश्चितपणे नैसर्गिक पर्यावरणातील फारच थोड्या वस्तुस्थिती सिद्ध करणे शक्य होते.

या ग्रंथाच्या चौथ्या प्रकरणात, ज्या प्रकारच्या वर्गीकरणाची आपण चर्चा केली त्याच्याच भाषेत आपण भूगोलाचा विचार करू लागलो तर, किती तरी अधिक अंतस्थ ज्ञान आत्मसात करणे शक्य होणार आहे. कांट, हंबोल्ट, हेटनर यांच्या मताप्रमाणे, एकूण शास्त्रीय क्षेत्राकडे निरनिराळ्या दृष्टिकोणातून पहाणे आवश्यक आहे, कारण कोणत्याही एका दृष्टिकोणातून पहाता संपूर्ण सत्यस्थिती ही पुष्कळ आणि विविध घटनांचा एक संग्रह आहे, असे वाटण्याची शक्यता असते. अशा एकाच दृष्टिकोणातून शास्त्राशी संपर्क साधू पाहणारा अभ्यासक कोणत्यातरी एका विशिष्ट वस्तुगटातील घटनांबाबत, त्या केव्हा व कोठे आढळण्याचा संभव आहे याचा विचार न करता, जेवढे शक्य होईल तेवढे, ज्ञान मिळविण्याचा प्रयत्न करत रहातो. सर्वच वस्तूंचे ढोबळमानाने सजीव आणि निर्जीव, निसर्ग निर्मित व मानव निर्मित असे वर्गीकरण करणे शक्य असल्याने, या "क्रमबद्ध" दृष्टिकोणामुळे विविध प्रकारच्या "क्रमबद्ध शास्त्रांचे" पुष्कळसे स्पष्ट स्वरूपाचे पोटविभाग पाडणेही शक्य होते.

पण, वस्तुस्थिती वेगळीच असते. शास्त्राला ज्या सत्यस्थितीचा अभ्यास करावयाचा असतो त्या सत्यस्थितीतील घटनांची मांडणी या क्रमबद्ध दृष्टिकोणातून रचलेल्या वर्गीकरणानुसार केलेली कोठेच आढळत नाही. म्हणूनच या दृष्टिकोणातून मिळणारे सत्यस्थितीचे दर्शन अपुरेच असते. सत्यस्थितीत निरर्थकपणे एकत्र मिसळलेल्या घटनांचे ढिगारे आढळलेले असते तर, कदाचित, त्या त्या वस्तुस्थितीचे केवळ सरळ वर्णन करण्याचे

काम भागले असते. पण, प्रत्यक्षात सत्यस्थितीच्या प्रत्येक भागात एकत्र आढळणाऱ्या विविध प्रकारच्या घटनांचे काही अर्थपूर्ण संबंध प्रस्थापित झालेले असतात, आणि निरनिराळ्या विभागांच्या घटनांमध्येही तशाच प्रकारचे संबंध असतात. याचाच अर्थ, सत्यस्थितीतील घटनांच्या प्रत्यक्ष मांडणीत, काही प्रमाणात तरी, एक पद्धत अथवा क्रम असतो. म्हणूनच सत्यस्थितीचे सर्वंकष ज्ञान करून घ्यावयाचे असल्यास, केवळ घटनांचा अभ्यास करून भागण्यासारखे नाही. प्रत्येक विभागाचे स्वरूप, त्याची अन्य विभागांच्या स्वरूपांशी तुलना करून, ते समजून घ्यावे लागते; आणि त्यासाठी सत्यस्थितीच्या विविध विभागांचाही अभ्यास करणे आवश्यक असते. सत्यस्थितीच्या कोणत्याही एका विभागाचे स्वरूप समजून घेण्यासाठी तेथे प्रत्यक्षात एकसंध स्थितीत असलेल्या घटनांच्या एकसंधतेचे सूत्र चांगले समजून घेण्याचे प्रयत्न करणे आवश्यक असते.

या एकसंधतेचे एकमार्गी औपपत्तिक विधान करणे शक्य असले, तरी सत्यस्थितीच्या स्वरूपामुळेच आपल्याला तिच्याकडे दोन भिन्न दृष्टिकोणांतून पहाणे भाग पडते. संपूर्ण सत्यस्थितीची स्थल व काल यांच्या भाषेत भिन्न भिन्न पोटभागात विभागणी होण्याची शक्यता असते. वास्तविक, एकाच भागात सर्वांचाच संयोग झालेला दिसत असतो म्हणजे या ठिकाणी व या क्षणी ही वस्तुस्थितीची एक बाजू झाली. पण, औपपत्तिकदृष्ट्या नसले तरी, व्यावहारिकदृष्ट्या कालविभाग व स्थल विभाग या दोहोंचा एकाच वेळी विचार करणे अशक्य असते. खगोलशास्त्रात असतात तशा, या घटनाही सापेक्षतः सोप्या असतात, अथवा अतिप्राचीन भूगोलात असतात तशी, तेथील गृहीत सामग्रीही सापेक्षतः दुर्मिळ असते, तेथे मात्र या दोनही दृष्टिकोणाचा संयोग करण्याच्या प्रयत्नांना यश आलेले दिसते. (पहाः प्रकरण ६ वे, विभाग 'अ'). वस्तुस्थितीच्या विभागांचे कालाच्या भाषेत विवेचन करणे याला ऐतिहासिक दृष्टिकोण असे म्हणतात; ऐतिहासिक भूशास्त्र, प्रागैतिहासिक इतिहास, आणि नित्याच्या सकुंचित अर्थाचा इतिहास, ही सर्व त्याचीच प्रातिनिधिक रूपे आहेत. तसेच सत्यस्थितीच्या विभागांचे स्थळांच्या भाषेत विचार करणे याला वंटनशास्त्रात्मक दृष्टिकोण असे म्हणतात, आणि त्याचे प्रातिनिधिक रूप खगोलशास्त्र व भूगोलशास्त्र यांत आढळते.

या ऐतिहासिक [९८] आणि वंटनात्मक शास्त्रांपैकी प्रत्येक शास्त्राला सत्यस्थितीच्या त्या त्या विशिष्ट विभागात आढळणाऱ्या सर्व प्रकारच्या घटनांचा अभ्यास करणे भाग असते. औपपत्तिक दृष्टिने पहाता, या घटनांत सर्वच क्रमबद्ध शास्त्रांतर्गत घटनांचा, म्हणजे भौतिक, जीवविषयक किंवा सामाजिक अशा सर्वच घटनांचा, समावेश होऊ शकतो. पण काही विशेष परिस्थितीमुळे, ही व्याप्ती काही शास्त्रांपुरतीच मर्यादित राहाते. इतिहास, भूगोल,

---

९८. "ऐतिहासिकशास्त्रे" या संज्ञेचा मानवाचा अभ्यास करणारी शास्त्रे– मग ती शास्त्रे इतिहासातून वृद्धिंगत झालेली आहेत म्हणून असो, की त्यांची पुष्कळशी सामग्री इतिहासातून गोळा केलेली असते म्हणून असो–या अर्थाने निर्देश करणे, हे तर्कविरुद्ध आहे आणि गैरसमज निर्माण करणारेही आहे. **पृथ्वीच्या** इतिहासाचा अभ्यास करणारे शास्त्र हे नावाने व स्वरूपानेही "ऐतिहासिक" च आहे.

खगोलशास्त्र या शास्त्रीय क्षेत्रांमधील हे सर्वसाधारण लक्षण डब्ल्यू. एम्. डेव्हिस यांनी बरोबर ओळखले होते. " गणित, पदार्थविज्ञान व रसायनशास्त्र यांच्या क्षेत्रांत आढळणारी इष्ट घटकांची अव्यभिचारिता वरील शास्त्रांच्या बाबतीत आढळणे शक्य नाही; कारण, काल व स्थल यांच्याशी निश्चित संबंध असणाऱ्या विविध प्रकारच्या गोष्टींचा अथवा घटनांचा त्यांना एकत्रच विचार करावयाचा असतो." पुढे तो असेही म्हणतो, की खगोलशास्त्र हे विश्वाचे गणित-पदार्थ-रसायनशास्त्रच आहे; आणि केवळ, अवकाशस्थ खगोलांवर सजीवसृष्टी असल्याचे आढळून आले नाही या वस्तुस्थितीमुळेच खगोलशास्त्रज्ञ जीवशास्त्रांवर, किंवा सामाजिक शास्त्रांवरही, आक्रमण करू शकत, अशीही एक पुस्ती येथे जोडावयास हरकत नाही. (१०४, २१३ f). त्याचप्रमाणे, पृथ्वीवरील नैसर्गिक परिस्थिती प्रागैतिहासिक कालात (मानवी कालांत नव्हे) जवळ जवळ बदललेली नाही. या परिस्थितीमुळेच इतिहास —हा इतिहास प्रागैतिहासिकापेक्षा अगदी वेगळा आहे—केवळ मानवी घटनांपुरताच मर्यादित असतो. तरीही व्हेसुवियसचा स्फोट ही घटना भूशास्त्राच्या दृष्टीने जितकी महत्त्वाची आहे, तितकीच, कदाचित थोडी अधिकच, इतिहासकाराच्या दृष्टिनेही महत्त्वाची आहे. नेमका कोणत्या स्फोटाचा येथे उल्लेख केलेला आहे हे वाचकांच्या सहज लक्षात येऊ शकते, ही वस्तुस्थितीच वरील विधान सिद्ध करते. त्याचप्रमाणे मध्ययुगीन हॉलंडच्या इतिहासाचा अभ्यास करणाऱ्या कोणाही अभ्यासकाला 'झायडर झी' च्या निर्मितीचा परिणाम म्हणून घडलेल्या घटनांचा विचार करावाच लागतो.

शास्त्राच्या ऐतिहासिक दृष्टिकोण बाळगणाऱ्या, ऐतिहासिक भूशास्त्र या नावाने ओळखल्या जाणाऱ्या, खास विभागाकडे नजर टाकणे विशेष उद्‌बोधक ठरण्याची शक्यता आहे. जीवविषयक घटनांचा अभ्यास करणाऱ्या शास्त्रांच्या क्षेत्रांत अतिक्रमण न करता, भूकवचातील निर्जिव शिलांचा अभ्यास करणे कोणालाही शक्य होत असले पाहिजे, असेच प्रत्येक अनभिज्ञ सामान्यजनाला वाटणार ! पण, जगाच्या प्रागैतिहासिक कालाचे आलोडन करण्यास आवश्यक असलेली सर्व सामग्री ज्याच्यापुढे सादर केली जात असते असा ऐतिहासिक भूशास्त्रज्ञ हा एकमेव शास्त्रज्ञ असल्यामुळे, त्याला ऐतिहासिक वनस्पतिशास्त्र, ऐतिहासिक प्राणिशास्त्र व काही अंशी ऐतिहासिक, सामाजिक मानववंशशास्त्र या सर्वांचा त्यात अंतर्भाव करणे भाग असते, असे आढळून येते.

विविध प्रकारच्या शास्त्रांच्या स्वरूपांसंबंधीच्या या विवेचनामुळे " पुन्हा पुन्हा चर्चिल्या जाणाऱ्या एका ठाम विधानाला " तोंड देणेही आपल्यास शक्य होईल. " मृत्तिकाशास्त्र, वनस्पतिशास्त्र आणि रसायनशास्त्र अशा प्रकारच्या शास्त्रांचे अभ्यास एक एका वेगळ्या घटनेवर केंद्रित झालेले असतात. तशा स्वरूपाची एखादी अगदी वेगळी घटना " भूगोलाच्या

क्षेत्रात नाही ". या गोष्टीचा कोल्बीने आपल्या अध्यक्षीय भाषणात आवर्जून उल्लेख केला आहे (१०७, २) [९९]. रसायनशास्त्र, वनस्पतिशास्त्र, किंवा राजनीतिशास्त्र यासारखी क्रमबद्ध शास्त्रे आणि त्याचे स्वतःचे अभ्यासक्षेत्र या दोहोत मूलभूत फरक आहेत हे त्याच्या अशा कबुलीजबाबाने सिद्ध होणार असले तरीही, कोणाही भूगोलाभ्यासकाला वरील विधानातील सत्य मान्य करण्याची भीती वाटण्याचे कारण नाही. तसेच, शास्त्रांचे वर्गीकरण केले जात असता ज्या शास्त्रगटात भूगोलाला स्थान दिले जाईल त्यामुळे भूगोलाकाराचा घोर अपमान होईल असेही कोणी समजण्याचे कारण नाही.

ही केवळ आपल्यासाठी राखून ठेवलेली वेगळी घटना आहे असा अधिकार भूगोल कोणत्याही घटनेवर सांगत नाही. उलट, तो ज्या भूक्षेत्रांचा अभ्यास करत असतो त्यात अर्थपूर्णपणे एकसंघ झालेल्या सर्वच घटनांचा तो अभ्यास करत असतो; पण, निराळ्या दृष्टिकोणातून विचार करणाऱ्या अन्य अभ्यासकांनाही त्याच घटना अभ्यासनीय आहेत असे वाटले तरी त्याची तो चिंता करत नाही. खगोलशास्त्रज्ञाला खगोलांचा अभ्यास करण्याचा मक्ता दिलेला असत नाही. म्हणूनच, पदार्थशास्त्रज्ञ अथवा रसायनशास्त्रज्ञ या खगोलांतील मूलद्रव्यांचा अभ्यास करू लागतात तेव्हा ते मुळीच संत्रस्त होत नाहीत. त्याचप्रमाणे भूगोलालाही आपली स्वतःची म्हणून एखादी वेगळी मूर्त वस्तू शोधत बसण्याची जरूरी नाही. ऐतिहासिक भूशास्त्राचा अभ्यासक ज्या शिला आपल्या अभ्यासाची गृहित सामग्री म्हणून वापरत असतो त्याच शिला गतिमान भूशास्त्रज्ञालाही अभ्यासासाठी हव्या असतात. आणि ऐतिहासिकांचे ते लाडके अश्मीभूत अवशेष तर वनस्पतीशास्त्रज्ञ, प्राणिशास्त्रज्ञ, मानववंशशास्त्र या सर्वांना अभ्यासनीय वस्तू म्हणून सारख्याच प्रिय असतात. आपले अभ्यासक्षेत्र म्हणजे अर्थशास्त्र, राजनितिशास्त्र व समाजशास्त्र यांची गोळाबेरीज असल्यासारखी दिसते असे इतिहास शास्त्रज्ञाला कोणीतरी सांगितले तर त्याची त्याला मुळीच खंत वाटत नाही.

शेवटी, कोणत्याच विशिष्ट प्रकारच्या वस्तुस्थिती "भौगोलिक वस्तुस्थिती" या नावाखाली वेगळ्या काढण्याचा प्रयत्न भूगोल करत नाही. बॅरोने आग्रहपूर्वक वारंवार सांगितल्याप्रमाणे, कोणतीही विशिष्ट वस्तुस्थिति ही केवळ "रसायनविषयक वस्तुस्थिती", किंवा केवळ "भूशास्त्रविषयक वस्तुस्थिती", किंवा "अर्थशास्त्रविषयक वस्तुस्थिती" असू शकत नाही, तर ती फक्त एक वस्तुस्थिती असते, आणि कोणतीही शास्त्रशाखा तिचा मुक्तपणे उपयोग करू शकते—येथे वस्तुस्थिती याचा अर्थ मूळची वस्तुस्थिती असा करावा. बोंगळपणे मान्य केलेला कोणतातरी एखादा अनुबंध अथवा त्या अनुबंधावरून काढलेले अनुमान असा करू नये.—केवळ, विविध प्रकारच्या वस्तुस्थिती सर्वसाधारणपणे काही विशिष्ट शास्त्रात इतर

---

९९. Phenomena (घटना) हा शब्द आपण येथे वापरला आहे त्यापेक्षा कोल्बीने तो वेगळ्या अर्थाने वापरलेला असल्याची शक्यता आहे, आणि त्यामुळेच त्याने विरुद्धार्थाचा निष्कर्ष काढलेला असावा, असे वाटते. पण, तसेही खात्रीने म्हणता येत नाही; कारण, त्याने स्वतःच उपस्थित केलेल्या या प्रश्नाची अथवा त्याच्या उत्तराची उघड चर्चा हेतुपुरःसरच केलेली नाही; उत्तर फक्त सूचित केलेले आहे.

शास्त्रांच्या मानाने अधिक अभ्यासल्या जातात, म्हणूनच हे सांकेतिक, पण तितकेच गैरसमज निर्माण करणारे शब्दप्रयोग सामान्य व्यवहारात रूढ झाले आहेत. अशा प्रकारे, गव्हाचे निरनिराळ्या ठिकाणांचे आणि निरनिराळ्या काळांतील दरांच्या संबंधींच्या वस्तुस्थितींचा अर्थशास्त्रात पदोपदी विचार केला जात असण्याची शक्यता असते, म्हणूनच त्या अर्थशास्त्रीय वस्तुस्थिती म्हणून ओळखल्या जातात. पण, तितक्याच सार्थपणे त्या " ऐतिहासिक वस्तुस्थिती अथवा " भौगोलिक वस्तुस्थिती " म्हणून ओळखल्या जाण्यास काहीच हरकत नाही. विशेषकरून सापेक्ष स्थलविषयक वस्तुस्थितींना फक्त " भौगोलिक वस्तुस्थिती " असे मानावयाचे, हा जो लोकमान्य गैरसमज आहे तो भूगोलाला मान्य होणे शक्य नाही, किंवा सापेक्ष स्थलविषयक वस्तुस्थितींबरोबरच फक्त नैसर्गिक घटनांविषयक वस्तुस्थितींचाच या संज्ञेत समावेश होत असतो, हा शास्त्रज्ञमंडळींत मान्य असलेला गैरसमजही भूगोलाला मान्य करणे शक्य होणार नाही. अगदी व्यापक अर्थाने असे म्हणता येईल की, ज्याप्रमाणे सर्व गतकालविषयक वस्तुस्थिती ऐतिहासिक असतात, तशाच सर्व भूपृष्ठविषयक वस्तुस्थिती भौगोलिक असतात. आणि ज्याप्रमाणे, इतरांचा विचार न करता फक्त ऐतिहासिकदृष्ट्या महत्त्वाच्या असणाऱ्या कोणत्याही प्रकारच्या घटनांचा वापर इतिहास करत असतो, तद्वत कोणत्या प्रकारच्या वस्तुस्थितींचा उपयोग करून घ्यावयाचा हे भूगोल ठरवून देईल, आणि हे ठरविताना त्यांच्यातील वस्तूंचा विचार न करता त्यांच्या भौगोलिक महत्त्वाचाच, म्हणजे जगातील क्षेत्रीय भेदाभेदांशी असणाऱ्या त्यांचा संबंधाचाच विचार करेल (c/o प्रकरण ८).

उदाहरणादाखल एक विधान घेऊ या. व्हेसुव्हियस हा उ. ४० ° ४९ °, पू. १४ ° ४६ ° वृत्तांवर उभा असलेला एक ज्वालामुखी आहे (व होता). आता हे विधान जितके भूशास्त्रविषयक अथवा इतिहासविषयक आहे त्यापेक्षा ते अधिक भौगोलिक आहे, असे म्हणता येणार नाही. थोडक्यात, ती केवळ एक वस्तुस्थिती आहे. ज्वालामुखींच्या क्रमबद्ध –भूगोलाच्या दृष्टीने पहाता या वस्तुस्थितीच्या पुढे दाखविलेल्या संबंधांवर आपल्याला विचार करावयाचा आहे. एका बाजूने तिचा संबंध भूमध्यसमुद्रातून जाणाऱ्या भूगर्भस्थ हालचालींच्या पट्ट्याशी आहे, तर दुसऱ्या बाजूने शेजारच्या काम्पानांतील सुपिक, रक्षामिश्रित, मृत्तिकांशी, पाम्पीच्या अवशेषांशी व जमिनीत गाडल्या गेलेल्या हर्क्युलेनियमशी, त्या क्षेत्रातील लोकवस्तीच्या जीवावर येणाऱ्या संकटांशी आणि त्या ज्वालामुखी पर्वताने त्या समतल भूमीवर निर्माण केलेल्या भूदृश्यविषयक परिणामांशी आहे.

थोडक्यात सांगावयाचे तर, इतिहासाप्रमाणे भूगोलाचा इतर शास्त्रशाखांपासून वेगळेपणा दाखवावयाचा आहे, तो अभ्यासासाठी वस्तू अगर घटनांच्या परिभाषेत सांगावयाचा नसून, तो मूलभूत कार्यांच्या परिभाषेत वर्णन करून सांगावयाचा आहे. विशिष्ट प्रकारच्या घटनांचे विश्लेषण आणि संश्लेषण करणे हेच क्रमबद्ध शास्त्रांचे मूलभूत कार्य असते असे वर्णन करावयाचे झाले तर, एकाच अवकाश खंडातील आणि एकाच कालखंडातील घटनांच्या प्रत्यक्ष एकीकरणांचे विश्लेषण आणि संश्लेषण हे घटनात्मक आणि ऐतिहासिक शास्त्रांचे मूलभूत कार्य असते, असे वर्णन करून सांगावे लागेल.

इतिहास व भूगोल या दोघांचेही नैसर्गिक शास्त्रे असेच वर्णन करण्यास हरकत नाही; कारण, ती दोनही शास्त्रे वस्तुस्थितीचे परीक्षण नैसर्गिक दृष्टिकोणातून करत असतात, म्हणजेच निसर्गतः वस्तूंची जशी मांडणी असते तशा स्थितीत आणि त्या जशा संबंधित असतील तशा अवस्थेत त्याचा ही शास्त्रे विवेचन करत असतात. याच्या विरुद्ध, क्रमबद्ध शास्त्रांची कार्यपद्धती सत्याभासात्मक असली तरी कृत्रिमच असते; कारण, काही विशिष्ट प्रकारची घटना तेवढीच परीक्षणासाठी तिच्या वास्तव परिसरातून बाहेर काढून घेतली जात असते.

म्हणूनच, शास्त्रीय विचारांच्या अगदी पुरातन कालखंडातही इतिहास व भूगोल या दोघांचीही अभ्यास क्षेत्रे या नात्याने विकास होत असे, या गोष्टीचे आश्चर्य वाटत नाही. शिवाय, ही दोनही क्षेत्रे 'शास्त्रांची गंगोत्री' आहे, आणि ते अगदी साहजिकही आहे. काल अथवा स्थल यांमध्ये घटनांचे एकीकरण करण्याच्या या प्रयत्नांतून अशा अनेक नव्या प्रकारच्या घटना उघडकीस येतात, की त्यापैकी कोणतीतरी एखादी आपल्यापरीने स्वतंत्र अभ्यासक्षेत्र म्हणून पुढे येण्यास पात्र असल्याचे दिसून येण्याची शक्यता असते. खरे म्हणजे, त्या एकूण एकसंधानक्रियेत त्या घटनांचे महत्त्व समजून घेण्याच्या प्रयत्नातूनच त्यांचा स्वतंत्रपणे अभ्यास करण्याची गरज निर्माण होते. म्हणूनच, निदान नव्याने प्रकाशात येणाऱ्या, या वेगळ्या प्रकारच्या घटना स्वाधिकारानेच स्वतंत्र अभ्यास-क्षेत्र होण्यास पात्र आहेत, असे मान्य केले जाईतो अनिश्चितकालापर्यंत ही उत्क्रांतीची प्रक्रिया अशीच रहावी, अशी आपली अपेक्षा असण्यास काहीच हरकत नाही. अशा रीतीने, निवासप्रकार या घटनेचा भूगोलाभ्यासकांनी शोध लावला आहे आणि त्याचे महत्त्वही तसेच मोठे आहे असे प्रात्यक्षिकांनी ते सिद्धही करू शकले आहेत, असे मान्य झाले, तर क्रमबद्धशास्त्रांच्या एखाद्या शाखेने या वस्तूंनाच आपल्या अभ्यासाचा खास विषय म्हणून मान्यता द्यावी, अशी अपेक्षा करण्यास काहीच हरकत नाही.

अशा रितीने, ' प्रसवक्षेत्रांना ' स्वतंत्र क्षेत्रांचे स्थान प्राप्त झाल्यामुळे भूगोल अथवा इतिहास यांच्या अभ्यासाचे मूळचे क्षेत्रच आकुंचित होईल, असे वारंवार बोलून दाखविण्यात आलेले असले, तरीही अशी भीती बाळगण्याचे कारण नाही. उलट, 'जननीक्षेत्र' पूर्वी जेवढे होते अगदी तेवढेच त्यानंतर शिल्लक राहाते. शिवाय या संबंधित क्षेत्रांतील प्रगतीमुळेच भूगोलाने अभ्यासावयाची सामग्री अधिकाधिक समृद्ध होत जाते, असे रिक्टोफेनने आपले मत दिले आहे आणि हेटनरने या गोष्टींवर वारंवार भर दिला आहे (७३, २७f). ज्याप्रमाणे अर्थशास्त्र व राजनीतिशास्त्र यांच्या प्रगतीमुळेच इतिहासासंबंधींच्या अर्थशोधनांतील इतिहासकारांची क्षमता चांगलीच वाढली आहे; त्याचप्रमाणे क्रमबद्ध प्राकृतिक भूगोल, हवामानशास्त्र, मृत्तिकाशास्त्र इत्यादी शास्त्रांच्या प्रगतीचा फायदा आधुनिक भूगोलाला पुष्कळच झालेला आहे. अर्थशास्त्र व अन्य समाजशास्त्रे यांनी काढलेल्या निष्कर्षांचाही भूगोलाला फायदा होण्यासारखा आहे. त्याची परतफेड म्हणून भूगोल त्या क्षेत्रांत कोणती भर टाकू शकतो, याचा विचार पुढे केला जाईल. मूलतः भूगोल हा एक दृष्टिकोण आहे,

अभ्यासाची एक पद्धती आहे.–तसे पहाता सर्वच शास्त्रे अशा अभ्यास पद्धतीच असतात– अशी भूगोलाची व्याख्या करणे आवश्यक आहे ही गोष्ट समजून न घेण्याची चूक केल्यामुळेच, प्रसवशास्त्रांच्या वृद्धीमुळे जनकशास्त्राला अभ्यासासाठी क्षेत्रच उरले नाही, असा पुष्कळांचा गैरसमज झाला आहे. म्हणूनच, मानव व निसर्ग यांच्यामधील अन्योन्य संबंध अशा सारख्या विशिष्ट प्रकारच्या घटनेचा अभ्यास हेच खरे भूगोलाचे क्षेत्र आहे असा अधिकार सांगून, किंवा आजपर्यंत दुसऱ्या कोणत्याच शास्त्राला जो अभ्यासनीय वाटला नाही असा एखादा नवा अभ्यासविषय शोधून काढून वेळ मारून नेण्याचे प्रयत्नही झालेले आहेत (क्रौवी २०१, २); किंवा क्षेत्रविषयक अमूर्तकल्पनांचे मूर्तवस्तूत रूपांतर करून वेळ मारून नेण्याचेही प्रयत्न झालेले आहेत. यांपैकी प्रत्येक प्रयत्नामुळे, कमीजास्त प्रमाणात, तावत्काळ भूगोल आपल्या प्रगतीपथावरून ढळला. त्यामुळे एकतर, तो अशा मार्गानि चालू लागला की न कळत, इतर शास्त्रे ज्याचा अंशही सोडून देणे शक्य नाही अशा, परक्या क्षेत्रात आक्रमण करत राहिला, अथवा गूढ विद्येच्या दलदलीत अडकून पडला. ही गोष्ट सिद्ध झालेली आहे, आणि त्याची पुनरावृत्ति होणे शक्य आहे.

तेव्हा, या प्रकरणाच्या शीर्षकात विचारलेल्या प्रश्नाचे एक उत्तर असे, की भूपृष्ठावर आढळणाऱ्या सर्व व संपूर्ण सत्यस्थितींचा विचार क्षेत्रीय भेदाभेदांच्या दृष्टिकोणातून करणारा भूगोल हा एक अभ्यास आहे. एक ज्ञानशाखा म्हणून स्वीकारलेली ही भूगोलाची भूमिका आहे, असे म्हणण्यास हरकत नाही. ज्ञानसंपादन करण्यासाठी एक ज्ञानक्षेत्र या नात्याने भूगोलाचे लक्षण हाच त्या सामान्य प्रश्नाचा अधिक महत्त्वाचा विषय आहे.

## 'क'–शास्त्राच्या सर्वसामान्य स्वरूपाच्या संदर्भात, भूगोलाचे स्वरूप

ज्ञान संपादनाचे एक क्षेत्र या नात्याने असलेले भूगोलक्षेत्राचे लक्षण समजून येण्यासाठी एकूण ज्ञानक्षेत्राचे सारभूत लक्षण समजून घेणे आवश्यक आहे. जे ज्ञान संपादन करत असता–– " निश्चितता, अचूकपणा, विश्वव्यापकता, आणि क्रमबद्धता या ध्येयांच्या प्राप्तीसाठी इतर सर्व विचारांना कठोरतेने गौणत्व दिले जाते ", व त्यामुळे जे व्यावहारिकज्ञान अथवा सौंदर्यबोधकज्ञान या दोहोपासून वेगळे दाखवता येते, त्या प्रकारच्या ज्ञानाशी येथे आपला संबंध आहे,–मग त्याला ज्याच्या त्याच्या मताने कोणीही कोणतेही नाव द्यावे.–इतर कोणत्याही प्रकारच्या ज्ञानाशी आपला संबंध नाही. (कोहेन ११५, ८३; पुढील काही पानांतून या तत्वांसंबंधी आलेली चर्चा मुख्यतः कोहेनवर आधारलेली आहे, पाने ८३ ते १४४ तसेच पहा बॅरी ११४, ३ ते ८८.)

ज्या जगात आपण राहतो त्यातील वस्तुस्थिती व अनुबंध अशा दोनही प्रकारचे ज्ञान शक्य तेवढ्या वस्तुनिष्ठपणे व अचूकपणे संपादन करण्यासाठी भूगोल प्रयत्नशील असतो. शक्यतोवर जगाच्या सर्व भागांना लागू पडणाऱ्या संकल्पना, अनुबंध आणि तत्त्वे अशारूपाने हे ज्ञान सादर करण्याचा भूगोलाचा प्रयत्न असतो. शेवटी अशा रीतीने, संपादन केलेले हे विश्वसनीय

ज्ञान तर्कशुद्ध क्रमबंधांच्या रूपाने संघटीत करण्याचाही त्याचा प्रयत्न असतो; मात्र त्यातील अन्योन्य संबंध निश्चित करून, अशा वेगवगेळ्या क्रमबंधांची संख्या शक्य तितकी कमी केलेली असते (c/o ११५, १०६ ते १४). आपली ही ध्येये गाठण्याची पराकाष्ठा भूगोल ज्या रीतीने करत असतो तिच्या परिभाषेत, एक अभ्यासक्षेत्र या नात्याने, भूगोलाची लक्षणे वर्णन करून सांगण्याचा आम्ही प्रयत्न करणार आहोत.

ज्या ज्ञानाचा भूगोल हा एक भाग आहे, त्या प्रकारच्या ज्ञानाची आमची व्याख्या जे ज्ञात आहे, म्हणजेच जे संपादित आहे, अशा ज्ञानावर आधारलेली नाही, तर ज्ञानान्वेषणावर आधारलेली आहे, म्हणजेच अज्ञाताला ज्ञात करून घेण्याच्या पद्धतींवर नियंत्रण ठेवणाऱ्या मूलभूत तत्त्वांवर आधारलेली आहे. या ज्ञानप्रकाराच्या विविधशाखांना या ध्येय प्राप्तीच्या मार्गावर कमीजास्त प्रमाणात यश आलेले दिसते. मात्र, कोणत्याही एका शास्त्रशाखेला परिपूर्ण निश्चितता अथवा अचूकपणा, प्रत्यक्षार्थाने विश्वव्यापकता अथवा त्यातील अखिल ज्ञानभांडाराची एकाच क्रमबंधात संपूर्ण मांडणी करण्याची क्षमता प्राप्त झाली असल्याचा दावा सांगता येणार नाही.

ज्या ज्ञानशाखेला, येथून पुढे सोयीकरिता, ' शास्त्र ' या नावाने संबोधणार आहोत त्या प्रकारच्या ज्ञानाच्या पायाभूत गरजा वर दर्शविल्याप्रमाणे आहेत. या दृष्टिने वरील ध्येयांची तुलना कलाविषयक प्रतिबोधनाच्या ध्येयांशी केली (मग, ती ध्येये कलाभ्यासकांनी कोणत्याही स्वरूपात मांडलेली आपल्या नजरेस येवोत), तर तर्कशुद्धपद्धतीने या दोन ज्ञानक्षेत्रांचे संयोजन करणे, अथवा एकातून दुसऱ्यात संक्रमण करणे शक्य होणार नाही, ही गोष्ट स्पष्ट होईल. अचूकपणा या ध्येयाच्या पूर्ततेसाठी राहोच, पण निश्चितता या ध्येयांच्या पूर्ततेसाठीही अन्य सर्व विचार गौण मानण्यास कोणताही कलावंत खासच तयार होणार नाही. आपल्या कृतींतून मूलभूत विश्वव्यापित्वाचा आविष्कार होत रहावा अशी गरज त्यालाही वाटत असण्याचा संभव आहे. पण त्या संकल्पनेचा प्रभाव त्याच्या त्याच्या कृतीच्या तपशीलांवर पडू शकत नाही. तसेच, कोणतीही एक कलाकृती संघटीत स्वरूपात मांडलेली असावी असे त्याला वाटत असण्याची शक्यता आहे, तथापि, एकाच प्रकारच्या सर्व कलाकृतींचे सर्वसामान्य संघटन असावे अशी अपेक्षा तो ठेवत नाही. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचे तर, येथे, आपण मूलतः भिन्न असलेल्या दृष्टिकोणांचा विचार करत आहोत. कलाकार व भूगोलकार दोघेही भूक्षेत्राचे ज्ञान संपादन करण्याचा व सादर करण्याचा प्रयत्न करत असण्याचा संभव आहे, पण त्यांच्यापैकी कोणाही एकाला स्वतःच्या ध्येयांचा त्याग केल्याशिवाय दुसऱ्याच्या ध्येयांचा स्वीकार करणे शक्य होणार नाही (c/o क्राफ्ट १६६, २०f).

भूगोल आपले जगासंबंधीचे ज्ञान शक्य तितके अचूक आणि निश्चित करण्याच्या प्रयत्नात असतो या गृहीत प्रमेयावर व्यावसायिक भूगोलकार आक्षेप घेणार नाहीत हे गृहीतच आहे. पण, काही वस्तुस्थिती अशा असतात, की इतरांच्या मानाने त्या अधिक अचूक व

निश्चित मापन साधनांच्या कक्षेत येतात, असे दिसते म्हणून, अशाच विशिष्ट प्रकारच्या व वस्तुस्थितीच्या विवेचनांची मर्यादा भूगोलानेही आपल्यावर लादून घ्यावी, हा उपसिद्धान्त मात्र येथे चुकीचा ठरणार आहे. दृश्य घटना अथवा मूर्त घटना यांच्यासंबंधींच्या वस्तुस्थिती व त्यांचे अनुबंध जितक्या प्रमाणात अचूकपणे व निश्चितपणे ठरविता येतात तितक्या प्रमाणात सांस्कृतिक घटनांच्या वस्तुस्थिती व त्यांचे अनुबंध ठामपणे सांगता येत नाहीत. या गोष्टीचे प्रात्यक्षिक करून दाखविणे शक्य आहे असे मानले—अर्थात, ते करून दाखविता येत नाहीच–तरीही, ज्यांचा अभ्यास आपल्याला तितकासा अचूकपणे व निश्चितपणे करणे शक्य होत नाही अशा घटना वगळल्या व ज्यांचा अभ्यास अधिक अचूकपणे व निश्चितपणे शक्य असते, अशा घटनांचीच मर्यादा आपण स्वतःवर लादून घ्यावी अशी गरज शास्त्राच्या कोणत्याही तत्त्वातून निर्माण होत नाही. उलटपक्षी, या क्षेत्राच्या, समजा, सांस्कृतिक स्वरूपाचे आपले ज्ञान शक्य तितके निश्चितपणे संपादन करता यावे म्हणून तशा प्रकारच्या ज्ञानाशी संबंधित असलेल्या सर्व वस्तुस्थिती विचारात घेण्याची आवश्यकता निर्माण होते. या वस्तुस्थिती सांस्कृतिक संकल्पनांचे ते मूर्त स्वरूपात अवतरलेले परिणाम असोत, अथवा त्या कल्पनांचे ते अमूर्त आविष्कार असोत, त्या दोन्ही प्रकारच्या वस्तुस्थिति–गटांचा शक्य तितक्या आणि सारख्याच अचूकपणे आणि निश्चितपणे अभ्यास करणे आवश्यक असते (११५, ८३ ते ९९).

त्याचप्रमाणे, भूगोलविषयक निरीक्षणाच्या विशिष्ट पद्धतींवर काही मर्यादा घातली जावी अशी पळवाट या ध्येयांमधून सापडत नाही. उलट, अधिक अचूक व निश्चित ज्ञानाचा मार्ग दाखवितील अशा सर्व पद्धतींचा वापर करणेच त्यांच्यामुळे आवश्यक होऊन बसते. संख्यात्मक सामग्री पुरेशी अचूकही नसते आणि पुरेसे तपशील देणारीही नसते. त्यामुळे आपल्याला संख्यात्मक सामग्रीवरून मिळालेल्या ज्ञानाची तपासणी करण्यासाठी व त्याची पूर्तता करण्यासाठी क्षेत्र-कार्याचे तंत्र–प्रत्यक्ष निरीक्षण व व्यक्तिगत भेटीगाठी अशा दोनही प्रकारचे–उपयोगात आणावेच लागते (C/o जोन्स, २८७). पण, त्या प्रदेशाच्या भागाभागाचे संपूर्ण क्षेत्र-निरीक्षण करणे शारीरिकदृष्ट्या शक्य आहे असे गृहीत धरले, तरी अशा रीतीने हाती आलेल्या निष्कर्षांतून उमटणारे चित्र तात्कालिक परिस्थितीचे असते, सामान्यता एकाच ऋतूचे असते. सहाजिकच, अशा निरीक्षणांवरून विशेषेकरून जमिनीच्या सातत्याने वर्षभर केला जात असलेल्या वापरासंबंधीचे सामान्य सिद्धान्त चुकीचे असण्याची शक्यात आहे, ही गोष्ट आर्. ई. डॉज यांनी लक्षात आणून दिलेलीच आहे (२८७, ११०). अर्थात गृहीत सामग्री कितीही अप्रत्यक्ष निरीक्षणांवर आधारलेली असली, तरी प्रत्यक्ष पहाणीच्या निष्कर्षांचा ताळा संख्यात्मक सामग्रीच्या सहाय्याने करून पहाणे प्राप्त असते.

वर्णनांच्या आणि अनुबंधांच्या संकल्पना आणि संज्ञा या दोन्ही गोष्टी शक्य तितक्या निर्दिष्ट व निश्चित केल्या जाव्या असा आदेश निश्चिततेच्या शास्त्रीय ध्येयातून मिळतो. ज्यातील अनिश्चितार्थी संकल्पना सहज अर्थबदल करू शकतात, आणि ज्यातील वरवर विशिष्टार्थी दिसणाऱ्या संकल्पनाही केवळ द्वर्थी रूपके असल्याचे सिद्ध करता येते अशा कच्च्या पायावर कोणतीच भक्कम इमारत उभारणे शक्य होणार नाही.

अचूकपणा आणि निश्चितपणा ही ध्येये प्राथमिक वस्तुस्थिती प्रस्थापित करण्याच्या रीती आणि मूलभूत संकल्पनांच्या व तांत्रिक संज्ञांच्या रचना एवढ्यापुरत्याच लागू पडतात असे नाही, तर निरीक्षण केलेल्या वस्तुस्थितींमधील अनुबंध ज्यांच्या मदतीने विश्लेषण पद्धतीने आपण ओळखू शकतो अशा आणि वस्तुस्थितीविषयक अधिकतर निष्कर्ष ज्यांच्या सहाय्याने अनुमान पद्धतीने काढू शकतो अशा गणितशास्त्रातील व तर्कशास्त्रातील प्रक्रियांनाही ही ध्येये लागू पडतात. कोणताही एक, आणि एकच, अभ्यासक कोणत्याही विशिष्ट शास्त्रीय प्रश्नाचा अभ्यास करत असतो, तेव्हा कितीही क्रांतिक दृष्टीने तो स्वतःच्या कार्याचे परीक्षण करत असला, अथवा वरील ध्येयांच्या पूर्ततेसाठी तो कितीही कष्ट घेत असला, तरी त्याच्या हातून चुका होण्याची शक्यता राहातेच—मग त्या चुका त्याच्या निष्काळजीपणामुळे होवोत अथवा त्याच्या निरीक्षणांवर व युक्तिवादांवर परिणाम करणाऱ्या व्यक्तिप्रभावामुळे झालेल्या असोत ! ज्यांच्या वस्तुस्थिती अचूकपणाच्या उच्चतम निकषांनी मापून येतात, आणि ज्यांच्या घटना सापेक्षतः सोप्या असल्यामुळे तत्संबंधीचे युक्तिवाद अगदी ठाम स्वरूपाचे असू शकतात, अशा शास्त्रांनीही ही गोष्ट एक सर्वसामान्य गृहीत सिद्धान्त म्हणून मान्य केलेली आहे. भूगोलाभ्यासकांचे निष्कर्ष तर त्यांच्या तुलनेने कितीतरी अनिश्चित स्वरूपाचे असू शकतात ! म्हणूनच, अचूकपणाची आणि निश्चिततेची पातळी उंचावता यावी या हेतूने सर्व शास्त्रांनी एक तत्व मान्य केलेले असते. शास्त्राभ्यास अशा रीतीने चालू ठेवावेत, संघटित करावेत, व सादर करावेत, की एकाच प्रश्नावरील वेगवेगळ्या अभ्यासकांनी गोळा केलेला पुरावा संग्रहित करण्याची त्यात सोय असावी ; म्हणजेच, असा प्रत्येक शास्त्रीय अभ्यास अभ्यासू असावा ; याचा अर्थ असा, की त्या अभ्यासात तत्पूर्वीच्या त्या प्रश्नासंबंधीच्या सर्व अभ्यासपूर्व लिखाणांचा उपयोग केलेला असावा आणि तो अशा स्वरूपात सादर केला जावा, की त्यानंतरच्या अभ्यासकांनाही त्या सामग्रीचा उपयोग करणे सहज शक्य व्हावे.

समाजशास्त्रविषयक पुष्कळशा कार्यात आणि भूगोलविषयक काहीशा कार्यात एक दोष नेहमीच राहून जातो. येथे कोणत्याही अभ्यासासाठी वापरलेली मूळ सामग्री नंतर अभ्यासकांना प्रत्यक्ष पहाणीसाठी उपलब्ध असत नाही. म्हणूनच, त्या अभ्यासकाची व्यावसायिक पात्रता व विश्वसनीयता यांवर श्रद्धा ठेवूनच पुष्कळशा गोष्टी मान्य कराव्या लागतात. परिणाम असा होतो, की अशाप्रकारचे अन्य अभ्यासकांचे अभ्यास उपयोगात आणले जाणे, आणि त्यांतील संदर्भ घेतले जाणे या गोष्टी या क्षेत्रांत आणखीच आवश्यक होऊन बसतात. हे केवळ व्यावसायिक सभ्यता म्हणून करून चालत नाही, तर आपले निर्णय अधिक निश्चित स्वरूपाचे व्हावेत म्हणूनही हे करणे भाग पडते.

केवलावश्यक गोष्टींशिवाय कोणत्याच अन्य गोष्टी शास्त्रज्ञांकडून केवळ श्रद्धेच्या बळावर मान्य करण्यास शास्त्र तयार नसते. कोणत्याही विशिष्ट अभ्यासकेचे निष्कर्ष नंतरच्या अभ्यासकांना फेरतपासणीसाठी उपलब्ध असावेत – मग ते त्यांचा उपयोग आपले निष्कर्ष केवळ ताडून पहाण्यासाठी करोत, की त्यांच्या दुरुस्तीसाठी करोत. म्हणजेच, त्यासाठी वापरलेल्या मूलभूत संकल्पना, ज्या निरीक्षणांच्या व युक्तिवादांच्या सहाय्याने निर्णय घेण्यात येतात त्यांच्या पद्धती, आणि एकूण अभ्यासक्षेत्राशी या अभ्यासाचा असलेला संबंध या सर्व गोष्टींच्या बाबतीत स्पष्ट समझोता असला पाहिजे. त्या क्षेत्रात प्रमाणित तंत्रपद्धती व संघटन पद्धती विकसित झालेल्या असतील, तर असा समझोता असणे अगदी शक्य असते, हे उघडच आहे. पण, तशी परिस्थिती नसेल तर मात्र, प्रत्येक अभ्यासात या सर्वांचा निर्देशपूर्वक उल्लेख केलेला असणे आवश्यक आहे.

भूगोलकारांनी प्रत्यक्षात केलेल्या कार्याच्या शास्त्रीय गुणवत्तेबाबत निर्णय देणे हा प्रस्तुत ग्रंथाचा उद्देश नाही. तरीही भूगोलाच्या स्वरूपासंबंधीच्या त्यांच्या कल्पना आणि त्या कल्पनांचे त्या क्षेत्रावर होणारे परिणाम यांच्याशी आपला संबंध आहे. या दुसऱ्या विषयाच्या आधारे एक प्रश्न येथे उपस्थित करणे न्याय्य ठरेल : सर्वसामान्यपणे भूगोलकारांनी, अथवा त्यांच्या प्रकाशनावर अंशतः नियंत्रण ठेवू शकणाऱ्या संपादकांनी, भूगोलक्षेत्रातही वरील कसोट्या आवश्यक आहेत हे तत्वता मान्य केलेले असल्याचे भूगोलविषयक –अनुसंधान–प्रकाशनांवरून निदर्शनास येते का ? – अर्थात, अचूकपणा व निश्चितपणा या शास्त्रीय ध्येयांनी घालून दिलेल्या कसोट्याच येथे अभिप्रेत आहेत.

ही ध्येयेच ज्ञानान्वेषणाची अत्यावश्यक तत्वे असतात, याबाबत शास्त्राच्या विविध शाखांमध्ये दुमत असण्याची शक्यता नाही ; फरक असण्याची शक्यता असते ती फक्त ध्येयसिद्धीच्या प्रमाणांत ! या संदर्भातील भूगोलाचे यश, अन्य शास्त्रांनी संपादन केलेल्या अशाप्रकारच्या यशांबरोबर तोलून पहाण्याचा मोह व्हावा, इतके श्रेष्ठ दर्जाचे नाही, ही गोष्ट निर्विवाद आहे. म्हणूनच, अशाप्रकारच्या तुलना करण्याची हौस असणाऱ्यांनी भूगोलक्षेत्राला ' खालच्या दर्जाचे ' स्थान दिले म्हणून अपमानित होण्याचे कारण नाही. स्पर्धेतील यशापयशाबद्दल निर्णय देताना कोणीही समंजस निरीक्षक केवळ यशापयशाच्या प्रमाणाच्या भाषेत निर्णय देणार नाही, तर अंगीकृत कार्याच्या काठिण्याच्या भाषेतही निर्णय देईल.

विश्वव्यापकता व क्रमबद्धता या शास्त्राच्या दुसऱ्या दोन ध्येयांचा पाठलाग भूगोल ज्या पद्धतीने करतो त्या पद्धतींचा विचार हाच, एक अभ्यासक्षेत्र या नात्याने भूगोलाचे स्वरूप समजून घेण्याचे कामी, सर्वाधिक महत्त्वाचा आहे. ज्या दोन ध्येयांचा आताच आपण विचार केला त्यांच्याप्रमाणे ही दोन ध्येये सहज समजण्याइतकी सोपी नाहीत. म्हणून, त्यापैकी प्रत्येकाचे तपशीलवार विवेचन करणे भाग आहे.

## 'ड' – भूगोलातील प्रजातिविषयक संकल्पना व तत्त्वे

गॅलिलिओने निरनिराळ्या वजनाच्या दोन विशिष्ट वस्तू पिसाच्या झुकत्या मनोऱ्यावरून खाली सोडल्या, तेव्हा त्या दोनही वस्तू एकाच वेळी व एकाच वेगाच्या गतीने जमिनीवर पडल्या. त्याच्या या सुप्रसिद्ध प्रयोगाने येवढ्याच एका गोष्टीचे प्रात्यक्षिक झाले असते, तर त्या वस्तुस्थितीला शास्त्रीय ज्ञानजगात नगण्यस्थानच मिळाले असते. पण, नंतरच्या प्रयोगांनी असे सिद्ध करून दाखविले, की त्याने एका विश्वव्यापी सत्याचे सोदाहरण स्पष्टीकरण केले. म्हणजेच, कोठेही, केव्हाही व कोणीही तशी वजने खाली टाकली, तरी, निरपेक्षपणे, हाच संबंध खरा होता ; आणि हेच त्या प्रयोगाचे मोठे महत्व होते. अशा प्रकारच्या विश्वव्यापी सत्यांच्या शोधात रहाणे हे शास्त्राचे मूलभूत कार्य आहे, या बाबत कोणीच विवाद करणार नाही. उलट, अन्यस्थळी व अन्यकाळी तसे निर्णय मिळू शकले नाहीत असे प्रयोगांती नंतर सिद्ध झाले असते, पण त्या एका प्रसंगी तसे वेगळे निर्णय नक्कीच मिळाले या वस्तुस्थितीचे सत्यत्त्व सिद्ध झाले असते आणि त्याचे उत्तरही पुढे कधी सापडले नसते, तरीही शास्त्रीय ज्ञानाचाच एक अंश त्या प्रयोगाने मिळाला होता. बॅरी म्हणतो त्याप्रमाणे, " शक्य असेल तितके ज्ञान संपादन करणे हाच शास्त्राचा व्यवसाय आहे (११४, १२२). ते विश्वव्यापी सत्यांच्या शोधात असते हे खरे असले तरी, आणि एखाद्या गोष्टीचे स्पष्टीकरण विश्वव्यापी सत्यांच्या भाषेतच देता आले नाही तरी, –आणि पुढेही कधी देण्याची शक्यता नसली तरी –त्या निश्चित व अचूक ज्ञानांशाकडे शास्त्र दुर्लक्ष करू शकत नाही ; कारण, सत्यस्थितीचे परिपूर्ण ज्ञान मिळविणे हेच शास्त्राचे गृहीत-सिद्धान्तात्मक ध्येय आहे. " अर्थातच, विश्वव्यापी तत्त्वांच्या भाषेत शक्य असेल तेवढ्या पूर्णपणे ; आणि कोणत्याही परिस्थितीत कोणत्या तरी प्रकारे, ते ज्ञान स्पष्ट झालेले असले पाहिजे.

प्रत्येकजण शास्त्रीय क्षेत्रात विश्वव्यापी सत्यांना असलेले महत्त्व एका बाजूने मानत असतानाच जे अद्याप तरी विश्वव्यापी सत्यांच्या भाषेत सांगता येत नाही, अशा ज्ञानक्षेत्राच्या दुसऱ्या भागाकडे दुर्लक्ष करण्याची सामान्य चूक दुसऱ्या बाजूने करत असतो. पुष्कळजण असेच गृहीत धरून चालतात, की नियम व तत्त्वे यांचा विकास करणे येवढ्याच एका गोष्टीशी शास्त्राचा संबंध आहे. गेल्या शतकात, खगोलशास्त्र, पदार्थशास्त्र, रसायनशास्त्र या क्षेत्रांत नियम व तत्त्वे यांच्या विकासाला आलेल्या अमाप पिकाचे प्रतिबिंब या संकल्पनेच्या रूपाने उमटलेले दिसते, असे हेटनरचे मत आहे (१६१, २२१ ते २४). किंबहुना, पदार्थशास्त्र व रसायनशास्त्र ही केवळ अमूर्त शास्त्रे आहेत –पण, शुद्ध गणितापेक्षा वेगळी आहेत –आणि त्यांचा संबंध फक्त नियम व तत्त्वे यांच्याशी आहे, असे गृहीत धरले गेले. पण, सत्यस्थितीशी संबंधित असलेले कोणतेही शास्त्र केवळ नियम व तत्त्व रचना करण्याची मर्यादा स्वतःवर घालून घेऊ शकणार नाही, ही गोष्ट पुष्कळशा शास्त्रज्ञांना व शास्त्रतत्त्वज्ञांना अगदी अलीकडेच कळून चुकली आहे. ही शास्त्रे विश्वव्यापी सत्यांच्या आकलनासाठी धडपडत असली, तरी सत्यस्थितीचे संपूर्णक्षेत्र ती व्यापूच शकणार नाहीत. प्रत्येक क्षेत्रात काही तरी अज्ञेय,

अनिवेदनीय व अनिर्वचनीय असा अंश शिल्लक राहाणारच. त्याच्याकडे दुर्लक्ष केले, तर आपले ज्ञान अपेक्षेप्रमाणे परिपूर्ण होऊ शकणार नाही ; आणि हा अनवस्थाप्रसंग कोणतेच शास्त्र मान्य करणार नाही. लेहमान म्हणतो, की " शक्य असेल तितक्या परिपूर्ण रूपात ज्ञान सादर करण्याचा प्रयत्न म्हणजेच अनुसंधान होय " (२५४, २९९).

विश्वव्यापी-सत्य-रूपाने स्पष्ट करून सांगता येण्यासारखा शास्त्रीय क्षेत्राचा भाग आणि आपल्यापरीने अभ्यासपात्र असलेली एखादी घटना अथवा यांच्याशी संबंधित असलेला शास्त्रीय क्षेत्राचा भाग या दोहोतील विरोधानेच विंडलबाट व रिकर्ट या दोन जर्मन तत्त्वज्ञांचे विशेष लक्ष विसाव्या शतकाच्या सुरूवातीच्या काळात वेधून घेतले होते (पहा : हेटनर चर्चा १११, २५४ ते ५९ ; किंवा १६१, २२१ ते २२४ ; आणि ग्राफ १५६ ; आणि याबरोबरच या दोघांमधील चर्चा). त्यांनी या आधारावर शास्त्राचे वर्गीकरणही केलेले दिसते. ' नोमोथेटिक ' म्हणजे विधिनियम तयार करणारी शास्त्रे आणि ' इडिओग्राफिक ' म्हणजेच ' आइनमालिग ' अर्थात अनन्यसाधारण गोष्टींशी संबंधित असलेली शास्त्रे असा भेद वर्गीकरणासाठी दाखविला आहे. ही विभागणी पुष्कळशी निसर्गनिष्ठ शास्त्रे आणि समाजनिष्ठ शास्त्रे या रूढ विभागणीसारखीच असल्यासारखे दिसते.*

पण शास्त्रक्षेत्राच्या सर्वच शाखांतून शास्त्रीय ज्ञानाच्या अशा प्रकारच्या दोन बाजू असतात, असे स्पष्टपणे दिसून येते (C/o श्ल्यूटर १३१, ५१०f). सामान्य सिद्धान्त आणि विधिनियम सांगणे येवढेच शास्त्राचे प्रयोजन असते, या सर्वमान्य कल्पनेचा स्वीकार –करणे हे मध्ययुगीन पंडिती वास्तववादावरील असाधारण श्रद्धेचेच लक्षण आहे, अशी हेटनर यावर टीका करतो. उलटपक्षी, " प्रत्यक्ष सत्यस्थितीचे ज्ञान, म्हणजेच, परिस्थिती व प्रसंग या रूपांनी दिसणाऱ्या वेगवेगळ्या वस्तुस्थितींचे ज्ञान या अंतिम हेतूच्या सिद्धीची ती केवळ साधने आहेत " (C/o क्राफ्ट १६६, ११-१३).** खगोलशास्त्रज्ञ जेव्हा खगोलीय यंत्रशास्त्राचे नियम विकसित करण्याचा प्रयत्न करत असतो, तेव्हा खगोलांच्या हालचालींचे यथातथ्य आकलन करून घेता यावे हाच त्याचा हेतू असतो ; न होऊन, विश्वाचे नियंत्रण विधिनियमांनी होत असते हे सिद्ध करण्याचा त्याचा हेतू नसतो, कारण हे प्रमेय तत्त्वज्ञानाधिष्ठित आहे, त्याला शास्त्राधिष्ठित म्हणता येणार नाही. त्या खगोलांकडे आपले लक्ष एक वेगळी वस्तू या नात्यानेच राहिले पाहिजे, हे तो विसरलेला नसतो. चंद्राच्या दृश्य भागाचे नकाशे तयार करणारे अथवा शनीच्या कड्यांचा अभ्यास करणारे अभ्यासक आपल्या अभ्यासाने अशाप्रकारचे नियम प्रस्थापित करू शकत नाहीत, म्हणून ते कमी दर्जाचे शास्त्रज्ञ असतात असे म्हणता येणार नाही.

काही शास्त्रांतून अभ्यासिल्या जाणाऱ्या घटनेचे स्वरूपच असे असते की, विधिनियम तयार करण्यास आवश्यक असलेले ज्ञान मोठ्या प्रमाणात विकसित होण्यास पुरेसा अवकाश असतो. याविरूद्ध, दुसऱ्या काही शास्त्रांत अभ्यासिल्या जाणाऱ्या घटनाघटनांमधील फरक,

---

*पुरवणी टीप क्र. ४६ पहा.

** हे अवतरण हेटनर वरून घेतलेले आहे.

आणि त्यांपैकी प्रत्येकाचे मानवाच्या दृष्टीने असलेले महत्त्व, यांमुळे त्या क्षेत्रांतील अभ्यासकांना –त्यांची इच्छा असो वा नसो –असामान्यांचाच विचार अधिक प्रमाणात करणे भाग पडते. म्हणूनच, शास्त्र विविध शाखांमध्ये महत्त्वाचे व कायमचे अंशात्मक फरक निर्माण करणारी ही एक महत्वाची गोष्ट आहे.

या दृष्टिकोणातून केलेली शास्त्राच्या विविध शाखांची तुलना भूगोलाच्या स्वरूपाचे आकलन करून घेण्यास मदत करील, अशी शक्यता आहे, आणि भूगोल हे कोणत्या प्रकारचे शास्त्र आहे याचा बोध करून घेण्यास मदत करील, अशीही शक्यता आहे.

शास्त्राच्या सर्वच शाखा, काही प्रमाणात, असामान्याच्या अभ्यासांबरोबरच विश्वव्यापकांचाही अभ्यास करण्यात गुंतलेल्या असतात, असे आम्ही वर सुचविले आहे. त्यांतील पुष्कळशा अभ्यासकांचे प्रत्यक्ष कार्य, पूर्णांशाने नसले तरी बहुतांशाने, विश्वव्यापकांच्या शोधनातच गढून गेलेले असते ; आणि असामान्यांच्या अभ्यासाचे कार्य दुसऱ्या अभ्यासकांकडे किंवा त्या शास्त्राच्या अन्य विभागांकडे सोपविलेले असते. अशी स्थिती पदार्थशास्त्रात आणि रसायन शास्त्रात, विशेषतः त्यांच्या औपपत्तिक बाजूने, असण्याची शक्यता आहे असे आम्ही गृहीत धरतो. जीवविषयक शास्त्रांतून, आणि मानसशास्त्रातही, कमीजास्त प्रमाणात, हीच गोष्ट खरी आहे. (ज्या विषयांचे काहीच प्रशिक्षण घेतलेले नाही अशा क्षेत्रांच्या स्वरूपाची चर्चा करत राहणे हे जितके न्यायविरूद्ध आहे तितकेच ते धोक्याचेही आहे. पण, मी येथे येवढेच सांगण्याची परवानगी घेतो, की, या आणि यांपुढील परिच्छेदांतील विधाने त्या त्या क्षेत्रांतील माझ्या सहाध्यायांशी केलेल्या चर्चेवर आधारलेली आहेत).

पण, बहुतेक सर्व शास्त्रांच्या काही विशिष्ट शाखांतील अभ्यासकांचा संबंध स्वतंत्र वस्तूंच्या, म्हणजेच असामान्यांच्या, अभ्यासाशी मोठ्या प्रमाणात असतो. अभ्यासांच्या या प्रकाराचे महत्त्व खगोलशास्त्रात किती मोठे आहे, हे आम्ही यापूर्वीच दाखवून दिले आहे. भूशास्त्रातही असामान्यांचा विचार करणाऱ्या अभ्यासांना, प्रमुख नसले तरी, बरेच महत्त्वाचे स्थान असते. तीच परिस्थिती प्राचीन प्राणिजीवनशास्त्रात असल्याचे स्पष्टच दिसते. खनिज निक्षेपांच्या सामान्य तत्त्वांचा विकास करण्याऐवजी, जेव्हा अभ्यासक काही विशिष्ट निक्षेपांचे परिपूर्ण ज्ञान संपादन करण्याच्या निमित्ताने तशा प्रकारच्या निक्षेपांवरच लक्ष केंद्रित करतात, तेवढ्याप्रमाणात तरी खनिज शास्त्राच्या क्षेत्रातही हीच गोष्ट खरी ठरते. विशिष्ट क्षेत्रांचे क्षेत्रांतर्गत भूशास्त्रीय नकाशे काढण्याच्या निमित्ताने केलेल्या भूशास्त्रीय पर्यवेक्षणाच्या निश्चितपणे मोठ्या व मौलिक कार्याला तर हे विधान अधिकच लागू पडणारे आहे. (खरे पहाता, तर्कदृष्ट्या, याला भूशास्त्रज्ञांनी संवर्धित केलेली भूगोलाची शाखा, असेही म्हणण्यास हरकत नाही).

वर नावनिशीवार दिलेल्या नैसर्गिक शास्त्रांपेक्षाही, अर्थशास्त्राने विश्वव्यापी सत्यांसंबंधींचे आपले ज्ञान कदाचित अधिक प्रमाणात विकसित केले आहे. राजनीतिशास्त्रात ज्याचा उल्लेख " औपपत्तिक राजनीती " म्हणून केलेला असतो तेवढ्याच शाखांतून विश्वव्यापी सत्यांचा विचार प्रामुख्याने केला जात असतो. तौलानिक शासन या विषयाचे अभ्यासक शासनविषयक सामान्य तत्त्वांचा विचार करतातच, पण वेगवेगळ्या शासनसंस्थांतील भेदांचे ज्ञान मिळवण्याकडे व त्यांचे आकलन करून घेण्याकडे त्यापेक्षाही अधिक लक्ष पुरवितात. विश्वव्यापी सत्यविषयक व असामान्य वस्तुविषयक अभिरूचींचा संगमच या अभ्यासकांच्या रूपाने होत असतो. पण, पदार्थशास्त्रात व जीवशास्त्रात, आणि कदाचित अर्थशास्त्रातही, या दोन प्रकारांचे अभ्यास वेगवेगळ्या अभ्यासकांमध्ये विभागले जाण्याची शक्यताच अधिक असते. राजनीतिशास्त्रात ही अवस्था ज्यामुळे निर्माण झाली ती परिस्थिती आणि भूगोलातील परिस्थिती या दोहोत पुष्कळच साम्य असल्यामुळे, त्या परिस्थितींचे विश्लेषण करणे उद्‌बोधक होण्याची शक्यता आहे.

पहिली परिस्थिती अशी, राजनीतिशास्त्रातील बहुतेक सर्व घटनांचा एकत्रित विचार करत असता, प्रजाति-वर्णनांतून सर्वसाधारण रूपधेयांसंबंधींची केवळ रूपरेषा मिळते, पण प्रत्येक वेगळा नमुना अन्य रूपधेयांच्या बाबतीत लक्षणीय फरक असल्याचे दाखवत असतो. रचनेच्या दृष्टीने पहाता, या घटना पदार्थशास्त्रातील, अथवा अर्थशास्त्रातीलही, घटनांपेक्षा कितीतरी अधिक जटिल असतात ; आणि त्या घटना प्राणिजीवनासंबंधींच्या नमुन्यांपेक्षा कमी जटिल दिसल्या तरी, जीवविषयक शास्त्रातील नमुने, प्रजाति, जाति आणि प्रती यांच्या समान उत्पत्तीमुळे जीवविषयक विविध घटनांत आढळणाऱ्या उच्च कोटीच्या सरूपतेचा त्यांच्या ठिकाणी अभावच असतो. अनुसंधान कार्य करणाऱ्या औषधिवैद्याच्या दृष्टीने, " प्रत्येक मानवी-शरीर वेगळे आणि असामान्य असते. प्रत्येक मज्जारज्जू दुसऱ्या मज्जारज्जूंपेक्षा वेगळा असतो. " —मात्र, मानव-शरीरशास्त्राच्या अभ्यासकाला तसे वाटत नाही. हे खरे असले तरीही, हे फरक एकाच प्रकारच्या दोन शासनांमध्ये आढळणाऱ्या फरकांपेक्षा फारच किरकोळ असतात. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे झाले तर, जातिपातळीवरून केलेले मानवी मज्जारज्जूचे वर्णन कोणत्याही दुसऱ्या मज्जारज्जूचे बऱ्याच मोठ्या प्रमाणात जवळजवळ परिपूर्ण चित्र उभे करू शकते. पण, अशाच दृष्टिकोणातून एखाद्या शासनाचे चित्र तसे उभे करणे शक्य होत नाही. एखाद्या शरीरशास्त्रज्ञाला ज्या प्रमाणात मानवी रज्जूचे ज्ञान झालेले असते, तितक्या प्रमाणात एखाद्या राजनीतिशास्त्रज्ञाला शासनसंस्थेबद्दलचे ज्ञान संपादन करावयाचे असेल, तर प्रत्येक नमुन्याच्या असामान्य लक्षणांकडे कितीतरी अधिकांशाने लक्ष पुरविणे भाग पडेल.

शिवाय, एका स्वतंत्र मानवी मज्जारज्जूच्या तुलनेने एका स्वतंत्र शासन संस्थेला दिले जाणारे अत्यधिक महत्त्व हेही, एका स्वतंत्र शासनसंस्थेकडे अधिक लक्ष पुरविले जाते याचे दुसरे एक कारण आहे. ही दुसरी परिस्थिती सर्वचबाबतीत खरी असते. एकेक प्रसंग या

दृष्टीने राजनीतिशास्त्रातील घटना इतक्या महत्त्वाच्या मानल्या जात असतात की, त्यातील प्रत्येक घटना शक्य असेल तितक्या परिपूर्णपणे समजून घ्यावीच लागते. उदाहरणार्थ : हुकूमशाहींचा अभ्यास करणाऱ्या एका शास्त्राने त्यावरून प्रजातिसंकल्पना आणि सामाजिक नियम याचा विकास करता येईल इतकाच त्यांचा अभ्यास करावयाचा, पण इटलीतील प्रचलित शासनाचा (फॅसिस्ट शासनाचा) व त्याबरोबर जर्मनीच्या प्रचलित शासनाचा (नाझी शासनाचा), त्या घटना असामान्य स्वरूपांच्या आहेत या सबबीवर, अभ्यास करण्यास नकार द्यावयाचा असे ठरविले, तर त्या शास्त्राने अखिल मानव जातीचे कधीच समाधान होणार नाही. मग एखाद्या अभ्यासकाची वैयक्तिक पसंती काहीही असो !

तिसरा एक विचार व्यावहारिक अर्थाचा आहे. जगात कोट्यावधी मानवी मज्जारज्जू असल्यामुळे, एक स्वतंत्र शास्त्रज्ञच काय पण शास्त्रज्ञांचा एक संपूर्ण गटही, मज्जारज्जूंची जी रूपे सापेक्षतः विश्वव्यापी असतात अशा रूपांचाच अभ्यास करण्यात गुंतवून ठेवण्यास काहीच हरकत नाही. या अभ्यासांतून मज्जारज्जूविषयक पुरेसे विश्वव्यापक ज्ञान संपादन करणे त्याला शक्य होईल ; पण त्याबरोबरच, त्याच्या स्वतःच्या मर्यादांचेही तो समर्थन करू शकेल. साहजिकच, सर्व स्वतंत्र लक्षणांचा अभ्यास इतर शास्त्रज्ञांना करण्याची मोकळीक राहील. पण, राजनीतिशास्त्रज्ञांना संपूर्ण इतिहासभांडाराचे आलोकन करूनही सर्वप्रकारच्या मिळून काही थोड्या हुकूमशाहीपलीकडे अभ्यासासाठी अधिक सामग्री मिळण्याची शक्यता नाही, आणि एकाच विशिष्ट हुकूमशाहीचे तर हाताच्या बोटांवर मोजता येतील इतकेच नमुने आढळून येतील. अशा स्थितीत, आपल्या स्वतःवर प्रजातिरूपांचाच अभ्यास करण्याची मर्यादा घालून घेऊन, स्वतंत्र नमुन्यांचे विवेचन करण्यास, ते असामान्य असतात या सबबीवर, नकार देणे हे केवळ असमंजसपणाचे होईल. याच्या विरूद्ध दिशेने विचार यापेक्षाही अधिक महत्त्वाचे आहे. सर्वच मानवी मज्जारज्जूंच्या वेगवेगळ्या लक्षणांचा अभ्यास करण्याइतका वेळ मानवी-शरीर-शास्त्रज्ञांना मिळण्याची शक्यताच नाही. पण राजनीतिशास्त्राच्या क्षेत्रात, मात्र, जगातील सर्व शासनसंस्थांचा वेगवेगळा अभ्यास करणे, ही गोष्ट अशक्य कोटीतील समजली जाणार नाही.

हाच विचार मोठ्या प्रमाणात, आणि कदाचित अधिक जोराने, इतिहासक्षेत्रास लागू पडतो, ही गोष्ट अगदी स्पष्ट आहे. कोणाही एका इतिहासकार व्यक्तीने अथवा इतिहासकारांच्या गटाने शासन घटना, युद्धे आणि लढाया अशा विषयांच्या इतिहासांच्या अभ्यासांच्या मर्यादा घालून घेण्यास काहीच हरकत नाही, आणि अशा प्रकारच्या अभ्यासांवरून सामान्यतत्त्वे व विधिनियम निष्कर्षरूपाने रचण्यासही हरकत नाही ; कारण, ती तत्त्वे व ते नियम इतिहासातील कालखंड आणि घटनाक्रम यांच्या अभ्यासात रस घेणाऱ्या सर्वसाधारण इतिहासकारांच्या दृष्टीने फार मौलिक असतात. या पद्धतीमुळे अशा प्रकारचे इतिहासकार सैनिकीशास्त्राचे अथवा घटनात्मक शासनशास्त्राचे अभ्यासक म्हणून गणले जातील की काय, या प्रश्नाचे उत्तर आपल्याला शोधत बसण्याची गरज नाही. एक गोष्ट निश्चित आहे की, इतिहासाचा केवळ एक अंशच अशा प्रकारच्या अभ्यासग्रंथांतून सादर केला जात असतो.

*आता, आपल्याच क्षेत्राचा विचार आपण करू लागलो, तर स्वतंत्र घटनांच्या विवेचनाशी भूगोलाचे अति घनिष्ठ संबंध असतात, असेच दिसून येईल. घटनेच्या सापेक्ष महत्त्वाकडे दुर्लक्ष करून, केवळ तिच्या असामान्यत्त्वामुळे एखाद्या घटनेच्या विवेचनात स्वतःला पूर्णपणे विसरून जाण्याकडेच भूगोलकारांचा कल असतो, अशी शंका काही टीकाकारांना येण्याची शक्यता आहे हे खरेच. ज्याला काही भौगोलिक महत्त्व असल्याचे दाखविता येण्याची शक्यता नाही असे भूपृष्ठावरील प्रत्येक रूपधेय, त्याच्या सापेक्ष महत्त्वाचा विचार न करताच, अभ्यासासाठी घ्यावयाचे ठरविले, तर भूगोलविषयक सामग्रीच्या या अनुल्लंघनीय डोंगराखाली भूगोल स्वतःच असा दडपला जाईल की, त्याला डोके वर काढण्याची आशाही राहणार नाही, हे अगदी उघड आहे. प्रत्येक लहानसहान तालुकाच काय, प्रत्येक खेडे, डोंगर, इतकेच नाही तर भूपृष्ठावरील प्रत्येक ओहोळ हे सर्वच अभ्यासांचे विषय होऊन बसतील.

उलटपक्षी, प्रजाति परिभाषेची मर्यादा सांभाळून केलेले भौगोलिक वर्णन समर्पकच असते. एका मोठ्या क्षेत्राच्या त्रोटक व वरकरणी वर्णनातही त्यातील स्वतंत्र रूपधेयांचा मोठ्या संख्येने नामनिर्देश करून त्यांचे वर्णन देणे आवश्यक होते. आल्पस् व हिमालय यासारखे पर्वत, मौंट रेनर व व्हेसुव्हियस यासारखे डोंगर, ॲमेझोन, मिसिसिपी यासारख्या नद्या, किंवा नायगारा धबधबा, जर्मनी अथवा संयुक्त संस्थानांसारखी राज्ये, लंडन, पॅरिस अथवा न्यूयॉर्कसारखी शहरे —यांचा वर्णन केलेल्या क्षेत्रात अंतर्भाव असेल, तर —यांच्याकडे विशिष्ट प्रकारांची उदाहरणे अथवा विशिष्ट तत्त्वांच्या स्पष्टीकरणार्थ दिलेली उदाहरणे या दृष्टीने कोणीच पाहणार नाही. त्यांच्या स्वतःच्या वैयक्तिक महत्त्वाच्या दृष्टीनेच त्यांच्याकडे पाहिले जाईल (C/o हेटनर १६१, २२१ ते २२४).

याचे एक कारण असे की, कोणतेही प्रजातिनिष्ठ वर्णन कितीही तपशीलवार केलेले असले, तरी अशा स्वतंत्र रूपधेयांचे चित्र उभे करण्याच्या दृष्टीने अगदीच असमर्पक असते. जीवशास्त्रज्ञ जेव्हा एखाद्या पेशीकेंद्राचे वर्णन करतो, तेव्हा तशाप्रकारच्या पेशीकेंद्राचे पुष्कळसे परिपूर्ण चित्र तो उभे करू शकतो. पण, शिकागोच्या व्यापार-केंद्रांचे परिपूर्ण ज्ञान एखाद्याला झाले, तरीही मिनापोलिसच्या समांतर बाजारपेठेचे ज्ञान करून घेताना त्याला त्याचा फारसा उपयोग होणार नाही. मोठ्या नगराच्या नावाचे केवळ अनुकरण करावयाचे म्हणून मिनापोलिसच्या नागरिकांनी आपल्या शहराच्या व्यापारी केंद्राला " लूप " म्हणावे, या गोष्टीचे समर्थन फक्त ' सामान्य सरूपतेची ओढ ' या शब्दांनीच करावे लागेल. प्रत्यक्षात, शिकागोतील रस्ते आणि मोटारगाड्यांचे उंच मार्ग ज्याप्रकारे वळसे घेत असतात, तशा प्रकारचे वळसे मिनापोलीसच्या रस्त्यांना व गाड्यांच्या मार्गांना घ्यावे लागत नाहीत.

वरील उदाहरण अगदी दुय्यम दर्जाच्या तपशिलावर आधारलेले आहे असे वाटले, तर महासरोवरांचा क्रमबंध अथवा न्यूयॉर्क शहर या सारख्या भौगोलिक रूपधेयांचा विचार करावा. तसे पाहिले तर कितीतरी मोठी सरोवरे आफ्रिकेतही आहेत. पण एकमेकाशी

*पुरवणी टीप क्र. ४७ पहा.

जोडलेल्या गोड्यापाण्याच्या सागरांचा क्रमबंध या स्वरूपात उत्तर अमेरिकेच्या महासरोवरांचे प्रतिरूप पृथ्वीवर अन्यत्र कोठेही सापडणार नाही —आणि आपल्याला असलेल्या माहितीनुसार विश्वातही कोठे सापडणार नाही तसेच, एका संपूर्ण खंडाच्या बऱ्याच मोठ्या भागाच्या व्यापाराचा केंद्रबिंदू या त्याच्या मूलभूत स्वरूपातच न्यूयॉर्क शहराचा विचार करावयाचे एखाद्याने ठरविले, आणि नंतर येवढ्याच एका दृष्टीने त्याचे प्रतिरूप कोठे सापडते हे तो शोधू लागला, तर, न्यूयॉर्कचे स्थानिक स्वरूप पूर्णपणे दृष्टिआड करूनही, याप्रकारचे कोणतेच दुसरे शहर जगाच्या पाठीवर त्याला आढळणार नाही. शांघाय, ब्यूनास आयर्स व हाम्बुर्ग हीही एकेका विस्तृत क्षेत्राची व्यापारी केंद्रे आहेतच ; पण त्यांतील कोणतेच शहर, उत्तर अमेरिका खंडाच्या दृष्टीने न्यूयॉर्क शहर जे महत्त्वाचे कार्य बजावते, तसे कार्य आपापल्या विशिष्ट खंडासाठी करत नाही.

एव्हाना, कोणाही बहुश्रुत वाचकाच्या लक्षात आले असेल की, या नजरेत सहज भरणाऱ्या बाबी असल्यामुळे, अगदी किरकोळ महत्त्वाच्या रूपधेयांसह सर्वच भौगोलिक रूपधेयांना लागू पडणारा एक सामान्य नियम त्यांच्यांतून मांडता येतो. रूपधेयांचे वर्णन प्रकारांच्या परिभाषेत समर्पकपणे दिले जात नसल्यामुळेच, इतरेजनांबरोबर भूगोलकारांनाही, संबंधसादृश्यांचा आश्रय घ्यावा लागतो. अर्थात्, त्यांचेही काही महत्त्व असण्याची शक्यता आहेच. तरीही, त्यांचा फार गंभीरपणे उपयोग केला गेला, तर ती फसवी असतात. हँकौला 'चीनचे शिकागो' म्हणणे, किंवा पिटस्बर्ग-क्लेवलँड क्षेत्राला अमेरिकेचे ऱ्हूर म्हणून संबोधने म्हणजे, अंशतः खरा असला तरी, अंशतः खोटा ठसा उमटविण्यासारखेच आहे.

यावरील उदाहरणाने दुसऱ्या एका विचाराचेही स्पष्टीकरण होते. भूगोलाला पुष्कळशा घटनांचा वेगळाच विचार करावा लागत असतो. स्वतंत्र घटना या नात्यानेही त्यांचे महत्त्व लक्षात घेतले जात असते. याचा अर्थ, जगाच्या दृष्टीने त्याची उपयुक्तता लक्षात भरत असते येवढाच होत नाही, तर भूपृष्ठाच्या दृष्टीने असलेले आणि अगदी शैक्षणिक आधाराने मापलेले त्या घटनेचे महत्त्वही लक्षात घेतले जाते. प्रत्यक्षात असो की, सुप्त-स्वरूपात असो नायगारा धबधब्याचे भौतिक महत्त्व शून्यप्राय मानले तरीही, इतर शेकडो धबधब्याप्रमाणेच एक विशिष्ट प्रकारचा धबधबा असे केवळ त्याचे वर्गीकरण करणारे वर्णन वाचून कोणत्याच भूगोलशास्त्रज्ञाचे समाधान होणार नाही. आपल्या सर्व वैयक्तिक लक्षणांनी युक्त अशी ही घटना, मनुष्याच्या दृष्टीने तिच्या स्वतःपुरतीच, एक शास्त्रीय घटना आहे.

भूगोलातील हे असामान्यांचे महत्त्व घटनांपुरतेच मर्यादित नसून, दोन घटनांमधील अनुबंधांनाही भूगोलात तितकेच महत्त्व दिले जाते. सरोवरे, उत्तरेकडील नापीक प्रदेश आणि दक्षिणेकडील आंतरराष्ट्रीय सरहद्द यांच्याशी असलेला विनिपेगचा अनुबंध मूलतःच असामान्य आहे, आणि या कारणानेच आपण त्यांच्याकडे दुर्लक्ष करू शकत नाही.

जणू काही, इतिहासाप्रमाणे भूगोलही असामान्यांच्याच अभ्यासाची मर्यादा पाळत आला आहे, असे कोणालाही वाटण्याची शक्यता आहे. खरे म्हणजे, गेल्या शतकांपर्यंत तशीच परिस्थिती होती, यात काहीच शंका नाही ! हेटनर म्हणतो त्याप्रमाणे, " भूगोल हा अशा असामान्यांच्या वर्णनांनीच जखडून टाकलेला होता. . . . . सर्वसाधारण संकल्पना फक्त ढोबळ स्वरूपात, आणि त्याही, पर्वत, दऱ्या, शहरे इत्यादि सामान्य प्रकारबोधक संज्ञांनी व्यक्त केल्या गेलेल्या आढळतात. "(१६१, २२I). ही परिस्थिती अटळ असल्यामुळे, जसे कोणी केवळ विधान केल्याने, शास्त्र या नात्याने भूगोलावर टीकास्त्र सोडल्यासारखे होत नाही, तसे ते इतिहासावरही होत नाही. बॅरीचे हे विधान नकारार्थीही व्यक्त करता येण्यासारखे आहे. ज्याचा अभ्यास करणे अशक्य आहे त्याचा अभ्यास करत बसणे हा शास्त्राचा उद्योग नव्हे !

उलटपक्षी, आपल्या समोरील घटनांच्या व्यक्तिगत लक्षणांच्या आणि अनुबंधांच्या अभ्यासांवर समाधान मानणारा, पण, प्रजातिसंकल्पना आणि विश्वव्यापक तत्त्वे यांचा विकास करण्याच्या आलेल्या प्रत्येक संधीचा उपयोग करण्यात कुचराई करणारा भूगोल शास्त्राच्या एका प्रमुख प्रमाणास मुकलेला असेल. म्हणूनच, हेटनरच्या पुढील मताशी आपल्याला सहमत व्हावयास हरकत नाही. एकदा शास्त्रीय क्षेत्राच्या एका शाखेतील आणि नंतर दुसऱ्या शाखेतील, क्रमबद्ध शास्त्रांचे निष्कर्ष घेऊन त्यांचा विकास करत करत प्रजातिसंकल्पनांवर आधारित सामान्य निरीक्षणांपर्यंत भूगोल मजल मारतो, ही वस्तुस्थितीच भूगोलाची जास्तीतजास्त शास्त्रीय प्रगती दाखविते. (तसेच सॉरने घेतलेले पी. बार्थ यांच्या ग्रंथातील अवतरण पहा, २११, २७).

भूगोलाशी संबंधित असलेल्या नैसर्गिक घटनांच्या बाबतीत झालेली प्रजातिसंकल्पनांच्या विकास कार्याची प्रगती, संबंधित सांस्कृतिक घटनांच्या बाबतीपेक्षा, खूपच अधिक आहे, यात शंका नाही. पुष्कळशा देशातून भूशास्त्र व अन्य भौतिकशास्त्रे यांच्या बरोबर असलेले भूगोलाचे संबंध घनिष्ठ होते हे या प्रगतीचे एक कारण असून, गतशतकात भौतिक घटनांशी संबंधित असलेल्या क्रमबद्धशास्त्रांची झालेली प्रगती सांस्कृतिक घटनांशी संबंधित असलेल्या क्रमबद्ध शास्त्रांच्या प्रगतीच्या तुलनेने अधिक आहे, हे प्रगतीचे दुसरे कारण आहे. तरीही, क्रमबद्ध भूगोलाच्या प्रत्येक विभागातून अशा प्रगत जातिसंकल्पनांची उदाहरणे देणे शक्य आहे.

एखाद्या विशिष्ट रूपधेयाची पुष्कळशी लक्षणे एकाच शब्दाने अथवा वाक्यांशाने –अथवा क्वचित cfb या सारख्या चिन्हाने स्पष्ट करून दाखविणे शक्य होते, आणि सहज लक्षात ठेवता येईल असे संक्षिप्त वर्णन करणेही आपल्याला शक्य होते, याचे सर्व श्रेय अशाप्रकारच्या प्रजाति संकल्पनांना द्यावयास पाहिजे. जगाच्या विविध भागांत ज्यांची पुनरावृत्ती झालेली दिसते अशा विविध कारकांमधील अनुबंधांची तत्त्वे विकसित करणेही अशा प्रजातिसंकल्पनांच्याच वापरामुळे शक्य झाले आहे. नंतर, हीच तत्त्वे विशिष्ट प्रकारच्या क्षेत्रांतून दिसून येणाऱ्या घटनांच्या एकसंधीकरणाचा अभ्यास करण्याचे कामी उपयोगी पडण्याची शक्यता असते.

इ-१५५७-३२ ब.

विविध प्राकृतिक रूपधेयांमधील अनुबंधांच्या संदर्भातील सामान्यतत्त्वे अगदी पूर्णपणे विकसित झालेली असतानाच, एखादे पीक, एखादा विशिष्ठ प्रकारचा कारखाना अथवा एखादें शहर यासारख्या विशिष्ट सांस्कृतिक बाबींचे आणि त्यांच्यांशी संबंधित असलेल्या अन्य सर्व रूपधेयांचे अनुबंध याविषयीच्या सामान्य तत्त्वांतही प्रगती करण्यात आलेली आहे. आर्थिक भूगोलाच्या प्रत्येक विभागात आणि काही प्रमाणात भूगोलाच्या अन्य सांस्कृतिक विभागांत अशीच तत्त्वे विकसित करण्यात आली आहेत.

म्हणूनच भूगोल हे, काही प्रमाणात, विधिनियम सादर करणारे अथवा सामान्य सिद्धान्त मांडणारे एक शास्त्र आहे. हेटनर आणि पेंक या दोघांनी याबाबतीत इतिहासापेक्षा भूगोलच वरचढ आहे असा निष्कर्ष काढला आहे. (१६१, २२३ ; १५८). तरीपण, क्रमबद्ध समाजशास्त्रांनी प्रतिपादन केलेल्या सामान्य संकल्पना व तत्त्वे याचा इतिहासाने वापर केलेला आहे ही गोष्ट दृष्टीआड करणे चुकीचे ठरेल.

भूगोलात होत असलेल्या तत्त्वांच्या विकासाची विद्यमान अवस्था—मग ही अवस्था गुणवत्तेची असो की विश्वसनीयतेची असो—समाधानकारक आहे असे फार थोड्या भूगोलकारांना वाटते. अधिक तत्त्वांच्या, म्हणजेच अधिक विश्वसनीय तत्त्वांच्या, शक्यतेनुसारच विचार करावयाचा झाला तर, कोणाचेच समाधान होण्याची शक्यता नाही. मात्र सामान्य सिद्धान्त व सामान्यतत्त्वे यांच्या विकास प्रयत्नांच्या मार्गात येणाऱ्या अडचणी व त्यावर घातल्या गेलेल्या विधानरूप मर्यादा त्यांना स्पष्ट दिसू लागल्या, तर व्यावसायिक भूगोलकारांचा उत्साहभंग कमी झाल्याशिवाय राहणार नाही. त्यापेक्षाही अधिक महत्त्वाची गोष्ट अशी की, या वस्तुस्थितीची स्पष्टपणे जाणीव झाली तरच वाममार्गी प्रयत्नांना आळा बसण्याची शक्यता आहे ; कारण, अशा प्रयत्नांतून फक्त हेत्त्वाभासक तत्त्वेच जन्माला येतात.

आमच्या अडचणीचे जेम्सने दिलेले स्पष्टीकरण पुढे दिल्याप्रमाणे आहे. " आपण ज्या घटनांचे निरीक्षण करण्यात गुंतलेले असतो, त्या निरीक्षकांच्या नजरेच्या मानाने इतक्या अवाढव्य असतात की, आपल्याला राईतील झाडे दिसतात, राई कधीच दिसत नाही. त्यानेच दिलेली उत्कृष्ट उपमा वापरावयाची झाली तर, वर्तमानपत्रातील छायाचित्रावरून चाललेल्या एखाद्या कीटकाच्या नजरेत छापलेल्या बिंदूचे तपशील तेवढेच येतात, त्या छायाचित्राची महत्तर रचना त्याच्या नजरेच्या टप्प्याच्या बाहेरच असते ; तशीच अवस्था घटना पहात असता आपलीही होते " (२८६, ८४). पण, ही गंभीर अडचण दूर करण्यासाठी, म्हणजे ती घटना आपल्या नजरेच्या टप्प्यात आणण्यासाठी, नकाशा हा जेम्सने प्रस्तुत केलेला उपाय. भूगोलकारांनी, अगदी पुरातन कालापासूनच, शोधून ठेवलेला नाही का ? असे असूनही, तत्त्वे प्रस्थापित करण्याच्या दिशेने झालेली आपली प्रगती अगदीच बेताची आहे.

घटनांच्या एकसंधानाचे जे स्वरूप आम्ही अभ्यासासाठी मान्य करतो, ते वास्तविक फार मोठ्या संख्येने उपस्थित असलेल्या स्वतंत्र अथवा अर्ध-स्वतंत्र कारकांचे एकसंधान असते. त्यामुळे, पर्जन्य व मृत्तिका, तपमान व पिके अशासारख्या सरळ अनुबंधांशी आपला संबंध क्वचितच येत असतो. अन्य सर्व परिस्थिती स्थिर आहेत असे गृहीत धरून, औपपत्तिकदृष्ट्या क्रमबद्ध शास्त्रांचा युक्तिवाद आम्हीही लढवू शकतो. पण, आम्हाला या रूपधेयांचा अभ्यास फक्त सत्यस्थितीच्या प्रयोगशाळेतच करावयाचा असतो. ही प्रयोगशाळा अशी आहे की, कदाचित काही बाबी वगळल्या तर, इतर कारक स्थिर अवस्थेत सापडत नाहीत, आणि ते तसे राहतील असे करण्याचा कोणताही उपाय आमच्याजवळ नाही. एकूण परिणामी घटनेशी असलेल्या प्रत्येक वेगळ्या कारकाच्या संबंधांवर नियंत्रण ठेवणारी औपपत्तिक तत्त्वे आपल्याला माहीत आहेत असे गृहीत धरले, आणि सांस्कृतिक रूपधेयांसारख्या जटिल परिणामी घटनांच्या बाबतीत सर्वच अनुबंधांची, प्रत्येकी योग्य प्रमाणात केलेली गोळाबेरीज विधानरूपाने सांगण्याचा प्रयत्न करणारी तत्त्वे सादर करता आली असेही गृहीत धरले, तरी ती इतक्या गुंतागुंतीची होतील की, त्यांचा उपयोग करणे अशक्य होऊन बसेल. ही अडचण तशी सामान्य स्वरूपाचीच आहे, कारण ती सामाजिक शास्त्रांच्या अति गुंतागुंतीच्या रूपानांच लागू पडते असे नाही, तर प्राकृतिक शास्त्रांच्या पुष्कळशा घटनांनाही तीच अडचण लागू पडते. एखाद्याला सर्व तत्त्वे मुखोद्‌गत आहेत आणि सर्व गृहीतसामग्री त्याच्या हाताशी आहे असे गृहीत धरूनही, त्याने सादर केलेले उत्तर अशा एका गुंतागुंतीच्या गणिती समीकरणात गुंतून पडेल, कोणत्याच सांत मानवशक्तींना ते सोडविता येणार नाही. भूगोलाच्या तंत्रांना व पद्धतींना परिपक्वता आली आहे असे गृहीत धरूनही, कारकांच्या येवढ्या जटिलांनी भरलेल्या परिणामी घटनांचे भवितव्य सांगण्याचे धाडस स्वतः भूगोलच करणार नाही, असे कोल्बीने सुचविलेले आहे. (१०७, ३५l).

भूगोलात जी तत्त्वे विकसित होण्याची शक्यता असते अशा स्थूल तत्त्वांची उपयोजकता निश्चितपणे मर्यादित करणारी आणखी एक महत्त्वाची अडचण, ज्या पायावर ही तत्त्वे उभारलेली असतात त्या पायाच्या, म्हणजे त्या प्रजाति संकल्पनांच्या, डळमळीतपणातून निर्माण झालेली आहे. तसे पहाता, ही अडचण, कमीजास्त प्रमाणात, प्रत्येक शास्त्रशाखेत उपस्थित होत असतेच. ज्या शास्त्रांना नियंत्रित प्रयोग करण्याचे सामर्थ्य असते त्यांना या तत्त्वांशी संबंधित असलेले आणि प्रजाति प्रकारांच्या साच्यात चपखलपणे बसणारे नमुने निवडून घेणे शक्य असते. सत्यस्थितीतील हे प्रत्यक्ष नमुने जातिप्रकारांशी ज्या प्रमाणात विसंगत असतील त्या प्रमाणात ते तत्त्व त्यांना लागू पडेनासे होईल. निवड करताना असे तारतम्य दाखवता यावे इतके जातिप्रकारांचे पुरेसे नमुने भूगोलक्षेत्रात उपलब्धच नसतात. शिवाय आपल्या हेही लक्षात आलेले आहे की, हे निवडलेले नमुने जातिप्रकारांशी अगदी जुळते असतात असेही घडत नाही. जी संगती असते तीही अगदी स्थूल मर्यादेत असते. कोणत्याही एकाच प्रकाराच्या वेगवेगळ्या नमुन्यात असणारे हे मोठे भेद भूगोलकारांमध्ये दिसून येणाऱ्या एकमताच्या अभावामुळे जास्त ठळक

होतात. भूगोलकारांमधील हे मतभेद काही थोड्या शंकास्पद नमुन्यांच्या वर्गीकरणाबाबतच दिसून येतात असे नाही, तर त्या प्रत्यक्ष प्रकारांसंबंधी, अथवा त्या प्रकारांच्या क्रमबंधासंबंधीच, मतभेद असलेले दिसून येतात. प्रजातिसंकल्पनांचे क्रमबंध भक्कम असतील तरच भक्कम तत्त्वांचा विकास करणे शक्य होते. म्हणूनच, क्षणभर थांबून, अशा प्रकारच्या संकल्पना भूगोलात विकसित होतातच कशा, याचा थोडा विचार करू या.*

भूगोलात वापरात असलेल्या, बहुतेक सर्व नसल्या तरी पुष्कळशा, प्रजातिसंकल्पना अन्य ज्ञानशाखांतून उसन्या घेतलेल्या आहेत, ही गोष्ट आम्ही या पूर्वीच स्पष्ट केलेली आहे. पण, संकल्पनांचा एक गट असा आहे, आणि तो गट मोठा असण्याचीही शक्यता आहे, की त्यांच्या सामान्य भाषेतील अभिव्यक्तीतच, शास्त्र हा शब्द मानवाच्या कानांवर पडलेला नव्हता तेव्हापासून तो भूगोलाचा अभ्यास करत होता, या वस्तुस्थितीचे प्रतिबिंब उमटलेले दिसते. व्यवहारज्ञानावर आधारलेल्या या संकल्पना अगदी ओबडधोबड असण्याची शक्यता असली तरीही, त्यातील पुष्कळशा संकल्पना थोडीशी मुरड घालून शास्त्रीय विचार-प्रवाहात सामावून घेणे शक्य असल्याचे आढळून येते. महासागर, सरोवर, नदी, पर्वत, मैदान, नगर, बंदर, शेत, पीक इत्यादि सामान्य भाषेत वापरल्या जाणाऱ्या सर्वच कल्पना त्यांच्या नित्याच्या अर्थानेच शास्त्रीय उपयोगासाठी काटेकोरपणे व्याख्याबद्ध करणे शक्य असते. त्यांच्या ऐवजी, इतरेजनांवर वजन मारण्यासाठी नवीन तांत्रिक संज्ञा निर्माण करावयाच्या, हा केवळ ढोंगीपणा आहे (श्मिट, ७, १९२). उलटपक्षी, सामान्य भाषेतील अशाच काही अन्य संज्ञा इतक्या विविधार्थांनी वापरल्या जात असतात की, निश्चित अशा तांत्रिक अर्थाने त्यांना बंदिस्त करणे अशक्य होते.

प्रजाति संकल्पनांचा आणखी एक गट क्रमबद्ध शास्त्रांमधून, विशेषतः भूशास्त्रातून, भूगोलाने उसना घेतलेला आहे. यांपैकी पुष्कळशा संकल्पना जरी उपयुक्त असल्याचे सिद्ध झाले आहे, तरी त्यांच्या श्रेष्ठ शास्त्रीय-अधिकारसंस्थेने या संकल्पनांचे भूगोलातील उपयोजन तर्कशुद्ध असल्याचे आश्वासन दिले आहे, असे गृहीत धरणे चुकीचे आहे. एका क्षेत्राच्या अभ्यासकाने निकटवर्ती क्षेत्रांच्या निष्कर्षांची दखल घेणे, आणि कोणतीही चूक प्रत्यक्ष दाखवून देता आली नाही तोपर्यंत, अन्य शास्त्रशाखांतून प्रस्थापित झालेल्या वस्तुस्थिती व अनुबंध अचूक आहेत असे गृहीत धरणे, हा शास्त्रीय कार्यपद्धतीचा एक सामान्य नियम आहे. हे खरे असले तरी, हा नियम वर्गीकरण पद्धतींना लागू पडत नाही ; कारण, ती बरोबर आहे अगर चूक आहे असे म्हणता येत नाही, तर ती, कमी जास्त प्रमाणात, उपयुक्त आहे इतकेच म्हणता येते. उदाहरणार्थ : भूशास्त्रज्ञांनी त्यांच्या वर्तमान रूपाकडे लक्ष न देता त्यांच्या पुरातन इतिहासावर लक्ष ठेवून भूरूपांचे वर्गीकरण केलेले आहे. अशा स्थितीत त्यांची

---

*पुरवणी टीप क्र. ४८ पहा.

' पठार ' ही संकल्पना केवळ ती एक शास्त्रीय संकल्पना आहे येवढ्या कारणाकरता भूगोलकारांनीही मान्य केली पाहिजे, अशी आवश्यकता नाही. याविरूद्ध, त्याच शब्दाशी निगडित असलेली सामान्य भाषेतील कालमान्य संकल्पनाच, भूशास्त्रज्ञांनी त्या शब्दाला एक नवा-वेगळा अर्थ चिकटवला त्याच्या कितीतरी पूर्वीपासून, भूगोलकार वापरत आलेले आहेत.

शेवटी, स्वतः भूगोलकारांनीच प्रकारांचे विविध क्रमबंध विकसित केलेले आहेत. त्यामुळे ज्या रुपधेयांचा अभ्यास ते करतात त्यांचे वर्गीकरण ते निरनिराळ्या प्रकारांत करू शकतात. अशारीतीने स्वतंत्र घटकांवर आधारलेल्या प्रजातिसंकल्पनांना घटकजटिलांवर आधारलेल्या प्रजातिसंकल्पनांची जोड देण्याचे कार्य ते विशेष आस्थेने करत असतात. पण, या नव्या वर्गीकरणाच्या नवीन क्रमबंधांचे व सामान्य विचारप्रवाहांतून उसन्या घेतलेल्या क्रमबंधांचे, अगर संलग्न क्रमबद्ध शास्त्रांमधून उसन्या घेतलेल्या क्रमबंधांचे, एकमेकांशी पटत नाही असे दिसते. त्यामुळेच, भूगोल शास्त्राने वापरण्याच्या दृष्टीने कोणत्या संकल्पना उपयुक्त आहेत, या प्रश्नावर बरेच मोठे वादंग माजले आहे. कित्येकांना वाटतो तसा हा प्रश्न, ' जुन्यांना मान्यता द्यावयाची की नव्यांना ? ' असा सोपा नाही, तो अधिक मूलगामी आहे. प्रश्न असा आहे की भूगोलाच्या विशिष्ट दृष्टिकोणातून पहाता कोणत्या संकल्पना श्रेष्ठ मूल्यांच्या आहेत. याबाबत खूपच वादावादी झालेली असल्याने, आणि आपल्या क्षेत्राचे दृष्टिने त्याचे व्यावहारिक महत्त्व फार मोठे असल्याने त्याचे संक्षिप्त विश्लेषण करणे आवश्यक आहे.—असे आणखीही पुष्कळ प्रश्न पुढे आले होते, त्यावरही विचार करणे जरुर होते, पण ते आपण टाळले आहेत.

कोणत्याही वस्तूची सर्वच लक्षणे एकमेव प्रजातिसंकल्पनेत समाविष्ट करणे अशक्य कोटीतील असते, ही वस्तुस्थिती आहे. याचा अर्थ, इतकाच, की वर्गीकरणाच्या आधारतत्त्वानुसार कोणत्याही एकाच विशिष्ट वस्तूचे एकाचवेळी निरनिराळ्या पुष्कळ प्रकारांनी वर्गीकरण करण्यास हरकत नाही. पण असे प्रकारभेद पुष्कळसे समरूपच होत असावेत. म्हणूनच, आमच्या शब्दसंग्रहाच्या मर्यादा लक्षात घेऊन, वेगवेगळ्या प्रकारच्या संकल्पनांचा बोध करण्यासाठी एकच प्रकारच्या संज्ञा आम्ही वापरत असतो. अगदी सोपी अशी दगडी कोळसा हीच बाब विचारात घेऊ. एखादा प्राचीन प्राणीजीवनशास्त्रज्ञ, मला वाटते, दगडी कोळशाचे वर्गीकरण वनस्पतीजन्य उत्पादन म्हणून करील, भूशास्त्रज्ञ तो केवळ एकाच प्रकारचा खडक आहे असे मानेल, तर खनिजशास्त्राभ्यासक त्याचा एक खनिज म्हणून उल्लेख करील. खरे पहाता दगडी कोळशाची ही सर्व रुपे एकाचवेळी खरी आहेत; म्हणूनच यापैकी प्रत्येक संकल्पनेत तो सामावलेला आहे, तरीही त्यापैकी कोणतीही एक संकल्पना दगडी कोळसा म्हणजे काय हे संपूर्णपणे स्पष्ट करू शकत नाही.

वस्तूच्या स्वतःच्या अंगभूत लक्षणांच्या केवळ नैसर्गिक आधारावर त्या वस्तूंचे प्रजातिप्रकारांत वर्गीकरण ठरवून देणे शक्य होत नाही. तसेच, सर्वच लक्षणांच्या संज्ञा वापरून वर्गीकरण करणेही शक्य होत नाही. म्हणूनच प्रजाति संकल्पना विकसित करण्यासाठी कोणत्या लक्षणांचा विचार केला जावा हे त्या प्रजाति संकल्पना कोणत्या हेतूने बांधल्या जात आहेत त्यावर अवलंबून राहील. प्रजाति संकल्पना हे अंतिम साध्य नसून, ते केवळ एक शास्त्रीय साधन आहे, आणि त्यांचा विशिष्ट हेतू विविध शास्त्रशाखांच्या दृष्टिकोणावर अवलंबून असतो.

अन्यथा भिन्न असणाऱ्या वस्तूंमधून भागीदारीने आढळणाऱ्या सर्वसामान्य लक्षणांच्या एकूण समुच्चयाचे केलेले एकमेव विधान सादर करता यावे हाच प्रजाति संकल्पना बांधण्यामागील सामान्य हेतू असतो. सत्यस्थितीचे वर्णन करण्याचा मूलभूत हेतू साध्य होण्यास त्यांची मदत होते. या संकल्पनांतून वर्णनाची एक संक्षिप्त पद्धती तर मिळतेच, पण त्याबरोबरच कोणत्याही वर्णनाचे आकलन करून घेणे, व ते स्मरणात ठेवणेही सहज शक्य होते. शिवाय अशा प्रकारच्या अचूक, संक्षिप्त व समुच्चयबोधक संज्ञा, व्यावहारिकदृष्ट्या अनिवार्य नसल्या तरीही, वस्तूवस्तूंमधील अनुबंधांची तत्त्वे प्रस्थापित करण्याच्या दृष्टीने अत्यंत उपयुक्त ठरतात. दोनही बाबतीत एकच गोष्ट खरी आहे. वस्तूंचा ज्या दृष्टिकोणातून अभ्यास केला जात असतो त्या दृष्टीकोणानुसार अत्याधिक महत्त्वाची असलेली त्या वस्तूची लक्षणे त्या प्रजाति संकल्पनेने स्पष्टपणे मांडलेली असणे आवश्यक आहे. उदारणार्थ : औष्णिक अभियांत्रिकीचा एखादा अभ्यासक दगडी कोळशाचे वर्गीकरण करत असताना कोळशाच्या ज्वलनगुणाशी संबंध नसणाऱ्या अनेक लक्षणांकडे दुर्लक्ष करत असण्याची शक्यता आहे. मग, ती लक्षणे प्राचीन वनस्पतीशास्त्राच्या दृष्टीने कितीही महत्त्वाची असोत !

यावरूनच भूगोलातील विविध प्रकारच्या जातिसंकल्पनांच्या क्रमबंधांत तारतम्य करण्यासाठी एक आधार आपल्या हाती येतो. क्रमबंधांतील वर्गीकरण भौगोलिक वर्णनांसाठी केलेले असो, किंवा भौगोलिक अनुबंध प्रस्थापित करणाऱ्या तत्त्वांसाठी केलेले असो, त्या वर्गीकरणात भूगोलाच्या दृष्टिकोणातून अत्याधिक महत्त्वाच्या असलेल्या लक्षणांचा उल्लेख स्पष्टपणे व संपूर्णपणे करण्यात आलेला आहे का ?

अन्य शास्त्रे क्रमबद्ध स्वरूपाची असोत किंवा ऐतिहासिक स्वरुपाची असोत, जेथपर्यंत भौगोलिक दृष्टिकोण अन्य शास्त्रशाखांच्या दृष्टिकोणापासून वेगळा असतो, तेथपर्यंत, अन्य शास्त्रांतून भूगोलात उसन्या घेतल्या जाणाऱ्या प्रजाति संकल्पनांबाबत पक्षपात करणारे कोणतेही गृहीत प्रमेय मान्य केले जात नाही. उलट, विरुद्धपक्ष मान्य करणेच सुरक्षित असते; कारण, ज्या प्रजातिसंकल्पना सामान्य भाषेत असल्याचे आम्हाला आढळून आले त्याही, भूगोलाने स्पष्टकरून सांगितलेल्या दृष्टिकोणातून, म्हणजेच सामान्य दृष्टिकोणातून विकसित झालेल्या असतात. सामान्य खलाशी मानतो त्याप्रमाणेच भूगोलाभ्यासकाच्या दृष्टिनेही व्हेल

हा मासा आहे, किंवा—शब्दाचा वापर गैर आहे असे मानले तर—व्हेलचा समावेश महासागरी जलचर प्राण्यांच्या सर्वसाधारण संकल्पनेतच व्हावयाचा असतो, भूचर प्राण्यांच्या संकल्पनेत व्हावयाचा नसतो.

गतशतकातील भूशास्त्रीय प्राकृतिक भूवर्णनातील पुष्कळशा संकल्पना वारसाहक्काने भूगोलाने घेतल्या, आणि भूरुपांच्या रचनांच्या प्रक्रिया हाच ज्यांचा प्रमुख अभ्यासविषय होता अशा अभ्यासकांनी, त्या पृथ्वीच्या इतिहासाचा एक भाग आहेत असे मानून, त्या संकल्पना विकसित केल्या. अर्थातच, भूरुपांच्या उत्पत्तीतून परिणत झालेल्या, आणि म्हणूनच त्यांच्या उत्पत्तीची गुरुकिल्ली ठरणाऱ्या त्या लक्षणांच्या परिभाषेत भूरुपांचे वर्गीकरण करण्याचा, हे काम कितीही अवघड वाटले तरी, त्यांनी प्रयत्न केला आहे व ते योग्यही आहे.

भूगोलाभ्यासकही असाच भूरुपांच्या उत्पत्तीशी प्रत्यक्षपणे आणि प्रामुख्याने संबंधित असता, तर त्यानेही त्या प्रजातिसंकल्पना न डगमगता तशाच मान्य केल्या असत्या. पण, हा आधार त्याने घेतल्यावर गतिमान प्राकृतिक भूवर्णन आणि भूगोल या दोहोंतील भेद दाखविणे अवघड होऊन बसले असते. भूरुपांचे स्वरुप जास्तीतजास्त स्पष्ट करून दाखविण्याचे उत्कृष्ट साधन म्हणून, त्यांच्या उत्पत्तिविषयक वर्गीकरणाची जरुरी भूगोलकाराला भासण्याची शक्यता आहे. मला हेटनरच्या प्रतिपादनाचे अचूक आकलन झालेले आहे असे मानल्यास, माझ्या मते, हेटनरनेही याच युक्तिवादाचा अवलंब केलेला आहे. त्यांच्या लक्षणांचा साकल्याने विचार करूनच, भूरुपे व हवामान यांचे प्रकार प्रस्थापित करावयाचा भूगोलकाराचा प्रयत्न असतो (१६१, २२२ f); आणि ते सरळपणे करता येत नाही हेही आमच्या लक्षात आलेले आहे. संकल्पनादृष्ट्या पहाता, ही गोष्ट उत्पत्तिविषयक वर्गीकरणानेच साध्य होणारी आहे (हेटनरच्या सूचनेप्रमाणे, हा अंतिम टप्पा नव्हे तर, तो प्रथम टप्पा आहे). प्रश्न असा आहे की, हे शक्य आहे कां ? वलीकरण, उद्धरण, स्फोटन व क्षरण या वेगवेगळ्या प्रक्रियांनी विकसित झालेला अंतिम आकार ज्या माध्यमांतून सादर केले जातात ते माध्यम म्हणजेच ही भूरुपे, असे आपण गृहीत धरले, तर या विविध प्रक्रियांनी ज्यातील प्रमुख व गौण पोटविभाग निश्चित केलेले आहेत असे वर्गीकरण असलेला क्रमबंध रचणे शक्य आहे. पण मग, या प्रक्रियांपैकी प्रमुख कोणत्या आणि गौण कोणत्या हा यक्षप्रश्न आपल्यापुढे दत्त म्हणून उभा रहातो !

बऱ्याच पूर्वी म्हणजे १९०६ मध्येच, पेंकने प्रत्यक्ष भूरुपवर्णनाच्या दृष्टिकोणातून या प्रश्नाची चर्चा केलेली आहे. भूरचना व भूपृष्ठरुपे या दोहोत अतिशय सुसंवाद असल्याचे दिसून येते; म्हणूनच त्यांच्या रुपाने भूगर्भस्थ हालचालींच्या संकल्पना रचण्यासाठी एक भक्कम आधार भूरुपवर्णन शास्त्राच्या हाती आल्यासारखे दिसते, असे त्याचे मत झाले. " उंचसखल भूभागांचे एकूण क्षेत्र या पर्वतप्रदेशांच्या मूळ भौगोलिक संकल्पनेच्या ऐवजी तीव्र वलीकरण झालेला जमिनीचा पट्टा ही भूगर्भस्थ हालचालींशी संबंधीत संकल्पना पुष्कळांनी उचलली. " पण भूरचनेसंबंधीच्या अधिक बारकाईने केलेल्या संशोधनात असे आढळून आले की, भूगर्भस्थ

हालचाली व भूरुपवर्णनशास्त्र यांचा, पूर्वी समजला जात असे तितका, निकटचा संबंध नाही. अर्थातच, भूगोलाभ्यासकाला अभ्यासावयाचे असते ते, व स्पष्टपणे वर्णन करून सांगावयाचे असते ते, भूरुप भूशास्त्रज्ञाला अभ्यासावयाचे असते त्या भूरचनेपेक्षा काही वेगळे असते, असाच निष्कर्ष यातून काढावा लागतो (१२८, १५ f, ३५ f). अलिकडेच, बोहेमियन डोंगर व मध्यफ्रान्सचे डोंगर यांची तुलना करून याच निष्कर्षाचे सोदाहरण स्पष्टीकरण पेंकने केले आहे. त्याच्या मताने हे दोनही डोंगर-प्रदेश स्फोटातून (Zerborsten) निर्माण झालेले आहेत. घटकरचनेतही त्या दोहोंत पुष्कळ साम्य आहे, आणि घटकरचनेतही पूर्ण अनुबंध आहे. तरीही, भौगोलिकदृष्ट्या, अंतर्वक्र आणि बहिर्वक्र यांच्यातील फरकायेवढा, त्या दोहोत फरक आहे.

संपूर्ण आजनन वर्णनाचा शेवट संपूर्ण रुप-वर्णनानेच होत असतो. तरीही, त्या क्षेत्राच्या दृष्टीने महत्त्वाच्या असणाऱ्या सर्व प्रक्रीया विचारात घेऊन केलेले भूरुपांचे आजनन वर्गीकरण म्हणजेच, त्या प्रक्रियांच्या शक्य त्या सर्व कालानुसारी रचनांचे वर्गीकरण–हे त्यांच्या वर्तमान प्रकारांचे वर्गीकरण असणारच नाही. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर, अंतिम परिणामांचे वर्णन करण्याचा तो एक अप्रत्यक्ष मार्ग होईल. पण, भूरुपांच्या वर्तमान लक्षणांचे प्रत्यक्ष विवेचन केल्याने तेच वर्णन अधिक अचूकपणे व संक्षेपाने करणे शक्य होईल.

कोणतेही वर्गीकरण मान्य केले तरी काही लक्षणांची मर्यादा ते आपल्यावर लादते, अर्थात अन्य लक्षणांकडे दुर्लक्ष करणे आपल्याला भाग पडते. तसे असेल तर, घटनांच्या एकसंधानाच्या परिभाषेत एखाद्या क्षेत्राचा अभ्यास करू पाहणाऱ्या भूगोलाभ्यासकाने, त्यापैकी कोणती लक्षणे अत्याधिक महत्त्वाची मानावयाची ? अर्थातच, जी लक्षणे वर्तमान भूपृष्ठावरील अन्य घटनांशी अर्थपूर्णपणे संबंधित आहेत तेवढीच महत्त्वाची मानावयाची. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर, त्या भूरुपाचा त्याच्या भूरचना प्रकाराशी जितका निकट संबंध असतो तितका संबंध त्याच्या उत्पत्तिकारणातून निर्माण झालेल्या त्याच्या अंतिम परिणामाशी असत नाही, कारण, त्या क्षेत्रातील घटनांच्या एकूण जटिलाचा ते भूरुप हाच एक कार्यकारी कारक असतो.

पण, दोनही दृष्टिकोणातून पाहता, प्राथमिक महत्त्वाची लक्षणे समानच असतात, अशा काही बाबी असतात, यात शंका नाही; उदाहरणार्थ : ज्वालामुखी किंवा झीजदरी (Canyons). अशा बाबतीत दोनही गटातील अभ्यासक एकाच जाति संकल्पनांचा वापर करतीलच. मात्र, अभिरुचीतील या एकरुपतेचा जेथे अभाव असतो, तेथे उत्पत्तिनिष्ठ-प्राकृतिक-भूवर्णनकार अथवा भूशास्त्रज्ञ यांनी दाखविलेल्या दिशेनेच जाण्याची सक्ती भूगोलकारावर असत नाही, जर्मन भूगोलक्षेत्रात भूरुपांच्या अभ्यासाबाबत वेगळा शास्त्रीय दृष्टिकोण मान्य करण्याचे स्वातंत्र्य मिळावे म्हणून लढा दिले गेले, तो डब्ल्यू. एम्. डेव्हिस यांच्या पद्धतींना झालेल्या विरोधांतून साकार झाला. यूली ब्यूर्गर या दोघांच्याही

मताने, हा वेगळा भौगोलिक दृष्टिकोण पासार्जने, १९१२ मध्ये, अत्यंत परिणामकारकरीतीने सादर केला. आणि तेव्हा पासून त्या त्या प्रदेशांतील (किंवा भूदृश्यांतील) कार्यकारी कारक या नात्याने तेथील वर्तमान भूरुपांचे वर्णन केले जावे या गोष्टीवर तो भर देत राहिला (१७०, ४९७ f; ११, ७७). जाता जाता, डेव्हिसच्या समर्थनासाठी –अर्थात, समर्थन आवश्यक असल्यास– एक टीपवजा पुस्ती जोडण्यास हरकत नाही. जोर्बोन येथे व्याख्यान देताना, डेव्हिसने पुढील विधान केले : " भूरुपांचा विकासक्रम फिरुन तयार करणे फार अडचणींचे आहे असे दिसून येईल, म्हणजेच गतकालीन समस्यांच्या जंजाळात वर्तमान भूदृश्याकडे दुर्लक्ष होऊ लागले, तर केवळ गतकालीन पर्वतवर्णनांच्या सहाय्याने त्या भूमीचे वर्णन करणे भूगोलकाराच्या हिताचेच ठरेल " (११३, २३७).

सॉरचा निष्कर्षच बहुतेक सर्व अमेरिकी भूगोलकार आज मान्य करतील यात काहीच संशय नाही. उंचसखलस्वरूप आणि त्यांचे कार्यकारी महत्त्व यांचा त्यांच्या जननरीतीशी काहीच संबंध नसतो (२११, ३७; तसेच बोथन १०६, १४१ f पहा). प्रकारांच्या उत्पत्तिनिष्ठ संकल्पना त्यांच्या कार्याच्या दृष्टिने फारशा सार्थ असत नाहीत, हा वरील सिद्धान्ताचा तर्कसिद्ध उपसिद्धान्त न मान्य करण्यात ते बहुधा चूक करत असतात. एखादे क्षेत्र " विसकान्सिन मोरेनने " व्यापलेले आहे असे सांगण्याने त्यांच्या पृष्ठरुपाचे अथवा त्याच्या जनकशिलांचे अचूक वर्णन मिळत नाही, याचा त्यांना विसर पडतो. यासंदर्भात सॉर अशी टीप जोडतो, की हवामानांच्या अभ्यासाबाबत, भूगोलकारांनी उत्पत्तिनिष्ठ वर्गीकरणातून स्वतःची अगदी पूर्णपणे मुक्तता करून घेतली आहे (२११, ३३); पण अशा प्रकारचे स्वातंत्र्य भूरुपांच्या अभ्यासाबाबत मिळविण्यास विलंब झाला याचे कारण,या देशातील व जर्मनीतीलही, बहुसंख्य भूगोलकार प्रामुख्याने भूशास्त्र व भूरुपवर्णनशास्त्र यात प्रशिक्षित आहेत, हेच असावे (येथे फ्रोबेलच्या १८८६ मधील सडेतोड विधानाची दखल घ्यावी. हे विधान आम्ही प्रकरण तीन विभाग 'अ' मध्ये तळटीप छत्तीसमध्ये उद्धृत केलेले आहे).

भूगोलकारांनी भूशास्त्रीय दृष्टिकोणापासून आपली मुक्तता करुन घेणे आवश्यक आहे असे म्हणणे, म्हणजे भूशास्त्रज्ञांवरहल्ला चढविण्यासारखे आहे, असे कोणत्याही अर्थाने सिद्ध होत नाही. वास्तविक, हे सांगण्याची ही जरुरी भासू नये (पण, या दृष्टिकोणासंबंधीच्या एका मौखिक चर्चेत प्रस्तुत लेखकाबद्दल काही गैरसमज करून घेतले गेले; त्यांच्या निरसनासाठी त्याला येथे आपली भूमिका स्पष्ट करुन सांगण्याची परवानगी असावी). भूशास्त्रज्ञांनी 'पठार' या एका चांगल्याशा संज्ञेचा गैरवापर केला आहे. असे कोणालाही वाटणे सहाजिक आहे; या संज्ञेच्या सहाय्याने ' गतकालीन पठार ' असे वर्णन करण्याचा त्यांचा हेतू असतो. अशा पारिभाषिक शब्दप्रयोगात इतक्या अडचणी निर्माण होतात, की त्याच्या बळावर येवढ्याशा गोष्टीचा बाऊ करणे, हे समर्थनीय ठरणार नाही. भूशास्त्रज्ञांनी विकसित केलेल्या संकल्पना भूगोलकारांच्या टीकेचा विषय होऊ शकत

नाहीत. सत्यस्थितीचा अभ्यास भूशास्त्रीय दृष्टिकोणातून करण्याच्या त्यांच्या हेतूच्या दृष्टिने त्या संकल्पना अगदी समर्पकच आहेत, हे गृहीत असते. पण, सत्यस्थितीचा अभ्यास भौगोलिक दृष्टिकोणातून करणे, हा हेतू साध्य होण्यासाठीही भूशास्त्रज्ञांच्या संकल्पना समर्पक असतातच असे गृहीत धरण्याचे काहीच कारण नाही. –याच्या विरुद्ध परिस्थिती असल्याची खात्री व्हावी अशी पुष्कळ कारणे आहेत – एवढी एकच गोष्ट येथे स्पष्ट करावयाची होती.

एका बाजूला भूरुपे आणि दुसऱ्या बाजूला लागवड अथवा मृत्तिका-धूप यांचे संबंध प्रस्थापित करणारी भक्कम तत्त्वे प्रस्थापित करावयाची झाली, तर लागवड आणि मृत्तिका-धूप यांच्या संदर्भात सार्थ असणारी भूरुपांची मापनीय लक्षणे स्पष्ट करून सांगणाऱ्या संकल्पनासिद्ध असणे आवश्यक आहे. जनन-प्रकारांवरून स्पष्ट होणाऱ्या लक्षणांची येथे आवश्यकताच नाही. या बाबतीपुरता हा प्रश्न पहिल्या टप्प्यात सोपा वाटला, तरी पुढे तो चांगलाच गुंतागुंतीचा होत जातो. आताच विधानरुपाने सांगितलेल्या दृष्टिकोणातून पहाता, भूरुपांचे अत्यावश्यक लक्षण म्हणजे त्यांचा उतार. पण, घनभूमितीच्या नियमांप्रमाणे, प्रत्येक बिंदूपासून आणि प्रत्येक बिंदूच्या प्रत्येक दिशेने, तो सातत्याने व नियमितपणे बदलत जात असतो. तरीही उतारांचे मापन अंतरा-अंतराने करण्याच्या, अलिकडेच विकसित झालेल्या, पद्धतीमुळे या प्रश्नाचे, निदान अंशतः, उत्तर मिळण्याची शक्यता निर्माण झाली आहे असे दिसते.

थोडक्यात, सत्यस्थितीकडे पहाण्याचा सहजसुलभ दृष्टिकोण सामान्य मनुष्याप्रमाणे भूगोलानेही मान्य केल्याने, कोणत्याही घटनेचे महत्त्व तिच्या अन्य भौगोलिक अर्थाच्या उपस्थित घटनांशी असलेल्या संबंधाच्या भाषेत सांगावे लागते. उत्पत्तीच्या भाषेत तिचे महत्त्व सांगून चालत नाही. म्हणूनच, प्रजातिसंकल्पनांची वर्गीकरणात्मक क्रमबंधांची रचना करत असताना, त्या रचना घटनांच्या जननस्वरुपापेक्षा त्यांच्या कार्यस्वरुपावरच आधारलेल्या असतील, तर त्या भूगोलाला अधिक उपकारक ठरतील.

अशा अनेक अडचणींचा गुंता असूनही, एखाद्या क्षेत्राच्या चल घटकांमधील संबंध दाखविणारी तत्त्वे प्रस्थापित करण्यात भूगोलाला यश आले आहे. आणि थोड्या कमी प्रमाणात असले तरी, घटक जटिलांत होणाऱ्या बदलांमधील संबंध सामान्य तत्त्वांच्या रुपाने मांडण्यातही भूगोलाला यश आलेले आहे. हे काम थोडेसे अवघड असले, तरीही ते शक्यतेच्या कोटीतील आहे. सामान्यतः, घटकजटिलांचा अभ्यास, अद्यापही बराचसा प्रथमावस्थेत, म्हणजेच प्रकारांच्या विकासावस्थेत, आहे. पण मागच्या प्रकरणात चर्चेसाठी घेतलेल्या ग्रामीण क्षेत्रांच्या वर्गीकरणाचे क्रमबंधही अशाप्रकारचे क्रमबंध सादर करतात. आणि या अवस्थेतही त्यांनी प्रजातीसंबंध सूचित केलेले आहेत. पण, आपण घटकांचा, अगर घटकजटिलांचा, विचार न करता, प्रत्यक्ष त्या क्षेत्रांचाच विचार करू लागलो, तर अशा प्रकारची सामान्य तत्त्वे आपल्याला प्रस्थापित करता येतील अशी आशा आहे का ? हा प्रश्न भूगोलाच्या काळजाला हात घालणारा आहे.

प्रकारांची अथवा प्रजातिसंकल्पनांची रचना झालेली असणे, ही अट सामान्य तत्वांच्या विकासासाठी आवश्यक आहे, हा तर गृहीत सिद्धांत आहे. क्षेत्रांचे प्रकारानुसारी, क्रमबद्ध वर्गीकरण केलेले असणे जरूर आहे, या पासार्जच्या सूचनेचा प्रभाव पुष्कळसा अभ्यासकांवर पडलेला दिसतो, तेही यामुळेच, हेही गृहीत आहे. भूगोलाचा गाभा सार्वकालिक सत्यांनी समृद्ध करण्याची शक्यता या सूचनेतून निर्माण झाली आहे, असे वाटते. अर्थातच, त्याबरोबरच आम्हा भूगोलाभ्यासकांच्या कार्याची ' शास्त्रीय ' गुणवत्ता उंचावेल.

शास्त्राच्या दृष्टिने सार्वकालिक सत्यांचे अन्वेषण करत रहाणे, हे जरी आवश्यक असले, तरी ती शोधून काढली पाहिजेत अशी, कोणत्याही प्रकारे निकड असत नाही. ही खूणगाठ बाळगल्यास, आपण या प्रश्नाला अधिक कल्पकतेने हात घालू शकू. सत्यस्थिती अशी आहे, की शास्त्रीय ज्ञानक्षेत्राचे कित्येक महत्त्वाचे भागच सार्वकालिक सत्यांच्या आधाराने – स्पष्ट करून दाखविता येत नाहीत – आणि ही स्थिती सर्वच शास्त्रशाखांत असते. अंतिम फलितांना म्हणजे शास्त्रीय सामान्य तत्त्वांना अवास्तव महत्त्व दिले गेल्यामुळे त्यांना आवश्यक असणाऱ्या पायाभूत आधारतत्त्वांकडे दुर्लक्ष होण्याचा संभव असतो. इष्टवस्तू नसलेल्यांना प्रथम इष्ट मानावयाचे, आणि नंतर वास्तविक जे जातीप्रकारात मोडत नाहीत त्यांची काळजीपूर्वक छाननी न करताच अमुक जातिकप्रकार म्हणून त्यांचे वर्गीकरण करावयाचे. या पद्धतीने सामान्य तत्त्वे कधीच प्रस्थापित करता येणार नाहीत. वर्गीकरणाचा काल्पनिक आराखडा तयार करुन व त्यांचे तात्त्विक स्पष्टिकरण देऊन, स्वतःची फसवणूक करून घेता येईल. पण, प्रत्यक्ष जगातील सत्यस्थितींच्या संदर्भात या तत्वांची उपयोजकता शून्य असल्यामुळे आमच्या इमारतीचा सांगाडाच बनावट असल्याचे जाहीर होईल. दुसऱ्या एका शास्त्रशाखेबाबत चर्चा करत असताना, " काल्पनिक स्पष्टीकरणे हे त्या त्या शास्त्राच्या अपक्वतेचे एक सारभूत लक्षण असल्याचे दिसते (११६, ५४२); " असे क्रोबर म्हणतो.

एकूण लक्षणांच्या परिभाषेत केलेल्या प्रदेशांच्या जागतिक वर्गीकरणाच्या नशिबी अपयश ठेवलेलेच असते; या परिस्थितीच्या कारणांची येथे पुनरावृत्ती करत बसण्याची जरूरी नाही. कोणत्याही एका घटकजटिलाच्या अनुरोधाने संपूर्ण जगाचे प्रजातिदृष्ट्या वर्गीकरण करणे शक्य असते. पण, वेगवेगळ्या प्रदेशानुसार बदलत जाणाऱ्या घटकजटिलांच्या गोळाबेरजेचे प्रजातिनिष्ठप्रकारांच्या एकाच क्रमबंधात वर्गीकरण करून दाखविणे अशक्य असते (प्रकरण १०, 'ग' पहा). प्रस्तुत हेतू साध्य करण्यासाठी सर्वच प्रदेशांचे असे वर्गीकरण करत बसण्याचीही गरज नाही. एक संपूर्ण क्षेत्र म्हणून विचारात घेऊन ज्यांचे प्रजाति प्रकारानुसार वर्गीकरण करणे शक्य आहे असे काही प्रदेश जरी आपल्याला सापडले, तरीही त्यांच्या आधारे जातितत्त्वे प्रस्थापित करण्याचे पुढचे पाऊल टाकता येईल.

आपण कितीही थोडक्या क्षेत्रांचा विचार करावयाचे ठरविले, तरी त्यातून सारभूत अडचण एकच असते. आपल्याला घटनांच्या ज्या एकसंधानाचा अभ्यास करावयाचा असतो, ते काही संपूर्ण एकसंधान झालेले एकक असत नाही, तर अंशतः संबद्ध, व अंशतः असंबद्ध, अशा घटकजटिलांचा एक संच त्यात समाविष्ट असतो. त्यापैकी काही तर अन्य क्षेत्रात विस्तारणाऱ्या एक संधानांच्या शाखाच असतात—आणि, पूर्णार्थाने विचार करता, त्या सर्व जगभर विस्तारलेल्या असतात.

वर्तमानपत्रातील छायाचित्राचा अभ्यास करणाऱ्या कीटकाची जेम्सने दिलेली उपमा वापरून, कोणत्याही प्रदेशाच्या भूगोलाबाबत पुढे दिल्याप्रमाणे आपलेही मत होण्याची शक्यता आहे. प्रत्येकी स्वतंत्र रचना असलेली, व प्रत्येकी वेगळा आकार व वेगळी मापे असलेली वेगवेगळी असंख्य छायाचित्रे अंशतः एकमेकावर पडतील अशा रीतीने छपाईच्या सोईसाठी ठेवली आहेत आणि शेजाऱ्याच्या कडांशी जुळती व्हावी म्हणून प्रत्येकाच्या कडांची स्वच्छंदपणे काटछाट केलेली आहे, असे दृश्य त्या कीटकाला दिसेल. कीटकाच्या भूमिकेतील तो भूगोलाभ्यासक प्रत्येक रचनेचा एक आकृतिबंध तयार करू शकेल आणि जातिनुसार त्यांचे वर्गीकरणही करू शकेल. पण, त्या रचना जशा परस्पराक्रमक अवस्थेत आढळल्या तशा अवस्थेत त्यांच्या गोळाबेरीजेचे जातिनुसार वर्गीकरण करू शकणार नाहीत. एकाच प्रकाराने परस्पराक्रमण करणाऱ्या अशा घटक जटिलांचा एकच प्रकारचा संयोग अनेक क्षेत्रांतून आढळला, तर त्या अति जटिल रचनेचाही एक जातिप्रकार प्रस्थापित करणे शक्य होईल. अशी पुनरावृत्ती होत असते अशी कल्पना करणे शक्य आहे : उदाहरणार्थ ब्रिजच्या खेळात वाटून आलेल्या पत्त्यांच्या डावांची आवृत्ती होत असते. तरीही, ज्यांतून सर्वसामान्य तत्त्वे विकसित करता येतील अशा प्रजातिविषयक प्रजातिसंकल्पनांचा पुरवठा करणाऱ्या असंख्य परिस्थितींची पुनरावृत्ती होत असलेली आढळणे आपल्या दृष्टीने आवश्यक आहे.

" एक विशिष्ट प्रकारचे क्षेत्र " असे न म्हणता " प्रदेश " ही संज्ञा सोईसाठी वापरून आपले आपणच गोंधळून जाण्याचा धोका संभवतो. पो-मैदान आणि मध्य डान्यूब-मैदान हे दोनही अमेरिकी मका पट्ट्याच्या प्रकारचेच " शेती-प्रदेश " आहेत, असे आपण म्हणतो तेव्हा एकच प्रकारच्या कृषि-जटिल या सर्व क्षेत्रांत आढळतो, येवढाच आपल्या म्हणण्याचा अर्थ असतो. या तीनही क्षेत्रांत अगदी एकसारखा कृषि-जटिल असतो असे गृहीत धरले, तरीही तो क्षेत्रप्रकार एकाच प्रजातीचा आहे असे म्हणणे शक्य होणार नाही. जगाच्या पाठीवर " मका-पट्टा " म्हणता येईल असा एकच पट्टा आहे, आणि तो एक असण्याची शक्यता आहे. एका क्षेत्रातील कोणतातरी घटक-जटिल अन्य क्षेत्रांत आढळेलही, पण त्या सर्व जटिलांचा संयोग प्रत्यक्ष मिश्रणरूपाने आढळेल तो अखिल भूपृष्ठावर फक्त एकदाच आढळेल (बान्झेवरून २४६, ४१ व हेटनरवरून १६१, २९३).

आतापर्यंत आपण ज्यांचा विचार तशा प्रकारच्या अति विस्तृत क्षेत्रांच्या बाबतीत हा निष्कर्ष खरा असणे शक्य आहे, कारण असे विस्तृत प्रदेश जगाच्या पाठीवर सापेक्षतः थोडेच असणार. पण, लहानसहान प्रदेशांचा, किंबहुना स्थानपरिसरांचा (locality), म्हणजे प्रांतांचा, आपण विचार करू लागलो तरीही आपल्याला जातिप्रकार प्रस्थापित करता आले पाहिजेत. प्रस्तुत ग्रंथाचे हस्तलिखित वाचत असता, माझ्या एका सहाध्यायाने, एक मंगोलियातील दुसरा पॅटॅगोनियातील व तिसरा अमेरिकी महामैदानातील अशा, तीन प्रांतांची निवड यासाठी करता येईल असे सुचविले. त्याच्या मते, ही क्षेत्रे इतकी समरूप आहेत, की, त्यांची तुलना अगदी एकाच शेंगेतील वाटाण्यांशी जरी करता आली नाही तरी, निदान निरनिराळ्या बागांत येणाऱ्या शेंगांतील वाटाण्यांशी खासच करता येईल. या विशिष्ट बाबतीत, पुष्कळसे एकाच प्रकारच्या घटकांचे व घटक जटिलांचे संयोग बव्हंशी सरूप असले, तरी प्रत्येक प्रांतातील हीच सामान्य रूपधेये त्या त्या क्षेत्रातील सर्वाधिक महत्त्वाची रूपधेये आहेत, असे वरील प्रत्येक बाबतीत आपण म्हणू शकू का ? वरील सूचना करणाऱ्या माझ्या सहाध्यायाने स्वतःच रचलेल्या एका क्रमबंधासह, बहुतेक सर्वच क्रमबंधांनी हीच तीन क्षेत्रे वेगवेगळ्या प्रमुख जागतिक प्रकारांत दाखविलेली आहेत. मंगोलियातील भटक्या टोळ्यांची क्षेत्रे वगळावयाची, आणि पॅटॅगोनियातील व महामैदानातील फक्त व्यापारी चराऊ-कुरणेच विचारात घ्यावयाची, असे ठरविले, तरीही अन्य काही रूपधेयांच्या सरूपतेच्या तुलनेने रस्ते, लोहमार्ग आणि नागरी वसाहती यांच्या विकास क्रमातील लक्षणीय विषमता किरकोळ महत्त्वाची आहे असे कोणत्या आधारावर आम्ही म्हणणार ?

वर दिलेले उदाहरण आपल्याला प्रांतीय प्रकारांच्या दिशेने नेणार असे दिसते. कारण, एका विशिष्ट घटक जटिलाचाच प्रभाव असलेल्या क्षेत्रांचाच –त्यांच्या त्यांच्या नैसर्गिक व सांस्कृतिक अशा दोन्हीही घटकांसहित –त्यात समावेश आहे. अधिक सुमार गुंतागुंत असलेले परिसर आपण विचारात घेतले तरीही हीच परिस्थिती अधिक स्पष्टपणे दिसू लागते. उदाहरणार्थ : पो-मैदानातील एखादा स्थानपरिसर काहीबाबतीत तरी अमेरिकी मका-पट्ट्यातील स्थानपरिसरासारखा दिसणे शक्य आहे. अर्थातच, दोघांचीही वर्गवारी " टोमॅटोचे प्रकार म्हणून न करता वाटाण्याचे प्रकार म्हणून करण्याचा " मोह होणे साहजिकच आहे. पण, दुसऱ्या काही तितक्याच महत्त्वाच्या बाबींच्या आधारावर पो-मैदानाचा हा प्रांत नेपोलिटन मैदानातील एखाद्या प्रांतासारखा दिसू लागतो ; आणि त्याच्या आधारावर त्या प्रांताचे वर्गीकरण ' टोमॅटो प्रकार ' म्हणून करणे भाग पडते. शिवाय, आल्पस्च्या पायथ्याशी असलेल्या, उत्तर यूरोपातून इटलीच्या द्वीपकल्पाकडे जाणाऱ्या महामार्गावर असलेल्या आणि आड्रियाटिक व टिऱ्हेनियन समुद्रांच्या सान्निध्यात असलेल्या या पो-मैदानाच्या स्थान महात्म्यामुळे त्यात निर्माण झालेल्या सर्व रूपधेयांच्या संदर्भात पहाता, जगातील अशा प्रकारच्या इतर सर्वच प्रांतांपेक्षा हा परिसर मूलतःच भिन्न आहे.

थोडक्यात सांगावयाचे झाल्यास, माणसामाणसातील पृष्ठरज्जूंच्या किंवा एका शेंगेतील वाटाण्यांच्या अनन्यतेपेक्षा प्रदेशाप्रदेशांतील अनन्यता अगदी वेगळ्या प्रतीची असते. पहिल्या दोन उदाहरणातील अनन्यता गौण लक्षणांत आढळते ; पण, प्रमुख लक्षणांच्या बाबतीत त्यांच्यात एकरूपता असते. प्रदेशांतील अनन्यता मात्र त्यांच्या प्रमुख लक्षणांच्या एकूण संयोगातच असलेली आढळते. या अर्थाने, प्रदेशांच्या ' व्यक्तित्वाचा ' उल्लेख करणाऱ्यांशी आम्ही सहमत आहोत. फ्रेंच भूगोलकारांनीही आणखी एक ' व्यक्तिमत्व ' ही संज्ञा वापरलेली आढळते, पण ती तो प्रदेश म्हणजे एक सावयव जीव असल्याची भलतीच सूचना देऊन जाते (मुसेट ९३, २७४f ; C/o श्लूटर १४३, २१८ ; पेंक १५८, ४९ ; क्राइत्स बुर्ग २४८ आणि फिंच २२३, १६f).[१००]

याच प्रश्नाच्या एका उद्‌बोधक चर्चेत ग्राडमानने पुढे दिलेली सूचना केली आहे. " एखाद्याने एखाद्या प्रांताचा (Locality) त्याच्या सर्व आंतरसंबंधित घटनांच्या भाषेत अभ्यास केलेला असेल, तर त्याच्या मनःपटलावर एकाच परिपूर्ण चित्राचा ठसा उमटलेला असतो. त्यामुळे, त्याला असे वाटत असते की, ते त्याला अगदी मोजक्या वाक्यांत आणि अचूक शब्दांत स्पष्ट करता यावे. पण, आपल्याजवळचे हे मानस-चित्र तशा परिपूर्णावस्थेत दुसऱ्याच्या हाती देता येत नाही, म्हणजे प्रत्येकाने ते स्वतःच अनुभवले पाहिजे. " अर्थात, लेखकाने वाचकाला आपल्याबरोबर त्या चित्राच्या संपूर्ण विश्लेषण-संश्लेषणाच्या प्रक्रियेतून फिरविले, तर वाचकालाही त्या अंतिम प्रतिबोधाचा पुनःप्रत्यय येईल. चर्चेच्या शेवटी ग्राडमानने दिलेली टीप भाषांतराने न बिघडविता जशीच्या तशीच दिलेली बरी. " Damit wird reichlich Wasser in den Wein unserer jungen Begeisterung gegossen, und es ist niemandem zu verargen, wenn ihm der Trank fürs erste nicht recht munden will " (२३६, १३१f). (यामुळे, आमच्या तारूण्यपूर्ण उत्साहाच्या मदिरेत खूपच पाणी ओतले जाईल ; आणि जर ते पेय प्रथमतः रूचकर लागले नाही, तर त्यात कोणालाच दोष देता येणार नाही.).

---

१००. भूगोल आपल्या प्राकृतिक अंगाने अनन्यरूप असला तरी त्याच्या मानवी अंगाने तो अधिक सामान्यरूप आहे, असा श्लूटरने निष्कर्ष काढला आहे –आणि तोही ज्या लेखात त्याने भूगोल, केवळ द्विमुखच नव्हे तर, बहुमुख आहे या गोष्टीवर भर दिला आहे, त्याच लेखात काढला (१४८, २१८, १४५-४६) ! श्लूटर स्वमत खंडन करतो हे ग्राफच्याही लक्षात आले होते. पण, त्याच्या मते असा विरोध दुसऱ्याच एका विषयाबाबत होता. श्लूटरने भूगोलाच्या निसर्गशास्त्रात्मक अंगाबाबत आणि समाजशास्त्रात्मक अंगाबाबत काढलेले निष्कर्ष परस्परविरोधी आहेत. त्याचा तो युक्तिवाद एका विशिष्ट तत्त्वज्ञानावर आधारलेला आहे हेही ग्राफने मान्य केलेले आहे. या तत्त्वज्ञानानुसार शास्त्रांची भौतिक व सांस्कृतिक अशी विभागणी ते शास्त्र विधिनियमात्मक आहे का कल्पित सिद्धान्तात्मक आहे या तत्त्वाद्वारे केलेली असते –थोडक्यात, चक्रीय-युक्तीचा आधार घेतला आहे (१५६, १०६ ; तसेच हेटनरचे परीक्षण व नंतरची चर्चा ; आणि क्राफ्ट पहा १६६, ११-१३).

आता मर्यादित उपयोजनाची एक पद्धत शिल्लक रहाते. या पद्धतीने एकाच प्रकारचे नमुने म्हणून प्रांतांची ओळख पटणे शक्य आहे असे दिसेल. मका-पट्टा, अथवा ऑस्ट्रियातील आल्प्स अशा एकसलग विस्तृत क्षेत्रात, पुन्हा पुन्हा दिसणाऱ्या उदाहरणावरून, एकाच शेंगेतल्या वाटाण्याइतके सरूप असणाऱ्या प्रांतांचा एक निश्चित प्रकार असल्याचे आपल्याला दिसून येत नाही का ? एकूण लक्षणांच्या परिभाषेत त्यांच्या व्याख्या करूनही, ते सर्व एकाच जातीचे विविध नमुने असे मानता येणार नाही का ? एकाच मोठ्या प्रदेशाच्या वेगवेगळ्या प्रांतांतील रूपधेयांची उत्पत्ती कमीजास्त प्रमाणात समान असल्यामुळे, निदान जीवविषयक जातींच्या नमुन्यांशी असलेले त्यांचे साम्य कोणाच्याही लक्षात येण्यासारखे आहे.

एकाच विस्तृत प्रदेशांतील वेगवेगळ्या प्रांतांतून असणारा नैसर्गिक घटकांचा तो विशिष्ट संयोग मूलतः एकच असतो, आणि त्या आधारे होणारा सांस्कृतिक विकासही सारतः एकाच प्रकारच्या मानवी कारकांनी नियंत्रित केलेला असतो. असे गृहीत धरून चाललो तरी दोन महत्त्वाचे फरक शिल्लक रहातातच. येवढ्या मर्यादित अवकाशातही सापेक्षस्थानांच्या महत्त्वाकडे आपण दुर्लक्ष करू शकत नाही. केंद्रप्रांतांपेक्षा पर्यंतप्रांत अनेक प्रकारे वेगळे असण्याची, आणि हे वेगळेपणाचे प्रकार फार महत्त्वाचे असण्याचीही शक्यता आहे. शिवाय, हेच प्रांत जर नमुनेही असतील तर त्यांच्या लक्षणांत आकार आणि क्षेत्रफळ यांचा समावेश करावाच लागेल.' ही लक्षणे केवळ शैक्षणिक महत्त्वाची असतात असे नाही ; ती त्या प्रांतांच्या रूपधेयांच्या विकासांवर, विशेषतः नागरी रूपधेयांच्या विकासांवर, निश्चितपणे परिणाम करणारी असू शकतात. आता, या प्रांतांच्या क्षेत्रफळ आणि आकार या गोष्टी निश्चित करावयाच्या कशा ? अर्थातच सरासरीने, आणि काहीशा स्वैरपणेच, या गोष्टी कराव्या लागतील. अशा परिस्थितीत, तत्सम रूप असलेल्या ' पम्किन ' व 'गूजनेक ', ' स्क्वाश ' यांच्या बियाही वाटाण्याबरोबरच मिसळल्या जाव्या, अशा काही भेदांनाही त्या लक्षणसंचात मान्यता लाभलेली दिसेल.

हा जो शेवटचा विचार मांडला गेला, तोच आपल्या या सादृश्य कल्पनेतील मूलभूत चूक उघडी करून दाखवितो. एका विस्तृत प्रदेशाचे प्रांत एकाच जातीचे वेगवेगळे नमुने सादर करत नसतात, तर ते फक्त एकाच पूर्ण वस्तूचे सरूप विभाग असतात ; आणि त्यांच्यांतील सरूपताही, ते सर्व प्रांत एकाच वस्तूचे केवळ विभाग आहेत, या एकाच वस्तुस्थितीवर आधारलेली असते. खरे पहाता, ही पूर्ण वस्तू म्हणजेच तो विस्तृत प्रदेश, हीही खऱ्या अर्थाने पूर्णवस्तू असतच नाही तर प्रदेश या एका पूर्णवस्तूचा तो एक भाग असतो.

प्रदेशांविषयीच्या प्रजाति संकल्पना यांच्यापासून वेगळ्या अशा प्रदेशांच्या संकल्पना विकसित करण्याचा हा प्रयत्न –आणि त्यांच्याच आधारे प्रदेशा-प्रदेशांच्या आपापसात तुलना करून, त्यांच्या संबंधांची दर्शक तत्त्वे विकसित करावयाचा प्रयत्न –प्रदेश ही एक वस्तू अथवा एक घटना आहे या भ्रांतिजनक गृहीत प्रमेयातून निर्माण झालेला आहे, असे म्हणता येईल. खरे तर, आपल्या भाषेने आपणच फसतो. काही विशिष्ट क्षेत्रे या प्रकारात

मोडतात असे आपण म्हणतो, तेव्हा, त्यांच्यातील एक किंवा अधिक घटक अथवा घटकजटिल असे असतात की ते प्रत्येकी त्या संपूर्ण क्षेत्रात एका प्रकारचे असलेले आढळतात, येवढाच अर्थ आपल्याला अभिप्रेत असतो. प्रजातिप्रकारांच्या विविध क्रमबंधांतून आढळणाऱ्या घटनांचे वर्गीकरण केल्यावर, अशा एक अगर अधिक प्रकारांचा समावेश असणाऱ्या प्रदेशांचे नामकरण, त्यात समाविष्ट असणाऱ्या प्रकारानुसार, आपण करत असतो. आपण त्या प्रदेशांचे वर्गीकरण करत नाही, तर त्याच्या एक अथवा अधिक लक्षणांचे वर्गीकरण करतो. ज्याप्रमाणे ऐतिहासिक कालखंड ही एखादी घटना नसते, त्याचप्रमाणे प्रदेश ही स्वतःही एखादी घटना नसते, तर ती घटनेभोवती बसवावयाची एक बौद्धिक चौकट असते. ती सत्यस्थितीत अस्तित्वात नसलेली एक अमूर्त संकल्पना आहे. अर्थातच एक घटना म्हणून त्याची अन्य घटनांशी तुलना होण्यासारखी नाही, किंवा प्रजातिसंकल्पनांच्या एखाद्या क्रमबंधात त्याचे वर्गीकरणही करता येण्यासारखे नाही, अर्थातच, हा आधार घेऊन सांगावया त्यांचा अन्य घटनांशी असलेल्या संबंधांविषयीची तत्त्वेही आपल्याला मांडता येणार नाहीत. खऱ्या अर्थाने, प्रदेशा-प्रदेशांमध्ये समर्पक संबंधयोग (म्हणजे, केवळ भौमितिक संबंधांपेक्षा वेगळ्याप्रकारचे संबंधयोग) असतात, असे आपण म्हणूच शकत नाही. जे संबंध असतात ते वेगवेगळ्या प्रदेशांतील विशिष्ट घटनांमध्ये असतात. तसेच, या घटना या प्रदेशातील अमुक अमुक प्रांतांत मोडतात असे म्हणण्या पुरताच त्या प्रदेशांचा त्या प्रदेशांतील घटनांशी संबंध असतो.

यावर कोणी असा आक्षेप घेईल, की येथे " area " या शब्दांचा अगदीच शब्दार्थाने विचार केला गेला आहे. अमूर्तपणे मर्यादित असलेल्या अवकाशात आढळणाऱ्या व अन्योन्यसंबंधात असणाऱ्या घटनांची केवळ गोळाबेरीज, येवढाच अर्थ " area " (क्षेत्र अथवा प्रदेश) या शब्दाचा असतो —म्हणजेच, त्यात एक एकक या नात्याने तशाच प्रकारच्या दुसऱ्या एककांशी संबंध ठेवणारे असे काहीही असत नाही (यापूर्वी केलेल्या संज्ञांच्या वापरांमुळे गोंधळ उडू नये म्हणून पुढे दिलेले स्पष्टीकरण लक्षात घ्यावे.) एक सापेक्षतः बंदिस्त समष्टी तयार करणाऱ्या अन्योन्य संबंधित घटकांच्या बेरजेसच एकक म्हणावे, एक पूर्ण वस्तू म्हणू नये, या विधानाचे काही अधिकारी व्यक्तींच्या मताधारे आम्ही समर्थन करणार असलो, तरी अशा शिथिल एककात एखाद्या काटेकोर एककाचे गुणधर्म असतात असे समजता कामा नये —उदाहरणार्थ : एक एकक या नात्याने तशा प्रकारच्या दुसऱ्या एककांशी संबंध ठेवणारी एकच घटना निर्माण करणारे गुणधर्म. क्षेत्रीय एककांमधील संबंध, असे ज्या संबंधांविषयी आपण ढोबळमानाने म्हणत असतो, ते एका क्षेत्रातील काही घटक आणि दुसऱ्यातील काही यांच्यांमधील संबंध असतात ; याच्यापलीकडे त्यात काही अर्थ असत नाही, हे आपण चांगले जाणून असतो, असेच भौगोलिक भूमिकेवरून म्हणावे लागेल.).

अशा स्वरूपात, प्रजातिसंकल्पनांच्या परिभाषेत क्षेत्रांचा अभ्यास करणे शक्य होत नाही ; पण, त्यातील अंतःसंबंधी घटनांच्या विलक्षण संयोगांच्या रूपाने ते फक्त असामान्य असल्याचे मानता येते. वरील निष्कर्षाचा एक परिणाम असा झाला की, काही ग्रंथकारांनी, प्रदेशांचा अभ्यास हा शास्त्रीय अभ्यासासाठी योग्य असा विषय होत नाही, असा निर्णय दिला. याबाबत कोहेन, बॅरी, क्राफ्ट इत्यादि ज्ञानक्षेत्राच्या अभ्यासकांच्या मतांचे संदर्भ वाचकांसाठी आम्ही मागेच सादर केले आहेत. तरीही, शास्त्र या संज्ञेची व्याख्या करण्यास प्रथमपासूनच आम्ही नकार दिलेला असल्यामुळे, आम्हाला या प्रश्नाची चर्चा करावयाची नाही. पण, एका गोष्टीचा येथे पुनरूच्चार करावासा वाटतो, की प्रत्येक शास्त्रशाखेचा संबंध अशा असामान्यांशी कमीजास्त प्रमाणात येतच असतो. ग्रान्योने सुचविल्याप्रमाणे, सामान्य संस्कृतीच्या भूमिकेवरून पहाता, मानवाचा परीसर तयार करणाऱ्या अंतःसंबंधी घटनांच्या समग्र संचाइतकी लक्षवेधी अशी दुसरी कोणतीच विलक्षण गोष्ट दाखविता येणार नाही (२५२, ४४).

उलटपक्षी, प्रजातीसंकल्पना आणि सामान्य तत्त्वे यांच्या सहाय्याने प्रत्यक्ष क्षेत्रांचा विचार करणे शक्य होत नाही, असा निष्कर्ष आम्ही काढला. याचा अर्थ वेगवेगळ्या क्षेत्रांच्या लक्षणातील लक्षणीय साम्यगुण स्पष्ट करून सांगणाऱ्या प्रजातिसंकल्पनांचा उपयोग करून घेता येतच नाही, असा होत नाही. वेगवेगळ्या क्षेत्रांत घटकजटिलांची व घटकजटिलांच्या कित्येक संयोगांची पुनरावृत्ती होत असेल तर ती उघडकीस आणणे आवश्यकच आहे. जगाच्या वेगवगेळ्या प्रदेशांच्या गुंतागुतीचे स्वरूप समजून घेण्याचे भीमकार्य सुलभ व्हावे आणि जगाचे आकलन होण्यास सहाय्यक ठरणारी संबंधयोगांची काही तत्त्वे विकसित करता यावी हा आपला हेतू असतो. तो साध्य व्हावा म्हणून, पुष्कळ प्रदेशांची काही लक्षणे सांगता येतील अशा सापेक्षतः मर्यादित घटक-जटिलांची जशी गरज आहे, तशीच, निदान काही थोड्या प्रदेशांची, पुष्कळशी लक्षणे सांगता यावी म्हणून शक्यतो अगदी परिपूर्ण घटक-जटिलांचीही गरज आहेच. कोणत्याच प्रदेशाची सर्व लक्षणे एकाच प्रजातिसंकल्पनेद्वारे स्पष्ट करून सांगता येत नसली तरी, घटक कोणत्याही एका क्रमबद्ध जगातील सर्वप्रदेशांना लागू करता येत नसला तरी, आणि घटक जटिलांचा, अत्यंत गुंतागुंतीचा का असेना पण, एकच एक संयोग फारच थोड्या प्रदेशांत असल्याचे आढळून येत असला तरीही, त्यांचे महत्त्व फार मोठे आहे, हे विसरून चालणार नाही.

म्हणूनच, आपल्या प्रस्तुत हेतूच्या पूर्ततिसाठी, जगाच्या विभागणीच्या एकाच क्रमबंधात गैरलागू असणाऱ्या पुष्कळशा घटक-जटिलांचा उपयोग करून घेणे आपल्यास शक्य आहे. उंचसखलपणा, मृत्तिका, पाणलोट अशा एखाद्या संयोगाच्या परिभाषेत जगाची विभागणी करणे तर्कदृष्ट्या शक्य होणार नाही. तरीही, याच कारकांचा एक विशिष्ट एकसंघ संयोग ज्यांत अस्तित्वात आहे असे कितीतरी प्रांत आपल्याला निश्चितपणे आढळतात. उदाहरणार्थः पूर मैदानांच्या एक खास प्रकार म्हणून " ब्लॅक बॉटमस्‌कडे " बोट दाखविता येईल (भौगोलिक हेतुसिद्धिसाठी उपयुक्त असे पूरमैदानांचे वर्गीकरण करणे शक्य होते का, हा प्रश्न वेगळा ! ).

तसेच, ज्यांच्यात नैसर्गिक आणि सांस्कृतिक अशा दोनही प्रकारच्या घटकांचा समावेश होत असतो अशा घटक-जटिलांना मान्यता देणे व त्याचा वापर करणे शक्य आहे. दऱ्यांच्या खड्या दरडीवर आढळणारे व पायऱ्यापायऱ्यांनी चढत जाणारे द्राक्षमळे इटलीच्या आल्समधील असोत की ऱ्हाईनच्या घळीतील असोत, एकदा का आपण त्यांचे वर्णन केले, की या दोन स्थळांच्या दरम्यान कोठेही आढळून येणाऱ्या अशा प्रकारच्या कोणत्याही प्रांताचे बहुतांश वर्णन केल्यासारखे होणार आहे. अशाप्रकारे, दमट हवामानाच्या वृत्तान्तर्गत प्रदेशातील नदीमुखावर असलेल्या बंदराचे वर्णन करणे शक्य आहे –परदेशांतून आणलेल्या यंत्रांनी व तंत्रज्ञांनी चालविलेला व परदेशांतून येणाऱ्या सामग्रीतून उभारलेले कारखाने व त्यांची गुदामे, आणि यांबरोबरच याला अगदी विरोधी अशी प्राथमिक अवस्थेत असलेल्या आरण्यांची पार्श्वभूमी, तसेच तद्देशीयांच्या राहात्या घरांशेजारीच परकीय नियंत्रणाखालील मंडळींच्या वसाहतींचा मोहल्ला, असे त्याचे वर्णन करता येईल. त्यांच्या या सामान्य रूपरेषेच्या स्वरूपात, वृत्तान्तर्गत किनारपट्टीवर क्वचित शेकडो ठिकाणी अशाच प्रकारच्या घटकजटिलांची पुनरावृत्ती झालेली दिसेल.

वर्णन आणि अर्थसंशोधन—म्हणजेच संबंधदर्शक तत्त्वांचे प्रतिपादन— या दोन्ही हेतूंनी पहाता, अशा प्रकारच्या प्रजातिवर्णनांचे मूल्य वादातीत आहे. येथे एक गोष्ट ध्यानात बाळगली पाहिजे की, वर्णन विषय असलेल्या प्रांताच्या सर्वच, नव्हे सर्व प्रमुख, लक्षणांचा त्या वर्णनात समावेश झालेला असत नाही. अर्थातच, अगदी केवळ आराखड्याच्या स्वरूपात देखील जगाचे वर्णन करू शकणारा एकच क्रमबंध रचणे शक्य होणार नाही.

## इ – भूगोलातील ज्ञानसंघटन

शास्त्राच्या प्रत्येक क्षेत्रात ज्ञानाचे संघटन क्रमबंधाच्या रूपाने केलेले असणे आवश्यक आहे. त्यामुळे कोणत्याही विशिष्ट प्रश्नाच्या अभ्यासकाला आपल्या प्रश्नाच्या संदर्भात हवी असलेली वस्तुस्थिती, जाति-संकल्पना आणि तत्त्वे त्याला सहज उपलब्ध होतात. पण, जर त्या क्षेत्रातील सर्वच ज्ञानाचे संघटन एकाच क्रमबंधात करणे शक्य होत नसेल, तर हे संघटन अनेक क्रमबंधात करावे. मात्र हे अनेक क्रमबंध, शक्यतोवर, अन्योन्य-संबंधीत असणे आवश्यक होईल (कोहेन ११५, १०६-१४).

भूगोलक्षेत्रातील ज्ञान अगदी भिन्न अशा दोन प्रकारांनी क्रमबद्ध करण्याची प्रथा आहे. क्षेत्रीय भेदाभेदांच्या घटना काही प्रमुख गटांत विभागावयाच्या, प्रत्येक गटात घनिष्ठसंबंध असलेल्या घटनाच समाविष्ट करावयाच्या, आणि अशारीतीने संपूर्ण भूगोल क्षेत्राची रचना विशिष्टरूप-शाखांमध्ये करावयाची. मग, प्राकृतिक भूगोल, आर्थिक भूगोल –याचेच पुढे कृषिभूगोल, खनिजोत्पादन-भूगोल, वस्तु-निर्मिति-भूगोल इत्यादी पोट विभाग करावयाचे—, राजकीय भूगोल, आणि ज्याला सामाजिक भूगोल असे म्हणता येईल तो

भूगोल, अशा सर्वांचा त्यात समावेश करावयाचा. अर्थातच ऐतिहासिक भूगोलाचा या गटात समावेश करणे चुकीचे आहे, कारण तो कोणत्यातरी एका पुरातन कालखंडाचा संपूर्ण व स्वंयंपूर्ण भूगोल असतो (द्वारा प्रकरण ६क).

उलटपक्षी, प्रत्येक विशिष्टाभ्यासी शाखांतील ज्ञानासह, सर्व भूगोलविषयक ज्ञान जगातील क्षेत्रीय भेदाभेदांचा विचार करण्यासाठी आवश्यक असलेल्या या दोन भिन्न दृष्टिकोणानुसार संघटीत करता येणे शक्य आहे. कोणत्याही एका विशिष्ट विकारी घटनेच्या भेदाभेदांचे जगभर पसरलेल्या दुसऱ्या विकारी घटनांशी असलेले संबंधच विचारात घेणारा एक दृष्टिकोण, आणि एकाच क्षेत्रातील सर्वच विकारी घटनांचे एकूण स्वरूप लक्षात घेणारा दुसरा दृष्टिकोण.*

एका स्वतंत्र घटनेच्या परिभाषेत केलेल्या भौगोलिक ज्ञानाच्या संघटनाला युरोपीय भूगोलकार " सामान्य भूगोल " असे नाव देतात, तर त्यालाच आपल्या देशात " क्रमबद्ध भूगोल " असे नाव दिले जाते. पण, क्षेत्रानुसार संघटनाला सामान्यतः " प्रादेशिक भूगोल " असे म्हणतात—( " विशिष्ट भूगोल " या संज्ञेचा वापर या प्रकारासाठी सामान्य व्यवहारात आता केला जात नाही, ही एक चांगली गोष्ट समजली पाहिजे. या प्रकारासाठीच "Länderkunde" ही संज्ञा जर्मन भूगोलात नित्य वापरली जाते).

भूगोलक्षेत्राची विभागणी करण्याच्या या दोन वेगळ्या पद्धतींचा संयोग एकाच पातळीवर करता येत नाही. भूगोलाच्या या विशिष्टाभ्यासी शाखांपैकी प्रत्येकशाखा क्रमबद्ध आणि प्रादेशिक या दोनही भूमिकांत सादर केली जात असते– क्रमबद्ध भूगोलात एकेका घटकाचा अथवा घटकजटिलाचा स्वतंत्रपणे केलेला अभ्यास ही भूमिका असते, तर प्रादेशिक भूगोलात परस्परसंबंधीत स्वरूपांच्या विशिष्ट गटापुरता मर्यादित असलेल्या प्रादेशिक अभ्यासाचा एक भाग ही भूमिका असते. अशाप्रकारे शेतीशी संबंधित असलेल्या घटकजटिलांचा अभ्यास —उदाहरणार्थ, जमीन वापराचे जटिल, नैसर्गिक परिस्थितीविषयक जटिल इत्यादि— हा शेतीविषयक भूगोलाचा प्रादेशिक अभ्यासही असतो. उदाहरणार्थ, कोल्बीने केलेला मध्यदक्षिण कॅलिफोर्नियातील मनुका-बेदाणा उत्पादनाचा अभ्यास (३३७).

भौगोलिक रूपधेयांनुसार भूगोलक्षेत्रातील गटवारी विशिष्ट क्षेत्रांच्या स्वरूपात अन्य प्रकारेही करणे शक्य आहे, ही गोष्ट स्पष्ट आहे. उदाहरणार्थ : वसाहतींचा भूगोल किंवा नागरी भूगोल अशी गटवारी (Siedlungsgeographic). एका विशिष्ट महानगराचा भूगोल हा, उघडउघड, प्रादेशिक भूगोलाचा एक खास प्रकारच आहे. पण पुष्कळशा महानगरांतून ज्यांची पुनरावृत्ती झालेली आढळते अशा वेगवेगळ्या नागरी रूपधेयांच्या अभ्यासांचा समावेश क्रमबद्ध भूगोलात करता येतो. शिवाय, शेतमळ्याप्रमाणेच महानगर हेही एका प्रत्यक्ष घटक-जटिलाच्या स्वरूपात असल्याने आणि त्या जटिलाचा एक स्वतंत्र एकक म्हणून विचार

*पुरवणी टीप क्र. ४९ पहा.

करता येण्यासारखा असल्याने, क्रमबद्ध नागरी भूगोलात जगातील, अथवा त्याच्या एका भागातील, महानगरांचा अन्य भौगोलिक भेदांमुळे दिसणाऱ्या त्यांच्या बदलत्या स्वरूपाच्या भाषेत अभ्यास केल्या जाण्यास हरकत नाही.

यात " गणिती भूगोलाला " आणि नकाशीकरण विद्येला कोठेच स्थान नाही, या वस्तुस्थितीचे स्पष्टीकरण देणे आवश्यक आहेसे वाटते. हवामानशास्त्रात पृथ्वीग्रहाचा सूर्याशी असलेल्या संबंधामुळे निर्माण होणाऱ्या क्षेत्रीय भेदांचा आपल्याला विचार करावयाचा असतो. पण, या संबंधयोगातील वस्तुस्थितींसाठी आपण खगोलशास्त्रावरच अवलंबून असतो. त्याचप्रमाणे, पृथ्वीचा अचूक आकार आणि तिचे मापन हेही खगोलशास्त्र व भूमापन (Geodesy) शास्त्र या क्षेत्रांत उद्भवणारे प्रश्न आहेत ; आणि त्यांचा भूगोलशास्त्राइतकाच खगोलशास्त्राशीही जिव्हाळ्याचा संबंध आहे. याचा परिणाम म्हणून, भूगोलाच्या पाठ्यपुस्तकांतून प्रास्ताविक प्रकरणांतील " गणिती भूगोलाच्या " प्रकरणात बहुतेक सर्व विषय खगोलशास्त्रातील, आणि अशा अन्य अभौगोलिक, तपशिलांनी भरलेला असतो, या गोष्टीची हेटनरने दखल घेतलेली आहे (१११, २७४ f). अशी व्यवस्था तर्कशुद्ध वाटते खरी, पण, अन्य क्षेत्रांतील तपशीलवार अभ्यासाने भूगोलग्रंथाचा आरंभ करणे, ही नव्या अभ्यासकांना भूगोलक्षेत्राची ओळख करून देण्याची परिणामकारक पद्धती होऊ शकते कां, असा प्रश्न येथे उपस्थित केला जाण्याचा संभव आहे —जणूकाही, जीवशास्त्रावरील एखाद्या पाठ्यपुस्तकाचा आरंभ रसायनशास्त्राचा जीव-रसायनापर्यंत नेणारा तपशीलवार अभ्यास करणाऱ्या प्रकरणांनी करणेच योग्य समजले जावे ! शिवाय, नकाशीकरणविद्या हे शास्त्र नसून तंत्र आहे ; आणि म्हणूनच, अनेक शास्त्रांना उपयुक्त ठरणारे ते एक प्रकारचे ज्ञान आहे. इतर शास्त्रांपेक्षा भूगोलाला त्याची गरज अधिक असते, आणि भूगोलातच त्याचा विकास उच्चतम पातळीला पोहोचलेला दिसतो. म्हणूनच, भूगोलाशी त्या विद्येचा संबंध अगदी निकटचा असावा हे स्वाभाविक आहे, व तर्कसिद्धही आहे (प्रकरण ८-ड पहा). पण, म्हणून नकाशा-विद्येला भूगोलशाखा मानणे, म्हणजे संख्या शास्त्राला अर्थशास्त्राची शाखा मानण्याचाच प्रकार होईल.

जगाचा अभ्यास या नात्याने, विशिष्टाभ्यासी क्षेत्रांच्या भूमिका घेऊ शकणाऱ्या जगाच्या बहुसंख्य बाजूंचा समावेश भूगोलात होणे आगत्याचे आहे. भूगोलातील बहुतांश कार्य —मग ते क्रमबद्ध भूगोलासंबंधी असो की प्रादेशिक भूगोलासंबंधी असो— प्राकृतिक भूगोल अथवा प्रादेशिक भूगोल यांनीच व्यापलेले असते. ही गोष्ट आपल्या साहित्याची एखादी स्वैर चाचणी घेऊनही पटवून देणे शक्य आहे ; आणि ही वस्तुस्थिती सर्वश्रुत आहे. नागरीभूगोल औपपत्तिकदृष्ट्या जरी या विशिष्टाभ्यासी क्षेत्रांच्या पलीकडेही संचार करत असला तरी, प्रत्यक्ष परिपाठात तो यांच्या पलीकडे क्वचितच कशाचा समावेश करत असताना दिसतो ; राजकीय भूगोलाचे साहित्य आकाराने भरपूर असले, तरी त्याचे महत्त्व अद्याप गौण आहे; आणि सामाजिक भूगोलाविषयी म्हणाल तर, तो शून्यातच आहे ! वरील परिस्थिती हा, गेल्या शतकात ज्या विशिष्ट पद्धतीने भूगोलाचा विकास होत गेला, त्याचा परिणाम आहे ; किंवा असेही म्हणता येईल की, प्रत्यक्षदर्शनी लक्षात भरणारे आणि सोपेसोपे

प्रश्न तेवढेच भूगोलकारांनी आधी हाताळावयाला सुरुवात केली आहे आणि अधिक गुंतागुंतीचे प्रश्न पुढील अभ्यासासाठी राखून ठेवले आहेत. असे का घडले, याचे स्पष्टीकरण करण्यामागचा मानसशास्त्रीय गृहीत प्रमेयाचा वादग्रस्त विचार बाजूला ठेवला, तरीही या परिस्थितीची नित्यप्रामाण्य असलेली कितीतरी कारणे देता येतील.

जगाच्या क्षेत्रीय भेदाभेदांच्या अभ्यासात, या भेदाभेदांना पोषक असणाऱ्या पुष्कळशा रूपधेयांपैकी प्रत्येकासंबंधी भूगोलाला वाटणारी आस्था त्या रूपधेयाचा एकूण भूगोलक्षेत्राशी असलेल्या संबंधाच्या प्रमाणातच असते. प्रत्येक रूपधेयात विविध विभागानुसार लक्षणीय फरक पडत जातात; आणि त्यांच्या या विकारांचे दुसऱ्या कोणत्यातरी नैसर्गिक रूपधेयात आणि बऱ्याचशा सांस्कृतिक रूपधेयांत झालेल्या विकारांशी महत्त्वाचे संबंध असतात. सर्वसाधारणपणे असे म्हणता येईल की, जगाच्या वेगवेगळ्या विभागांच्या नैसर्गिक पर्यावरणात लक्षणीय फरक पडत असतात; आणि बहुतेक सर्वच सांस्कृतिक रूपधेये नैसर्गिक पर्यावरणावर अंशतः अवलंबून असतात, ही वस्तुस्थिती एकूण भूगोल क्षेत्रात प्राकृतिक भूगोलाचे महत्त्व मौलिक स्वरूपाचे आहे, या गृहीत सिद्धान्ताचे पुरेसे प्रात्यक्षिकच आहे.*

अलिकडच्या काही दशकात, भौगोलिक कार्याचे लक्ष आर्थिक भूगोलावर केन्द्रित झालेले दिसते या गोष्टीचे समर्थन करणे इतके सोपे नाही. ही गोष्ट शास्त्रीय दृष्टिकोणाशी विसंगत असली तरी कल्पित व्यावहारिक मूल्यांच्या अभ्यासांवर भर देण्याची भूमिका, पुष्कळशा अभ्यासकांच्या मते, यातूनच स्पष्ट होते. या क्षेत्रातील बऱ्याचशा कार्याला मिळणारी प्रेरणा क्षेत्रबाह्य विचारांतूनच स्फुरलेली असते, ही गोष्ट निःसंशय! व्यावहारिक-हेतुसिद्धीसाठी म्हणून या कार्याची आखणी झालेली असेल, —उदाहरणार्थः जमीन-वापराचे पर्यवेक्षण इ.—, तर तो भूगोलाचाच एक उपयोजनात्मक प्रकार आहे, असे त्याचे समर्थन करता येईल. जे कोणी एखाद्या शास्त्राचे ज्ञान व त्याच्या पद्धती यांचे उपयोजन विशिष्ट कूटप्रश्नांची उकल करण्यासाठी म्हणून करतात, त्यांच्याच कार्यामुळे त्या शास्त्राला प्रेरणात्मक प्रतिक्रिया मिळू लागतात, यात संशय नाही. पण, शास्त्राची औपपत्तिक बाजू आणि उपयोजनात्मक बाजू यांच्यात मुळातच सापत्नभाव आहे. एखाद्या विशिष्ट बाबत, ज्या प्रश्नाचा अभ्यास उपयोजनात्मक बाजूने करावयाचा असतो त्या प्रश्नाच्या स्वरूपावरूनच उपयोजनेची व्याख्या व मर्यादा निश्चित केली जात असते. पण, एखाद्या विशिष्ट गुंतागुंतीचा प्रश्न शास्त्राच्या कोणत्याच औपपत्तिक शाखेच्या साच्यात बसू शकत नाही, तरीही त्याला लागू पडणाऱ्या सर्वप्रकारच्या तंत्रांची व ज्ञानाची मदत घेण्यास हा उपयोजनपक्ष सिद्ध असतो. आता, ते कार्य वेगवगेळ्या शास्त्रज्ञांच्या गटात विभागून दिले, तरी, अगदी तात्त्विक दृष्ट्याही, ही विभागणी औपपत्तिक शास्त्रांच्या विभागणीला अनुसरून असत नाही.**

---

* पुरवणी टीप क्रमांक ५० पहा.

** पुरवणी टीप क्रमांक ५१ पहा.

शिवाय आर्थिक भूगोलातील अभिरूची ही बहुधा मुख्यतः आर्थिक घटनांसंबंधीचीच अभिरूची असते, आणि त्या घटनांचा अभ्यास कमीअधीक प्रमाणात त्यांच्या भौगोलिक बाजूंनीच केला जात असतो, असाही दावा करण्यास हरकत नाही. पुष्कळशा अभ्यासलेखांबाबत हे खरे आहे, असे मान्य केले, तरी —म्हणजे विशेषतः काही विशिष्ट उत्पादनांचे जागतिक वितरण, अथवा विशिष्ट देशांची आर्थिक स्थिती, यांचा अभ्यास त्यांच्या भौगोलिक आधारांच्या भाषेत केला जातो असे मानले, तरी— मानवी घटनांशी संबंधित असलेल्या भूगोलाच्या सर्व विभागांना आर्थिक भूगोल मौलिक महत्त्वाचा आहे या गोष्टीला ज्या कारणांनी मान्यता देणे भाग पडते, ती मूलभूत कारणे निरुत्तरितच रहातात.

सांस्कृतिक रूपधेयांच्या एका लांबलचक यादीचे परीक्षण करत असता आपल्याला एक गोष्ट आढळून आली (प्रकरण १०-फ पहा). निरनिराळ्या प्रदेशांत दिसून —येणाऱ्या ज्या रूपधेयांतील फरक भौगोलिकदृष्ट्या अधिक महत्त्वाचे होते— अर्थात नैसर्गिक व सांस्कृतिक अशा दोनही प्रकारच्या क्षेत्रीय भेदांशी असलेल्या त्यांच्या संबंधाच्या भाषेत —ती रूपधेये बहुतांशी आर्थिक स्वरूपाची होती. (काही केल्या, त्यांच्यात सर्वच आर्थिक रूपधेयांचा समावेश होण्याची शक्यता नव्हती ; कारण, बरीच रूपधेये आर्थिकदृष्ट्या फार महत्त्वाची असली, तरी ती भौगोलिकदृष्ट्या फारच थोड्या महत्त्वाची असतात). म्हणूनच, मानवी अथवा सांस्कृतिक भूगोलाचा विचार आर्थिक भूगोलाच्या भाषेतच करावा लागतो, हे भूगोलकारांचे मत समर्थनीयच आहे.

शिवाय, आर्थिक घटना ज्यांच्याशी संबंधीत असतात अशा नैसर्गिक रूपधेयांचा तपशीलवार अभ्यास आर्थिक भूगोलासाठी करणे आवश्यक असल्यामुळे आर्थिक भूगोलांतर्गत प्रादेशिक अभ्यासाचा पुष्कळसा भाग प्रादेशिक भूगोलाच्या तपशीलावर अभ्यासानेच व्यापलेला असतो. अगदी सोप्या शब्दांत सांगावयाचे म्हणजे, पुष्कळसे लोक, स्थलांतर करण्यापेक्षा अथवा आत्मार्पण करण्यापेक्षा, असतात तिथेच जगणे पसंत करतात ; याचे कारण ते हवामान, किंवा तेथील राजकारण, अथवा तेथील रीतिरूढी यांपैकी काही तरी त्यांना खास आवडत असते हे नव्हे, तर ते तेथे आपली वृत्ती चालवू शकतात, हेच होय. ज्याप्रकारे ते आपली वृत्ती मिळवत असतात, म्हणजेच ज्याप्रकारे ते आपले सर्वसाधारण जीवन जगत असतात ती वृत्ती तेथील नैसर्गिक रूपधेये व आर्थिक रूपधेये यांच्या आंतरसंबंधांनी निश्चित केलेली असते ; आणि त्यांचा अभ्यास करणे हेच कार्य आर्थिक भूगोलाला करावयाचे असते (C/o श्मिट, ७, १६२-२००).

याच आधारावर, शेतीविषयक भूगोलावर (म्हणजे, जमीन वापरासंबंधी भूगोलावर) प्रामुख्याने दिला जाणारा भर समर्थनीय ठरविला गेला. नागरी क्षेत्रातील रूपधेये बऱ्याच मोठ्या प्रमाणावर वेगवेगळ्या प्रदेशांतही एकसारखीच दिसतात. याचा अर्थ, एखाद्या अगदी प्रामुख्याने शेती प्रधान असलेल्या क्षेत्राचा प्रादेशिक भूगोल त्यातील शहरे वगळून, अथवा

त्यांचा केवळ नामोल्लेख करून, ते पूर्ण करता येईल असा अर्थ होत नाही, हे सांगण्याची गरज नाही. कारण त्या प्रदेशाच्या स्वरूपाचे आकलन होण्यासाठी, कृषिक्षेत्रे आणि महानगरे यांच्यातील अन्योन्य संबंधही महत्त्वाचे असतात.

उलटपक्षी, जगाच्या निदान दोन प्रमुख विभागांत —अर्थात, युरोपीय व अमेरिकी भूगोलकारांच्या आत्यंतिक जिव्हाळ्याच्या दोन विभागात— क्षेत्रीय भेदाभेदांची जागा सधनता व स्वरूप या दोन बाजूंनी होणाऱ्या भेदमूलक नागरी विकासाने बऱ्याच मोठ्या प्रमाणात घेतलेली आहे. या क्षेत्रांतील भूगोलाचा संबंध कारखानदारीच्या भूगोलाशी अगदी जिव्हाळ्याचा असतो, कारण त्याच्यावर नागरीविकास प्रामुख्याने आधारलेला असतो. तसेच, त्या प्रदेशातील अत्यंत असामान्य अशी मनुष्यनिर्मित रूपधेये या अर्थाने प्रत्यक्ष त्या शहरांच्या अभ्यासाशीही भूगोलाचा संबंध असतो.

एकूण भूगोलाचा बराच मोठा भाग प्राकृतिक आणि आर्थिक भूगोलांनीच व्यापलेला असतो, असे म्हणताच, अन्य विभागांकडे दुर्लक्ष करण्यास हरकत नाही असे सुचविण्याचा मुळीच हेतू नाही. प्रथमतःच, राजकीय संघटनांतील, आणि अगदी संकुचित अर्थाने संस्कृतीतील, प्रादेशिक भेदांशी असलेल्या त्यांच्या संबंधांचे आकलन झाल्याशिवाय, आर्थिक भूगोलातील अनेक रूपधेयांचे अचुक अर्थानुसंधान करणे शक्य होत नाही. म्हणूनच, ती रूपधेये भौगोलिकदृष्ट्या महत्त्वाची असतात आणि त्यांचे इतरांशी असलेले संबंधयोग निश्चितपणे माहिती व्हावे म्हणून त्यांचाही अभ्यास क्रमबद्ध पद्धतीने होणे आगत्याचे असते.

पूर्व युरोपच्या दिशेने प्रवास करत जाणाऱ्या, अथवा रिओग्रांडे ओलांडून जाणाऱ्या, किंवा मध्याक्षांशांतील दक्षिण अमेरिकेच्या प्रदेशात प्रवास करत जाणाऱ्या कोणाही प्रवाशाच्या दृष्टिला, संस्कृतीतील प्रमुख प्रादेशिक भेद, अन्य भौगोलिक रूपधेयांच्या संदर्भात, बऱ्याच महत्त्वाचे वाटणे शक्य आहे, ही गोष्ट सुपरिचित आहे. मग, चीनी-जपानी अथवा भारतीय संस्कृतीतील प्रादेशिक भेदांचा विचारच करावयास नको. दुय्यम दर्जाच्या सांस्कृतिक भेदांचे परिणाम मात्र अगदीच किरकोळ स्वरूपाचे असतात. युरोपच्या धान्योत्पादनाच्या नकाशांचा बारकाईने अभ्यास केल्यास, उत्तर समुद्रापासून आल्पसपर्यंत एक सीमारेषा असणे किती महत्त्वाचे आहे हे उघड दिसू लागते. या रेषेच्या पूर्वेला राय व बटाटे यांना पोषक अशाच प्रकारची नैसर्गिक परिस्थिती पश्चिमेला असून ही, पश्चिमेपेक्षा पूर्वेकडेच त्यांचे महत्त्व फार मोठ्या प्रमाणात असल्याचे दिसते. ही रेषा फ्रान्स व जर्मनी यांच्यातील सांस्कृतिक सीमारेषेवरून (राष्ट्रीय हद्दीवरून नव्हे) जाते. तरीही, वर दाखवून दिलेला भेद किरकोळ स्वरूपाचा आहे. अशा प्रकारचेच पण अधिक स्पष्टपणे नजरेत भरणारे शिल्प व वास्तुशास्त्रीय नमुने, रूढी-रीती इ. भेद पहिल्या प्रतीचे भौगोलिक भेद असल्याचे मानता येणार नाही. म्हणूनच लोकांच्या भूगोलाच्या तपशीलवार व क्रमबद्ध अभ्यासाचे मूल्य अन्य हेतूंच्या दृष्टिने कितीही मोठे असले तरी एकूण भूगोलात त्यामुळे किरकोळच भर घातली जात असते, असे दिसून येईल.

पण खाणकामाच्या भूगोलाचे महत्त्व त्याच्या स्वतःच्या दृष्टिने कमी असले तरी, अत्यंत महत्त्वपूर्ण मानल्या जाणाऱ्या कारखानदारीच्या भूगोलाशी त्याचे जे अर्थपूर्ण संबंध असतात त्यातच त्याचे महत्त्व दडलेले असते.* त्याचप्रमाणे लोकांच्या तपशीलवार भूगोलाचा संबंध राज्यांच्या भूगोलाशी अगदी जिव्हाळ्याचा असतो. स्वतंत्र राजकीय एकके या नात्याने राज्यांच्या भूगोलाचा अभ्यास हा, कदाचित राजनितीशास्त्राचा एक गौण भाग असला, तरी राज्यांचा भूगोल हा राजकीय भूगोलाचा एक प्रमुख घटकाभ्यास झालेला आहे. हा निष्कर्ष राज्य या एककाच्या विशिष्ट लक्षणाचा परिणाम आहे ; पण, एकूण भूगोल क्षेत्राचा एक भाग या नात्याने राजकीय भूगोलाचे स्थान व कार्य या विषयाच्या चर्चेत हा मुद्दा बहुधा कोणाच्या नजरेतच येत नाही.

राज्य असो, शासनसंस्था असो किंवा कोणतीही लोकप्रतिनिधीक संघटना असो, सामाजिक संघटना हे असे एक रूपधेय आहे, की ते जगाच्या निरनिराळ्या भागात बदलत जाते ; आणि तरीही या बदलांचा इतर रूपधेयांशी फारच थोडा संबंध असतो. ग्रीक द्वीपसमूहाच्या डोंगराळ स्वरूपामुळे ग्रीक नगरराज्यात लोकशाही शासनसंस्थांचा विकास होण्यास आवश्यक ती पार्श्वभूमी लाभली. राजनितीशास्त्राच्या भौगोलिक बाजूचे एक प्रमेय या प्रस्तावाच्या रूपाने मांडता आले. पण, ते डोंगराळ बेटांच्या भूगोलाच्या क्रमबद्ध अभ्यासातून, अथवा लोकशाहीच्या क्रमबद्ध अभ्यासांतूनही, सूचित केले जाण्याची शक्यता नाही. लोकसभेच्या जननीचे निवासस्थान हे हवामान, भूरचना आणि मृत्तिका यांच्या विशेष परिस्थितींचे, पण बऱ्याचश्या विस्तृत आकारमानाचे एक बेट असून ते खंडभूमीपासून जवळ असले तरी तिच्यापासून पूर्णपणे विभक्त आहे. तिच्या मुली मात्र यापेक्षा मूलतःच भिन्न असलेल्या नैसर्गिक पर्यावरणात व अगदी वेगळ्या प्रकारच्या आर्थिक भूगोलावस्थेत सुखासमाधानाने नांदत आहेत. पेंकने सुचविल्याप्रमाणे, या दृष्टिकोणातून केल्या जाणाऱ्या राजकीय संघटनांच्या अभ्यासांतून राजनितीशास्त्रज्ञांना काही पुरवणी सूचना करण्यापलीकडे भूगोलाला या विषयात अधिक महत्त्वाचे स्थान मिळण्याची शक्यता नाही (२६३, ५१).

उलटपक्षी, भूपृष्ठाचा एक विभाग या नात्याने भूगोलाभ्यासकाला राज्य या एककाबद्दल प्रत्यक्ष अभिरूची असते. भूविभाग हा मनुष्यनिर्मित असतो व तो भूपृष्ठाच्या स्वरूपाचा सहजसिद्ध घटक नसतो, ही वस्तुस्थिती असल्याचे पेंकने सुचविले आहे. आमच्या दृष्टीने ही सूचना अगदी गौण आहे ; कारण, पृथ्वीची कसलीही विभागणी फक्त मनुष्यच करत असतो, ही गोष्ट आपल्या लक्षात आलेली आहे. तसेच, " राज्य ही मानवाच्या (राजनैतिक) कार्याची केवळ रंगभूमी असली तरी या रंगभूमीचा प्रभाव त्याच्या कार्यांवर पडलेला असतो ", हे पेंकने केलेले राज्यव्याप्त भूपृष्ठाचे वर्णनही आम्हास मान्य नाही. राज्यक्षेत्राचे हे वर्णन फक्त राजनितीशास्त्रज्ञांच्या दृष्टिकोणाचे प्रातिनिधिक आहे. पण, भूगोलाच्या दृष्टिकोणातून राज्य हे असे एक क्षेत्र आहे, की त्यातील काही परिस्थिती सर्वत्र अस्तित्वात असतात. याच्याविरुद्ध, अन्य क्षेत्रांत त्या सत्यस्थितीत नसतात. म्हणून, राज्य हे काही फार महत्त्वपूर्ण

*पुरवणी टीप क्र. ५२ पहा.

क्षेत्र नसते, तर काही बाबतीत एकजिनसी असणारे क्षेत्र असते, आणि सर्व भौगोलिक घटनांपैकी हीच घटना अतिसहज आणि अति निश्चितपणे मर्यादित असते. महानगरापेक्षा मोठे आणि कार्यकारी क्षेत्रीय एकक म्हणून संघटीत केलेले, राज्य हे एकच क्षेत्र असते (प्रकरण ९-क) ही गोष्ट, एकके या नात्याने प्रदेशांचे परीक्षण आपण केले, तेव्हाच आपल्या नजरेस आलेली आहे. राज्यक्षेत्र ही बऱ्याच बाबतीत एक मूर्त व एकरूप वस्तू असते, आणि म्हणूनच "प्रदेश" या अमूर्त संकल्पनेपेक्षा वेगळी असते. भूपृष्ठाचा हा विभाग अशा इतर विभागांपासून अगदी काटेकोरपणे विभक्त केलेला व तितकाच व्याख्याबद्ध केलेला असतो. इतर विभागांशी त्याचे संबंधही दोन परिपूर्ण एककांचे दरम्यान असावे तशाच प्रकारचे असतात. अन्य मूर्त-वस्तूंप्रमाणे राज्यक्षेत्राला आकारमान, रूप आणि रचना असतात. खरे पहाता, राज्य- क्षेत्रांचा विचार करत असतानाच आमची प्रदेशविषयक संकल्पना केवळ पुस्तकी महत्त्वाची न रहाता, व्यावहारिक महत्त्वाची ठरू लागते.

विशेषतः आपल्या या देशातील पुष्कळशा भूगोलकारांना एक क्षेत्रीय एकक या नात्याने राज्य ही संकल्पना भूगोलक्षेत्राबाहेरची आहे, असे वाटत असण्याची शक्यता आहे. समोर दिसणाऱ्या भूदृश्यात त्याचे दर्शन होणे अवघडच असते. पण येवढ्याच एका कारणासाठी त्याच्यावर आक्षेप घेतला जात नाही, त्याला आणखीही एक कारण आहे. मानवाच्या राजनितीची रचना ही काहीतरी बाह्याकारी गोष्ट आहे, त्याची तशी गरज पृथ्वीलाही नाही आणि मानवालाही नाही, हा सार्वत्रिक समज, हेच ते कारण. उलटपक्षी, श्लुटर म्हणतो त्याप्रमाणे (त्या शब्दाच्या अतिव्यापक अर्थाने), राज्य हे मानवाइतकेच पुरातन आहे, कदाचित जास्तच ! ज्यात राज्याचे बीज अनुस्यूत आहे अशा एखाद्या मंडळाचे संरक्षण त्याला मिळाले नसते, तर नरातून मानव निर्माणच झाला नसता. अगदी सुरुवातीपासूनच मनुष्य, हा, ॲरिस्टॉटलच्या शब्दात, राजनैतिक प्राणी (zoon politikon) होता (१३४, ४१०). राजनैतिक प्राणी या नात्याने, एखादा शेत-मळा करण्याइतके अथवा एखादे नगर-बसविण्याइतके, एखादे राज्य निर्माण करणे हेही स्वाभाविक होते (C/o फोगेल २७१, ५) ; आणि ईस्टच्या शब्दात या विषयाचा उपसंहार असा करता येईल : " ते दुसरे काहीही असो . . . . . . . . पण विस्ताराने व अटळपणे तो एक भौगोलिक आविष्कार आहे, आणि त्या स्वपातच भूगोलशास्त्राच्या अभ्यासविषयाचा एक भाग आहे " (१९९, २७० ; तसेच C/o २१६, ८०२ ते ८०४).

भूगोलाच्या या विभागाचा एकूण भूगोलक्षेत्राशी असलेल्या संबंधाबाबत बराच वाद माजलेला असल्यामुळे, भौगोलिक अभ्यासाचा एक विषय या नात्याने राज्यक्षेत्राच्या महत्त्वाचे संक्षिप्त परीक्षण करण्यास हरकत दिसत नाही. जगातील राज्यक्षेत्रांच्या आकारांतील आणि रूपांतील लक्षणीय भेद ही भूपृष्ठावरील क्षेत्रीय भेदाभेदांच्या संदर्भातील एक अगदी उघड वस्तुस्थिती आहे. म्हणूनच, राज्यक्षेत्र हे जगाचे असे एक लक्षण आहे, की जगाच्या वेगवेगळ्या भागात दिसणाऱ्या भेदाभेदांच्या अभ्यासाला वाहून घेतलेल्या विषयाला, त्याचे

आकलन करून घेणे प्राप्त असते. त्यांच्या त्यांच्या क्षेत्रातील राजकीय जीवनच नव्हे, तर आर्थिक जीवनही नियंत्रित करण्याचे सामर्थ्य राज्यांत असते, या सत्यास्थितीमुळेच, राज्य ही एक किरकोळ महत्त्वाची बाब आहे हे विधान खोडून काढता येते. क्षेत्रीय भेदाभेदांच्या या महत्त्वाच्या वस्तुस्थितीचे संबंध भेदाभेदांच्या अन्य रूपधेयांशी अर्थपूर्णपणे प्रस्थापित असतील तरच त्या वस्तुस्थितीला भूगोलात काही अर्थ प्राप्त होतो, हा मुद्दा शेवटी लक्षात घेतलाच पाहिजे.

पण, भूपृष्ठाच्या कोणत्याही भागाची राज्यक्षेत्रांत केलेली विभागणी ही " नैसर्गिक " आहे —म्हणजेच, नैसर्गिक परिस्थितींनी ती निश्चित केलेली आहे— अशी कल्पना करणे हा निव्वळ सत्यापलाप आहे. राज्य ही घटनाच मुळात सांस्कृतिक असल्याने, ते प्रत्यक्ष राज्य अथवा सरहद्दीसारखे त्याचे कोणतेही घटक नैसर्गिक असण्याची शक्यताच नाही (३५७). पण, युरोप अथवा आशिया यांचा राजकीय नकाशा आणि तत्संगत उंचसखलभूमीचा नकाशा यांची तुलना, भेदाभेद दाखविण्याच्या या दोन प्रकरणात असलेले घनिष्ठ संबंध असल्याचे लक्षात घेतल्याशिवाय, करताच येणार नाही. जेथे राजकीय नकाशा अगदी स्वैरपणे केल्यासारखा दिसण्याची शक्यता आहे तेथेही, उदाहरणार्थ दक्षिण अमेरिकेत, प्रथम लोकवस्तीच्या घटनेच्या नकाशांचा विचार करून नंतर त्यांचे स्पष्टीकरण करू शकणाऱ्या नैसर्गिक घटकांचे नकाशे विचारात घेत गेलो, तर असे दिसून येते की, राज्यांच्या बाह्य सरहद्दी जरी स्वैरपणे आखलेल्या असल्या तरी, मूलतः राज्यात होणारी विभागणी त्या खंडाच्या प्राकृतिक भूगोलाशी अत्यंत अर्थपूर्णपणे निगडित असते.

आकार, रूप आणि सापेक्षस्थानांगभूत अन्योन्यसंबंध या उघड दिसणाऱ्या रूपधेयांबाबतच राज्याराज्यांत फरक असतात असे नाही, तर त्यांच्या अंतर्रचनेतही फरक असतात. निरनिराळ्या राज्यांच्या रचनेतील फरकांचा प्रत्यक्ष संबंध प्राकृतिक, आर्थिक व मानववंशात्मक भूगोलाच्या परिभाषेत केलेल्या त्या त्या राज्यांच्या प्रादेशिक रचनेशीही असतो. आपापल्या क्षेत्रातील सर्वच सांस्कृतिक रूपधेये, कमीजास्त प्रमाणात, सजातीय व सुसंबद्ध एककात संघटित करण्याच्या राज्यांच्या धडपडीचा परिणाम, आर्थिक भूगोलात ज्यांचा विचार केला जात असतो त्या जागतिक आर्थिक भेदाभेदांवर, झालेला दिसतो— हा परिणाम काहींवर विशेष लक्षणीय असतो, तर काहींवर इतकासा नजरेत भरणारा नसतो, पण तो सर्वत्र असतोच. या धडपडीचा अगदी दृश्य परिणाम म्हणजे सीमाशुल्क प्राकार (Tariff Walls). हे प्राकार सीमेचे दगड आणि सरहद्दीवरची ठाणी यांच्या सूक्ष्मरूपानेच दिसत असतात. तरीही अत्युच्च पर्वतराजी अथवा अतिविस्तृत महासागर यांच्यापेक्षाही त्यांचे परिणाम उत्पादन आणि व्यापार यांच्या भूगोलावर अधिक झालेले दिसतात. तथापि, नजरेत न भरणारे परिणाम, त्यांचा एकंदरीने विचार केला तर, त्याहीपेक्षा महत्त्वाचे असतात. उदाहरणार्थ : पॅरिस खोऱ्याचा प्रादेशिक भूगोल त्याच्यातील एका अत्यंत महत्त्वाच्या रूपधेयाचे, म्हणजेच पॅरिस महानगराचे, स्पष्टीकरण फारसे समाधानकारकरीतीने देऊ शकणार नाही, कारण हे महानगर उत्तर

फ्रान्सच्या विस्तृत व सुपिक मैदानी भागाच्या तुलनेने, आपल्या आकाराने व स्वरूपानेही, प्रमाणाबाहेर वाढत गेलेले दिसते. उत्तर समुद्रापासून ते थेट भूमध्यसमुद्रापर्यंत सर्वच प्रदेश एकाच पॅरिस केंद्रित, सुसंघटित एककात अडकवून टाकण्याच्या फ्रान्स राज्याच्या गेल्या कित्येक शतकाच्या यशस्वी खटपटीत या भौगोलिक घटनेचे समर्पक स्पष्टीकरण मिळू शकते. उलटबाजूने, एकाच राजनैतिक-आर्थिक एककात समाविष्ट झाल्याचा दृश्य परिणाम फ्रान्समधील प्रत्येक प्रदेशाच्या कृषिविषयक व उद्योगविषयक विकासावर झालेला दिसतो.

म्हणूनच, मुख्यतः राज्यांचा भूगोल या नात्याने राजकीय भूगोलाचे स्थान भूगोलक्षेत्राच्या-पर्यन्त भूमीवर आहे असे मानणे योग्य नाही, तर ते भूगोलाच्या प्रमुख रूपांशी निकट संबंध ठेवणारे आहे, असे मानावे हे बरे. पण, ज्ञानसंशोधनाच्या कक्षेच्या पलीकडे असलेल्या विशिष्ट हेतूंच्या सिद्धीसाठी राजकीय भूगोलाची परिभाषा वापरून भूगोलच वेठीला धरला जातो. हे भूराज-नितिशास्त्र (Geo-politics) हे भूगोलाचे एक खास क्षेत्र मानले गेले आहे आणि त्याची एक पोकळ व्याख्याही करण्यात आली आहे— असे म्हणण्यापेक्षा त्याची व्याख्या करता आली नाही असे म्हणणे बरे. त्याचा विकास प्रथम जागतिक युद्धोत्तरकालात विशेषेकरून जर्मनीत झाला. ते, फार तर, राजनितिशास्त्रात केलेल्या भूगोलाच्या उपयोजनाची भूमिका घेऊ शकते (हासिंजर १६५, २३). अर्थातच, त्याच्या मूल्याचे व महत्त्वाचे मापन, ज्या राजकीय हेतूच्या सेवेसाठी त्याची योजना केली आहे त्या हेतूला किती मूल्य चिकटविले जाणार, यावर अवलंबून आहे. त्याचे उपयोजन राष्ट्रीय राजनितीच्या सेवेसाठी जर्मन दृष्टिकोणातून केलेले असेल, तर त्या हेतूला मिळणारे धनमूल्य व अन्य देशांच्या दृष्टिकोणातून त्याला मिळणारे ऋणमूल्य यांचे समीकरण होते. तरीही, जगातील विचारप्रवाहांवर पडलेला तिचा प्रभाव लक्षात घेता, अत्यंत प्रभावी असणारी ती एकच एक भूगोलशाखा आहे व तिनेच राज्याच्या जीवनावश्यक क्षेत्राची संकल्पना रचलेली आहे, ही गोष्ट आजतरी मान्य करावीच लागेल. [भू-राजनितिशास्त्र व त्याच्या बरोबरच राजकीय भूगोलाचा इतिहास आणि त्यातील पद्धतीतंत्रविषयक प्रश्न, यांचा उहापोह प्रस्तुत लेखकाने पूर्वी केलेला आहे (२१६). त्यानंतर, फ्रान्सच्या आन्सेलने, आंतरराष्ट्रीय शास्त्र ही संज्ञा वापरून भू-राजनितिशास्त्र (Geopolitique) या संज्ञेतून सुटका करून घेण्याची खटपट केली (१८७). इंग्लंडच्या ईस्टने याच विषयावर एक महत्त्वपूर्ण ग्रंथ लिहिला आहे (१९९). राजकीय भूगोलावर एक अत्यंत समावेशक ग्रंथ मौलने लिहिलेला आहे (१५७).]

ज्या दृष्टिकोणाचा आपण पाठपुरावा करत आलो त्या दृष्टिकोणातून आपण जेव्हा समाजशास्त्रविषयक भूगोलाच्या औपपत्तिक शक्यतेचा विचार करत होतो, तेव्हा तशा स्वरूपाच्या अभ्यासांच्या विकासाने भूगोल क्षेत्रात महत्त्वाची भर पडू शकेल ही गोष्टच शंकास्पद वाटू लागली. विकासाच्या प्राथमिक अवस्थेत असलेल्या प्रदेशातील वस्त्रप्रावरणांचा भूगोल, साधन-अवजारांचा भूगोल, आणि शक्य असल्यास, चालिरितींचा, रूढींचा आणि धर्मांचा

भूगोल, यांचा अभ्यास करण्यास हरकत नाही. पण, जगाच्यां महत्वाच्या भागांच्या दृष्टिने पहाता, अशाप्रकारच्या अभ्यासांना भौगोलिक महत्व प्राप्त होऊ शकत नाही. शिकागोचा हिवाळा लंडनच्या हिवाळ्यांपेक्षा कडक असूनही, शिकागोचा पुरुषवर्ग कान गोठून गेले तरी लंडन टोप्याच वापरतो. संयुक्त संस्थानांच्या मध्य-पश्चिम प्रदेशातील स्थापत्य शिल्प एकाच अर्थाने विशेष महत्वाचे आहे ; त्यामुळे त्या प्रदेशाची स्वतःची अशी कोणतीच संस्कृती नसल्याचे उघड होते. धर्मविषयक क्षेत्रीय भेदाभेदांना, राजकीय भूगोलात काही थोडे आणि आर्थिक भूगोलात काही बाबतीत, महत्व असले, तरी धर्मविषयक भेदभेदांचा क्षेत्रीय भेदनिदर्शक अन्य रुपधेयांशी थोडकाच संबंध असल्याचे दिसून येते. इस्लामी धर्माचीच गोष्ट घ्या ! कवोष्णकुरणप्रदेशांतील भटक्या जमातींचा धर्म म्हणून सामान्यपणे त्याचा निर्देश केला जातो. पण, वृत्तान्तर्गत पर्जन्याच्या आणि सघन भात-लागवडीच्या बंगाल किंवा जावा सारख्या प्रदेशांतही तो तितकाच जोमात असल्याचे दिसते.

शास्त्रीय क्षेत्रात तर, भावीकालात होणाऱ्या विकासाचे पूर्व-निर्णय देण्याचा प्रयत्न करणारी भविष्यवाणी अत्यंत धोक्याची असते. आर्थिक व राजकीय वस्तुस्थितीखेरीज आणखी पुष्कळ रुपे प्रादेशिक भेदाभेदांशी अर्थपूर्णपणे संबंधीत असतात. म्हणून, अर्थपूर्ण संबंधाचा काही घटनांत अभाव असतो हे सिद्ध करण्यासाठी निवडलेल्या काही उदाहरणांच्या आधारे, हे संपूर्ण क्षेत्रच निकालात काढणे अगदीच असमंजसपणाचे ठरेल. वसाहतींचे प्रकार, घरांचे प्रकार इत्यादींचे अभ्यास यूरोपमध्ये झालेले आहेत, तसे ते आपल्या देशाच्या काही भागांतही झाले आहेत —आणि मला असेही सांगण्यात आले की, जपानमध्ये अलीकडेच ते विशेष उत्साहाने करण्यात आले आहेत. हे सर्व अभ्यास एकूण भूगोलक्षेत्रात क्रमबद्ध अभ्यासांची त्यामुळे भरच पडेल अशी शक्यता असल्याचे सुचवितात (c/o विशेषेकरून श्मिट १८०, ५४-८०; तसेच यापूर्वीची एतद्विषयक चर्चा पहा. प्रकरण ८-फ).

एकूण भूगोलाला जी ध्येयधोरणे लागू आहेत त्यांचाच प्रभाव आपण चर्चेसाठी निवडलेल्या प्रत्येक विशिष्टाभ्यासी भूगोल शाखेवरही पडलेला आहे. किती प्रमाणात ही ध्येय-धोरणे साध्य होऊ शकतात तो निर्देशांक त्या त्या क्षेत्रानुसार बदलत जातो, कारण त्या त्या संगत क्षेत्रातही हे प्रमाण बदलतच असते. सर्वसाधारणपणे असे म्हणता येईल की, प्राकृतिक भूगोलात अचूकपणा आणि निश्चितपणा यांचे प्रमाण अत्याधिक असण्याची शक्यता आहे. सांस्कृतिक भूगोलाच्या विविध शाखांची चर्चा आपण ज्या क्रमाने करत आलो जवळजवळ त्याच क्रमाने ध्येयसिद्धीचे प्रमाण कमी कमी होत जाते. मात्र, अशा प्रकारची तुलना हे कोणत्याही प्रकारे सर्वव्यापी सत्य मानू नये. काही आर्थिक वस्तुस्थिती नैसर्गिक घटनांपेक्षा कितीतरी अधिक अचूकपणे व निश्चितपणे प्रस्थापित करता येतात, आणि भूगोलातील राज्यक्षेत्रासारख्या फारच थोड्या वस्तुस्थिती इतक्या मोठ्या प्रमाणात अचुकपणे

आणि निश्चितपणे प्रस्थापित करता येतात, आणि भूगोलातील राज्यक्षेत्रासारख्या फारच थोड्या वस्तुस्थिती इतक्या मोठ्या प्रमाणात अचुकपणे आणि निश्चितपणे प्रस्थापित करणे शक्य होते.*

पण सर्वव्यापी सत्यांच्या विकासातील सर्वाधिक विरोध वर उल्लेखिलेल्या विशिष्टाभ्यासी शाखांत असलेला दिसत नाही; तर तो, आपल्या सर्व शाखांसह क्रमबद्ध भूगोल आणि भागशः अथवा संपूर्ण, प्रादेशिक भूगोल या दोहांत अधिक असल्याचे दिसते. याच विशिष्ट कारणाने, स्वतःसाठी आणि प्रादेशिक भूगोलाशी असलेल्या त्याच्या संबंधासाठीही, क्रमबंधात्मक भूगोलाचा स्वतंत्रपणे विकास होणे इतके महत्वाचे होऊन बसले आहे.

या दोन दृष्टिकोणांची विभागणी करणे हे भूगोलाच्या मूळ स्वरूपामुळेच अत्यावश्यक असते. ज्यांच्यांतील बदल अंशतः अन्योन्य संबंधित असतात तर अंशतः स्वतंत्र असतात अशा बहुसंख्य वेगवेगळ्या रुपधेयांद्वारे आविष्कृत होणारे भेदाभेद म्हणजेच भूपृष्ठाचे क्षेत्रीय भेदाभेद होत; आणि भूगोलालाही त्यांचाच अभ्यास करावयाचा असतो. अर्थात, यापैकी प्रत्येक रुपधेयाच्या जगभर पसरलेल्या क्षेत्रीय भेदभेदांचा अभ्यास करणे भूगोलाला भागच असते. मात्र, हा अभ्यास त्या विशिष्ट वस्तूच्या क्रमबद्ध अभ्यासाचा भाग म्हणून व्हावयाचा नसून भूपृष्ठाच्या क्षेत्रीय भेदाभेदांच्या अभ्यासाचा एक प्रकार म्हणून व्हावयाचा असतो. यालाच क्रमबंधात्मक (अथवा सामान्य) भूगोल असे म्हणतात. एक गोष्ट स्पष्ट आहे की, दोन क्षेत्रांमधील भेदांचे संपूर्ण आकलन या क्रमबद्ध भूगोलांच्या सुयोग्य भागांची केवळ बेरीज करून होऊ शकत नाही. एकत्र आणि एकाचस्थळी आढळणाऱ्या सर्वच भौगोलिक रुपधेयांच्या समग्र अंतःसंबंधाचा अभ्यास करणे आवश्यक असते. याच अभ्यासाला प्रादेशिक भूगोल असे म्हणतात. भूगोल क्षेत्राच्या या दोन दृष्टिकोणातील फरक हंबोल्टच्या कार्याने उघड झाले, त्याचे प्रथम विधान व्हेरेनियसने केले आणि हे द्वैत या क्षेत्रापुरते तरी अटळ आहे असे वासेरने दाखवून दिले. हे द्वैत भूगोलाच्या सामग्रीत नाही, तर तो विषय हाताळण्याच्या पद्धतीत आहे. अगदी अलिकडेच क्राफ्ट या तत्त्वज्ञाने, या क्षेत्राचे परीक्षण करत असता, या विधानाच्या पुष्ट्यर्थ भरपूर पुरावा सादर केला आहे (१६६, ४ f). सामान्यतः, या दोन दृष्टिकोणांतील भिन्नतेबाबत आधुनिक भूगोलाचे एकमत असल्यासारखे दिसते. या भिन्नतेची रुपरेखा रिक्टोफेनने आखली (७३), आणि त्यानंतर हेटनरने ती गिरवतानाच अधिक स्पष्ट करून सांगितली (१४०, १६१, २१८, ३९८ ते ४०३; तसेच c/o पेंक १६३, ४४). मात्र, पूर्वीइतकाच आजही, भूगोलाच्या या दोन रुपांचे सापेक्ष महत्व हा विषय सातत्याने वादग्रस्त राहिला आहे.

या दोन संघटन पद्धतीतील संबंध हेटनरने, पुढे दिल्याप्रमाणे, सोदाहरण स्पष्ट केला आहे. भौगोलिक घटकांतील हे बदल. जणूकाही, पृथ्वीपृष्ठाला समांतर असलेल्या वेगवेगळ्या पृष्ठात सामावले आहेत, असे मानले, तर त्या सर्वांची मिळून भूपृष्ठापासून वरच्यावरच्या, पण वेगवेगळ्या, पातळीत असलेल्या पृष्ठांची एक मालिका तयार

*पुरवणी टीप क्र. ५३ पहा.

होईल. भूगोलाच्या कोणत्याही एका विशिष्ट क्रमबद्ध विभागात, एकाच घटकपातळीतील पृष्ठावर असलेल्या सर्व फेरबदलांचा, कदाचित् अन्य घटकपातळीतील पृष्ठावरील फेरबदलांच्या संदर्भातही, अभ्यास होत असतो. पण, प्रादेशिक भूगोलात या सर्व पृष्ठांमधून भूपृष्ठाच्या एका मर्यादित क्षेत्रासाठी उभा छेद घेतला जातो, व त्या एकाच भूक्षेत्रातील सर्व घटक लक्षणांचे समग्र आकलन करून घेतले जाते. [याच उपमेवर आधारलेली, व स्तरित भूशास्त्राशी साम्य दाखवणारी व्हॅनक्लिफची आकृती पहा (४३३) ].

भौगोलिक ज्ञानाचे संघटन करण्याच्या या दोन पद्धतींच्या भागाभागांत अंतःसंबंध आहेत, इतकेच नव्हे तर, अनेकदा समजल्या जातात तितक्या या पद्धती एकमेकापासून भिन्न नाहीत, असे निदान परिपाठावरून दिसते. क्रमबद्ध अभ्यास संपूर्ण जगाचा आढावा घेणारे असलेच पाहिजेत असा दंडक नाही. एकखंड अथवा कोणताही एक प्रदेश अशा मर्यादित क्षेत्रातही असे अभ्यास करण्यास हरकत नाही; मात्र तेवढ्या क्षेत्रातही अभ्यासविषय असलेल्या त्या रुपधेयात फेरबदल होत गेले असले पाहिजेत. (म्हणून, सामान्य भूगोल ही संज्ञा, एक प्रकारे, दुर्दैवी मानली पाहिजे). एका लहानसर क्षेत्रातील, एका मागून एक, सर्वच रुपधेयांचा क्रमबद्ध अभ्यास केला, तरी या सर्व क्रमबद्ध अभ्यासांच्या मालिकेची केवळ एकूण बेरीज केल्याने तो प्रादेशिक भूगोलातील अभ्यास होणार नाही. तो फक्त एका मर्यादित क्षेत्राचा क्रमबद्ध भूगोल तयार होतो; कारण, मूलभूत भेद आहे तो त्यांच्या दृष्टिकोणाचा ! प्रादेशिक भूगोलात अभ्यासांचे केंद्रबिंदू ते स्वतंत्र स्थलपरिसर अथवा प्रांत हे असतात, व ते लहान असोत की मोठे असोत, त्यांचा विचार (अर्थातच स्वेच्छेने) एकके म्हणून केला जात असतो आणि त्यांच्यापैकी प्रत्येकाचे विशिष्ट भौगोलिक स्वरूप समजून घेणे हाच या अभ्यासांचा हेतू असतो ––म्हणजेच, सर्व भौगोलिक कारकांच्या कार्यकार संबंधातून निर्माण झालेल्या रचनेची विशिष्ट रीती समजून घ्यावयाची असते (हेटनर १२६, ६७२).

या दोन विभागासाठी वारसाहक्काने चालत आलेल्या भूगोलातील या संज्ञा पुष्कळशा अभ्यासकांना असमाधानकारक आहेत – असे वाटते, हे आधी सूचित केलेच आहे. ज्या अभ्यासांसाठी विस्तृत क्षेत्रांत पसरलेल्या, अथवा जगभर पसरलेल्या घटनांच्या वेगवेगळ्या वर्गांचे परिशीलन केले जात असते त्या अभ्यासपद्धतीला व्हेरेनियसने सुचविलेली " सर्वसामान्य भूगोल " (Geographia Generalis) ही संज्ञा जर्मनीत अगदी जवळजवळ सर्वत्र (Allgemeine Geographic), आणि फ्रान्समध्येही (Geographic Generale) वापरली जाते. पण, हेटनर व अन्य काहींच्या मते ही संज्ञा गैरसमज निर्माण करणारी आहे. या आक्षेपाला कारण असे, की हे अभ्यास भूपृष्ठाच्या एका भागापुरते मर्यादित असतात, एवढेच नाही तर, त्यात विशेषकरून भूपृष्ठावरील रुपधेयांचा विचार त्या रुपधेयांच्या वेगवेगळ्या वर्गानुसार केला जात असतो. रिक्टोफेनने एकदा तर याला " विश्लेषणात्मक भूगोल " ही संज्ञा सुचविली होती (७३, ४१). पण, भूगोलाच्या या दोनही प्रकारांत विश्लेषण व संश्लेषण या दोन्हीही पद्धतींची सारखीच गरज असते, हा हेटनरने घेतलेला आक्षेप बरोबर आहे,

(१२६, ६७५, किंवा १६१, ४००). श्लूटरने मात्र हीच संज्ञा मान्य केलीसे दिसते (२४७). या प्रश्नाचा अगदी प्रथम विचार करत असताना हेटनरने ("Vergleichende Länderkuande ") " तौलनिक भूगोल " ही संज्ञा " सामान्य भूगोल " या संज्ञेऐवजी वापरून, भूगोलाच्या या दोन स्वरुपांचे निकटसंबंध अधिक स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला. हेटनरच्याच निवेदनानुसार, रिक्टोफेनने आखलेल्या एका अभ्यासक्रमावरूनच ही संज्ञा त्याने उचलली होती, असे दिसते. या सर्व गोष्टी आपण पूर्वी निदर्शनास आणून दिलेल्या आहेतच. हेटनरने आपल्या यानंतरच्या पद्धतितंत्रविषयक अभ्यासांतून हेटनरने ही संज्ञा वापरलेली नसली, तरी सागरांखेरीज सामान्यभूगोलाचे सर्व क्षेत्र व्यापणाऱ्या आपल्या एका समावेशक ग्रंथाला शीर्षक देताना तो पुन्हा त्यांच संज्ञेकडे परत आला (३६३). याबाबतचा अंतिम निर्णय जर्मन अभ्यासकांनी काहीही घेतला, तरी अमेरिकी अभ्यासकांना " भूगोलाच्या दुर्भाग्यामुळेच हा शब्दप्रयोग प्रचारात आला " हे पेंकचेच मत मान्य आहे (९०). उलटपक्षी, अमेरिकी साहित्यात मोठ्या प्रमाणात वापरल्या गेलेल्या " क्रमबद्ध भूगोल " या संज्ञेला जर्मन भूगोलकारांच्या लिखाणांतून भरपूर पूर्वाधार सापडतो. उदाहरणार्थ या प्रकारच्या भूगोलाचे रिक्टोफेनने केलेले वर्णन क्रमबंधात्मक तत्त्वांच्या पायावर " आधारलेला भूगोल " असे आहे (७३, ४१), तर हेटनरने त्याला " क्रमबद्ध मांडणी " असे म्हटले आहे (१२६, ६७५), आणि पेंकने त्यालाच " क्रमब्रंधात्मक विहित क्षेत्रानुसारी " असे नाव दिले आहे (१६३, ४४). दुर्दैवाने, ही संज्ञा जर्मन भाषोत्पन्न नसल्याने, आणि तिच्या समानार्थी जर्मन शब्द तितके समर्पक नसल्याने, त्या देशात तरी त्या संज्ञेचा वापर भूगोलक्षेत्राच्या एका प्रमुख शाखेचे नाव म्हणून केला जाण्याची शक्यता नाही, हे उघड आहे.

वेरे नियक्षने परिचय करून दिलेली दुसरी संज्ञा " विशिष्ट भूगोल " (Geographia Specialis) ही आहे. पण जर्मनीत त्याऐवजी " भूखंड विज्ञान " (Länderkunde) किंवा अगदी अलीकडे, " भूक्षेत्रदृश्य विज्ञान " (Landschaft kunde) या दोन संज्ञांनी मोठ्या प्रमाणात घेतलेली आहे. (अर्थात, वरील दोन संज्ञांतील फरकाकडे येथे दुर्लक्ष करावयाचे आहे) ; आणि जर्मनी व्यतिरिक्त इतर सर्वच देशांत त्याची जागा " प्रादेशिक भूगोल " (Regional Geography) या समर्पक संज्ञेने घेतलेली आहे. बऱ्याच जर्मन भूगोलाभ्यासकांना Länderkunde ही संज्ञा समर्पक नाही असेच वाटते; त्यातून सागर वगळले जातात हे एक कारण आणि आता प्रदेश या नावाने अभ्यासिल्या जाणाऱ्या सर्वसामान्य क्षेत्रापेक्षा खूपच मोठे क्षेत्रीय विभाग त्या संज्ञेने सुचविले जातात हे दुसरे कारण. १८३१ मधेच फ्रयोबेलने Land या ऐवजी Region ही संज्ञा सुचविली होती (५४), तर सुपानने " विशिष्टाभ्यासी भूगोल " (Spezielle Geographic किंवा Special Geographic) या संज्ञेचा पुन्हा वापर करण्यास तयार होता (७८, १५३). वेबेलला या संज्ञे इतकीच Regionale Geographic ही संज्ञाही मान्य होती (२६६, १९८). पण, लाऊटेनझाक Regionale Geographic हीच संज्ञा मान्य करत असे (१७३, २९ f). यांपैकी कोणतीच संज्ञा जर्मन भाषेतून आलेली नसल्यामुळे वर्तमानकालीन जर्मन भूगोलकारांना कोणतीच मान्य होण्याची शक्यता नव्हती.

भूगोलक्षेत्र दोन वेगवेगळ्या, पण एकमेकाला छेद देणाऱ्या, दोन दिशांनी विभागले जाते, या वस्तुस्थितीमुळेच हा गोंधळ माजत असतो. काही थोड्या उदाहरणांची वर्गवारी करून याच परिस्थितीचे आणखी स्पष्टीकरण देण्याचा प्रयत्न करण्यास हरकत दिसत नाही. प्रस्तुत ग्रंथकाराच्याच अन्य अभ्यासग्रंथांचा संदर्भासाठी उपयोग करण्याची मर्यादा पाळली म्हणजे दुसरा कोणी दुखावला जाण्याचा धोकाही त्यातून निर्माण होणार नाही. " राजकीय सरहद्दींच्या प्रकारांचा अभ्यास " हा राजकीय भूगोलातील क्रमबद्ध अभ्यास आहे, आणि त्यात काही जातिसंकल्पनांची रचना करणे आणि काही सामान्य तत्वे मांडणे हे हेतू साध्य व्हावयाचे आहेत (३५७). " अप्पर सायलेशियाच्या सरहद्दींचा अभ्यास " हा अंशतः प्रादेशिक अभ्यास आहे —म्हणजे प्रादेशिक राजकीय भूगोलांतर्गत अभ्यास आहे (३५५). त्याप्रमाणे, " अपर सायलेशियातील उद्योगप्रधान प्रांतांचा अभ्यास " हाही प्रादेशिक असला, तरी तो, आर्थिक भूगोलाच्या एका विभागापुरताच मर्यादित आहे (३५६). शेवटी, " आस्ट्रिया हंगेरीचा अभ्यास " हा एका ऐतिहासिक कालखंडाचा, म्हणजे विसाव्या शतकाच्या आरंभकालाचा अभ्यास आहे— तो एक राजकीय प्रादेशिक भूगोलांतर्गत ऐतिहासिक भूगोलाचा अभ्यास आहे (३५८). दुसऱ्या शब्दांत सांगावयाचे झाले तर, फायपरच्या म्हणण्याप्रमाणे जी मर्यादा पाळणे आवश्यक आहे, तशी सीमारेषा आर्थिक व प्रादेशिक या दोन भूगोल शाखांमध्ये असल्याचे आम्ही मानत नाही (१०९, १०८), कारण प्रत्येक शाखा दुसऱ्यांवर अतिक्रमण करत असतेच. पण, यावरून असेही अनुमान निघते, —आणि, कदाचित, फायफरला तेच सुचवावयाचे होते— की प्रादेशिक भूगोल जर आर्थिक-प्रादेशिक भूगोलापूरताच मर्यादित ठेवला तर तो परिपूर्ण होईल असे समजावयाचे कारण नाही.

## 'फ' भूगोलातील ज्ञानसंघटनाची अन्य एकसंघक शास्त्रांतील ज्ञानसंघटनांशी तुलना

क्रमबद्ध भूगोल आणि प्रादेशिक भूगोल ही भूगोलक्षेत्रातील ज्ञानसंघटनाची दोन संवर्गीय रुपे आहेत या आमच्या निष्कर्षामुळे, वाचकांच्या मनात एक प्रश्न उभा रहात असण्याची शक्यता आहे —आणि तसा—तो प्रस्तुत लेखकाच्याही मनात आला होता. ज्या शास्त्रांच्या बरोबरीने आम्ही भूगोलाला बसविले त्या शास्त्रविभागात भूगोलाचे नेमके स्थान कोणते ? खगोल शास्त्राबरोबरच भूगोल शास्त्राची वर्गवारी क्षेत्रवर्णनप्रधान शास्त्र म्हणून करावयाची असेल, आणि या दोहोंचाही समावेश इतिहासशास्त्राबरोबर एकसंघक शास्त्रशाखेत करावयाचा असेल, तर यांपैकी प्रत्येक क्षेत्रात व क्रमबंधात्मक व विभागात्मक (म्हणजेच प्रादेशिक किंवा आवर्तनी) दृष्टिकोणाशी सुसंगत असणारी विभागणी असावी, अशी अपेक्षा करणे तर्कसंगतच नाही का ? बहुतेक सर्वच खगोलशास्त्राचा अभ्यास क्रमबंधात्मक दृष्टिकोणातून आणि बहुतेक सर्व इतिहासाचा अभ्यास कालखंडात्मक दृष्टिकोणातून करणे

शक्य आहे, असे कोणालाही प्रथमदर्शनीच वाटण्याची शक्यता आहे. अशी परिस्थिती असल्यामुळेच एक शंका येते. वरील दोनही क्षेत्रांशी भूगोल तर्कदृष्ट्या समरूप आहे या आमच्या उपपत्तिवर विकल्पांची सावट तर पडणार नाही ना ?

खगोलशास्त्र व भूगोलशास्त्र ही दोन्ही अवकाशस्थ एकसंधानाशी संबंधित असली —अवकाशातील अन्योन्य संबंध असणाऱ्या वस्तूंशी संबंधित असली—तरी ज्या अवकाशांचा त्या शास्त्रांना अभ्यास करावयाचा असतो त्यांचे स्वरुप आणि त्या मर्यादेत असलेल्या वस्तूंचे स्वरुप यांच्यांत इतका अंतर्बाह्य फरक असतो, ही तर्कसंमत सरुपता कितीही मोठी असली, तरी या दोन क्षेत्रांच्या विकासांचे परिणामही सरुप असतील अशी अपेक्षा करण्याचे धाडस कोणी करणार नाही ! आपल्या बहुतांश कार्याच्या संदर्भात आकाशस्थ अवकाश भलताच सुगम आहे असे खगोल शास्त्रज्ञाला वाटण्याची शक्यता आहे. कारण, एकतर त्यात सजातीय ईथर सर्वत्र भरलेला असतो, —आणि आपल्या बहुतेक सर्व कार्याच्या संदर्भात या अवकाशाला तो शून्यावकाशच मानतो— आणि दुसरे असे, की त्यात फक्त अचेतन राशींचाच समावेश असतो. या राशी बहुतांशी ज्यांची स्पष्टपणे व्याख्या करता येईल अशा एककांच्या रुपांत असतात आणि एकमेकांपासून महदंतराने विभक्त असतात. म्हणूनच, ते राशी मूलतः परिपूर्ण एककांच्या रुपांनी परस्परांशी संबंधित असतात. कोणत्याही आकाश प्रदेशात —उदाहरणार्थ, सूर्यमालेने व्यापलेल्या आकाशप्रदेशात— एकसंधानाची समस्या मोठीशी नसते; असते ती या एककराशींच्या अन्योन्य संबंधांना क्रमबद्ध करण्याची समस्या असते. ही समस्या प्रामुख्याने परस्परांच्या स्थिती व गती यांच्यावर होणाऱ्या परिणामांशी संबंधित असते, आणि ते परिणाम गुरुत्व आणि मुक्तगती या दोन कारकांच्या भाषेत अभ्यासावयाचे असतात. पण, क्रमबद्ध खगोलशास्त्रातही, अद्यापि सर्वच निर्णय शास्त्रीय नियमांच्या चौकटीत बसवता येत नाहीत. सूर्याच्या गतीचे मापन अन्य ताऱ्यांच्या संदर्भात झाले असले, तरी ती गती निश्चितपणे सांगणारे नियम तयार झालेले नाहीत, कदाचित केव्हाच होणार नाहीत !

प्रादेशिक भूगोलाशी सुसंगत असणारे अभ्यास खगोलशास्त्रांतही असतात. असे प्रादेशिक अभ्यास म्हणजेच, वेगवेगळ्या भागांतील फरक प्रत्यक्ष निरीक्षणाने ठरविता यावे इतकी जवळ असणारी जी सूर्यमालेतील एकके आहेत, अशांच्या तपशीलवार निरिक्षणांनीयुक्त असे अभ्यास होत. पण, जरा निराळ्या स्वरुपाचे म्हणजे आपल्या विश्वातील नक्षत्रांचे अभ्यास आणि तारायुक्त वायुमेघांचे तपशीलवार परीक्षण या गोष्टीही त्याच प्रकारच्या अभ्यासांत मोडतात.

त्यांतील वर्ण्यविषयाच्या सापेक्ष सुगमतेमुळे खगोलशास्त्राचा संबंध क्रमबंधात्मक अभ्यासांशीच अधिक असतो, पण, इतिहासाची स्थिती मात्र याच्या अगदी उलट असते, या गटातील ऐतिहासिक भूशास्त्र क्रमबंधात्मक व आवर्तनी या दोन संपर्कपद्धतींतील भेद अगदी स्पष्ट करून दाखवते. ऐतिहासिक युगांयुगांतून होत आलेल्या हवामानविषयक बदलांचा,

पर्वतराजींच्या विकासावस्थेत होत गेलेल्या बदलांचा, आणि सर्वसामान्यपणे खंडांतर्गत भूरुपांच्या बदलांचा, अभ्यास —तसेच, घोड्याच्या उत्क्रांतीचा अभ्यास— ही सर्वच पृथ्वीच्या इतिहासातील क्रमबंधात्मक अभ्यासांची रूपे आहेत. याविरुद्ध, उत्तर मिसिसिपियन युगात, अथवा पृथ्वीच्या इतिहासातील एखाद्या प्राचीन युगात, घडलेल्या हवामान, भूरूपे आणि वनस्पतिजीवन व प्राणिजीवन या सारख्या सहघटनांचे एक सर्वसाधारण चित्र सादर करण्याचा प्रयत्न करणारे अभ्यास असतात.

भूगोलाच्या स्वरूपाविषयीच्या या चर्चेत जिचा आम्ही अथपासून इतिपर्यंत वारंवार उल्लेख करत आलो ती भूगोलाची इतिहासाशी होत आलेली तुलना, अर्थातच, " ऐतिहासिक कालाचा इतिहास " या इतिहासाच्या नित्याच्या अर्थाने केलेली आहे. पण, ही तुलना फक्त प्रादेशिक भूगोलाच्या संदर्भातच करणे शक्य होते, म्हणजेच, इतिहास क्षेत्रात क्रमबंधात्मक अभ्यासांचा अभाव असतो, असे विविध अभ्यासकांनी सुचविलेले आहे (c/o पेंक १५८, ४८ ते ५०).

ज्याला " कालखंडात्मक इतिहास " असे नाव देता येईल त्याच्याच भाषेत इतिहास शिकविला जातो, या वस्तुस्थितीमुळे आपली दिशाभूल होण्याचे कारण नाही. पण, आपल्या अनुसंधान कार्यासाठी निवडलेल्या समस्यांचा अभ्यास करताना, घटनांच्या एका अगदी संकुचित गटात एखाद्या वर्षपंक्तीमध्ये होत गेलेल्या विकासांवर व बदलांवर इतिहासकार, सहसा, आपले लक्ष केंद्रित करतात, हे खरेच ! अशा अभ्यासातून एखाद्या विशिष्ट रुपाच्याच विकासाचे विवेचन केलेले आढळते. उदाहरणार्थ : राज्य घटनेच्या एखाद्या विशिष्ट प्रकाराचा विकास, इग्लंडच्या गव्हाच्या किमतीत होत गेलेले बदल, अथवा मिनेसोटातील मार्गांची वाढ अशाप्रकारच्या विशिष्ट घटनांचेच अशा अभ्यासांत प्रतिपादन केलेले असते.

क्रमबद्ध भूगोलाला महत्व देणे जसे भूगोलक्षेत्राला आगत्याचे वाटते तसे कोणत्याच प्रकारचे महत्व वरीलप्रकाराच्या अभ्यासांना देण्याची गरज एकूण इतिहास क्षेत्रालाच वाटत नाही असे कोणाही तिऱ्हाइताचे मत होईल. विशेषेकरून, क्रमबद्ध भूगोलात वृद्धिंगत झालेल्या जातिसंकल्पना व तत्वे यासारख्या निश्चित स्वरुपांच्या विचारांची निर्मिती सदरच्या अभ्यासांतून इतिहासक्षेत्रात तितक्या निश्चयाने झालेली नाही.

या दोन क्षेत्रांत अभ्यासिल्या जाणाऱ्या आणि ग्रंथरुपाने प्रसिद्ध झालेल्या समस्यांची तुलना केली तर, भूगोलात सामान्यतः अभ्यासिल्या जाणाऱ्या घटनांपेक्षा ज्यांचे अंतःसंबंध फारच गुंतागुंतीचे असतात, अशा घटनांशी इतिहासकारांचा संबंध असतो, हे स्पष्ट दिसून येते. पण, या फरकांमागील तर्कसिद्ध आधार मात्र तितकासा स्पष्ट होत नाही. या दोन क्षेत्रांच्या संबंधांबाबतचे आमचे मूलभूत गृहीतप्रमेय विचारात घेता असा तर्कसिद्ध निष्कर्ष निघतो, की या दोनही क्षेत्रांतून एकाच घटनेचा अभ्यास करावयास हरकत नाही; अर्थात्, इतिहासाने क्षेत्रीय घटनांचा आणि भूगोलाने ऐतिहासिक प्रसंगाचा विचार करण्यास काहीच हरकत नाही.

सत्यस्थितींच्या ज्या छेदांचा अभ्यास इतिहास व भूगोल करत असतात, त्यात आढळणाऱ्या सर्वच घटनांचा विचार दोन बाजूंनी करत बसण्याची गरज नाही; फक्त, काल अथवा स्थल यांच्या विविध छेदांत ज्या घटना महत्वाने बदलत जातात तेवढ्यांचाच विचार केला म्हणजे पुरे. ज्यांच्यातील बदल अत्याधिक असतात आणि एकूण भेदाभेदांच्या संदर्भात ज्यांच्यातील बदल महत्वपूर्ण असतात अशाच घटनांवर लक्ष केंद्रित करावयाचे असते. ज्या एकूण सत्यस्थितीशी, म्हणजेच जगाच्या इतिहासकालीन घटनांशी, इतिहास व भूगोल या दोहोंचाही संबंध येतो त्यात नैसर्गिक घटनांचा एक प्रमुख गट आहे. तो अन्य घटनांच्या कार्यकारणांशी संबंधित असल्यामुळे, सर्वच घटनांच्या दृष्टिने मौलिक महत्वाचा असतो. पण, तोच नैसर्गिक घटनासंच एका बाजूला जगाच्या निरनिराळ्या वर्तमानकालीन क्षेत्रांत लक्षणीय बदल होत गेल्याचे दाखवितो, तर दुसऱ्या बाजूला ऐतिहासिक जगाच्या वेगवेगळ्या कालखंडांतून होत गेलेले तत्संबंधी बदल उपेक्षणीय असल्याचे दिसते. अर्थातच, यामुळे सकुंचित अर्थाने ऐतिहासिक काल आणि प्रागैतिहासिक काल यांच्यातच केवढेतरी अंतर निर्माण होते, मग पुरातन जीवशास्त्राचे तर नावच घ्यावयास नको !

म्हणूनच प्रत्यक्ष नैसर्गिक रुपधेयांमधील फरक, किंवा नैसर्गिक रुपधेयांशी घनिष्ठ संबंध असलेल्या सांस्कृतिक रुपधेयांमधील फरक, असे क्षेत्रीय भेदच भूगोलात अत्याधिक महत्वाचे गणले जातात. हवामान व भूरुपे अशा नैसर्गिक रुपधेयांत एकाच काळात जगभर फरक पडत गेलेले असतात, तसेच मूलभूत बदल ऐतिहासिक कालांतही त्या त्या रुपधेयांत एकाच स्थळी होत गेले असते, तर इतिहासातही भूगोलाशी सरुप परिस्थिति निर्माण झालेली दिसली असती. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर, इंग्लंडचे नैसर्गिक पर्यावरण, सीझर नंतरच्या काळात, आर्द्र न रहाता रखरखीत झाले असते, ध्रुवदेशीय न रहाता वृत्तान्तर्गत स्वरूपाचे झाले असते, तेथील मैदानांचे रुपांतर पर्वतराजींत झाले असते, तर मात्र इंग्लंडच्या कृषिविषयक इतिहासाला इंग्लंडच्या इतिहासातील सर्वाधिक महत्त्वाच्या प्रकरणाचे स्थान मिळाले असते. आणि इतिहासानेही ' हवामानेतिहास ', 'भूरुपेतिहास' इत्यादींसारख्या क्रमबंधात्मक शाखा यापूर्वी केव्हाच विकसित केल्या असत्या. थोडक्यात, इतिहासाने हवामानेतिहासाचा क्रमबद्ध अभ्यास विकसित करावा —म्हणजेच, हवामान बदलांचा अन्य ऐतिहासिक रुपधेयांशी असलेल्या संबंधाचा अभ्यास करावा— ही गोष्ट केवळ युक्तिवादात न रहाता आगत्याची ठरली असती, तरच " हवामानात होत गेलेल्या किरकोळ बदलांना देखील ऐतिहासिक महत्त्व आहे " या इल्सवर्थ हंटिंग्टनच्या सिद्धान्ताचे समर्थन करता आले असते.

कोणत्याही परिस्थितीत, " इतिहास कालात नैसर्गिक परिस्थिती सापेक्षपणे स्थिर राहिली, म्हणूनच अशा नैसर्गिक परिस्थितींशी निकटसंबंधित असणाऱ्या सांस्कृतिक रुपधेयांनाही त्याचप्रमाणात स्थैर्य लाभले " या नियमाची, आताच पुढे ठेवलेल्या उदाहरणाचे स्वरूप अपवादात्मक आहे, हीच खरी कसोटी आहे. कोणत्याही प्रदेशातील जमीन वापराची रीत शतकानुशतके, आणि चीनमध्ये कित्येक सहस्त्रके, एकंच प्रकारची राहू शकते ; कित्येक नगरे

तारुण्य, प्रौढत्व, वृद्धत्व व अंत अशा नित्याच्या जातिप्रक्रियेतून जातच नाहीत, इतकेच नव्हे, ती अशाच परिस्थितीत अनंतकालपर्यंत टिकून राहण्यास काहीच हरकत दिसत नाही.

म्हणूनच, कालाच्या संदर्भात लक्षणीयपणे बदलत जाणाऱ्या घटना, म्हणजेच नैसर्गिक परिस्थितींशी कमीप्रमाणात संबंधित असणाऱ्या सांस्कृतिक घटना, या सामान्यतः खूपच अधिक गुंतागुंतीच्या स्वरुपाच्या घटना असतात-- उदाहरणार्थः- चालिरिती, रुढी, राजनैतिक संघटना, यांत्रिक शोध इत्यादी. भूगोलांशी अत्यंतिक संबंध असणाऱ्या घटनांपेक्षा या घटना मुळातच फार गुंतागुंतीच्या असतात, इतकेच नव्हे तर, वेगवेगळ्या प्रदेशांतील भौगोलिक घटनांमधील अंतःसंबंधांपेक्षा, वेगवेगळ्या कालखंडांतून वरीलप्रकारच्या घटनामधील दिसून येणारे अंतःसंबंधही अधिक गुंतागुंतीचे असतात. खरे म्हणजे, बहुतेक सर्वच बाबतीत, इतिहासाच्या एका कालखंडाच्या स्वरुपाने त्याच्यानंतरच्या कालखंडाचे स्वरुपही निश्चित केलेले असते . पण, भूगोलात मात्र एका प्रदेशाच्या स्वरुपाचे त्याच्या शेजारच्या प्रदेशाच्या स्वरुपावर, झालेच असले तर, अगदी किरकोळ परिणाम झालेले दिसून येतात. म्हणूनच, इतिहासकारांना आपण केलेल्या कालविभागणीच्या काल्पनिक स्वरुपाची चांगलीच जाणीव असते ; त्यामानाने, भूगोलकारांना त्यांनी केलेल्या प्रादेशिक विभागणीसंबंधीची अशी जाणीव रहात नाही, यात आश्चर्य नाही !

उलटपक्षी, जमिनीकडून समुद्राकडे जाताना जशा प्रकारचे फरक भूगोलात दृष्टिला पडतात, तशाच प्रकारचे फरक ऐतिहासिक विकासक्रमात अनपेक्षित खंड पडल्यामुळे निर्माण होत असतात. जेव्हा नवेनवे शोध व यांत्रिक शोध लागतात, किंवा लोकसमूहाचे स्थलांतर होते, तेव्हा त्या प्रदेशाची एका नव्या संस्कृतिशी ओळख होत असते. गेल्या कित्येक, शतकांत, अमेरिकी वसाहतींची सीमा ही एक भौगोलिक विरोध दाखविणारी रेषा होती, इतकेच नव्हे तर, कोणत्याही प्रदेशातून सरकत असताना, मानव निसर्गाशी जुळते घेण्याच्या प्रयत्नात असताना, निर्माण झालेल्या एका नव्या ऐतिहासिक क्रान्तीची निदर्शक रेषा होती. म्हणूनच, या क्रान्तीच्या इतिहासकाराने नैसर्गिक व सांस्कृतिक रुपधेयांमधील संबंध दाखविणारी नियंत्रक तत्वे समजून घेणे आवश्यक आहे. औद्योगिक क्रांतिसारख्या, आणि त्याच्याच अनुषंगाने आलेल्या युरोपियन कृषिक्रांतीसारख्या, समस्यांच्या बाबतीतही हीच गोष्ट खरी आहे.

पुष्कळशी ऐतिहासिक सामग्री ज्यांच्यांतून उपलब्ध होते त्या रुपधेयांपेक्षा कमी गुंतागुंतीच्या ऐतिहासिक समस्यांचा ज्या इतिहासकारांना विवेचन करावयाचे असते, ते इतिहासकार शक्य असेल तेथे वर्ण्यविषयाचा क्रमबद्ध अभ्यास करण्यास आणि शक्य असेल तेव्हा त्यांच्यांतील संबंधयोग स्पष्ट करून सांगण्यास कचरत नाहीत, हे गृहितच आहे. पण, बहुतांश ऐतिहासिक घटना त्यांचे निश्चित स्पष्टीकरण न देता येण्याइतक्या गुंतागुंतीच्या असतात. ही वस्तुस्थिती असली तरी, ऐतिहासिक घटनांचे अर्थानुसंधान करताच येत नाही, असे अधिकारी तत्व, निर्माण होण्याची गरज नाही. मानव निसर्गाशी जुळते घेण्यासाठी

वापरत असलेली आधारतत्वे ज्यांमुळे लक्षणीयरीत्या पालटली, त्यावर उल्लेखिलेल्या परिस्थितींशी तुलना करता येतील अशा घटना इतिहासात फार थोड्या घडल्या, हे एक प्रकारे दुर्दैव म्हणावयाचे ! तसेच, त्यांच्यापैकी बहुतेक घटना इतक्या पुरातन कालात घडलेल्या आहेत, की त्यांचा अभ्यास करण्यासाठी लागणारी विश्वसनीय सामग्री अगदीच तुटपुंजी असते. उदाहरणार्थ : क्रमाने प्रगत होत जाणाऱ्या वसाहतींच्या सीमा या अर्थाने " सरहद्दींच्या " इतिहासाचा अभ्यास करावयाचा असेल , तर त्यात फक्त 'नव्या जगातील' व सैबेरियातील अशा सरहद्दींचा अभ्यास करून भागणार नाही, तर मध्य युगात झालेल्या युरोपीय जर्मन वसाहतींच्या हद्दी, आणि त्याच्याही पूर्वीच्या अँग्लो-सॅक्सन वसाहतींच्या इग्लंडमधील हद्दी, यांचाही अभ्यास बरोबरीने करावा लागेल. अशा अभ्यासांसाठी लागणारी सर्व सामग्री उपलब्ध आहे असे गृहीत धरूनही, अशा समस्या अत्यंत गुंतागुंतीच्याच राहणार; कारण जगाच्या इतिहासाचे विविध कालखंड त्यात गुंतलेले असतात, आणि जगातील मूलतः भिन्न स्वरुपांच्या वेगवेगळ्या प्रदेशांची त्या गुंतागुंतीत भर पडते.

क्रमबद्ध अभ्यासांसांठी हाताळावयाच्या इतिहासातील समस्या साधारणतः वाजवीपेक्षा जास्त गुंतागुंतीच्या असतात, आणि त्यांच्यातील संबंधित कारके इतकी दुर्बोध असतात, की त्यांचे निरीक्षण व मापन करणे अशक्य होते, त्यामुळेच, क्रमबद्ध भूगोलात ज्या प्रकारच्या संकल्पना विकसित झाल्या आहेत त्यांच्याशी संगती दाखविणाऱ्या जातिसंकल्पना आणि तत्वे इतिहासक्षेत्रात विकसित करणे अडचणींचे होते. राज्यांचा अभ्युदय व विनाश, राज्यक्रांतींची कारणे, किंवा विशिष्ट सामाजिक चळवळींचा विकास, अशा विषयांसंबंधींचे शास्त्रीय नियम रचणे शक्य आहे असे काही इतिहासाभ्यासक मानतात —अर्थातच, ते इतिहासलेखक नसतात— ही गोष्ट निश्चित आहे. पण, या प्रमेयाच्या पुष्ट्यर्थ त्यांनी मांडलेल्या पुराव्यापेक्षा त्यांच्या अभिनिवेशामुळेच हे प्रमेय जास्त आकर्षक होते. काही तत्वे प्रस्थापित करता येतील अशा रीतीने ज्या घटनांची जातिसंकल्पनांनुसार वर्गवारी करता येते, अशा इतिहासात महत्व प्राप्त झालेल्या एखाद्या घटनेचा क्रमबद्ध इतिहास रचता येईल की काय, याबद्दल निदान व्यावसायिक इतिहासकार साशंक आहेत; आणि इतिहासातील ही उणीव भूगोल भरून काढू शकतो, ही भूगोलकारांची सर्वसाधारण श्रद्धा भक्कम पुराव्याअभावी, आजतागायत तरी, निराधारच राहिली आहे.

भूपृष्ठावरच अत्यंत लक्षणीयपणे बदलत जाणाऱ्या घटनांमधील अंतःसंबंधांपेक्षा ऐतिहासिक कालात तितक्याच लक्षणीयपणे बदलत आलेल्या घटनांतील अंतःसंबंध कितीतरी अधिक गुंतागुंतीचे असतात, या वस्तुस्थितीचा परिणाम इतिहास व भूगोल या दोहोंत विरोधाभास निर्माण होण्यात झाला. पण, सत्यस्थितीत जशा अवस्थेत आढळतात तशा अवस्थेत घटनांचे एकसंधान करण्याचा प्रयत्न करणारी शास्त्रे, या शब्दात वर्णनकरता येणाऱ्या त्या दोन क्षेत्रांतील तर्कसिद्ध साम्याला वरील विरोधाभास मुळीच बाधक ठरत नाही.

## 'ग'–क्रमबद्ध भूगोलाचे स्वरुप*

कोणत्यातरी एकाच भौगोलिक कारकाच्या परिभाषेत भूपृष्ठाच्या भेदाभेदात्मक स्वरुपाचे विवेचन करणे हे क्रमबद्ध भूगोलातील अभ्यासांचे सरळ सोपे रुप होय. गतकालातील अशा प्रकारचे सर्व अभ्यास जास्त प्रमाणात नैसर्गिक कारकांपुरतेच —उदाहरणार्थः हवामानविषयक कारके, भूरुपे, मृत्तिका इत्यादी कारकांपुरतेच— मर्यादित असत. पण, पुष्कळ अभ्यासकांनी दाखवून दिल्याप्रमाणे, भूगोलाला सर्वसामान्यपणे मानवी अथवा सांस्कृतिक रुपधेयांचा विचार करावयाचा असेल, तर त्यांचा अभ्यास क्रमबद्ध भूगोलाइतकाच प्रादेशिक भूगोलातही होत गेला पाहिजे (c/o हेटनर १२६, ६७२ : हेटनरने केलेले क्रमबद्ध भूगोलाचे औपपत्तिक विवेचन १४०, १५२, ४६-४८, १६१, ३९८-४०४, व १६७, २८१-८६ इतक्या ठिकाणी आढळेल; आणि याच आधाराने जगाच्या प्रदेशांचे त्याने केलेले पर्यवेक्षण ३६३ मध्ये आढळेल.) याबाबतीत क्रमबद्ध भूगोलाची आजपर्यंतची वाटचाल एकमार्गी होत गेली आहे, ही गोष्ट आजच्या बहुतेक सर्व अभ्यासकांना कळून चुकलेली आहे. या विरोधाभासाचे एकांतिक उदाहरण फिंच व ट्रेवार्था यांच्या 'भूगोलाची मूलतत्वे' या ग्रंथात मिळते. नैसर्गिक घटकांच्या क्रमबद्ध भूगोलाचे सहाशे पानी प्रभावी प्रतिपादन लेखकांनी केले आहे; याच्या विरुद्ध, त्यांनी क्रमबद्ध सांस्कृतिक भूगोलातील कितीतरी अधिक गुंतागुंतीचे प्रश्न केवळ एकदशांश भागात गुंडाळलेले आहे (३२२).** असा पक्षपात होत असल्यामुळे, आपल्या देशात, आणि इतरत्रही, होत असलेल्या क्रमबद्ध सांस्कृतिक भूगोलाच्या विकासावर मोठाच अन्याय होत असतो. स्वतः फींचने केलेल्या अभ्यासांसह अन्य पुष्कळच उत्कृष्ट अभ्यासांकडे सदर लेखकांनी कां दुर्लक्ष करावे हे कोडे उलगडत नाही. शिवाय, जर्मन अभ्यासकांनी केलेल्या सांस्कृतिक भूगोलातील क्रमबद्ध अभ्यासांची केवढी तरी मोठी गणती आज उपलब्ध आहे, आणि विशेषेकरून त्यात श्लूटर व त्याचे विद्यार्थी यांचा समावेश होतो (c/o वायबेल याने केलेली चर्चा २६६, २०११, श्लूटरचे नमुनेदार उदाहरण 'पुलांचा अभ्यास' याचा पूर्वीच उल्लेख करण्यात आला आहे, २४७, मानवाच्या क्रमबंधात्मक भूगोलाचे तपशीलवार पर्यवेक्षण हसिंजर लिखित खंडात (३६०) पहावयास मिळते).

जर्मनी व अमेरिका या दोनही देशात, नैसर्गिक रुपधेयाबरोबरच, सांस्कृतिक रुपधेयांचाही ज्यात समावेश असतो अशा संपूर्ण प्रादेशिक अभ्यासांविषयींची अभिरूची वाढीला लागलेली असतानाही, भूगोलविषयक अनुसंधानकार्याची पिछेहाट होत असताना दिसते, ती त्याला क्रमबद्ध सांस्कृतिक भूगोलाच्या भक्कम आधाराचा अभाव असल्यामुळे होते, असे नाही. उलट, पुष्कळसे भूगोलकार सामाजिक अभ्यासांत अप्रशिक्षित असतात, त्यामुळे अधिक पिछेहाट होते, असे ब्रोकने नमूद केले आहे (१०८, २५२). प्रादेशिक भूगोलातील अभ्यास संपूर्णपणे करता यावे म्हणून अभ्यासकांची पूर्वतयारी करून घ्यावयाची असेल, —आणि सर्वच भूगोलकारांनी या क्षेत्रात, निदान काही थोडे, कार्य करावे याबाबत सर्वसामान्य एकमत आहे— तर त्याने संबंधी भौतिक शास्त्रांतील प्रशिक्षण घेतलेले असणे

---

*पुरवणी टीप क्र. ४९ पहा.

**हा संदर्भ पहिल्या आवृत्तीसाठी आहे.

जितके आवश्यक आहे, तितकेच त्याला पुष्टी देणारे संबंधी सामाजिक शास्त्रांतील प्रशिक्षण घेणे आवश्यक आहे, ही गोष्ट तर्कसंगत आहे. पण अशी स्थिती भूगोलाच्या, असलीच तर, फार थोड्या शाखात आढळते. शिवाय, भूगोलाचे संबंध समाजशास्त्रांपेक्षा भूशास्त्राशी व अन्य भौतिकशास्त्रांशी सामान्यपणे अधिक निकटचे असल्याने आपल्या कार्याचा जिथे व ज्याप्रमाणात भौतिक शास्त्रांशी संबंध येणार असेल तेथे तेथे त्याची बारकाईने समीक्षा होईल, ही गोष्ट प्रत्येक भूगोलाकार ओळखून असतो. पण त्यामुळेच, कोणत्याही अर्थशास्त्रीय प्रमेयांचे औपपत्तिक प्रतिपादन करण्याचे, अथवा मनात येतील ते राजनैतिक अंदाज ठोकून देण्याचे धाडस तो करतो; कारण आपल्याला त्यांचा जाब द्यावा लागेल अशी भीती त्याला मुळीच वाटत नाही.

उलटपक्षी, भूशास्त्राशी निकटसंबंध असलेल्या भूरुपशास्त्रावर जो भर दिला जात होता त्याऐवजी, अलीकडेच होत असलेल्या खांदेपालटीनुसार, मानवी भूगोलावर आता भर दिला जाऊ लागला आहे; आणि त्यामुळे एक नवीनच वळण निर्माण झाले आहे. मुळात आर्थिक, ऐतिहासिक अथवा अन्य समाजशास्त्रविषयक कितीतरी सामग्री त्या त्या क्षेत्रांतून उसनी घेऊन, ती न पचवताच, आपण करत असलेले अभ्यास हे भौगोलिकच आहेत असे गृहीत धरून केलेल्या अभ्यासांसाठी तीच सामग्री सादर केली जात असते (९१, २४४) अशी टीका क्रेब्जने केली आहे. क्रमबद्ध सांस्कृतिक भूगोलातील संकल्पना आणि तत्वे समृद्ध करण्यासाठी स्वतंत्र अनुसंधान कार्याची गरज आहे, याची जाणीव अमेरिकी भूगोलकारांनाही झालेली आहे असे दिसते. —खरे पहाता, आजच्या भूगोलातील, भरून काढणे आवश्यक असलेली, ही एकच एक उणीव आहे, अशी भावना सर्वत्र आणि उघडपणे पसरत असलेली दिसते.[१०१]

म्हणूनच, भूगोलातील क्रमबद्ध अभ्यास आणि संबंधी क्रमबद्ध शास्त्रांतील अभ्यास, या दोहोंतील फरकांचे काळजीपूर्वक परीक्षण करणे इष्ट आहे. विशेषेकरून, जे भूगोलाच्या सीमाप्रान्तात कार्य करत असतात, त्यांना भूगोलाचा वेगळेपणा मनात सतत बाळगणे आवश्यक असल्यामुळे, त्यांच्याकरिता तरी अशा परीक्षणाची आवश्यकता आहे, असे स्मिथने सुचविले आहे. संदर्भशास्त्रांतील संकल्पना व पद्धती यांच्याशी ते चांगले परिचित असले, आणि त्यांचा उपयोग आपल्या कार्यासाठी ते करू शकत असले, तरीही त्या क्रमबद्ध शास्त्रांच्या वेगळ्या दृष्टिकोणाची पूर्ण जाणीव ठेवून, भूगोलाच्या दृष्टिकोणाने नेमून दिलेल्या हेतूसाठीच त्या शास्त्रांचा उपयोग करत राहिले पाहिजे (७, १६२ ff). विशेषेकरून, अर्थशास्त्र व आर्थिक भूगोल यांच्या अन्योन्य संबंधांचे सांगोपांग आणि मौलिक विवेचन करणाऱ्या अभ्यासग्रंथांची व त्याबरोबरच क्रमबद्ध आर्थिक भूगोलातील एका तपशीलवार अभ्यास ग्रंथाचीही, भर स्मिटने घातली आहे (७, ३८६).

---

१०१. राष्ट्रीय अनुसंधान मंडळाच्या भूशास्त्रविषयक अनुसंधान कार्यासाठी स्थापन केलेल्या भूगोल-विभागाने अमेरिकी भूगोलकारांच्या एका मोठ्या गटामधे वाटलेल्या प्रश्नावलीला मिळालेल्या उत्तरांवरून ही गोष्ट स्पष्ट झालेली आहे. तिच्या उत्तरादाखल आलेल्या अनेक सूचना या ग्रंथात उपयोगात आणलेल्या आहेत. त्यासाठी त्या सूचकांना सर्वसाधारण पोहोच देण्यास हरकत दिसत नाही.

यापूर्वीच उल्लेख केल्याप्रमाणे, क्रमबद्ध भूगोलाच्या विभागणीची संगती क्रमबद्ध शास्त्रांच्या विभागणीशी घालता येते, आणि क्रमबद्ध भूगोलाच्या प्रत्येक शाखेचा घनिष्ठ संबंध संगत क्रमबद्ध शास्त्राशी असतो. हा संबंधयोग केवळ 'शेजारची शास्त्रे' या शब्दप्रयोगाने अचूकपणे स्पष्ट केला जात नाही. कारण, भूगोल ही क्रमबद्ध शास्त्रांच्या हद्दीला केवळ लागून असलेली एक शास्त्र-शाखा नाही तर, सर्वच क्रमबद्ध शास्त्रांचा छेद घेणाऱ्या एका शास्त्रीय दृष्टिकोणाची भूमिका क्रमबद्ध भूगोलाने घेतली आहे (प्रकरण ४-अ). म्हणूनच, क्रमबद्ध भूगोलाला क्रमबद्ध शास्त्रांपासून विभक्त करणारी सीमारेषाच नाही. पण, या दोन दृष्टिकोणांतील अंतर,ज्याला इतर कोणत्याही शास्त्रशाखेतील कार्य न करता भौगोलिक कार्यच करावयाचे आहे अशा, भूगोलाभ्यासकाने सतत राखलेच पाहिजे.

एखाद्या विशिष्ट घटनेचे वितरण हे भूगोलाइतकेच या घटनेशी संबंधित असलेल्या शास्त्रांला महत्वाचे वाटते. फरक इतकाच, की भूगोलाचे लक्ष त्या संपूर्ण घटनेवर केंद्रित झालेले असत नाही —कारण वितरण ही त्याच्या स्वरुपाची एक बाजू झाली— तर एकूण जगाच्या क्षेत्रीय भेदाभेदांशी असलेल्या तिच्या वितरणाच्या संबंधांवर भूगोलाचे लक्ष केंद्रित झालेले असते.

हा दृष्टिकोणातील विरोध धान्य (मका) उत्पादनाचे उदाहरण घेऊन स्पष्ट करता येण्यासारखा आहे. एकूण उत्पन्नाची देशवार आकडेवारी आणि त्याचे राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय बाजारपेठांवर होणारे निकाली परिणाम, या गोष्टी अर्थशास्त्राच्या दृष्टिने महत्वाच्या असल्यातरी भूगोलाच्या दृष्टिने महत्वाच्या नाहीत, हे गृहीत आहे. (पण, अर्थशास्त्राच्या या भौगोलिक रुपांसंबंधीचा विचार अर्थशास्त्रज्ञ स्वखुशीने आर्थिक भूगोलाकडे सोपवितात, या वस्तुस्थितीमुळे कोणी गोंधळून जाण्याची शक्यता आहे. परिणामी, जो मुळात अर्थशास्त्राचा एक भाग आहे अशा क्षेत्रात अनुसंधानकार्य करण्याचा खटाटोप भूगोलकारांनी अनेकवार केला आहे). त्याचप्रमाणे, मका उत्पादनातील वार्षिक बदलांचा वार्षिक पर्जन्यमानातील बदलांशी असलेला संबंध हा कृषिशास्त्राभ्यासकांचा अत्यंत जिव्हाळ्याचा विषय असला तरी, भूगोलात प्रत्यक्ष त्याचा विचार होत नाही. नेब्रास्कात होणाऱ्या पर्जन्यातील बदलांचा तिकडील मका उत्पन्नावर जितका परिणाम होतो, तितका परिणाम पेन्सिल्वानियातील तेवढ्याच बदलांचा तिकडील उत्पादनावर होत नाही. ही वस्तुस्थिती मात्र भौगोलिकदृष्ट्या महत्वाची आहे. मका उत्पादनातील लक्षणीय क्षेत्रीय बदलांशी भूगोलाचा संबंध असतो याचे कारण हे उत्पादन एकूण क्षेत्रीय भेदाभेदांच्या एका भागाचे प्रातिनिधीक रुप आहे. एका बाजूला, हवामानातील, मृत्तिकांतील, सापेक्ष स्थानांतील किंवा सांस्कृतिक परिस्थितितील भेदांशी असलेल्या त्याच्या संबंधांतून आणि दुसऱ्या बाजूला, पिके-गुरेढोरे अशा घटक जटिलांतील, धान्यकोठारांच्या स्वरुपांतील, उपसा यंत्राच्या वापरातील भेदांशी असलेल्या त्याच्या संबंधातूनच एकूण क्षेत्रीय भेदाभेदांशीही त्या उत्पादनाचा सहवास घडतो.

दुसऱ्या शब्दात सांगावयाचे झाले तर, मका उत्पादनाच्या वंटनविषयक वस्तुस्थिती या स्वभावतः " भौगोलिक " नाहीत; अगदी नकाशावर दाखविलेल्या असल्या तरीही त्या भौगोलिक महत्वाच्या नाहीत. पण, त्या वस्तुस्थितींच्या संदर्भात ज्या गोष्टींचा अभ्यास केला जात असतो तो अभ्यास भूगोलाच्या दृष्टिने अर्थपूर्ण असतो. विविध क्षेत्रात आढळणाऱ्या भौतिक व सांस्कृतिक घटनांच्या वंटनविषयक वस्तुस्थितींचे केवळ वर्णन व विश्लेषण करून, फारतर, एक ज्ञानकोष निर्माण करता येईल, पण, क्रमबद्ध अथवा प्रादेशिक भूगोलग्रंथ तयार होणार नाही. त्यासाठी त्या घटनांतील क्षेत्रीय भेदाभेदात्मक वस्तुस्थितींचा अभ्यास त्यांच्या क्षेत्रीय संबंधांतून केला गेला पाहिजे; म्हणजेच, त्या क्षेत्रातील अन्य घटनांशी असलेले त्या वस्तुस्थितींचे संबंध आणि त्यांचे अन्य क्षेत्रांतील घटनांशी असलेले अवकाशात्मक लागेबांधे या दोहोंमुळे निश्चित होणारे त्यांचे त्या क्षेत्रातील महत्व स्पष्ट झाले पाहिजे.

उदाहरणार्थ : क्रमबद्ध आर्थिक भूगोलांतर्गत अभ्यास हा भूगोलविषयक दृष्टिकोण अथपासून इतिपर्यंत टिकवून धरता आला नाही, तर त्याचे रुपांतर अर्थशास्त्रांतर्गत भौगोलिक अंगांच्या अभ्यासात होऊन जाईल. अभ्यासासाठी घेतलेल्या विशिष्ट घटनेच्या वितरणविषयक वस्तुस्थिती प्रस्थापित करणे, हा टप्पा दोनही प्रकारच्या अभ्यासांसाठी आरंभीच घ्यावा लागतो हेच या गोंधळाचे कारण असते. पहिल्याच टप्प्यात अभ्यासकाचे लक्ष प्रत्यक्ष त्या घटनांवर केंद्रित झालेले असते, आणि त्याच दृष्टिकोणातून अभ्यास पुढे चालू ठेवला जाण्यात त्याचा सहजच परिणाम होतो. अर्थातच, तो त्या घटनेचा अभ्यास होतो, म्हणजेच तो अभ्यास क्रमबद्ध शास्त्राचा असतो.

आपल्या काही थोड्या अभ्यासांसाठीच अर्थशास्त्रज्ञ अथवा वनस्पतीशास्त्रज्ञ त्यांना इष्ट असलेल्या घटनांचा विचार त्यांच्या सापेक्ष स्थलांच्या संदर्भात करत असतात. पण, भूगोलकार आपल्या इष्ट वस्तुस्थितींच्या सापेक्ष स्थलांचा विचार नेहमीच करत असतो. त्यामुळेच, वस्तूंचे 'स्थल' निश्चितकरणे (आणि त्याचा अन्वयार्थ लावणे), येवढ्याने भूगोल पूर्ण होत नसला तरी, ही केवळ भूगोलाची जबाबदारी आहे —कारण भूगोल हे वंटनशास्त्र आहे— असे सहसा मानले जाते. कोणाही प्राणिशास्त्रज्ञाने, भूशास्त्रज्ञाने अथवा अर्थशास्त्रज्ञाने आपल्या इष्ट घटनेच्या वंटनाचा विचार करत असता, आवर्जून भूगोलाचाच आधार घेतला पाहिजे असा दावा सांगणे, हेही धाष्टर्याचे व सत्यस्थिती-विरोधक ठरेल. तसेच, अन्य शास्त्रांतील अभ्यासकांनी आपपाल्या अभ्यासांसाठी नकाशीकरणाचे भौगोलिकतंत्र वापरले तरी तेवढ्याने ते भूगोलकार होत नाहीत. गतकालातील घटनेचा 'काल' निश्चित करण्याची इतिहासाची पद्धती अर्थशास्त्रज्ञ अथवा राजनितिशास्त्रज्ञ वापरत असण्याची शक्यता असते. पण, तेवढ्यानेच काही त्यांचे कार्य ऐतिहासिक स्वरुपाचे ठरत नाही. त्याचप्रमाणे, क्रमबद्ध शास्त्रांचे सर्वच अभ्यासक आपापल्या घटना —मग त्या वनस्पती असोत, प्राणी असोत किंवा कारखाने असोत— सादर करत असतांना भूगोलावर अवलंबून न रहाता, त्यानी स्वतःच भौगोलिक तंत्रांचा वापर करण्यास काहीच हरकत नाही (प्रकरण ३-ड पहा).

उलट, काही विशिष्ट प्रकारच्या वस्तुस्थितींच्या वितरणाचे ज्ञान मिळविण्यासाठी काही क्रमबद्ध शास्त्रज्ञांच्या तोंडाकडे पहावयाचे, ही गोष्ट भूगोलाभ्यासकांच्या चांगलीच अंगवळणी पडलेली आहे. खनिजसाठे आणि विविध प्रकारच्या पृष्ठशिला यांचा ठावठिकाण मिळविण्यासाठी भूगोलकार भूशास्त्रावर अवलंबून रहातात. तसेच ते मृत्तिकांच्या वितरणासाठी मृत्तिकाशास्त्रावर, आणि वनस्पती व प्राणी यांच्या वितरणासाठी वनस्पतीशास्त्र व प्राणीशास्त्र यांच्यांवर अवलंबून असतात. शेवटच्या दोन प्रकारचे अभ्यास हे वनस्पतीशास्त्रांतर्गत व प्राणिशास्त्रांतर्गत भौगोलिक अभ्यासांचे प्रातिनिधिक असून, ते वनस्पतीभूगोल आणि प्राणिभूगोल यांच्यापेक्षा वेगळे आहेत, कारण, अशा भूगोलांतून वनस्पती व प्राणी यांच्या परिभाषेत करावयाच्या अभ्यासांसाठी समावेशक क्षेत्रावर लक्ष केंद्रित केलेले असते, असे आग्रही मत वॅलेसवर विश्वासून हेटनरने मांडले आहे. ज्या संबंधी क्रमबद्ध शास्त्रांनी भौगोलिक अंगाकडे दुर्लक्ष केलेले असते अशाच क्षेत्रांत, —विशेषेकरून अर्थशास्त्रात— वितरणस्थिती निश्चित करण्यासाठी, भूगोलाभ्यासकाला पाया खोदण्यापासून कार्य करावे लागते. पण, गृहोपयोगी पिके व प्राणी यांच्या अभ्यासासाठी नकाशीकरणाचे तंत्र कसे वापरावयाचे याचा परिचय भूगोलकारांनी त्यांना एकदा करून दिल्यावर कृषि-अर्थशास्त्रज्ञांनी ते उसने तंत्र जणु आपल्याच क्षेत्राचा एक अविभाज्य घटक असल्याप्रमाणे वापरले आहे.

कोणत्याही घटनेच्या वितरणाच्या अभ्यासात तिच्या प्रकारांचे वर्गीकरण हे गृहित धरलेले असतेच. पुष्कळशा बाबतीत अभ्यासवस्तू अगदी सुगम असतात आणि त्यामुळेच त्यांचे वर्गीकरण सर्व संबंधी शास्त्रांना स्पष्टपणे ओळखता येणारे व मान्य होणारे असते, —उदाहरणार्थ : लागवडीच्या वनस्पतींचे विविध पिकांत वर्गीकरण, मका, गहू, ओट इत्यादी. पण इष्ट घटना अशा सुगम नसतील, तर त्या विशिष्ट अभ्यासासाठी, त्या घटनेची कोणती अंगे अत्याधिक महत्वाची म्हणून निवडलेली आहेत, यावर तिचे वर्गीकरण अवलंबून राहील. परिणाम असा होईल की, एकाच घटनेच्या वितरणाशी संबंधित असलेली दोन शास्त्रे वितरणासंबंधीच्या वस्तुस्थितीच वेगवेगळ्याप्रकारे सादर करतील. हा फरक त्या टप्प्यापुरता अत्यल्प वाटला, तरी अभ्यासाच्या नंतरच्या टप्प्यात तोच प्राधान्याने महत्वाचा ठरण्याची शक्यता आहे.

तरीही, परिश्रमांची बचत हे तत्व शास्त्रीय कार्यातील एक इष्टतम व स्वयंसिद्ध सत्य मानले जाते, ही गोष्ट कोणीही विसरता कामा नये. दुसऱ्या एखाद्या शास्त्राने एखाद्या घटनेच्या वितरणाच्या संदर्भात तिचे वर्गीकरण व वस्तुस्थितींचे प्रस्थापन या गोष्टी विकसित केल्या असतील आणि त्याच क्रमबद्ध भूगोलाच्या हेतुसिद्धीसाठी उपयुक्त आहेत असे दिसून आले असेल, तर त्या वितरणाची वेगळ्याप्रकारे पुनरावृत्ती करत बसण्याचे प्रयोजन भूगोलाभ्यासकाला उरत नाही. पण, यापूर्वी आम्ही निदर्शनाला आणून दिले आहे त्याप्रमाणे, भूरुपांसारख्या सापेक्षतः गुंतागुंतीच्या घटनांच्या विवेचनात दुसऱ्या शास्त्राने

आपल्या हेतुसिद्धीसाठी प्रस्थापित केलेल्या वस्तुस्थिती भूगोलांच्या दृष्टिने अनावश्यक असतात असे दिसून आले आहे. सहाजिकच, क्रमबद्ध भूगोलातील त्या वस्तुस्थितीचा अभ्यास अगदी पहिल्या टप्प्यापासून नव्याने सुरू करणे क्रमप्राप्त ठरते (प्रकरण ११-ड).

शास्त्रीय क्षेत्रात कोणत्याही वस्तुस्थिती सादर करावयाच्या असल्या की, अर्थशोधनाची आवश्यकता निर्माण होते. प्रत्येक शास्त्र-शाखेने वस्तुस्थिती सादर केलेल्या असल्या आणि त्यांचा उपयोगही केलेला असतो, पण त्यांचे अर्थशोधन अन्य शास्त्रशाखांना करावयाचे असते. कोणत्याही घटनेच्या वितरणासंबंधीच्या वस्तुस्थिती सादर करत असताना, त्या वितरणाची कारणमिमांसाही भूगोलाने करावयाची असते, असे भूगोलकारांनी गृहीत धरलेले असते, हा त्याचाच परिणाम असावा. अशाबाबतीत, म्हणजेच कोणत्याही घटनेच्या वितरणाच्या बाबतीत, वितरणविषयक अर्थशोधन तर्कदृष्ट्या भूगोलाच्या साच्यात बसते की, क्रमबद्ध शास्त्रांच्या साच्यात बसते ?

शास्त्राशास्त्रांमधील सीमारेषांच्या सापेक्ष स्थानांबाबतचा वाद उकरून काढावा म्हणून हा प्रश्न येथे उपस्थित केलेला नाही आणि भूगोलाभ्यासकांसाठी एखादी आचारसंहिता प्रस्थापित करावी या हेतूने तर खासच उपस्थित केलेला नाही. पण या प्रश्नाच्या चर्चेमुळे, क्रमबद्ध भूगोलाचा क्रमबद्धशास्त्रांशी असलेला एकूण संबंध अधिक स्पष्टपणे समजून येण्यास मदत होईल, असा मला विश्वास वाटतो.

एक गोष्ट अगदी स्पष्ट आहे. ज्या कोणा अभ्यासकाला एका विशिष्ट घटनेच्या वंटनाचे अर्थशोधन करावयाचे असेल, तो प्रामुख्याने, तिच्या विकासाची कारणे ज्यांच्यामुळे सूचित होतील अशा रूपांच्या भाषेत, तिचा अभ्यास करत राहील; आणि अन्य रूपांच्या भाषेत त्या घटनेच्या वंटनाचे मापन करावयाचे झालेच, तर त्यांचे अर्थशोधन सुलभ व्हावे म्हणून प्रथम मागे वळून उत्पत्तिरूपांशी असलेला त्यांचा संदर्भ तपासून घेणे प्राप्त होईल. एका बाजूला भूगोल (व इतिहासही) आणि दुसऱ्या बाजूला क्रमबद्ध शास्त्रे या दोहोंतील एक मूळ भेद असा आहे : पहिल्याचे लक्ष घटनांचे एकसंधान साधण्यावर वेधलेले असते, तर दुसऱ्याचे लक्ष विशिष्ट प्रकारच्या घटनेच्या 'प्रक्रियांचे' विश्लेषण करण्याकडे वेधलेले असते. प्रक्रियांच्या अभ्यासांत काल हा घटक अंतर्भूत असतो येवढ्या एका वस्तुस्थितीवरून जसा तो अभ्यास इतिहासात जमा होत नाही, तसाच वंटनाच्या अभ्यासात स्थल या घटकाचा अंतर्भाव होतो येवढ्यावरून तो अभ्यासही भूगोलाचा भाग होत नाही, असे क्रोबरने विशेष भर देऊन सांगितले आहे (११६, ५४५). एका विशिष्ट घटनेच्या विकास प्रक्रियांच्या अभ्यासाचा परिणामी निर्णय म्हणजेच त्या घटनेच्या जागतिक वंटनाचे स्पष्टीकरण असावे असे दिसते. अर्थातच् तो त्या क्रमबद्ध शास्त्राचाच सुयोग्य अभ्यास-विषय आहे. पण, क्रमबद्ध भूगोलात तोच अभ्यास एका घटकाच्या जागतिक प्रतिमेची भूमिका घेतो; आणि तसे करताना त्याचे लक्ष जागतिक क्षेत्रांच्या भेदाभेदात्मक स्वरूपाशी असलेल्या त्या घटनेच्या

कार्यकारी संबंधांवर वेधलेले असते. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे झाले तर, भूगोलाला वस्तूंचा "स्थलनिर्देश" करावा लागत असला तरी "स्थलनिर्देशांसाठी" अभ्यास म्हणजे भूगोल नव्हे, इतकेच काय, तो भूगोलाचा एखादा अविभाज्य भागही नव्हे. म्हणूनच, या "स्थलनिर्देशांचे" स्पष्टीकरण देत बसणे एखादी घटना जेथे आढळते तेथेच ती कां आढळावी याचे पूर्ण स्पष्टीकरण देणे —हे भूगोलाचे कार्य नव्हे. अर्थातच, त्यांच्या कार्यामुळे सार्थ ठरणाऱ्या रूपांवर आधारलेल्या प्रजातिसंकल्पना विकसित करत असताना, क्रमबद्ध भूगोलाला उत्पत्तिरूपांवर आधारलेल्या प्रजातीसंकल्पनांकडे इच्छेनुसार दुर्लक्ष करता येण्यासारखे आहे.[१०२]

कोणत्याही घटनेच्या वितरणाचे स्पष्टीकरण देत बसणे हे भूगोलाचे कार्य नव्हे, असा निष्कर्ष आम्ही काढलेला असला तरी, त्या विशिष्ट घटनेच्या अन्य भौगोलिक घटनांशी असलेल्या संबंधांचे अर्थसंशोधन करण्यासाठी अशा प्रकारच्या स्पष्टीकरणांची त्याला गरज लागण्याचा संभव आहे, हेही त्याच्याच बरोबर स्पष्ट झालेले आहे. उदाहरणार्थ : मृत्तिकांच्या भूगोलात, कोणत्याही क्षेत्रातील हवामान व तळशिळा यांच्या स्वरूपांशी असलेल्या मृत्तिकांच्या संबंधांच्या अर्थसंशोधनासाठी मृत्तिकांचा एकूण विकास कसा झाला, या गोष्टीच्या आकलनाची गरज भासते. पण, त्या मृत्तिकांच्या विकासाचे तत्संबंधी सर्व कारकांच्या व प्रक्रियांच्या भाषेत स्पष्टीकरण देत रहाणे हे कार्य मृत्तिकाशास्त्रज्ञाचेच आहे.

म्हणून आम्ही पुढीलप्रमाणे निर्णय घेतो. एका विशिष्ट घटनेचा क्रमबद्ध भूगोल, तिच्या वितरणाचे नियंत्रण करणाऱ्या तत्त्वांसाठी, त्या घटनेशी संबंधित असलेल्या क्रमबद्ध शास्त्रावर अवलंबून रहातो. पण पुष्कळशा बाबतीत, संबंधी क्षेत्रातील अभ्यासकांचे लक्ष अशा प्रकारची तत्त्वे विकसित करण्याकडे असत नाही, असे भूगोलाभ्यासकाला आढळून येण्याची शक्यता असते. अशास्थितीत, भूगोलाभ्यासकाने त्यांसाठी अनंतकालपर्यंत वाट पहात रहावे अशी कोणीच अपेक्षा करणार नाही. अशा परिस्थितीत, त्याला अशा अभ्यासाची

१०२. येथे एक गोष्ट लक्षात घेण्यास हरकत नाही. भूगोल हा केवळ वंटनाचा अभ्यास आहे, म्हणजेच वस्तूंच्या स्थलनिर्देशाचा अभ्यास आहे, ही संकल्पना हेटनरने पुन्हा पुन्हा मोठ्या जोमाने खोडून काढली आहे. तरीही त्याने वर आलेल्या युक्तिवादाचा विचारच केलेला नव्हता, असे स्पष्ट दिसते. याचे कारण, असे की भूगोलांतर्गत घटनांचे वर्गीकरण उत्पत्ति-प्रधान असलेच पाहिजे. असे तो गृहित धरतो (१६१, २२३). त्याचप्रमाणे, तर्कसिद्ध प्रादेशिक क्रमबंधातही उत्पत्तितत्व मानले जाणे आगत्याचे आहे, असा दावा तो करतो. माझ्या या ग्रंथात अथपासून इतिपर्यंत मांडलेल्या विचारांचा मुख्य आधार हेटनरने लिखित " पद्धतितंत्रविषयक प्रभावी ग्रंथ " हाच आहे. हेटनरने, वास्तविक, हे निष्कर्ष काढावयास नको होते, असे मला वाटते. अर्थातच, वर आलेल्या युक्तिवादाचे क्रांतिक परीक्षण पुन्हा पुन्हा करणे मला भाग पडले आहे. पण, निदान अद्याप तरी, या तर्कसंगतीत, अथवा निष्कर्षात काही चूक असल्याचे मला आढळून आलेले नाही.

जबाबदारी स्वतःच स्वीकारावी लागण्याचीही शक्यता आहे. पण, असे करत असताना आपण तावत्काल आपला दृष्टिकोण बदलतो आहो याची जाणीव भूगोलाभ्यासकाने ठेवली नाही, तर ज्यासंबंधी पुरेशी पूर्वतयारी आपण केलेली नाही अशा परक्या क्षेत्रात आपण निश्चितच अतिक्रमण केलेले आहे, हा शोध फार उशीरा लागेल.

वरच्या परिच्छेदात काही भूगोलकारांकडे वैयक्तिक अंगुलिनिर्देश केला आहे असे वाटण्याची शक्यता आहे. तेव्हा, हा मुद्दा प्रस्तुत लेखकाच्या स्वतःच्याच अनुभवांतून सोदाहरण स्पष्ट करण्यास हरकत नाही. काही विशिष्ट प्रदेशांतच लोखंड आणि पोलाद कारखान्यांचे केंद्रिकरण झालेले आढळते; ते कोणत्यातरी कारणाने त्या क्षेत्रातील अथवा अन्यक्षेत्रातील दगडीकोळसा व लोखंड यांच्या खाणींच्या उपस्थितीशी संबंधित असते; आर्थिक भूगोलाच्या प्रत्येक पाठ्यपुस्तकास या संबंधयोगांचा आवर्जून उल्लेख करण्याचा प्रयत्न केलेला असतो. ही गोष्ट प्रथमपासूनच भूगोलाभ्यासकांच्या लक्षात येऊन चुकलेली आहे. पण, उद्योगांच्या अर्थशास्त्राचे अभ्यासक लोखंड व पोलाद कारखान्याच्या वितरणाच्या समस्येचा अभ्यास करण्याकडे दुर्लक्ष करत आले आहेत आणि त्यामुळे वरील संदर्भातील कोणतेच विधान समर्पक नसल्याचे आढळून येते, यात काही संशय नाही. या प्रदेशांच्या स्वरूपाच्या अर्थशोधनाच्या प्रयत्नात असलेल्या भूगोलाभ्यासकांना या उद्योगधंद्याची सधन वृद्धी हीच या प्रदेशांच्या प्रमुख लक्षणांपैकी एक लक्षण असल्याचे आढळून आले. अर्थातच, त्यांना या कारखान्याचा अन्य भौगोलिक रूपधेयांशी असलेला संबंधयोग स्पष्ट करून दाखविणे भागच होते. म्हणूनच, लोखंड व पोलाद कारखान्यांच्या सापेक्ष स्थानांचे नियंत्रण करणारी सामान्य तत्त्वे प्रस्थापित करण्याचे कार्य प्रस्तुत लेखकानेच आपल्या शिरावर घेतले (३५२). कारण, त्यांच्या आधारावर, संयुक्त संस्थानांच्या क्रमबद्ध भूगोलाचा एक विभाग म्हणून या उद्योगाचा अभ्यास करणे लेखकाला शक्य होणार होते (३५३). यांपैकी पहिल्या प्रकारच्या अभ्यासात बरीच गोडी निर्माण झाल्यामुळे, अन्य काही उद्योगधंद्यांच्या आणि एकंदरीने उद्योगांच्या सापेक्ष स्थानांचे नियंत्रण करणाऱ्या तत्त्वांच्या अभ्यासांकडे लेखक सहजच ओढला गेला. तेव्हापासून एक गोष्ट मला स्पष्ट दिसू लागली. फक्त संयुक्त संस्थानांच्या लोखंड आणि पोलाद उद्योगाचा अभ्यास करत असतानाच माझे लक्ष त्या उद्योगांच्या क्षेत्रीय महत्वावर —अर्थात, काही क्षेत्रांचे विशिष्ट लक्षण या सदरात— केंद्रित झालेले होते. पण, अन्य सर्व अभ्यासांत उद्योग ही घटना या अर्थाने त्यांच्यावर लक्ष केंद्रित केले जात होते, आणि त्यापैकी एकाच रूपाचे, म्हणजेच त्याच्या सापेक्ष स्थानांचेच, स्पष्टीकरण करण्याची गरज आहे असे वाटत होते. अर्थातच, या माझ्या अभ्यासलेखांकडे, कोणी लक्ष दिलेच असेल तर, फक्त अर्थशास्त्रज्ञांनी लक्ष दिले होते, यात आश्चर्य वाटण्याजोगे काहीच नाही.

या व्यक्तिगत अनुभवावरून प्रस्तुत लेखकाने काढलेला निष्कर्ष हा एक सर्वसामान्यपणे लागू पडणारा नियम असण्याची शक्यता आहे. सापेक्षस्थानांच्या (Standorts) समस्येचा अभ्यास करावयाचा असेल तर, भूगोलापेक्षा अर्थशास्त्राच्या प्रशिक्षणाचीच अधिक जरूरी

असते, इतकेच नव्हे तर, त्यासाठी तीच एक समस्या मानून त्या समस्येवर संपूर्ण लक्ष जितके केंद्रित करावे लागते तितकी त्याच्या परिणामाकडे लक्ष देण्याची आवश्यकता असत नाही. अर्थातच, हा अभ्यासक अर्थशास्त्रज्ञ असेल तरच ती प्रत्यक्ष समस्या, त्याचे लक्ष वेधून घेईल, पण, जर तो भूगोलज्ञ असेल तर त्याचे लक्ष त्याच्या परिणामांवरच खिळून राहील (c/o टिस्सेन १६०, ८).

खरे तर, विविध शास्त्रांनी अभ्यासावयाच्या समस्यांची तर्कसिद्ध वाटणी धाब्यावर बसवून, भूगोलाभ्यासकांनी हा विषय इतक्या विस्तृत प्रमाणात विकसित केलेला आहे की, तो त्यांच्याच क्षेत्राचा एक भाग म्हणून हाती ठेवण्याचा अधिकार त्यांनी सांगितला, तर शास्त्रांच्या कार्यक्षेत्रांच्या तर्कसिद्ध विभागणीचा विचार बाजूला सारून, केवळ वहिवाटीचा हक्क म्हणून, तो कायद्याने मान्य होईल, असा दावा भूगोलपक्षाला करता येण्यासारखा आहे. (c/o क्राप्ट १६६, ७). आर्थिक व्यवहारांच्या सापेक्षस्थान समस्येबाबत भूगोलाभ्यासकांनी भरीव कामगिरी केली आहे, यात शंकाच नाही. पण, आपण या समस्येचा पाठलाग सातत्याने व पद्धतीने करत आलो नाही. म्हणूनच, या क्षेत्राची अंतर्बाह्य मशागत आपणच यशस्वीरीतीने केली असल्याच्या आधारावर, आपण आपला वहिवाटीचा अधिकार ठामपणे नोंदवू शकत नाही. कारण, अशा घटनांची नियामक तत्त्वे आम्ही पुरवावी म्हणून संपूर्ण ज्ञान जगत् काही आमच्या तोंडाकडे पहात नाही !

या ' सापेक्षस्थान (standorts) समस्येच्या उपपत्तीवरील आपल्या सर्वंकष अभ्यासग्रंथाच्या प्रस्तावनेत स्वीडिश अर्थशास्त्रज्ञ पालेंदर याने या क्षेत्रात भूगोलकारांनी केलेल्या क्रांतिक पर्यवेक्षणावरून उपरिनिर्दिष्ट निष्कर्ष पडताळून पहाता येईल (३७२). मात्र, त्याला एक पुस्ती जोडणे न्याय्य ठरेल. स्वतःच्या कार्यासाठी आवश्यक असलेले निष्कर्षही अर्थशास्त्रज्ञांनी समर्पकपणे विकसित केलेले नसल्यामुळे, भूगोलाभ्यासकांनी या क्षेत्रात पदार्पण केले. विशेषता, अमेरिकी अर्थशास्त्रज्ञांनी या क्षेत्राकडे अगदीच दुर्लक्ष केले, आणि ज्यावेळी प्रस्तुत लेखकाने हाच विषय निवडला त्यावेळी वेबरच्या कार्याची त्यांना ओळखही नव्हती (३९६). काही असले तरी, पालांदरने वेबरचे कार्य अव्यवहार्य असल्याचे दाखवून दिले आहे.

म्हणूनच, आतातरी अर्थशास्त्रज्ञ या समस्येकडे लक्ष देऊ लागले आहेत या गोष्टीचे भूगोलाभ्यासक स्वागत करतील. अर्थात, भूगोलही काही भोक्त्याचीच भूमिका करू इच्छित नाही. ही समस्या तर्कदृष्ट्या अर्थशास्त्रीय दृष्टिकोणाच्या कक्षेतील आहे, हे जरी आम्ही मान्य केलेले असले तरी, ती अर्थशास्त्राच्या क्षेत्रातील एका भौगोलिक समस्येची भूमिका घेते, यात संशय नाही. म्हणजे, भौगोलिक दृष्टिकोणाचे ज्ञान असण्याची गरज आलीच. आणि नेमकी याच मार्गाने प्रत्यक्ष सामग्रीची आणि परिणामकारक स्पष्टीकरणाची अशी दुहेरी भर त्या क्षेत्रात घालत असताना, भूगोलाला दात्याची भूमिकाही सातत्याने करणे शक्य होणार आहे.

क्रमबद्ध शास्त्रांवर भूगोलाला अवलंबून रहावे लागते, याबाबत बरीच टीका झालेली असल्यामुळे, अर्थशास्त्रांतर्गत रुपधेयांच्या वंटनांच्या अर्थशोधनाने परतफेड करण्याची संधी घेण्यास काही हरकत नाही, अशा अर्थाच्या केल्या गेलेल्या एक दोन महत्त्वपूर्ण सूचनांची दखल येथे घेणे औचित्यपूर्णच ठरेल.

कोणत्याही घटनेच्या वंटनाच्या अर्थशोधातील पहिला टप्पा त्या वंटनाचे चित्र तयार करणे हा असतो, हे उघड आहे. थोड्या अंशाने का होईना, ज्यांनी भौगोलिक दृष्टिकोण आत्मसात केला आहे अशा क्रमबद्ध शास्त्रांच्या अभ्यासकांना एक गोष्ट सहज कळून चुकेल, की भूपृष्ठावरील गोष्टींच्या सापेक्ष-स्थानांचे सुवाच्य चित्रण करण्याची एकच-एक भाषा म्हणजे नकाशाची भाषा असते, आणि विश्वसनीय अर्थशोधनासाठी आपल्या संस्थांना येवढ्या मोठ्या एककांच्या नकाशांपेक्षा अधिक तपशीलवार नकाशांची जरुरी असते. भूगोलात व भूशास्त्रात हा एक गृहित सिद्धांत मानला गेलेला असला आणि अर्थशास्त्रात आता त्याला संपूर्ण मान्यता मिळालेली असली, तरीही अर्थशास्त्राच्या अनेक शाखांत त्याच्याकडे दुर्लक्ष केलेले दिसते. जेव्हा पेन्सिल्वानिया, ओहायहो, इंडियाना, इलिनायस या राज्यातील केवळ विकास संख्यांच्या भाषेत एकूण संयुक्त संस्थानातील पोलाद-उद्योगाच्या सापेक्ष स्थानांचे अर्थशोधन अर्थशास्त्रज्ञ करू लागले, तेव्हा त्यांना सापेक्ष स्थान निश्चियनाची तत्त्वे हाती लागण्याच्या संभाव्यतेच्या दृष्टिने पराभव पत्करणारे निष्कर्ष काढण्याची पाळी आली, यात आश्चर्य वाटण्यासारखे काहीच नाही. आपल्या शिरगणतीची जिल्हानिहाय आकडेवारी, राज्यनिहाय आकडेवारी इतकी परिपूर्ण नसली तरीही, आग्नेय पेन्सिल्व्हानिया-मेरीलँड, पिट्जबर्ग-यंग्ज टाऊन क्षेत्र, एरी सरोवरीवरील बंदरे आणि कालुमत जिल्हा यासारख्या क्षेत्रांतील पोलाद उद्योगाच्या विकासाचे पुरेसे अचूक मापन करावयाचे असेल, तर जिल्हानिहाय नकाशेच वापरणे प्राप्त आहे (३५३). तसेच, त्या त्या वस्तुस्थिती एखाद्या तपशीलवार नकाशावर दाखविलेल्या पाहिल्याखेरीज, आणि विशेषत्वाने कारखानदारी करणाऱ्या शहरांचा विचार विसकॉन्सिन विरुद्ध मिनेसोटा या भाषेत, करावयाचा नसून, तो विचार मिशिगन सरोवराच्या पश्चिम किनाऱ्याशी असलेल्या त्यांच्या सान्निध्याच्या भाषेत करावयाचा आहे, हे त्याच्या नजरेत भरल्याखेरीज विसकॉन्सिन व मिनेसोटा यांच्या औद्योगिक विकासातील विरोधाचे अर्थशोधन करण्याची कोणीच आशा करू नये (३२६).

भूगोलाचे प्रशिक्षण न मिळालेल्या एखाद्या अर्थशास्त्राच्या अभ्यासकाला, अर्थशास्त्रीय रुपधेयांच्या वंटनाचा एखादा तपशीलवार नकाशा पाहूनही, तौलनिक सापेक्षस्थानासंबंधीची समस्या आणखी सोपीकरून त्या नकाशावर सादर केलेली आहे, असेच वाटण्याचा संभव आहे. म्हणजे तो जवळजवळ निरपवादपणे सापेक्षस्थानांच्या भाषेतच त्यांचा विचार करण्याची शक्यता आहे. सापेक्षस्थलासंबंधीचा हा विचार तो केवळ भूमितीच्या दृष्टिने करत राहील, पण, प्रदेशांच्या भिन्न रुपांचा तो विचारही करणार नाही. पुष्कळशा अर्थशास्त्रावरील पाठ्यपुस्तकातून कृषि उत्पादनांच्या विविध प्रकारच्या वंटनांच्या प्रतिपादनावर थ्यूनेनने सादर

केलेल्या एका नगर-केंद्राभोवती पसरलेल्या व क्रमाने बदलत जाणाऱ्या उत्पादनांच्या समकेन्द्रीय पट्ट्यांच्या सुगम चित्रांचा चांगलाच प्रभाव पडलेला दिसतो. (हे चित्र तयार करणारा लेखक उत्तर जर्मनीच्या सापेक्षतः समस्वरुप मैदानी प्रदेशातील रहिवासी होता ही गोष्ट येथे लक्षात घेण्यासारखी आहे) [या उपपत्तीच्या रुपरेषेसाठी योनासन पहा ३१३ (१९२५, २८४-८६)]. पूर्वीच्या काळी हे विश्लेषण कितीही संयुक्तिक वाटत असले तरी, आधुनिक काळातील व्यापारविषयक सुविधांच्या विकासामुळे, जमीनवापर निश्चित करण्याचे कामी सापेक्षस्थल हा कारक गौण महत्त्वाचा होऊन राहिला आहे व त्यामुळेच त्या पूर्वकालीन विश्लेषणाची मोठ्या प्रमाणात मोडतोड झाली आहे. मंडई पुरवठ्यासाठी लावलेल्या बागा आणि दूध पुरवठ्यासाठी असलेले गौळवाडे येवढे सर्वश्रुत अपवाद वगळले, तर विविध प्रकारच्या कृषि उत्पादनांचे सापेक्षस्थान त्यांच्या स्थानांच्या सापेक्षता कितीतरी अधिक प्रमाणात ते हवामान, जमिनीचा चढउतार, मृत्तिका व पाणलोट यांच्यावर अवलंबून असतात, असे ओ. ई. बेकर यांनी काही वर्षांपूर्वीच दाखवून दिलेले आहे. युरोपीय शेतीसंबंधीचे तपशील उदाहरणादाखल घेऊन त्याने या वस्तुस्थितीचे प्रात्याक्षिकच केले आहे (३२४). मात्र, सापेक्षस्थानांच्या या कारकाकडे अशा प्रकारच्या चर्चेत संपूर्ण दुर्लक्ष करावयास हरकत नाही असा याचा अर्थ होत नाही. कृषि भूगोलविषयक अभ्यासांच्या बाबतीत सहसा अशी स्थिती निर्माण झालेली दिसते. [हे नियम पहिल्याने घालून दिले गेले, त्यानंतरच्या काळात व परिस्थितीत पडलेल्या मूलभूत फरकांचा संदर्भ लक्षात घेऊन वेबेलने थ्यूनेनच्या या नियमांची सांगोपांग व तपशीलवार चर्चा केली आहे (३९५, ४७-४८) ].

कोणत्याही घटनेच्या वितरणाचे अर्थशोधन करणाऱ्या अभ्यासकाला भौगोलिक दृष्टिकोण असणे महत्त्वाचे आहे; या संदर्भातील या चर्चेत, तर्कशास्त्र काही सांगत असले तरी, ही समस्या हाताळण्याच्या दृष्टिने भूगोलकार पूर्णपणे सुसज्ज असतो, असे सुचविले आहे, असे कोणालाही वाटेल. जर भूगोलकार हा निष्कर्ष मान्य करणारच असतील, तर त्या पूर्वी त्यानी पालांदराने आपल्या अधिकारपूर्ण प्रबंधात केलेल्या काही विशिष्ट प्रश्नांच्या विवेचनांचे नीट परीक्षण करावे हे बरे —विशेषेकरून वाहतुकीसारख्या समस्या हाताळताना ढीगभर अर्थशास्त्रीय तपशीलांची गरज असते याचा विचार करावा. तसेच गार्व्हर व त्याचे सहकारी यांनी केलेल्या संयुक्त संस्थानातील कारखानदारीच्या सापेक्षस्थानांच्या अभ्यासात त्यानी विकसित केलेल्या आर्थिक विश्लेषणाच्या तंत्राचेही चांगले परीक्षण करावे.— ज्याचा उल्लेख आम्ही यापूर्वीच केलेला आहे त्या नकाशा-प्रेमाच्या अभावाचे उदाहरण या पालांदराच्या ग्रंथाच्या रुपानेही मिळते (३४७). शेवटी, ज्यांना काही थोडे भूगोलविषयक प्रशिक्षण लाभले आहे अशा अर्थशास्त्रज्ञांचे अभ्यासग्रंथही नजरेखालून घालावे. उदाहरणार्थ : हूवरने केलेला पादत्राण-उद्योगाचा अभ्यास (३६४).

अर्थशास्त्रासारख्या कोणत्याही शास्त्रीय क्षेत्रांतर्गत भौगोलिक बाजुचा अभ्यास करावयाचा झाल्यास, भौगोलिक दृष्टिकोणाची, काही प्रमाणात तरी आवश्यकता असते, एवढेच

आतापर्यंत आपण दाखवून देऊ शकलो. अर्थशास्त्रांतर्गत ऐतिहासिक समस्या हाताळण्यास काही प्रमाणात ऐतिहासिक दृष्टिकोणाचीही आवश्यकता आहे यावर भर देत असण्याची गरज नाही; कारण, सर्वच अर्थशास्त्रज्ञांना या-ना-त्या मार्गाने इतिहासाचे प्रशिक्षण मिळालेलेच असते, पण, त्या मानाने फ़ारच थोड्यांना भूगोलाचे प्रशिक्षण मिळालेले असते. जे जे शास्त्र " तत्संबंधी वस्तूंचा भूपृष्ठावरील क्षेत्रीय वितरणांचा विचार करते, त्याला त्याला भौगोलिक पद्धतींचा आश्रय घ्यावाच लागतो. आपल्या अभ्यासवस्तूंच्या रुपांत पडत जाणाऱ्या क्षेत्रीय फरकांचे अर्थशोधन त्याला करता आलेच पाहिजे. आपल्याच क्षेत्रातील सामान्य संकल्पना आपल्याला आत्मसात करता याव्या म्हणून, आणि आपल्याच शास्त्रातील वस्तूच्या स्वरुपाचा सखोल अभ्यास करण्याचे एक उपयुक्त साधन म्हणून, भौगोलिक तुलनांच्या भाषेत विचार करण्याच्या पद्धतींचा त्याला उपयोग करता आला पाहिजे. अशाप्रकारे अर्थशास्त्रात अनुसंधानकार्य करणारा प्रत्येक अभ्यासक भूगोलाभ्यासकही असला पाहिजे. (त्याला भौगोलिक पद्धतींचा वापर करता आला पाहिजे या अर्थाने भूगोलाभ्यासक हा शब्द येथे वापरला आहे). मग त्याची तशी इच्छा असो वा नसो. अशी इच्छा त्याला जितकी लवकर होईल, आणि तो ते ज्ञान संपादन करील, तितके त्याचे आणि त्याच्या अनुसंधानकार्याचे हित होईल." असा स्मिटने निष्कर्ष काढला आहे (७, ४).

म्हणून, आमचा निष्कर्ष थोडक्यात असा—शास्त्रांच्या वर्गीकरणाच्या युक्तिवादाच्या भाषेत, तसेच अभ्यासकांच्या व्यावसायिक सिद्धतेच्या—म्हणजे, तांत्रिक आणि साहित्यिक ज्ञानाच्या—भाषेत, घटनांच्या वितरण-विषयक तत्वांच्या समस्येचा अभ्यास करण्याचे काम प्राधान्याने अर्थशास्त्रज्ञांकडून उत्तम रितीने होणे शक्य आहे; पण त्याबरोबरच तो, कांही अंशी तरी, भूगोलाचा अभ्यासक असणे जरूर आहे.

कोणताही गैरसमज होऊ नये म्हणून, येथे आणखी एक गोष्ट सांगितली पाहिजे. या संपूर्ण चर्चेत—नव्हे, या संपूर्ण ग्रंथातच —" भूगोलकार " ही संज्ञा " भूगोलाचा अभ्यासक " या शब्दप्रयोगाचे संक्षिप्त रुप म्हणून वापरलेली आहे. कोणतीही एक व्यक्ती एकाच वेळी भूगोलाभ्यासक असून अर्थशास्त्राभ्यासकही असू शकेल; आणि ज्या विषयाची त्याला अधिक गोडी वाटेल आणि ज्या विषयाचा अभ्यास करण्यास आपण सुसज्ज आहोत असा त्याला विश्वास वाटेल, त्या विषयाचा तो अभ्यास करू शकेल, हे गृहितच आहे. आपल्या कार्याशी संबंधित असलेल्या अन्य क्षेत्रांतील कार्यात महत्त्वाच्या विचारांची भर वेगवेगळ्या भूगोलकारांनी टाकलेली आहे व पूढेही टाकत राहण्याची शक्यता आहे. खरे पहाता, अशा दोन वेगळ्या शास्त्रीय क्षेत्रांतील हे वैयक्तिक आंतरसंबंध ग्राह्य आहेत अशी केवळ मान्यता देऊन काम भागण्यासारखे नाही, तर ते अत्यंत इष्ट आहेत असा आग्रह धरला गेला पाहिजे (१४७, १२४- f, १३४). हा विचार सर्व शास्त्रांच्या बाबतीत सामान्यपणे खरा असेल तर भूगोलाच्या बाबतीत तो विशेषत्वाने खरा आहे. भूगोलाचा संबंध विविध शास्त्रांच्या सीमाक्षेत्रांजवळच येत असतो, आणि तज्ञ अभ्यासक जर एकाच शास्त्राला चिकटून राहतील

तर ही क्षेत्रे नेहमीच ' पडीक ' राहतील. येवढेच नव्हे तर, भूगोल आपल्या प्रत्येक शाखेच्या माध्यमाने विविध क्रमबद्ध शास्त्रांचा छेद घेत जातो. म्हणूनच, " शास्त्रांच्या हद्दी दुर्लंघ्य भितींनी आखलेल्या नाहीत " ही गोष्ट भाग्याचीच समजली पाहिजे, असे पेंक म्हणतो. याच प्रश्नाच्या चर्चेच्या ओघात तो पुढे म्हणतो : " एखाद्याजवळ आवश्यक ते परवाने असतील तर, तो राज्यांच्या सरहद्दीही ओलांडून जाऊ शकतो ". हे त्याचे विधान, त्यानेच सुचविलेल्या रुपकाला थोडी मुरड घालून, असे लिहिण्याची विनंती करण्यास हरकत नाही. " एखाद्याजवळ आवश्यक तेवढी पात्रता असेल, म्हणजेच परवाना असेल, तर तो शास्त्रांच्या सीमा ओलांडून जाऊ शकतो ". प्राध्यापक पेंक यांना आंतरराष्ट्रीय सरहद्दींबाबत आलेल्या वैयक्तिक अनुभवावरून तरी, शास्त्रांच्या सीमांवर सीमारक्षक ठेवले जाऊ नयेत या प्रस्तावाला ते मान्यता देण्याइतकी आपल्या मताला मुरड घालतील, असे वाटते. अर्थात, ज्या क्षेत्रात तो असे अतिक्रमण करत असतो त्या क्षेत्रात अधिकारी असलेल्या व्यक्तींचा निर्णय हाच अंतिम निर्णय राहील, या अटीवर प्रत्येक अभ्यासकाने स्वतःच्या परवान्याबाबतचा निर्णय स्वतःच घ्यावा. काही असले तरी, जो कोणी अशा संक्रमणक्षेत्रात संचार करत असतो " त्याला घोडा बदलला तरी मांड बदलू न देण्याची खबरदारी घेतली पाहिजे ", याबाबत सर्वांचे एकमत होण्यास हरकत नाही (९०, II, ३६). शिवाय पेंकने अन्यत्र सूचित केल्याप्रमाणे, तो कोणत्याही क्षेत्रात कार्य करत असला तरी त्या अभ्यासकाला आपण ते करण्यास पात्र आहोत असा विश्वास वाटला पाहिजे. ही अट पूर्ण करण्यासाठी, आपण कोणत्या क्षेत्रात, व केव्हा, कार्य करत आहोत यांची त्याने पूर्ण जाणीव ठेवणे आवश्यक आहे. भूगोलाला आपला पायाभूत दृष्टिकोण ठामपणे मांडता यावा म्हणून, कोणतेही क्षेत्रांतरित बीजारोपण त्याच्या खऱ्या स्वरुपातच मान्य केले जावे, आणि ते आपल्या विस्तारक्षेत्रातील आहे या सबबीवर त्याचे फळही आपलेच असा गैरअधिकार सांगू नये.

जवळजवळ तशाच आधारावर, भूगोलाचा भू-रुपवर्णनाशी असलेल्या संबंधाविषयीचा प्रश्न —चर्चा करून न सोडविता एकदम — निकालात काढण्याची परवानगी मिळण्यास हरकत दिसत नाही*. विशेषतः इंग्रजी भाषिक देशांमध्ये, हा प्रश्न बराच काळ मोठा वादाचा विषय होऊन बसलेला आहे. १९०८ मध्येच गायकीच्या मताशी आपण सहमत असल्याचे सांगत असतानाच चिझोल्मने, भूरूपांचा अभ्यास त्यांच्या उत्पत्तीला अनुसरुन करावयाचे ठरविले तर तो थेट भूशास्त्राचीच वाट धरेल, असे मत दिले. इतर पुष्कळशा भूगोलकरांनीही त्याच्या या मताचा प्रतिध्वनी उमटविला. त्याबरोबरच –इंग्लंडमध्ये नसले तरी अमेरिकेत –त्या क्षेत्रातील बहुतांश कार्य भूगोलकारांनीच पूर्ण केलेले आहे. विशेषेकरून डेव्हिस यांच्या कार्याचा व त्यांच्या प्रभावाचा परिणाम (c/o डी. डब्लू. जॉनसन, १०३). जर्मनीत रिक्टोफेनने घालून दिलेला मार्ग पेंकने व त्याच्या विद्यार्थ्यांनी अंगिकारल्यामुळे, भूरूपशास्त्र हे भूगोलाचे असे एक नियमित अंग झाले, की त्याचा कायमचाच समावेश भूगोलात करण्याला, घेतलाच असल्यास, फारच थोडयांनी आक्षेप घेतला. (याविरूद्ध, विशेषेकरून

*पुरवणी टीप क्रमांक ५४ पहा.

नेदर्लंडमध्ये या प्रकारच्या अभ्यासात भूगोल आणि भूशास्त्र हा फरक स्पष्टपणे वेगळा करून दाखवितात (९२, २९४). एकूण ज्ञानक्षेत्राच्या दृष्टिकोणातून भूगोलाचे परीक्षण करत असताना ज्ञानोपपत्तिज्ञ (Erkenntnistheoretiker) क्राफ्ट याने असा निष्कर्ष काढला, की भूरूपांच्या उत्पत्तीच्या अभ्यासासह केलेल्या भूरूपवर्णनामुळे भूगोलक्षेत्राच्या तर्कसिद्ध एकात्मतेला तडा जातो, हे दिसत असूनही, केवळ या क्षेत्राच्या ऐतिहासिक उत्क्रांतीच्या आधारावर त्याचा समावेश भूगोलात केला आहे, हेच खरे. अशी स्थिती निदान जर्मनीत तरी असल्याचे स्पष्ट दिसते (१६६, ७). म्हणून, शेवटी क्राफ्टने असा निर्णय दिला की, त्याच्या या समावेशावर आक्षेप घेतला जाण्याची शक्यता राहिली नाही. निदान जोपर्यंत भूरूपवर्णनकारच भूगोलकार असतात, तोपर्यंत ही स्थिती अशी राहणारच, अशी पुस्तीही येथे जोडण्यास हरकत दिसत नाही. जर्मनीतील भूगोलाभ्यासक त्याला मिळणाऱ्या प्रशिक्षणामुळे भूरूपशास्त्रज्ञही असतो. आणि शास्त्रीय क्षेत्रांतील श्रमविभागणीच्या न्यायाने, या खास क्षेत्राचा अंतर्भाव भूगोलानेच आपल्या क्षेत्रात करून घेतलेला आहे.

भूगोलक्षेत्रातील तर्कवादापेक्षा त्याच्या इतिहासावर आधारलेला हा निष्कर्ष आपल्या देशातही लागू पडतो का, या प्रश्नाचे उत्तर देण्याचा प्रयत्न प्रस्तुत लेखक करू इच्छित नाही. भूरूपशास्त्राच्या भूगोलाशी असलेल्या निकट साहचर्यामुळे भूगोलाला निःसंशयपणे फायदे झाले आहेत तसे काही तोटेही झाले आहेत. भूरूपशास्त्राचे भूरूपांकडे असलेले लक्ष प्रामुख्याने स्वतः , करता अभ्यासावयाच्या विषयाकडेच असावे —म्हणजे, वनस्पतिशास्त्राचे लक्ष वनस्पतीकडे असावे —तशा स्वरूपाचे असते. म्हणून, मिशोटेने म्हटल्याप्रमाणे, त्याचा दृष्टिकोण क्रमबद्ध शास्त्राचा असतो, याविरूद्ध भूगोलाचा दृष्टिकोण वंटनशास्त्राचा असतो. (१८९, २६). या विरोधाचा एक सामान्य परिणाम झालेला दिसतो. प्रामुख्याने भूरूपशास्त्रज्ञ म्हणून शिक्षण घेतलेल्या भूगोलाभ्यासकांना सातत्याने भौगोलिक दृष्टिकोण टिकवून धरणे सहसा अवघड होते, असे मत स्वतः पेंकनेच दिले आहे (९०, I, ३८f). त्यांच्यापैकी पुष्कळांनी भूगोलाच्या पद्धतितंत्रविषयक विचारात उडविलेल्या गोंधळाबद्दल– ते त्यांच्यापैकी– पुष्कळांनी भूगोलातील पद्धतितंत्रविषयक विचारात उडविलेल्या गोंधळाबद्दल न बोलणेच बरे. या संदर्भातील आणखी एक विशेष परिणाम यापूर्वीच सूचित केलेला आहे (प्रकरण ९–ड). स्वतंत्र वस्तू म्हणून भूरूपांचा अभ्यास केल्यामुळे तर्कदृष्ट्या होणारे त्यांचे वर्गीकरण क्रमबद्ध शास्त्रातील स्वतंत्र वस्तूंच्या वर्गीकरणासारखेच असते. अर्थातच ते वर्गीकरण भूरूपांच्या क्षेत्रीय स्वरूपानुसार केलेले असणार नाही, —म्हणजेच, " जगातील विविध भूरूपात्मक क्षेत्रांच्या स्वरूपानुसार असणार, " असे मिशोटेने त्याचे वर्णन केले आहे. जोपर्यंत भूरूपशास्त्र हा भूगोलाचा अविभाज्य भाग आहे असे मानले जाते तोपर्यंत तत्संगत क्रमबद्ध शास्त्रांनी केलेंल्या वर्गीकरणाचा विचारही न करता हवामान, नैसर्गिक वनस्पती किंवा शेतमळ्यांचे प्रकार यांचेही वर्गीकरण करण्याचे स्वातंत्र्य आपल्याला आहे असे भूगोलकारांना वाटते. पण त्या दडपणामुळेच वंटनशास्त्रांतर्गत वर्णनाला उपकारक ठरणारे भूरूपांचे वर्गीकरण करणे त्यांना अवघड होऊन बसले. पुष्कळशा

बाबतीत वेगवेगळ्या भूरूपांचे प्रकार उपयुक्त ठरत असत हे निश्चितच आहे. पण, तेच वर्गीकरण सर्व बाबतीत लागू करण्याच्या प्रयत्नामुळे क्षेत्रीय परिभाषेतील काही विरोधाभास निर्माण झाले. उदाहरणार्थ : श्वेतपर्वतांचे वर्णन "मोनॉडनॉकांचा एक संग्रह" असे केले गेले.

भूगोल व भूरूपशास्त्र यांच्या अन्योन्य संबंधांबद्दल काहीही निष्कर्ष काढले गेले असले तरीही, विकासेतिहासाच्या वस्तुस्थितीमुळे आता ते शास्त्र भूगोलाचे एक अंग बनलेले आहे, ही गोष्ट लक्षात घेतलीच पाहिजे ; आणि जर्मन शास्त्राबाबत क्राफ्टनेही हेच मान्य केले आहे. पण, ज्या समस्यांना अशी स्वतःची प्रतिष्ठा गतकालात प्राप्त झालेली नाही अशा, पण तर्कदृष्ट्या समरूप, समस्यांचा अंतर्भाव या क्षेत्रात केला जावा म्हणून युक्तिवाद करण्यासाठी वरील निष्कर्षाचा उपयोग करता येणार नाही. राज्यक्षेत्रांच्या उत्क्रांति-प्रक्रिया ही समस्याही, भूरूपांच्या उत्क्रांतीच्या अभ्यासाप्रमाणे, भूगोलाचेच एक अंग आहे असा दावा मौलने, आणि अलीकडे ईस्टनेही, केला आहे. राजनैतिक इतिहासाच्या भौगोलिक बाजूच्या अशा अभ्यासांचा विकास प्रामुख्याने सहसा जितका भूगोलकारांनी केला आहे, तितका तो राजनीति-शास्त्रकारांनी किंवा इतिहासकारांनी केलेला नाही, अशी वस्तुस्थिती असल्याचे सिद्ध करून दाखविता आले तरच हा दावा समर्थनीय ठरेल (१५७, १९९, २७० ; c/o २१६, ९५६.)

आता, क्रमबद्ध भूगोलाचा अन्य क्रमबद्ध शास्त्रांशी असणाऱ्या संबंधाच्या आपण केलेल्या परीक्षणाचा गोषवारा येथे द्यावयास हरकत दिसत नाही. वैचारिकदृष्ट्या, क्रमबद्ध भूगोल कोणत्याही घटनेच्या वितरणाविषयीची आवश्यक ती सामग्री अन्य शास्त्रांकडून, अथवा सर्वसाधारण संख्यात्मक सामग्री पुरविणाऱ्या संदर्भ ग्रंथांतून मिळवित असतो. भौगोलिक हेतुसिद्धीसाठी उपयुक्त ठरेल अशा कोणत्याही प्रकारांनी, त्या घटनेच्या विविध रूपांचे वर्गीकरण भूगोल स्वतःच करत असतो –म्हणजेच, तो प्रादेशिक स्वरूपाच्या दृष्टिने महत्त्वपूर्ण असणाऱ्या लक्षणांच्या भाषेत घटनांचे वर्गीकरण करतो –मग, अशाप्रकारचे वर्गीकरण अन्य शास्त्रांतून उपलब्ध असो अगर नसो. शिवाय, वैचारिक दृष्ट्या, त्या घटनेच्या वितरणाचे स्पष्टीकरण, म्हणजेच तिच्या उत्पत्तीची माहिती भूगोल त्या क्रमबद्ध शास्त्रांकडूनच मिळवितो. भूरूपे, आरण्ये, पिके, पोलाद कारखाने किंवा राजनैतिक राज्ये, काही असो, त्या घटनांच्या विकासाची तत्त्वे व त्यांच्या वितरणाची कारणे हे विषय त्यासंबंधी शास्त्रांच्या जिव्हाळ्याचे विषय असतात. या वस्तुस्थिती व ही तत्त्वे ही सामग्रीची उसनवारी आहे हे उघडपणे मान्य करून –आणि, अर्थातच, ती सामग्री नेहमीच संबंधी क्रमबद्ध शास्त्रांकडून पुरविली जात असते असे गृहीत धरून –भूगोल आपल्या कार्यास सुरूवात करतो.

या वरील प्रश्नाचा उहापोह इतका केला यालाही एक कारण आहे. विशेषेकरून क्रमबद्ध भूगोलात, अभ्यासकाला भौगोलिक दृष्टिकोणाची भूल पडण्याची शक्यता असते, आणि अन्य क्रमबद्ध शास्त्रांचे अभ्यासविषय असलेल्या घटनांच्या अप्रामाणिक प्रतिपादनाने तो त्या घटनेचे अवास्तव चित्र उभे करील अशी, किंवा भूगोलक्षेत्र सोडून अगदी परक्या क्षेत्रात शिरण्याचे साहस करील अशीही, शक्यता असते. ही गोष्ट लेहमानने लक्षात आणून दिलेली आहे. (११३, २३७ f). केवळ बारीक पण स्पष्ट सीमारेषा आखून हा अतिप्रसंग टाळता येईल की काय याची शंका वाटते. आम्ही अद्याप क्रमबद्ध भूगोल व अन्य क्रमबद्ध शास्त्रे या दोहोमध्ये अशी सुस्पष्ट मर्यादा आखलेलीच नाही, असा आक्षेप वाचकांनी यापूर्वीच घेतलेला असण्याची शक्यता आहे ; आणि असा प्रयत्न आम्ही केलेला नाही हेही खरे ! या संदर्भातील संबंधयोग दोन शेजारी क्षेत्रांमधील पर्यंतभूमी सारखे नाहीत, तर दोन भिन्न पातळीत असलेल्या दोन वेगळ्या क्षेत्रांच्या छेदासारखेच आहेत. ही वस्तुस्थिती ध्यानात बाळगली तर, आमच्या मते, येथे सीमांची गरजच नाही. खरी भिन्नता आहे ती या दोन दृष्टिकोणातील. वितरणाच्या भाषेत ज्यांचा अभ्यास केला जात असतो त्या विशिष्ट घटनेवर त्या क्रमबद्ध शास्त्राचे लक्ष एकवटलेले असते, तर क्षेत्रीय भेदाभेद निर्माण करण्याचे कामी या वितरणाने कोणती भूमिका घेतली आहे यावर क्रमबद्ध भूगोलाची नजर खिळलेली असते. पुष्कळशा अभ्यासांसाठी, भूगोलाभ्यासकाला संबंधी क्रमबद्ध शास्त्राच्या पातळीवरच, पण सीमारेषा सोडून, बराच फेरफटका करण्याची आवश्यकता भासू लागते. असे करताना तो आतपर्यंत शिरण्याची शक्यता असते. पण, भौगोलिक दृष्टिकोणाचे आपले अवधान त्याने सोडलेले नसेल, तर आपले क्षेत्र सोडून आपण परक्या क्षेत्रात भटकत आहोत याची त्याला आठवण करून देण्यासाठी सीमेवरील खुणांच्या दगडांची मुळीच गरज् राहणार नाही. उलट, आपल्याला आवश्यक ती सामग्री संपादन केल्यावर आणि आवश्यक ते निष्कर्ष प्रस्थापित केल्यावर, तो तात्काळ भौगोलिक पातळीवर परत येईल (पहा. आकृती क्र. १).

क्रमबद्ध भूगोलात भौगोलिक दृष्टिकोणाला ठामपणे चिकटून रहाता यावे म्हणून, अभ्यासकाने आपले कार्य चालू असेतोपर्यंत क्षेत्रवर्णनात्मक शास्त्र या अर्थाने भूगोलक्षेत्राचा संदर्भ सतत घेत राहिले पाहिजे. हा दृष्टिकोण प्रादेशिक भूगोलात अगदी स्पष्टपणे निर्देशित असतो याबाबत बहुतेक सर्व लेखकांचे एकमत असते. म्हणूनच, भूगोलक्षेत्राच्या विशिष्ट क्रमबद्ध शाखांमध्ये कोणाला कितीही गोडी वाटत असली तरी, प्रत्येक भूगोलाभ्यासकाने प्रादेशिक अभ्यास केलेले असणे आवश्यकच आहे, याबाबत पेंक याच्याशी पुष्कळांचे एकमत झालेले आहे (१२९, ६३९). लेहमानच्या आग्रही मतानुसारही, कोणत्याही परिस्थितीत, क्रमबद्ध भूगोलाचा अभ्यास करत असताना त्याचा प्रादेशिक अभ्यासांशी असलेल्या संबंधांचा विचार सतत करत रहाणे अत्यावश्यक आहे (१८१, ४९). भूगोलातील कोणत्याही क्रमबद्ध अभ्यासाचा या दृष्टिकोणातून विचार केला, तर त्या भूगोलाभ्यासकाचे

लक्ष त्या प्रत्यक्ष घटनेवर, म्हणजे तिची उत्पत्ती व तिच्या प्रक्रिया या गोष्टींकडे नसते, तर त्या घटनेचा अन्य भौगोलिक रूपधेयांशी असलेल्या संबंधांवर त्याचे लक्ष असते. (म्हणजेच, क्षेत्रीय भेदाभेदांच्या दृष्टीने महत्त्वाच्या रूपधेयांवर लक्ष असते.).

येथे जे निष्कर्ष आम्ही काढले आहेत त्यांचा परिणाम म्हणून क्रमबद्ध भूगोलातील, सगळे नाही तरी, बहुतांश कार्य निकालातच काढावे लागेल, असा एक विचार प्रथमदर्शनी मनात येऊन जातो. पण परिस्थिती याच्या उलट आहे. घटनांच्या विशिष्ट प्रकारांचा एकूण क्षेत्रीय भेदाभेदांशी असलेल्या संबंधाच्या क्रमबद्ध अभ्यासांची तरतूद करण्याचे आगत्याचे कार्य करण्यासाठी तेवढा भाग या निष्कर्षांमुळेच मोकळा करून देण्यात आला आहे. विजातीय रूपधेयांच्या जटिलाच्या भाषेत प्रत्येक क्षेत्रातील हा जटिल बदलत असतो. अन्योन्य आंतरसंबंध असलेल्या विजातीय रूपधेयांच्या एका जटिलाच्या भाषेत जगातील प्रदेश एकमेकापेक्षा निराळे असल्याचे दाखविता येते. कोणत्याही एका स्वतंत्र प्रदेशाचे संपूर्ण अर्थशोधन करावयाचे झाले, तर त्याच्या आकारमानाच्या कोणत्यातरी एका पातळीवर त्या प्रदेशातील घटनांच्या विशिष्ट वर्गांनी तयार केलेल्या घटक विभागात त्या प्रदेशाची विभागणी आपल्याला कल्पनेनेच करावी लागते. मिशोटेने म्हटल्याप्रमाणे, त्या प्रदेशाचे वनस्पतिनिर्मित स्वरूप, त्याचे भूरूपात्मक स्वरूप, त्यातील प्रत्येक प्रमुख सांस्कृतिक रूपधेयाने निर्माण केलेले स्वरूप, आणखी कितीतरी अन्य रूपे या सर्वांचा अभ्यास करणे आवश्यकच आहे (१८९, १७ ते ३३). शिवाय, अशा परिपूर्ण पण स्वतंत्र अभ्यासांच्या केवळ तुलनेने जगाच्या क्षेत्रीय भेदाभेदांचे संपूर्ण आकलन होऊ शकत नाही. त्याबरोबरच ज्यांच्यातील केवळ नैसर्गिक वनस्पतींचा, केवळ भूरूपांचा, किंवा केवळ सांस्कृतिक रूपांपैकी एकाचा अभ्यास केला गेला आहे, असे प्रदेश एकमेकांपासून कोणत्याप्रकारे परस्परांपासून विभक्त व कोणत्याप्रकारे परस्परांशी निगडित असतात, हेही समजून घेणे आवश्यक असते. मिशोटे या तौलनिक अभ्यासांना " तौलनिक वनस्पति-भूगोल, " " तौलनिक भूरूपांचा भूगोल " इ. अशी नावे देतो. त्याचप्रमाणे हेटनरही आपल्या अनेक खंडात लिहिलेल्या क्रमबद्ध-भूगोलाला " Vergleischende Länderkunde " हे नाव देतो व ते वाटते तितके अनुचित नाही. तरीही, दुर्दैवाने, या हेटनरच्या नावाने बरेच गैरसमज निर्माण केले, हे आपण पाहिलेलेच आहे (प्रकरण २-ड). ज्याने अमेरिकी भूगोलाला भूगोलातील वंटनात्मक संकल्पनेची प्रथमच ओळख करून दिली, त्याच प्राकृतिक भूगोलकाराने, म्हणजे फेनमाननेच, संयुक्त संस्थानांचा प्रादेशिक प्राकृतिक भूगोलविषयक प्रभावी अभ्यास प्रकाशित करून क्रमबद्ध भूगोलासंबंधीचा आपला हाही दृष्टिकोण प्रात्यक्षिकाने सिद्ध करून दाखविला, ही गोष्ट अत्यंत अर्थपूर्ण आहे.

विशेषेकरून, ज्यांना प्रादेशिक भूगोलाविषयीच्या आवडीतून क्रमबद्ध अभ्यास करण्याची स्फूर्ती मिळाली, त्यांनीच क्रमबद्ध भूगोलाने कोणत्याप्रकारचे कार्य करण्याची जबाबदारी स्वीकारावी, ते अगदी स्पष्टपणे सूचित केलेले आहे. कोणत्याही एका विशिष्ट रूपधेयाच्या त्या क्षेत्राशी असलेल्या संबंधाचे मापन प्रदेशाच्या एकूण स्वरूपातील अन्य कारकांशी असलेल्या त्याच घटकाच्या संबंधाच्या भाषेत करावे लागते, हे त्यांनी ओळखले. तसेच, वेगवेगळ्या घटकांच्या केवल मापनांचा सापेक्ष मापनांइतका, म्हणजेच घटकांघटकांतील अन्योन्य संबंध-दर्शक गुणोत्तरांइतका, उपयोग होत नाही, हेही त्यांच्या सूक्ष्म नजरेतून सुटलेले नव्हते.

गुणोत्तरांच्या नकाशीकरणाच्या घटकमहत्त्वसमतारेषा-पद्धती (Isoplethic Method) चा विकास हे क्रमबद्ध भूगोलातील अभ्यास अधिकाधिक भौगोलिक स्वरूपाचे करण्याच्या दृष्टिने टाकलेले एक अत्यंत महत्त्वाचे प्रगतीचे पाऊल ठरते. एंगल ब्रेख्टच्या कार्याचा आधार घेऊन, वेलिंग्टन डी. जोन्सने ही पद्धती आपल्या देशात परिणामकारक रीतीने सादर केली व तिचा विकास केला (२८३), आणि आता तिचा सर्वत्र उपयोगही केला जातो आहे. चीनच्या वेगवेगळ्या विभागांतील कृषिविषयक भेदांच्या अभ्यासांसाठी ट्रेवार्थाने अलीकडेच प्रसिद्ध केलेल्या पिकांच्या गुणोत्तरांच्या नकाशांची (३९२) उपयुक्तता आणि ज्यांवर आपल्याला यापूर्वी अवलंबून रहावे लागत असे त्या केवलमूल्यदर्शक बिंदुयुक्त नकाशांची उपयुक्तता यांची तुलना करून पहावी (३९२). एकाच घटनेसंबंधीची दोन गुणोत्तरे एकाचवेळी दाखविण्याची सोय करून ही पद्धती आणखी सुधारता येईल. हीच गोष्ट प्रस्तुत लेखकाने तयार केलेल्या संयुक्त संस्थानांतील दुग्धव्यवसाय-क्षेत्रांच्या घटक-महत्त्व-दर्शक समता-रेषांच्या नकाशांवरून दाखविली गेली आहे (३२५ : पण नकाशा फार लहान प्रमाणावर छापलेले असल्यामुळे हे प्रात्यक्षिक फारसे समर्पक झालेले नाही). जोन्सच्या लघुक्षेत्रदर्शक नकाशाचा विस्तार व विकास करणाऱ्या या अभ्यासाने दुग्धव्यवसायाच्या विकासाच्या घनतेतील बदलाच्या प्रमाणांतून निर्माण होणारे जमीनवापराच्या क्षेत्रीय स्वरुपांतील भेदांचे प्रत्यक्ष चित्रण केलेले आहे. गौळवाड्यातील गाई किंवा दुग्ध-उत्पादन यांच्या वितरणाचे दर्शन घडविणाऱ्या सामान्य शिरगणतीच्या नकाशांवरून ही गोष्ट केवळ अप्रत्यक्षपणे, आणि पुष्कळ अंशी चुकीच्या स्वरूपात, अनुमानानेच जाणून घ्यावी लागत असे. मागील प्रकरणात ग्रामीण क्षेत्रांच्या जागतिक वितरणाच्या दोन प्रकारच्या क्रमबंधांची चर्चा आलेली आहे. कृषिप्रकार निश्चित करणे आणि " कृषिप्रदेशांच्या " सीमा ठरविणे या गोष्टी वरील दोनही प्रकारांत घटक-महत्त्वदर्शक समतारेषांच्या नकाशांच्या अधिकाधिक रचनेवरच अवलंबून रहातात. (मग ते नकाशे अप्रकाशित राहिले तरी चालेल). या नकाशांवर वेगळ्या वेगळ्या पिकांचे एकूण पिकांशी, लागवडीखालील जमिनीचे एकूण जमिनींशी, गुराढोरांच्या कळपांचे लागवडीखालील जमिनींशी इत्यादी वेगवेगळ्या गुणोत्तरांच्या रुपाने स्पष्ट होणारे भेद दाखविले असणे जरूर असते.

क्रमबद्ध भूगोलातील ही गुणोत्तरात्मक पद्धती कृषिभूगोलापुरतीच मर्यादित आहे, असे नाही. नित्याच्या "उठावाच्या" नकाशांशिवाय, म्हणजे ज्यात फक्त प्रत्यक्ष उंचीच दाखविलेली असते अशा नकाशाशिवाय "सापेक्ष उठाव" दाखविणारे नकाशेही तयार करण्यात आले आहेत. पार्शच्या अनुकरणाने, हे नकाशे बेगवेगळ्या युरोपिय भूगोलकारांनी, आणि या देशातील गायहारोल्ड स्मिथ यांनी, तयार केलेले आहेत. [विशेषेकरून जेम्सचे पर्यविक्षण पहा (२९४); आणि क्रेसीचे अगदी अलीकडील उदाहरणही पहा, ३३८]. "सामाजिक भूगोलाच्या" क्षेत्रातील गृहप्रकारांचे नकाशे काढताना याच पद्धतीचा उपयोग क्निफेनने केला आहे. तसेच, प्रस्तुत लेखकाने संयुक्त संस्थानातील लोकसंख्येची मानववंशात्मक रचनेतील क्षेत्रीय भेद दाखविण्यासाठी या पद्धतीचाच उपयोग केला आहे (३५९).

जेथे वितरणाच्या विशिष्ट स्वरूपामुळेच समतारेषांचे नकाशे तयार केले जाण्याची शक्यता कमी होते, तेथेही, उदाहरणार्थ नगरलक्षणांच्या विवेचनासाठी, केवल संख्यात्मक मापनाच्या तत्त्वाचा उपयोग नगरांच्या स्वरुपांतील भेदाभेदांच्या स्पष्टीकरणार्थ करता येण्यासारखा आहे. म्हणजेच, नगर-विकासाच्या भाषेत नगरांच्या तुलना करत असता, आणि प्रदेशांच्या तुलना करत असतानाही, महत्त्वाची कामगिरी बजावणारी आकारमाना-व्यतिरिक्त अन्य लक्षणे स्पष्ट होण्यासारखी आहेत. हीच गोष्ट प्रस्तुत लेखकाने केलेल्या उत्तर अमेरिकेतील कारखानदारीपट्ट्याच्या अभ्यासावरून सोदाहरण सिद्ध झालेली आहे. त्यात नगरांच्या कारखानदारीच्या कार्याचे मापन, केवल-मूल्यात न करता, एकूण कार्याच्या संदर्भात केलेले आहे (३२६).

जॉन के. राइट यांनी "वितरणाची काही मापने" या शीर्षकाखाली अगदी खूप गुंतागुंतीचे एक तांत्रिक साधन क्रमबद्ध भूगोलाच्या सहाय्यासाठी अलीकडेच सादर केलेले आहे (२९३). त्यात बरीच गुंतागुंतीची गणित-सूत्रे वापरावी लागतात एवढ्याच कारणावरून त्यांचा उपयोग करण्याच्या विरुद्ध, अथवा त्यांच्या बाजूने, भूगोलकारांनी आपले मत कलुषित करून घेऊ नये. हे असे एक नवीन, पण मौल्यवान, तंत्र आहे, की त्यामुळे प्रादेशिक भूगोलाला उपकारक ठरतील असे निष्कर्ष काढण्याची पात्रता क्रमबद्ध भूगोलाला प्राप्त होण्याची शक्यता आहे, असे राइटने सादर केलेल्या विविध, पण लहानसहान उदाहरणांवरून सूचित होते. ते निष्कर्ष आज उपलब्ध असलेल्या निष्कर्षापेक्षा कितीतरी अधिक अचूक असतील, अशी शक्यता राइटने सादर केलेल्या छोट्यामोठ्या उदाहरणांवरून सूचित होत असली, तरी या तंत्राची उपयुक्तता पटवून देण्याच्या दृष्टिने ती अपर्याप्तच आहेत, असे निदान प्रस्तुत लेखकाचे मत झालेले आहे. एखाद्या प्रत्यक्ष समस्येसाठी त्याचे उपयोजन करून पहाण्यात आणि त्यातून कोणते निर्णय हाती येतात हे तपासून पहाण्यात एखाद्या अभ्यासकाला तरी गोडी वाटेल, अशी आशाच करत रहावे लागणार आहे.

भूगोलातील क्रमबद्ध अभ्यासाचा सर्वात सोपा प्रकार एकाच घटकापुरता मर्यादित असतो. पण, भूगोलात घटक-जटिल या संकल्पनेचे महत्त्व फार आहे, या गोष्टीची दखल आम्ही यापूर्वीच घेतलेली आहे. विविध घटकांचे प्रकार-निरपेक्ष, सहसंबंधयुक्त साहचर्य म्हणजेच घटक-जटिल होय. सुमारे एकाच प्रकारच्या घटक-जटिलाची निरनिराळ्या क्षेत्रात पुनरावृत्ती होत असल्याचे आढळून आल्यास, आणि त्यांचे वितरण भौगोलिकदृष्ट्या महत्त्वाचे असल्याचे नजरेस आल्यास त्यांचा क्रमबंधात्मक अभ्यास करण्यास हरकत नाही —आणि हा अभ्यास जागतिक स्वरूपाचा, अथवा एकाच विस्तृत क्षेत्राशी संबंधित असावयासही हरकत नाही. क्रमबद्ध भूगोलाच्या विविध शाखांचा अन्योन्यसंबंध साधणारे हे अभ्यास म्हणजे प्रादेशिक भूगोलाच्या विशिष्ट क्षेत्रातील एकघटकाभ्यासाच्या पायापासून सर्वघटक-जटिलाभ्यासाच्या शिखरापर्यंत पोहोचविणाऱ्या पायऱ्या असतात.

पर्जन्यमान, तपमान, जमीनउतार, मृत्तिका, पाणलोट-व्यवस्था, व वनस्पतिजीवन अशासारख्या विविध घटकांचे एकाच स्थळी दिसणारे अंतःसंबंध एकाच घटक-जटिलाच्या रुपाने सादर करता येण्याची शक्यता असते. आणि मग, ज्याचा आडव्या पातळीतील विस्तार अनिश्चित आहे असा उभ्या पातळीतील तो एक जटील आहे. असे म्हणावयास हरकत रहात नाही. उलटपक्षी, हे घटक निरनिराळ्या स्थळी उपस्थित असण्याची शक्यता असते. त्यांच्या अंतःसंबंधातून आडव्या पातळीतील कमीजास्तपणे निश्चित विस्तार असलेले एक क्षेत्रीयरुप निर्माण होईल. तसेच, लांबट विस्ताराची यू-आकाराची आल्प्स पर्वतातील, अथवा तत्सम, एक दरी हा तिच्या प्राथमिक अवस्थेत एक नैसर्गिक जटिल होता, आणि त्याची जमीन उतार, मृत्तिका पाणलोट आणि वनस्पती ही कारके एका बाजूच्या पर्वतउतारापासून दुसऱ्या बाजूच्या पर्वतउतारापर्यंत एका निश्चित रीतीने बदलत गेली. म्हणजेच, तिरकस दिशेने बऱ्याचशा निश्चित मर्यादा असलेले ते एक क्षेत्रीयरुप होते, तथापि, प्रत्यक्ष त्या संकल्पनेचा विचार करता, तिच्या मर्यादा लांबीच्या दिशेने अनिश्चित असतात— म्हणजेच, त्या प्रत्येक विशिष्ट बाबीपुरत्याच निश्चित केल्या जातात. या विरुद्ध एक 'पोल्ये' हेही असेच, पण सर्वच दिशांच्या मर्यादा निश्चित असलेले, जटिल क्षेत्रीय एकक आहे.

एस्टोनियाचा भूगोलकार मार्कस याने घटक-जटिलांच्या अभ्यासांत एका उद्‌बोधक व सूचक ग्रंथाची भर घातली आहे. हा ग्रंथ, अगदी पूर्णांशांनी नसला तरी, बव्हंशी नैसर्गिक घटकांच्या संयोगाच्या (Nature Complex) अभ्यासाला वाहिलेला आहे (२३९). "टंड्रा", "हायमूर", "लो-मूर", "कवोष्णकुरण प्रदेशातील तृणसमृद्धसखल भाग" इत्यादी संज्ञा वापरून अशा घटक-जटिलांच्या अगदी सहज लक्षात भरणाऱ्या प्रकारांना अगदी पूर्वीपासूनच भूगोलकारांनी मान्यता दिलेली आहे, अशी नोंद त्याने केलेली आहे. कोणत्याही एका जटिलातील कोणत्याही एका कारकात कसलाही बदल झाला तरी त्यामुळे इतर कारकांत तत्काळ फरक झालेला दिसत नाही, तर ते नव्या परिस्थितीशी कमीजास्त वेगाने जुळते घेऊ लागतात. ज्यांच्यांतील सर्वच घटकांची पूर्णपणे संगती लागलेली आहे ते "नियमित जटिल", आणि ज्यांच्यातील ही जुळणी पूर्णत्वाला पोहोचलेली नाही ते " अनियमित " असे

तो त्यांचे भेदही दाखवितो. याच संदर्भात अन्य लेखकांनी 'संवादी' व "विसंवादी" जटिल असे भेद सुचविलेले आहेत, त्यापेक्षा या संज्ञांनी केलेले वर्णन अधिक स्पष्ट आहे (प्रकरण १०-ड पहा). जेव्हा एखादा घटक-जटिल दुसऱ्या क्षेत्रातील घटक-जटिलात घुसलेला दिसतो तेव्हा त्याला मार्कस त्या घटकाचे "धन आक्रमण" असे नाव देतो, कारण त्या दुसऱ्या जटिलाला अशा कोणत्याच कारकाची विशेष गरज नसते.—उदाहरणार्थ कवोष्णकुरण प्रदेशात झालेले आरण्यप्रदेशांचे आक्रमण, हेच आक्रमण विरुद्ध दिशेने झालेले आढळते तेथे त्याला तो "ऋण आक्रमण" असे नाव देतो. घटक-जटिलांच्या वर्गीकरणाची एक योजनाही त्याने आखली होती. त्यानुसार खऱ्याखुऱ्या जटिलांना अमूर्त अशा विशिष्ट जातीत अथवा प्रकारात घातले आहे—अर्थातच, तसे करताना त्याने त्यांच्या आवश्यक त्या सामान्य लक्षणांचा विचार केलेला आहे—आणि पुढे त्यांची त्याने कुल, प्रत अशीही व्यवस्था लावून दिलेली आहे.

वर्गीकरणाच्या एकाच क्रमबंधात सर्व प्रदेशांची व्यवस्था लावण्याच्या प्रयत्नात असताना आमच्यापुढे ज्या दुर्लंघ्य अडचणी उभ्या राहिल्या, त्याच मूळ अडचणी घटक-जटिलांच्या प्रकारांचे, म्हणजेच अमूर्त प्रकारांचे, लीनियन पद्धतीने वर्गीकरण करणे हा अंतिम हेतू साध्य होण्याच्या मार्गात उभ्या राहतात. आरण्यव्याप्त पर्वतप्रदेश, अरण्यव्याप्त मैदानी प्रदेश, पर्वतप्रदेशातील कवोष्णकुरणप्रदेश व मैदानी कवोष्णकुरणप्रदेश हे चार भिन्न प्रकार आहेत. ते वर्गीकरणाच्या कोणत्याही एका एकपक्षीय क्रमबंधात तर्कशुद्ध पद्धतीने बसविता येत नाहीत; कारण, पर्वत व मैदान हा भेद महत्त्वाचा मानावयाचा की आरण्य व कुरण हा भेद महत्त्वाचा मानावयाचा याचा निर्णय देणारी एकही वस्तुनिष्ठ पद्धती आम्हाला माहित नाही. त्याचप्रमाणे, एका भौगोलिक प्रदेशाचा (Landschaft) उल्लेख एकाच प्रकारच्या घटक-जटिल या अर्थाने करणे शक्य आहे, ही मार्कसने पुढे केलेली सूचनाही आम्हाला मान्य होण्यासारखी नाही. त्या प्रदेशात उपस्थित असलेल्या त्या जटिलातील सर्वच घटकांचा आपण विचार करू लागलो, तर शेवटी आपल्या हाती लागते ती त्याची एक असाधारण अवस्था असते, तो त्याचा एक प्रकार होऊ शकत नाही (प्रकरण १०-इ पहा). मार्कसचा प्रोत्साहक निष्कर्ष जरी आपण मान्य केला नाही तरी, नैसर्गिक घटक-जटिलांच्या विशिष्ट प्रकारांच्या क्रमबद्ध अभ्यासांतून काही मौलिक निर्णय आपल्या हाती येण्याची शक्यता आहे, अशी अपेक्षा करण्यास हरकत नाही. अर्थात, यातील प्रत्येक जटिलातून त्या प्रदेशाच्या संपूर्ण स्वरूपाच्या, किंवा त्याच्या रूपरेषेचाही, पुरेसा आविष्कार होत नसला तरी, कोणत्याही एका घटकापेक्षा एका जटिलात त्या प्रदेशाचा अधिक आविष्कार होत असतो, असे मानावयास काहीच हरकत नाही.

संघटनकुशल मानवी हाताने निर्माण केलेल्या व बऱ्याच बाबतीत फार विस्तृत क्षेत्रावर पसरलेल्या अनेक घटक-जटिलांच्या अभ्यासांतून कितीतरी अधिक उपयुक्त निर्णयांची अपेक्षा करण्यास हरकत नाही, असे प्रादेशिक विभागणीच्या या पूर्वीच्या आपल्या चर्चेने सूचित

केलेलेच आहे. ज्या नैसर्गिक घटकजटिलांबाबत आपण चर्चा केलेली आहे, ते योगायोगाने एकत्र आलेल्या काही शक्तींच्या आंतरक्रियांच्या परिणामांची केवळ गोळाबेरीज, अशा स्वरूपाचे असतात. त्यातील कोणत्याही एका शक्तीचे आकलन तिच्या अन्य शक्तींशी असलेल्या संबंधांच्या भाषेत तिच्यापुरते स्वतंत्रपणे करता येते. म्हणूनच या नैसर्गिक घटक-जटिलांपेक्षा सांस्कृतिक घटकजटिल हे वेगळ्या प्रतीचे असतात. हे सांस्कृतिक घटक-जटिल मानवाने हेतुपुरस्सर त्यांच्या अंतिम परिणामांच्या संपादनासाठीच निर्माण केलेले असतात. त्यातील कोणत्याही एका घटकाची उपस्थिती त्याच्या अन्य घटकांशी असलेल्या संबंधांच्या भाषेत समजून घ्यावयाची नसून, त्या अंतिम परिणामाशी असलेल्या त्यांच्या संबंधाच्या संदर्भात समजून घ्यावयाची असते. उदाहरणार्थ : मका-पट्ट्यातील शेतमळ्यावर मानवाने संघटित केलेल्या एकूण पिके व गुरेढोरे यांच्या साहचर्याच्या दृष्टीने असलेल्या ओटच्या महत्त्वाच्या भाषेत, किंवा, तसाच विचार करू लागलो तर, मजुरी, भांडवली खर्च, जमीन यांच्यावर किमान खर्च व कमाल अर्थोत्पादन या त्याच्या अंतिम परिणामाच्या भाषेतही, मका-पट्ट्यातील ओटचे महत्त्व स्पष्ट करून घ्यावे लागेल. परिणामी, हे सांस्कृतिक घटक-जटिल बऱ्याच मोठ्या प्रमाणात स्वयंपूर्ण एकक रूपानेच संघटित केलेले असतात. म्हणूनच, त्यांचे आकलन हाच सांस्कृतिक प्रादेशिक भूगोलाच्या विकासाचा पहिला टप्पा मानला जावा, असे आम्ही यापूर्वी दाखवून दिले आहे.

शेतमळ्यासारख्या सांस्कृतिक घटक जटिलांच्या सापेक्षतः लहान एककात समाविष्ट असलेल्या कारकांची संख्या नैसर्गिक घटक जटिलांत सामान्यतः आढळणाऱ्या कारकांच्या संख्येपेक्षा कितीतरी अधिक असते, व त्यात भौतिक व अभौतिक अशा दोन्ही प्रकारांच्या घटकांचा समावेश असतो. संयुक्त संस्थानांतील शेतमळ्यांच्या प्रकारांतील भेद शेतमळ्यावरील लोकवस्तीच्या स्वरूपातील भेदांशी संबंधित असते म्हणजे मळेकरी हे देखील गुरेढोरे व पिके यांच्या बरोबरीने त्या मळ्याच्या नियमित घटकाची भूमिका करत असतात, ही गोष्ट ओ. ई. बेकर यांच्या लक्षात येऊन चुकली आहे. (३१२).

जरी सामान्यतः सांस्कृतिक जटिलांची फक्त लहानसर क्षेत्रीय एकके बनत असली, तरी मानवांनी त्यांचे संघटन शिथिल प्रादेशिक जटिलांत केलेले आढळते. अशा प्रादेशिक जटिलांनी मात्र प्रत्येकी सापेक्षतः अधिक विस्तृत क्षेत्र व्यापलेले असते.

शेवटी, सांस्कृतिक व नैसर्गिक अशा दोनही प्रकारांच्या घटकांचा ज्यात समावेश होतो अशा जटिलानांही मान्यता द्यावयास हरकत नाही. मानव बऱ्याचशा बाबतीत समान नैसर्गिक परिस्थितीत एकाच प्रकारचे सांस्कृतिक जटिल वाढवत असतो. ज्यातील सांस्कृतिक घटक जटिलांनी काही नैसर्गिक जटिलांशी अंतर्गत संबंध जोडून ठेवले आहेत, असेही अनेक जटिल आढळण्याची शक्यता आहे, अशी अपेक्षा करण्यास हरकत नाही. पण, नैसर्गिक परिस्थितीशी जुळते घेण्याच्या आपल्या पद्धतीत मनुष्य कधीच सातत्य राखत नसल्यामुळे, या संयुक्त घटक-जटिलांची उपयोजकता सापेक्षतः मर्यादित असणार, अशीच अपेक्षा आपण केली पाहिजे.

ज्यांच्याशी आपला संबंध येत असतो अशा काही घटक-जटिलांचा अभ्यास अन्य शास्त्रांनी आधीच करून ठेवलेला असतो असे भूगोलाला आढळून येते. फक्त सरूप व सामान्य प्रकारांचाच अशा जटिलांत समावेश केलेला असेल –उदाहरणार्थ : अनेक वनस्पतींचा जटिल या अर्थाने नैसर्गिक वनस्पतींचा अभ्यास, किंवा झोतभट्ट्या, पोलादभट्ट्या, रूळ करण्याच्या गिरण्या, वस्तुनिर्मितीच्या गिरण्या, साठवणाची प्रांगणे, इत्यादींचा जटिल या अर्थाने लोखंड-पोलाद-निर्मितीचा कारखाना यांचा अभ्यास केला असेल –तर क्रमबद्ध शास्त्रांपैकी संबंधीशास्त्र त्या जटिलाच्या त्याच्या मूळ स्वरूपात अभ्यास करण्याकडे आणि त्याच्या जगभर झालेल्या वितरणाकडे लक्ष पुरवत असते. पण, अधिक गुंतागुंत असलेले काही जटिल –म्हणजेच ज्यात विधर्मी घटनांचा संयोग झालेला असतो असे जटिल –मात्र, फक्त भूगोलकारालाच जिव्हाळ्याचे वाटण्याची शक्यता आहे. भौगोलिक हेतू साध्य होण्याच्या दृष्टीने उपयुक्त असे शेतमळ्यांचे वर्गीकरण अर्थशास्त्रज्ञांनी तयार केलेलेच असेल तर भूगोलकार त्याच्या वर्गीकरणाचा जरूर उपयोग करील. पण तसे नसल्यास, स्वतःचे तसे वर्गीकरण करण्यास तो कमी करणार नाही. तथापि, अशा विशिष्ट बाबतीत, अभ्यासकांचे हे दोन गट परस्पर सहकार्याने कार्य करू लागले, तर दोनही शास्त्रांच्या दृष्टिकोणांतून उपयुक्त ठरेल असे एकच एक वर्गीकरण ते तयार करू शकतील, असे वाटते (C/o ३२० व त्याबरोबरच ३१९ आणि ३२४). पण, अर्थशास्त्रज्ञांनी तयार केलेले कारखानदारी उद्योगांचे वर्गीकरण भूगोलाला कोणतेच मौलिक ज्ञान देऊ शकणार नसेल, तर भूगोलकाराला एक वेगळे वर्गीकरण करण्याशिवाय गत्यंतरच नाही.

अभ्यास एका घटकाचा असो की एका घटक-जटिलाचा असो, क्रमबद्ध भूगोलातील अभ्यास विशिष्ट प्रकारच्या एकाच घटनेवर अथवा घटना-साहचर्यावर लक्ष केंद्रित करत असतो. त्यामुळे, जाति-संकल्पना प्रस्थापित करण्याच्या दिशेने त्याची वाटचाल सुरू होते. प्रत्येक घटकासाठी अथवा घटक-जटिलासाठी त्याच्या प्रकार भेदांचा एक तर्कशुद्ध क्रमबंध प्रस्थापित होण्याची शक्यता निर्माण होते ; आणि त्या रूपधेयाचे प्रकार आधीच प्रस्थापित झाले असतील, तर त्याच पायाचा आधार घेऊन अभ्यस्त रूपधेयाचे अन्य भौगोलिक रूपधेयांशी असलेले संबंध तत्त्वांच्या रूपाने सांगितले जाण्याची शक्यता निर्माण होते –मग ती तत्त्वे उपयोजनदृष्ट्या कितीही मर्यादित असोत, अथवा सदोष असोत ! पर्जन्यमान, मृत्तिका, जलप्रवाहांमुळे निर्माण होणारी झीज अथवा भर, पीक-गुरे साहचर्य, पोलाद कारखाने किंवा राजनैतिक सरहद्द यांपैकी कोणत्याही एकाचा आपण विचार करत असलो, –मात्र, हा विचार संपूर्ण जगाचा नसला, तर प्रत्येक बाबतीत तो निदान विस्तृत क्षेत्रांचा तरी असावा. –तर ते अभ्यस्त रूपधेय व अन्य भौगोलिक महत्त्वाची रूपधेये यांच्यातील संबंधयोग प्रस्थापित करण्याची शक्यता निर्माण व्हावयास हरकत दिसत नाही.

क्रमबद्ध भूगोलाचे सर्वच निष्कर्ष जाति-संज्ञांनी स्पष्ट करून सांगणे हे कोणत्याच परिस्थितीत शक्य होणार नाही –मग ते निष्कर्ष संकल्पनांसंबंधींचे असोत किंवा तत्त्वांसंबंधीचे असोत ! (हेटनर १६७, २८३). ज्वालामुखींचा क्रमबद्ध अभ्यास करत असता, केवळ एका प्रकाराचे एक उदाहरण म्हणून क्राकाटोआचे विवेचन समर्पकपणे करताच येणार नाही. त्याचप्रमाणे, एका भौगोलिक रूपधेयाचा दुसऱ्या रूपधेयांशी असलेल्या संबंधांचा विचार करत असताना, आपापल्यापरीने असामान्य दिसणाऱ्या असंख्य बाबी आढळून येतील. तरीही, क्रमबद्ध भूगोलाचा बराच मोठा भाग सर्वसामान्य परिस्थितींचाच विचार करत असतो आणि त्याची वाटचालही तत्त्व-विकासाच्या दिशेनेच होत असते. प्रश्न असा आहे, की त्यांच्यामुळे भूगोलाला भविष्यतर्काचे सामर्थ्य प्राप्त होते काय ? कारण, शास्त्राच्या अंगी असलेली ही अनमोल शक्ती हाच " शास्त्राचा " कळस, असे पुष्कळदा मानले जात असते.

आपण ज्याला शास्त्र म्हणतो तशा प्रकारच्या " जाणीवेची " –पदार्थशास्त्रज्ञ जॉन टी. टेट [१०३] याने ही संज्ञा सुचविलेली आहे –आवश्यक लक्षणे त्या ज्ञानाच्या स्वरूपावरून निश्चित केली जात नाहीत. खरे तर, ज्याला ' शास्त्र ' असे संबोधतात तशा प्रकारच्या ज्ञानसंशोधनाच्या पद्धतीची ती परिणामी फळे असतात. भविष्यकाळात प्रत्यक्ष निरीक्षणाने एखाद्या वस्तुस्थितीचे आकलन जसे होऊ शकेल, तसेच विद्यमान कारकांच्या संयोगांतून निर्माण होणाऱ्या भावी परिणामांचे जवळ जवळ तितके स्पष्ट आकलन केवळ तत्त्वसिद्ध अनुमानांनी होऊ शकेल, इतक्या मोठ्या प्रमाणात निश्चित ज्ञान-संपादनातील यश हेच भविष्यकथन-क्षमतेचे खरे रूप असते. मापनातील सदोषतेमुळे निर्माण होणाऱ्या पर्यन्त दोषापेक्षा अधिक दोष असाच अर्थ " जवळ जवळ " या विशेषणाने येथे सुचविले आहे. प्रत्येक क्षेत्रात, अनिश्चिततेचा म्हणजेच अनाकलनीयतेचा पर्यन्त नित्य उपस्थित असतोच. आणि भौतिकशास्त्रांनाही –इतकेच काय, आधुनिक भौतिकशास्त्रांनाही तो कधीतरी पुसून टाकता येईल अशी आशा वाटत नाही.

म्हणूनच, कोणत्याही शास्त्राची भविष्यकथन-क्षमता त्याच्या यथार्थता, निश्चितता, विश्वव्यापकता या ध्येयांची उच्चतम प्रमाणात झालेल्या पूर्ततेची परिणती, व त्याचा दर्शनी पुरावाही, असतात. खरे पहाता, ती त्या शास्त्राची कसोटी नव्हे, तर ती शास्त्रांतर्गत " ज्ञानाच्या " संपादनातील यशाची कसोटी असते. हे यश त्याच्या प्रत्यक्ष परिणामामागे धावत सुटल्याने प्राप्त होणार नाही, तर " ज्ञानाच्या " मूलभूत ध्येयांची मोठ्या प्रमाणात पूर्तता करण्यासाठी धडपड केल्याने प्राप्त होणार आहे.

---

१०३. " माझे ज्ञानविषयक विचार " या विषयावर मिनेसोटा विद्यापीठातील आपल्या सहकाऱ्यांपुढे दिलेल्या अनौपचारिक व्याख्यानात ही सूचना त्याने केलेली होती.

स्पष्ट शब्दात सांगावयाचे तर, भविष्यकथनाचा खटाटोप करत करत भूगोलविषयक भविष्यकथनांचे शिक्षण घ्यावयाचे हा मार्गच आम्हाला मान्य नाही. शास्त्रीय तत्त्वांसंबंधींचे एक उपप्रमेय असे आहे की, आपले ज्ञान किती प्रमाणात अपुरे व अनिश्चित आहे हे जाणून घेण्यासाठी आपणच प्रयत्नशील असले पाहिजे. एखाद्या परिस्थितीबाबतचे आपले आवश्यक ज्ञान अपुरे असल्याची जाणीव झालेली असूनही त्या परिस्थितीबाबत भविष्यकथन करणे हे अशास्त्रीय मार्गाचा अवलंब करण्यासारखे आहे. भविष्यकथनाची क्षमता असलीच पाहिजे असा शास्त्राचा आग्रहही नाही. एखाद्या विशिष्ट शास्त्रशाखेत क्षमता कमी असल्याचे प्रत्यक्ष व भक्कम प्रमाण देण्यात आले आहे, एवढ्याने काही ते शास्त्रच नव्हे असे सिद्ध होत नाही ; उलट, त्या ज्ञानक्षेत्राचे स्वरूप शास्त्रीयच आहे असे जाहीर करणारा तो एक शास्त्रीय निष्कर्ष असतो.

मोठ्या प्रमाणात निश्चितता असलेले भविष्यकथन करण्याची पात्रता अंगी यावी इतक्या उच्च दर्जाचे आवश्यक ध्येय संपादन करण्यात क्रमबद्ध भूगोलाच्या अनुसंधानाने यश मिळविले आहे असा दावा कोणीही व्यावसायिक भूगोलकार करणार नाही, असे निदान मी गृहीत धरतो. अधिक परिपक्व व समृद्ध भूगोल किती जरी यश संपादन करणार असला, तरीही भूगोलशास्त्रात काही दुर्लंघ्य अडचणी व मर्यादा नित्यच रहाणार आहेत, ही गोष्ट आपण मान्य केलीच पाहिजे.

सांस्कृतिक भूगोलातील बहुतांश मापनावश्यक घटनांचे आणि क्रमबद्ध नैसर्गिक भूगोलातील पुष्कळशा मापनावश्यक घटनांचे स्वरूपच असे आहे, की, काही निसर्गशास्त्रांना ज्या प्रकारची अचूक आणि निश्चित मापने करणे शक्य असते, तशा प्रकारची मापने करणे त्यांच्याबाबतीत कधीच शक्य होणार नाही, ही गोष्ट आपल्याला प्रथमपासूनच माहीत आहे. हीच अडचण इतर पुष्कळ क्रमबद्ध-शास्त्रांत, आणि विशेषेकरून सामाजिक शास्त्रात, भूगोलाइतकीच असलेली दिसते.

क्रमबद्ध भूगोलाच्या प्रत्येक शाखेतील घटनांचे व त्यांच्या अन्योन्य-संबंधांचे ज्ञान जातिसंकल्पना व तत्त्वे यांच्या रूपाने अपूर्णपणेच ग्रथित करता येण्यासारखे आहे ; आणि म्हणूनच, भूगोलाच्या भविष्यकथनात काही मर्यादेपर्यंत अनिश्चितता रहाणे अटळ आहे. प्रत्येक शास्त्रीय क्षेत्रात, कमी जास्त प्रमाणात, ही अनिश्चिततेची मर्यादा असतेच, हे खरे असले तरी, भूगोलातील घटनांच्या असामान्यत्वाचे प्रमाण, इतर पुष्कळ शास्त्रांच्या तुलनेने, अधिक असते ; इतकेच नव्हे तर, ही असामान्यता अगदी प्रथम श्रेणीची आणि व्यावहारिक महत्त्वाची असते. ही गोष्ट भूगोल आणि सामाजिक शास्त्रे यांच्या बाबतीतच तेवढी खरी आहे असे नसून, मानवी शरीरशास्त्र व, व्यक्ती व तिचे कुटुंब यांच्या दृष्टिकोणातून, मानसशास्त्र यांच्याबाबतीत, तसेच वातावरणशास्त्र व भूशास्त्र यांच्या काही शाखांच्या बाबतीतही, खरी आहे. जपानच्या बेटांवर असंख्य भूकंपांचे धक्के बसतील, असल्या भविष्यकथनाची किंमत शून्य असते. पण यापुढे होणाऱ्या पुढच्याच भूकंपाचा दिवस व ठिकाण यांचे अचूक निदान कोणी करू शकेल काय ?

---

*बोमन् पहा, (१०६, १७, ३१ ते ३३).

आणखीही एक गोष्ट आमच्या लक्षात आलेली आहे. जेथे काही विकारकांवर प्रयोगकालापुरते नियंत्रण ठेवता येईल, व त्याअंती प्रत्येक संबंधी कारकाचे अचूक महत्त्व समजून घेता येईल, अशा एखाद्या प्रयोग-शाळेत क्रमबद्ध भूगोलाचा अभ्यासविषय असलेल्या घटनांचे गुंतागुंतीचे अंतस्संबंध नेता येतील अशी शक्यता नाही. भूगोलाप्रमाणे सामाजिक शास्त्रांतही हाच दोष आहे. इतकेच नव्हे तर, मानव शरीरशास्त्र, भूशास्त्राच्या बहुतेक सर्व शाखा, आणि खगोलशास्त्र यांच्या मध्येही हा दोष असतो. या सर्व शास्त्रीय क्षेत्रांतील अभ्यासक फक्त सत्यस्थितीच्या प्रयोगशाळेत कार्य करू शकतात, आणि सत्यस्थितीच स्वतःच्या पसंतीनुसार करून दाखवेल अशा प्रयोगांचेच ते निरीक्षण करू शकतात. प्रयोग शाळेत ऋणाणूंच्या क्रियांचा अभ्यास करणाऱ्या पदार्थशास्त्रज्ञालाही ही मर्यादा लागू आहे. ज्यांचा अभ्यास करण्याच्या प्रयत्नात तो असतो त्या एका सुट्या ऋणाणूचे तो नियंत्रण करू शकत नाही. म्हणूनच, "निरीक्षण व प्रयोग या दोन क्षेत्रांमध्ये एखादी पक्की निदानरेषा काढता येण्यासारखी नाही" (११५, १११), असा निष्कर्ष कोहेनने काढला.

प्रयोग-शाळेतील प्रयोगांचे पर्याय म्हणून जी साधने सत्यस्थितीच आपल्यापुढे सादर करत असते, त्यातही भूगोलाचा पाय दोन प्रकारे मागे ओढला जात असतो. जवळ जवळ सरूप असणाऱ्या वस्तूंच्या आवृत्तींची हजारोच काय लक्षावधी उदाहरणे जेथे सादर करता येतील अशी बरीच ज्ञानक्षेत्रे आहेत. पण, भूगोलात, भूशास्त्रात, खगोलशास्त्रात व समाजशास्त्रांच्या काही शाखांत अशी सरूप उदाहरणे केवळ शेकड्यांनी, आणि काही बाबतीत तर हाताच्या बोटावर मोजता येतील इतकीच, आणि कितीकदा तर केवळ एकच एक उदाहरण, सादर करता येण्यासारखी असतात. ज्या शास्त्रांत त्यांतील संबंधयोगांशी गुंतलेल्या कारकांची संख्या सापेक्षतः लहान असते (उदाहरणार्थ खगोल शास्त्रात) आणि केलेल्या निरीक्षणांचा स्पष्टपणा व अचूकपणा निदान प्रयोगशाळेतील निरीक्षणांच्या बरोबरीचा असतो, अशा क्षेत्रांत ज्यांतील निश्चिततेच प्रमाण पुष्कळच मोठे असते असे शास्त्रीय नियम ज्यांवर आधारावयाचे ती आधारतत्त्वे पुरविण्यासाठी काही थोडीच उदाहरणे पुरेशी होतात. पण भूगोलात, भूशास्त्रात आणि समाजशास्त्रात कित्येकदा वरील एक, अगर दोनही, अटींचा अभाव असलेला दिसून येतो.

कमीजास्त प्रमाणात पुष्कळ स्वतंत्र विकारकांच्या अत्यंत गुंतागुंतीच्या कार्यांचे प्रतिपादन ज्या शास्त्रशाखांना करावे लागते त्यांच्या बाबतीत आणखीही एक अडचण रहाते. प्रत्येक गोतावळ्यातील अंतःसंबंधांची परिपूर्ण विधाने अत्यंत जटिल गणिती समीकरणांच्या रूपाने मांडून एखाद्या दैवी शक्तीने शास्त्रज्ञांच्या हाती दिली आणि एखाद्या विशिष्ट परिस्थितीतील वेगवेगळ्या कारकांचे संपूर्ण आणि अचूक ज्ञानही त्याच दैवी शक्तीमुळे हाती आले, तरीही निष्कर्षांच्या निश्चित ज्ञानापर्यंत येऊन पोहोचण्यासाठी सोडवावयाच्या समस्येची जटिलता मनाच्या परिमेय आकलन-शक्तीच्या बाहेरची असेल.*

---

*हा निष्कर्ष तत्त्वतः चार्लस हार्टशोर्न याने सुचविलेला आहे.

ज्या शास्त्रशाखांत भावी घटनांबद्दलचे निश्चित ज्ञान कमीच मिळण्याची अपेक्षा आहे अशा शास्त्रांत भूगोलाची गणना, त्याच्या मूळ स्वरूपामुळेच, करणे प्राप्त होते. कारण, भविष्यकथन ही संज्ञा प्राप्त करून घेण्यासाठी ज्ञानाच्या निश्चिततेची पातळी फार उंच असावी लागते.* तरीही, अशा प्रकारची निश्चितता जेथे शक्य आहे अशा पुष्कळ घटना आजच्या विकासावस्थेतही गृहीत प्रमेयरूपाने मांडणे शक्य झाले असते, ही गोष्ट निर्विवाद आहे. पश्चिम व्हर्जिनियात उच्च प्रतीच्या लोहखनिजाचे मोठे साठे सापडले असते, तर त्यातून परिणत होणारा खाण उद्योगाचा विकास तेथे होईल हे तर आपल्या भविष्यकथनात येईलच, पण पिट्सबर्ग व कोलूमेत या उद्योग-क्षेत्रांतील लोखंड-पोलाद उद्योगात सामान्यतः काही लक्षणीय बदल होत जातील हेही भविष्यकथन रूपाने आपण सांगू शकलो असतो, यातही शंका नाही. येथे वाचकांच्या हेही लक्षात आले असेलच, की ही घटना एकांतिक तर नाहीच उलट यातील संबंध योग अगदी साधे आहेत, कारण यात केवळ तीनच प्रमुख विकारक गुंतलेले आहेत (३५२). पण, ज्याप्रकारचे ज्ञान क्रमबद्ध भूगोलांतून संपादित होत असते ते बव्हंशी निश्चिततेच्या दृष्टिने कमी दर्जाचे असते. अशा ज्ञानाला सामान्यतः " कल, " " शक्यता " अशा संज्ञांनीच संबोधावे लागते. शिवाय, मानवी व्यक्ती व गट यांच्या स्वैर वर्तन-प्रवृत्तीमुळे आणखी काही अटींची पुस्तीही त्यांना जोडणे भाग पडते.

थोडक्यात, विकासाच्या कमाल मर्यादेपर्यंत भूगोलशास्त्र विकसित होईल तेव्हाही अगदी मर्यादित क्षमतेहून अधिक भविष्यकथन करण्याची क्षमता त्याला प्राप्त होण्याची शक्यता नाही असे भविष्य खुद्द भूगोलशास्त्राबाबत वर्तविणेच न्याय्य ठरेल (श्मिट ७, २१० ते २१३ ; कोल्बी १०७, ३५ f ; आणि फिंन्च २२३, १९).

तो प्रश्न मूलभूत स्वरूपाचा नाही, असे म्हणून, भविष्यकथन-क्षमतेचा प्रश्न निकालात काढला, तरी सार्वकालिक सत्ये, जातिसंकल्पना व तत्त्वे या सर्वांचा मागोवा घेत रहाणे, ही गोष्ट कोणत्याही शास्त्राच्या विकासाच्या दृष्टिने प्राधान्याने महत्त्वाची असते हे मानलेच पाहिजे. अशा जातिसंकल्पना विकसित करण्याची कमालीची संधी भूगोलाच्या क्रमबद्ध भूगोल या शाखेला मिळते. जगाच्या निरनिराळ्या भागांतील सरूप नमुन्यांत घटनांची व घटनांच्या अन्योन्य संबंधांची पुनरावृत्ती होत असते. म्हणूनच, त्या संबंधांचा आविष्कार सार्वकालिक सत्यांच्या रूपाने घडविणे व त्या आधारे सामान्य तत्त्वे विकसित करणे या गोष्टी शक्य होतात. भूगोलकाराची पदवी प्राप्त केलेल्या अभ्यासकांपैकी ज्यांना मानसिक कल, बौद्धिक शिक्षण आणि प्रशिक्षण या गुणांमुळे जातिसंकल्पनांचा अभ्यास करणे व त्यानुसार तत्त्व प्रतिपादन करणे व नियम रचणे हे कार्य करणे पसंत पडते, त्यांना भूगोल-क्षेत्रात केवढे तरी कार्य करता येण्यासारखे आहे. हे भूगोलाचेच अविभाज्य कार्य असून त्यातूनच प्रादेशिक भूगोलास लागणारा आवश्यक तो पाया रचला जात असतो. म्हणूनच कोणाही भूगोलकारांनी अशा अभ्यासकांना 'पलायनवादी' असे म्हणून

---

*हे विधान अतिशयोक्तीचे आहे. पुरवणी टीपा क्रमांक ५५ पहा.

इ-१५५७-३६ अ.

हिणवणे योग्य नव्हे. फेनमानने रेखाटलेले भूगोल क्षेत्राचे चित्र जे मानतात आणि प्रादेशिक भूगोल हाच भूगोलक्षेत्राचे केंद्र आहे असे समजतात त्यांनी त्या व्याख्येला फेनमाननेच जोडलेल्या पुस्तीकडे दुर्लक्ष करणे चांगले नाही. तो म्हणतो ! " अशी रचना करण्यात भूगोलक्षेत्राच्या एका भागाला दुसऱ्या भागांपेक्षा अधिक प्रतिष्ठा देण्याचा हेतू नाही, किंवा आपली शाखा सोडून त्याने दुसऱ्या शाखेकडे वळावे असे आवाहन करण्याचाही त्यामागे हेतू नाही. अर्थात, पर्यंतापेक्षा केन्द्राला काही अधिक जन्मसिद्ध मूल्य लाभलेले असते असे मानावयाची गरज नाही (२०६, १०).

क्रमबद्ध भूगोलाच्या स्वरूपाच्या आपण केलेल्या परीक्षणात भूगोल क्षेत्राच्या अटळ असलेल्या व्यापकतेवर भर दिला गेला आहे. एखाद्याने प्रादेशिक भूगोल त्यातून वगळावयाचे मनात आणले, तरी ही परिस्थिती किंचितही बदलण्याची शक्यता नाही. उलट, बहुविधतेचीच ओढ असलेल्या या अभ्यासात एकरूपता निर्माण करणारी एकमेव पद्धती गमावून बसावी लागेल. आता क्रमबद्ध भूगोलाला नैसर्गिक व अमानव घटकांची मर्यादा घालण्याचा कोणी प्रयत्न केला, तरी त्यात अंतर्भूत असलेल्या घटनांची विजातीयता सर्व क्रमबद्ध शास्त्रांच्या एकूण बेरजे-इतकी विस्तृत होणारच आहे. पण त्याबरोबरच,मानवी कारकांना फाटा दिल्यामुळे या बहुविधतेला प्रत्यक्ष प्रादेशिक अभ्यासांच्या रूपाने एकसंध करण्याची शक्यता नाहीशी होणार आहे. एकीकृत क्षेत्र मिळविण्यासाठी आणखी काट-छाट केली तरी या परिस्थितीत पडणारा फरक सापेक्षच राहणार. वनस्पती व प्राणी यांचा भूगोल या क्षेत्राच्या बाहेर ठेवण्याचा निर्णय घेतला, तरीही हवामान आणि भूरूपे यासारख्या अगदी वेगळ्या विषयांचा अभ्यास एकत्र करावाच लागतो. ही दोनही भौतिकशास्त्रे असल्याने, आणि दोघांचाही संबंध पृथ्वीशी असल्याने, भौतिकशास्त्राच्या दृष्टिकोणातून, अथवा पृथ्वीच्या दृष्टिकोणातून त्यांचा अभ्यास तर्कशुद्ध पायावर करणे शक्य होईल. पदार्थशास्त्रदृष्ट्या ही दोन क्षेत्रे परस्परांपासून दूरची व विभक्त आहेत, आणि त्यांचा संबंध पृथ्वीशी आहे, एवढ्याच एका प्रासंगिक सबबीच्या जोरावर त्यांचा संयोग तर्कशुद्ध ठरणार नाही. पृथ्वी ही त्यांना एकरूप करणारी चौकट आहे असे गृहीत धरले, तरी अगदी स्थूलमानाने विचारात घेऊनही त्यांचा भूपृष्ठापुरताच संयोग शक्य होतो ; पण तेथेही, वनस्पती, प्राणी व मानव यांच्या भूगोलातील घटकांबरोबर ते अशा संमिश्र स्थितीत आढळतात की, प्रयत्न करूनही त्यांना या घटकांपासून वेगळे काढता येत नाही. प्रदेशरूपाने आढळणाऱ्या विजातीय घटकांच्या परस्पर संबंधित प्रत्यक्ष संयोगांमुळे निर्माण होणाऱ्या भूपृष्ठातील रूपधेयांच्या अभ्यासानेच क्रमबद्ध भूगोलातील या विविधतेला एकाच शास्त्राच्या रूपाने एक संध करता येईल. या संदर्भात रिक्टोफेनने काढलेला निष्कर्ष पुढे दिला आहे. " या समस्येत अंतर्भूत असलेल्या पूर्णता व व्यापकता या कल्पनांनी बिचकून जाण्याचे कारण नाही. अभ्यास क्षेत्र विस्तृत असले, तरी त्याचे

सोयीस्कर विभाग करून ते अनेकांनी वाटून घेता येण्यासारखे आहेत. कोणी एकच भूगोलाच्या सर्व शाखांतून अनुसंधान कार्य करू शकेल अशी शक्यता राहाणार नाही इतकेच ! पण, ज्याने स्वतःला मनःपूर्वक भूगोलकार्याला वाहून घेतलेले आहे, त्याला भूगोलाच्या सर्व शाखांतून होणाऱ्या प्रगतीचा मागोवा घेता येईल इतके त्यावर प्रभुत्व मिळविणे शक्य आहे. शिवाय आपल्या मर्यादित बुद्धिसामर्थ्यावरही कोणत्यातरी एकाच भागात सफल संशोधन करण्याइतका कोणी भाग्यवान असेल, तर त्यानेही आपल्या त्या भागाचे उरलेल्या भागांशी असलेल्या संबंधांचे आकलन करून घेण्यासाठी सतत प्रयत्नशील राहिले पाहिजे ; आणि त्या संपूर्ण क्षेत्रातील अंतःसंबंध त्याने कधीच दृष्टिआड होऊ देता कामा नये." (७३, ६७ ते ७०).

ज्या कोणा भूगोलकार व्यक्तीला अनुसंधानाद्वारे भूगोलाच्या प्रगतीला हातभार लावावयाची इच्छा असेल, त्याने जे उच्च ध्येय पुढे ठेवले असेल त्या प्रमाणात त्याला पूर्व तयारी करावी लागेल. या पूर्व तयारीचा केंद्र बिंदू भूगोल क्षेत्राचा कोणतातरी एक भाग (अर्थात क्रमबंधात्मक) आणि त्याला आधारभूत असलेले एक विशिष्ट क्रमबद्ध शास्त्र हे असावेत. मात्र, तसे करताना, अन्य भागांच्या शिक्षणाकडे त्याने दुर्लक्ष होऊ देता कामा नये. भूशास्त्र हा त्याचा स्वतःचाच अभ्यासविषय असल्याने रिक्टोफ़ेनने तोच खरा "सर्वतोपरी विश्वसनीय पाया" आहे असे म्हटले व भूशास्त्रावर भर दिला, ही गोष्ट नैसर्गिक होती. दुसऱ्या कोणाही भूगोलकाराने कोणत्यातरी दुसऱ्या शास्त्राचा अशाप्रकारे प्रमुख पूरक शास्त्र म्हणून केलेली निवड तितकीच न्याय्य ठरण्यास हरकत नाही –मग ते शास्त्र वातावरणशास्त्र असो, की वनस्पतिशास्त्र असो, नाही तर अर्थशास्त्र अथवा दुसरे कोणतेतरी शास्त्र असो –असे ओबरहुम्मर व ग्राडमान हे दोघे जेव्हा प्रतिपादन करतात, तेव्हा ते रिक्टोफेनच्या सामान्य तत्त्वावरून निघणारा तर्कसिद्ध निष्कर्षच सांगत असतात (१२४, ११ ; २५१, समालोचन, ५५२).

जो कोणी भूगोलकार क्रमबद्ध भूगोलाच्या एखाद्या शाखेत विशेष प्राविण्य प्राप्त करून घेईल, आणि संगत क्रमबद्ध शास्त्रांतही समर्पकपणे सुसज्ज असेल त्याला क्रमबद्ध भूगोलाबरोबरच त्या दुसऱ्या क्षेत्रातही कामगिरी करण्याची सुसंधी प्राप्त होईल. जे भूगोलकार भूशास्त्रांतर्गत अनुसंधान कार्य करण्यास समर्थपणे सुसज्ज होते अशांच्या बाबतीत हे नेहमीच योग्य मानले गेलेले आहे. त्याचप्रमाणे, आणि त्याच अटीवर, भूगोलकार व्यक्तींनी मानववंशशास्त्र, अर्थशास्त्र किंवा राजनीतिशास्त्र या क्षेत्रांतून अनुसंधान कार्य करणे हेही न्याय्य आहे, असे मानावयास काहीच हरकत नाही. मात्र, ज्याअर्थी अन्य क्षेत्रांतील अनुसंधान कार्याबाबत निर्णय देण्याची पात्रता भूगोलकारांत असणार नाही, त्याअर्थी अशाप्रकारचे अनुसंधान कार्य भूगोल तज्ञांकडे सादर केले न जाता संबंधी क्षेत्रांतील तज्ञांकडे सादर केले जावेत हेच तर्कसंगत होईल असे दिसते.

अशाप्रकारचे दृष्टिकोणातील फेरबदल उलट दिशेनेही केले जाण्याची तितकीच शक्यता आहे, ही गोष्ट येथे स्वतंत्रपणे नमूद करण्याची गरजच राहात नाही. कोणत्यातरी क्रमबद्ध शास्त्राचा अभ्यासक, आपल्या क्षेत्राच्या भौगोलिक बाजूसंबंधी त्याला अभिरूची असल्यामुळे, भूगोलक्षेत्रातही अधून मधून भर टाकू शकेल. मात्र, अशा देवाण घेवाणीत कोणत्याही प्रकारे अतिक्रमण होत असल्याची कुरकुर उभय पक्षांकडून केली जाण्याचे कारण नाही.[१०४]

## ह – प्रादेशिक भूगोलाचे स्वरूप

गेल्या तीस वर्षांतील भूगोलाचा विकास पहात असता, प्रादेशिक भूगोलाबद्दल लक्षणीय आस्था निर्माण झालेली दिसते. त्यापूर्वी क्रमबद्ध भूगोलावरच सर्व लक्ष केंद्रित झालेले होते. कारण, त्यावेळी सर्वच शास्त्रांतून सार्वकालिक सत्ये प्रस्थापित करण्यावर भर दिला जात असे ; आणि या परिस्थितीचाच एक नैसर्गिक परिणाम म्हणून, क्रमबद्ध भूगोलावर सर्वांचेच लक्ष केंद्रित झालेले होते. पण व्हिडालच्या नेतृत्त्वाखाली फ्रान्समध्ये आणि हेटनर, पेंक, ग्राडमान, पासार्ज वगैरेसारख्या काही मंडळींच्या नेतृत्वाखाली जर्मनीत, युरोपीय भूगोलकारांचे लक्ष बेताबेताने क्रमबद्ध भूगोलाची दिशा सोडून दुसऱ्या दिशेकडे वळू लागले होते. त्याचप्रमाणे, आपल्याही देशात बॅरोज व सॉर या दोघांनी प्रसिद्ध केलेल्या दोन कार्यक्रम निर्देशन-पत्रिकांत अन्य मुद्यांवर केवढेही दुमत असले, तरी प्रादेशिक अभ्यास हाच भूगोलाचा गाभा असून, त्यावर भर देणे आवश्यक आहे, या मुद्यावर एकमतच होते (२०८ ; २११). वर्तमान अमेरिकी भूगोलातील अत्यंत प्रभावी अशी ही दोन तंत्रविषयक विधाने आहेत. या दोघांत असलेल्या समान विचारांची फायफरने नोंद घेतली हे योग्यच केले. पण, त्यांनीच अमेरिकी भूगोलातील वर्तमान विचारप्रवाहाची दिशा ठरवून दिली, असे विधान करून मात्र फायफरने अतिशयोक्ती केली (१०९, ९६ ff). कारण, खरे तर, या मंडळाच्या या पूर्वीच्या अध्यक्षीय भाषणांतील पद्धति तंत्रविषयक जाहीरनाम्यांनी जे साधलेले होते तेच या दोघांनी साधले ; म्हणजेच " अमेरिकेतील भूगोलविषयक मतप्रवाहाचे ते केवळ प्रतिबिंब आहे " (९४). प्लाटने दाखवून दिल्याप्रमाणे, विशेषेकरून लहानसर क्षेत्रांचा तपशीलवार अभ्यास करण्याकडे असणारा कल, आणि एकूण वर्तमान मतप्रवाह, यांचे

---

१०४. या परिस्थितीचा एक तर्कसंगत उपसिद्धान्त आपल्या मंडळाच्या सभासदत्वाच्या रूपाने सिद्ध होतो. त्यात अन्य क्षेत्रांतील विशेषाभ्यासकांचा पुष्कळदा भूगोलज्ञ म्हणूनच अंतर्भाव केला गेलेला दिसून येतो. याचा अर्थ दोन शास्त्रांमधील प्रत्यक्ष मर्यादा रेषेवर असे संक्रमण नित्यच होत असल्याचे ते लक्षण आहे असा नसून, भूगोल सर्वच क्रमबद्ध शास्त्रांतून छेद घेत गेलेला असल्यामुळे, एकप्रकारे, त्या सर्वांचाच अंतर्भाव भूगोलात होऊ शकतो या वस्तुस्थितीचेच ते निदर्शक आहे.

मूळ पहिल्या महायुद्धापूर्वी घेतला गेलेला भूशास्त्रविषयक क्षेत्राभ्यास वर्ग, आणि युद्धकालात झालेले लष्करी नकाशीकरणाचे प्रयोग यांच्यापर्यंत जाऊन पोहोचते.[१०५] या प्रगतीला कोणत्या शक्ती अथवा कोणत्या व्यक्ती कारणीभूत झाल्या हे निश्चित करण्याची, नव्हे अंदाज करण्याचीही, शक्यता नाही, आणि आवश्यकताही नाही. तरीही, सघन प्रादेशिक अभ्यास होत रहावे म्हणून अमेरिकी भूगोल संस्थेचा अध्यक्ष या नात्याने बोमन यांनी घेतलेल्या परिश्रमाचा जो प्रभाव पडलेला दिसतो त्याचा उल्लेख करणे आवश्यक आहे (C/O १०६). मध्यपूर्वेच्या भूगोलकारांच्या गटाचा पडलेला वैयक्तिक प्रभाव हाच कदाचित सर्वाधिक महत्त्वाचा असावा. कारण, त्यांनी, १९२३ व त्यानंतरच्या वर्षांत, भरविलेल्या वार्षिक क्षेत्र-परिषदांमुळे खूपच कार्यकर्त्यांचे लक्ष प्रादेशिक नकाशीकरणाच्या समस्येवर केंद्रित झाले [ उदाहरणार्थ : या गटाने सर्वानुमते काढलेल्या निष्कर्षांचा अहवाल व त्याला जोडलेली सभासदांची यादी पहा. तेच नकाशे जोन्स आणि फिंच यांनी १९२५ मध्ये प्रसिद्ध केले (२८१). तसेच, त्यातच ग्रथित केलेले २८२ ते २९० हे महत्त्वाचे अभ्यास लेखही पहा.]*

अमेरिकी व युरोपीय भूगोल एका विशिष्ट अर्थाने हंबोल्ट व रिटर यांच्यातील साधारण दृष्टिकोणाकडे परत फिरला आहे, असे म्हणावयास हरकत नाही (पहा : प्रकरण २-ड). पण ज्या प्रदीर्घ कालखंडात क्रमबद्ध भूगोलावर लक्ष केंद्रित करण्यात आलेले होते त्याचा एक सुपरिणामच झाला. परत येतायेता, त्याच्याच सहाय्याने, प्रादेशिक भूगोलातील निष्कर्षांचा अन्वयार्थ लावता येईल अशा जातिसंकल्पना व सामान्यतत्त्वे यांनी भूगोल सुसज्ज झाला आहे —ती सामग्री मानवी व सांस्कृतिक रूपधेये या विषयात सापेक्षतः अपुरी आहे आणि हा अपुरेपणा भूगोलविषयक साहित्याबरोबरच त्याच्या बहुतांश अभ्यासकांच्या प्रशिक्षणातही राहून गेला, हे भूगोलाचे दुर्दैव म्हणावयाचे !

ज्या पुष्कळशा भूगोलाभ्यासकांनी हा लक्षपालट मान्य केला आहे त्यानी तात्पुरती एक अटही गृहीत धरली आहे. क्रमबद्ध भूगोल जितका 'शास्त्रीय' झालेला आहे, तितकाच 'शास्त्रीय' प्रादेशिक भूगोलही केला पाहिजे; म्हणजेच, जेथे राहून प्रादेशिक भूगोलालाही शास्त्रीय तत्त्वांची रचना करणे शक्य होईल अशा उच्च पातळीवर त्याची प्रतिष्ठापना हर प्रयत्नांनी केली पाहिजे. या महत्वाकांक्षेमुळे तो किती अडचणींत आला आहे हे आपण पाहिले आहेच. म्हणूनच, प्रादेशिक भूगोलाचा त्यांच्या अंतिमस्वरूपात विचार करताना, क्रमबद्ध भूगोलात न आढळणाऱ्या पण प्रादेशिक भूगोलाच्या अभ्यासकांवर लादणे आवश्यक झालेल्या काही मर्यादा आपण येथे नीट समजून घेतल्या पाहिजेत.

---

१०५. अलीकडेच, म्हणजे १९३८ मध्ये, झालेल्या सभेत मंडळापुढे वाचल्या गेलेल्या एका प्रबंधातील हे विधान आहे. प्लाटने विशेषत्वाने एक गोष्ट दाखवून दिली : " सॉरने सादर केलेले प्रस्ताव " ज्यात ग्रथित केलेले आहेत असा पहिलाच ग्रंथ म्हणून ज्याचा उल्लेख फायफरने केला आहे, त्यात, कोणत्याच प्रस्ताव सूचकाचा उल्लेख न करता, सॉरच्या दोनही सहलेखकांनी सादर केलेले प्रस्तावही ग्रथित आहेत [त्याबरोबरच, शिकागो विद्यापीठाच्या त्या परिसंवाद गटाच्या अनुल्लिखित सभासदांचेही काही प्रस्ताव आहेत]. " भूगोलातील क्षेत्रकार्याची रूपरेषा " –लेखक डब्लू. डी. जोन्स आणि सी. ओ. सॉर ; अमेरिकी-भूगोल-संस्थेची पत्रिका क्र. ४७ (सन १९१५) पाने ५२० ते ५२५].

*पुरवणी टीप क्रमांक ५६ पहा.

प्रादेशिक अभ्यासांचे वेगळे स्वरूप शब्दांकित करण्याचे अनेक अयशस्वी प्रयत्न केल्यानंतर, गणित शास्त्रातील चिन्हांचा वापर करूनच ते चांगले स्पष्ट करून सांगणे शक्य आहे असे माझे मत झाले. अर्थात, अशा प्रकारच्या अत्यंत जटिल समस्या खऱ्याखुऱ्या गणिती सूत्रांनी, अथवा समीकरणांनी, स्पष्ट करून सांगणे शक्य होत नाही, हेही तितकेच खरे आहे!

कोणत्याही एका संपूर्ण प्रदेशात बदलत जाणारे कोणतेही विशिष्ट भौगोलिक रूपधेय 'झ' हे दोन विकारकांचे फलन, फ (क्ष, य) असे, औपपत्तिक रीतीने मांडून दाखविता येण्यासारखे आहे, अर्थातच, येथे 'क्ष' आणि 'य' हे स्थलदर्शक सहनिर्देशांकांच्या जागी आलेले आहेत. गणितीपद्धतीचे मापन करता येणे शक्य असेल असे कोणतेही रूपधेय, जमिन उतार, पर्जन्यमान, पीकउत्पन्न अशा सारख्या, कोणत्याही दोन चलांचे फलन म्हणून सादर करणे शक्य असते. तसेच, ते एक अनियमित भूपृष्ठ म्हणून मूर्त स्वरूपात अचूकपणे दाखविणे शक्य असते. मग, अशा प्रकारचे पृष्ठ त्या संपूर्ण प्रदेशापुरते त्या रूपधेयाचे खरेखुरे लक्षण सादर करील. आणि औपपत्तिक पद्धतीने ते सर्व स्थळांच्या व सर्व लहानसहान विभागांच्या संदर्भातही बरोबरच असेल. शिवाय, संबंधी फलन जर फार गुंतागुंतीचे नसेल, तर पूर्णांकपर्यंत शून्य-लब्धीच्या उपपत्तीनुसार त्या रूपधेयाचे कोणत्याही मर्यादित विभागापुरते आणि एखाद्या स्वतंत्र स्थळासाठीही, संपूर्णपणे एकत्रिकरण करण्यास हरकत राहणार नाही. एका अर्थी, क्रमबद्ध भूगोलातील आपल्या कार्याचा काही भाग मांडणीच्या या प्रकाराशी सुसंगत असतो.

याचप्रकारे, कोणत्याही एका प्रदेशाच्या मर्यादितील दोन अगर तीन भौगोलिक कारकांचे अन्योन्य संबंध असतील—उदाहरणार्थः पीक उत्पन्नाचा पर्जन्यमान आणि मृत्तिकेतील सेंद्रिय घटकांश यांच्याशी असलेला संबंध— तितके सर्व विकारक त्यात गुंतवून एका फलनकारी समीकरणाने $झ_१ = फ' (झ_२, झ_३)$ असा मांडून दाखविता येईल. यासंबंधाचे मूर्त प्रातिनिधिकरूप म्हणून एका भूपृष्ठ प्रकाराची गरज लागेलच. क्रमबद्ध भूगोलात, बहुधा, आपण कोणत्यातरी एका रूपधेयाचे कोणत्यातरी दुसऱ्या एकाच रूपधेयाशी असलेला संबंध विचारात घेत असतो. आणि म्हणूनच तो संबंध एका प्रतलात काढलेल्या वक्राच्या रूपाने सादर करता येण्यासारखा असतो. यातील प्रत्येक कारक 'झ' हा एक स्वतंत्र फलन, फ (क्ष, य) आहे, आणि ते अधिक क्लिष्ट समीकरण, $झ_१ = फ' (झ_२, झ_३)$ हेही दोन अटींची पूर्तता झाल्यासच सर्वत्र लागू होणारे आहे : पहिली अट, $झ_१$ हा कारक इतर झ-कारकांच्या प्रभावापासून मुक्त असला पाहिजे; आणि दुसरी अट, जे कारक येथे विक्रिया करणारे आहेत ते स्वतः विचाराधिन असलेल्या त्या संपूर्ण प्रदेशात अविकारी असले पाहिजेत. प्रत्यक्षात यापैकी कोणत्याच अटींची पूर्तता होत नाही. आपल्याला विचारात घेता येण्यासारखा प्रत्येक

भौगोलिक घटक इतर दोन घटकांपेक्षा अधिक घटकांच्या प्रभावाने विकृत होत असतो. शिवाय, अपरिमेय व अगदी अज्ञात, अशा मानवी घटकांकडूनही तो विकृत होत असतोच. आणि विचाराधीन क्षेत्र कितीही लहान असले, तरी तेवढ्या क्षेत्रातही विचारात घ्यावयाचे सर्वच कारक काही प्रमाणात विकारी असतातच. क्रमबद्ध भूगोलाच्या या टप्प्यावर देखील आपल्याला सत्यस्थितीत काही अंशी काटछाट करावी लागली आहे, हाच त्याचा परिणाम.

आता, प्रत्येकी अनेक घटकांच्या कार्याचे प्रातिनिधिक असे, 'उ' या नावाने ओळखले जावयाचे, घटक जटिल गृहित धरून पुढचा एक टप्पा आपण घेऊ या. यातील काही थोडेच घटक विकारी असल्यामुळे तो स्वतः, कमी जास्त प्रमाणात ठराविक नियमानुसार, विकारी असतो. मृत्तिका, जमीन उतार, तपमान व पर्जन्यमान यांच्या विशिष्ट अवस्था दिल्या असता, अयथार्थता आणि अनिश्चितता या दोन दोषांसाठी भरपूर गाळा सोडूनही, नैसर्गिक वनस्पती व वन्य पशू यांच्या विशिष्ट अवस्था आपणास गृहीत धरावयास हरकत रहाणार नाही; आणि या सर्व 'झ' घटकांची गोळाबेरीज करून येणाऱ्या घटक जटिलालाच आपण 'उ' असे नाव देऊ शकू. हे 'उ' रूपधेय अंकगणितात मांडून दाखविणे शक्य आहे अशी कल्पना केली तर, वरीलप्रमाणेच त्याच्या लक्षणामुळे एक अनियमित भूपृष्ठ तयार होईल आणि ते पृष्ठ कोणत्याही एका मर्यादित भागापुरते आपल्या लक्षणाचा निर्देश करू शकेल. पण अशाप्रकारचे कोणतेही प्रातिनिधिक रूप बऱ्याच मोठ्या प्रमाणात अविश्वसनीय ठरण्याची शक्यता आहे, हे त्या घटकजटिलांच्या स्वरूपावरूनच उघड दिसते.

तरीही प्रादेशिक भूगोलात स्थान-दर्शक सहनिर्देशकांच्या यापेक्षा फारच गुंतागुंतीच्या फलनाशी आपला संबंध येत असतो. ते फलन कोणत्याही एका घटकाचे अथवा घटक-जटिलाचे म्हणून मांडता येण्यासारखे नाही. ते विविधप्रकारच्या अंशतः स्वतंत्र 'उ' घटक-जटिलांचे आणि त्यांच्यात भर टाकणारे निमस्वतंत्र 'झ' घटकांचे फलन म्हणून मांडून दाखवता येईल. अशारितीने कोणत्याही एका स्थळाचा एकूण भूगोल 'व' पुढे दिलेल्या फलनाच्या स्वरूपात मांडणे कदाचित शक्य होईल. व=फ ($उ_1$, $उ_2$ . . . . . $उ_n$ $झ_1$, $झ_2$ . . . . . . $झ_n$). आता, 'फ' या फलन प्रकारासंबंधीची, ज्यातील प्रत्येक घटक-जटिल उ विविध प्रकारच्या झ घटकांचे फलन असतो त्यांची आणि 'झ' या निमस्वतंत्र घटकांची अचूक व संपूर्ण माहिती आपल्याला मिळू शकली, तर ते फलन इतके गुंतागुंतीचे होईल की, अगदी 'न' मापनीय बाजू असलेल्या अवकाशाच्या परिभाषेतही, ते कोणत्याच मूर्त स्वरूपात सादर केले जाण्याची आशा रहात नाही. मात्र, त्या प्रदेशातील क्ष, य, अशा फक्त प्रत्येक स्थळाचे, आपल्याला सोडविता येईल असे, फलन आपल्या हाती येईल. पण, ते क्षेत्र त्या ठिकाणांपेक्षा अगदी थोड्या अंशानी जरी मोठे असेल, तरी ते फलन त्यासाठी अचूकपणाने मांडून दाखविता येणार नाही. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर, त्या क्षेत्रात अगणित संख्येने उपस्थित असलेल्या सर्व स्थळांच्या भूगोलाचा अभ्यास एकत्रित करूनच त्या

क्षेत्राच्या भूगोलाचा अभ्यास पूर्ण करता येईल. आणि हे दुष्करकर्म अमाप असल्याने अशक्य आहे. मर्यादित क्षेत्रांच्या भूगोलाचा अभ्यास कसा करावा आणि तो सादर कसा करावा हा खरा यक्ष-प्रश्न आहे. यापैकी प्रत्येकातील एकूण जटिलकार्य इतक्या जटिलफलनांवर अवलंबून असते आणि त्यांचे आंतरसंबंध इतके गुंतागुंतीचे असतात की, एकत्रिकरणाच्या कोणत्याही उपपत्तीने त्याची उकल करता येण्यासारखे नाही. म्हणूनच प्रादेशिक भूगोलाची समस्या स्थानिक भूगोलाच्या समस्येपेक्षा वेगळी आहे.

शेवटी, ज्यातील प्रत्येक स्थानांच्या 'व' मधे काही प्रमाणात तरी, बदल होत जातो अशा एका प्रदेशातील असंख्य स्थानांचा विचार करत न बसता, त्या प्रदेशाच्या लहानसर आणि मर्यादित विभागांच्या मर्यादित संख्येचा विचार, त्या प्रत्येकातील कारक तेवढ्यापुरते अविकारी आहेत असे गृहित धरूनच करणे भाग पडते. मग तो संपूर्ण प्रदेश व्यापण्यासाठी फक्त मर्यादित संख्येच्या परिणामी 'व' चीच जरूरी राहील आणि त्यातील प्रत्येक 'व' एका एकक स्थानाच्या भूगोलाचा नव्हे तर, एका लहानशा एकक क्षेत्राच्या भूगोलाचा प्रतिनिधि होईल. यामुळे वस्तुस्थितीत काटछाट होणे अटळ आहे ही गोष्ट सतत ध्यानात बाळगली तरच ही पद्धती कायदेशीर ठरते. आणखी लहान क्षेत्रे विचारात घेऊन ही काटछाट आणखी कमी करता येईल, पण संपूर्णपणे ती कधीच लुप्त होणार नाही; कारण एकक कितीही लहान घेतले, तरी त्यातील जे कारक अविकारी आहेत असे गृहित धरलेले असते ते प्रत्यक्षात विकारी असतात, हे आपल्याला माहित असते. विवेचन करण्यापुरता अवसर मिळावा येवढे सर्वात लहान एककही, त्यात लक्षणीय बदल मुक्तपणे होत असलेले दिसून यावे, इतके मोठे असते. अर्थातच, सत्यस्थितीची तितक्या प्रमाणात लक्षणीय काटछाट अंतिम भूगोलातही होत असलेली दिसते.

नित्याच्याच संज्ञा वापरून आमचा निष्कर्ष पुढे दिल्याप्रमाणे मांडता येण्यासारखा आहे. क्षेत्र कितीही मर्यादित व लहान असले, तरी भूगोलाभ्यासकाला अन्योन्य-संबंधात असलेल्या कारकांच्या एका जटिलाला तोंड द्यावेच लागते. त्यातच, जे सर्वच ठिकाणी विकृत होत जातात व ज्यांचे हे विकार केवळ अंशतःच परस्परावलंबी असतात, अशा पुष्कळशा अर्धस्वतंत्र कारकांची भर पडत असते. अर्थातच, क्षेत्राच्या या लहानसर एककांच्या अंतर्भागात होत जाणाऱ्या विकारांकडे भूगोलाभ्यासकाला स्वेच्छेनुसार दुर्लक्ष करावे लागते. म्हणजेच प्रत्येक लहान व मर्यादित एककातील संपूर्ण परिस्थिती एकरूप आहे असे गृहीत धरल्याशिवाय, त्या सर्वांचे एकत्रिकरण करणे शक्यच होत नाही. इतके केल्यावर, प्रत्येक विशिष्ट एकक क्षेत्रातील अन्योन्य संबंधातील घटनांचे आकलन, विश्लेषण व संश्लेषण पद्धतीने, करून घेणे भूगोलाभ्यासकाला शक्य होईल, अशी अपेक्षा करावयास हरकत नाही.

सर्व एकक क्षेत्रांचे अभ्यास एकत्रित केल्याने त्या संपूर्ण प्रदेशाचे परीक्षण घडविता येईल, पण तेवढ्याने त्याच्या प्रादेशिक अभ्यासाची पूर्तता मात्र होणार नाही. केवळ, वेगवेगळ्या " बंटन भागांचे " [Chores म्हणजेच जवळजवळ सजातीय भूभागांचे] अभ्यास करून व

त्यांचे प्रकार प्रस्थापित करुनही काम भागण्यासारखे नाही. " ज्याप्रमाणे, रसायनशास्त्रात आपला अभ्यास अणूंच्या पूरताच मर्यादित न करता, वेगवेगळ्या संयोगात परस्परांच्या सान्निध्यात त्यांच्या परिस्थितींच्या रीतींचा शोध घेत रहातो, त्याचप्रमाणे अधिक मोठे एकक तयार होत असताना त्या वंटन-भागांची एकत्र जोडणी कोणत्या रीतीने करण्यात आली आहे याचा विचार भूगोलाला प्रथम करावा लागतो. नवभूगोलात भौगोलिक रूपांच्या (Gestalten) आकलनाचा हा प्रश्न क्वचितच विचारात घेतला गेलेला दिसतो ". या सूचनेवर पेंकने भर दिला आहे. यानंतर पेंकने आणखी एक सूचना केली आहे. एखाद्या आकारसंयोगाचे आकलन होण्यासाठी, ज्यामुळे तो तयार होतो त्या शिलाखंडांचा अभ्यास व वर्गीकरण करून काहीच साधणार नाही. उलट, वेगवेगळ्या तुकड्यांची मांडणी व गट योजना यांचा विचार करणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे " वंटन भागांच्या "[१०६] मांडणीच्या अभ्यासाने महत्त्वपूर्ण विविध रचनात्मक रूपे सादर करता येतील (१६३, ४३ f; फिलाडेल्फियात दिलेल्या व इंग्रजीत प्रकाशित झालेल्या व्याख्यानातून घेतलेले अंशावतरण १५९, ६४०).

प्रादेशिक भूगोलाच्या औपपत्तिक दृष्टिकोणाच्या दुसऱ्या टप्प्यात, अधिक विस्ताराच्या प्रदेशाची रचनात्मक व फलनात्मक मांडणी शोधून काढण्यासाठी, या एकक क्षेत्रांचे परस्पर संबंध जोडावयाचे असतात. जणू काही हे त्या स्वतः एककांतीलच कार्यकारी संबंध आहेत असे मानून, पण ते प्रत्यक्षात तसे नाहीत याची पूर्ण जाणीव ठेवून, एका एककातील एक कारक व दुसऱ्या एककातील दुसरा कारक यांच्यामधील कार्यकारी संबंधांबद्दल विचार करण्यास आता अवसर मिळणार आहे, कारण संबंधित सर्वच कारक, आणि त्यांची परिणामी रूपेही,

---

१०६. एककक्षेत्र या अर्थाची ही संज्ञा प्रथम झ्योत्शने वापरली (२३७). त्याच्या व्याख्येनुसार ही संकल्पना आकारमानमर्यादांतून मुक्त आहे. सर्व भौगोलिक कारकांच्या (Geo-factors) सजातीयतेच्या केवळ सापेक्ष प्रमाणाने प्रस्थापित केलेल्या कोणत्याही वंटन भागाचे लहानसर वंटन भागात विभाग पाडणे शक्य असते. या विभागणीच्या प्रक्रियेची अंतिम मर्यादा पूर्णपणे सजातीय एकक हाती लागणे हीच असते. अर्थातच, असे एकक बिंदुमात्र असणार ! पेंकने ही सूचना मान्य केली तरी तिचा अर्थ बदलून ती वापरली. या नव्या अर्थानुसार (Chores) म्हणजे भूमीची सर्वात लहान एकके होतात. आणखी लहान करताच येणार नाहीत अशा बंदिस्त कोठड्याच म्हणाना! हेच विभाग एकत्र करून तो मोठ्या आकाराचे भाग तयार करतो. स्वतः शोधकाच्या व्याख्येपेक्षा वेगळ्या अर्थाने ती संज्ञा पेंकने वापरली येवढ्याच एका कारणाने नव्हे, तर लघुत्तम भू-एकक असूच शकत नाहीत असे आम्ही मान्य केले आहे म्हणूनही, आम्हाला हा शब्दप्रयोग मान्य नाही. पेंकने स्वतःच अन्यत्र कबुली दिल्याप्रमाणे, ही विभागणीची प्रक्रिया आम्ही अशीच पुढेही अमर्यादपणे चालू ठेवू अशी शक्यता आहे ; आणि आम्ही ज्याची विभागणी करत असतो त्यांच्यापेक्षा आमचे हे नवे पोट-विभाग कमी अगर अधिक, सत्यरूप असणार नाहीत.

प्रत्येक लहानसहान एककापुरती आपणच स्वेच्छेने स्थिर केलेली आहेत. शिवाय, या पद्धतीने निर्माण होणाऱ्या प्रादेशिक रचनेला वेगवेगळ्या तुकड्यांनी रचल्या जाणाऱ्या एका आकारसंयोगाचे स्वरूप येणार आहे. यातील प्रत्येक तुकडा आपल्यापुरता आरपार सजातीय रहाणार आहे; आणि त्यातील पुष्कळसे तर इतके समरूप दिसणार आहेत, की त्यांचे विवेचन करण्याच्या कोणत्याही प्रत्यक्ष पद्धतीत, त्या प्रदेशाच्या निरनिराळ्या भागात त्यांची पुनरावृत्ती होत असल्यासारखे दिसणार आहे. म्हणून, असे करत असताना आपणच तयार केलेला हा आकार-संयोग म्हणजे सत्यस्थितीची अचूक प्रतिकृती आहे असे मानून आपण स्वतःचीच फसगत करून घेणार नाही याची काळजी घेतली पाहिजे. पुष्कळशा अर्ध-स्वतंत्र कारकांच्या अनंतप्रकारे चल असणाऱ्या फलनाचे आकलन सान्त मनाने करून घेण्याची शक्यता निर्माण व्हावी म्हणून उपयोगांत आणलेली ती एक युक्ती आहे. येथे कल्पना-शक्तीचा तीन प्रकारे वापर करण्यात आला आहे. यातील प्रत्येक लहानसे एकक क्षेत्र हे आरपार एकरूप आहे असे स्वेच्छेने मान्य करण्यात आले आहे; त्यातील एकेकाला त्याच्या शेजाऱ्यापासून काही मर्यादा घालून अलग करण्यात आले तेही स्वेच्छेने आणि पुष्कळशी समरूप एकके स्वभावतः एकरूपच आहेत असे मानले गेले, तेही स्वेच्छेनेच.

अशारीतीने, भूगोलकार सादर करत असतो ते भूपृष्ठ कमीजास्त प्रमाणात विकृत झालेले असते. तशाही स्थितीत या भूपृष्ठाची तुलना एखाद्या आकृतिसंयोगाशी करावयाची असेल तर अशाच मूलभूत स्वरूपाच्या आणखी काही अन्य मर्यादांचा येथे आग्रह धरावा लागेल. त्या दोहोंच्या तंत्रांच्या तपशीलात साम्य आहे, असे मानावयास हरकत नसली तरी, कोणत्यातरी अंतिम हेतुवादात्मक तत्त्वाचा अवलंब केल्याशिवाय, भूपृष्ठाची तुलना कोणत्यातरी कलावस्तूशी करणे शक्य होणार नाही; कारण भूपृष्ठही एकाच व्यक्तीच्या विचारांतून संघटित झालेली परिणामी वस्तू आहे, असे आपण गृहीत धरू शकत नाही. उलट, कित्येक शिल्पज्ञांनी स्वतंत्ररीतीने काम करून बांधलेल्या इमारतीचे हेटनरप्रणीत रूपक हंटींग्टनप्रणीत " पार्थिव-पटावर " चित्रित करावयाचे झाले तर, कमीजास्त प्रमाणात स्वतंत्रपणे काम करणाऱ्या आणि कामचालू असतानाच स्वेच्छेने आपला आराखडा बदलणाऱ्या कित्येक कलावंतांनी मिळून काढलेल्या विविध रंगाकृतींच्या अंतर्संबंधी संयोगातून या भूपृष्ठाची निर्मिती झाली आहे, असेही आपण म्हणू शकतो. प्रत्येक आकृतीचे मूळस्वरूप, त्याचा दुसऱ्यांशी असलेला संबंध, आणि त्यावरून त्याचा एकूण चित्राशी असलेला संबंध, समजून घेण्यासाठी, क्रमबद्ध भूगोलात या विविध सलग सौंदर्याकृती विलग करण्याचा प्रयत्न केलेला असतो, असे म्हणता येईल; निरनिराळ्या रंगांचे तक्ते केवळ एकमेकावर ठेवून छापल्याने काही एकूण चित्र तयार होत नसते, तर त्यांचे कार्यकारणात्मक संबंधही जोडलेले असावे लागतात; आणि म्हणूनच, या विभक्तीकरण प्रयोगांत प्रत्येक आकृतीचा दुसऱ्या आकृतीशी असलेल्या कारणात्मक व कार्यात्मक संबंधांच्या विश्लेषणाचाही समावेश

असतो. प्रादेशिक भूगोलात, दर्शनी भूपृष्ठावर वेगवेगळ्या निसर्ग कलावंतांनी वापरलेल्या पण परस्परात मिसळून टाकलेल्या सूक्ष्म रंगछटांचे, आकृतीसंयोगाचे तंत्राला अनुसरून स्थूल आकारांत स्वेच्छेनुसार रूपांतर केले जाते. पण मग त्या आकृतिसंयोगातील तुकड्यांचा अभ्यास केला जातो तेव्हा एखाद्या कलाकृतीत असतो तसा एखादा एकरूपाकार संघटित आकृतिबंध येथेही हाती यावा अशी अपेक्षा ठेवली जाता कामा नये. त्याबरोबरच, रंगांचा नुसताच सावळागोंधळ किंवा विकृतीपटच आपल्या हाती लागेल म्हणून निराश होण्याचीही गरज नाही. वेगवेगळ्या सौंदर्याकृतींच्या रचनेमागे काही तत्त्वे दडलेली असतात, हे क्रमबद्ध भूगोलातील अभ्यासामुळे आपल्याला कळून चुकलेलेच आहे. प्रादेशिक भूगोलातील सजातीय एकके केवळ स्वेच्छेने निश्चित केली गेली नसतील, म्हणजेच ती काळजीपूर्वक केलेली मापने व योग्य निर्णय यांच्या संयुक्त उपयोजनावर आधारलेली असतील, तर या सौंदर्य रचनांच्या संयोगांतूनही गुंतागुंतीचे असले तरी कमीजास्त प्रमाणात सुव्यवस्थित आकृतिबंध दिसू लागतील, अशी अपेक्षा करण्यास हरकत नाही. शिवाय, या आकृतिबंधांचे स्पष्टीकरण काहीही दिलेले असले तरी त्यांची रचना त्यातील प्रत्येक विभागाच्या दृष्टिने अर्थवाही असते, कारण प्रत्येक विभागातील विकासावर दुसऱ्या विभागातील विकासाचा प्रभाव पडलेला दिसतोच.

भूपृष्ठाला कोणत्याही कलाकृतीची उपमा कशी अप्रस्तुत आहे हे दाखविणारी आणखी एक महत्त्वाची बाब या शेवटच्या विचारातूनच स्पष्ट होते. प्रत्यक्ष भूपृष्ठ हे जरी गतिहीन रूपांनी भरलेली एक स्थिर वस्तू असली, तरी दर्शनी भूपृष्ठात गतिमान वस्तूंचाही समावेश होत असतो आणि अशा गतिमान वस्तू भूपृष्ठाचे विविध भाग सतत जोडत असतात. (अशा प्रकारच्या वर्णनात कलावंत वापरतात तशा "जोर रेषा", "गतिमानता", "विरोधी जोर" इत्यादी संज्ञा वापरण्याचा प्रयत्न केला तर, आधीच असलेल्या गोंधळात भरच पडते). दुसऱ्या शब्दात सांगावयाचे झाले, तर भूगोलाभ्यासकाला रूपाइतकाच कार्याचाही विचार करावा लागतो. लहानसहान एकके स्वैरपणे प्रस्थापित केली जात असताना, त्यातील प्रत्येकाचे रूपच काय पण कार्यही आरपार एकसारखे आहे असे गृहित धरले गेले, तसेच, अधिक मोठे प्रादेशिक विभाग तयार करण्यासाठी ही लहान एकके एकत्र आणत असताना, त्यांच्या रूपांबरोबरच त्या एककांच्या परस्परांशी असलेल्या कार्यकारी संबंधांचाही आपल्याला विचार करावा लागल्यामुळे, ही समस्या आणखीच गुंतागुंतीची झाली. उदाहरणार्थ : एका आकृतिसंयोगातील दोन एकाच रंगाचे तुकडे जितके सारखे दिसतात, तितकीच दोन क्षेत्रीय एकके समरूप आहेत असे एक चित्र काढले. पण, कार्यदृष्ट्या मात्र त्यांपैकी एका एका प्रदेशातील नगरकेंद्राशी तर दुसरे दुसऱ्याच प्रदेशातील नगरकेंद्राशी निगडीत असल्याचे दिसले. आता, प्रश्न असा उद्‌भवतो की, त्या दोन एककांचा समावेश एकाच प्रदेशात करावयाचा की वेगवेगळ्या प्रदेशात करावयाचा ? आणि एकाच प्रदेशात समावेश करावयाचा असेल तर त्या दोहोंपैकी कोणत्या प्रदेशात करावयाचा ? या प्रश्नांचे कोणतेही एक उत्तर कमीजास्त प्रमाणात बौद्धिकच असते. खरे म्हणजे कोणतेच उत्तर अचूक नसते !

कोणत्याही एका प्रदेशातील एकक क्षेत्रांची मांडणी समजून घेणे हे जितके आवश्यक आहे, तितकेच त्यांची मांडणी परस्परांच्या संदर्भात कशा प्रकारे झाली आहे हे समजून घेणेही आगत्याचे आहे. पेंक व ग्रान्यो [हाही याच दिशेने विचार करणारा भूगोलकार आहे (२५२, २८-३१) ]. तर ही प्रक्रिया मोठमोठ्या एककांपर्यंत चालू ठेवू इच्छितात. अर्थातच, संबंधित क्षेत्रांचा आकार ही येथे महत्त्वाची गोष्ट मानली जात नाही. म्हणजेच, क्षेत्र विभागांची गटवारी करून, मोठ्या एककांसाठी ते ज्या रितीने जोडलेले असतात त्या रीतीचा आणि मोठ्या प्रमाणांच्या क्षेत्रांत ज्या रीतीने परस्परांच्या संबंधात गुंतविलेले असतात त्या रीतीचाही अभ्यास प्रादेशिक भूगोलात करावयाचा असतो. हा क्रम यापुढेही, अंतिम एकक गाठेतोपर्यंत चालू रहावयाचा असतो. आपले अंतिम एकक, म्हणजे एकमेव खरेखुरे एकक, आपले जग हेच असते !

पण एकत्रिकरणाच्या या प्रक्रियेतील वेगवेगळ्या पातळीत एक महत्त्वाचा फरक असतो. एकक क्षेत्रांची सजातीयता गृहीत धरत असताना, लहानच पण मौलिक, असा एक काल्पनिक घटक त्यात समाविष्ट केलेला असतो. पण, जशीजशी अधिकाधिक मोठ्या क्षेत्रांच्या दिशेने वाटचाल सुरू होते तसा तो काल्पनिक घटक वाढतच जातो. परिणाम असा होतो, की हे मोठे विभाग निश्चित केले जात असताना केवळ स्वेच्छेने वस्तुस्थितीची अधिकाधिक विकृती करणे भाग पडते.

सजातीय एकक क्षेत्रांचे प्रस्थापन हा पहिला टप्पा आता पूर्ण झाला असे गृहित धरून, आपल्यास दुसऱ्या टप्प्याकडे जावयास हरकत नाही. ज्यात आपल्या मताने जवळ जवळ समरूप असलेली जास्तीत जास्त सजातीय एकके असतात, पण, असमरूप असणाऱ्या कमीत कमी एककांचाही त्यातच समावेश केलेला असतो, अशा एक सलग मर्यादित क्षेत्राला प्रदेश असे नाव दिले जाते. या सजातीय एककांची कोणती लक्षणे इतरांच्या तुलनेने अधिक महत्त्वाची मानावयाची या व्यक्तिनिष्ठ निर्णयावरच समरूपसंबंधीचा निर्णयही आधारलेला असणार. परिणामी, उत्कृष्ट निकषावर लावून पहाता, प्रदेश निश्चित करणे ही गोष्ट एका अर्थाने व्यक्तीमतानुसारच ठरणार आहे.

शिवाय, वर वर्णन केले आहे तितके सोपे उत्तर या प्रश्नाला मिळणे कठीणच आहे. काही भौगोलिक रूपधेये एका स्थळापासून दुसऱ्या स्थळापर्यंत अगदी सावकाश बदलत जातात, हे खरे असले तरी, अन्य काही रूपधेयात अनियमित व तीव्र बदल होत असतात. उदाहरणार्थ, मृत्तिका, पर्वत प्रदेशातील उतार, नागरीवसाहती आणि नद्या, रस्ते, लोहमार्ग यासारख्या सर्वच प्रामुख्याने रेषांकित रूपधेये. त्यामुळे अगदी भिन्न लक्षणांनी युक्त असलेल्या या एककांचा समावेश कोणत्यातरी एका प्रदेशात करणे भागच पडते. अर्थातच एकके अंतस्संबंध असलेली असोत की केवळ शेजारी म्हणून सलग असोत, कोणत्या प्रकारची एकके अंदाजे विचार करता त्या प्रदेशाची लाक्षणिक रूपे आहेत, हे निश्चित करणे आवश्यकच होते. ते ठरविल्यानंतर, तो प्रदेश अशारीतीने निश्चित करावा लागतो, की अशा विविध प्रकारच्या समरूप एककांची संख्या त्यात जास्तीत जास्त असावी आणि अन्य एककांची संख्या त्यात कमीत कमी असावी.

ज्यातील " सजातीय एकके " आधी मान्य करून नंतरच त्यांच्या प्रादेशिक रचनेचा प्रयत्न केला जात आहे आणि ज्यांची लक्षणे त्या एककांमधीलच काहींच्याशी असलेल्या समरूपता व संबंध यांच्या भाषेत संक्षेपाने सांगणे शक्य आहे, अशा एका मोठ्या क्षेत्राचा विचार आता चालू आहे. साहजिकच, त्याच्या काही भागापुरते तरी वर वर्णिलेले अवघड कार्य सापेक्षतः सोपे झाले असल्याचे आढळून येते, कारण, कदाचित, त्यातील बहु-बहुसंख्य एकके लक्षात भरण्याइतकी समरूप असतात. तरीही, काही बाबतीत एका बाजूकडील एककाशी समरूप, तर दुसऱ्या काही बाबतीत दुसऱ्या बाजूकडील एककांशी समरूप अशी एकके त्यात असतात हेच ज्यांचे लक्षण म्हणून सांगावे लागेल, अशा वरील दोन एककांच्या दरम्यानच्या विभागांत तेच कार्य अत्यंत कठीण होवून बसण्याचा संभव आहे. शिवाय, ज्यातील विविध, भिन्न एककांचा समावेश कोणत्या भागात करावयाचा हेच लक्षात येणार नाही, अशीही काही क्षेत्रे आढळतील. काही बाबतीत त्यांची ओळख संक्रमणपट्टे या स्वरूपात पटू शकेल, हे खरे असले तरी, त्यामुळे आपली मूलभूत समस्या सुटणार नाही, तर काही काळ पुढे ढकलली जाईल, इतकेच ! तसेच, अशा क्षेत्रांना " लक्षणशून्य क्षेत्रे " किंवा " सर्वसाधारण " अथवा " संकीर्ण " क्षेत्रे अशी नावे दिल्याने मूळ प्रश्नाशी लपंडाव खेळल्यासारखे होईल ! (प्रकरणे ९-इ पहा).

अर्थातच, कोणी एखादा अभ्यासक अशी डोकेदुखी निर्माण करणारी ही क्षेत्रे नकाशावरून पुसून टाकण्यास मोठ्या आनंदाने तयार होईल; पण तसा अधिकार त्याला कोणीच दिलेला नाही. तसेच, ज्या शास्त्राला जग कसे आहे हेच प्रयत्नपूर्वक समजून घ्यावयाचे आहे, त्या शास्त्राला आपल्या ज्ञानसंचयात सहजगत्या संघटित करता येतील तेवढ्या क्षेत्रांपुरतेच आपले कार्य मर्यादित ठेवावयाचे आणि जास्त अडचणी निर्माण करणाऱ्या क्षेत्रांकडे काणाडोळा करावयाचा, असे करण्याचा परवाना दिला जाण्याची शक्यताच नाही. ही शंकास्पद क्षेत्रे सहसा केवळ निरुंदशा संक्रमण सीमा नसतात तर ती चांगली विस्तृत क्षेत्रे असतात. क्वचित्, अगदी स्पष्ट वर्गवारी केलेल्या क्षेत्राइतकीच काय त्यांच्यापेक्षाही मोठी क्षेत्रे असतात. अशा परिस्थितीत, अधिक मोठ्या क्षेत्रांच्या किंवा जगाच्याही, एकूण चित्रात ती क्षेत्रे कमी महत्त्वाची असतीलच असे गृहीत धरण्यास कोणताही आधार रहात नाही. " पर्यंत प्रदेशापेक्षा केंद्र प्रदेशात काही खास अंगभूत मूल्ये असतात, असे मानण्याचे मुळीच कारण नाही " हे भूगोलाच्या विविध शाखांच्या संदर्भात केलेले विधान एका प्रदेशाच्या विभागांच्या संदर्भातही अगदी शब्दशः लागू पडते.

म्हणूनच, आपण ज्यांना प्रदेश असे नाव देतो तशा प्रकारच्या एखाद्या इष्ट क्षेत्राची विभागणी आपण करत असतो आणि आमच्या निर्णयानुसार सर्वात महत्त्वाची असलेली लक्षणे प्रत्येक प्रदेशापुरती तरी अगदी संक्षिप्तपणे सांगता यावी अशा रीतीने ते विभाग निश्चित केले जात असतात, तेव्हा प्रत्यक्ष मापनांऐवजी व्यक्तिगत अभिप्रायावरच आपले निर्णय आधारण्याशिवाय गत्यंतर रहात नाही. अर्थात, ज्यांच्या मर्यादा निश्चित करत असताना

व्यक्तिगत निर्णयाचा आश्रय बऱ्याच मोठ्या प्रमाणात घ्यावा लागतो, असे हे आपले प्रदेश म्हणजे जमिनीची केवळ छकले आहेत, ही गोष्ट मान्य करावीच लागते. पण, शक्य त्या सर्व वस्तुनिष्ठ मापनांचा उपयोग केला गेला असेल आणि सर्व व्यक्तिगत निर्णय अभ्यासकांच्या उत्कृष्ट अभिप्रायावरच आधारलेले असतील, तर ते प्रदेश " स्वैरपणे निवडलेले " या केवल प्रयोगाने जाणवणाऱ्या अर्थापेक्षा निश्चितच अधिक सप्रमाण आहेत असे मानणे न्याय्य ठरण्यास हरकत नाही. उलटपक्षी, " प्रदेशांच्या विशिष्ट मर्यादाबाबत भूगोलाभ्यासकांचे ठोकळमानाने तरी एकमत होईल अशी अपेक्षा करण्यास हरकत नाही " हे पूर्वीच उद्धृत केलेले वेगवेगळ्या लेखकांचे मत, वर सांगतिलेल्या क्रमवार अडचणींचा विचार करता, भलतेच आशावादी आहेसे वाटते.

प्रादेशिक विभागणीसाठी अचूक वस्तुनिष्ठ आधार प्रस्थापित करण्याच्या कामी भूगोलाला यश येण्याची शक्यता नाही, हे खरे. तरीही, शक्य तेवढ्या उत्तम निर्णयानुसार निश्चित केलेल्या विविध क्षेत्रीय विभागात सर्व प्रादेशिक ज्ञान संघटित करण्याचे दुष्करकार्य टाळण्याचा परवाना मिळाला, असा या निष्कर्षाचा अर्थ होत नाही. क्रमबद्ध भूगोलाने प्रस्थापित केलेली जाति संकल्पना आणि तत्त्वे प्रादेशिक भूगोलाच्या निष्कर्षांचा अन्वयार्थ लावण्याचे कामी उपयोगात आणता यावी म्हणून हे प्रादेशिक ज्ञान शक्यतोवर अर्थपूर्ण विभागात संघटित केलेच पाहिजे. संपूर्ण जगाची प्रदेशरूपाने विभागणी आणि पोटविभागणी करण्याची सार्वत्रिक मान्यता असलेली आणि प्रमाणित अशी एकमेव पद्धती, हीच या प्रश्नाची सर्वात सोपी उकल आहे. पण ती भूगोलाच्या विद्यमान विकासावस्थेत तरी साध्य झालेली नाही आणि भावीकाळाचीही शाश्वती नाही. म्हणूनच, प्रादेशिक भूगोलाच्या प्रत्येक अभ्यासकाने आपापला प्रादेशिक विभागणीचा क्रमबंध प्रमाणित करून घेण्याचे अवघड कार्य करण्याची जबाबदारी स्वतःच्या शिरावर घेतली आहे. नाही तर, दुसऱ्या एखाद्या सहकाऱ्याचा तसा क्रमबंध त्याला उपयोगात आणणे शक्य असले पाहिजे. येथे " प्रमाणित " या शब्द प्रयोगाने निश्चित स्वरूपाच्या विधानांत सांगितलेल्या प्रमाणांवर आधारलेला प्रादेशिक क्रमबंध येवढाच अर्थ सूचित केलेला आहे. हेतू असा की, ही सर्व रचना कोणत्या आधारांवर केली गेली आहे याचे अचूक ज्ञान अन्य अभ्यासकांना होण्यास अडचण पडणार नाही.

भौगोलिक कार्याचा प्रथम टप्पा म्हणून असो किंवा अंतिम टप्पा असो, भूगोलातील प्रादेशिक ज्ञानाची संपूर्ण संघटना करण्यासाठी एकूण जागाची विभागणी करणे आवश्यकच असते. जिचा विचार दोनही दिशेने करणे प्राप्त असते, अशी ही प्रक्रिया कोणत्याही दिशेने चालू ठेवली, तरी पूर्ण झालेल्या क्रमबंधात संपूर्ण जगाची प्रादेशिक विभागणी झालेली सापडलीच पाहिजे. म्हणजेच, आमच्याजवळ असलेले प्रत्येक लहानसहान विभागाचे ज्ञानही तर्कदृष्ट्या समुचित ठिकाणी नीट मांडता आले पाहिजे. ही अत्यंत कठीण समस्या सोडविण्याच्या दोन वेगवेगळ्या पद्धती आहेत असे आपल्याला आढळून आले. त्या त्या

क्षेत्राच्या विशिष्ट लक्षणानुसार वर्गीकरण केलेल्या क्षेत्रीय क्रमबंधातच भौगोलिक ज्ञान तर्कशुद्धरीतीने मांडून दाखविता येईल. या पद्धतीची उपयुक्तता तौलनिक अभ्यासाच्या दृष्टीने अगदी स्पष्ट असली, तरी त्यातून सर्वच प्रादेशिक ज्ञान एकाच क्रमबंधात संघटित करण्याइतका अवकाश मिळत नाही; अशा अनेक स्वतंत्र क्रमबंधांची त्यासाठी गरज असते. शिवाय मोठ्या क्षेत्रांचे विभाग या नात्याने लहान लहान क्षेत्रांचे प्रत्यक्ष अन्योन्य संबंधही त्यात सादर केलेले नसतात. विवक्षित प्रदेशांच्या क्रमबंधाचे जगाची वास्तववादी विभागणी केली तरच असे संबंध त्यात समाविष्ट केले जाण्याची शक्यता आहे; आणि मगच, सर्व प्रादेशिक ज्ञानाचा अंतर्भाव एकाच तर्कशुद्ध क्रमबंधात करण्यास हरकत राहणार नाही. दुर्दैवाने प्रत्यक्षात उपस्थित असलेल्या कोणत्याही नैसर्गिक विभागणीतून असा एखादा क्रमबंध भूगोलाभ्यासकाला प्राप्त होत नाही, किंवा सावयव रूपांच्या सहज विभागणीशी संगती साधणाऱ्या दुसऱ्या कोणत्या पद्धतीनेही तो प्राप्त होत नाही. अर्थातच, अनुसंधानकार्याचा परिपाक म्हणून भूगोलाभ्यासकानीच तो विकसित केला पाहिजे आणि त्यात आवश्यक ते बदल सतत घडवून आणले पाहिजेत. हे कार्य चालू असतानाच, प्रादेशिक अनुसंधानाचे संघटन करण्यास उपयुक्त असा तात्पुरता साचा म्हणून त्याचा नित्य उपयोग करत राहिले पाहिजे.

भौगोलिक ज्ञान प्रादेशिक एककांच्या रूपात बुद्धिचातुर्याने संघटित करता यावे म्हणून प्रादेशिक मर्यादा आखण्याच्या प्रश्नाला कोणत्यारितीने तोंड देता येईल, हे आम्ही अगदी सामान्य संज्ञा वापरून येथे सूचित केलेले आहे. मग, असाही प्रश्न उपस्थित होतो, की प्रत्यक्ष प्रादेशिक अभ्यासात कोणत्या प्रकारच्या ज्ञानाचा अंतर्भाव करणे इष्ट आहे ? उपस्थित सामग्रीच्या स्वरूपाचा विचार करता, ज्या ज्या घटनांचा समावेश क्रमबद्ध भूगोलात होऊ शकतो, त्या सर्व प्रकारच्या घटनांचा अंतर्भाव एका प्रदेशाच्या संपूर्ण भूगोलात होत असतो, हे आम्ही यापूर्वीच दाखवून दिले आहे. अर्थातच, त्या घटना त्या विशिष्ट प्रदेशात उपस्थित असल्या पाहिजेत, हे उघड आहे. जे प्रादेशिक भूगोलात समाविष्ट होत नाही आणि ज्याचा क्रमबद्ध भूगोलातही अंतर्भाव होऊ शकत नाही, असे एकमेव क्षेत्र म्हणजे "ऐतिहासिक भूगोल". प्रत्येक भूतकालीन कालखंडाचा भूगोल वेगळा असल्यामुळे, वेगवेगळ्या ऐतिहासिक भूगोलांच्या संख्येला मर्यादाच रहात नाही, कारण प्रत्येकात त्याचे स्वतःचे क्रमबद्ध प्रादेशिक विभाग असतातच.

प्रदेशात उपस्थित असलेले घटनांचे प्रकार, ज्या रीतीने त्या तेथे उपस्थित असतात ती विशिष्ट रीती, आणि प्रत्येक एकक क्षेत्रातील घटनांचे परस्परांशी, व शेजारच्या एकक विभागातील घटनांशी असलेल्या अंतःसंबंधाचे स्वरूप या सर्व गोष्टींवरूनच त्या क्षेत्राचे विशिष्ट रूप व विशिष्ट कार्य निश्चित होत असते. त्यांचे महत्त्व सहनिर्देशनिय असते ही गोष्ट सर्वच अभ्यासकांनी जरी औपपत्तिकदृष्ट्या मान्य केलेले असले, तरी अलिकडच्या दशकांतील पुष्कळशा अभ्यासकांचा कल त्यांच्याकडे दुर्लक्ष करून त्यांच्या स्वरूपावर भर

देण्याकडेच असलेला दिसतो. हा प्रकार " शुद्ध भूदृश्यवाद्यांच्या " अभ्यासांत विशेषत्वाने उठून दिसतो (प्रकरण ७-इ). उलटपक्षी, विशेषेकरून श्पेथमानसारख्या पुष्कळशा अभ्यासकांच्या कल्पनेप्रमाणे कोणतेही क्षेत्र हा " शक्तींचे कार्यक्षेत्र म्हणजेच एक गतिमान जटिल " असतो, असे ग्रान्योला आढळून आले. यावर भूगोल हा कार्य-शक्तींचा अभ्यास नाही किंवा अंतःसंबंधाचाही अभ्यास नाही, तर तो एकाच क्षेत्रात अंतःसंबंधित असलेल्या वस्तूंचा अभ्यास आहे. असे ग्रान्यो आग्रहपूर्वक प्रतिपादन करत असला तरी, त्याचा स्वतःचा कल मात्र क्षेत्रांच्या कार्याकडे थोडकेच लक्ष पुरवून भूरूपांच्या अभ्यासावरच जास्त भर देण्याकडे होता, असाच अभिप्राय त्याने सादर केलेल्या एका प्रमुख जर्मन उदाहरणावरून द्यावा लागेल (२५२, ११४ f; C/o वेबेल २६६, २०४).

आपण जेव्हा एखाद्या भूक्षेत्राच्या कार्यासंबंधी बोलत असतो, तेव्हा एक गोष्ट विसरून चालणार नाही की, ते पूर्ण क्षेत्र ही काही एक कार्यकारी वस्तू असत नाही, तर एका क्षेत्रातील काही गोष्टींचा दुसऱ्या एका क्षेत्रातील काही गोष्टींशी कार्यकारी संबंध असतात, इतकेच. लहानसर क्षेत्रीय एकके सजातीय असतात व त्यांच्यात रूपात्मक व कार्यात्मक एकरूपता असते या आपल्या कल्पितकथेत, एक एकक क्षेत्र दुसऱ्या एकक क्षेत्रांशी कार्यकारी संबंध ठेवत असते, असे अलंकारिक भाषेत वर्णन करण्याची परवानगी मिळाली होती. पण, त्या क्षेत्रांचे परस्परांशी खरोखरीचे कार्यकारी संबंध असतात असा विचार मांडण्याचा प्रयत्न करत असताना, ही मूळ संकल्पनाच काल्पनिक आहे या गोष्टीचा विसर पडू देता कामा नये.

विशेषतः, " एखाद्या क्षेत्राच्या उत्पत्तीच्या " अभ्यासाचा प्रयत्न आपण करू लागतो, तेव्हा ही लहानसर क्षेत्रीय एककांची संकल्पना पार कोसळते. जेव्हा आपण त्या क्षेत्राच्या भूगोलातील गतकालीन इतिहासाच्या टप्प्यांचा अभ्यास करू लागतो, तेव्हा आपल्याला असे आढळून येते, की या लहानसर सजातीय क्षेत्रांना जेवढे प्रामाण्य, काहीशा अपुऱ्या अवस्थेतच, आज बहाल करू शकतो, तेवढे प्रामाण्य त्यांच्यातील एकाही क्षेत्राला भूतपूर्वकालात असण्याची शक्यता नाही. याचाच अर्थ असा होतो की, क्षेत्रे कितीही लहान असली तरी, त्यांची वाढ एककाच्या स्वरूपात कधीच होत नसते; तर त्यांच्यात सामावलेल्या विविध वस्तूंमध्ये होत जाणाऱ्या कमीजास्त बदलांचा परिणाम म्हणून तीही बदलतात असा भास होतो. म्हणूनच, आजचे एकक क्षेत्र हे याच्या आधीच्या टप्प्यातही त्याच प्रकारचे एकक होते, आणि नंतरच्या टप्प्यात, कदाचित, ते तसेच एकक राहील, अशी शक्यता नाही. आकृतीसंयोगाची संकल्पनाच मुळी, क्रमवार पण बदलत्या, फरकांच्या संकल्पनेशी न जमणारी आहे. याचा परिणाम म्हणून, भूगोलातील उत्पत्तिविषयक अभ्यास क्रमबद्ध अभ्यासांच्या रूपानेच हाती घ्यावा लागतो. अर्थातच, एखाद्या क्षेत्राच्या उत्पत्तीच्या अभ्यासाचे, त्या क्षेत्रात सामावलेल्या

सर्व वस्तूंच्या उत्पत्तीच्या प्रत्येक अभ्यासांइतके, विभाग पाडावे लागतील. प्रादेशिक भूगोलाच्या अभ्यासासाठी ते किती प्रमाणात इष्ट असतील हा प्रश्न वादाचा राहिल. वास्तविक, या प्रश्नाचा विचार आपण पूर्वीच केलेला असल्यामुळे येथे त्याचा पुनर्विचार करत बसण्याची गरज नाही (प्रकरण ६-ब).

प्रादेशिक भूगोलाचा संभाव्य विकास विचारात घेत असताना, उपस्थित झालेल्या सर्वात मोठ्या प्रश्नास उत्तर देता येईल अशा अवस्थेस आपण येऊन पोहोचलो आहोत. सार्वकालिक सत्ये, प्रजातिसंकल्पना आणि शास्त्रीय विधिनियम अथवा शास्त्रीय तत्त्वे, अशा रचना करता येतील इतकी भूगोलाच्या या शाखेची प्रगती होईल, अशी आशा बाळगण्यास जागा आहे !

प्रादेशिक भूगोलात उपयोगात आणला जाणारा सामान्यीकरणाचा एक प्रकार आपण यापूर्वीच वर्णन करून सांगितलेला आहे. तीच लहान एककक्षेत्रांच्या आधारे केलेली प्रदेशांची रचना. प्रकारसंकल्पना आणि अद्वितीयांचे वर्णन यांच्यासह अशा प्रकाराच्या विजातीय व अर्धस्वतंत्र विभागांचे सामान्यीकरण हा शास्त्रीय वर्णनाचा तिसरा प्रकार म्हणून क्राईस या तत्त्वज्ञाने वेगळा दिला आहे (हे मत ग्राफचे आहे : १५६, ५७ ते ६२ व १०५). या प्रकारच्या सामान्यीकरणात सर्वसाधारण तत्त्वे प्रस्थापित करण्यासाठी लागणारे आधार मिळत नसतात, तर त्यासाठी प्रकारसंकल्पनांची येथे गरज असते, या वस्तुस्थितीतच या प्रकारच्या वेगळेपणाचे महत्त्व.

केवळ, वर्णन करता यावे म्हणून तयार केलेली ही काल्पनिक क्षेत्रीय एकके आधारासाठी घेऊन जी सार्वकालिक तत्त्वे आपण रचण्याचा प्रयत्न करू, त्याच्यात प्रत्यक्ष त्या एककांपेक्षा अधिक प्रामाण्य असण्याची शक्यताच नाही. आता, ही एकके अत्यंत लहान करून घेतली नाहीत, तर आपण जी तत्त्वे प्रस्थापित करू त्यांतील व्यक्तिगत अभिप्रायामुळे त्यातील दोषांचे प्रमाण इतके मोठे होईल की, ती अत्यंत शंकास्पद मूल्यांची तत्त्वे म्हणून गणली जातील.

या अडचणीकडे दुर्लक्ष केले, तरी ज्या प्रत्येकात परस्पर साहचर्यात असलेल्या जटिलसंयोगांचा समावेश असतो अशा या स्वैर एककांचे वर्गीकरण करून त्यांतील विविध व अर्धस्वतंत्र कारकांच्या गोळाबेरजेवर आधारलेल्या प्रकारांचा एखादा क्रमबंध रचणे शक्य होत नाही. कोणत्याही एका प्रदेशात, केवळ किरकोळ दोष मान्य करून, समरूप म्हणण्यास हरकत नाही अशी एकक क्षेत्रे आढळत असली, तरी अशाच प्रकारची समरूपता असलेली एकक क्षेत्रे जगाच्या दुसऱ्या प्रदेशांत असलेली आढळत नाहीत. ऱ्हाइन नदीच्या उगमाकडील मैदानी भागात कोठेतरी असलेला एखादा लहानसर विभाग तंतोतंत त्याच प्रदेशातील पुष्कळशा विभागांसारखा असण्याची शक्यता आहे; पण, असा विभाग कितीही लहानसर म्हणून निवडला तरी जगाच्या दुसऱ्या कोणत्याही प्रदेशातील कोणत्याही एकक क्षेत्रापेक्षा तो मूलतःच वेगळा असतो (प्रकरण ११-ड पहा).

म्हणूनच क्रोबरने इतिहासाच्या संदर्भात काढलेला निष्कर्ष भूगोलालाही मान्य करावा लागतो. " सर्वच ऐतिहासिक घटना अद्वितीय असतात [माझ्या मते याचा अर्थ :–एका विशिष्ट कालखंडात एक विशिष्ट घटनासंयोग अस्तित्वात असतो], असे गृहीत धरले जाते इतकेच नव्हे तर त्याचे समर्थन केले जाते. पण, अशा अभ्यासांतून कोणतेही नियम, अथवा नियमवजा काहीतरी, आढळत नाहीत " [११६, ५४२]. हाच निष्कर्ष कोणत्याही विशिष्ट क्षेत्रात अस्तित्त्वात असलेल्या विशिष्ट घटनासंयोगालाही लागू पडतो.

तरीही, प्रजातिसंकल्पना आणि सामान्य तत्त्वे यांचा उपयोग न करताच प्रादेशिक भूगोलाचा अभ्यास केला जातो, असे कोणी समजण्याचे कारण नाही. उलटपक्षी, प्रत्येक प्रदेशातील घटनांच्या अंतःसंबंधांचा अन्वयार्थ लावण्याचे काम क्रमबद्ध भूगोलाने विकसित केलेल्या प्रकार-संकल्पनांवर आणि तत्त्वांवरच अवलंबून असते. (C/o श्मिट. ७, १९४). दुसऱ्या शब्दात सांगावयाचे झाले तर, प्रादेशिक भूगोलात समाविष्ट असलेल्या वेगवेगळ्या बाबींसाठी आणि त्यांच्यामधील सरलतर संबंधांसाठी क्रमबद्ध अभ्यासांनी पुरविलेल्या सार्वकालिक नियमांवर आपण अवलंबून असतोच. पण, प्रत्येक क्षेत्रीय एककातील एकूण अंतःसंबंधी संयोग एक मूलतः असामान्य परिस्थिती पुढे आणत असतो, आणि अशा परिस्थितीत उपयोगी पडण्यासारखे सार्वकालिक नियम मात्र आपल्याजवळ नसतात.

येथे असा एक आक्षेप घेतला जाईल, प्रदेशांचा विचार करत असताना पुष्कळसे भूगोलाभ्यासक अभ्यासाचा असा प्रकार उपयोगात आणतात की, तो शास्त्रीय नियमांच्या रचनेस आवश्यक असा दृष्टिकोण घेऊनच कार्य करतो—यालाच " तौलनिक प्रादेशिक भूगोल ", किंवा लक्षणीय समपता असलेल्या प्रदेशांची तुलना, असे म्हणतात. अमेझॉन, कॉंगो व इन्सुलिंडिया यांची मॉलने केलेली परिणामकारक तुलना हे एक चालू उदाहरण म्हणून उद्धृत करण्यास हरकत नाही (१७९, १८४-१८६). अन्य शास्त्रांची नियमरचनांचा फुलोरा येण्यापूर्वीची, पौगंडावस्था त्या त्या क्षेत्रांतील तौलनिक अभ्यासांनीच दाखविली जाते. तेव्हा, तुलनात्मक अभ्यासांकडून शास्त्रीय नियमांकडे अशी प्रगती करत प्रादेशिक भूगोलही यौवनावस्थेतून पुढे वाढतच राहिल अशी अपेक्षा करण्यास हरकत नाही, अशीच अनेकांची धारणा आहे.

यात अंतर्भूत असलेला मूलभूत विचार भूगोलाला नवीन नाही. हेटनरच्या मते, त्याच्या आधीच्या लेखकांनी केला नाही असे मानले तरी, या विचाराचा प्रथम परिचय हंबोल्टने करून दिला, आणि ब्रेन, नेव्हिंग, आणि विशेषेकरून, रिक्टोफेन यांनी त्याचा वापरही केला (१६१, ४०३ f). पण प्लेवीला * असे आढळून आले, की ही उदाहरणे प्रासंगिक लेखनाची आहेत; आपल्या साहित्यात तौलनिक प्रादेशिक भूगोलाला भूगोलक्षेत्राची एक शाखा म्हणून स्थान दिले गेलेले नाही. (४, ४६ ते ५५, ७७). अशा प्रासंगिक तुलना सर्वच शास्त्रांतून वापरल्या

* ' तुलनांचा उपयोग ' या विषयावरील जेसनने लिहिलेला निबंध (४४०) पहा.

जात असतात, या गोष्टींकडेही त्याने लक्ष वेधलेले आहे. याचे एक उदाहरण म्हणून अध्यात्मपंडित लिट याने केलेल्या कांट व हर्डर यांच्या तुलनेचा उल्लेख केला आहे (बर्लिन, १९३१). आपल्यालाही येथे एक पुस्ती जोडावयास हरकत दिसत नाही. काही बाबतीत अर्थपूर्ण समरूपता असलेल्या दोन अगर अधिक कालखंडांतील विकासांची तुलना वारंवार करत रहाणे हे इतिहासकाराच्या दृष्टीने महत्त्वाचे असते. एकूण, प्रादेशिक भूगोलासंबंधीचे नियम, निदान नियमांसारखे काही, शोधून काढणे शक्य होईल का, याबद्दल शंका निर्माण व्हावी अशा प्रकारची ही उदाहरणे आहेत.

तौलनिक भूगोलाच्या (Länder Kunde) मर्यादांमुळेच सार्वकालिक संकल्पना विकसित करण्याच्या मार्गात अडथळे निर्माण होतात, हे पासार्जने ओळखले होते. पण, भूप्रदेशांच्या तौलनिक भूगोलात (Landeschafts Kunde) ते टाळणे अगर त्यावर मात करणे शक्य आहे असा विश्वासही त्याने व्यक्त केला आहे (१९३६ मध्ये; २७२, ६१). यासाठी तो एक तृतीय मार्गी तुलना (Tertium Comparations) सुचवितो; आणि आपल्या अमूर्तप्रकारांच्या क्रमबंधाने ती सिद्ध होऊ शकते असा दिलासाही देतो. संबंधी क्षेत्रांचा आकार कमी करून त्याने काही थोड्या अडचणी अंशतः दूर केल्या, आणि उरलेल्या बाबतीत, ज्यांना सत्यक्षेत्रांचा संक्षिप्त आराखडा असेही म्हणता येणार नाही असे, काही प्रकार तयार करून त्याने अडचणींना सरळ बगल दिली, ही गोष्ट आपण आपल्या यापूर्वीच्या एका चर्चेत पाहिलेलीच आहे. (प्रकरण १०-इ पहा). शिवाय, सत्य भूमी आणि सत्य भूप्रदेश यांच्यातील फरक काय तो आकाराचाच असल्यामुळे, ही तिसऱ्या प्रकारची तुलना दोन्ही बाबतीत अशक्यच असते. क्षेत्रांची तुलना अशाप्रकारे अखंड चालू राहिली तरी प्रादेशिक नियमावलीचा शोध लागण्याची आशा यत्किंचितही निर्माण होणार नाही.

म्हणूनच, प्रदेशांचा तौलनिक अभ्यास हा नियमरचनात्मक प्रादेशिक भूगोलाच्या पूर्वतयारीचा टप्पाही ठरत नाही, किंवा भूगोलाची स्वतंत्र शाखाही होऊ शकत नाही. रिटरने एका शतकापूर्वी करून दिलेला या संकल्पनेचा परिचय हे एका अगदी वेगळ्या प्रकारच्या शास्त्रातून घेतलेल्या कल्पनेचे स्थलांतर केल्याचे द्योतक होते. त्याने त्या संकल्पनेची स्पष्टशी व्याख्या कधीच केली नाही; आणि इतरांनी तिचा उपयोग पुष्कळ वेगवेगळ्या प्रकारांनी केला. पण, महत्त्वाच्या विकासाचा कोणताच मार्ग त्यातून सापडला नाही (८, ८२ f).

तरीही, एक पूरक उपाय म्हणून या पद्धतीचा उपयोग काही वेगळेच फायदे देऊन जातो. एकमेकापासून पुष्कळच दूर असलेले प्रदेश जर पुष्कळशा बाबतीत समरूप असतील, आणि त्याचा परिणाम म्हणून काही घटकांच्या अथवा घटक जटिलांच्या संदर्भात एकाच प्रकारचे प्रदेश म्हणून त्यांचे वर्गीकरण करणे शक्य होत असेल, तर त्यांच्यातील साम्यांच्या, आणि विशेषेकरून भेदांच्या तुलनेला वेगळेच महत्त्व येईल. प्रत्येक जटिलातील घटनांच्या संबंधाचा जो अर्थ आपण लावत असतो तो पडताळून पाहण्यास हीच तुलना उपयोगी पडेल.

ज्यात एकाच प्रकारच्या घटकजटिलांची संख्या मोठी असते, अशा प्रमुख प्रदेशातील स्थानिकपरिसरांची तुलना करण्यासाठी या पद्धतीचा वापर याहूनही अधिक उपयुक्त ठरेल. जास्तीत जास्त रूपधेयांच्याबाबतीत एकसारख्या असणाऱ्या स्थानिक परिसरांची निवड केली, आणि यांपैकी पुष्कळशा रूपधेयांच्या बाबतीत त्यांच्याशी समान असणाऱ्या, पण सर्वच बाबतीत समान नसणाऱ्या, दुसऱ्या काही स्थानिक परिसरांशी त्यांची तुलना केली, तर त्या एकूण प्रदेशाच्या दृष्टीने काही विशिष्ट रूपधेयांच्या महत्त्वांची किल्ली आपल्या हाती लागण्याची शक्यता आहे.

आता एक सर्वश्रुत उदाहरण घेऊ : एकूण कापूस पट्ट्यातील प्रमुख लक्षणांचा विचार करू लागलो, की त्या प्रदेशातील कापूस पिकाचे महत्त्व केवळ हवामानविषयक परिस्थितीच्या परिभाषेत स्पष्ट करून सांगितल्याने भागेल असे मान्य करण्याकडेच कल निर्माण होण्याची शक्यता आहे. पण, हवामानविषयक परिस्थिती तीच असूनही, जेथे कापूस हे कमी महत्त्वाचे पीक आहे अशा प्रदेशांची तुलना जेथे कापूस हे सर्वाधिक महत्त्वाचे पीक आहे अशा प्रदेशांबरोबर, या दोहोंतील विरोधांचा शोध घेण्यासाठी केली, तेव्हा एकूण दक्षिण विभागातील कापसाचे पीक तिकडील मृत्तिकालक्षणांचा विचार न करता समजून येण्यासारखे नाही, ही गोष्ट यापूर्वीच आपण शिकलो आहो.

त्याचप्रमाणे, उत्तर विभाग आणि दक्षिण विभाग यांच्यामधील विरोधांच्या विचारात अत्याधिक महत्त्वाचे—म्हणजेच दक्षिणेकडील नीग्रोलोकवस्तीच्या उच्चप्रमाणाचे—जे एक रूपधेय आहे, त्याचे स्पष्टीकरण काही केवळ उत्तरेकडील हवामानविषयक परिस्थितींच्या परीक्षणाने मिळणार नाही, ही गोष्ट निदान अमेरिकी भूगोलकारांच्या यापूर्वीच लक्षात आलेली आहे. पण, सामान्य लोक विचारात, आणि काही युरोपीय भूगोलकारांच्या विचारांतही ती नीटशी मुरलेली नाही. स्थानिक परिसरांच्या या तुलनात्मक पद्धतीने या घटकाचे—आणि त्याच्या साहचर्याने असलेल्या सर्वच सांस्कृतिक घटकांचे—स्पष्टीकरण देणे, कापसाला आवश्यक असलेल्या हवामान व मृत्तिका परिस्थितींच्या संयोगाचा एकत्रित विचार केल्याशिवाय, शक्य होणार नाही. पण हाही निष्कर्ष अपुरा आहे. कारण, आज सर्वाधिक महत्त्वाचा समजला जाणारा कापूसप्रदेश जो मध्य टेक्सास, त्यातच नीग्रोलोकवस्तीचे प्रमाण बरेच कमी आहे. म्हणून, गुलामगिरीचा कालखंड संपुष्टात येण्यापूर्वीच—ज्यात कापसाबरोबर तंबाखूचाही समावेश होत असे अशा—लागवडीच्या पिकांसाठी विकसित केलेल्या स्थलपरिसरांची तुलना त्याकाळानंतर त्याच पिकांसाठी जोपासलेल्या स्थलपरिसरांशी केल्यावरच एकूण परिस्थितीचे संपूर्ण स्पष्टीकरण देणे शक्य होईल (३५९).

एकाच प्रदेशातील स्थानिक परिसरांच्या तुलना करण्याच्या या पद्धतीतून प्रजातिसंकल्पनांचा मार्ग सापडतो आहे असा भास होण्याची शक्यता आहे. पण, प्रत्यक्षात मात्र, संबंधित असलेल्या तेवढ्या एकाच मोठ्या प्रदेशाला लागू पडणारे निष्कर्ष हाती लागणार आहेत. कापूस पट्ट्याच्या या विभागात यांगत्से खोऱ्यातील एक विभाग आणि मुंबई प्रांतातील एक विभाग मिळवावयाचे म्हटले, तर कोणत्याही एका प्रदेश विभागासंबंधीच्या प्रजातीसंकल्पनेत त्या सर्वांचा समावेश होऊ शकणार नाही. कापूस पट्ट्यातील विभागांपुरतीच

मर्यादित तुलना करत असता, आपण वेगळ्या प्रकारच्या एककांची तुलना करत असत नाही, तर एकाच मोठ्या प्रदेशाच्या एकरूप विभागांची तुलना करत असतो. त्यांची एकरूपताही ते सर्व एकाच प्रदेशाचे विभाग आहेत या वस्तुस्थितीचा परिणाम असतो, हे या आधीच्या एका संदर्भात आम्ही दाखवून दिलेले आहे. आपण लावलेल्या अन्वयार्थाचा पडताळा घेण्याची ही युक्ती कितीही नामी असली तरी त्या युक्तीने सार्वकालिक संकल्पना व तत्त्वे आपल्या हाती लागण्याची शक्यता नाही.

म्हणून, आमचा निष्कर्ष असा, की पृथ्वीपृष्ठाच्या विभागानुसार केलेले पृथ्वीचे वर्णन म्हणजेच प्रादेशिक भूगोल होय ; आणि हाच त्याच्या शीर्षकाने स्पष्ट होणारा शब्दशः अर्थ आहे. कालखंडातील इतिहास या रूढ अर्थाने इतिहास ज्याप्रमाणे एक वर्णनात्मक शास्त्र आहे, त्याचप्रमाणे प्रादेशिक भूगोल हेही एक मूलतः वर्णनात्मक शास्त्र आहे. त्याचा संबंध असामान्य घटनांचे वर्णन करण्याशी असतो, अर्थातच त्यातून कोणतेच शास्त्रीय नियम उत्क्रांत होण्याची शक्यता नसते, आणि त्याच्या या दोषामुळेच त्यातील निष्कर्षांचा अन्वयार्थ लावणे फार अवघड होऊन बसते, यातही शंका नाही. वेगवेगळ्या घटनांचे स्पष्टीकरण देता येईल असे सामान्य नियम विकसित करण्याचे सामर्थ्य ज्या क्षेत्रात आहे त्या क्षेत्रात असे कार्यकरणे तुलनेने सोपे असते. तरीपण, प्रादेशिक भूगोलापुढे शास्त्रीय ध्येयच नाही, असा याचा अर्थ होत नाही. शास्त्रीय नियम रचणे हे शास्त्राचे प्रयोजन नव्हे, ही गोष्ट यापूर्वी आम्ही दाखवून दिले आहे. वस्तुस्थितीचे सम्यक आकलन करून घेणे हे त्याचे खरे प्रयोजन असून शास्त्रीय नियम हे ध्येयसिद्धीचे एक साधन आहे. ज्यांना ' भूवर्णन ' (Erdbeschreibung किंवा Geographia) हे त्या शास्त्राचे नाव अर्धशिक्षित व अशास्त्रीय आहे असे वाटते " त्यांना हायड्रिशने चोख उत्तर दिले आहे. वर्णन हेच शास्त्राचे अंतिम व उच्चतम ध्येय आहे ; अर्थातच हे वर्णन त्या वस्तूच्या पृष्ठापुरतेच म्हणजे वरवरचे असून चालत नाही, तर त्या वस्तूच्या लक्षणांवरून विश्लेषण पद्धतीने संपादित केलेल्या ज्ञानाचे संश्लेषण पद्धतीने आकलन करून घेण्याकडे त्याचा रोख असला पाहिजे (१५३, २१३)". अर्थशोधनात्मक वर्णनात कमालीचा अचूकपणा आणि निश्चितपणा यावा म्हणून जेथे व जेव्हा शक्य असेल तेथे व तेव्हा सामान्य तत्त्वे मांडली जावीत, इतकेच. विशिष्टप्रकारच्या घटनांचा अभ्यास क्रमबद्ध शास्त्रांनी, व त्याबरोबरच त्या घटनांच्या भूपृष्ठीय अन्योन्य संबंधांचा अभ्यास करणाऱ्या क्रमबद्ध भूगोलानेही, विकसित केलेल्या समुचित प्रजाति-संकल्पना व सामान्य तत्त्वे यांचा उपयोग प्रादेशिक भूगोल करून घेतच असतो.

प्रादेशिक भूगोलाच्या स्वरूपाबाबत आपण ज्या निष्कर्षाला येऊन पोहोचलो आहोत, त्यामुळे अलीकडच्याच काही वर्षांत अनेक अभ्यासकांनी उपस्थित केलेल्या दोन प्रश्नांची उत्तरे देणे शक्य होणार आहे. गेल्याच वर्षी प्रकाशित झालेल्या ब्रोक व फायफर यांच्या दोन टीका-लेखांत प्रादेशिक अभ्यासांच्या संदर्भात अमेरिकी भूगोलकारांमध्ये प्रचलित असलेल्या विचारप्रवाहांची चर्चा करण्यात आलेली आहे (१०८, १०९). बॅरोजने, आणि विशेषेकरून

सॉरने, लिहिलेल्या पद्धतितंत्रविषयक निबंधांमुळे प्रादेशिक अभ्यासांवर उत्साहभराने लक्ष केंद्रित करण्याचा एक कालखंड सुरू झाला होता. पण, नंतरच्या काळात, प्रादेशिक भूगोलाकडून इतक्या सर्व अपेक्षा पूर्ण केल्या जाणार आहेत का, अशी मूलभूत शंका अमेरिकी भूगोलकारांना येऊ लागली आहे. वर उध्दृत केलेल्या सर्वेक्षणावरून व त्यांनी संदर्भासाठी घेतलेल्या टीकालेखनावरून तरी वाचकाचा तसा समज होण्यास हरकत दिसत नाही. अटलांटिक महासागराच्या एका तटापासून दुसऱ्या तटापर्यंत उमटणाऱ्या ध्वनि-प्रतिध्वनीत प्रमाणांची अतिशयोक्ति करण्यात आली असण्याचा संभव आहेच. पण, एकाच विद्यापीठाच्या एका विभागात झालेली बंडखोरी अमेरिकेत व जर्मनीतही असलेल्या त्या विभागाच्या आजी आणि माजी सभासदांमध्येच घुमत राहिली, आणि तेवढीच या सर्वेक्षणात आपल्यापुढे सादर करण्यात आली, अशीही एक शक्यता आहे.१०७ अन्य अमेरिकी भूगोलाभ्यासकांनीही, तोंडी चर्चेत तरी, प्रादेशिक अभ्यासांतून अपेक्षित निर्णयांच्या संदर्भात अविश्वासाचाच सूर काढलेला ऐकू येतो, यात मुळीच संशय नाही.

---

१०७. अशा प्रकारच्या क्षेत्रकार्याचे " चक्षुर्वैसत्यं " ज्ञान नसणाऱ्या, आणि गेल्या पंधरावर्षे या कार्यासाठी प्रयोग करणाऱ्यांमध्ये चालू असलेल्या चर्चेत प्रत्यक्ष भाग न घेणाऱ्या, लेखकांनी करून घेतलेल्या तंत्रविषयक व हेतुविषयक गैरसमजांचा उल्लेख प्लाटच्या एका क्रांतिक टीकाग्रंथात अशा अभ्यासांच्या संदर्भातच आला आहे (२२४, १२५). अमेरिकी भूगोलाभ्यासकांचा गट आणि जर्मन भूगोलाभ्यासक यांनी अशाप्रकारच्या पद्धतीतंत्रविषयक चर्चांतून घेतलेल्या भूमिकेत एक महत्त्वाचा फरक असतो, याची आठवण वरील अडचणीचे स्पष्टीकरण मिळण्यासाठी सतत ठेवणे आवश्यक आहे. प्रकाशनासाठी लिहिलेल्या अनुसंधानात्मक अभ्यासग्रंथात ग्रथित करण्याच्या पात्रतेचे हे प्रश्न आहेत असे अमरिकी भूगोलाभ्यासक मानत नाहीत, तर दुसरे याच्या अगदी विरुद्ध मताचे आहेत. उलटपक्षी, विशेषकरून सभागृहाच्या बाहेर चालणाऱ्या तोंडी चर्चेत, आणि कमीजास्त अनौपचारिक चक्री-चर्चेत वेगवेगळ्या व्यक्तींनी या प्रश्नावरील आपले वैयक्तिक मत म्हणून मांडण्यास हरकत नाही. मतभेदाचे असले प्रश्न तितक्याच महत्त्वाचे असतात असेच बहुधा मानले जाते. त्या त्या संस्थांच्या अध्यक्षांनी केलेल्या " प्रगल्भ " घोषणांतूनच अशा मतप्रदर्शनांना औपचारिक प्रतिपादनाचा दर्जा प्राप्त होतो, आणि तोही त्यांचा प्रभाव पडू लागल्यावर बऱ्याच काळाने देण्यात आलेला असतो. ही गोष्ट येथे लक्षात घेणे महत्त्वाचे आहे. जर्मन भूमिकेने प्रभावित झालेल्या अभ्यासकांनीच या नियमाला काही थोडे अपवाद निर्माण केले आहेत, आणि तेही बहुधा एकाच संस्थेतून बाहेर पडलेले असल्यामुळे, पद्धतितंत्रविषयक प्रचलित विचार प्रवाहांचा विकास म्हणजे कालिफोर्निया विद्यापीठातील अशा विचार प्रवाहांचा विकास होय, असे कोणाही परदेशस्थ अभ्यासकास वाटावयास हरकत नाही. (उदाहरणार्थ : डिकिन्सन २०२). ब्रोक व फायफर या दोघांनीही ही मर्यादा निसटण्याचा प्रयत्न केला, पण, त्यांच्या मार्गात दुसरीच एक वस्तुस्थिती आडवी आली. अन्य अमेरिकी अभ्यासकांची पद्धतितंत्रविषयक मते प्रसिद्ध होतात, ती त्यांनी केलेल्या विधानखंडांच्या प्रतिवृत्तांच्या स्वरूपात, अथवा त्यांच्या प्रत्यक्ष अनुसंधानात्मक प्रबंधांत समाविष्ट असलेल्या स्पष्टीकरण खंडांच्या रूपांत आढळतात. ज्यावरून अमेरिकी भूगोलकारांच्या पद्धतीतंत्रविषयक मतांच्या विकासाचा प्रत्यक्ष मागोवा घेता येईल अशाप्रकारचे, आणि जर्मनीतील तत्सम साहित्याशी ज्याची तुलना करता येईल असे, कोणतेच साहित्य उपलब्ध नव्हते. अर्थातच, प्रत्यक्ष विकास प्रवाहापासून दूर रहाणाऱ्या कोणालाही हे दुष्कर कार्य करणे फारच कठीण आहे. दुर्दैवाने, आमच्या पासिफिक तटावरील गटाचाच त्यात मोठ्या प्रमाणात समावेश होतो. कदाचित अशा काही थोड्या पद्धतीतंत्रविषयक फुटकळ प्रबंधांपेक्षा, कोल्बीने केला आहे तशा प्रकारच्या, अमेरिकी भूगोलाच्या सर्वसाधारण विकासाचा सांगोपांग अभ्यासाचाच अधिक विश्वसनीय संदर्भ म्हणून उपयोग होण्यासारखा आहे (१०७).

प्रादेशिक अभ्यास करून भूगोलाला प्रगतीपथावर नेण्याचा आटोकाट प्रयत्न केल्यावरच, जणूकाही, आपण हे लिहित अगर बोलत आहोत असा आव हे संशयग्रस्त लेखक आणतात. पण, त्यांनी केलेल्या एकूण ग्रंथांची बेरीज केली तरीही त्यातून महत्त्वाचे सामान्य निष्कर्ष निघू शकत नाहीत असा शोध आम्हाला अनेक बाबतीत लागला. हा मुद्दा फार गंभीर अर्थाने मांडला गेला आहे यावर कोणाचा विश्वासही बसणार नाही. अमेरिकी भूगोलाने प्रादेशिक अभ्यासावर आपले प्रयत्न केंद्रित केले या गोष्टीला पुरी वीस वर्षेही झाली नाहीत, आणि हे काम पूर्णत्वाने करणे तर त्याला कधीच जमले नाही. तेवढ्या काळात सुमारे वीस एक अनुसंधानकार अभ्यासकांनी प्रत्येकी एक-दोन अगर तीन प्रादेशिक अभ्यास पूर्ण केले होते; आणि तेही पीस नदीच्या खोऱ्यापासून साओपावलो पर्यंत व युरोपपासून चीन पर्यंत विखुरलेले होते. त्यातही, प्रादेशिक संकल्पनेची उपपत्ती सांगणाऱ्या दोन प्रमुख अमेरिकी प्रवर्तकांपैकी एकानेही परिपूर्ण अशा (वर्तमान) प्रादेशिक अभ्यासाचे एकही प्रत्यक्ष उदाहरण सादर केलेले नसल्याने, प्रत्येक वेगळ्या अनुसंधानकार अभ्यासकाला आपापल्या पद्धतीने कमीजास्त प्रमाणात स्वतंत्रपणे मर्यादित करावा लागला, त्यातील विचारणीय घटना निश्चित कराव्या लागल्या आणि आपले निर्णय सादर करण्याची पद्धतीही त्यांनाच ठरवावी लागली. अशा स्थितीत, आपल्या प्रादेशिक अभ्यासांवरून सर्वसामान्य नियम विकसित करण्याच्या शक्याशक्यतेची न्याय्य कसोटी आपण घेतलेली आहे, असा गंभीर विचार कोणीतरी मनात आणू शकेल का ? अगदी सगळे अभ्यास जरी प्रमाणित प्रक्रियांनी पूर्ण करण्यात आले असते, तरी संख्येने ते इतके कमी आहेत, आणि निम्म्याहून अधिक जगावर असे विखुरलेले आहेत, की अशा अभ्यासांचे संकलन त्यावरून सामान्य निष्कर्ष काढण्यास अथवा सामान्यीकरणासाठी लागणारे पायाभूत विचार पुरविण्यास पुरेसे आहे, अशी अपेक्षा करणे फोल ठरले असते.

अशाप्रकारे, कितीही प्रदेशांचा अभ्यास केला आणि तो कोणत्याही पद्धतीने केला, तरी व्यर्थ आहे, कारण त्यातून शास्त्रीय नियम निर्माण होणारच नाहीत, अशी शंका अन्य काही कारणांनी पुष्कळशा अभ्यासकांना येऊ लागलेली आहे, ही शक्यताच अधिक आहे. हाच निष्कर्ष आमच्याही नजरेला आला, व तो औपपत्तिक रीतीनेही प्रत्यक्षप्रमाणे दाखवून पुरेपूर पटवून देता येण्यासारखा आहे. याचाच अर्थ असा, की ज्यांनी प्रादेशिक अभ्यास करताना तो आपला अंतिम हेतू म्हणून मान्य केला ते मृगजळामागे धावत होते या मताशी आम्ही सहमत आहो. तो हेतू जितक्या लौकर सोडून दिला जाईल तितके ते सर्व संबंधितांच्या हिताचे होणार आहे.

जर, खरोखरीच, जगाच्या भिन्नभिन्न क्षेत्रांची भिन्नभिन्न प्रमाणात होणाऱ्या विकासाच्या परिभाषेत जगाचे ज्ञान संपादन करणे हाच भूगोलाचा अंतिम हेतू असेल, तर जगाचे क्षेत्रीय

विभाग म्हणून प्रदेशांचा अभ्यास करण्याचे कार्य अवघड असले तरी, खुद्द भूगोलानेच त्याच्या प्रयोजनाबद्दल संशय घेऊन कसे चालेल ! सापेक्षतः अल्पसंख्य अभ्यासकांनी आपल्या क्षेत्रात वीस वर्षांहूनही कमी काळ कार्य केले, पण विद्वानांनी उत्साहभरात त्यांच्यापुढे ठेवलेल्या अपेक्षांप्रमाणे यश पदरात पडले नाही, म्हणून कोणत्याच शास्त्रीय क्षेत्रातील कार्यकर्त्यांनी निराश होऊन जाण्याचे कारण नाही. भूगोलाचा अभ्यासविषय जे जग ते मोठे असले तरी मर्यादित आहे; आणि भूगोल भविष्यकाळात दीर्घकाळपर्यंत जगणार आहे ! अर्थातच, अमेरिकी भूगोलाभ्यासकांचे संघटीत प्रयत्न अधिक उत्पादन-क्षम ठरतील यात तिळमात्र शंका नाही. पण त्यासाठी त्यांनी त्या शाखेच्या सर्वच अभ्यासकांचे, निदान बहुतांश अभ्यासकांचे, लक्ष जगाच्या काही मर्यादित भागांवरच केंद्रित केले पाहिजे—फ्रेंच भूगोलाभ्यासकांनी आपल्या स्वतःच्याच देशावर लक्ष केंद्रित केले आहे तसे, पण ज्यांना अन्य पुष्कळ कारणांमुळे नेमलेल्या प्रदेशापासून दूरदूरच्या क्षेत्रांकडे पहाण्याचा मोह होतो त्यांच्यावर, इष्ट असले तरीही, नियंत्रण घालणे सोयीचे नाही. एकूण अभ्यासकांची संख्या वाढत जावी, आणि काही विशिष्ट गटांनी तरी आपल्या देशातील सापेक्षतः मर्यादित क्षेत्राच्या प्रदेशांवर शक्यतो अधिकाधिक लक्ष केंद्रित करावे–उदाहरणार्थ विसकान्सिन येथे चालते त्याप्रकारे–अशी सदिच्छा करत राहण्यापलीकडे आपण तरी काय करणार ! पण, त्या त्या प्रदेशाबद्दल जे काही स्पष्टपणे लिहिले गेले असेल तेवढ्याचेच मंथन करून निष्कर्षांचे लोणी काढून घ्यावे आणि तो प्रदेश तसाच सोडून दुसऱ्यांकडे लक्ष वळवावे. " असल्या परिपाठांतून मात्र दूरवर पोहोचणाऱ्या शास्त्रीय मूल्यांचे निष्कर्ष हाती येतील अशी अपेक्षा करणे चुकीचे आहे " असा विशेष शेरा फिंचने याच संदर्भात मारलेला आहे. (२२३,२६). या प्रकारच्या अभ्यासांचे अध्यापनमूल्य लक्षात घेता त्याच्यावर खर्ची पडलेला काळ व प्रयत्न पुरेसा आहे असे समर्थन करण्यास हरकत नाही– त्यातही संबंधी प्रदेश वर्गात शिकवण्याच्या दृष्टीने महत्त्वाचे असलेच पाहिजेत. प्रादेशिक भूगोलातील अनुसंधान कार्यात चिरकालिक प्रगती व्हावयास पाहिजे असेल, तर संबंधी व्यक्तींनी सर्व लक्ष केंद्रित करून कितीतरी अधिक काळ या कार्यासाठी खर्च करणे आवश्यक आहे.–मग, एकेक प्रदेश हेच एकेका अभ्यासकाचे जीवनकार्य व्हावयास हरकत नाही, या फींचच्या मताशी तो सहमत असो वा नसो !

उलटपक्षी, प्रादेशिक भूगोलाच्या दृष्टीने, किती आकारमानाचे क्षेत्र हे अनुसंधान कार्याला पात्र आहे असे समजावे, हा प्रश्न या विचारांच्या संदर्भात उपस्थित केला जावा, हे अटळ आहे. व्हिडालच्या नेतृत्वाखाली फ्रान्समध्ये नियोजित केलेल्या अभ्यास-मालेत प्रथम प्रथम एका प्रांताच्या विस्ताराएवढ्या क्षेत्राचे परीक्षण करत असत. पण पुढे, क्रमाक्रमाने अधिकाधिक लहान क्षेत्रांची निवड करण्यात येऊ लागली. डेमान्गॉनच्या मते ॲलेक्सच्या परीक्षण-ग्रंथाने " सूक्ष्मदर्शी " अभ्यासांची परिसीमा गाठलेली आहे. त्याने ' ल-ओयसन ' या डॉफिन आल्पस्‌मधील एका arrondissment पेक्षाही लहान भागाचा अभ्यास केलेला

आहे. या परीक्षणासाठी त्याने ९१५ पानांचा ग्रंथ लिहिला असून, ८६१ संदर्भ ग्रंथांची सूची त्याला जोडलेली आहे (३२९). डेमान्जॉनच्या हिशोबाने त्यांची सरासरी एक चौरस किलोमीटरास, अथवा प्रत्येक बारा रहिवाशांमागे एक पानाहून अधिक पडते. आता, या तुलनेने अमेरिकी भूगोलकारांनी आपल्या ग्रंथांना " सूक्ष्मदर्शी " म्हणविणे समर्थनीय ठरेल का ?

येथे उपस्थित केलेल्या या प्रश्नाला तसे सोपे उत्तर सापडण्यासारखे नाही. कमी सखोल पण दीर्घतर कालखंड मालिकांच्या अभ्यासांना अगदी लघुतर कालखंडांच्या बारीक तपशील देणाऱ्या अभ्यासांची पुस्ती जोडता आली, तर ते कार्य इतिहासकारांना स्वागतार्ह वाटते. अशा दोनही क्षेत्रांतील कसोटी–म्हणजे अशा अभ्यासांचे महत्त्व–एकच असते. पण अशा कसोटीला वस्तुनिष्ठ मापनाची सोय नाही. या आधीच* आम्ही दोन महत्त्वाच्या गोष्टींचा विचार सुचविलेला आहे : एक, त्या क्षेत्राचे स्वयंसिद्ध महत्त्व[१०८] आणि दुसरे, एका मोठ्या क्षेत्राचे अथवा पुष्कळशा लहानसर, पण सरूप, क्षेत्रांचे प्रातिनिधिक स्वरूप या नात्याने या क्षेत्राचे संभाव्य महत्त्व.

आपल्या स्वतःच्या प्रांताच्या भूगोलाबद्दल खुद्दल-ऑयसानच्या रहिवाशांना वाटणारी अभिरूची बाजूला ठेवली, तर या इवल्याशा किरकोळ महत्त्वाच्या प्रांताचा इतका व्यापक अभ्यास करण्याची बाहेरच्या ज्ञानजगताला काहीच गरज नाही, असे गृहीत धरण्यास कोणतीच हरकत दिसत नाही. पण, फ्रेंच आलप्समधील दऱ्यांची आपल्याला थोडीफार माहिती असेल, आणि सर्वेक्षण परिक्रमा करत असताना, अशासारख्या शेकडो प्रांतांचा हा विशिष्ट प्रांत हे बऱ्याच मोठ्या प्रमाणात एक प्रातिनिधिक स्वरूप आहे असे नजरेला आले असेल, तर अशा प्रकारचा अभ्यास हा त्या संपूर्ण क्षेत्राच्या प्रादेशिक भूगोलाचे–निदान त्याच्या बऱ्याच मोठ्या भागाचे–एक विहंगम दर्शन घडवू शकेल. अशा प्रकारच्या अभ्यासात प्रातिनिधिक असतील तेवढीच लक्षणे स्पष्ट करण्याची आकांक्षा ठेवावी, अशी

---

* ' या आधीच ' म्हणजे २८८ व पुढील पानांवर.

१०८. प्रत्यक्ष जगातील सापेक्ष महत्त्वाच्या भाषेत कोणत्याही क्षेत्राच्या स्वयंसिद्ध महत्त्वाचा विचार आम्ही या पूर्वीच्या चर्चेत केलेलाच आहे. पण, एखाद्या क्षेत्रात रूपधेयांचे विशिष्ट साहचर्य असेल, आणि एखाद्या अनुत्तरित प्रश्नाचा त्यात समावेश होत असेल, तर त्या क्षेत्राला भूगोलशास्त्राच्या दृष्टीने एक आगळे महत्त्व प्राप्त होण्याचा संभव आहे, ही गोष्ट फींचने आमच्या लक्षात आणून दिलेलीच आहे (२२३, २३). या कसोटीची भर या संदर्भात टाकण्याची विशेष गरज वाटते. अप्पर सायलेशिया सारख्या एका सुदूर आणि अगदी लहानशा प्रदेशात, आणि जवळपासच्या कोणत्याच क्षेत्राचे प्रतिनिधित्व करू न शकण्याचा एका प्रदेशात, एका अमेरिकी भूगोलकाराचे मन गुंतून रहाते, या घटनेचे एवढेच एक समर्थन देता येण्यासारखे आहे (३५५ ; ३५६).

मर्यादा आपोआपच पडेल, हे गृहीत आहे. त्यामुळे, कोणीही असा प्रश्न विचारू शकेल, की एवढ्या कार्याला हजारभर पानांची गरज आहे का ? अशाच प्रकारच्या प्रांतांच्या अभ्यासांतून ब्लान्शार्ड व अन्य अभ्यासकांनी काढलेल्या निष्कर्षांची सदरच्या अभ्यासात केवळ पुनरावृत्ती होत असल्यामुळे या अभ्यासाचा पुष्कळच भाग बेजरूर आहे, असे डेमान्जॉनला आढळून आले. त्याच्या आधीच्या अभ्यासकांनी काढलेल्या निष्कर्षांचा पाठपुरावा जेवढ्या प्रमाणात आपण स्वतः करणार तेवढ्या भागातील वस्तुस्थिती तरी त्याने अधिक संक्षिप्तपणे सादर करण्यात काहीच हरकत नव्हती. या विरुद्ध, ब्लान्शार्ड सारख्याच दुसऱ्या एका समर्थ टीकाकाराने१०९ असे मत दिले आहे, की फ्रेंच आल्पस्च्या प्रातिनिधिक म्हणून गणल्या गेलेल्या समस्यांच्या कितीतरी अधिक सांगोपांग विवेचनाची भर, इतर कोणत्याही पूर्वाभ्यासकांपेक्षा अधिक प्रमाणात, ॲलेक्सने टाकलेली आहे.

विशेषेकरून अशाप्रकारच्या सूक्ष्मदर्शी भूगोलवर्णनपर–ही संज्ञा प्लाटने सुचविलेली आहे.–अभ्यासांवरच अमेरिकी प्रादेशिक भूगोलाबाबतच्या टीकेचा रोख असतो. अशाप्रकारच्या लहानलहान क्षेत्रांच्या एकूण बेरजेने एकूण जगाचे भूक्षेत्र कोणत्यातरी तर्कमान्य कालमर्यादेत व्यापून भूगोलाभ्यास पूर्ण करणे शक्य होईल ही गोष्ट व्यवहार बुद्धीला पटणारी नाही.—आणि ते शक्य झाले तरी ते सर्वच्यासर्व पचावयास अवघड होईल–परिणामी, स्वैरपणे निवडलेल्या विकीर्ण विभागाभ्यासांचा एक संकीर्ण संग्रह तेवढा आपल्या हाती राहील, अशी भीती टीकाकाराना वाटते (C/o लायली, २२०). अशाप्रकारच्या सूक्ष्म व विकीर्ण अभ्यासांतून कोणती सामान्य तत्त्वे हाती लागतील अशी आम्ही अपेक्षा करावी ? असा एक सवाल **विशेषेकरून** टीकाकारांनी विचारलेला **आहे. कारण " अभ्यास जितका जितका स्थलनिविष्ट होत जाईल तितके** तितके त्यावरील निष्कर्ष निरर्थक वाटू लागतील " (२८६, ८४).[११०]

---

१०९. जे. इयोत्श यांनी वैयक्तिक पत्रव्यवहारात दिलेले मत.

११०. " ' सूक्ष्मदर्शी ' पद्धतीमुळे काही प्रगती झालेली आहे का ? अशी शंका जेम्सने **प्रदर्शित** केली आहे " असा फाफरने जो निष्कर्ष काढला त्याचे मूळ या विधानावरून कदाचित हाती लागण्याची शक्यता आहे (१०९, ११५ ff). **पण,** हा निष्कर्ष जेम्सच्याच काही विधानांवरून स्पष्ट होणाऱ्या त्याच्या सर्वसाधारण मताशी सुसंगत नाही. उदाहरणार्थ : (१) " भूक्षेत्रवर्णनपर (मध्यमक्षेत्रदर्शी) किंवा भूगोल वर्णनपर (स्थूलक्षेत्रदर्शी) नकाशांवर अशा तपशीलांचे अधिक अचूक सामान्यीकरण करण्यास मदत करणारी साधने या दृष्टीने अशा लहानलहान क्षेत्रांच्या तपशीलवार अभ्यासांचे महत्त्व मोठे असते. " हे त्यानेच केलेले विधान, किंवा (२) " ' भूरूपवर्णनपर ' (सूक्ष्मक्षेत्रदर्शी) अभ्यास हे ' भूक्षेत्रवर्णनपर ' (मध्यमक्षेत्रदर्शी) किंवा भूगोलवर्णनपर (स्थूलक्षेत्रदर्शी) चिकित्सक परीक्षणांचे अगदी सत्त्वस्थ भाग असतात. " (२८६ ८५) हाही त्याचाच निष्कर्ष.

विशेषेकरून प्लाटने आपल्या दोन प्रकाशित निबंधांतून, आणि आमच्या मंडळापुढे वाचल्या गेलेल्या अप्रकाशित विधानांतूनही, या हल्ल्यांना सणसणीत उत्तर दिले आहे. " सहजी घडलेल्या प्रवासांत झालेल्या व्यक्तिगत मतांच्या, आणि कोणत्याच सामग्रीचा उपयोग न करता रचलेल्या पर्यावरणनिष्ठ उपपत्तींच्या डळमळीत आधारावर घरबसल्या लिहिलेल्या सदोष ग्रंथांविरुद्ध वेळेवारीच उघडलेली सयुक्तिक आघाडी " म्हणूनच ' सूक्ष्मदर्शी ' भूगोलाचा विकास झाला आहे, असेही मत त्याने आपल्या एका विधानात प्रदर्शित केलेले आहे. हे हेतू सिद्ध करण्यासाठी भूगोलाभ्यासकांनी प्रत्यक्ष क्षेत्राभ्यासाची कास धरावयाचा संकल्प केला. तसा प्रत्यक्ष क्षेत्रात पाय टाकणारा प्रत्येक भूगोलाभ्यासक सूक्ष्मदर्शीच असतो. कारण, तेथे गेल्यावर " एका विस्तृत प्रदेशाचे आकलन करण्याच्या प्रयत्नात असताना एकावेळी फक्त एक लहान प्रदेशच त्याला पहावयास मिळत असतो, आणि त्यामुळेच, भूगोलकारांच्या शृंगापत्तीला तोंड देण्याची पाळी त्याच्यावर येते. मग, तो सूक्ष्म प्रदेशांच्या तपशीलवार अभ्यासांत उडीच घेत नाही, कारण तसे केले नाही तरच भूगोलक्षेत्रात काही भर घालता येणार आहे, अशी अन्य अभ्यासकांच्या पद्धतितंत्रविषयक निष्कर्षांवरून त्याची धारणा होते, असे प्लाट आवर्जून सांगतो. उलटपक्षी, सर्वसामान्य प्राथमिक सर्वेक्षणांतून होणारा अभ्यास आणि तपशीलवार क्रमबद्ध अभ्यास यानी मोठे क्षेत्र व्यापता येते, हे खरे असले, तरी विस्तृत क्षेत्रांच्या संदर्भात सामान्य तत्त्वे प्रस्थापित करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या अंतःसंबंधित रूपधेयांच्या पायाभूत जटिलांचे एकत्र परीक्षण फक्त सूक्ष्मक्षेत्रातच तपशीलवार करणे शक्य असते, १११ असा तर्कशुद्ध निष्कर्ष त्याच अभ्यासकांनी मोठ्या विस्ताराच्या क्षेत्रांचे आकलन करण्याच्या प्रयत्नांतून काढलेला आहे.

---

१११. उदाहरणासाठी प्लाट पुढील दाखले देतो. फिंचने मॉटफोर्टचा अतिसूक्ष्म अभ्यास केला (२८-अ) एवढेच नाही, तर संपूर्ण जगाचे कृषिउद्योग व्यापणारे क्रमबद्ध अभ्यासही त्याने केले (बेकरसह ३४३). त्यातच ट्रेवार्थाच्या सहकार्याने अलीकडेच लिहिलेल्या पाठ्यपुस्तकात समाविष्ट केलेले पुष्कळसे मूलतः अनुसंधानात्मक अभ्यास यांचीही त्यात भर टाकता येण्यासारखी आहे (३९२). व्हिटल्सेने विस्कान्सिन मधल्या एका लहानशा प्रांताचे पर्यवेक्षण केले [" एका कृषिप्रधान प्रदेशाच्या भूगोलासाठी तयार केलेले क्षेत्रप्रधान नकाशे. " अमेरिकी भूगोलकारांच्या मंडळाचे अहवाल, १५ (१९२५), १८७ ते १९१]. इतकेच नव्हे तर त्याबरोबर जगाचे प्रमुख शेतीप्रधान प्रदेश प्रस्थापित करण्याचाही प्रयत्न त्याने केला आहे (३१९). शिवाय, अशाप्रकारच्या विस्तृत प्रमाणावर केलेल्या जागतिक सर्वेक्षणांतून काढलेल्या निष्कर्षांचा अन्वयार्थ लावताना व्हिटल्सेला एक प्रमुख अडचण आली. मेक्सिकी पठारी प्रदेशाचा अभ्यास (३४०) डिकेनने करून ठेवलेला आहे, अथवा प्लाटने स्पॅनिश अमेरिकेच्या कित्येक प्रांतांचे अभ्यास सादर केलेले आहेत. तशा प्रकारच्या प्रातिनिधिक, पण लहानसर, प्रांतांच्या केलेल्या तपशीलवार अभ्यासांची उणीव, ही एक मोठीच अडचण आहे, हे त्याच्या लक्षात आले, ही गोष्ट येथे नमूद करण्यासारखी आहे. शेवटी, अगदी अलीकडच्या एका अभ्यासात, सूक्ष्मदर्शी भूगोलाच्या कार्याचा परिक्रमात्मक स्थूलदर्शी कार्याशी असलेला संबंध प्लाटने दाखवून दिला आहे (२३४).

पण, प्लाटने केलेले हे सूक्ष्मदर्शी-भूगोलाचे समर्थन तसे औपत्तिक चर्चेवर थोडकेच आधारलेले आहे. त्यापेक्षाही, हिस्पानी अमेरिकेत काही वर्षे तो स्वतःच करत असलेल्या प्रत्यक्ष कार्यावर ते अधिक आधारलेले आहे. अमेरिकी भूगोलाच्या संदर्भात सूक्ष्मदर्शी भूगोलाच्या प्रादेशिक अभ्यासांची एक महत्त्वाची मालिका त्यांतूनच निर्माण झालेली आहे (या अभ्यासांची यादी २२१, १३ येथे सापडते. या यादीत आता २२४ ची भर पडलेली आहे). अमेरिकी भूगोलातील अशा प्रकारच्या अभ्यासमालिकांच्या संदर्भात केल्या गेलेल्या संशयखोर आक्षेपापैकी पुष्कळसे त्यांच्या हेतूंशीच असंबद्ध आहेत. माझ्या मते, रिओडी ग्रांडेच्या दक्षिणेला असलेल्या भूमीच्या संघटीत आणि वस्तुनिष्ठ व विश्वसनीय ज्ञानात भर घालणे एवढाच त्यांचा साधा हेतू आहे. जगाच्या निरनिराळ्या विभागांच्या अशा ज्ञानाची इष्टता आणि त्यासाठी केलेल्या प्रशिक्षित कार्यकर्त्यांच्या अनुसंधान कार्याची गरज, हेच मुळी भूगोल शास्त्राच्या स्वतंत्र अस्तित्वाचे पायाभूत समर्थन आहे, असे येथे आवर्जून सांगावेसे वाटते. जो कोणी जगाच्या त्या विभागाच्या अगदी प्राथमिक अभ्यासक्रमासाठी सामग्री गोळा करत असेल, त्याला हिस्पानी अमेरिकेचे आमचे वर्तमान ज्ञान समर्पक नाही हे उघडच दिसू लागते. म्हणूनच, अशा अभ्यासांतून काही ' शास्त्रीय तत्त्वे ' निर्माण होणार आहेत काय किंवा फायफर अपेक्षा करतो तशा (१०९) मोठमोठ्या संबंधयोगांच्या संदर्भात काही निष्कर्ष काढण्यासाठी त्यांची मदत होणार आहे काय, अशा प्रकारचे प्रश्न विचारून अशा विखुरलेल्या प्रांतांच्या तपशीलवार अभ्यासमालिकांचे मूल्यमापन करावयाचे नसते. संपूर्ण भूगोलच अशा प्रकारच्या " सूक्ष्मदर्शी " अभ्यासांनी किंवा सर्वसामान्यपणे प्रादेशिक अभ्यासांनी व्यापलेला असावा, असा दावा प्लाट जोपर्यंत करत नाही, तोपर्यंत तरी असे प्रश्न असंबद्धच ठरणार आहेत. पण, दक्षिण अमेरिकी भूगोलात अधिक समर्पक ज्ञानाची भर घालण्याची आवश्यकता आहे असे मान्य केले, तरी तशा प्रकारचे ज्ञान निर्माण करण्याची त्याची ही पद्धती सयुक्तिक आहे का, एवढा एकच प्रश्न येथे सुसंबद्ध ठरणार आहे.

दक्षिण अमेरिकेची आता उपलब्ध असलेली सर्वसामान्य सर्वेक्षणे भूगोलदृष्ट्या अनुचित आहेत, या विधानावर फारसा आक्षेप घेतला जाणार नाही. ब्रिटिश गिआनातील किनारपट्टीतील बागाईतीच्या प्लाटने अगदी अलीकडेच केलेल्या अभ्यासात, त्या खंडाचे उपलब्ध असलेले उत्तम सामान्यीकृत नकाशे त्याने अभ्यासिलेल्या विशिष्ट मृत्तिका, वनस्पती, आणि लोकसंख्येची घनता याविषयी काही चुकीच्या कल्पना देत असतात, असे नमूद करून ठेवलेले आहे. पण, मृत्तिका, पिके, मानववंश आणि व्यापार एतद्विषयक अगदी अचूक आणि पुरेशी माहिती त्यातून मिळाली असे गृहीत धरले, तरीही या सर्वांची गोळाबेरीज करून त्या खंडाच्या विविध विभागांचा भूगोल तयार होणार आहे का ? अगदी प्रांत हेच प्रमाण मानून त्या मर्यादेत अभ्यास करावयाचा म्हटले, तरी त्या प्रांताच्या सांस्कृतिक भूगोलाच्या

पायाचे, म्हणजेच त्यातील सांस्कृतिक घटकजटिलांसंबंधीचे तपशीलवार ज्ञान, अभावानेच असल्यामुळे अमेरिकी विद्यार्थी गोंधळून जातो. संयुक्त संस्थानांतील किंवा युरोपीय प्रदेशांच्या बाबतचे तशा प्रकारचे ज्ञान त्याला अगदी अबोधरीतीने मिळालेले असण्याचा संभव असतो ; ते कधी त्याने केलेल्या क्षेत्राभ्यासांतून निर्माण झालेले असते, तर कधी त्याच्या सामान्यज्ञानातून ते आलेले असते. या मूलभूत रूपधेयांचा अभ्यास प्रथम सापेक्षतः लहानसर भागांनीच करणे भाग असते. आणि सांस्कृतिक एकात्मतेचा अभाव असलेल्या जगाच्या क्षेत्रांत तर त्याची विशेषत्वाने जरूरी असते. म्हणूनच, पनामातील कोणाविशिष्ट गौळवाडी कुरणाचे पूर्ण आकलन अभ्यासकाने घेतलेले असेल, आणि एका मोठ्या विस्तृत प्रदेशात अशासारखीच रूपधेये विखुरलेली आहेत असे गृहीत धरण्याची अनुमती त्याला त्याच्या अभ्यासांतून मिळालेली असेल, तर त्या मोठ्या विस्तृत प्रदेशाच्या भूगोलाचे अधिक सत्यचित्र त्याच्या हाती येईल ; आणि कोणत्याही लहान प्रमाणावरील चित्रसंग्रहापेक्षा ते अधिक सरस असेल (प्लाट, पहा २२१).

अर्थातच, अभ्यासासाठी निवडलेला प्रांत हा अन्य प्रांताचे प्रातिनिधिक स्वरूप असतो असे येथे गृहीत धरणे आवश्यक आहे.* फिंच म्हणतो त्याप्रमाणे तो प्रकारदर्शक नमुना होण्याची शक्यता कमीच असते (२२३, २४). पण, जर तो प्रांत प्रातिनिधिक असेल, तर निदान काही मर्यादीत बाबतीपुरता तरी तो एक नमुना होईल, असे मानण्यास हरकत नाही. आणि महत्त्वाची गोष्ट अशी, की तो कोणत्या बाबतीपुरता ढोबळमानांचा नमुना आहे, हे आपल्याला माहीत असते. शिरगणती, व हवामानाचे तपशील आणि भूशास्त्रविषयक, भूरूपविषयक व मृत्तिकाविषयक सर्वेक्षणे अशा साधनांनी जे प्रांत समर्पकपणे व्यापले असतात, त्या प्रांतापुरती तरी अशा तपशीलांच्या अभ्यासाने वरील प्रश्नांची अंदाजे उत्तरे देणे शक्य होण्यास हरकत दिसत नाही. याच संदर्भात, घटकगुणोत्तरदर्शक व घटकमहत्त्वदर्शक नकाशे उपयुक्त असतात असे आम्ही मागे सुचविले आहे. पण अन्य प्रदेशांच्या बाबतीत, प्राथमिक सर्वेक्षणात आलेल्या अंदाजावरच अभ्यासकाला अवलंबून रहावे लागणार आहे. अशा-प्रकारच्या अंदाजांवरून दिलेल्या उत्तरांची शास्त्रशुद्ध निश्चित उत्तरांपासून फारकत झालेली असण्याची शक्यता आहे. तरीही काहीच उत्तरे जवळ नाहीत अशा अवस्थेपेक्षा ही अवस्था अधिक बरी. म्हणूनच, भविष्यातील अभ्यासाधारे त्याच लेखकाकडून अथवा अन्य अभ्यासकांकडून काही उत्तरे चुकीची आहेत असा निर्णय दिला जाण्याचा धोका लक्षात घेऊनही, तशी उत्तरे पुरविली जाणे आवश्यक आहे.

कदाचित, त्याच्या अगदी अलीकडच्या एका अभ्यासात, लहानसर प्रांताच्या अशा तपशीलवार अभ्यासांचा आणि मोठमोठ्या प्रदेशांच्या प्राथमिक सर्वेक्षणांचा अन्योन्यसंबंध कसा घालता येईल याचे एक सुस्पष्ट प्रात्यक्षिकच प्लाटने करून दाखविले आहे. ज्या लहान प्रांताचा त्याने सूक्ष्मदर्शी भूगोलपद्धतीने अगदी तपशीलवार अभ्यास केला तो " एका विस्तृत प्रदेश प्रकाराचा नमुना " नव्हता. तरी तो एका सलग बागाईती प्रांताचे एक सर्वसाधारण

* पुरवणी टीप क्रमांक ५७ पहा.

रूपधेय होता, आणि त्याच्यापुरता विचार करता, दक्षिण अमेरिकेच्या गुंतागुंतीच्या भौगोलिक आकृतिबंधात त्यालाही संवादी स्थान आहे असे दाखविण्यात आले आहे (२२४, १३६f). आता वरकरणी अगदी स्वैरपणे निवडलेल्या लहानसर आणि एकमेकांपासून दूर असलेल्या प्रांतांचे आधीच केलेले अभ्यास, विस्तृत क्षेत्रांच्या प्रादेशिक ज्ञानाच्या दृष्टीने कसे महत्त्वाचे ठरतात, हे त्याच्या, " हिस्पॅनिक अमेरिकेच्या प्राथमिक सर्वेक्षणात केलेले अभ्यास " या नावाच्या त्याच्या अंतिम प्रकाशनात, स्पष्ट होणार आहे; कारण या एककांचे हे तपशीलवार अभ्यास त्या विस्तृत क्षेत्रांचे एकसंध भाग बनवायचे आहेत.*

थोडक्यात सांगावयाचे झाले तर, स्वतःचे असे खास महत्त्व नसलेल्या लहानसर क्षेत्राचा अभ्यास सादर करणाऱ्या अभ्यासकाने, ते स्वतःपुरते एक क्षेत्र म्हणून सादर करणे हा त्या अभ्यासाचा हेतू नसतो, तर एका विस्तृत प्रदेशाच्या प्रातिनिधिक रूपाचे एक अचूक चित्र सादर करणे हा त्याचा खरा हेतू असतो, ही गोष्ट सतत मनात वागविली पाहिजे ; कारण इतक्या सघन पद्धतीने अभ्यास करणे अशक्य व्हावे इतका तो प्रदेश विस्तृत असतो. जोपर्यंत असा व्यापक हेतू नजरेपुढे ठेवून अभ्यासकाचे कार्य चालते तोपर्यंत, अभ्यासासाठी केवढ्या किमान आकाराचे क्षेत्र निवडले पाहिजे याचे माप ठरवून देण्याचा अधिकार हाती घेण्यास आपल्याला तरी कोणती सबब आहे !

## आयु–भूगोलातील एकीकृत द्वैत.**

भूगोलाच्या ऐतिहासिक उत्क्रान्तीच्या अभ्यासाने आणि त्याच्या शास्त्रसम्मेलनांतील स्थानासंबंधी केलेल्या तर्कनिष्ठ विवेचनाने जो एकच एक प्रश्न उपस्थित होतो, तोच प्रश्न आपल्या या भूगोलाच्या स्वरूपाच्या परीक्षणाने अंतिम प्रश्न म्हणून उपस्थित केला आहे. आधुनिक भूगोलाच्या संपूर्ण इतिहास कालात–म्हणजे निदान, बुशरने हा प्रश्न १८२७ मध्ये उपस्थित केला तेव्हापासून–त्याच एका प्रश्नाने कलहाचे मोहोळ उठविले आहे. समाविष्ट घटनांच्या भेदाभेदात्मक स्वरूपानुसार जगाच्या क्षेत्रांचा अभ्यास भूगोल करत असतो. भूगोलातील हा अभ्यास क्रमबद्ध दृष्टिकोणाला धरून प्रत्येक घटनाप्रकाराचा, किंवा प्रादेशिक दृष्टिकोणातून त्यातील सर्व विजातीय घटनांच्या परिभाषेत प्रत्येक प्रदेशाचा, अशा दोन प्रकारांनी होत असतो. आता प्रश्न असा उपस्थित होतो, की एकाच एकीकृत क्षेत्रात या दोन दृष्टिकोणांचा मेळ कसा घालावयाचा ?

आधुनिक भूगोलाने अगदी प्रारंभापासून या दोनही गोष्टींचा समावेश मान्य केला आहे. आणि व्हेरेनियसच्या आराखड्याने तर या गोष्टीला औपत्तिक अधिष्ठानही दिले

* १९४२ मध्ये प्रकाशित झालेला ग्रंथ : लॅटीन अमेरिका –ग्रामीण भाग आणि संयुक्त प्रदेश.

** पुरवणी टीप क्रमांक ४९ पहा.

आहे. तरीही एका अंगापेक्षा दुसऱ्या अंगावर भार देण्याचा प्रकार भूगोलाला सहन करावा लागला. रिटरच्या प्रभावामुळे हंबोल्टच्या लिखाणात दोनही दृष्टिकोणांचा संयोग झालेला दिसला, तरी त्यात क्रमबद्ध अभ्यासांना गौणस्थान दिले जात असे, आणि साहजिकच क्रमबद्ध अभ्यासांकडे दुर्लक्ष होऊ लागले. त्याचवेळी बुशर व फ्रोबेल यांनी यावर घेतलेले आक्षेप व्यर्थ गेले, तरी, पिशेलच्या अनुकरणाने व भूशास्त्रासारख्या क्षेत्रांतून विकसित झालेल्या शास्त्रीय प्रमाणांनी मिळालेल्या प्रोत्साहनामुळे, पुढील पिढीतील अभ्यासकांच्या अभिरूचीला असा काही झोका मिळाला की त्याने थेट दुसरे टोक गाठले. इ. स. १९१९ इतक्या उशीरा हेटनरच्या लक्षात येऊन चुकले, की जर्मनीत प्रादेशिक भूगोलापेक्षा क्रमबद्ध भूगोलाला तो " कोणी श्रेष्ठ व वेगळा " आहे असे मानले जाते. म्हणूनच सुमारे पाव शतकभर जो युक्तिवाद स्वतः सादर करत आला होता, त्याचाच त्याने आताही पुनरूच्चार केला आणि या क्षेत्राचे दोनही विभाग शास्त्रीयदृष्ट्या एकाच दर्जाचे आहेत असे प्रतिपादन केले (१४२, २२f) पण, एक दशक पूर्ण होते न होते तोच, त्याला स्वतःलाच त्याच निष्कर्षाचा आग्रह धरण्यासाठी पुन्हा तोच युक्तिवाद, पण विरुद्ध दिशेने, मांडावा लागला. कारण, " तरुणांना नेहमीच अतिशयोक्तीची ओढ असल्यामुळे, आता ते क्रमबद्ध भूगोलापासून भलतेच दूर निघाले होते " (१६१, ४०१) (संबंधितांपैकी काही त्याच्यापेक्षा फारसे लहान नव्हते, हे हेटनरला माहीतच नव्हते असे समजणे चुकीचे होईल). व्हिडालच्या नेतृत्वाखाली या आधीच फ्रान्समध्ये जी प्रतिक्रिया सुरू झाली होती, तिनेच युद्धोत्तरकालात जर्मन भूगोलाला भारून टाकले, आणि सर्व भौगोलिक कार्याचे प्रादेशिक भूगोल हेच खरे साध्य आहे यावर अधिकाधिक भर दिला जाऊ लागला. अशारीतीने, प्रादेशिक प्रकारशास्त्र (Länderkundiche Typologie) तयार होणे शक्य आहे असा विश्वास निर्माण झाल्यामुळे, यापुढे " सामान्य भूगोल " ही कालमान्य संज्ञा सर्व भूगोलाचे ध्येय समजल्या गेलेल्या प्रादेशिक प्रकारांच्या अभ्यासांना लागू करावी आणि अर्थातच क्रमबद्ध भूगोलाला (Allgemeine Erdkunde) एक आवश्यक प्राथमिक अभ्यासाचे अंग (Propaedeutic) या नात्याने गौण स्थान द्यावे, असा प्रस्ताव ओप्ल्टने मांडला (१७८, ६ ते ९). काहीसे अशाच अर्थाचे विचार पुढील विद्वानांनीही प्रदर्शित केले आहेत. ब्रौन (१५५, ५), व्होल्त्स (१५१, २४७), यूली (१७०, ४८६) आणि ग्राडमान (१६६, १३९२ उद्धृत).

त्याचप्रमाणे, आपल्या देशातही बॅरोजने प्रदेशांच्या अभ्यासांवर आणि सॉरने विशेषेकरून भूदृश्यांच्या अभ्यासांवर भर दिला. त्यामुळे, क्रमबद्ध अभ्यास फक्त शैक्षणिक उपयोजनासाठी आवश्यक असले, तरी भौगोलिक अनुसंधानासाठी ते तसे अनावश्यकच आहेत असा काहींचा समज झाला.

उलटपक्षी, हेटनर व पेंक यांच्यासारख्या ज्ञानवृद्धांनी भूगोलात या दोनही दृष्टीकोणांचे महत्त्व समानच असते, हे आग्रहपूर्वक सांगताना कधी मागेपुढे केले नाही. (हेटनरने पद्धतितंत्रांचा उहापोह करणाऱ्या प्रत्येक प्रबंधात निदान इतके विधान केलेच आहे ; पेंकसाठी पहा १२९, ६३९ ; १३७, १७३-७६ ; १६३, ४४). एकाबाजूकडून दुसऱ्या बाजूकडे लागोपाठ पालटत जाणाऱ्या या भाराचा अनुभव भूगोलाला घ्यावा लागला, ही वस्तुस्थितीच या क्षेत्रात दोघांचेही महत्त्व समन्वय साधन आहे असे सिद्ध करणारा अप्रत्यक्ष पुरावा आहे (C/o हेटनर २, ३०६).

क्राफ्टने केलेल्या भूगोलाच्या क्रान्तिक अन्वीक्षणात, एकच एकीकृत शास्त्र या नात्याने भूगोलाचा विचार सुरू झाला, तेव्हा त्याला एक गोष्ट आढळून आली. भूगोलात समावेश होणाऱ्या रूपधेयांत मानवी व नैसर्गिक असे द्वैत असते, हा आक्षेप लेचापेचा असल्याने खोडून काढणे एकवेळ शक्य होईल ; पण भूगोलात समावेश होणाऱ्या दृष्टिकोणात क्रमबद्ध व प्रादेशिक असे द्वैत असते, ही गोष्ट वादातीत आहे. केवळ, नियम रचना करणाऱ्या आणि असामान्यांचा विचार करणाऱ्या शास्त्राचा संयोग, अशा शब्दांनी हे द्वैत स्पष्ट होण्यासारखे नाही, असे हेटनरप्रमाणे क्राफ्टचेही मत आहे ; कारण क्रमबद्ध भूगोलात असामान्य बाबींच्या अभ्यासाचा समावेश केलाच पाहिजे, तसा प्रादेशिक भूगोलात प्रजातिसंकल्पनांचा व तत्त्वांचा उपयोग झालाच पाहिजे. नियमांची रचना अथवा असामान्यांचे वर्णन यापैकी कोणत्याच प्रकाराला भूगोलाच्या प्रयोजनाचे, किंवा अन्य कोणत्याही शास्त्राच्या प्रयोजनाचे, प्रातिनिधिक स्वरूप आहे असे म्हणता येणार नाही. या दोनही शाखांत भूगोलाचे प्रयोजन एकच असते, आणि ते म्हणजे जगाच्या क्षेत्रीय भेदाभेदांचे आकलन. पण हे प्रयोजन केवळ क्रमबद्ध अभ्यासांनी अथवा केवळ प्रादेशिक अभ्यासांनी साध्य होण्यासारखे नाही ; म्हणून या दोनही दृष्टिकोणांची भूगोलाला गरज आहे. याचाच परिणाम म्हणून, ज्या एका लक्ष्याने भूगोलाचे एकच एकीकृत शास्त्र बनवले आहे त्यासाठी दृष्टिकोणांचे हे द्वैत आवश्यक व समर्थनीय आहे, असा क्राफ्टने निष्कर्ष काढला (१६६, ११ ते १३).

हेटनरने ज्याच्यावर भर दिला आहे त्या दुसऱ्या एका वस्तुस्थितीमुळेही या मताला आणखी दुजोरा मिळतो, हे येथे नमूद करावयास हरकत नाही. काही विशिष्ट अभ्यासांचे, या कि त्या, कोणत्या सदरात, वर्गीकरण करावयाचे असा संभ्रम निर्माण होतो ; कारण फरक विषयात नसतो, तर दृष्टिकोणात असतो. पण काही अभ्यासविषयच असे असतात की त्यात दोहोंचा संयोग होण्याची शक्यता असते. उदाहरणार्थ : या आधी चर्चा केलेले जमीन वापरावर आधारलेल्या वर्गीकरणांचे क्रमबंध (प्रकरण १० 'फ' व 'ग'). त्यांचा हेतू शेतीविषयक प्रादेशिक भूगोलाची पार्श्वभूमी तयार करणे हा असतो. आणि त्यात कोणत्याही एका प्रदेशाच्या प्रादेशिक अभ्यासाच्या बहुतांश भागाचा सारांशाने समावेश

केलेला असतो. पण, त्याचवेळी त्यांच्या जागतिक विभागणीत ते विशिष्ट घटकजटिलाच्या क्रमबद्ध अभ्यासांनाही जागा देत असतात. परिणाम असा होतो की, भूगोलाच्या प्रमुख दोन विभागांपैकी कोणत्या विभागात ते अधिकांशाने मोडतात, हे काही केल्या स्पष्ट होत नाही.

भूगोलाची अत्यावश्यक अंगे म्हणून प्रादेशिक व क्रमबद्ध अभ्यास या दोहोंचाही समावेश भूगोलक्षेत्रात झाला पाहिजे या गोष्टीला मान्यता मिळाली, तरच कदाचित, त्यांच्या सापेक्ष महत्त्वाबाबतचा कोणताही आक्षेप असंबद्ध या नावाखाली निकालात काढणे शक्य होईल. प्रादेशिक अभ्यास क्रमबद्ध भूगोलाला पुढील गोष्टी पुरवितात : अन्यथा क्वचितच उपलब्ध होणारी तपशीलवार व वस्तुस्थितीजन्य माहितीचा संदर्भग्रंथ त्यातूनच पुरविला जातो. इतकेच नव्हे तर, क्रमबद्ध भूगोलात ज्यांच्याकडे सहजच दुर्लक्ष केले जाते, त्या संबंधयोगांच्या प्रश्नावर या अभ्यासांमुळे नेमके बोट ठेवले जाते; आणि क्रमबद्ध भूगोलाने रचलेल्या जातिसंकल्पना आणि तत्त्वे कसोटीला लावणारी अंतिमभूमी त्यांच्यामुळेच आयती तयार मिळते. उलटपक्षी, क्रमबद्ध अभ्यासांतून निर्माण होणाऱ्या अशा प्रकारच्या सामान्य तत्त्वांच्या विकासावरच प्रादेशिक भूगोलातील अंतःसंबंधित घटनांतील अन्वयार्थ शोधात होणारी प्रगती सतत अवलंबून असते, हे अगदी उघड आहे. अशा प्रकारचे शोध एकाच घटना प्रकाराशी संबंधित असलेल्या क्रमबद्ध अभ्यासांवर सोपवणे शक्य आहे असे गृहित धरणे बिनबुडाचे आहे, हे अनुभवाने दाखवून दिलेलेच आहे. त्या घटनांच्या ज्या रूपांबरोबर –म्हणजेच, जगाच्या निरनिराळ्या विभागांतील अन्य पार्थिव घटनांशी असलेल्या त्यांच्या संबंधांबरोबर –जसा भूगोलाचा संबंध येतो तसा प्रत्यक्षसंबंध संबंधी क्रमबद्ध शास्त्रांचा त्या रूपांबरोबर येत नाही, आणि अभ्यासकांकडूनही त्यांची दखल घेतली जात नाही. लेहमानने दाखवून दिल्याप्रमाणे फक्त भूगोलाभ्यासकच त्यांचा अभ्यास करत असतात. म्हणूनच, " भूगोलवृक्षाचा प्रादेशिक भूगोल हा शिरोभाग आहे, तर त्याच्या पोषणाला अत्यावश्यक असलेल्या अवयवांच्या जागी क्रमबद्ध भूगोलाची योजना आहे. आणि मुळाशिवाय जसा वृक्ष, तसा क्रमबद्ध भूगोलाशिवाय भूगोलवृक्षही जगू शकणार नाही, " असा लेहमानने निष्कर्ष काढला (११३, २३६ f).

शिवाय, क्रमबद्ध भूगोलातून विकसित होणारा दृष्टिकोण प्रादेशिक भूगोलाच्या सर्वसाधारण दृष्टिकोणाहून वेगळा असतो ; पण त्याबरोबरच, प्रत्येक प्रादेशिक भूगोलकाराने क्रमबद्धभूगोलाच्या कोणत्यातरी एक अगर अनेक शाखांचा अभ्यास ग्रंथनिर्मितीच्या हेतूने करत रहावे, इतका तो दृष्टिकोण महत्त्वाचाही असतो, असे लेहमानने सुचविले. उलटपक्षी, भूरूपांचा क्रमबद्ध अभ्यास करून ज्याने भूगोलात लक्षणीय भर घातली तोच पेंक मोठ्या आगत्याने सांगतो, की प्रत्येक भूगोलकारावर प्रादेशिक अभ्यासाचे संस्कार होणे आवश्यकच आहे. त्याच्या एकूण भूगोलविषयक संकल्पना व त्याच्या भौगोलिक क्रमबंधाविषयीच्या संकल्पना या सर्वांचा कस पाहणारा प्रादेशिक अभ्यास हा परिस आहे (१२९, ६३९ : C/o तसेच, ग्राफ १५६, ८२).

भूगोलाच्या या दोन अंतःसंबंधित दृष्टिकोणांचे परस्परावलंबित्व हेटनर सातत्याने व चिकाटीने सांगत आला आहे. चाळीस वर्षापूर्वीच्या आपल्या अगदी पहिल्या पद्धतितंत्रविषयक प्रबंधात तो ते सांगत होता, आणि आजही तो तेच सांगतो आहे. क्रमबद्ध भूगोलात वृद्धिंगत होणाऱ्या सार्वकालिक व भक्कम संकल्पना, हाच प्रादेशिक भूगोलाच्या प्रगतीचा आवश्यक पाया आहे. पण, क्रमबद्ध भूगोलाच्या पद्धती व क्रमबद्ध शास्त्रांच्या पद्धती सारख्याच असल्यामुळे " जो भूगोलाभ्यासक केवळ त्याच एका शाखेत कार्य करत रहातो, म्हणजे ज्याच्यावर प्रादेशिक भूगोलाचे संस्कारच झाले नाहीत, तो भूगोलक्षेत्र सोडून भलतीकडेच भटकण्याचा धोका पत्करत असतो. ज्याला प्रादेशिक भूगोलाचे आकलन झालेले नाही तो खरा भूगोलकारच नव्हे. क्रमबद्ध भूगोलाच्या मदती शिवाय प्रादेशिक भूगोल अपूर्ण रहात असला, तरी त्याच्या भूगोलरूपाला बाधा येत नाही. या उलट, प्रादेशिक भूगोलाच्या मदतीविना क्रमबद्ध भूगोलाकडून संपूर्ण भूगोलकार्याची पूर्तताच होत नाही. आणि कधी कधी तर अगदी नकळत तो आपले भूगोलरूपच गमावून बसतो " (१४२, २२f).

म्हणूनच, दोनही दृष्टिकोणाच्या पद्धतीनुसार भूगोलक्षेत्रात अद्याप विपुल कार्य व्हावयाचे आहे, असे गृहीत धरण्यास हरकत नाही. तेव्हा कोणत्याही एका मार्गाच्या विशेषाभ्यासकाने दुसऱ्याच्या अभ्यासांबद्दल निंदाव्यंजक सुरात अथवा कृतक सहानुभूतीच्या सुरात बोलणे त्याला शोभत नाही. " कारण दृष्टिकोणांतील फरक हे मूलतः अभिरूचीतील व्यक्तिगत फरकावर अवलंबून असतात " (११६, ५६९). या क्रोबरच्या मताचाच अनुवाद करत असेही म्हणता येईल : क्रमबद्ध भूगोलाच्या विशिष्टाभ्यासी दृष्टिकोणावर अथवा प्रादेशिक भूगोलाच्या संकलनाभ्यासी दृष्टिकोणावर, आणि प्रसंगोपात्त एकदा एकावर आणि एकदा दुसऱ्यावर असा कोणा भूगोलाभ्यासकाने अभिरूचिपालट केला तर त्याने नियमभंग केला असे मुळीच म्हणता येणार नाही. उलट, सहानुभूतिपूर्ण सहिष्णुता ही समझोत्याच्या दृष्टीने निश्चितच मूलतः उपकारक ठरेल.



## प्रकरण १२ वे

# उपसंहार (निष्कर्ष) —भूगोलाचे स्वरूप

भूगोल या नावाखाली ज्या अनेक-विध कल्पना पुढे मांडण्यात आल्या, त्यातील बऱ्याचशा कल्पनांनी, एकतर, एक तोंड बंद असलेल्या गल्लीत नेऊन सोडले, नाहीतर, थेट भूगोलाच्या हद्दीबाहेर जाणारा रस्ता दाखविला. अंतिम निर्णयांच्या मार्गावरील अनेक मुद्द्यांवर विचक्षणा करत आपण थोडे रेंगाळलो हे खरेच ! पण त्यामुळेच, आपल्याला भूगोलक्षेत्राच्या कक्षेतील अनेक कूटप्रश्नांचे तपशीलवार विश्लेषण करता आले. म्हणूनच भूगोलाचे स्वरूप निश्चित करणारे जे अस्तिपक्षी निर्णय आपण घेतले, त्यांचा संक्षिप्त सारांश येथे देणे उपकारक ठरणार आहे.

स्वतःच्या विकासाच्या इतिहास कालात भूवर्णनपर अभ्यास या अर्थानेच भूगोलाला इतर शास्त्रांमध्ये तर्कदृष्ट्या प्रतिवाद्य स्थान प्राप्त झाले आहे. हे भूगोलविषयक अभ्यास, इतिहासविषयक अभ्यासाप्रमाणेच, सत्यस्थितीतील विशिष्ट वस्तू आणि घटना यांच्या विवेचनाच्या प्रयत्नात नसतात, तर सत्यस्थितीच्या प्रत्यक्ष विभागांचे वर्णन करण्याच्या प्रयत्नात असतात. त्यांचा प्रयत्न घटनांच्या प्रक्रियांचे विश्लेषण वा संश्लेषण करण्याचा नसतो, तर सत्यस्थितीच्या त्या त्या विभागात घटनासाहचर्यांचे जसे संबंध असतील तसे विश्लेषण वा संश्लेषण करण्याचा त्यांचा प्रयत्न असतो.

इतिहासविषयक अभ्यास सत्यस्थितीचे कालनिष्ठ छेद लक्षात घेतात, तर भूगोल विशेषेकरून भूपृष्ठाच्या स्थानिक छेदांचा विचार करतो. भूगोल, आपल्या नावाशी प्रामाणिक राहून, कोणत्याही एका कालखंडात, आणि प्राधान्येकरून वर्तमानकालात, दिसणाऱ्या विविध स्थानिक विभागांच्या भेदाभेदांचे वर्णन करण्याच्या आणि त्यांचा अन्वयार्थ लावण्याच्या प्रयत्नात असतो. येवढ्या एका क्षेत्राबाबत भूगोल इतर कोणत्याही विज्ञानशाखेशी भागीदारी करण्यास तयार नसतो ; तरीही या क्षेत्रात तो अनेक शास्त्रांचे विभाग एकत्र आणतच असतो. म्हणजे, सोइस्कर व संघटित स्वरूपात या सर्वांची गोळाबेरीज करण्याचे काम तेवढेच भूगोल करत असतो, असा याचा अर्थ नव्हे. इतर शास्त्रे ज्यांचा वर्गवारीने अभ्यास करत असतात त्या विजातीय घटनांची मिश्रणे कायिक सान्निध्याच्या भाषेत सांगण्याइतकी सरळ नसतात; तर, त्या घटना कार्यकारण भावाने संबद्ध असतात व त्यांची जटिल क्षेत्रीय संयुगे निर्माण झालेली असतात. म्हणजेच, विविध शास्त्रे ज्यांचा स्वतंत्र रीतीने अभ्यास करत असतात, अशा सामग्रींचे एकसंधान भूगोलाला करावयाचे असते ; आणि त्यासाठी, जगाच्या निरनिराळ्या विभागात होत असणाऱ्या विजातीय घटनांच्या प्रत्यक्ष एकीकरण विषयक परिभाषा त्याला वापरावयाची

असते. भूगोलाने अभ्यासाकरता निवडलेली कोणतीही एक घटना दुसऱ्या एखाद्या क्रमबद्ध शास्त्राचा अभ्यासविषय असू शकेल. तरीही, भूगोल या क्रमबद्ध शास्त्रांतील तद्विषयक ज्ञानांची केवळ तुकडे-जोड करत नाही, तर आपल्या खास दृष्टिकोणातून या सर्व घटना एकसंध बनवून सोडतो. हीच गोष्ट व्यवहाराने व सिद्धान्तानेही हंबोल्टने परिणामकारकरीतीने प्रस्थापित केली.

भूविज्ञानाने सर्वच क्रमबद्ध शास्त्रांतील विभाग घेतलेले असल्यामुळे, या शास्त्रांपैकी प्रत्येकाशी त्याचे परस्पर व जिव्हाळ्याचे संबंध निर्माण झालेले आहेत. घटनांची आपण केलेलीं वर्णनें व त्यांच्या अन्योन्य संबंधांचे आपण लावलेले अर्थ शक्यतो अचूक व ठाम स्वरुपाचे असावेत म्हणून, ज्या ज्या ज्ञानाचा परिणामकारकरीतीने उपयोग करता येण्यासारखा असेल, ते सर्व ज्ञान या विविध क्रमबद्ध शास्त्रांतून भूगोल निवडून घेईल. ज्ञानाच्या या उसनवारीत त्या त्या क्रमबद्ध शास्त्रांतून विकसित झालेल्या प्रजातिसंकल्पना असतात, अथवा त्यांच्या प्रकारांची वर्गीकरणेही असतात. पण, जेव्हा हे ज्ञान भौगोलिक हेतूंच्या संदर्भात अप्रस्तुत असते, तेव्हा भूगोलालाच स्वतःच्या प्रजातिसंकल्पना व वर्गीकरण-पद्धती विकसित कराव्या लागतात.

याच्या उलट, भूगोलाने क्रमबद्ध शास्त्रांत केवढी तरी भर घातली आहे, व घातली जात आहे. खरोखरीच्या जगातील परस्पर संबंधाचे सरळ परीक्षण आपल्या पद्धतीने करत असताना, भूगोलाला क्रमबद्ध शास्त्रांच्या अवास्तव, पंडिती नजरेच्या निरीक्षणांतून निसटलेली एखादी घटना आढळते. इतकेच नव्हे तर, अशा काही घटनांचा स्वतंत्रपणे अभ्यास करावा इतक्या महत्त्वाच्या त्या आहेत, हेही भूगोल दाखवून देतो ; आणि अशारीतीने क्रमबद्ध शास्त्रांच्या अभ्यासक्षेत्रात मोलाची भर टाकतो. क्रमबद्ध शास्त्रांच्या बव्हंशी तात्त्विक दृष्टिकोणामुळे, घटनांची जी एक बाजू त्यांच्या सहसा दृष्टिआड झालेली असते, तिच्यावरच भूगोल सतत भर देत असतो. या बाजूलाच भौगोलिक बाजू असे म्हणतात. कोणत्याही घटनेचे केवळ सामान्यगुण आणि प्रक्रिया येवढ्यांचाच अभ्यास केल्याने त्या घटनेचे सर्वांगीण आकलन होऊ शकत नाही ; या गोष्टीची क्रमबद्ध शास्त्रांना सतत जाणीव करून देणाऱ्या वास्तववादी टीकाकाराचे कर्तव्य बजावून, भूगोल त्यांना मदत करत असतो. जगाच्या विविध विभागातील त्या घटनांच्या प्रत्यक्ष स्थानांमुळे त्यांच्यात निर्माण झालेले फरकही क्रमबद्ध शास्त्रांनी लक्षात घेणे आवश्यक आहे. आपला अभ्यास-विषय असलेल्या ज्या या घटना त्यांच्यांतील भेदांचा अचूक अर्थ लावण्यासाठी आणि त्यांच्या परिणामी जागतिक वाटणीचाही अर्थ लावण्यासाठी, क्रमबद्ध शास्त्रांना, भूगोलाच्या खास दृष्टिकोणामुळे त्याला विकसित कराव्या लागलेल्या त्याच्या खास तंत्रांची अंशतः उसनवारी करावी लागतेच. अशा तंत्रापैकी नकाशीकरण व नकाशावाचन ही विशेष उल्लेखनीय आहेत.

सत्यपरिस्थितीचे सर्वांगीण आकलन होण्यासाठी इतिहासाबरोबर भूगोलही आवश्यक आहे. क्रमबद्ध शास्त्रांचा केवळ योजनाबद्ध अभ्यास केल्यास सत्यस्थितीचे पांडित्य निर्मित गाळे पडू लागतात, आणि तसे होऊ लागले की तिचे मूलभूत स्वरूप अंशतः नष्ट होतेच.

" Ach von ihrem lebenwarmen Bilde
Blieb der Schatten nur zurick. "

[अरे ! त्या जीवंत दृश्यातली राहिली बापडी
त्यांच्या चित्रात केवळ झोपडी.]

व्हिडाल म्हणतो त्याप्रमाणे, " सर्वच वस्तुस्थितींचा समावेश होऊ शकतो असा जागतिक परिसर असो, किंवा प्रत्येकाचे स्थान निश्चित करणारा प्रादेशिक परिसर असो, त्यांची संगती व सहसंबंध यांचे आकलन करून घेण्याची सहजाभिरुची फक्त भूगोलाभ्यासानेच वाढीस लागते. "

फिंचच्या मते या प्रमेयाचे एक उपप्रमेयही मांडता येते. शास्त्राचे समाजसेवेसाठी उपयोजन करण्याचा प्रश्न उपस्थित होतो, तेव्हा हे भूवंटनात्मक भूगोलशास्त्र प्रत्यक्षपणे कार्य करू लागते ; कारण, समाजापुढील अनेक कूटप्रश्न —आणि विशेषेकरून जमीन वापराच्या अत्यंत कार्यक्षम संघटना संबंधीचे प्रश्न— वस्तुतः प्रादेशिक प्रश्नच असतात. " तरीही, भूवंटनात्मक दृष्टिकोणाला उपयुक्ततेच्या समर्थनाची आवश्यकता आहेच, असा वरील विधानाचा अर्थ लावला जाता कामा नये ; –आणि मी असे गृहीत धरतो, की फींचचाही तसे म्हणण्याचा हेतू नव्हता (२२३, २१ff). उलटपक्षी, समाजापुढील कूटप्रश्नांशी शास्त्रांचा संबंध घालून देत असताना भूगोलाचे काही खास मूल्य आहे. काही विशेष गोष्टींतील स्थानपरत्वे दिसणाऱ्या भेदांच्या भाषेतच नव्हे, तर इतर सर्वक्षेत्रांपेक्षा वेगळ्या असणाऱ्या पण प्रत्येक क्षेत्रात आढळणाऱ्या एकूण घटनांच्या संयोगाच्या भाषेतही, प्रत्यक्ष दिसणाऱ्या जगाच्या क्षेत्रीय भेदाभेदांचा अर्थ लावता यावा म्हणून, शुद्धशास्त्रांच्या क्षेत्रात एखाद्या स्वतंत्र शास्त्राची गरज आहे; ही वस्तुस्थिती भूगोलाच्या या मूल्यामुळें अधिकच पक्की होते.

इतिहासासारखेच, भूगोलाचे स्वरूपही इतके समावेशक आहे, की आदर्श आणि परिपूर्ण भूगोलकाराला —व आदर्श आणि परिपूर्ण इतिहासकारालाही— नैसर्गिक व मानवी जगाशी संबंध असणाऱ्या प्रत्येक शास्त्राचे सर्व ज्ञान असणे आवश्यक होते. याच प्रमेयाचा व्यत्यास असा होतो, की क्रमबद्ध शास्त्रांच्या कोणाही अभ्यासकाला भूगोलाच्या कोणत्यातरी शाखेबद्दल, अंशतः का होईना, गोडी वाटत असतेच. शिवाय, भूगोल व इतिहास या दोहोंतही वस्तुस्थितीच्या प्रत्यक्ष अंशभागांचे वर्णन करण्याचा आणि त्यांचा अन्वयार्थ लावण्याचा प्रयत्न असतो ; आणि साधारणपणे, सामान्य माणसालाही सहजसुलभ असणाऱ्या पद्धतीनेच या अंशभागांतील घटनांचे निरीक्षण केले जाते. परिणामतः,

इतिहासाप्रमाणेच, भूगोलाच्या क्षेत्रातही सामान्य माणसाला मुक्त प्रवेश असतो, असे वरवर पहाणाऱ्याला वाटणे साहजिक आहे. वर्तमान इतिहासाखेरीज इतर कोणत्याही इतिहास शाखेला, निदान भूतकालीन लेखांचा उपयोग करता यावा इतकी विद्वत्ता असणे आवश्यक आहे ; पण ज्या कोणाला प्रवासाची संधी मिळेल व पाहिलेल्या गोष्टींचे वर्णन करण्याची पात्रता असेल, त्या प्रत्येकाला भूगोलाचा अभ्यास करणे शक्य आहे. याचा एक परिणाम असा झाला, की एक नियमबद्ध शास्त्र म्हणून प्रतिष्ठित होण्यापूर्वी कितीतरी अगोदरपासून, भूगोलाचा अभ्यास इतरेजनच करत आले, आणि तेव्हापासून असंख्य हौशी प्रवाशांनी उपयुक्त सामग्री पुरवून भौगोलिक साहित्यात कमी जास्त भर टाकली. तो बरा असो कि वाईट असो, पण हा गुण इतिहासाप्रमाणेच भूगोलातही असलेला दिसतो.

म्हणूनच, रिक्टोफेन म्हणतो त्याप्रमाणे, " पेरल्याशिवाय पिकणारे, भूगोल हे एक आयते क्षेत्र आहे असा कित्येकांचा भ्रम आहे. मनःपूर्वक अनुसंधान कार्य करणाऱ्या अभ्यासकांनी लिहिलेल्या भूगोलविषयक साहित्याचा बहुतांश भाग कोणालाही सहज कळण्यासारखा असल्यामुळे, पूर्वतयारीसाठी कोणतेही प्रशिक्षण न घेता आपण या क्षेत्रात यशस्वीरीतीने कार्य करू, आणि धावत्या प्रवासात केलेल्या निरीक्षणांचे रसभरित वर्णन करून, म्हणजेच जुजबी साहित्य निर्माण करून, मानाचे तुरे लावून या क्षेत्रात सहज मिरवू, असे कोणालाही वाटते. या बहिरंग साहित्याचा येवढा लोंढा या क्षेत्रात येत असतो, की भूगोलाच्या वैज्ञानिक आशयाबाबत बहुसंख्य प्रशिक्षितांनी घेतलेले स्पष्ट निर्णयही त्यामुळे धुकट दिसू लागतात. पण हे साहित्य कितीही सदोष असले तरी त्या साहित्यानेच लोकप्रियताही मिळवून देण्याची सेवा केली, हे नाकबूल करता येण्यासारखे नाही. इतिहासाप्रमाणेच, या क्षेत्रातही, हाती आलेल्या बहुतांश वस्तुस्थिती तत्काल समजून घेण्यातील भासमान सुगमता आणि भरीव संशोधन करत असता मार्गात येणाऱ्या अडचणींची दुर्गमता, या दोहोतील विरोध उठून दिसतो " (७३, ६८). इतिहासाचे बाबतीत या विरोधाच्या महत्त्वाची चर्चा ॲलन जॉन्सन व अन्य काही लेखकांनी केलेली आहे (११७).

प्रसंगोपात्त, एखाद्या भ्रमणशील सामान्य मनुष्याकडून सहज अतिक्रमण घडावे, इतकी इतिहास व भूगोल ही दोनही क्षेत्रे अतिक्रमणसुलभ आहेत, हाही त्या क्षेत्रांच्या मूलभूत स्वरुपाचाच परिणाम आहे. असे असले, तरी हे अतिक्रमण रोखण्यासाठी विद्वत्ताप्रचुर तांत्रिक संज्ञांचे काटेरी कुंपण उभारण्याच्या प्रयत्नांतून काहीच फायदा होणार नाही. वेळी, स्वतःचे ज्ञान धूसर पटाने–पडदानशीन–करून आपल्या विषयाची प्रतिष्ठा राखण्यासाठी धडपडावे, असा विचार भूगोलाभ्यासकांच्या मनात येईल असे वाटत नाही. विरूद्धपक्षी, ज्या क्षेत्रांचे शोधन करण्याची संधी फारच थोड्या व्यावसायिक भूगोलकारांना मिळते असेही दुर्गम आणि विस्तृत प्रदेश भूगोलक्षेत्राचे भाग आहेत. म्हणूनच अशा प्रदेश-शोधनात लक्ष घालणाऱ्या हौशी शोधकांच्या मदतीचे हार्दिक स्वागतच केले पाहिजे. मात्र, व्यावसायिकांकडून जितके शक्य आहे तितके ज्ञान व प्रशिक्षण त्यांनी

आधीच घेतलेले असणे आवश्यक आहे, ही एकच अट त्यांनी मान्य करावी, असे सुचवावेसे वाटते. असे झाले तरच, त्यांच्या प्रयत्नांना येणारी फळे आपल्यापरीने अधिक निकोप व सरस होतील व भूगोलाच्या दृष्टीने ती अधिक चिरंतन मूल्याची ठरतील.

जगाच्या अभ्यासाशी संबंधित असलेली व एकीकरण करणारी शास्त्रे, या अर्थाने भूगोल व इतिहास ही दोन्ही समरूप आहेत. म्हणूनच या दोघांचे संबंध सर्वस्पर्शी व अन्योन्यस्पर्शी आहेत. तरीही त्यांच्या एकीकरण पद्धतींची आधारतत्त्वे एका-अर्थी विरोधी आहेत. भूगोल हे काम भूक्षेत्रांच्या भाषेत करतो, तर इतिहास तेच काम करण्यासाठी कालखंडांची भाषा वापरतो. वर्तमान भौगोलिक रूपध्येयांचा अन्वयार्थ लावावयाचा झाल्यास, त्यांच्या ऐतिहासिक विकासाचे थोडेतरी ज्ञान भूगोलकाराला असणे आवश्यक आहे. येथे भौगोलिक उद्दिष्टांच्या सिद्धतेचे इतिहास हे साधन झाले. या उलट, ऐतिहासिक घटनांचा अन्वयार्थ लावताना त्यांच्या भौगोलिक पार्श्वभूमीचे काही थोडे ज्ञान असावेच लागते. येथे मात्र इतिहास-विषयक उद्दिष्टांच्या सिद्धतेचे भूगोल हे साधन झाले. कोणत्यातरी एकाच दृष्टिकोणावर सातत्याने व सुस्पष्टपणे भर दिला गेला तरच या परस्परविरोधी दृष्टिकोणांची जोडी बांधणे शक्य होणार आहे. या दोनही दृष्टिकोणांचे समन्वय पद्धतीने संयोजन करावयाचे झाल्यास अडचणींचा असा गुंता निर्माण होईल, की तो सोडविणे, निदान आज तरी, मानवी विचारकक्षेच्या बाहेर राहील. एकाच स्थळाच्या ऐतिहासिक भूगोलांच्या क्रमान्वित दृश्यांचा स्थिरचित्रपट तयार करणे हा भूगोलक्षेत्रातील अशाप्रकारच्या संयोजनाचा एक मार्ग म्हणून मान्य होण्याची शक्यता आहे. पण तसे न करता, त्या दृश्यांचा एक चलचित्रपट तयार करण्याचा प्रयत्न केल्यास, स्थल व काल या दोहोंच्याही संदर्भात होणारे सलग बदल दिसत जातील, आणि असे झाले तरच सत्यस्थितीचे परिपूर्ण दर्शन घडेल. पण, अशा चित्रपटाचा दृक्प्रत्यय घेणेच आपल्या सामर्थ्याच्या पलीकडे आहे असे वाटते ; मग, त्यांचा अर्थ लावण्याची गोष्टच कशाला !

ज्या दृष्टिकोणातून सत्यस्थितीचे ज्ञान संपादन करण्याचा भूगोलाचा प्रयत्न असतो, तो दृष्टिकोण वेगळा असला, तरी भूगोलाच्या ज्ञानसंपादन पद्धतीवर नियंत्रण ठेवणारी पायाभूत साध्ये व, ज्याला ' विज्ञान ' याखेरीज प्रतिशब्दच नाही, त्या निःशेषज्ञानक्षेत्राच्या सर्वशाखांतील एतद्विषयक साध्ये यात कोणताच फरक नाही.

जगाच्या क्षेत्राक्षेत्रातील भेदाभेद स्पष्ट करण्यासाठी लागणारे सर्वांगीण ज्ञान संपादन करण्याचा भूगोलाचा प्रयत्न असतो. म्हणूनच, तो जगाच्या विभागपरत्वे बदलत जाणाऱ्या घटनांमधील भेद त्यांच्या भौगोलिक महत्त्वाच्या भाषेत —म्हणजेच, त्यांच्या एकूण क्षेत्रीय भेदाभेदांशी असणाऱ्या संबंधाच्या भाषेत— स्पष्ट करतो. क्षेत्रीय वर्गीकरणाच्या दृष्टीने महत्त्वाच्या घटनांचे आविष्कारही क्षेत्रीयच असणार. अर्थात, असे आविष्कार जमिनीवर त्यांच्या प्रत्यक्ष विस्ताराच्या भाषेतच सांगितले जाण्याची आवश्यकता नसली, तरी निश्चित विस्ताराच्या क्षेत्राचे लक्षण म्हणून ते सांगता आलेच पाहिजेत. साहजिकच, या घटनांच्या

अन्योन्य संबंधांचा अभ्यास करत असताना, कोणत्याही एका वेगळ्या घटनेच्या, अथवा परस्परसंबंध असलेल्या अनेक घटनांच्या क्षेत्रीय आविष्कारांचे चित्रण करणाऱ्या नकाशांच्या तुलनेवरच भूगोल प्रथमतः म्हणजेच मूलतः अवलंबून राहतो. शास्त्रीय तंत्रांच्या परिभाषेत बोलावयाचे झाले तर, ज्ञानजगतात भूगोलाचे प्रतिनिधित्व प्रामुख्याने नकाशे वापरण्याच्या तंत्राने केलेले आहे.

सामान्यपणे कोणत्या घटना भौगोलिक महत्त्वाच्या आहेत हे ठरविण्याचे कोणतेच लिखित नियम नाहीत. क्षेत्रीय भेदाभेदांच्या संदर्भात असलेले एखाद्या घटनेचे प्रत्यंक्ष महत्व आणि अन्य घटनांच्या कार्यकारण संबंधांतून तिला मिळणारे अप्रत्यक्ष महत्व, यांच्या आधारेच त्या घटनेच्या भौगोलिक महत्वासंबंधीचा निर्णय, त्या त्या विशिष्ट बाबतीपुरता वेगवेगळा घेणेच प्राप्त आहे. आपले निष्कर्ष शक्य तेवढे अचूकपणे काढता यावे म्हणून प्रत्येक बाबतीत ज्यांच्या संबंधाने काही प्रकारची परिमेय सामग्री तो गोळा करू शकला आहे अशा त्या क्षेत्रातील महत्वाच्या घटनांवरच प्रत्येक अभ्यासकाला अवलंबून रहावे लागते. ज्या घटना परिमेय नाहीत पण ज्या भौगोलिकदृष्ट्या अर्थपूर्ण आहेत अशा घटनांचा अभ्यास त्यांच्याच परिमेय परिणामांच्या सहाय्याने, म्हणजेच अप्रत्यक्षपणे करावा लागतो.

वर सांगितलेल्या सामान्य तत्त्वांतून कोणतीच घटना अथवा कोणतीच बाजू वगळली जाणार नाही. क्रमबद्ध भूगोलाच्या क्षेत्रातील एका विशेष क्रमबंधाचा अभ्यास अथवा एखाद्या प्रदेशाच्या विशिष्ट भागाचा अभ्यास केला जात असताना, अभ्यासविषय असणाऱ्या घटनांचे परस्पर संबंध सांगण्याच्या दृष्टीने अर्थशून्य असलेल्या विशिष्ट प्रकारच्या घटना तर्कानेच वगळल्या जाण्याची शक्यता आहे. सारांश, परिपूर्णतेच्या त्याच्या ध्येयामुळे प्रजाति संकल्पनांच्या रूपात व्यक्त करता येतील अशी रूपध्येये व संबंध यांचा तर विचार त्याला करावा लागतोच, पण मूलतः वेगळ्या असलेल्या अनेक रूपध्येयांचा व संबंधांचाही विचार भूगोलाला करणे भाग पडते.

एका वस्तुगटाच्या अभ्यासाने अथवा एका निरीक्षण पद्धतीने काढलेले निष्कर्ष अन्य वस्तूगटांच्या अभ्यासात अथवा अन्य-निरीक्षण पद्धतीने काढलेल्या निष्कर्षांशी पडताळून पहाता यावेत म्हणून, भूगोल सर्व प्रकारच्या वस्तुस्थिती लक्षात घेत असतो ; व अशा वस्तुस्थिती निश्चित करण्यासाठी उपयोगी पडणाऱ्या सर्व पद्धतींचा वापरही तो करत असतो. कारण, तसे केल्यानेच परस्पर-संबद्ध घटनांविषयींचे त्याचे ज्ञान शक्य तेवढे अचूक व निश्चित करण्याचा भूगोलाचा हेतू साध्य होणार असतो.

हाच हेतू नजरेपुढे ठेवून, प्रत्यक्ष प्रमाणित नसतील तर निदान, निश्चित शब्दांत व्याख्याबद्ध केलेल्या संकल्पनांवर आधारलेली आणि अचूक व तर्कशुद्ध विचारसरणीची सार्वकालिक व शास्त्रमान्य प्रमाणेच भूगोल मान्य करत असतो. स्वतंत्र पण असंबद्ध प्रमाण खंडांचा एक ढिगारा होऊन रहाण्याऐवजी, ज्ञानचिकित्सेच्या व ज्ञानप्रतिपादनाच्या

विद्वत्तापूर्ण कार्यपद्धतींनी वारंवार पडताळून पाहिलेले आणि सातत्याने सृजनशील ठरणारे अनुसंधानकार्य करणे शक्य होईल, अशाप्रकारे आपले क्षेत्र संघटित करण्याचा भूगोलाचा प्रयत्न असतो.

सामान्यीकरणाच्या मर्यादा सांभाळून, शक्य तितक्या निर्दोष बनविलेल्या प्रदेशाच्या विरूप विभागांच्या संयोगांची दृश्ये प्रस्थापित करणे हाच भूगोलाचा उद्देश असतो ; तसेच, ज्यांच्या सहाय्याने त्या रूपध्येयांत प्रत्यक्षपणे असलेल्या साधारण लक्षणांचे निश्चितपणे वर्णन करता येईल अशा घटनाविषयक अथवा घटना जटिल विषयक प्रजातिसंकल्पना प्रस्थापित करण्याचाही त्याचा उद्देश असतो ; आणि भूगोलाच्या या सर्व प्रयत्नांचा अंतिम हेतू जगाच्या ज्ञानाचे अति विस्तृत तपशील सहज समजण्याइतके सोपे करणे हा असतो. कोणत्याही विशिष्ट क्षेत्रातील, अशा प्रकारच्या घटनांच्या परस्पर संबंधांचा अन्वयार्थ अचूकपणे लावता यावा म्हणूनच, अशा प्रजाति-संकल्पनांच्या आधारे, एकाच, अथवा वेगवेगळ्या, प्रदेशातील क्षेत्रीय संबंध असलेल्या घटनांच्या संबंधयोगांची तत्त्वे प्रस्थापित करण्याचाही भूगोलाचा प्रयत्न असतो.

शेवटी कोणत्याही विशिष्ट ज्ञानखंडाचा संबंध त्याचा निर्देश करणाऱ्या इतर सर्व ज्ञानखंडांबरोबर जोडणे शक्य व्हावे म्हणून, आपले जगासंबंधीचे सर्व ज्ञान अंतर्गत जोडणी असलेल्या एकाच क्रमबंधाने संघटित करण्याचा भूगोलाचा प्रयत्न असतो. अंशतः स्वतंत्र राहुनही परस्पर संबंध ठेवणाऱ्या गतिमान घटनांच्या परिणामी स्वरूपांच्या एकीकरणाचा समावेशही जगाच्या क्षेत्रीय भेदांभेदांत व्हावा लागतो, आणि हे एकीकरण भूपृष्ठावरील सर्व स्थलांना लागू पडणारे असावे लागते. म्हणजेच, गतिमान-घटनांच्या परिणामी-स्वरूपांचे सर्व जगभर दिसणारे सकृत् एकत्रीकरण एकाच क्रमबंधाने संघटित करणे अशक्य आहे.

सर्व जगावर किंवा त्याच्या कोणत्याही भागावर, जसा त्यांच्यात बदल होत जातो तशा स्थितीत, कोणत्याही महत्त्वाच्या घटकाचा अथवा घटकजटिलाचा अभ्यास, एकूण क्षेत्रीय भेदाभेदांशी असलेल्या त्यांच्या संबंधाच्या भाषेत, क्रमबद्ध भूगोल करत असतो. अर्थात, त्याच विषयाच्या क्रमबद्ध शास्त्रात केला जातो तशा प्रकारचा, कोणत्याही अर्थाने परिपूर्ण असा, त्या घटनेचा अभ्यास येथे केला जात नाही ; तर, तिचा अभ्यास केवळ तिच्या भौगोलिक महत्त्वाच्या संदर्भातच केला जातो. म्हणजेच, त्या घटनांचे क्षेत्रपरत्वे संबंध आणि त्या त्या क्षेत्राची लक्षणे निश्चित करणाऱ्या अन्य रूपध्येयांशी असलेले त्यांच्या बदलांचे संबंध, यांच्या संदर्भातच हा अभ्यास केलेला असतो. अशा रीतीने पृथ्वीच्या कोणत्याही एका रूपध्येयाचा अभ्यास एक परिपूर्ण क्रमबंध म्हणून क्रमबद्ध भूगोलात ग्रंथित केलेला असला, तरी पृथ्वीवरील प्रत्येक ठिकाणी, त्यांचा संबंध अन्य रूपध्येयांशी संबंधित असलेल्या संगत क्रमबंधांशी असतोच.

त्या त्या स्थळांचे सर्वांगीण भूगोलदर्शन घडविता यावे म्हणून, गृहीत स्थळी असलेल्या सर्व रूपध्येयांचे सर्व ज्ञान प्रादेशिक भूगोलात एकत्रित केलेले असते. हे ज्ञान क्रमबद्ध भूगोलाच्या विविध-भागांतून भागशः मिळवलेले असते. तसेच ते त्या रूपध्येयांच्या परस्परांशी असलेल्या संबंधांच्या परिभाषेत असते. काहीशा स्थान निरपेक्षपणे बदलत जाणाऱ्या कारकांचे स्थानिक एकीकरण केल्यावर, अशा असंख्य स्थानिक एकीकरणांचे प्रादेशिक एकत्रीकरण करणे शक्य होते. लहान एकक क्षेत्रांतून दिसून येणाऱ्या फरकांकडे दुर्लक्ष करणाऱ्या अनुमाननिष्ठ युक्तीनेच असे प्रादेशिक एकीकरण शक्य होते. यथेच्छ काट छाट करून त्यांचे एकजातीय एकक केले तरच ही मर्यादित संख्येची क्षेत्रीय एकके स्वतःपेक्षा विस्तृत क्षेत्रांचे भाग म्हणून त्यांच्यातील परस्पर संबंधांच्या संदर्भात अभ्यासणे शक्य होईल ; कारण, ही विस्तृत क्षेत्रे स्वतः त्यांच्यापेक्षा अधिक विस्तृत असणाऱ्या विभागांचे पोटभाग असतात ; आणि अखेर, हे सर्व एकाच जगाचे विभाग असतात.

क्षेत्रनिष्ठ अभ्यासाचे केंद्र बनविता येतील असे जगाचे भाग पाडणे आणि या भागांचे पोटभाग पाडणे हीच प्रादेशिक भूगोलाच्या घटनेतील एक क्लिष्ट समस्या आहे. कारण, शेवटी जवळजवळ एकजातीय क्षेत्रीय एककापर्यंत पोहोचणारी, आणि सर्व विभाग व पोटविभाग यांचा एक, अथवा अनेक, क्रमबंध असणारी संपूर्ण जगाची विभागणी करणे हे अवघड कामही याच समस्येच्या पोटी करावयाचे आहे. हे काम कितीही अवघड असले, तरी सुसंघटना व निःशेषत्व या उद्दिष्टांच्या मागणीनुसार या प्रश्नाची सर्वोत्तम उकल शोधण्याचा प्रयत्न भूगोल करत असतो.

क्रमबद्ध भूगोल व प्रादेशिक भूगोल या दोहोंच्या मधला टप्पा निर्माण करण्याने, अशी संघटना करण्याची एक पद्धती मिळण्याचा संभव आहे. कोणत्याही एका घटकाच्या अथवा घटक-जटिलाच्या आधारे जगाचे विभाग अथवा पोटविभाग पाडणारा एक तर्कसिद्ध क्रमबंध रचणे शक्य होणार आहे. या ठिकाणी जटिल या शब्दाने अनेकविध पण निकटसंबंधी असे पुष्कळसे घटक अभिप्रेत आहेत. घटकजटिलांच्या प्रजातिसंकल्पनांवर आधारलेला प्रत्येक क्रमबंध प्रत्यक्ष मापनांच्या जोरावर घेतलेल्या वस्तुनिष्ठ निर्णयांच्या सहाय्यानेच तडीला नेणे शक्य होईल. प्रत्येक क्रमबंध अनेक घटकांच्या सांस्कृतिक जटिलांवर आधारला, तर आपणास मिळालेले जगाचे बहुतेक सर्व प्रादेशिक ज्ञान ज्यात ग्रथित करता येईल असा साचा तयार करण्यासाठी निदान तीन क्रमबंध पुरेसे होतील. मात्र, असे करण्याने, आपण त्या प्रदेशाचा भूगोल पूर्णांशाने ग्रथित करत नसतो, तर प्रादेशिक भूगोलाच्या वेगवेगळ्या बाजू स्वतंत्रपणे ग्रथित करत असतो.

जगांतील प्रदेशांचा परिपूर्ण भूगोल एकाच क्रमबंधात संघटित करावयाचा झाला, तर तो क्रमबंध अंतर्गत क्षेत्रांच्या एकूण स्वरूपांवर आधारलेला असला पाहिजे ; आणि त्यात अधिकाधिक मोठ्या एककांचे विभाग या दृष्टिने, त्या क्षेत्रांच्या सापेक्ष स्थानांचाही विचार

झाला पाहिजे. निश्चित स्वरूपाच्या प्रदेशांच्या कोणत्याही क्रमबंधात भौगोलिक महत्त्वाच्या सर्वच रूपध्येयांचा विचार करणे भाग असते ; मग त्यांतील काही एका प्रदेशात अधिक महत्त्वाची असतील तर दुसरी दुसऱ्यांत. प्रदेशाप्रदेशांतील समानता अगर विषमता ठरविण्याच्या दृष्टीने कोणती रूपध्येये अधिक महत्त्वाची, व कोणती कमी महत्त्वाची, मानावयाची यासंबंधी वैयक्तिक निर्णय घेता आले, तरच कोणत्याही पातळीवरील असे विभाग निश्चित करता येतील. म्हणून, कमीतकमी शब्दात ज्यांच्या स्वरूपाचे वर्णन करता येईल अशा रीतीने निश्चित केलेले भू-भाग म्हणजे प्रदेश होत, अशीच व्याख्या कोणत्याही पातळीवरून करावी लागेल. अशी व्याख्या केली तरच प्रत्येक प्रदेशात सरूप एककांची वेगवेगळी सामान्यीकृत वर्णने संख्येने किमान होतील, प्रत्येक वर्णनात सुमारे समान लक्षणांच्या कमाल संख्येने समावेश केला जाईल, आणि ती वर्णने सरूप एककांच्या जास्तीत जास्त संख्येला लागू पडतील.

विज्ञानाची सर्वच मूलभूत उद्दिष्टे भूगोलाच्या सर्व शाखांना सारखीच लागू पडत असली, तरी या विविध शाखा ती ज्या प्रमाणांत साध्य करू शकतात त्यात फरक पडतोच. भूगोलाच्या प्राकृतिक, आर्थिक, राजकीय इत्यादि विशिष्ट शाखांमधील हे फरक, म्हणजे प्रमाणातील फरक, विविध क्रमबद्ध शास्त्रे ही उद्दिष्टे ज्या प्रमाणात साध्य करू शकतात त्या प्रमाणांतील अशाच फरकांशी सुसंगत असतात.

भूगोलक्षेत्रातीलच भौगोलिक ज्ञान ग्रथित करण्याच्या दोन प्रमुख पद्धतींच्या —म्हणजेच क्रमबद्ध भूगोल व प्रादेशिक भूगोल यांच्या, स्वरूपात कमालीचे फरक असल्याचे आढळून येते. या प्रत्येक विभागात विज्ञानाच्या सर्वच विशेष शाखांतील संबंधित भागांचा समावेश करून घेतला जात असतो. या दोन भागांतील ज्ञान ग्रथित करण्याच्या नमुन्यांतील फरकांबरोबरच, ते ज्ञान कोणत्या मर्यादेपर्यंत सर्वसमावेशकांच्या रूपाने —मग ते प्रजातिसंकल्पनांच्या रूपाने असो वा संबंधयोग दर्शक तत्त्वांच्या रूपाने असो— व्यक्त करावयाचे याबाबतही त्यांच्यांत मूलभूत मतभेद आहेत.

प्रथम, प्रत्येक घटनेचा अभ्यास तिच्याच क्षेत्रीय भेदांचा इतरांच्या क्षेत्रीय भेदांशी असलेल्या संबंधांच्या भाषेत केलेला असतो ; आणि नंतर अशा सर्वसाधारण महत्वाच्या विशिष्ट भौगोलिक घटनांच्या भाषेत एकूण क्रमबद्ध भूगोल ग्रथीत केलेला असतो. क्रमबद्ध भूगोलाला वर्णन प्रकार इतर क्रमबद्ध शास्त्रांच्या वर्णनांसारखाच असतो. त्यांच्या प्रमाणेच त्याचाही प्रयत्न संबंधी घटनांच्या प्रजातिसंकल्पना आणि त्यांच्या अभ्यासलेल्या संबंधयोगांची सर्वसमावेशक तत्त्वे प्रस्थापित करण्याचा असतो. मात्र हे सर्व क्षेत्रीय भेदांच्या संदर्भात असणाऱ्या त्यांच्या महत्वाच्या भाषेत व्यक्त केलेले असते. मिळालेले सर्व ज्ञान सर्वसमावेशक तत्त्वांच्या भाषेतच व्यक्त करण्याचा आग्रह धरणे भूगोलाला शक्य होत नाही. —आणि तसा आग्रह कोणत्याच क्रमबद्ध शास्त्राला धरून चालतही नाही— कारण त्याचे पुष्कळसे ज्ञान असाधारण बाबींच्या अभ्यासातून मिळवायचे असते व त्या स्वरुपातच ते व्यक्त करावे लागते.

भूगोलातील प्रजातिसंकल्पना आणि तत्त्वे विकसित करण्याबाबत कोणत्याच तर्कशुद्ध मर्यादा घातल्या गेल्या नसल्यामुळे भूगोलक्षेत्रात अभ्यासावयाच्या घटनांचे स्वरूप आणिं त्यांचे परस्पर संबंध या दोन गोष्टी इतक्या अडचणी निर्माण करतात की त्यामुळे रेखीव तत्त्वे प्रस्थापित करण्याच्या मार्गात अडथळे येतात. भूगोलात येणाऱ्या अडचणी आणि विज्ञानाच्या इतर सर्व शाखांतून याबाबत येणाऱ्या अडचणी कमीजास्त प्रमाणात एकाच प्रकारच्या आहेत. जवळजवळ भूगोलाचे प्रतिरूपच समजल्या गेलेल्या इतिहास क्षेत्रात, अगदी प्रत्येक बाबतीत, या अडचणी भूगोलापेक्षाही बऱ्याच मोठ्या प्रमाणात येत असतात. त्यामुळेच क्रमबद्ध इतिहासाच्या तुलनेने, क्रमबद्ध भूगोलाची सर्वस्पर्शी विचार विकसित करण्याची क्षमता कितीतरी अधिक आहे. तथापि, कोणत्याही एका परिस्थिती संबंधीची ज्ञात वस्तुस्थिती आणि प्रस्थापित तत्त्वे या दोनही गोष्टीतील परिपूर्णता, निर्दोषता व निश्चितता यांचे प्रमाण कनिष्ठ असल्यामुळे, भूगोलक्षेत्रात भविष्यकालीन घटनासंबंधी निश्चित अनुमान बांधण्यास क्वचित अवकाश मिळतो. हे लक्षण भूगोला प्रमाणेच इतिहासात आहे, येवढेच नव्हे तर, इतर अनेक भौतिक व सामाजिक शास्त्रांतूनही आहे.

प्रादेशिक भूगोल स्वतंत्र एककांतील क्षेत्रीय भेदाभेदांच्या सर्व परस्पर संबंधित प्रकारांचे ज्ञान प्रथम संघटित करतो, कारण नंतर ते त्याला एकूण भूक्षेत्राचे भाग व पोटभाग यांच्या क्रमबंधाच्या रूपात ग्रथित करावयाचे असते, त्याच्या वर्णन पद्धतीतही दोन टप्प्यांचा समावेश असतो. प्रथम वेगवेगळ्या एकक स्थळांच्या परस्पर संबंधित रुपध्येयांचे एकीकरण उद्‌गामी व अवगामी पद्धतीने स्पष्ट करून, नंतरच गृहीत क्षेत्रातील अशा सर्व स्थळांचे एकीकरण अशाच उद्‌गामी व अवगामी पद्धतीने केले जावयाचे असते. या लहान, पण निश्चित, स्थळांचा एकरूप एकके या नात्याने त्यांचा विचार करता यावा इतकी त्यांच्या वस्तुस्थितीत काटछाट केली तरच हे शक्य होते. कारण, तसे केल्याने त्यांची परस्पर तुलना करता येते आणि अधिक विस्तृत एककांच्या क्षेत्रीय आकृतिबंधाच्या रूपाने ती सर्व एकत्र करता येतात. प्रत्येक एकक प्रदेशाचे किमान सामीन्यीकृत वर्णन करणे शक्य व्हावे आणि त्या वर्णनात किमान दोष आणि शेष रहावे अशा दृष्टीने, पण एकंदरीने स्वैरपणेच, ही विस्तृत एकके निश्चित केलेली असतात.

ज्या एककांचा विचार प्रादेशिक भूगोलात करावयाचा असतो ती एकके वास्तव नसतात व त्या घटनाही वास्तव नसतात. कारण वर्गीकरणाच्या कोणत्याही पातळीवरून विचार केला तरी, त्यांच्या मूळस्वरूपात काटछाट करावीच लागते. म्हणून प्रजातिसंकल्पना अथवा सत्यस्थिती निदर्शक तत्त्वे स्वतंत्रपणे विकसित करणे भूगोलाला शक्य होत नाही. अर्थात, स्वतःच्या क्षेत्रातील निष्कर्षांचा अन्वयार्थ लावण्यासाठी क्रमबद्ध भूगोलाने प्रस्थापित केलेल्या प्रजाति संकल्पना सत्यस्थिति निदर्शक तत्त्वांवर त्याला अवलंबून रहावेच लागते. शिवाय, अंशतः स्वरूप असलेल्या या विविध क्षेत्रीय एककांच्या तुलनेने, प्रादेशिक भूगोलाला क्रमबद्ध भूगोलाने विकसित केलेल्या संकल्पना व सामान्य तत्त्वे पडताळून पहाता येतात व आवश्यक तेथे ती दुरुस्त करता येतात.

भूपृष्ठाचे असामान्यपणे बदलत जाणारे स्वरूप हाच प्रादेशिक भूगोलाचा प्रत्यक्ष वर्ण्य विषय आहे. भूपृष्ठ हे असे एक एकक आहे, की ज्याचे पोट-विभाग अनुमानानेच पाडावे लागतात. विभागणीच्या कोणत्याही पातळीवरून विचार केला, तरी इतिहासाच्या कालखंडाप्रमाणेच, हे विभागही एकूण स्वरूपाच्या दृष्टीने असाधारण असतात. म्हणजे, तपशीलांच्या अन्वयार्थाचा समावेश त्या निष्कर्षांत केला असला तरीही, प्रादेशिक भूगोलाचे निष्कर्ष बव्हंशी वर्णनात्मकच असतात. तरीही या असामान्यांचे शोध, त्यांचे विश्लेषण व संश्लेषण ही सर्वच " केवळ वर्णने आहेत " असे समजून, ती निकालात काढली जाणे योग्य ठरणार नाही. हे वर्णन शास्त्राच्या एका आवश्यक कार्याचे प्रातिनिधिक स्वरूप आहे, आणि असामान्यांच्या अभ्यासाने शास्त्राला येवढेच कार्य करणे शक्य आहे. अशा असामान्यांच्या स्वरूपाचे परिपूर्ण ज्ञान मिळविणे व ते समजून घेणे, यामुळेच त्या असामान्यांचे सर्वांगीण आकलन होत जाते. म्हणूनच, भूगोलाची सर्वच क्षेत्रे असामान्य असतात, हे भूगोल शास्त्राचे एक सामान्य तत्त्व म्हणून मान्य झाल्यावर, त्याला अन्य कोणतीच सर्वसाधारण तत्त्वे वृद्धिंगत करण्याची गरज रहात नाही.

विशिष्ट प्रकारच्या घटनांचा अभ्यास करणारी क्रमबंधात्मक शाखा आणि सत्यस्थितीत जे त्यांच्या संबंधाचे प्रकार आढळतात, त्या प्रकारांचा अभ्यास करणारी एकीकरण शाखा या दोहोंचीही एकंदरीने सर्वच शास्त्रांना गरज असते. त्याचप्रमाणे, घटनांचा अभ्यास करणारी एक आणि ज्ञानाचे संघटन करणारी एक अशा दोन शाखांची —म्हणजेच क्रमबंधात्मक व प्रादेशिक या दोन्ही पद्धतींची— गरज भूगोलालाही आहे. प्रत्येक प्रकारच्या घटनांमधील क्षेत्रीय भेदाभेद आणि त्यांच्यामधील संबंधांविषयींची नियंत्रक तत्त्वे समजून घेण्यासाठी क्रमबद्ध भूगोल आवश्यक आहे. पण तेवढ्याने, भूक्षेत्रीय एककांचे पूर्णत्वाने आकलन होत नाही. उलट, त्यांनी त्यांच्यातील रंगछटांचे खेळ आणि जीवनांचा बहर ओरबडून काढलेले असतात. म्हणूनच इतर क्षेत्रांशी तुलना करून, प्रत्यक्ष त्या क्षेत्राचे संपूर्ण स्वरूप समजण्यासाठी, निरनिराळ्या एककांत आढळणाऱ्या व परस्पर संबंध असणाऱ्या रूपधेयांच्या एकूणातीचे परीक्षण करण्याची भूगोलाला गरज असते, आणि अशा परीक्षणालाच प्रादेशिक भूगोल असे म्हणतात. त्यापैकी प्रत्येक पद्धती एकाच वेगळ्या दृष्टिकोणाचे प्रतिनिधित्व करत असली, तरी भूगोलाचा एकमेव हेतू साध्य होण्यासाठी दोहोंचीही सारखीच आवश्यकता आहे. म्हणूनच, भूगोलाच्या एकूण क्षेत्रात दोहोंचाही समावेश केलेला आहे, तो योग्यच आहे. शिवाय, या दोनही पद्धती परस्परांना निगडित असून, परस्परांना पोषकही आहेत. भूगोलाचा अंतिम हेतू जगाच्या क्षेत्रीय भेदाभेदांचा अभ्यास करणे हा असतो आणि तो प्रादेशिक भूगोलातच अधिक स्पष्ट झालेला असतो. प्रादेशिक भूगोलाशी आपला संबंध अबाधितपणे राखला, तरच क्रमबद्ध भूगोलाला भूगोलाच्या हेतूला चिकटून रहाता येते; अन्यथा तो इतर शास्त्रांत केव्हाच विलीन होऊन गेला असता. याउलट, प्रादेशिक भूगोलाचे क्षेत्र, तसे पाहिले तर, नापीकच असते. पण, क्रमबद्ध भूगोलाने प्रस्थापित केलेल्या प्रजातिसंकल्पना व सामान्य तत्त्वे यांचे खतपाणी त्याला सतत मिळत राहिले तरच, स्वतःच्या निष्कर्षांचा अन्वयार्थ लावताना निश्चिततेची व निर्दोषतेची वरची पातळी नित्य गाठण्यास लागणारी सृजनक्षमता त्याच्यात निर्माण होणार आहे.

पद्धतितंत्रविषयक चर्चांना सांप्रत जो ऊत आला आहे, तो अमेरिकी भूगोल अभूतपूर्व अशा एका मतभेदांच्या कालखंडात अडकून राहिला आहे याचे लक्षण आहे, अशी त्याची उपपत्ती लावणे चुकीचे ठरेल. बऱ्याच अंशी आजपर्यंत तोंडी चर्चेच्या स्वरूपात असलेल्या या मतभेदांच्या द्रावणाचे लेखरूपाने स्फटिकीभवन होत असल्याचेच ते लक्षण आहे, ही गोष्ट निःसंशय. भूगोलाच्या काही मूलभूत तत्त्वांना प्रथमच लेखी आव्हान दिले गेल्यामुळे, हे मतभेद गेल्या दहा वर्षात पृष्ठभागावरील फेसासारखे दिसू लागले आहेत. ' एक वर्णनात्मक शास्त्र ' या भूगोलाच्या मूलभूत भूमिकेबद्दलच प्रश्न उपस्थित झाला असता, तरी त्या आव्हानामुळे काही खास मतभेद निर्माण झालेले नाहीत. उलटपक्षी, पद्धतितंत्राबद्दल वाद चालू असता, केवळ सवयीने परस्पर-विरोधी पक्ष चर्चेच्या आखाड्यात उतरत त्यांचे मतभेद प्रत्यक्षात दुय्यम प्रश्नांबद्दल होते आणि विज्ञान क्षेत्रातील भूगोलाच्या प्रमुख कार्याबद्दल त्यांचे एकमतच होते, असे या नव्या वादामुळे उघडकीला आले.

प्रादेशिक भूगोलाच्या क्षेत्रातील अभ्यासांच्या महत्त्वासंबंधीच्या मतात लक्षणीय एकवाक्यता अलीकडेच झालेली दिसते, अमेरिकी भूगोलाच्या विकासेतिहासात इतकी एकवाक्यता पूर्वी कधीच झालेली दिसत नाही आणि विशेष असे, की ही एकवाक्यता तात्त्विक आणि व्यावहारिक अशा दोन्ही पातळीवर झालेली दिसते. शिवाय या दोन क्षेत्रांमधील भासमान् दरी क्रमाक्रमाने अरुंद होत चाललेली आहेसे दिसते. कारण, प्रादेशिक भूगोलाचे अभ्यासक विद्यार्थी क्रमबद्ध भूगोलावर अधिकाधिक विसंबून राहू लागले आहेत; आणि ज्या प्रमाणात आपले अभ्यास प्रादेशिक भूगोलाशी सहसंबंध राखणारे असतील त्याच प्रमाणात एकूण भूगोलक्षेत्रातील आपले महत्त्व टिकून राहील, ही गोष्ट क्रमबद्ध भूगोलाच्या अभ्यासकांनाही आता कळून चुकली आहे.

अमेरिकी भूगोल आपल्या क्षेत्राच्या मूलभूत स्वरुपासंबंधीची सर्वमान्य व्यवस्था लावण्याच्या मार्गाने पुढे सरसावला तर एका विस्तृत आणि सर्वसाधारण आघाडीवर विपूल साहित्य निर्माण होण्याचा काल नजीकच्या भविष्यातच आलेला दिसेल, अशी आशा करण्यास हरकत दिसत नाही. अशा प्रकारची सर्वमान्य व्यवस्था दोन-तीन दशकांपूर्वीच जर्मनीत झालेली आहे आणि फ्रेंच भूगोलक्षेत्रात झालेल्या बहुतांश कार्यात ती इतकीशी सुस्पष्ट नसली तर गर्भित आहेच. भूतकालीन व वर्तमानकालीन अभ्यासकांनी मांडलेल्या भिन्न भिन्न मतांचा समर्पक व न्याय्य विचार करून या विषयांशी निगडित असलेल्या सर्व समस्यांचे अंतबार्ह्य परीक्षण मुक्तपणे विचार करणाऱ्या विचारवंतांनी केले तर पद्धतितंत्रविषयक व अन्य, प्रश्नावरही अशी एकवाक्यता संपादन करणे शक्य होईल. म्हणूनच, गेल्या शतकभरात भौगोलिक विचारांतून लिहिल्या गेलेल्या विपुल साहित्याच्या मंथनाने संघटित केलेले हे अन्वेषक परीक्षण पद्धतितंत्रविषयक प्रचलित समस्यांवर केंद्रित केलेले आहे. आपल्या क्षेत्रातील पायाभूत उद्दिष्टे व कूटे यांच्या सर्वमान्य व्यवस्थेला यामुळे हातभार लागेल, अशी मी आशा करतो.

मिनेसोटा विद्यापीठ
जून १९३९



# पुरवणी टीपा

**(टीपांची स्थाने त्या त्या पानावर संबंधी ओळीपुढे उजव्या समासात तारांकित चिन्हांनी (*) किंवा संबंधी वाक्यांच्या शेवटच्या शब्दावर तारांकित चिन्हांनी दाखविली आहेत.)**

| टीप क्रमांक | टीपेचा मजकूर | पृष्ठांक |
|---|---|---|
| १ | स्ट्रॅबोच्या ग्रंथाचा अपवाद वगळल्यास या प्रकरणातील संदर्भ ग्रंथांची यादी त्यांच्या मूळ भाषेत तयार केली आहे. हंबोल्टचे प्रमुख ग्रंथ (संदर्भ सूचीतील क्र. ४५ ते ४७ आणि ५९ ते ६०) पुष्कळ भाषांतून पुन्हा प्रकाशित झालेले आहेत; पण भाषांतरांच्या अचूकपणावर वाचकांनी विसंबून रहाणे इष्ट नाही. रिटरच्या दोन खंडाच्या बाबतीत तर (सूची क्र. ५० व ६१) ते अधिकच खरे आहे. हे दोनही खंड डब्ल्यू. एल. गागी यांनी भाषांतरित केले असून ते Geographical studies (बोस्टन, १८६१) आणि Comparative Geography (फिलाडेल्फिया, १८६५), या नावानी प्रसिद्ध केले आहेत. | ६१२ |
| २ | प्राचीन कालातील भूगोलविषयक दृष्टिकोण स्पष्ट करणारा इंग्रजीतील प्रमाणित संदर्भ ग्रंथ History of ancient Geography (४०२) हा बनबेरीचा ग्रंथ होय. हा ग्रंथ अलीकडेच पुनर्मुद्रित झाला आहे. अलीकडेच उजळणी झालेला पण थोडा संक्षिप्त केलेला टोझरने लिहिला आहे (४०३). विविध संप्रदायांनी केलेल्या कार्याच्या स्वरूपाचे विश्लेषण (४०३) आधुनिक भूगोलकारांनी केलेल्या विश्लेषणाशी अधिक तुलना करून पहाण्यासारखे आहे. अभिजात निर्मितीच्या कालापासून तो थेट एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धापर्यंतच्या संपूर्ण कालखंडासाठी, ग्रंथ संदर्भांनी समृद्ध असलेल्या पेशेलच्या ग्रंथांला इंग्रजी भाषेत तोड नाही (४०१). पण, आपल्या या प्रकरणाच्या दृष्टीने वरील ग्रंथापेक्षाही विसोट्स्कीच्या भौगोलिक विचारांचा तपशीलवार अभ्यासच या प्रकरणाच्या हेतूशी अधिक सुसंगत आहे. विसोट्स्कीचा हा ग्रंथ अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात प्रसिद्ध झाला (१). | १७ |
| ३ | गेल्या वर्षी प्रसिद्ध झालेल्या वार्षिक अहवालात झालेल्या चुकांमुळे या तळटीपेप्रमाणेच पुढील काही टीपांतही भाषांतरे व अनुवादांच्या | ४४ |

## पुरवणी टीपा—चालू

| टीप क्रमांक | टीपेचा मजकूर | पृष्ठांक |
|---|---|---|
| ३ | संदर्भात दुरुस्तीची जरूरी भासू लागली. माझ्या माहितीप्रमाणे, त्या नंतरच्या काळात, या दुरुस्तीच्या विश्वसनीयतेबद्दल कोणताही आक्षेप घेतला गेलेला नाही. | ४४ |
| ४ | यानंतर, ग्रिफिथ टेलरने संपादित केलेल्या " Geography in the Twentieth Century " (न्यूयॉर्क, १९५२ पाने ४२-५९), या ग्रंथातील, ' Geography in the 19th Century ' या आपल्या लेखात जॉर्ज टेथामने हंबोल्ट व रिटर यांच्या कार्याच्या येथील चर्चेला पुष्टी दिली व तिचा विषय विस्तारही केला. हंबोल्टच्या संदर्भात हीच गोष्ट रेफ्रिड एल्. स्टीव्हनसन याच्या La Obra de Alexander Von Humboldt en Mexico, (Publ. No. 202, Institute panamericano de Geographia e Historia, मेक्सिको डी. एफ् १९५६, पाने १९९ ते ३४६). १९५९ मध्ये संपन्न झालेल्या या क्षेत्रांच्या या दोनही " संस्थापकांच्या " शंभराव्या पुण्यतिथी महोत्सवाच्या निमित्ताने जर्मन भूगोलकारांनी त्यांच्या ग्रंथांचा अभ्यास करणारे प्रबंध मोठ्या संख्येने प्रसिद्ध केले. | ४५ |
| ५ | या परिच्छेदाची शेवटची दोन वाक्ये चुकीने लिहिली गेली. हंबोल्टने आपल्या " प्राकृतिक भूगोलात " सर्वोच्च सजीव या अर्थाने मानवाचाही समावेश केला असला तरी त्यात त्याने त्याच्या बौद्धिक क्षेत्राचा व कलाक्षेत्राचा समावेश केला नाही. तथापि, असा भेद एका अर्थी अवास्तव असतो, हे त्याला कळून चुकले होते. (६९, ३८६; ' Perspective ...... ' मधील पान ६८ वरील तळटीप पहा.) | ५८ |
| ६ | ' निसर्ग ' ही संज्ञा रिटरच्या ग्रंथात काहीशी सातत्यभंग करून वापरली गेली आहे. ( ' Perspective ...... ' मधील पान ४८ वरील तळटीप पहा.) | ५९ |
| ७ | आमच्या पाठोपाठ लिओ वायबेलनेही रिटरच्या बागायत पद्धतीच्या उगमाविषयीच्या उपपत्तीचा भक्कमपणा सिद्ध केला. Geographical Review, (क्र. ३२, १९४२, पाने ३०७ ते ३१०.) | ६६ |
| ८ | या वाक्यांतून सूचित होते त्यापेक्षा कितीतरी अधिक निश्चितपणाने रिटरने भूगोलाच्या मर्यादा भूकवचाशी निगडित करून ठेवल्या होत्या. ( Perspective...... पान ४२ वरील तळटीप पहा.) | ७८ |

## पुरवणी टीपा–चालू

| टीप क्रमांक | टीपेचा मजकूर | पृष्ठांक |
|---|---|---|
| ९ | मेरि सॉमरव्हिल संबंधीचे हे विधान पुढच्याच वाक्यात उल्लेखिलेल्या स्योररच्या ग्रंथावर आधारलेले आहे. जे. एन. एल. बेकरला ते संशयास्पद असल्याचे आढळल्याचा उल्लेख ' Mary Somerville and Geography in England ' यात Geographical Journal, CXI, मधील आपल्या अभ्यास लेखात तो करतो. (क्र. १११, १९४८ पाने २०७ ते २२२.) | ८० |
| १० | गुयोत हा जरी फ्रान्समधील ह्युगनॉट कुटुंबात जन्मला असला, तरी त्याचे बरेचसे उच्च शिक्षण जर्मनीत आणि विशेषतः बर्लिन मध्ये झाले. अर्थातच तिथे, तो रिटरच्या हाताखाली शिकत होता. तो एकदा तर रिटरच्या ग्रंथाचे अनेक भाग फ्रेंचमध्ये भाषांतर करण्याच्या उद्योगाला लागला होता. पण ते काम त्याने कधीच पुरे केले नाही हे उघड आहे. त्याला राजकीय कटकटीमुळे स्वित्झरलंड सोडून १८४८ मध्ये अमेरिकेत यावे लागले.<br><br>" मानववंशाच्या इतिहासाच्या संदर्भातील तौलनिक प्राकृतिक भूगोल " या विषयावरील हॉर्वर्डमध्ये त्याने दिलेल्या फ्रेंच भाषेतील लॉवेल व्याख्यानांचे इंग्रजी भाषांतर ' The Earth and Man ' या नावाने १८४९ मध्ये प्रसिद्ध झाले (६४). स्मिथ्सोनियन इन्स्टिट्यूटमध्ये तो दीर्घकालपर्यंत नोकरीत होता. १८५४ मध्ये प्रिन्स्टनमध्ये भूशास्त्र आणि प्राकृतिक भूगोल या विषयाचा प्राध्यापक म्हणून त्याची नेमणूक झाली व हे स्थान त्याने आपल्या मृत्यूकालापर्यंत म्हणजे १८८४ पर्यंत भूषविले. त्याने स्मिथ्सोनियन इन्स्टिट्यूटसाठी वातवरणविषयक व अन्य प्राकृतिक माहितीच्या तक्त्यांच्या विस्तृत मालिका तयार केल्या. (याच त्याच्या कार्यामुळे संयुक्त संस्थानांच्या हवामानविषयक कार्यालयाची प्रस्थापना होण्यास प्रेरणा मिळाली.) याशिवाय त्याने शालेय भूगोल पुस्तकांची एक मालाही प्रसिद्ध केली. [जेम्स डी. डाना यांचा Memoir हा ग्रंथ पहा. (४१०)]. | ८० |
| ११ | रात्सेलच्या संकल्पना आणि त्यांचे उगम यांचा सांगोपांग आणि अधिकारी अभ्यास योहन्नेस स्टाइनमेत्त्लर याने आपल्या पंडित पदवीसंपादनासाठी लिहिलेल्यात " Die Anthropogeographie Friedrich Ratzels und ihre ideengeschichtliches Würzeln " या प्रबंधात Bonner Geographische Adhanlungen, खंड १९, १९५६, यात केलेला आहे. | ८७ |

## पुरवणी टीपा—चालू

| टीप क्रमांक | टीपेचा मजकूर | पृष्ठांक |
|---|---|---|
| १२ | नाझी सत्तेच्या कालखंडात हेटनरला कोणतेही प्रकाशन करण्याची मनाई होती. पण, त्याचा Allgemeine Geographie des Menschen हा ग्रंथ त्याच्या मृत्यूनंतर, म्हणजे १९४७ मध्ये प्रसिद्ध करण्यात आला. त्यातच त्याच्या व्यावसायिक पार्श्वभूमिचे व व्यावसायिक यशाचे वर्णन श्मिट्हेनरने लिहिलेले आहे. | ९१ |
| १३ | डिमार्टोनने १९२४ मधील आपल्या लिखाणात, इतिहासाच्या पाशांतून मुक्त झाल्यानंतरच फ्रान्समधील भूगोलाचा विकास होऊ लागल्याचे त्याच्या नजरेस आले असे नमूद केले आहे (४१२; तसेच पहा ४१५). प्रस्तुत ग्रंथात फ्रेंच अभ्यासकांची भूगोलविषयक मते व्हिडल-डि-लि-ब्लाख, ब्रून्हेस आणि व्हॉलॉक यांच्या लिखाणापुरतीच मर्यादित आहेत. यापेक्षा कितीतरी अधिकांचा विचार Perspective ...... पान ४ व पाने १८८-८९ येथे केला आहे. | ९९ |
| १४ | उगमस्थानांचे संदर्भ न देता पद्धतितंत्रविषयक कार्याची चर्चा करण्याचा ब्रिटिश भूगोल क्षेत्रातील परिपाठाची धन्यच म्हटली पाहिजे ! त्यामुळे अनेक महत्त्वाचे अभ्यासलेख प्रस्तुत लेखकाच्या निदर्शनासच आले नाहीत. अशा लेखांतील विशेष लक्षणीय लेख म्हणजे मॅकिंडरचे पहिले पहिले लेख (४२२ व ४२३) आणि हर्बर्टसन्च्या मृत्यूनंतर म्हणजे १९१५ नंतर प्रसिद्ध झालेला त्याच्या टिपणांचा संग्रह (४२४). " ब्रिटीश विद्यापीठात भूगोलाचे स्थान " या केल्टीने १९२१ मध्ये लिहिलेल्या एका त्रोटक आराखड्यात ब्रिटनमधील भूगोलविषयक विचारप्रवाहांबद्दल बरीच माहिती ग्रथीत केलेली आहे. त्याबरोबरच, त्या काळात तिकडे रूढ असलेल्या मतांची प्रत्यक्ष अवतरणेही त्यात आहेत (४११). ब्रिटीश भूगोलाभ्यासकांनी सापेक्षतः मोठ्या संख्येने प्रसिद्ध केलेल्या पद्धतितंत्रविषयक प्रबंधांचा विचार Perspective ...... च्या पाने ४ ते ७ व १७९ ते १९१ येथे केला आहे. | १०० |
| १५ | 'Congress of Arts and Sciences' च्या Universal Exposition (St. Louis, 1904) च्या संदर्भात लिहिलेला पेंकचा एक लेख होवार्ड जे. रोजर या संपादकाने बोस्टन येथे १९०६ मध्ये प्रसिद्ध केला. पण, या अमेरिकी प्रकाशनात येथे उल्लेख केलेल्या उताऱ्याचा समावेश केलेला नाही. | ११७ |

## पुरवणी टीपा—चालू

| टीप क्रमांक | टीपेचा मजकूर | पृष्ठांक |
|---|---|---|
| १६ | भूगोलाची प्राकृतिक व्याप्ती निश्चित करणाऱ्या भूकवचविषयक संकल्पनेच्या अधिक चर्चेसाठी Perspective......पाने २२ ते २५ पहा. | १२६ |
| १७ | पण, 'भौगोलिक निश्चयनवादा' च्या प्रश्नावर रात्सेल व सेम्पल यांनी घेतलेल्या भूमिकेच्या संदर्भात Perspective...... पान ५६ वरील तळटीप पहा. | १३० |
| १८ | अलीकडच्या काळात "पर्यावरणवादी संकल्पनेचा" अत्यंत ओजस्वी प्रवक्ता ग्रिफिथ टेलर हा होय (४३२, ४३४). त्याने स्वतःच्या भौगोलिक कार्यातील आणि सर्वसामान्यपणे आस्ट्रेलियातील भौगोलिक कार्यातील विकासाचा लिखित पुरावाच सादर केला आहे (४५१). तसेच Perspective ...... पाने ५८ व ६२ पहा. | १३० |
| १९ | बॅरोच्या अध्यक्षीय भाषणावर जरी बरीच चर्चा झाली आणि परदेशीय अभ्यासकांच्या लिखाणांतून त्याचे संदर्भ वारंवार देण्यात आले तरी जॉर्ज रेन्नरचा अपवाद वगळल्यास (४१६), त्याचा अमेरिकी भूगोलावर पडलेला प्रभाव अगदीच अल्पजीवी ठरला. | १३२ |
| २० | नंतरच्या काळात कान्टचे भूगोलविषयक विधान काहीशा निराळ्या स्वरूपात कित्येक लेखांतून आलेले आहे. (१) ज्या स्वरूपात ते येथे सादर केले आहे तेच कान्टने जे प्रत्यक्ष बोलून दाखविले त्याचे बहुधा अगदी जवळजवळ अचूक स्वरूप असावे. (२) त्याच्या व्याख्यानाचा हा विशिष्ट भागच लक्षात घेतला जात असतो तोपर्यंत निरनिराळ्या संदर्भग्रंथातील फरक फारसे महत्वाचे नाहीत आणि (३) याच्या विरूद्ध कांटच्या प्रसिद्ध झालेल्या व्याख्यानांच्या आवृत्तितील अन्य भाग, त्यांची अधिकृतता संशयास्पद असल्यामुळे किंवा ती त्याने आपल्या शिक्षकीपेशातील पहिल्या काही वर्षात सादर केलेल्या सामग्रीवर आधारलेली असल्यामुळे, तितकेसे विश्वसनीय अथवा परिपूर्ण नाहीत. याविरुद्ध येथे भाषांतरित केलेला भाग त्याच्या पेशाच्या मध्यकालातील म्हणजे १७७५ मधील व त्याच्या व्याख्यानाच्या पुष्कळशा विश्वसनीय व परिपूर्ण लिखित पुराव्यावर आधारलेला आहे. | १४७ |

## पुरवणी टीपा–चालू

| टीप क्रमांक | टीपेचा मजकूर | पृष्ठांक |
|---|---|---|
| २० | कान्टच्या विधानाची गुणवत्ता काही असो, नंतरच्या काळातील भौगोलिक विचार प्रवाहाच्या विकास क्रमावर त्याचा महत्त्वाचा प्रभाव पडला असे गृहीत धरता येण्यासारखे नाही. (Perspective...... पान ८० पहा). " कांट व हंबोल्ट ते हेटनर येथपर्यंत आलेली अवकाश शास्त्र या नात्याने भूगोलाची संकल्पना. " हा या विषयावरील प्रस्तुत लेखकाचा लेख पहा. अमेरिकी भूगोलाभ्यासक संघटनेचा वार्षिक अहवाल १९५८. (खंड ४८, पाने ९७ ते १०८). | १४७ |
| २१ | या विषयावरील हंबोल्ट व रिटर यांच्या दृष्टिकोणांसंबंधीची आणखी विधाने मागच्या एका प्रकरणात, पान ७७ वर समाविष्ट केलेली आहेत. तशीच ती विशेषेकरून माझ्या १९५८ च्या लेखात ती दिली आहेत व त्याचा संदर्भही आधीच्या टिपणांत दिलेला आहे. त्यातच १७९३ मध्ये त्याने केलेल्या पायाभूत विधानाच्या मूळ लॅटिन प्रतीवरून केलेल्या भाषांतराचाही अंतर्भाव केलेला आहे. | १४८ |
| २२ | जवळजवळ त्याचवेळी आणि अगदी स्वतंत्रपणे क्रेब्जनेही आपल्या भूगोलविषयक संकल्पनांचे विधान केले आणि त्या हेटनरच्या संकल्पनांशी बव्हंशी समरूप होत्या, हे त्याच्याही लक्षात आले (४१६). | १५४ |
| २३ | हंबोल्टच्या या विषयावरील विधानाची कल्पना हेटनरला नव्हती याची खातरजमा त्यानेच मला लिहिलेल्या एका खाजगी पत्रावरून झालेली आहे. नंतर केलेल्या चौकशीतून, कांट व हंबोल्ट या दोघांच्या संबंधांचा अथवा कांट, हंबोल्ट व हेटनर याचे या संकल्पनेच्या संदर्भात आलेले संबंध या विषयीचा कोणताच निश्चित पुरावा निष्पन्न होऊ शकला नाही. टीप क्र. २० मध्ये निर्देशित केलेला माझा १९५८ मधील लेख पहावा. | १५५ |
| २४ | शास्त्र परिवारात भूगोलाचे स्थान या संकल्पनेचा या अभ्यासग्रंथात समावेश केला आहे आणि अगदी अलीकडच्या एका अभ्यासग्रंथात काही किरकोळ फेरबदल व विस्तार करून त्याचा पुनरुच्चारही केला आहे; कारण बाह्य पुराव्याच्या आधारे निश्चित केलेल्या भूगोल-लक्षणांचे त्यात स्पष्टीकरण केलेले दिसते. अर्थातच ज्यावर ते निष्कर्ष अवलंबून आहेत असे एक मौलिक व आवश्यक प्रमेय म्हणून त्या संकल्पनांचा विचार केला जाता कामा नये. Perspective ...... पाने १० f व १७३ ते १८२ पहा. | १५५ |

## पुरवणी टीपा—चालू

| टीप क्रमांक | टीपेचा मजकूर | पृष्ठांक |
|---|---|---|
| २५ | रिटरचे हे विधान पान ५७ वर अधिक पूर्णपणे स्पष्ट केले आहे आणि Perspective ...... च्या पान ६६ वरील तळटीपेत त्यात आणखी भर घातली आहे. | १५८ |
| २६ | क्राफ्टच्या प्रश्नाला या विधानाने दिलेले उत्तर असमर्पक असल्याचे दिसून येते. त्याचाच पुनर्विचार Perspective ...... पाने ४१ ते ४७ वर केला आहे. | १६० |
| २७ | " इतिहासाचा भूगोलाशी संबंध " या विषयावरील हे प्रकरण तर्कदृष्ट्या पुढे जावयास पाहिजे. आणि अभ्यासकानेही याचे वाचन १० वे प्रकरण पूर्ण होईपर्यंत पुढे ढकलले, तर त्याच्या विचारांना तडे जाण्याची क्रिया कमी प्रमाणात होते आहे असे त्याच्या अनुभवास येण्याची शक्यता आहे. यानंतर येणाऱ्या प्रकरणांच्या तुलनेने त्याचा संकुचित आकार हा त्याच्या महत्वाचे ' माप ' आहे असे समजू नये; उलट आपल्या देशातील भूगोलाभ्यासकांत त्याकाळी तो एक वादाचा विषय बनण्याची शक्यता किती कमी होती याचे ' माप ' म्हणजे हा आकार असे समजावे. त्याचप्रमाणे, प्रस्तुत ग्रंथकाराचे हेटनरच्या विवेचनाशी संपूर्ण एकमत होत असल्याचे त्याला दिसून आले या वस्तुस्थितीचेही ते प्रतिबिंब आहे (पान १८६ f वर दाखविलेला संदर्भ वगळला, तर) त्या संपूर्ण प्रकरणात हेटनरच्याच मताचा सातत्याने अनुवाद करण्यात आला आहे, या विषयाचा पुनर्विचार Perspective ...... च्या आठव्या प्रकरणात, पुढे दिलेल्या बदलासह केलेलाच आहे. | १९९ |
| २८ | हेटनरच्या मतांना विन्क्लरने कसून विरोध केला. त्याच्या मते भूगोल हे स्थलाबरोबर कालाचेही शास्त्र आहे. ' भूदृश्ये ' हा भूगोलाभ्यासाचा एक विषय आहे. (या ग्रंथाचे ९ वे प्रकरण म्हणूनच सांस्कृतिक भूदृश्याचा म्हणजेच Landschaft चा इतिहास हा भूगोलाभ्यासातील एक अत्यावश्यक विषय आहे). (याबरोबर पुढील टीप क्र. ३८ पहा.). | २०२ |
| २९ | ब्रोकच्या या अभ्यास ग्रंथाचा निर्देश पुढे पान १८७ वरील चर्चेत आलेल्या " तौलनिक ऐतिहासिक भूगोला " चे सयुक्तिक उदाहरण म्हणून व्हावयास हवा होता. | २०३ |

## पुरवणी टीपा–चालू

| टीप क्रमांक | टीपेचा मजकूर | पृष्ठांक |
|---|---|---|
| ३० | अद्याप भाराला न आलेल्या फळझाडांच्या रोपांची सापेक्ष संख्या हाच प्रादेशिक कल दाखविणारा निर्देशांक म्हणून तिचा उपयोग करावा असे सांगणारा माइगचा अभ्यास लेख याच विचार प्रवाहाचे उदाहरण आहे. ज्यांचा हिशोब उत्पादन संख्येत केलेला नसतो अशी झाडे हाच त्या प्रदेशाच्या कार्यकारी अर्थस्थितीचे महत्त्वाचे रुपधेय असते आणि भविष्यकाळात एका निराळ्या रीतीने तेच एक महत्त्वाचे रुपधेय होणार असते. लेखकाचे लक्ष त्या फळबागांच्या वाढीच्या प्रत्यक्ष प्रक्रियेकडे प्रामुख्याने लागलेले नाही तर या दोनही वेळी त्या त्या परिस्थितीकडे त्याचे लक्ष लागलेले आहे (४५०). | २१० |
| ३१ | याप्रमाणेच, " आपण काय करतो आहोत याच्या अज्ञानामुळे भूगोलात इतिहासाचे मिश्रण होण्याचा धोका असतो " असे उद्‌गार मॅकिन्डरने १९३१ मध्ये काढले आणि पुढे दाखविलेल्या भेदाच्या रुपाने त्याने या कोड्याची किल्लीही आपल्या हाती देऊन ठेवली. " माझ्या मते, भूगोल हा विकासात्मक अभ्यास नसून कार्यात्मक आणि रचनात्मक अभ्यास आहे. त्यात उत्पत्तिदर्शक अथपिक्षा प्रगतिदर्शक अर्थानेच कार्यकारण संबंधांचे वर्णन येणे इष्ट आहे ". (४२९, २६८; अशाच प्रकारची चर्चा प्रस्तुत ग्रंथाच्या ३५८ पानावरही आहे). | २११ |
| ३२ | या प्रकारच्या उर्वरित भागात सादर केलेल्या विवेचनाचे पुनः परीक्षण व येथे काढलेल्या निष्कर्षात झालेले काही फरक Perspective ......... च्या पाने १०२ ते १०६ यात पहा. | २१५ |
| ३३ | १९३९ मध्ये हा ग्रंथ लिहिला जात असताना या प्रकरणाच्या विवेचनात आलेल्या मर्यादा हा जर्मन आणि अमेरिकी भूगोलकारांच्या पद्धति तंत्रविषयक लिखाणातील एक खळबळजनक चर्चेचा विषय झाला होता. पण, सद्यःस्थितीत त्याचा पाठपुरावा करणारा कोणीही अमेरिकी भूगोलकार असल्याचे माझ्या माहितीत नाही. | २१७ |
| ३४ | एका चक्री चर्चेत फींच याने केलेली ही विधाने ही त्याने पूर्ण विचाराअंती घेतलेले निर्णय होते असे समजणे चुकीचे ठरेल. ज्यांनी या मर्यादांचे आग्रहपूर्वक प्रतिपादन केले त्यांचे विचार त्यात स्पष्टपणे सादर केलेले आहेत, येवढ्याच कारणासाठी त्यांचा येथे उपयोग केला आहे. | २२५ |

## पुरवणी टीपा–चालू

| टीप क्रमांक | टीपेचा मजकूर | पृष्ठांक |
|---|---|---|
| ३५ | येथे व या ग्रंथातील असंख्य ठिकाणी " क्षेत्रीय भेदाभेद " ही संज्ञा ज्याप्रकारे वापरली गेली आहे त्यामुळे सहजगत्या काही गैरसमज निर्माण झालेले निदर्शनास आले. म्हणून, प्रस्तुत लेखक त्याऐवजी आता " क्षेत्रीय बदल " अशी संज्ञा वापरू लागला आहे. Perspective ...... पाने १२ ते २१ पहा. | २८० |
| ३६ | काही तर्कसिद्ध कारणांनी, क्षेत्र बदलांच्या महत्त्वमापनाची एक जास्तीची कसोटी, अर्थात मानवाच्या दृष्टीने महत्त्व ही कसोटी, भूगोलाभ्यासक खरोखरीच अवलंबत असतात, हा प्रस्तुत लेखकाने काढलेला निष्कर्ष या नंतरच्या काळातील आहे. Perspective...... पाने ४१ ते ४७ पहा. | २८५ |
| ३७ | मला माहीत असलेला आजचा कोणताच अमेरिकी भूगोलकार प्रदेश ही एक वस्तू असल्याचे ठामपणे सांगत नसला, तरी प्रदेशविषयक संकल्पनेसंबंधीच्या चर्चा मात्र अशा गृहीत प्रमेयावर आधारलेल्या असतात, की त्यावरून अशा स्वरूपावरच त्यांची श्रद्धा आहे असे सूचित होते. | २९८ |
| ३८ | अशाच काही गृहीत प्रमेयाच्या आधारे १९३८ मध्ये, विंक्लरने सामान्य भूगोलाची, म्हणजे क्रमबद्ध भूगोलाची तर्कशुद्ध पुनर्घटना करावी आणि त्यासाठी प्रदेशाचे रचनाशास्त्र, प्रदेशाचे कार्यशास्त्र, प्रदेशाचे कालक्रम वर्णन, प्रदेशाचे वंटनशास्त्र आणि प्रदेशाचे प्रकारात्मक क्रमबंध या संज्ञांची परिभाषा वापरावी असे आग्रहपूर्वक प्रतिपादन केले. अर्थातच, हवामानशास्त्र, भूरुपवर्णनशास्त्र इत्यादी मंडळींची त्याने त्या त्या शास्त्रांकडे हकालपट्टी केली (४४२). | ३१२ |
| ३९ | या प्रकरणातील आणि पुढील प्रकरणाच्या काही भागातील प्रदेशांच्या विवेचनात, प्रदेश संकल्पनेत झालेल्या नंतरच्या काळातील विकासाच्या संदर्भात, काही महत्त्वाचे फेरफार करणे आवश्यक होऊन बसले. त्याचे विश्लेषण Perspective... पाने १२९ ते १४३ येथे आलेले आहे. | ३४१ |
| ४० | १९१४ साली, योर्गने या विषयावर प्रकाशझोत टाकणारे सहाप्रकाशित नकाशांचे विश्लेषण सादर केले. हे नकाशे उत्तर अमेरिकेच्या " नैसर्गिक प्रदेशांचे " होते. त्यातच त्या खंडाचे आणखी पंधरा विभागही पाडलेले होते. त्यापैकी प्रत्येक नकाशा एकाच घटकावर आधारलेला होता; उदाहरणार्थः प्राकृतिक भूगोल, | ३५३ |

## पुरवणी टीपा–चालू

| टीप क्रमांक | टीपेचा मजकूर | पृष्ठांक |
|---|---|---|
| ४० | हवामान किंवा वनस्पतिजीवन (४४३). हा अभ्यास ग्रंथ युरोपीय साहित्याच्या सांगोपांग परीक्षणावर आधारलेला व त्यात गॅलोरने लिहिलेल्या व्हिडाल-ड-ल ब्लाखच्या संप्रदायातील एका उदाहरणाबरोबरच हर्बर्टसन, हेटनर आणि पासार्ज यांच्या साहित्याचाही समावेश केलेला होता (४३७). त्याचवेळी घडलेल्या एका ऐतिहासिक महत्त्वाच्या घटनेचीही दखल घेतली पाहिजे. अमेरिकी भूगोलाभ्यासकांच्या एका समितीने " एक आगळे आणि उच्च दर्जाचे कार्य " म्हणून संयुक्त संस्थानांच्या " नैसर्गिक प्रदेशांच्या " नकाशांची रचना करावयाची व त्यातून " प्रादेशिक अन्वीक्षणासाठी तर्कशुद्ध एकके " पुरवावयाची असे दुहेरी कार्य हाती घेतले होते (४४४). पण, समितीने ते पुढे ढकलण्याचा निर्णय घेतला आणि त्या ऐवजी संयुक्त संस्थानांची विभागणी प्राकृतिक एककांत करण्याच्या कार्यावरच लक्ष केंद्रित करावयाचे ठरविले. ते कार्य शेवटी प्राध्यापक फेनमान यांनी तडीला लावले. | ३५३ |
| ४१ | पर्यावरणातील सर्वच कारकांचा विचार होत असताना त्यांत मानवोत्पादित कारके व निसर्गोत्पादित कारके असा भेद करणे भूगोलदृष्ट्या आवश्यक आहे. हे प्रमेय नंतरच्या असंख्य चर्चांतून गृहीत धरले गेले, सामान्यपणे सर्वच भूगोलकारांनी ते पूर्वीपासूनच गृहीत धरलेले आहे आणि तेच या परिच्छेदात ग्रंथित केले आहे. पण आता मात्र या प्रमेयावर आक्षेप घेण्यात येत आहेत. पहा Perspective... पाने ४८ ते ६४. | ३५९ |
| ४२ | हा ग्रंथ लिहिला गेला त्यावेळी हा विषय निरपवादपणे केवळ शैक्षणिक अभिरुचीचा म्हणूनच गणला जात असे. पण नंतरच्या काळात, नियोजनाच्या प्राथमिक टप्प्यात आर्थिक नियोजनासाठी एखाद्या क्षेत्राची वा प्रांताची अगदी समर्पक विभागात प्रादेशिक विभागणी करावयाची असते त्यावेळी नियोजनविषयक अभ्यास गटात भाग घेण्यासाठी पुष्कळ देशात भूगोलकारांना पाचारण करण्यात आले. अर्थातच, नंतरच्या टप्प्यात राजकीय पोटविभाग म्हणून जेव्हा प्रदेशांचा विचार करावयाचा असतो तेव्हा त्यांना पाचारण केले जाण्याची शक्यता कमीच असे. या विषयावरचे प्रकाशित साहित्य आता खूप उपलब्ध असले तरी अप्रकाशित साहित्य त्याच्या कितीतरी पटींनी अधिक आहे. | ३६७ |

## पुरवणी टीपा—चालू

| टीप क्रमांक | टीपेचा मजकूर | पृष्ठांक |
|---|---|---|
| ४३ | भौगोलिक परिस्थितीचा मानवी विचारावर होणाऱ्या परिणामांचे एक अंग म्हणून " प्रत्यक्ष भौगोलिक परिस्थितीचा भौगोलिक विचारांच्या स्वरुपावर उमटणारा ठसा " या विषयाचा भूगोलकारांनी अभ्यास करण्यास हरकत नाही, असे सुचवत असतानाच, जॉन के. राइट याने पुष्कळ पूर्वीच्या काळातील अनेक दाखलेही नोंदवले आहेत. —अशा प्रकारच्या अभ्यासांना " भूगोलाचा भौगोलिक इतिहास " असे नाव द्यावे असेही त्याने सुचविले आहे. (४०५). | ३७१ |
| ४४ | याशिवाय, क्षेत्रीय आकारमान हाच प्रादेशिक विभागणीचा एक कारक असतो. औपपत्तिक स्वरुपाचे खंडांतर्गत मैदान त्यातील नैसर्गिक रुपधेयांबाबत व सांस्कृतिक पार्श्वभूमीबाबत ते संपूर्णपणे सजातीय असते. तरीही, नागरी-ग्रामीण व्यापार आणि नागरी वसाहतींची मोठी केंद्रे यांची आवश्यकता भासू लागताच भिन्न स्वरुपाच्या आर्थिक प्रदेशांचा विकास होण्याच्या दिशेने पावले पडू लागतात असे इतर लेखकांबरोबर, ल्योशने दाखवून दिलेले आहे (४४९). | ३७२ |
| ४५ | मार्क जेफरसनने आपल्या १९१६ च्या अध्यक्षीय भाषणात महत्त्वपूर्ण प्रादेशिक विभाग शोधण्यासाठी एक अत्यंत उद्बोधक सूचना केली. नगरे व शहरे यांचे नकाशीकरण करावे आणि या मानवी वसाहतींचे गट विरुद्ध कमी प्रमाणात भेदभाव दाखविणाऱ्या ग्रामीण वसाहती असे निरीक्षण करावे (४४६). | ४०० |
| ४६ | यापुढील विवेचनात ' नियमरचनात्मक ' या संज्ञेत जाति संकल्पनांच्या रचनेबरोबरच नियम रचनांचाही अंतर्भाव होतो असे मानलेले आहे. तसेच " Unique " या संज्ञेचा अर्थ " असामान्य " असा करावयाचा नसून " आगळावेगळा " असा करावयाचा आहे. | ४६२ |
| ४७ | जाति संकल्पना अथवा सामान्य नियम प्रस्थापित करण्याचा भूगोल किती प्रमाणात प्रयत्न करत असतो आणि त्याबरोबर वेगळ्या क्षेत्रांचा किती प्रमाणात विचार करत असतो, हा या प्रकरणाच्या बहुतांश उर्वरित भागात चर्चेसाठी घेतलेला प्रश्न Perspective... पाने १४७ ते १७२ येथे पुनर्विचारासाठी अगदी सरळपणे घेतलेला आहे. भूगोलाचा संबंध दोन्हीशी आहे या मूलभूत निष्कर्षात त्या चर्चेमुळे काहीच फरक पडणार नसला तरी काही पुरवणी निष्कर्ष काढणे शक्य व्हावे अशी काही नवी सामग्री त्या चर्चेत ग्रंथित केलेली आहे. | ४६६ |

## पुरवणी टीपा—चालू

| टीप क्रमांक | टीपेचा मजकूर | पृष्ठांक |
|---|---|---|
| ४८ | हेटनर (४३८), विल्यम मॉरिस डेव्हिस (४४५) आणि कॅम्पबेल (४४७) अशा सारख्या लेखकांच्या पहिल्या पहिल्या अभ्यास ग्रंथात विशेषेकरून भूरुपांसंबंधी, जातिसंकल्पना विषयक किती तरी मौल्यवान सामग्री आहे. | ४७१ |
| ४९ | या प्रकरणातील क्रमबद्ध आणि प्रादेशिक भूगोलाची तुलना व त्याचे संबंध या विषयावरील चर्चेत या दोन दृष्टिकोणातील तीव्र विरोध स्पष्ट होतो. या विषयाच्या पुनर्विचारातून आणखी एकच निष्कर्ष निघाला. विशिष्टाभ्यासी एकघटकनिष्ठ अभ्यासांकडून जवळजवळ संपूर्णपणे प्रादेशिक अशा अभ्यासांकडे, असा क्रमाने व अखंडपणे चढत्या भाजणीचा अभ्यास येवढेच त्याचे वास्तव स्वरुप नजरेपुढे रहाते. | ४८६ |
| ५० | यापूर्वीचे दोन परिच्छेद आणि पुढील काही पानांवरील दुसरे काही परिच्छेद एकाच सर्व संमत गृहीतकावर आधारलेले आहेत. भूगोलाची सर्व विविध ' नैसर्गिक ' अंगे भूगोलाची एकच शाखा संघटित करतात. याच्या विरुद्ध दुसरी एक प्रमुख शाखा असते, तिला मानवी भूगोल असे म्हणतात. गेल्या दशकभर तोंडी चर्चांतून आणि पत्रव्यवहारांतूनही या मताला प्रस्तुत लेखकाने कसून विरोध केलेला आहे. आता तर त्याने Perspective......... च्या पाने ६७ ते ८० येथील चर्चेत त्या आक्षेपांची नोंदही केलेली आहे. | ४८८ |
| ५१ | त्सूबरने १९३७ साली लिहिलेल्या एका छोटेखानी प्रबंधात नियोजनाशी संलग्न शास्त्रांचे तात्त्विक संबंध आणि त्यांचे नियोजन कार्याशी असलेले संबंध, यांची तुलना केलेली आहे. (४५६) तसेच संदर्भसूचीतील क्र. ४५१ ते ६० हे निबंध पहा. | ४८८ |
| ५२ | ज्या ग्रंथांना त्यांचे लेखकच " राजकीय भूगोल " असे नाव देतात, त्याच ग्रंथावर आधारलेले एक वास्तव विधान या नात्याने हा निष्कर्ष निश्चितच अचूक आहे. हे खरे असले तरी याच शीर्षकाखाली ज्यांचा समावेश होण्यास हरकत नाही अशा अन्य प्रकारच्या अभ्यासानांही मान्यता देण्याचे कामी भूगोलकारांना यश आले नाही. त्या अपयशाचे हा निष्कर्ष हे प्रतिबिंब आहे. नंतरच्या काळात या मतात झालेल्या विकासाची प्रस्तुत लेखकाने पुढील अभ्यासलेखात चर्चा केलेली आहे. " राजकीय भूगोलाचा कार्यकारी | ४९१ |

## पुरवणी टीपा–चालू

| टीप क्रमांक | टीपेचा मजकूर | पृष्ठांक |
|---|---|---|
| ५२ | दृष्टीकोण " अमेरिकी भूगोलकार-महामंडळाचे वार्षिक अहवाल, खंड ११ (१९५०) पाने ९५ ते १३०. तसेच, अमेरिकी भूगोलातील " राजकीय भूगोल : एक सूची व भावी विकासाच्या दिशा ", प्रेस्टन इ. जेम्स व क्लॅरेन्स एफ्. जोन्स, प्रकाशन-सिराकस, १९५४, पाने १६२ ते २२५ : आणि " आधुनिक जगातील राजकीय भूगोल " कॉन्फ्लिक्ट रिझोल्यूशन, IV (१९६०) पाने ५२ ते ६६. | ४९१ |
| ५३ | शासकीय प्रतिनिधिमार्फत होणाऱ्या कार्याचा विचार या ग्रंथात फारसा केलेला नाही कारण अशा कार्यांचे स्वरूप " उपयोजनात्मक भूगोला " चे असते. अशा कार्यात प्रस्तुत लेखकानेही पुष्कळदा भाग घेतलेला आहे. अशाप्रकारच्या अभ्यासांचे भूगोलाच्या कोणत्याच औपपत्तिक शाखेत सरळ वर्गीकरण करणे शक्य होत नाही किंबहुना प्रत्यक्ष शास्त्राच्याच कक्षेत ते येत नाही, हे आम्ही पूर्वीच दाखवून दिले आहे (पाने ३९९ व पुढे). अशा व्यावहारिक प्रश्नांत कार्यांचे स्वरूप एका बाजुने प्रत्यक्ष त्या प्रश्नांची हुकूमत चालत असते, तर दुसऱ्या बाजुने त्या अभ्यासक व्यक्तीच्या विशेष पात्रतेमुळे प्रभावित होत असते. | ४९६ |
| ५४ | भूरुपवर्णन शास्त्राचा भूगोलाशी संबंध हा प्रश्न येथेच नव्हे तर या सर्व ग्रंथातच टाळण्याचा प्रयत्न केला आहे. पण, याच विषयाचा सविस्तर विचार Perspective... पाने ८४ ते ९६ येथे केला आहे. | ५१७ |
| ५५ | " भविष्यकथन" या संज्ञेला आवश्यक असलेले अति-निश्चिततेचे अत्युच्च प्रमाण या विधानात गृहीत धरलेले आहे. Perspective... पान १६५ वरील तळटीप क्र. १० पहा. | ५३१ |
| ५६ | या यादीत वेलिंग्टन जोन्सने १९३० मध्ये लिहिलेल्या एका छोट्याशा निबंधाचाही (४४८) समावेश व्हावयास हवा होता. क्षेत्रीय विश्लेषणाची " भागशः पद्धती " त्या निबंधात प्रथमच सादर करण्यात आली. ही पद्धती स्प्रिंगफील्ड गटाने तयार केली. त्यानंतर फींचने ते काम अधिक पूर्णत्वाने तडीला लावले (२८५); आणि त्यानंतर तीच नियोजनात्मक सर्वेक्षणासाठी तिच्यात थोडा फेरफार करून वापरण्यात आली आणि हडसनने त्याचे वर्णन केले (४५८, ४५९). | ५३४ |
| ५७ | ज्याच्यावर खूप भर देण्यास हरकत नाही असे हे वाक्य Perspective... च्या पान १६४ वर अधिक विस्ताराने दिलेले आहे. | ५५९ |

● ● ●

# अमेरिकी भूगोलाच्या पद्धतितंत्रविषयक चर्चेतील रुढी व आचार

लेखक–रिचर्ड हार्टशॉर्न

( डिसेंबर १९४७ च्या वार्षिक सभेत सादर केलेली पत्रिका )

आपल्या कार्यक्षेत्राचे स्वरूप, त्याचे हेतू आणि त्याच्या प्रक्रियेच्या सामान्य पद्धती या विषयांच्या प्रश्नाकडे पहाण्याची अमेरिकी भूगोलकारांची विरोधाभासात्मक प्रवृत्ती उघड दिसते. प्रकाशित झालेल्या अभ्यास ग्रंथावरून निवाडा करावयाचा झाल्यास, अशा प्रश्नांचे परीक्षण करण्यात त्यांना फारशी गोडी वाटत नाही. असाच कोणीही निर्णय देईल. पण, अशा विवाद विषयांवरील चर्चांच्या एकूण संख्येचा विचार करून न्याय द्यावयाचा झाला तर, वरील निष्कर्षाच्या अगदी विरूद्ध निष्कर्ष काढावा लागेल.

आशय प्रधान ग्रंथांतील ग्रंथित विषयांवर आश्चर्य वाटावे इतका अल्प विवाद निर्माण होत असतो. कारण, आमचे अभ्यासक्षेत्र त्यातील कार्यकर्त्यांच्या प्रमाणाने येवढ्या प्रचंड क्षेत्रात विस्तारलेले आहे, की आपले मार्ग क्वचितच एकमेकाच्या आड येतात. पुष्कळदा आपण निराळ्या क्षेत्रात पण समांतर मार्गावर कार्य करत असतो. परिणामतः पद्धतितंत्र, हा आपल्या कार्य क्षेत्रातला प्रमुख पण साधारण अवयव बनला आहे. ही एकच बाजू अशी आहे की त्याबाबत मत देण्याची क्षमता आपल्या ठिकाणी आहे असे प्रत्येकासच वाटते. त्याबरोबरच, अमेरिकी भूगोलाचा विकासेतिहासच असा आहे, की आपल्या क्षेत्रातील आशयप्रधान प्रश्नांवर त्यांचे जेवढे एकमत होते, त्यापेक्षा बरेच कमी एकमत त्या क्षेत्राच्या स्वरुपासंबंधीच्या प्रश्नांवर होत असते. आपण पद्धतितंत्रविषयक प्रश्नांना किती महत्त्व देतो याचा पुरावा आपण त्या प्रश्नाचा ज्या विस्ताराने चर्चा करतो त्यावरूनच मिळतो. तरीही या पद्धतितंत्रविषयक चर्चांचा कल युक्तिवाद करणे व निष्फळ वादविवाद करणे याकडेच जास्त असतो. याची जाणीव झाल्यामुळेच की काय, पण आपण या भूगोलविषयक प्रश्नांची ज्याप्रकारे चर्चा करतो व त्यावर युक्तिवाद करतो त्या पद्धतिबाबतच एकमेकावर टीका करत रहातो. या टीका प्रतिटीकांतून असे सूचित होते, की उचित प्रवृत्ती व संचालन या विषयींचे नियम कोठेतरी अस्तित्वात असले पाहिजेत, पण ते कमी अधिक प्रमाणात सामान्यतः मान्य असले तरी अलिखितच असले पाहिजेत.

एक टीकाकार आणि प्रतिस्पर्धी टीकेचे एक लक्ष्य या दोनही नात्यांनी मला जे अलीकडे अनुभव आले त्यामुळेच स्वरूपविषयक चर्चांतून एक समाज-गट म्हणून अमेरिकी भूगोलकारांच्या रुढी व आचार तरी काय आहेत यावर खोल विचार करणे भाग पडले. प्रकाशित साहित्यातून आमच्या प्रतिक्रिया संबंधीचा सप्रमाण पुरावा काही प्रमाणात

उपलब्ध झाला. माझ्या आठवणींतून आमच्या मंडळाच्या वार्षिक सभेच्या वेळी होणाऱ्या चर्चांतून अंशतः तसेच माझ्याशी झालेल्या चर्चेत केलेल्या विशिष्ट तोंडी टीकांतून बऱ्याच अंशाने आणि भूगोलाच्या स्वरुपासंबंधीच्या माझ्या स्वतःच्याच चर्चेसंबंधी पत्रव्यवहारांतून विशेषेकरून हा पुरावा उपलब्ध झाला.[1]

अमेरिकी भूगोलकारांच्या पद्धतितंत्रविषयक चर्चांच्या वर्तमान रुढी व आचार ज्यांच्या माध्यमातून व्यक्त होतात त्या विशिष्ट प्रवृत्ती व ते नियम याच पुराव्याच्या सहाय्याने अवगामी पद्धतीने सिद्ध करणे आणि त्यांच्यापैकी प्रत्येकाची संयुक्तिकता विश्लेषणाने निश्चित करणे, हाच या पत्रकाचा हेतू आहे.

## (१–२) भूगोलाची चर्चा आवश्यक आहे का ?

वस्तुस्थितीवरून काढण्यासारखा पहिला निष्कर्ष असा आहे, की पद्धतितंत्रविषयक चर्चांना खरोखरीच काही मूल्य आहे का, या विषयी अमेरिकी भूगोलकारांच्या मनात बराच संभ्रम आहे. हाती आलेला पुरावा वरवर चाळूनही भूगोलाभ्यासकांची दोन गटात वर्गवारी करता येईल. एक गट ' भूगोल म्हणजे काय ? ' याबद्दल वादविवाद करत रहातो, तर दुसरा गट अशाप्रकारची चर्चा हा कालापव्यय आहे असाच युक्तिवाद करतो. ज्या व्यक्ती अशा प्रकारच्या चर्चांतून प्रामुख्याने भाग घेत असतात, त्याच अशा प्रकारच्या चर्चा मुळीच महत्त्वाच्या नसतात असा युक्तिवाद इतरत्र करताना आढळतात. बरेच जण समांतर रेषांत उभे असतात आणि दोनही गटांचे युक्तिवाद स्वीकारतच रहातात. दुसऱ्या काहींच्या मते प्रशिक्षण कालाच्या पूर्वभागात अशा चर्चांना काही मूल्य असते, पण अभ्यासकाने एकदा आपले हेतू व पद्धती प्रस्थापित केल्यावर अशा चर्चा निष्फळ ठरतात.

---

१. या पत्रकात वापरलेला विश्वासार्ह पुरावा प्रस्तुत लेखकाच्या ' भूगोलाचे स्वरूप ' या अभ्यास ग्रंथाच्या संदर्भात प्रसिद्ध झालेल्या समीक्षणांवरून आणि त्याहीपेक्षा अधिक व्यक्तिगत पत्रव्यवहारावरून घेण्यात आलेला आहे. यांपैकी बरीचशी पत्रे सखोल विचार करणारी आणि स्पष्टवक्ती पण आपुलकीने ओथंबलेली आहेत. अशा स्वरुपाचा पुरावा वापरत असताना, त्यांच्या उगमस्थानांचा नामनिर्देश करणे अनुचित वाटते. म्हणून ज्या सहकाऱ्यांनी माझ्या अभ्यासग्रंथाच्या विचारधारेला योगदान केले त्या सर्व सहाध्यायांच्या रसिकतेबद्दलची कृतज्ञता व्यक्त करण्याचीच मर्यादा घालणे उचित वाटते. अशा टीकांपैकीच एका लेस्टर इ. क्लिम् यांच्या ग्रंथाच्या द्वितीय मुद्रणाच्या निमित्ताने लिहिलेल्या व ' भौगोलिक समीक्षण ' या नियतकालिकाच्या जुलै १९४७ च्या अंकात प्रसिद्ध झालेल्या ("Commentary"—Geographical Review, July 1947, pp 486-490) टीकालेखाच्या रसिकतेबद्दल कृतज्ञता मला विशेषत्वाने व्यक्त केलीच पाहिजे. त्यात ज्या कार्यासाठी प्रस्तुत ग्रंथाचा उपयोग केला जात आहे त्यासंबंधीची माहिती प्रयत्नपूर्वक गोळा केली आहेच; त्याशिवाय अमेरिकी भूगोलकारांच्या या ग्रंथापुरत्याच नव्हे तर सर्वसाधारण पद्धतितंत्रशास्त्रविषयक चर्चा संबंधींच्या प्रतिक्रियाही त्यांनी परिणामक रीतीने पण सारांशरूपाने दिलेल्या आहेत, असा माझा विश्वास आहे.

या उभयसंचारी व्यक्तींचे अस्तित्व आपल्याला असे सुचविते, की अशा चर्चांतून पुढे येणारे वादविषय सत्याधिष्ठित नसतात. ज्या ज्या व्यक्तीला स्वतःला भूगोलकार म्हणून घ्यावयाचे असेल –आणि तसे कुणाला वाटत नसते ? – त्याला त्याला त्या संज्ञेच्या अर्थाबाबत नक्कीच काही आस्था असते. काही जण असेही म्हणतात की, ' आम्ही आमच्या भूगोलविषयक संकल्पना आमच्या आशयप्रधान लिखाणांतून प्रस्तुत करणेच पसंत करतो आणि इतरांनीही तसे करण्यात समाधान मानावे '. पण, कोणाही भूगोलकाराचा हा बुरखा क्षणभर बाजुला करण्याचा अवकाश, की ' भूगोल म्हणजे काय ? ', ' त्याचा हेतू काय असावा ? ' व ' भूगोलाला तो हेतू कसा साध्य करता येईल ? ' या विषयींच्या बऱ्याचशा निश्चितपणे सूत्रबद्ध केलेल्या संकल्पना त्याच्या जवळ तयार असतात असे दिसून येईल आणि संकल्पनांचे मूल्य फक्त त्याच्या पुरतेच मर्यादित असते, असेही तो मानत नसतो. जर त्याने पुस्तक लिहिलेच, तर त्या संकल्पनेचे विधान त्याच्या पाठ्यलेखात नसले तरी त्याच्या प्रस्तावनेत त्या संकल्पनेचे विधान करील आणि आपल्या प्रभावाखाली असलेल्या विद्यार्थ्यांसमोर तर तो सातत्याने ते प्रस्तुत करत राहील.

थोडक्यात, " जोपर्यंत तुम्ही चालला आहात तोपर्यंत तुम्ही ' कोठे चालला आहात ? ' या प्रश्नाचे औचित्यच रहात नाही " ही सर्वमान्य कल्पना आपल्यांपैकी कोणीही सर्वार्थाने मान्य करत नाही. खरे तर, आपण हे ओळखून आहे, की प्रत्येक भूगोलाभ्यासकाला ' भूगोल म्हणजे काय ? ', ' त्याचा हेतू काय असतो ? ' व ' त्याचा अभ्यास कसा केला जावा ? ' या तीनही प्रश्नांना ' येनकेन प्रकारेण ' उत्तरे शोधावीच लागतात.

खरा वादाचा मुद्दा अशा प्रश्नांचे महत्त्व किती, हा नसून, त्यांच्या चर्चांतून काही प्रगतीची अपेक्षा करणे शक्य होणार आहे काय ? हा आहे. काहींच्या मते अशा चर्चांतून वितंडवादच निर्माण होतात. या वादांतून तत्त्वबोधाचा प्रकाश लाभण्याचे दूरच उलट विवादांतून आरोप, प्रत्यारोपाच्या फैरी मात्र झडत रहातात. हा बौद्धिक निराशावाद आपण स्वीकारावयाचा का ? समरुप प्रशिक्षण घेतलेले, एकाच क्षेत्रात कार्यरत असलेले, पण आपल्या क्षेत्राविषयींच्या आणि त्यातील कार्यपद्धती विषयींच्या संकल्पना वेगळ्या असलेले अभ्यासक अधिकांश सहमताच्या दिशेने वाटचाल करू शकणारच नाहीत का? निदान, आपणांत असे मतभेद का निर्माण होतात याविषयी तरी एकमेकांची समजूत घालू शकणार नाहीत का ?

पद्धतितंत्रशास्त्रविषयक गंभीर व परिणामकारक अभ्यासांवरील भूगोलकारांच्या प्रतिक्रियांतून या प्रश्नांना उत्तर मिळालेले आहे, असे मला वाटते. ज्यांनी अशा प्रकारचे अभ्यास प्रकाशित केलेले आहेत ते मोठ्या खेदाने पण ठामपणे असे सांगतील की, त्यांच्या कोणत्याच एका किंवा सर्वच आशयप्रधान ग्रंथांनी अभ्यासकांचे लक्ष वेधून घेतले नाही, तितके लक्ष पद्धतितंत्रविषयक ग्रंथांनी वेधून घेतले होते. इतकी लोकप्रियता त्यांनी मिळवावी अशी

त्यांची पात्रता नसेलही, पण जी मिळाली ती विनाकारण नव्हती खास ! याचे एक कारण मला सुचवावेसे वाटते. अमेरिकी भूगोलकार अशा प्रश्नांच्या संदर्भात काय काय बोलतात याला काही महत्त्व नाही, ते बऱ्याच मोठ्या प्रमाणात पद्धतितंत्रविषयक प्रश्नांचा गंभीरपणे व आस्थापूर्वक विचार करत असतात हे सत्य आहे.

वस्तुस्थितीचे हे निदान, हे खरे असेल, तर आपण त्याला मान्यता देणे आवश्यक आहे आणि मगच, आपण सर्वांनी एकत्र गेऊन ज्या विषयांचा अभ्यासपूर्वक चर्चा करण्याची आवश्यकता असते त्यापैकीच पद्धतितंत्रविषयक समस्या हाही एक आहे, याबद्दल आपले एकमत होणे शक्य होईल.

## २– अभ्यास की वाद ?

पद्धतितंत्रविषयक प्रश्नांचा अभ्यास कसा करावयाचा आणि त्यांची चर्चा तरी कशी करावयाची हाच एक प्रश्न आहे. " भूगोलात आपण काय करतो ? " व " ते कसे करतो ? " हे मूलभूत प्रश्न जेव्हा भूगोलाभ्यासक एकत्र जमतात तेव्हा केवळ तोंडी चर्चा करण्याच्या पात्रतेचे ते आहेत, पण गंभीर लिखाणाच्या अथवा पांडित्यपूर्ण ग्रंथलेखनाच्या पात्रतेचे ते नाहीत, असाच अमेरिकी भूगोलकारांचा या विषयाकडे पहाण्याचा सर्वसामान्य रोख असतो; म्हणून अशा वादांतून तत्त्व बोध असा होतच नाही. प्रसंगोपात्त, विशेषकरून आपल्या अध्यक्षीय भाषणात, या प्रश्नासंबंधी त्यावेळची त्याची वैयक्तिक मते, एखाद्याने केवळ ' धार्मिक श्रद्धेने दिलेल्या कबुलीजबाबा ' प्रमाणे आपल्या सहकाऱ्यांपुढे सादर करावी हेच भूगोलकाराच्या दृष्टीने समयोचित असते, अशी पुस्ती जोडणे म्हणजे वरील विधानाला एक किरकोळ मुरड घालण्यासारखे आहे. अशा प्रकारची व्याख्याने केवळ तोंडी प्रस्तुतीसाठी बनवलेल्या सूत्रबद्ध विधानांपेक्षा जास्त महत्त्वाची असतात असे मानावयाची गरज नाही आणि ती जणू एखाद्या विद्वत्ताप्रचुर प्रबंधाप्रमाणे आहेत असे समजून त्यांचे क्रान्तिक परीक्षण करत बसण्याइतक्या योग्यतेची ती नसतात, असेच सामान्यतः मानले जाते.

पद्धतींच्या संयुक्तिकतेबाबतचा निर्णय हाती आलेल्या त्यांच्या परिणामांवरून घ्यावयाचा असेल, तर केवळ पुराव्याच्या भारानेच हा नियम उलटून टाकावा लागेल. आमच्या साक्षीने अशा प्रश्नांवर लांबलचक तोंडी युक्तिवाद केले जातात ; पण चर्चेत भाग घेणारे वक्ते व त्यांचे श्रोते यांच्या विचारावर त्यांचा क्वचितच परिणाम झालेला तेथे दिसून येतो. असे असले तरी, स्वतः लेखकांचेच नव्हे, तर त्यांच्या पुष्कळशा सहकाऱ्यांचे व त्यांच्या पूर्वसूरींचेही विचार सादर करणाऱ्या विद्वत्ताप्रचुर अभ्यास ग्रंथांचे, अनुसंधान कार्य करणाऱ्या पुष्कळशा भूगोलज्ञांच्या विचारांवर लक्षणीय व विकसनशील परिणाम झालेले आहेत याबद्दल भौगोलिक विचारांच्या गेल्या वीस वर्षांतील विकासांशी परिचित असलेल्या कोणाही व्यक्तीच्या मनात

संदेह रहात नाही. त्या अभ्यासकांच्या विचारधारेवर परिणाम घडवून आणत असतानाच त्यांचा त्यांच्या आशयप्रधान लिखाणांवरही प्रभाव पडत गेला आहे, म्हणजे परिणामांच्या दृष्टीनेही त्या सृजनशील होत आलेल्या आहेत.

म्हणून, जोपर्यंत अशा प्रश्नांच्या चर्चा केवळ तोंडी युक्तिवादांनी भरलेल्या असतात तोपर्यंत त्या निष्फळच ठरतात असे म्हणणाऱ्यांशी आपण सहमत होण्यास हरकत नाही. पण, पूर्वीच्या लिखाणांच्या क्रान्तिक परीक्षणांवर आणि शान्त मनाने केलेल्या तर्कशुद्ध विश्लेषणांवर आधारलेल्या विद्वत्ताप्रचुर चर्चाही परिणामशून्य होतात असे म्हणणे, म्हणजे प्रत्यक्ष अनुभवलेली वस्तुस्थितीच अमान्य करण्यांसारखे होईल.

या विचारांवरून पुढे दिलेले निष्कर्ष निघतात :–

१. संबंधी समस्येसाठी विद्वत्तेचे उपयोजन जबाबदारीने केल्यास भक्कम पद्धतितंत्राबाबत सर्वसाधारण समझोत्याच्या दिशेने अतिजलद प्रगतीची अपेक्षा करता येईल.

२. मौखिक चर्चेला फक्त दुय्यम अवस्थेतच महत्त्व द्यावयाचे असते. कारण, त्या स्थितीतच अशा विद्वत्तापूर्ण निष्कर्षांचे उपयोजन केले जाण्याची शक्यता असते. अर्थातच अशा चर्चेला केवळ त्या सभेत उपस्थित असलेल्याच्या व्यक्तिगत मतांवर अवलंबून रहावे लागत नाही.

उपप्रमेयादाखल अशीही एक पुस्ती जोडण्यास हरकत नाही. अशा प्रकारच्या मौखिक चर्चा चक्री चर्चेच्या स्वरूपात घडविल्या गेल्या तर त्या अधिकात अधिक मौलिक ठरतील, अशी शक्यता आहे. पण भूगोलकारांच्या औपचारिक सभेतील चर्चा किमान अंशाने सृजनक्षम होण्याचीच शक्यता असते.[२]

---

२. वर दिलेल्या निष्कर्षांमुळेच " भूगोलाचे स्वरूप " हा ग्रंथ लिहिण्यात आला आहे. आपण ज्या समस्यांबाबत तोंडी वाद करत होतो, त्याच प्रश्नांच्या सखोल अभ्यासाने आमचे गतकालीन स्वकीय व परकीय सहव्यवसायी जे शिकले त्याच्याच आरपार आणि सर्वंकश परीक्षणाची आज गरज आहे, असे दिसून आले. ज्यांच्या जंजाळात आमच्या चर्चापद्धतींमुळेच आम्ही अडकून पडलो होतो आणि जे अनंत-कालपर्यंत चालूच रहातील असे वाटत होते त्यांतील पुष्कळसे वादविवाद अनावश्यक आहेत असे अशाप्रकारच्या अभ्यासांवरून दिसून येईल; तर, अद्याप अनुत्तरित राहिलेल्या प्रश्नांना एक वैज्ञानिक पार्श्वभूमी लाभेल आणि त्यामुळे आपल्या भविष्यकालीन चर्चा कदाचित् अधिक सृजनक्षम होऊ शकतील. पदवी परीक्षार्थींच्या प्रशिक्षणासाठी या ग्रंथांचा उपयोग क्लीमच्या अहवालानुसार जसा केला जात आहे, त्यांचा विचार करूनच त्यांच्यासाठी अनेक संदर्भांचा या ग्रंथात समावेश केलेला आहे. या टीपा स्वतःच्या सफाईसाठी नसून गैरसमज काढून टाकण्यासाठी व त्यांचा गैरउपयोग केला जाऊ नये म्हणून दिल्या आहेत.

## ३– अशी गंभीर टीका इष्ट आहे का ?

वर आलेल्या निष्कर्षात ' जबाबदार ' अणि ' विद्वत्तापूर्ण ' या शब्दांचा वापर केल्यामुळे आपल्याला तिसऱ्या प्रकारच्या वृत्तीचा विचार करणे भाग आहे. पद्धतितंत्रविषयक प्रश्नांवर भूगोलकार जे लिहितो वा प्रकाशित करतो त्याचा ' फाजील गांभीयनि ' विचार करण्याची प्रथा काही तितकीशी न्याय्य नाही. लेखक आपल्या सत्यार्थनि शास्त्रीय लिखाणाचा, ते लिहिले जात असता, जितक्या गंभीरपणे विचार करत असतात, तितक्या गंभीरपणे पद्धतितंत्रशास्त्रविषयक अभ्यासांचे लेखक आपल्या लिखाणाचा, ते लिहिले जात असता, विचार करत नाहीत, हे आपण समजून घेतले पाहिजे. ' पण, असं का ? ' भूगोलक्षेत्रात आपले आशयसंबंधी लिखाण कार्य जितके प्रभावी ठरते तितके आपले पद्धतितंत्रविषयक लिखाण प्रभावी ठरत नाही असे त्यांना वाटते, या त्यांच्या समजाला काही कारण आहे काय ? या प्रश्नाला द्यावयाचे त्यांचे उत्तर काही असो; आपल्या पद्धतिविषयक लिखाणाचा वाचकांवर काहीतरी अर्थपूर्ण प्रभाव पडायला पाहिजे अशी अपेक्षा लेखकांनी बाळगलेली असणारच. नाहीतर, ते लिखाण प्रकाशनासाठी देण्यामागचा हेतूच काय असतो ? भूगोलकार काही आत्माभिव्यक्तीसाठी हे लिखाण करत नाहीत, अगर प्रकाशित करत नाहीत, हे गृहीतच आहे. गंभीर स्वरुपाचे लिखाण करणाऱ्या सर्वच लेखकांप्रमाणे भूगोलकारांचा लेखन हेतू लोकांवर प्रभाव पाडणे हाच असतो.

कोणी लेखक कधीकधी तत्कालीक महत्त्वाच्या विचारांवर प्रभाव पडावा याच हेतूने लिहित असतो; पण, दुसऱ्या काही लेखांतून मात्र टिकाऊ प्रभावाची काहीतरी निर्मिती व्हावी अशी अपेक्षा तो करत असतो, हे खरे आहे. खरे म्हणजे कोणत्या लेखनाचा प्रभाव कसा पडेल हे स्वतः लेखक कधीच ठरवू शकत नाही. आपण ज्याला आपले अधिक महत्त्वाचे लेखन समजतो ते लिखाण लोक मानत नाहीत; याच्या उलट, त्याच्या दृष्टीने कमी महत्त्वाचे लिखाणच लॉर्नाडून स्तुतिपात्र समजण्याचा आणि वाचत रहाण्याचा हट्ट धरतात, याच गोष्टीचा संताप कादंबरीकार ब्लॅकमोरला येत असे. एक शतक उलटून गेले तरी, ज्यूलियस फ्रोबेल हा भूगोलकार त्याने तरुण वयात लिहिलेल्या आणि अर्धवट माहितीने भरलेल्या दोन पद्धतितंत्रविषयक प्रबंधाचा लेखक म्हणूनच भूगोलक्षेत्रात ओळखला जातो. पण, त्यानेच लिहिलेला याच क्षेत्रातील कितीतरी अधीक परिपूर्ण प्रबंध आणि त्याबरोबरच ज्यांना लेखकच खूप अधिक महत्त्व देत असे असे त्याचे आशयप्रधान ग्रंथ यांचा वरवर तरी कधी कोणावर प्रभाव पडलेला नव्हता. सांप्रतकाळी त्यांचा पुन्हा निदान उल्लेख होऊ लागला आहे, याचे कारण तरी हेच; त्याच्या तरुण वयातील अपरिपक्व विचारांतून निर्माण झालेल्या त्याच दोन प्रबंधांनी वर्तमानकाळीही अभ्यासकांचे पुन्हा लक्ष वेधून घेतले आहे[३]. भूगोलातील प्रचलित विचारांवरील टीकाकार आपल्या विविध लिखाणांच्या सापेक्ष गुणवत्तेबद्दलचा फ्रोबेलचा निर्णय आता मान्य करतात; आणि तरीही त्याचे तेच दोन लेख प्रचलित विचारांच्या संदर्भातही अर्थपूर्ण आहेत, असे मानून त्यांच्याबद्दलच आस्था दाखवत असतात.

---

३. The Nature of Geography पाने ७२ ते ७५ आणि १०२ ते १०६.

स्वतःच्या विविधप्रकारच्या लिखाणांच्या सापेक्ष गुणवत्तेबाबत स्वतः लेखकाला काहीही वाटत असले तरी, आपल्या लिखाणांपैकी एका लिखाणाचा कोणीतरी एकाने अधिकच गंभीरपणे विचार केलेला असतो, हा त्या लेखकाचा दावा वाचकांनीही तितकाच गंभीरपणे विचारात घेणे अवघड असते. माझ्या माहितीत असा एकही भूगोलकार नाही, की त्याने त्याचे लिखाण मान्य करणारे विद्यार्थी त्याच्या कायदिशांचा थोडा जास्तच गंभीरपणे विचार करत असतात, अशी तक्रार केलेली आहे. जोपर्यंत एखाद्या भूगोलकाराचे पद्धतितंत्रविषयक लिखाण वेदमंत्राप्रमाणे शिरोधार्य मानले जात असते, तोपर्यंत त्यावर आक्षेप घेतला जात नाही. पण, जेव्हा विरुद्ध बाजुकडून क्रांन्तिक विचार व्यक्त केले जातात तेव्हा मात्र ते आक्षेप असह्य होतात.

पद्धतितंत्रविषयक चर्चांचा हेतू सत्यशोधनाचा प्रयत्न करणे आणि त्यातून आपल्या विषयांसाठी अत्यंत विश्वसनीय प्रवेशपद्धती शोधणे हाच असेल, असे गृहीत धरले तर, एखाद्या लेखकाच्या पद्धतितंत्रविषयक लिखाणांची क्रान्तिक चर्चा होणे येवढा एकच चर्चेचा प्रकार त्याच्या स्वतःच्या विचारव्यवस्थेच्या दृष्टीने मौलिक ठरण्याची शक्यता आहे. पद्धतितंत्रविषयक प्रश्न अडवणुकीचे आणि तर्कदृष्ट्या गुंतागुंतीचे असतात, त्यामुळे त्यातून स्पष्ट व निश्चित स्वरुपाची उत्तरे क्वचितच मिळविता येतात. कारण जे संख्यात्मक तक्त्यांनी, नकाशावर वितरणाने किंवा स्पष्ट व सुबद्ध व्याख्यांनी आणि वर्णनात्मक संज्ञांनी सापेक्ष-काटेकोरपणे व्यक्त करून दाखवता येणार नाहीत अशा पण साधारणतः चुकीच्या व्याख्यांनी आणि निसुटत्या अर्थांच्या शब्दांनी सांगितल्या जातात अशा काही कल्पनांशी तेथे विचारव्यवहार चालू असतात. अर्थातच लेखकाला स्वतःची व आपल्या वाचकांची फसवणूक करण्याची बरीच मोठी संधी असते. उलट, सुदैवाने गेल्या दोन शतकांच्या अवधीत भूगोलविषयक पद्धतितंत्रांसंबंधीच्या समस्यांचा अभ्यास भूगोलाभ्यासकांनी फार मोठ्या संख्येने प्रकाशित लिखाणाच्या रूपाने केलेला आहे. त्यांच्या परिशीलनांतून त्याच समस्यांचा आज फेरविचार करण्याचा प्रयत्न करणाऱ्या कोणालाही आपल्याच विचार व्यवस्थेची परीक्षणे ढिगाने पुरविली जातील.

समान समस्यांचा अभ्यास करणाऱ्या दुसऱ्या कोणाच्या विचारांशी स्वतःच्या विचारांबरोबर तुलना करण्याची कोणतीही पद्धती पद्धतितंत्रविषयक लेखकांला आवडत नाही, अथवा त्याने स्वतः सादर केलेल्या मुद्यांच्या तार्किक युक्तिवादाचे क्रान्तिक परीक्षण करण्यातही त्याला गोडी वाटत नाही, हे लक्षात आल्यावर मात्र मन आश्चर्यमुग्ध होते ! एखादी विशिष्ट संकल्पना सत्य मानणाऱ्या कोणाही भूगोलकाराला आपल्या कल्पनांची दुसऱ्यांच्या कल्पनांशी तुलना करण्याची कसोटी त्यांना मूल्यवर्धकच ठरेल असे वाटत नाही ? इतर विचारवंतानीही त्याच्या विचारांना तर्कशुद्ध विश्लेषणाची कसोटी लावून पहावी असे कोणा भूगोलकाराला वाटतच नाही का ? आपल्यापैकी प्रत्येकाची आपण योग्य मार्गावरूनच चाललो आहो याची खातरजमा झाली आहे का ? भूगोलकारांनी गतकालात घालून दिलेले, अथवा अन्य

भूगोलकार वर्तमान काळात घालू देत असलेले, मार्ग तपासून पहाणे याला त्याच्या दृष्टीने काहीच महत्त्व नाही का ?

" तुमचे हे वादविवादशास्त्र मला मुळीच पसंत नाही ", असे म्हणून हे सर्व प्रश्न निकालात काढण्याचा कोणीही प्रयत्न करू शकतो. पण तसे म्हणणे तर्काधिष्ठित युक्तिवाद त्याला आवडत नाही असे कबूल करण्यासारखे आहे. म्हणजेच, बुद्धिवादी प्रक्रियेने काढलेल्या निष्कर्षांच्या भरीवपणाची खातरजमा करून घेण्याच्या या एकमेव कसोटीला आपले लिखाण लावून पहाणे त्याला मुळीच आवडत नाही.

थोडक्यात, जो जो आपल्या लिखाणाच्या तर्कवादाचे कोणी क्रान्तिक विश्लेषण केलेले आपल्याला आवडणार नाही असे म्हणतो, तो आपले निष्कर्ष भरीव, संशयास्पद अथवा अगदी चुकीचे आहेत हे कळवून घेण्याची त्याला मुळीच फिकीर वाटत नाही, असेच म्हणत असतो. कोणाही लेखकाच्या बाबतीत हे खरे असले–म्हणजेच तसे होणे शक्य असले– तरी गंभीरपणे त्याचे लिखाण वाचून त्या विषयाचा सखोल अभ्यास करणारे विद्यार्थी–अभ्यासकांच्या बाबतीत ते खरे असण्याची मुळीच शक्यता नाही.

पद्धतितंत्रविषयक लिखाणांवर फारसा गंभीरपणे विचार करू नये किंवा पद्धतितंत्रशास्त्र हे असे एक क्षेत्र आहे, की लहर लागेल तेव्हा कोणाही भूगोलाभ्यासकाला त्यात निरंकुशपणे लुडबुड करण्यास हरकत नसते, असे मानण्याची प्रचलित वृत्ती आहे; त्या ऐवजी पुढील तीन निष्कर्ष मानावे :–

१. कोणत्याही प्रकारच्या लिखाणांचा किती गंभीरपणे विचार करावयाचा याचे अनुमान करण्यासाठी वापरावयाचे माप स्वतः लेखकाने आपल्या लिखाणाला दिलेल्या महत्त्वांशांवरून ठरवावयाचे नसून त्यांचे महत्त्व वाचकांना किती वाटते यावरूनच ठरवावयाचे असते.

२. पद्धतितंत्रविषयक अभ्यासांसाठी लागणारी विद्वत्तेची प्रत आशय-प्रधान ग्रंथनिर्मितीसाठी लागणाऱ्या विद्वत्तेच्या प्रतीपेक्षा कमी धारदार असून चालत नाही.

३. पद्धतितंत्रविषयक कोणतेही प्रकाशन योग्य लिखाण क्रान्तिक मूल्यमापनाच्या कसोटीस लावावे हे महत्त्वोचित आहे व इष्टही आहे. अर्थातच हे मूल्यमापन त्यातील मूलभूत गृहीत-तत्त्वांच्या, त्याने प्रस्तुत केलेल्या पुराव्याच्या विश्वासार्हतेच्या अन्य अभ्यासकांनी काढलेल्या निष्कर्षांच्या विस्तृत तुलनांच्या परिभाषेतच केले जावे [४].

---

४. भूगोलविषयक प्रशिक्षण, " युद्धकालीन अनुसंधानकार्य आणि तातडीची व्यावसायिक साध्ये ", या एड्वर्ड इ. एकरमन यांचा हा ग्रंथ पूर्वकालीन पद्धतितंत्रविषयक लिखाणांच्या क्रान्तिक विश्लेषणाचे एक उत्कृष्ट उदाहरण म्हणून वाचकांनी वाचून पहावा. ' असोसिएशन ऑफ अमेरिकन जॉग्राफर्स चे वार्षिक वृत्तान्त ' नियतकालिक XXXV No. 4 ( डिसेंबर १९४५ ) पृष्ठ क्र. १२१ ते १४३.

## ४–हा भूगोलच आहे का ? असे कोणी विचारल्यास चालेल का ?

आमच्या अलिखित नियमावलीतील सर्वश्रुत नियमच कुणाला नीटसा समजलेला नाही. हा नियम असा : " भूगोल म्हणजे काय ? " या प्रश्नाला उत्तर शोधणे इष्ट आहे आणि महत्त्वाचेही आहे, हे मान्य करण्यास कोणाची हरकत नसली तरी, या प्रश्नाच्या उत्तराचे एखाद्या भूगोलकाराच्या विशिष्ट अभ्यासलेखाच्या परीक्षणासाठी उपयोजन करणे –म्हणजेच " हा भूगोल आहे का ? " असा प्रश्न उपस्थित करणे– हे, नालस्ती करणारे नसले तरी, इष्ट नव्हे खास ! हा नियम वारंवार मोडला जात असल्यामुळे आणि अशा प्रसंगी उफाळून येणाऱ्या अमान्यतेच्या जोरदार प्रतिक्रियांमुळेही तो नियम सर्वविश्रुत झाला असावा. अशाच प्रकारचा एक भावाविष्कार अज्ञातवासात पडून होता तो आता प्रकट करावा इतका उत्कट आहे. " एखादा अभ्यासू सहकारी मोठ्या आनंदाने काही उत्पादक कार्य करत असलेला पाहून कंटाळ्याने डोके हालवत आणि स्मशान गांभीर्याने एकटाकी सुरात उच्चारलेल्या प्रश्नाने व्यक्त होत असलेला हा हट्टी रक्तक्षयासारखा रोग आमच्या काही भूगोलकारांना कोठून जडला आहे हे मला मुळीच समजेनासे झाले आहे. संबंधित भूगोलकारांच्या प्रचलित मतानुसार, जे पोटविषय भूगोलक्षेत्राच्या बाहेरचे आहेत, असे ठरविले गेले अशा काही पोटविषयांबद्दल आस्था दाखविणाऱ्या अन्य भूगोलाभ्यासकांना ' हे चूक आहे, ते दुरुस्त करा ' असे म्हणण्याचा अथवा या सभेत ते बसण्यास अपात्र आहेत असे घोषित करण्याचा अधिकार या मंडळींनी कोठून मिळविला ? ".[५] उपस्थित सर्वजणच या अमान्यतेच्या सांघिक घोषणेत सामील होतील, असे मी गृहीत धरतो. तरीही, आपल्या वार्षिक सभेत सादर केल्या जाणाऱ्या पत्रिका वाचल्या जात असताना एकूण किंवा भौगोलिक नियतकालिकांतून प्रसिद्ध होणाऱ्या अशाच पत्रिका वाचून " आपण ज्याला भूगोल असे मानत आलो त्या क्षेत्रात आता याही लिखाणाचा समावेश करावयाचा काय ? " असा प्रश्न स्वतःला विचारला नाही असा कोणीतरी आपल्यामध्ये उपस्थित आहे का ? अर्थातच, भूगोलाची एक व्याख्या तयार करण्यामागील उचित हेतूबाबत अथवा तिचा उपयोग कोठे व कसा करावयाचा यासंबंधीच्या हेतू बाबत आपल्या मनात बराच गोंधळ आहे हे अगदी उघड आहे.

### अ– हा प्रश्न विषयसंबद्ध आहे का ?

एखाद्या विशिष्ट अभ्यासलेखाचा संबंध भूगोलक्षेत्राशी आहे अशी त्याची वर्गवारी करणारा निर्णय, ही काही त्या संपूर्ण प्रबंधाच्या अर्थवत्तेवरील टीका असत नाही. कोणत्याही कारणाने या टीकेचा परिणाम त्या प्रबंधाच्या मूल्यमापनावर होण्याची शक्यता नाही. म्हणजेच, कोणत्याही प्रकारे मूल्यमापन निर्णयाशी संबंध नसणारे, पण केवळ वर्गवारीशी संबंधित असलेले, विधान आहे. एखादा भूगर्भशास्त्रीय अभ्यासलेख किंवा ऐतिहासिक अभ्यासलेख

---

५. कार्ल सॉर, ' जॉग्राफिकल रिव्ह्यू ' च्या संपादकाशी झालेला पत्रव्यवहार XXII ( ऑक्टोबर १९३२ पृष्ठ, ५२८).

हे भौगोलिक लेखापेक्षा कमी किंमतीचे, असे गृहीत धरण्यास काही आधार असल्याचे मला तरी माहीत नाही. दोन अगर अधिक शास्त्रांच्या तंत्रांचा मिश्र-वापर इतक्या विस्ताराने करतात, की त्यांचा समावेश कोणत्या क्षेत्रात करावयाचा याचे कोडे पडावे आणि तरीही त्यातून एका श्रेष्ठ दर्जाच्या अनुसंधान कार्याची भर पडावी, असे घडण्यास काही हरकत आहे काय ?

म्हणून, जेव्हा एखादे आशयप्रधान लिखाण विचारार्थ सादर केले जाते तेव्हा आपला संबंध असतो तो प्रत्यक्ष त्या लिखाणाशी, त्याच्या परिपूर्णतेशी, त्याच्या भक्कमपणाशी अथवा त्याच्या शिक्षणक्षम अर्थवत्तेशी हे ओघानेच आले. भूगोलक्षेत्राशी त्या लिखाणाच्या संबंधाविषयी आस्था दाखविणारा कोणताही प्रश्न विषयांतर करून पद्धतितंत्रविषयक दुसऱ्याच एका विषयाच्या चर्चेकडे आपले विचार वळवितो. कोणत्याही विषयांतराप्रमाणे हेही नियमबाह्य आहे. मग, लिखाणाच्या वर्गीकरणाचा प्रश्न ग्रंथसूची तयार करणाऱ्यांकडे सोपविण्यास हरकत नाही.

## ब– मर्यादा कोणी घालावयाच्या ?

भूगोलाभ्यासकांच्या एखाद्या गटाने अमूक एक विषय भूगोलक्षेत्रात समाविष्ट करता येणार नाही असा निर्वाळा द्यावा असा कोणताही आधार नाही, तसा तो असण्याची शक्यताही नाही.

या क्षेत्राच्या अफाट विस्तारात शब्दशः संपूर्ण पृथ्वीचा अंतर्भाव होतो. आणि त्याच्या कक्षेत घटनांच्या वेगवेगळ्या प्रकारांची केवढी विविधता समाविष्ट करावी लागते याचा विचार करता भूगोलाभ्यासकांना काही करून अभ्यासाच्या या अमर्याद आवाक्यावर काही मर्यादा घालाव्या असे वाटणे अगदी साहजिक आहे. अर्थातच अशा मर्यादित विषयांवर अधिकार-वाणीने ते भूगोलाभ्यासक बोलू शकतील अशी अपेक्षा असते. अशी अधिकारवाणी आपण किती विस्तारापर्यंत मिळवू शकू व टिकवू शकू हे ज्याचे त्याने ठरवावयाचे आहे. एखादा विशिष्ट अनुसंधानविषय आपल्या अभ्यासक्षेत्रात समावून घेण्याची त्याची इच्छा नाही आणि तशी त्याला जरूरीही वाटत नाही; असा एखाद्या अभ्यासकाचा त्या अनुसंधानाबाबत निर्णय ठरला तर तो निर्णय त्याच्या स्वतःपुरता झाला. त्या कार्यात आपल्याला रस नाही हे त्याचे वैयक्तिक मत झाले, ते सार्वजनिकपणे व्यक्त करणे हे सामान्य शिष्टाचाराच्या विरुद्ध आहे हे लक्षात घेऊन त्याने तसे करणे टाळावे.

आपण ज्याला भूगोल म्हणून मानतो ते सर्वच क्षेत्र आपल्या आवडीच्या व आकलन-क्षमतेच्या अधिकार क्षेत्रात समाविष्ट करता यावे अशी बहुतेक सर्व भूगोलकारांची सामान्यपणे उत्कट इच्छा असावी हे उचितच आहे. जर अशा अभ्यासातून आपल्या क्षेत्राच्या एकूण आवाक्याच्या मापनासंबंधी काही आधार मिळणार असेल आणि जे आशयप्रधान अभ्यास ते वाचत असतात अथवा वाचलेले ऐकत असतात त्यांचेही दिग्दर्शन त्याच संदर्भात करता येण्यासारखे असेल, तरच तो पद्धतितंत्रविषयक अभ्यास त्यांना मूल्यवान वाटतो.

आमच्यापैकी कोणी ' भूगोल म्हणजे काय ? ' किंवा ' तो कसा असला पाहिजे ? ' याचे उत्तर निश्चित विधानांच्या सहाय्याने सादर करणार असेल आणि ज्या कोणाला आम्ही आतापर्यंत जे लिहिले ते पटले असेल, तर ते वरील निर्णयांची कसोटी एखाद्या विशिष्ट आशयप्रधान लेखनास लावून पहाण्याचा प्रयत्न खासच करतील. भूगोल म्हणजे काय या प्रश्नाला उत्तर देण्याचा कोणत्याही प्रयत्नाचा हेतू पद्धतिनिष्ठ दिशादर्शन हाच असल्यामुळे वरील निष्कर्षांचा असा उपयोग करणे संयुक्तिक आहे आणि अपेक्षितही आहे. अगदी प्रत्यक्ष शब्दात सांगावयाचे तर, ज्याने भूगोलक्षेत्राची निश्चित संकल्पना शब्दांकित केलेली असेल आणि जो एखादा आशयप्रधान लेख वाचेल अथवा ऐकेल त्याने " आपल्या समजुतीप्रमाणे रचलेल्या भूगोलक्षेत्रात तो लेख नेमका कोठे चपखलपणे बसतो ? " हा प्रश्न स्वतःलाच विचारून त्याचे उत्तर मिळवणे उपयुक्त आहे , असे त्याला दिसून येण्याची शक्यता आहे.

त्यातूनही, अमूक एक प्रबंध भूगोलक्षेत्रात समाविष्ट करता येण्यासारखा नाही असा निष्कर्ष एखाद्याला सार्वजनिकरित्या व्यक्त करावयाचा असेल तर तो अभ्यासक ते आव्हान केवळ एका व्यक्तिगत मताला –म्हणजेच ज्याने आपला प्रबंध भूगोलक्षेत्रातीलच आहे असे गृहीत धरले त्या लेखकाच्या व्यक्तिगत मतालाच– दिलेले असते आणि तेही पहिल्यापेक्षा काही खास मोठा भक्कम पुरावा असलेल्या मताकडून दिले गेले आहे अशातला भाग नसतो. भूगोलक्षेत्रासंबंधातील अमूक एका ग्रंथाचे वर्गीकरण करण्याचा निर्णय त्या क्षेत्राची जी विशिष्ट संकल्पना आधार म्हणून मान्य केलेली असते तिच्या परिभाषेतच तो प्रमाणित असतो. पण, भूगोलाची कोणतीही एक संकल्पना कोणत्याही अन्य कल्पनागम्य संकल्पनेपेक्षा जास्त अधिकृत आहे असे गृहीत धरण्याचा परवाना कोणीही मिळविलेला नाही.

त्याप्रमाणे आम्ही असा अधिकार प्रस्थापित करण्याचा प्रयत्नही करू नये हे बरे. जरी कोणत्याही पद्धतितंत्रविषयक अभ्यासग्रंथाचा " भूगोल म्हणजे काय ? " या प्रश्नाचा ऊहापोह करण्यामागील हेतू या क्षेत्रात अधिकतम परस्पर समजूतदारीचा प्रयत्न व्हावा हाच असतो. आणि समजा तात्त्विक एकमत मिळाले तरीही त्या संबंधीचा एकवाक्यतेचा कबुली जबाब अपेक्षित नाही आणि आवश्यकही नाही असे मानण्यास हरकत नसावी. ज्ञान-शिक्षण क्षेत्र पुराणमतवादाला आणि म्हणूनच नवमतवादालाही मान्यता देऊ शकत नाही. म्हणूनच " भूगोल म्हणजे काय ? " या प्रश्नाला अभ्यास करत असताना कोणा भूगोलकाराचे नामनिर्दिष्ट लिखाण भूगोलक्षेत्रात प्रवेश देण्याच्या पात्रतेचे आहे अगर नाही हे ठरविण्यासाठी लागणारे सूत्र निर्माण करण्याचा प्रयत्न करण्याची आवश्यकताच नाही, आणि आपल्याला तसे करणे शक्य होणार नाही, म्हणून, मला वाटते " पण हा भूगोल आहे का ? " या प्रश्नातील ' पण ' हा शब्द नेहमीच अनाठाई असतो.

## क—ज्या हेतूंसाठी हा प्रश्न सुसंबद्ध आहे ते हेतू

पद्धतितंत्रविषयक चर्चेत नामनिर्दिष्ट आशयप्रधान ग्रंथासाठी तात्त्विक निष्कर्षांचे उपयोजन करून त्याची कसोटी घेणे किंवा त्यातून ते निष्कर्ष सिद्ध करणारी उदाहरणे देणे, हे सयुक्तिक आहे इतकेच काय, ते आवश्यकही आहे. आणि हे करत असतानाच, त्या आशयप्रधान ग्रंथाचा भूगोलक्षेत्राशी असलेल्या संबंधांची चर्चा होणे इष्ट आहे.

भूगोल व एखादे अन्य ज्ञानक्षेत्र यांच्या सीमारेषेवरील नामनिर्दिष्ट अभ्यासलेखांवर या तात्त्विक संकल्पनेचे उपयोजन केल्यामुळे निर्माण झालेल्या त्या दोन क्षेत्रांतील तर्कशुद्ध भेदाभेदांसंबंधीच्या अवघडत चाललेल्या तात्त्विक चर्चेचे शुद्धीकरण करण्याची आवश्यकता भासण्याची शक्यता आहे. एखाद्या साध्या उदाहरणानेही वरील विधान स्पष्ट करता येईल. असे अभ्यासलेख तात्त्विक सीमारेषेच्या एका अगर दुसऱ्या बाजूला स्थापित करणारा कोणताही निर्णय त्या अभ्यासाच्या दृष्टीने महत्त्वाचा नसतो, तर अशा रीतीने सोदाहरण स्पष्ट झालेले पायाभूत तात्त्विक भेद तेवढेच अर्थपूर्ण ठरतात.[६]

जेव्हा एखादा पद्धतितंत्रशास्त्र लेखक भूगोलक्षेत्राच्या व्याप्तीसंबंधाचे विधान सादर करतो, पण त्यात आजपर्यंत ज्यांची संस्करणे भूगोलकारांनीच केलेली आहेत अशांपैकी काही लिखाणांना त्याने स्पष्ट शब्दांत प्रवेश नाकारलेला असतो, तेव्हाच अधिक महत्त्वाची समस्या उभी रहाते. आपल्या विधानाची सयुक्तिकता सिद्ध करण्यासाठी, म्हणजेच इतरांच्याकडून ही संकल्पना अपर्याप्त असल्याच्या केल्या जाणाऱ्या आरोपाविरुद्ध स्वतःच्या संकल्पनेचा बचाव करण्यासाठी लेखकाने असे दाखवून दिले पाहिजे, की या विधानातून ज्याप्रकारचे लिखाण वगळले जाते त्या लिखाणाचा भूगोलाव्यतिरिक्त कोणत्यातरी अन्य शास्त्रीय क्षेत्रात होत असलेला समावेश अधिक औचित्यपूर्ण असतो. पण तो हे उपपत्तीच्या परिभाषेत करू शकत नाही, कारण तसे करण्याने केवळ चक्री-तर्काच्या आधारे युक्तिवाद केल्यासारखे होईल. म्हणून, प्रत्यक्ष लिखाणांच्या उदाहरणांनी त्यांच्या न्याय्यान्याय्यतेचा निर्णय करून, तंत्र-लेखकाने असे सिद्ध केले पाहिजे, की भूगोलाला आवश्यक मानली गेलेली हेतूविषयक, संघटन-विषयक आणि तंत्रविषयक लक्षणे वादासाठी घेतलेल्या अशा प्रकारच्या ग्रंथातून अभावानेच आढळतात आणि त्यांबाबतीत ते लिखाण अन्य शास्त्रांशी अधिक जवळीक करतात.[७]

---

६. नेचर ऑफ जॉग्राफीच्या पृष्ठ क्र. ४०८ व ४१९ वर अशी उदाहरणे सापडणे शक्य आहे. वरील दोन्हीही बाबतीत लेखकांकडून आक्षेप घेतले जाण्याची शक्यता आधीच दूर झालेली आहे. कारण ती प्रस्तुत लेखकाच्या स्वतःच्याच प्रकाशित लिखाणातून निवडलेली होती. अर्थात असे करण्याने त्या लिखाणांना वाजवीपेक्षा जास्त महत्त्व दिलेले आहे असा ग्रह होण्याचा धोका मी पत्करलेलाच आहे.

७. उदाहरणादाखल, " इतिहासावर भूगोलाचा प्रभाव " या विषयावरील विशिष्ट ग्रंथांच्या संदर्भात कार्ल सॉडरने केलेली चर्चा पहावी. तसेच Recent Developments in cultural Geography या लेखातील राजकीय भूगोलावरील ग्रंथांची चर्चा पहावी. (संदर्भ Recent Developments in Social Sciences (1927) पृष्ठ क्र. १९९ f व २०७ ते २११).

जेव्हा भौगोलिक लिखाणांसाठी घालून दिलेल्या काही नीतिनियमांच्या प्रभावाखाली निर्माण झालेल्या आशयप्रधान लिखाणातून सादर होत गेलेल्या त्याच तत्त्वांच्या फलितांचे परीक्षण करून एखादा पद्धतितंत्रविषयक लेखक त्या आदेशांच्या समर्थनीयतेची कसोटी पहाण्याचा प्रयत्न करतो तेव्हाही अशाच प्रकारची समस्या उभी रहाते. अशा प्रकारच्या वास्तव अशा मूर्त कसोट्यांचा अभाव हेच आमच्या पुष्कळशा पद्धतितंत्रविषयक चर्चांचे प्रमुख मर्मस्थान आहे. भूगोलाच्या विशिष्ट संकल्पनेचा किंवा भौगोलिक कार्यसंबंधीच्या विशिष्ट आदेशांचा विचार चालू असताना, अशा औपपत्तिक मार्गदर्शकांच्या प्रभावाखाली निर्माण होणारे प्रबंध, त्यांचे व्यवस्थापन, त्यांचे हेतुसाधन व त्यांचे तंत्रविधान याबाजूनी, जी सामान्यतः भौगोलिक या संज्ञेने मान्यता पावलेली आहेत, अशा लक्षणांनी युक्त आहेत का, किंवा ते कोणा दुसऱ्या क्षेत्राशी जवळीक दाखवत नाहीत ना, या प्रश्नांचा निर्णय करणे हे या विषयाशी सरळ सुसंगतही असते आणि सार्थही असते[८].

या सर्वच बाबतीत, आशयप्रधान ग्रंथाबाबत दिले गेलेले निर्णय हे ' पद्धतितंत्रविषयक चर्चांकरता केलेले योगदान, ' येवढेच त्याचे औचित्य असते. आणि चर्चेचा विषय पद्धतितंत्रासंबंधीचाच असेल तर तेवढ्यापुरते सुसंगतही असतात, हे लक्षात ठेवले पाहिजे. अशाप्रकारचे न्याय हे उदाहरणादाखल वापरलेल्या आशयप्रधान ग्रंथावरील टीकाच होत, असा ग्रह करून घेणाऱ्या वाचकांना लेखक मनाई करू शकत नाही —मग लेखकाने त्यात 'ग्रंथावर कोणत्याही प्रकारची टीका करण्याचा हेतू नसतो ' असे किती आग्रहाने सांगितले, तरी ते व्यर्थ ! तसेच, ते अभ्यासग्रंथ भूगोलक्षेत्रात प्रवेशपात्र आहेत अगर नाहीत याचा निर्णय करणारेच ते न्याय आहेत असा त्यांचा आदर वाचकाने केला तरीही लेखक त्याला प्रतिबंध करू शकणार नाही. मात्र, वर विधानरुपाने मांडलेल्या पहिल्या अगर दुसऱ्या तत्त्व-प्रणालीच्या विरोधात हा त्याचा निष्कर्ष असेल तर त्याला स्वतः वाचकच जबाबदार धरला जातो.

## ड—हा प्रश्न म्हणजे लेखकावर हल्ला तर नव्हे ?

' हा भूगोल नव्हेच ' असे म्हणणे एखाद्या भूगोलकाराने केलेल्या आशयाभ्यासावर केलेली टीका नव्हे असे मान्य केले तर ती ज्याने तो अभ्यासलेख लिहिला त्या भूगोलकारावर केलेली टीका नाही का ठरणार ? स्वतःला भूगोलकार म्हणविणाराने फ़क्त भूगोलविषयक कार्य केले पाहिजे या गृहीत-तत्त्वावरच वरील रोख आधारलेला असतो. एखाद्या विशिष्ट अभ्यासाची अर्थवत्ता वा गुणवत्ता यांचा विचार बाजूला ठेवूनही त्या अभ्यासलेखाची वर्गवारी भूगोल म्हणून करता आली नाही, तर तशाप्रकारचा अभ्यास त्या भूगोलकाराने करावयालाच नको, असे म्हटले जाते. विद्येच्या कोणत्याही क्षेत्रात कार्य करणाऱ्या व्यक्तीवर एकच अट

---

८. आशय प्रधान ग्रंथांच्या अशा तात्त्विक निकषांचा कसोटीसाठी उपयोग केल्याची उदाहरणे The Nature of Geography च्या पृष्ठ क्र. १२३ ते १२५, १७७ व २१९ यांवर शोधून पहाण्यास हरकत नाही.

घातलेली असते, ती फक्त ' पूर्तिक्षमतेची '. आपला भूगोलक्षेत्रातील सहकारी भूगोल-क्षेत्राबाहेरच्या क्षेत्रात कार्य करत असेल, तर त्या लेखकाची त्या क्षेत्रातील पूर्तिक्षमता आजमावण्याचा कोणताही अधिकार भूगोलज्ञांना असत नाही. शिवाय, कोणत्याही विशिष्ट अभ्यासग्रंथासाठी आवश्यक त्या पूर्तिक्षमतेची अंतिम कसोटी त्या अभ्यासाने संपादन केलेले यश हीच असली पाहिजे आणि ते लिखाण जर अभिजात व साधार असेल तर तो लेखक पूर्तिक्षम नाही असा निर्णय कोणत्या आधारावर द्यावयाचा !

सत्यस्थिती अशी आहे, की अभ्यासक व्यक्ती ज्या विद्याक्षेत्रात कार्य करण्याइतकी पूर्तिक्षम आहे त्या क्षेत्राचा आवाका, ज्या क्षेत्राचे प्रशिक्षण त्यांनी घेतलेले असते त्या विशिष्ट शास्त्राच्या परिभाषेत व्याख्याबद्ध करता येण्याची शक्यता नाही. माझी खात्री आहे की, माझा प्रत्येक वाचक भूगोलक्षेत्राचे बाहेरील अशा काही विषयांची नावे सांगू शकेल, की ज्या विषयात तो भूगोलक्षेत्रातील विषयांपेक्षाही अधिक पूर्तिक्षम आहे.

भूगोलाचे स्वरुप काय असते आणि त्याचा आवाका केवढा असतो हे ठरविण्यासाठी ' कोणीही भूगोलकार व्यक्ती कोणत्याही टीकेला पात्र न होता विषयातिक्रमण करण्याची शक्यताच रहाणार नाही अशा मर्यादा शोधून काढणे ' हे काही योग्यसे निमित्त होणार नाही. त्यापेक्षा असा एक विषयगाभा ठरवून द्यावा की ज्यात आणि ज्याच्या भोवती कार्य करत असता, आपण कोठे आहो याचे भान ठेवून भूगोलकार विभिन्न दिशांनी जास्तीत जास्त दूर जाऊ शकेल, म्हणजेच भूगोलाभ्यासकाला दिशादर्शन करणे येवढाच हेतू त्यासाठी पुढे ठेवणे योग्य ठरेल. आमच्या सहकाऱ्यांपैकी कोणी कार्यकर्ता विषयगाभ्यापासून इतका दूर वाहवला, की मर्यादातिक्रमण करून, तर्कदृष्ट्या ज्यांना अन्य शास्त्रीय क्षेत्रांत स्थान दिले जावे अशा बाह्य क्षेत्रात तो घुसला आहे असे जरी आमचे मत झाले, तरी तो आमचा निष्कर्ष टीकागर्भ असत नाही. उलटपक्षी, अशा कलमीकरणाने निर्माण होणाऱ्या फायद्याच्या अपेक्षेने आपण अशा प्रकारच्या सफरीना प्रशस्त मान्यता देऊन त्यांचे स्वागत करण्यास काहीच हरकत नाही. आमची मागणी येवढीच. आमची मागणी येवढीच, की भूगोलक्षेत्राच्या सीमासंलग्न बाह्यक्षेत्रात आमच्या कार्यकर्त्यांनी आपली दिशाभूल होऊ देता कामा नये. नाहीपेक्षा, मागे रेंगाळणाऱ्या सहकाऱ्यांकडे पाहून, " आपल्या क्षेत्राचे खरे केंद्र इकडे आहे. सर्व भूगोल कार्यकर्त्यांनी इकडे येऊन कार्य करावे. " असा केविलवाणा आक्रोश करण्याची त्यांच्यावर पाळी येईल !

आपल्या चित्शक्तीच्या सामर्थ्यावर जितके दूर जाता येईल तितके आणि त्याची पूर्तिक्षमता त्याला सुरक्षितपणे घेऊन जाऊ शकेल तिथेपर्यंत प्रसंगानुसार कार्य करत रहाण्याचे वैयक्तिक पूर्णस्वातंत्र भूगोलकाराला प्रदान करण्याचे महत्त्व मान्य करूनही, ' आपले अत्यधिक कार्य भूगोलक्षेत्रास समर्पित करणे ही भूगोलकाराची व्यावसायिक जबाबदारी नाही का ? ', असा प्रश्न वाचकाने विचारण्यास हरकत आहे का ? जो जो स्वतःला भूगोलाभ्यासक म्हणवतो त्याला त्याला बौद्धिक आणि केवळ तात्त्विक प्रामाणिकतेची एक बाब म्हणून, तो

ज्यावर भूगोल म्हणून विश्वास ठेवतो त्या विषयासाठी आपले बहुतांश लक्ष केंद्रित करण्याची आकांक्षा बाळगतोच, असे मी गृहीत धरतो. पण, भूगोल म्हणजे काय हे अधिकारवाणीने सांगणाऱ्यांच्या अभावी जर कोणाला त्याचे कार्य भूगोल क्षेत्राच्या बाहेरचे आहे असे आढळले तर तसे सूचित करणारे त्यांचे ते विधान त्या भूगोलकाराच्या कार्यावर गर्भित टीका करणारे नसते, तर ती भूगोलकाराच्या संकल्पनेवर केलेली टीका असते. कोणाही भूगोलकाराच्या पद्धतितंत्रविषयक लिखाणांतून अथवा त्याच्या आशयप्रधान ग्रंथातून व्यक्त झालेली त्याची भूगोलविषयक संकल्पना त्याच्या सहकाऱ्यांच्या क्रान्तिक विचारमंथनासाठी सदामुक्त आहे याविषयी कोणी शंका घेणार नाही.

' हा भूगोलच आहे का ? ' हा प्रश्न उभा करण्यात गुंतलेल्या समस्यांच्या आम्ही केलेल्या चर्चेचे विधान सारांश रुपाने, " हा प्रश्न केवळ पद्धतितंत्रविषयक हेतूपुरताच नेमका सुसंबद्ध आहे. " अशा शब्दात करावयास हरकत नाही. काही विशिष्ट आशयप्रधान ज्ञानांश एका विशिष्ट अभ्यासलेखात समाविष्ट केलेला असेल, तर त्यातील विषयाचे वर्गीकरण आणि संघटन आपल्या विचारधारेशी जुळते का, हे तपासून पहाण्याची त्याची समस्या त्या वाचकाच्या व्यक्तिगत गरजेतून निर्माण झालेली आहे. अर्थात, त्या प्रश्नाच्या त्याने स्वतःच दिलेल्या उत्तराविषयीची आस्था फक्त त्यालाच असणार. म्हणूनच आपल्या या उत्तरासंबंधी आणखी कोणाला आस्था असेल असे मानण्यास कोणतेच सबळ कारण त्याच्यापाशी नाही. सर्वसाधारण चर्चेच्या दृष्टीने म्हणाल तर, त्या चर्चेचा विषय केवळ पद्धतितंत्रविषयक उहापोह येवढाच असेल तर मात्र तो प्रश्न विषयसंगत समजला जाईल. त्या परिस्थितीत त्या आशयप्रधान लिखाणांचे वर्गीकरण केल्याने क्रान्तिक विचारमंथन उद्‌भवेल. पण, कोणत्याही परिस्थितीत, यां चर्चेची क्रान्तिक छाया त्या आशयप्रधान लिखाणांवर अथवा त्यांच्या लेखकांवर पडेल असे मानले जाण्याची शक्यताच नाही.

## व्यक्तिगत समस्या

या पूर्वीच्या विभागांत केलेल्या भूगोलकाराविषयीच्या चर्चेने या पत्रिकेत चर्चिलेल्या सर्व समस्यांच्या तळाशी असणाऱ्या प्रमुख अडचणीपर्यंत आपण येऊन पोहोचलो आहोत– म्हणजेच वैयक्तिक मताच्या समस्येपर्यंत पोहोचलो.

शेवटच्या विभागापूर्वीच्या सर्वच विभागांत, भूगोलकारांच्या लिखाणांचा उल्लेख जणू ती लिखाणे स्वयंभू आहेत, त्याचा लेखकांशी काडी-मात्र संबंध नाही, अशा थाटात केलेला आहे. ती एक वस्तुस्थिती आहे, हेच त्या गृहीतकाचे प्रामाण्य होय. जेव्हा कोणी लेखक आपले लिखाण प्रकाशित करतो, तेव्हा तो आपले ते अपत्य वाऱ्यावर सोडून देतो. जगावयाचे की मरावयाचे, वाचकांवर प्रभाव पाडावयाचा की नाही याचा, तो लेखक त्याच्यासाठी काय करू शकतो याच्याशी मुळीच संबंधित नसतो. लेखक आपल्या अपत्याचे कल्याण चिंतत रहातो का त्याचे अपत्यत्वच पूर्णतः अमान्य करतो याचा विचारही न करता

ते प्रकाशन आपले स्वतंत्र जीवन जगतच रहाते. पण, ज्या ज्या वेळी वाचनालयातील एखादा वाचक त्याला काय सांगावयाचे असते त्याला बौद्धिक प्रतिसाद देतो तेव्हा त्याचे पुनरुज्जीवन होते. कदाचित ह्या वेळे पावेतो मूळ लेखक दिवंगत झालेला असतो आणि एक व्यक्ती म्हणूनही त्याच्या स्मृती शिल्लक राहिलेल्या नसतात.

हे चित्र एवढ्यानेच पूर्ण होणार असते, तरीही आपल्या समस्या संपल्या असत्या. एकदा प्रकाशित झालेली लिखाणे पशु-पक्षांच्या पिलांप्रमाणे त्यांच्या लेखक पित्यांशी काहीच संबंध ठेवत नाहीत. पण लेखकाचे नाते मात्र मानवी माता-पित्याप्रमाणेच त्यांच्या प्रकाशनांशी जोडले जातच रहाते. तरी, हे अपत्यप्रेम केवळ भावनिक असत नाही. मानवाची ख्याती, निदान विद्येच्या क्षेत्रात, त्याच्या बौद्धिक अपत्यांमुळेच बव्हंशी निर्धारित होत असते.

पंडितांच्या क्रान्तिक चर्चांमधून टीकाकार विचार करत असतो तो लिखाणांचा असतो लेखकांचा नसतो, हा तर सार्वत्रिक नियम आहे. लिखाणावर केलेल्या टीकेने लेखक व्यक्तीचा अवमान होण्याची शक्यता आहे, हे कळत असूनही, आपण आशयप्रधान लिखाणांवरील क्रान्तिक परीक्षणे त्याच्या लिखाणावरील न्याय्य टीका आहे, त्या लेखकांवर चढविलेले हल्ले नव्हेत, असे मानूनच वाचत असतो.

तथापि, आशयप्रधान लेखनाच्या मानाने पद्धतितंत्रविषयक लिखाण लेखक या व्यक्तीच्या विचारांशी कितीतरी अधिक निगडित असल्यासारखे दिसते. आशयप्रधान ग्रंथातील आशयाचा बराच मोठा भाग वस्तुस्थितींनी घटित असतो; म्हणूनच त्यांच्यावर कोणा व्यक्तीचे स्वामित्त्व असत नाही; पण, तो जे विचार व्यक्त करतो ती जणू त्याची अभीष्ट मालमत्ताच असल्यासारखी दिसते. वास्तविक एका दुर्दैवी पण अटळ रुढीमुळे वरील मत आणखी भारदस्त होते. वास्तविक, आमचा संबंध लेखकांशी नसून लिखाणाशी असतो, तरीही पद्धतितंत्रविषयक चर्चांमधून त्या लिखाणांचा उल्लेख त्यांच्या शीर्षकांच्या नावांनी न करता त्यांच्या लेखकांच्या नावांनी विशेषे करून केला जात असतो. आशय प्रधान ग्रंथ वेगवेगळी एककेच मानली जातात, कारण त्यांची शीर्षके त्याना हाताळण्यासाठी बसवलेल्या सुबक मुठींसारखी असतात. कधी-कधी तर ती शीर्षकेच लेखकांच्या नावांपेक्षा अधिक तोंडी असतात. पण पद्धतितंत्रलिखाणांची चाल अगदी याच्या विरुद्ध असते. एखाद्या ग्रंथाचा उल्लेख आम्ही " जगातील शेतीचा भूगोल ", " कॅलिफोर्नियातील रहाळ ", किंवा " दक्षिण जर्मनी " (Sud-deutsch-land) असा केला तर आपल्या वाचकाला आम्ही कोणत्या संदर्भात बोलतो आहे, हे सहज कळते. पण, "समकालीन भौगोलिक पद्धतींवर काही टीका "," भूगोलाच्या आशयाबाबतचा विश्लेषणात्मक अभ्यास ". किंवा " भूगोलाच्या पद्धती व परंपरा ". असा शीर्षकांचा उल्लेख पुन्हापुन्हा केला तरी, फारच थोड्या वाचकांना आपल्याला सुपरिचित असलेल्या डेव्हिस, लायली, हेटनर यांच्या अभ्यासलेखांचे आहेत याची ओळख पटेल. शिवाय, बऱ्याचशा बाबतीत पद्धतितंत्रविषयक अभ्यासलेख ही वेगवेगळी एकके असत नाहीत. अनेक वर्षांच्या काळात प्रत्येकाला स्वतंत्र शीर्षक देऊन लिहिलेल्या

पुष्कळशा लेखांवरून सारतः एकच दृष्टिकोण सादर केला जाण्याची शक्यता असते. अशा विविध लेखांना एकत्र बांधणारे एकच ओळखपत्र म्हणजे लेखकाचे नाव.

पद्धतितंत्रविषयक चर्चा व्यक्तिगत ओळखण्याच्या या वृत्तीचा एक दुष्परिणाम असा होतो, की जेव्हा कोणी टीकाकार एखाद्या पद्धतितंत्रविषयक प्रबंधाचे तर्कशुद्ध विश्लेषण करतो, ते ज्याने तो प्रबंध सादर केला त्या लेखकाचेच तो विश्लेषण करत असतो असे मानले जाते. तसेच मूळ लेखक काही स्पष्टीकरण देण्यासाठी किंवा त्या प्रबंधाच्या समर्थनासाठी प्रत्युत्तर देऊ लागतो, तेव्हा तो जणु स्वतःचाच बचाव करतो आहे असे मानले जाते; आणि मग ती एकूण चर्चाच वैयक्तिक द्वंद्वाचे रूप घेते. त्यात गुंतलेले औपपत्तिक प्रश्न आपल्या दृष्टीने फार जिव्हाळ्याचे असतात म्हणून असे होते असेही नाही. उलटपक्षी त्यांच्याबाबत आपण पुरेशा गंभीरपणे विचार करत नसल्यामुळे आपले लक्ष सहजच त्याप्रश्नांच्या बाह्यरुपाच्या पण अधिक प्रक्षोभक बाबींनी वेधून घेतले जाते. शास्त्रीय चर्चांच्या तळाशी जी वस्तुनिष्ठतेची घनता असते असे गृहीत धरले जाते त्या घनतेच्या पातळीला आम्ही अद्याप पोहोचलो नाही. शिवाय आपापल्या क्षेत्रात लक्षवेधी प्रतिष्ठा प्राप्त झालेल्या प्रशिक्षित व्यक्ती तर्कशुद्ध युक्तिवाद करत असताना चुका करतच नाहीत अशी अपेक्षा केली जाते. हे चुकीचे गृहीत प्रमेय हाच एक जास्तीचा कारक होऊन बसतो. परिणामतः अशा एखाद्या चुकीचा आढळ झालाच तर तो मूळ विचारधारेत योग्य दुरुस्ती करणारा प्रेरक होत नाही तर ती त्या श्रेष्ठ व्यक्तीवर केलेली विघातक टीका मानली जाते. अशा सभांतून उभयपक्षी एकमताचे मुद्दे अधोरेखित होण्याऐवजी खोडून टाकले जातात, मतभेद भव्यरुप धारण करतात आणि याचे बक्षीस म्हणून सत्यार्थदर्शना ऐवजी वैयक्तिक प्रतिष्ठा पदरात पडते.

या व्यक्तिगत निष्ठेपासून मुक्त होणे आपल्याला शक्य झाले, चर्चा चालू असता आपले लक्ष लेखकांवर केंद्रित करण्याऐवजी लिखाणांवर केंद्रित करणे शक्य झाले, तर या आधी नोंदलेल्या पुष्कळशा अडचणी चर्चेच्या वेळी टाळता येतील. त्यामुळे एखादा लेखक आपल्या आशयप्रधान लिखाणांपेक्षा स्वतःचे पद्धतितंत्रविषयक लिखाण कमी महत्त्वाचे समजतो, हा विचार वरील चर्चांत अस्थानी ठरेल. समोर असलेले लिखाण वाचकांच्या विचारांवर प्रभाव पाडण्याच्या दृष्टीने येवढाच प्रश्न या ठिकाणी सुसंबद्ध असतो. तसेच एखादे लिखाण नुकतेच प्रकाशित झाले किंवा तसे करून वीस वर्षे लोटली का शतके लोटली हा प्रश्न तितकाच असंबद्ध ठरतो. जर कोणत्याही लिखाणाचा प्रभाव आजच्या अभ्यासकांच्या प्रचलित विचारसरणीवर पडत असेल, तर ते लिखाण वर्तमान काळातही लक्षवेधी लिखाण म्हणून त्यावर चर्चा करणे उचितच ठरेल. इतकेच काय एखादी विचारसरणी ही त्याच्याच लेखकाचा वर्तमान दृष्टीकोण आहे का, याही गोष्टीचा भौगोलिक लिखाणावरील टीकाकाराशी संबंध नसतो. एखाद्या लेखकाने एकेवेळी व्यक्त केलेला दृष्टीकोण आता तसा राहिला नसेल, तर हा आपल्या

विचारसरणीतील बदल वाचकांपर्यंत पोहोचविण्याची जबाबदारी लेखकाची आहे, टीकाकाराची नव्हे. फक्त जशी ती भौगोलिक साहित्यांतून व्यक्त असेल तशीच ' प्रचलित विचारधारा ' टीकाकाराने लक्षात घ्यावी अशी अपेक्षा करणेच सयुक्तिक ठरते [१].

थोडक्यात सांगावयाचे तर विद्येच्या सर्वच शाखांतील एक सार्वत्रिक नियम पद्धतितंत्रविषयक चर्चांनाही लागू पडतो. पांडित्याचा संबंध लिखाणाशी असतो लेखक-व्यक्तीशी नसतो. पद्धतितंत्रविषयक टीकेचाही रोख संबंधी लिखाणावर असला पाहिजे, व्यक्तीवर असता कामा नये. आणि ही, मर्यादा अशा टीकाकारांनी सतत व सक्तीने राखली पाहिजे; तरच चर्चेचा भार व्यक्ति निरपेक्ष पातळीवर टिकवून धरता येईल. प्रस्तुत लेखकाने यदा कदाचित वर दिलेल्या प्रमाणरेषांना चिकटून रहाण्यात कसर केली असेल आणि त्यामुळे ज्यांचा अधिक्षेप झाला असेल त्यांची या निमित्ताने मी माफी मागत आहे. ही सक्ती प्रबंध वाचला जातो आहे तोपर्यंत दोनही पक्षांना सारखीच लागू आहे, याची वाचकाला आठवण करून देणे न्याय्य होईलसे वाटते. आणि मगच ती खरी वाचक-लेखक चर्चा होते !

एक समाजगट या नात्याने, अमेरिकी भूगोलकार पाळत असलेल्या विद्यमान रुढी व प्रमाणे यांच्यावर आम्ही केलेल्या पद्धतितंत्रविषयक बहुतांश चर्चेमुळे मर्माघात झालेला आहे, म्हणूनच ज्याकडे मोठ्या अभिमानाने अंगुलिनिर्देश करण्यास हरकत नाही अशा एका सुप्रतिष्ठित रुढीला मान देऊन या चर्चेचा उपसंहार करणे संयुक्तिक होईल. माझ्या कल्पनेप्रमाणे, जो अगदी सुप्रतिष्ठित परिपाठ असल्यामुळे ज्याने एका सक्तीच्या सामाजिक कायद्याचे रूप धारण केले आहे त्याचाच, मी येथे उल्लेख करतो आहे. तो असा एखादी पद्धतितंत्रविषयक चर्चा वैचारिक कलहाऐवजी वैयक्तिक कलह निर्माण करत असल्याचे दिसले, तरी ते संघर्ष जास्तीत जास्त स्पर्धा सारखेच असल्याचे मानले जाते. अशा संघर्षांना चकमकी इतकेही महत्त्व दिले जात नाही, युद्धाचे तर नाहीच नाही ! बौद्धिक अश्वाने आपल्या स्वारास खाली फेकले –मग तो घोडा कितीही उंच असो– तरी तो स्वार दगावत नाही. उलटपक्षी, तो अनुभव सतत चालू रहाणाऱ्या शैक्षणिक प्रक्रियेचा एक भाग आहे, असेच मानले जाते. गेली वर्षानुवर्षे, " पद्धतितंत्रविषयक मतभेद हे वैयक्तिक शत्रूत्वासाठी अथवा ज्ञानक्षेत्रातील पंथनिर्मितीसाठी वापरावयाचे आधार नव्हते ", या तत्त्वाला अमेरिकी भूगोलकार सातत्याने चिकटून राहिले. ज्यामुळे भूगोलक्षेत्रातील मित्र भावाला तडे जातील अशा रीतीने कोणालाही डिवचण्याचे प्रकार टाळण्यासाठी प्रस्तुत लेखकाने व संपादकीय टीकाकारानी, ' भूगोलाचे स्वरुप ' या ग्रंथाच्या लेखन कालात जे प्रयास केले त्याची वाचकाला कल्पनाही करवणार नाही. हे प्रयत्न आपल्यापुरते तरी पूर्णपणे यशस्वी झाले असोत व नसोत, सर्व संबंधितांकडून जे कळाले त्यावरुन असे म्हणता येईल, की त्या प्रयत्नाना पूर्ण सहकार्य लाभले आहे. अमेरिकी भूगोलकारांचे एकमत होवो वा न होवो, ते उच्च प्रतीचे व जिव्हाळ्याचे बौद्धिक संबंधयोग टिकवून धरतातच.

---

१. C/O क्लिमने केलेल्या या मुद्यावरील चर्चा. ४८८.

## ग्रंथ पाठ्यलेखनात (Text) उद्धृत केलेल्या

# संदर्भ-ग्रंथांची सूची

**(ग्रंथनामांक तिरकस अंकांनी व पृष्ठांक सरळ अंकांनी दाखविलेले आहेत).**

' भूगोलाचे स्वरूप ' हा अभ्यासग्रंथ भूगोल विषयाभ्यासकांच्या लिखाणांतून निर्माण केलेला आहे. त्याच्या पाठ्यलेखनात अशा संदर्भ ग्रंथांचा उल्लेख पानांपानांवर आलेला आहे आणि त्या त्या ठिकाणी त्यांचा निर्देश संक्षिप्त रुपांत कंसात केलेला आहे. अशारीतीने उल्लेख केलेल्या संदर्भ ग्रंथांची नामसूची रुढीचा अतिक्रम करून संदर्भाच्या सोईसाठी पाठ्यग्रंथाच्याही आधी छापलेली दिसेल.

पाठ्यलेखनात अंकांनी कंसात दाखविलेला संदर्भांक प्रस्तुत यादीतील त्या ग्रंथनामाचा क्रमांक दाखवितो. संदर्भग्रंथातील ज्या पृष्ठांवरून संदर्भ घेतलेला असतो ते पृष्ठांक ग्रंथाकारापुढे स्वल्पविराम टाकून दाखविले आहेत.

अभ्यासकांना अधिकात अधिक उपयुक्त व्हावी म्हणून या यादीतील ग्रंथ काही गटात विभागून मांडलेले आहेत. प्रत्येक गटातील ग्रंथनामे अंदाजे कालक्रमानुसार मांडलेली आहेत. फक्त शेवटी दिलेला संकीर्ण गट या नियमाला अपवाद आहे. सूचीच्या पहिल्या विभागात चालू शतकाच्या आधीच्या काळात झालेल्या भौगोलिक विचारांच्या ऐतिहासिक विकासाशी संबंधित संदर्भ आहेत. फक्त शेवटी संकीर्ण गट या नियमाला अपवाद आहे. सूचीच्या पहिल्या विभागात चालू शतकाच्या आधीच्या काळात झालेला भौगोलिक विचारांच्या ऐतिहासिक विकासाशी संबंधित संदर्भ आहेत, त्यात ऐतिहासिक व चरित्रात्मक अभ्यास ग्रंथांबरोबरच भूगोलविषयक ग्रंथांचा अंतर्भाव केलेला आहे. दुसरा आणि मोठा विभाग चालू शतकातील भौगोलिक विचारांच्या ऐतिहासिक विकासाशी संबंधित आहे. पुढे दिलेल्या आराखड्यात याच मांडणीचा निर्देश केला आहे :—

१. सन १९०० पूर्वीचे ऐतिहासिक व भौगोलिक विचार (ग्रंथनामांक १ ते ८२).
   सर्वसाधारण ऐतिहासिक अभ्यास (१ ते ११).
   वेगवेगळ्या भूगोलकारांच्या ग्रंथांचे क्रान्तिक परिशीलन (१२ ते ३७).
   पद्धतितंत्रविषयक आणि सोदाहरण स्पष्टीकरणात्मक ग्रंथ (३८ ते ८२).

२. विसाव्या शतकातील भौगोलिक विचार (८३ ते ४००).
   भौगोलिक ग्रंथाचे सामान्य सर्वेक्षण (८३ ते ११०).
   शास्त्रांचे अभौगोलिक क्षेत्रांचे तत्त्वज्ञान (१११ ते १२०).
   भौगोलिक विचारांचे पद्धतितंत्रशास्त्र (१२१ ते २२४).
   जर्मनीतील (१२१ ते १८१).
   फ्रान्समधील (१८२ ते १८७).

## पुरवणी संदर्भ ग्रंथ—सूची



उपयोजनात्मक भूगोलाचे पद्धतितंत्रशास्त्र (४५१ ते ४६०) कंसातील Bibliography (ग्रंथ सूची) हा शब्द असे सूचित करतो, की संदर्भित अभ्यासग्रंथात विशेषेकरून उपयुक्त ठरणारी ग्रंथनामे या यादीतही समाविष्ट आहेत. ही यादी क्वचित् स्वतंत्र संदर्भसूचीच्या स्वरूपात असेल किंवा तळटीप संदर्भाच्या स्वरूपातही असेल.

[टीप : मूळ ग्रंथात दिलेल्या संदर्भ यादीतील ग्रंथनामे इंग्रजीत व अन्य युरोपीय भाषांत दिलेली आहेत. ग्रंथनामांचे मराठी भाषांतर ही कल्पना मनाला न पटल्यामुळे ती मूळग्रंथांत जशी आहेत तशीच प्रस्तुत यादीत छापली आहेत. ग्रंथाच्या पाठ्यलेखनात (text) संदर्भित ग्रंथनामे परकीय भाषेत असतील तर ती त्यांच्या मूळभाषेतच तेथेच छापलेली आहेत—**भाषांतरकार**].

## A—History of Geographical Thought before 1900 A. D. General Historic Study

1. Wisotski, Emil : "Zeitstromungen in des Geographie". Leipzig. 1897 (Bibliography).

2. Hettner, Alfred : Die Entwicklung der Geographie in 19 Jarhundert Geogr. Ztschr- 4 (1898), 305-320. [Expanded in 161, 1-109].

3. Richthofen, Ferdinandfran-Von : Triebkrafte unt Richtungen der Erdkunde in neunrehnten." (Rektoratsrede, University of Berlin 1903). Ztschr. d. Geogr. f. Erdk. Berlin, 38 (1903) 655-692.

4. Gunther, Siegmund : "Entwicklung der Erdkunde als Wissenschaft", Teil and Hilfswissenschaften der-selben". in Rohte K. C. und E Weyrich, Dev Moderne Erdkunde-unterricht, wein-Leipzig 1912, 7-40.

5. Becker, Anton : "Entwicklungen der Erdkunde- unterrichts". in Rothe K.C. und E. Weyrich. Dev Moderne Erdkunde-unterricht. Wein Leipzig. 1912, 41-55.

6. Wagner, Hermann : "Lehrbuch der Geographie". Hannover 1920. Einleitung". 17-36.

7. Smichtt, Pete Heinrich : "Wirtschaftsforschung und Geographie," Jena 1925 (Bibliography).

8. Plewe, Ernst : "Untersuchung iiber den Begriff, "Vergleischenden, Erdkunde und seine Anwendung inder newren Geographie." Ztschr. d. Ges. F. Erdkunde Berlin Erg. Heff 4 (1932) (Bibliography).

9. Wreight, John Kirtland : "A Plea for the History of Geography." Iris (Bruxelles). 8, 1925, 477-491. (Excellent Bibliography on the History of Geography.).

10. Dickinson, Robert E : and O. J. P. Howarth : The Making of Geography. Oxford. 433.

11. Burger, Karl : "Der Landschaftsbegrift an Beitrag zur Geographischen Erdraum anffassung." Dresdenergeographistulien 7, 1935 (Bibliography). Abstract by K. H. Heggins, "Landscape as Landschaft" Geography, 21 (1936), 225f.

### Biographical and Critical Studies of the Works of Individual Geographers

12. Gerland, Georg : Immanual Kant. Seine Geographischen und Anthropologischen Arbeiten, Kant Studien, 19 (1905), 1-43, 417-547. Also published seperately. Berlin 1406.

13. Adickes, Erich : Kant's Ansilchten uiber Geschichte und Bau ider. Erdk. Tubingen 1911.

14. idem : untersuchungen zu Kant's physicher Geographie, Tubeingen 1911.

15. idem : Ein Neu Antgefundenes Koilegheft nach Kant's Vorlesung unber physiche Geographie, University, Tubingen 1913. Review of this and two preceding titles by O. Schluter.

16. Dove,Alfred : Johann, Reinhold foster : and George f. Forster. Allg. dentsche Biographie, 7 (1878), 166-181.

17. Fung Breife der Gebsuder Von Humboldt an Johann Reinhold Forster. Edited by F. Jonas. Berlin 1899.

18. Goethe's Brief Weschel mit wilhem und Alexander V. Humboldt. Edited by L. Geiger. Berlin 1919.

19. Briefwechsel Alexander V. Humboldt's mit Heinrich Berghans. Edited by Berghans 3 vols. Jena 1862. 1869.

20. Brihns, Karl, editor : Alexander V. Humboldt. Eine Wissenschafttischea Biographie. 3 vols. Leipzig 1872. English Edition Vol. 1-2 only, London 1873. (Bibliography). (The references in this paper are taken from Bibliographical sections of Vol. I by J. Lowenberg and Vol. II by A-Dove and the critical essay in Vol. III by A. H. R. Grisebach. Pischel's essay is reprinted in Abhandlung {66}) .

21. Dove, Alfred : " Alexander Humboldt. " Allq. Deutsche Biographie 13(1881), 358-383.

22. Döring, Lothar : Wensen und Aufgaben de Geographie lei Alexander Von Humboldt Bis. Uiniv, Frankfurt, 1930. Published also in Frankfurter Geograph. Hefte. 1931 Bibliography.

23. Rehder, Helmult : Die Philosophie der undlischen Landschafter unsprwng und ihre follendung Diss. Heidelburg 1929.

24. Kramer, Gustau : Carl, Rilter. in Lebensbild nach seiner Landschaftlischen Nuchiass-2 vols. Hallo 1864, 1870.

25. Marthe F : was bedoutet Carl Ritter fur die Geographie. Berlin 1880, Brachme reprinted with additions Ztschr d. Ges f. Erdkunde, Berlin 1879. 374-400.

26. Ratzel Friedrich : " Zn Cart Ritters hundertjarigem Geburtstage " in Kleine schriften. Munich 1906, I, 377-428. Originally published in newspaper, 1879, in part also in Allq. dentsche Biography 49(1904), 163-172.

27. Hozel Emil : " Das geographische Individnun ber Carl Ritter und seine Bedentung fur den Begriffdes Naturgebeites und der Naturgrenze ", Geogr- ztschr. 2(1896) 378-96, 433-444.

28. Frobel Julius : Ein lebenslauf Aufzeichnungen Ervinnetrungen und Bekenitnisse, 2 Vols. stutgart 1890-1891. Abstract in Allq. Dentsche Biographie, 49, (1904) 163-172.

29. Hantzsch Victor : " Ernst Kapp. " Allq. Dentsche Biographie, 51 (1906), 31-33.

30. Garardin, Paul : and Jean Brunhes. " Elisee Reclus' Leben und Wirken. " Geogr. Ztschr. 12(1906), 65-79.

31. Ratzel Friedrich : " Oscar Peschel. " Allq. dentsche Biographie, 25 (1887), 416-430. Repub. in Ratzel. Kleine Schriften Munich 1906, I, 429-447.

32. Hettner, Alfred. Ferdinand von Richthofens Bedentungen fur de Geographie Ztschr, 12(1906), 1-11.

33. ula Wille : " Alfred Kirchhoff. " Geogr, ztschr, 13(1907), 537-552.

34. Steffen Hans : " Erinnerungen an Alfred Kirchoff, als Methodiklex Enversitatslehrer, " Gegr, ztschr 25(1919) 289-302.

35. Helmodt, Hans : " Freidrich Ratzel, ein lebensabriss von ihm selbst und fom Herbausgeben in Ratzel, Kleine schriften, Munich, 1906 (H. Helmodt, editor), I, XXI-XXIII.

36. Hassert, Kurt : " Friedrich Ratzel, Sein Leben und Wirken. " Geogr. Ztschr. 11(1905), 305-325, 361-380.

37. Sapper, Karl : " Georg Gerland, " Geogr-Ztschr, 25(1919), 329-340.

**Methodology, with Illustrative Works***

38. The Geography of Strabo. Trans. by H. C. Hamiltan and Falconev London 1892.

39. Kant Immanuel : Vorkreitisch shriften in Kant's Gesammetle shriften, Berlin, Academy of sciences edition B. D. I, II, (1901, 1905) (Includes various short studies on the earth and its movements, earthquakes and winds and statements of his programme for the course in " Physical Geography " for various years originally published 1754-1765, Bd.I, 183-204, 417-472. 489-503, II, 1-12, 312f 443. See also Reflexionen zur Physischen Geographie, Edited by E. Adikes for manuscripts. Bd XIV (1911), 539-635).

40. Immanuel Kant's physische Geographie, edited by F. T. Rink First published Konnigsberg. 1802, evidently from manuscripts of 1775 and 1759 (see footnote 3 in text). Republished in various editions of Kant's works perticularly in edition published by Berlin Academy of sciences, Kant's Gesammelte Schriften, Bd. IX (1923), 151-436, with notes by Paul Gedan (509-568).

41. Forster, John Reinhold : Observations made during A Voyage Round the World, on physical Geography, Natural History, and Ethic Philosophy. London, 1778.

42. Humboldt Alexander V. Florae Fribergensis Specimen. Berlin 1793. (Long footnote on the division of sciences concerned with nature (ix-x).

43. Idem : Ideen zn einer Physiognomik de Gewasche (Brochure), Tubingen, 1806.

44. idem : Ideen zn einer Geographie der Pflanzen nebst einem Naturgemoide der Tropenlander, Tubingen (1807).

45. idem : Ansichten dev Natur : mit wissenschaftlichen Erlauterungen. Stutgarf, 1808, 1849.

* पुरवणी टीप क्रमांक १ पहा. (*See Supplementary note 1).

46. idem : Essai Politique sur le royaume de la nauvelle Espagne. Paris, 1811.

47. Idem : Relation historique du Voyage anx regions equinoxiatus du Nanveau Continent. 3 vols, Paris 1814 to 1825.

48. Alexander von Humboldts Natur and Kultuschilderungen. ausge wahlt und eingeleitet von Karl H. Dietzel, Leipzig. 1923. [selections. chiefly from the three preceding works.]

49. Ritter Carl : Die Erdkunde um ver hultniss zur Natur und zar Geschichte des Menschen, oder allgemeine vergleichende Geographie als sichere Groundlage des studium and unterrichts in physicalischen und historischen wissenschaften. 19 vols. (2nd. ed. of Vol. I and II), Berlin 1822-59 [Introduction, I -188. republished in 50].

50. idem : Einleitung zur allgemeinen vergleichenden Geographie, und Abhandlungen zur Begrundung einer mehr Wissenschaftlicheu Bhandlung der Erdkunde. Berlin, 1852. Republication of "Einleitung" and "Allgemeine Vobemerkungen uber the festen Formen der Erdrinde," both from the Erdkunde (1817) ; and five lectures given before the Akad. d. Wissenschaften, Berlin, 1826, 1828, 1833, 1836, 1850 and previously published in Abandlung d. Kgl. Akad.----- (his-phil. kl).

51. Bucher, August Leopold von den Hindrvnissen, welche dev Einfuhrung eines besserung Ganges berum Vortragg der Erdkunde of schulen in wege stehen. Coslin 1827.

52. Humboldt Alexander v : Vorlesungen uiber physikalische Geographie nebst Prolego meneuiber stellung der Gestirne, Berlin in winter 1827-28. Edited by Miron Goldstein, Berlin 1934.

53. Fro"bel Julius : Geographisch Statistiche Besechreibung von ober und Neider Peru, Argentinien, urugary and Paraguay Vol . 20 of Handbuch neuesten Erdbeschreibung Ed. by A. C. Garpari Guths Nuts and others. Weimar, 1831-32.

54. Idem : " Einige Blicke auf den jetzingen for mellen zustand der Erdkunde" Amaden der Erd Volkar und staatenkunde (Berqhaus Annalen) 4(1831), 493-506.

55. Ritter Carl : " Carl Ritter's Schrellen an Heinrich Berghans in Berichung anf den vorstehenden Aufsatz des Herrn Julius Frobel." Annalen den Volkar und staatenkunde (Berghaus Annalen (4) 1831), 506-520.

56. Frobel Julius : uber de unterscheidung einer Erdkunde als eigentlicher Naturwisesenschaft und einer historischen Erkunde." Annalen der Erdvolkar und staatenkunde (Berghaus Annalen) ; 6 (1832), 1-10.

57. Idem : Entwurfeines systentes der Geographischen Wissenschaften," Mittheil aus d. Gebiete d. Theoretischen Erdkunde. (Zurich). 1(1836), 1-35, 121-132, Discussed by H. Wagner. Geogr. Jarbuch, 7(1878), 621f.

